ताराबाईकालीन कागदपत्रे
खंड पहिला

शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर
ज्ञानमेवामृतम्



शिवाजी विद्यापीठ
ऐतिहासिकग्रंथमाला

पुष्पपहिले

# ताराबाईकालीन कागदपत्रे

## खंडपहिला

सं...

अ... हेब पवार

शिवाजी विद्यापीठ ऐतिहासिक ग्रंथमाला : पुष्प पहिले

# ताराबाईकालीन कागदपत्रे

## खंड पहिला

**संपादक**

डॉ. आप्पासाहेब पवार

किंमत १० रुपये

## अनुक्रमणिका

# प्रस्तावना

शिवाजी विद्यापिठाने प्रथमपासूनच संशोधनावर अधिक भर दिला आहे आणि संशोधनपर ग्रंथांच्या दोन मालाही सुरू केल्या आहेत : एक 'संस्कृत–प्राकृत ग्रंथमाला' आणि दुसरी 'ऐतिहासिक ग्रंथमाला.' संस्कृत–प्राकृत ग्रंथमालेतील पहिले पुष्प पं. खुपेरकर शास्त्री यांच्या (१) 'श्रुतिसिद्धांत दीपिका' आणि (२) 'श्रुतिसिद्धांत प्रकाश' या जोडग्रंथाने गुंफिले गेले. ऐतिहासिक ग्रंथमालेतील पहिला ग्रंथ ताराबाईकालीन कागदपत्रें खंड–१ आता प्रसिद्ध होत आहे. ऐतिहासिक ग्रंथमालेतील पहिलाच ग्रंथ महाराणी ताराबाई यांच्या संबंधीचे साधन साहित्य म्हणून प्रकाशित होत आहे हे अतिशय औचित्यपूर्ण वाटते. कोल्हापुरचा परिसर महाराणी ताराबाई यांच्या कर्तबगारीशी निगडित झालेला आहे. आक्रमक मोगल फौजांच्या तुफानी हल्याना धैर्याने तोंड देऊन सलग खडकाप्रमाणे अढळ राहिलेले विशाळगड, पन्हाळा, रांगणा, आदिकरून किल्ले महाराणी ताराबाई यांच्या अजोड कर्तबगारीची साक्ष पटवितात. महाराणी ताराबाई यांची कर्मभूमी म्हणून कोल्हापुरच्या परिसराला मराठ्यांच्या इतिहासात अनन्य साधारण स्थान प्राप्त झाले आहे. या थोर व्यक्तीच्या नावाने विद्यापीठाच्या ऐतिहासिक ग्रंथमालेतील पहिला ग्रंथ प्रकाशित होत आहे हे यथायोग्यच आहे. ताराबाईंचा कालखंड प्रदीर्घ म्हणजे इ. स. १६८० ते १७६१ पर्यन्तचा आहे. या कालखंडाची ऐतिहासिक साधनें काही प्रकाशित झाली आहेंत आणि आता काही नवीन प्रकाशित होत आहेत.

"ताराबाईकालीन कागदपत्रे" ही कोठून मिळविली याचा थोडा वृत्तांत दिला पाहिजे. राजाराम कॉलेजमध्ये इतिहास आणि राज्यशास्त्र या विषयांचा प्राध्यापक म्हणून माझी नेमणूक झाल्यावर मी इतिहास संशोधनाचे कार्य हाती घेतले. मराठ्यांचा इतिहास हा संशोधनाचा मुख्य विषय होता. प्रथम मी कोल्हापूर संस्थानचे कागदपत्र तपासण्याचे ठरवून त्यासाठी परवानगी काढली. नंतर त्या भागातील ऐतिहासिक घराण्यांचे कागद बघण्याचे व ते मिळविण्याचे प्रयत्न केले. उन्हाळ्याच्या सुट्टीत मी दूरदूरच्या सहली केल्या. मद्रास येथील फोर्ट सेंट जॉर्ज मधील मॅकेन्झी कलेक्शन व तंजावर येथील सरस्वती महालातील कागदपत्रेही पाहिली, आणि जरूर त्या कागदांच्या नकला करून घेतल्या. पुण्याच्या एलिअनेशन ऑफीसमध्ये अनेक वेळा गेलो आणि तेथील अनेक कागदपत्रांच्या नकला स्वहस्ते केल्या. काहींच्या नकला कारकून ठेवून करून

घेतल्या. काही घराण्यानी मला आपले कागदपत्र घरी घेऊन जाण्यास परवानगी दिली; परंतु बहुसंख्य कागदपत्र मला ज्या त्या ठिकाणीच पहावे लागले. ब्रिटिश हद्दीत जसे इनाम कमिशन बसले तसेच कोल्हापूर संस्थानातही बसले. त्या कारणाने कोल्हापूर संस्थानातील ऐतिहासिक घराण्यांच्या सनदा, कैफियती आणि वंशावळी मागविण्यात आल्या. सुमारे आठ हजार सनदांची दोन मोठाली बाडे लाकडी संदूकीत भरून ठेवली होती आणि त्याबरोबर नऊशे कैफियती आणि वंशावळी होत्या. ( मी जेव्हा हे कागदपत्र पाहिले त्यावेळी या संदूका जुन्या राजवाड्यात खजिन्याजवळ ठेवलेल्या असत. ) हे सर्व कागदपत्र मी जातीने पाहून त्यांचे उतारे केले. ताराबाईकालीन कागदपत्रांत समाविष्ट केलेल्या बहुतेक सनदा या बाडामधील आहेत. याशिवाय कोल्हापुरच्या रेकॉर्ड ऑफिस-मधील कागदपत्रातून निवडलेले कागदही घेतले आहेतच.

## यादव दप्तर :

अगदी अचानकपणे यादव दप्तराचे कागदपत्र हाती आले. या घराण्याचे कागद प्रथमतः आजच प्रकाशित होत आहेत. या कागदातून या घराण्याची हकीकतही कळून येते. हे सगळे कागद अस्सल असून त्यांच्यापैकी काहींची छायाचित्रे या खंडात दिली आहेत. महाराणी ताराबाईंच्या हस्ताक्षराचा कागद याच दप्तरात मिळाला. यातील स्वरूपजी यादव व गिरजोजी यांच्या परगणा कराड येथील देशमुखीच्या विभाजनाचा महजर अत्यंत महत्वाचा आहे. याची लांबी ६७ फूट ६ इंच असून, रुंदी सव्वासहा इंच आहे. समास उजव्या व डाव्या बाजूंस प्रत्येकी इंचभर ठेवला आहे. प्रत्येक चिकटबंदावर मागील बाजूस दोन शिक्के आहेत. यादव दप्तरातील कागद ताराबाईकालीन घडामोडींची हकीगत सांगणारे महत्वाचे असे कागदपत्र आहेत.

## बावडा दप्तर :

राजवाडे यानी बावडा दप्तराचे संशोधन करून सुमारे २०० कागद निवडून त्यांचा एक स्वतंत्र खंड प्रसिद्ध केला. पुढे पंत अमात्य श्रीमंत परशुराम भाऊसाहेब यांच्या आज्ञेने बावडा दप्तर फिरून प्रकाशित करण्याचे काम श्रीयुत के. गो. सबनीस यानी अंगावर घेतले. श्रीयुत सबनीस यानी बावडा दप्तराचे दोन खंड प्रसिद्धही केले. त्यानंतर मीही बावडा दप्तर तपासण्याची परवानगी मागितली. ती मिळाल्यावर ह्या दप्तराचे मी फिरून संशोधन करून त्यातून काही कागद मिळविले. त्यांचा अंतर्भाव या खंडात केला आहे.

**इतर घराण्याचे कागद :**

बावडा दप्तराप्रमाणे कोल्हापूर शहरातील आणि संस्थानातील इतर ऐतिहसिक घराण्याचे कागदपत्र पाहण्याचा प्रयत्न मी केला. कापशीकरांचे रेकॉर्ड, जोशीराव घराण्याचे रेकॉर्ड, त्याचप्रमाणे मुनीश्वर दप्तर, साठम घराण्याचे कागदपत्र, इ. पाहण्याची संधी मला लाभली. या सर्व संग्रहांतील उपयुक्त कागदाच्या नकला मी केल्या. त्या कागदपत्रांपैकी बरेच कागद या खंडात आले आहेत.

**काव्ये :**

मद्रासच्या फोर्ट सेंट जॉर्ज मधील मॅकेन्झी कलेक्शन्स, तंजावर येथील सरस्वती महाल मधील हस्तलिखित संग्रहाच्या आणि पुण्याच्या एलिअनेशन ऑफिसमधील कागदांचा निर्देश मी आरंभी केलाच आहे. या तिन्ही संग्रहातून उपयुक्त अशा ज्या कागदांच्या नकला आणल्या त्यांपैकी काही कागदांचा अंतर्भाव या खंडात झालेला आहे. परशुरामचरित्र हे काव्य मॅकेन्झी कलेक्शनमधून घेतले आहे, तर ताराबाई-वरील काव्य तंजावरच्या सरस्वती महालातील हस्तलिखितामधील आहे.

**तळबीड दप्तर :**

महाराणी ताराबाई यांच्या माहेरचे म्हणजे तळबीडकर-मोहिते घराण्याचे काही कागदपत्र राजवाडे यानी " इतिहास आणि ऐतिहासिक " या मासिकात ( भाग ५ वा. पृ. १०६-१३६ ) तळबीड दप्तरातून प्रसिद्ध केले आहेत. हे मूळ दप्तर तपासण्याचा योग मला दोन वर्षांपूर्वी आला. राजवाडे यानी विचारात न घेतलेले असे या दप्तरातील काही कागद या खंडात समाविष्ट करण्यात आले आहेत. यात काही अस्सल आदिलशाही फर्माने आहेत. या खंडात त्यांची छाया-चित्रे दिली असून त्यांचा मराठी गोषवारा सुप्रसिद्ध इतिहासलेखक आणि फारशी-पंडित श्रीयुत सेतु माधवराव पगडी यानी केला तोच येथे दिलेला आहे. या कागदात ताराबाईचे वडील हंबीरराव मोहिते सेनापती यांचा निर्देश असलेले दोन कागद व नेताजी पालकर यानी केलेले पाटिलकीचे निवाडपत्र व एक अभयपत्र असे महत्वाचे कागद आहेत.

**पोर्तुगीज कागदपत्रे :**

मराठ्यांच्या इतिहाससंबंधीच्या पोर्तुगीजांच्या कागदपत्रांचा बोलबाला पुष्कळच झाला आहे; परंतु या कागदपत्रांचे मराठी भाषांतर अद्याप उपलब्ध

झालेले नव्हते. या खंडात संबंधित अशा पोर्तुगीज कागदपत्राचे भाषांतर देण्यात आले आहे. हे कागदपत्र " Arquivo Portugues Oriental " संपादक Dr. A. de Braganca Pereira व " Assentos do Conselho do Estado " संपादक Dr. P. S. Pissurlencar या ग्रंथातून घेतले आहेत. त्यांचे मराठी भाषांतर श्री. स. शं. देसाई यानी केले आहे. श्री. देसाई यानी काही कागद गोवा पुराभिलेख संग्रहालयातूनही नकलून आणले. तेही या खंडात घातले आहेत.

" ताराबाईकालीन कागदपत्रे " या ग्रंथातील साधने कोठून उपलब्ध झाली हे सांगितल्यावर त्यांचे महत्व काय तेही दिग्दर्शित करावे लागेल. त्यासाठी आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या साधन ग्रंथाचा धावता आढावा घेणे चुकीचे होणार नाही. स्कॉट वेअरिंग ह्या इंग्रजी इतिहासकाराने इंग्रज प्रवाशांच्या आणि इतर ग्रंथकारांच्या सहाय्याने आपला " मराठ्यांचा इतिहास " हा ग्रंथ इ. स. १८१० साली छापून प्रसिद्ध केला. त्यानंतर सुमारे सोळा वर्षांनी इ. स. १८२६ मध्ये ग्रँट डफ् यानी 'मराठ्यांचा इतिहास' प्रसिद्ध केला. ग्रँट डफ् यानी हा इतिहास लिहिण्याचे काम त्यावेळचे इंग्रज मुत्सद्दी मौन्ट स्टुअर्ट एल्फिन्स्टन व जनरल सर थॉमस मनरो यांच्या प्रोत्साहनाने हाती घेतले. इतिहासास लागणारी साधन-सामुग्री सहजगत्या मिळवावयाची अनुकूलता त्याला लाभली होती. मराठी राज्य इ. स. १८१८ मध्ये इंग्रजानी खालसा केल्यावर ग्रँट डफ् ह्यांची साताऱ्च्या प्रतापसिंह महाराजांकडे पोलिटिकल रेसिडेन्ट म्हणून नेमणूक झाली. तिथे महाराजांचा व ग्रँटचा स्नेह जमला. महाराजानी ग्रँट डफ्ना आपल्या जवळील सर्व मौल्यवान कागदपत्र दाखविले. शिवाय शिवाजी महाराजांपासून सर्व राज्यांतील कागदपत्रांचे आगर जे चिटणीस घराणे त्यातील पुरूषानी छत्रपतींच्या कारकीर्दीचा लिहिलेला इतिहास व आपल्या संग्रही ठेवलेले महत्वाचे अनेक कागदपत्र ग्रँट डफ् साहेबास दिले. पुण्याच्या पेशवे दप्तरातून अस्सल पत्रे शोधून काढली. पंत प्रतिनिधी आदि जहागीरदारानी आपल्या दप्तरातील कागदही ग्रँटना दाखविले. अशा रीतीने विपूल माहिती मिळवून ग्रँटसाहेबानी मराठ्यांचा इतिहास लिहिला.

डफ्च्या इतिहासाबद्दल कै. वि. शा. चिपळूणकर यानी प्रशंसोद्गार काढले, तरी इ. स. १८६७–६८ साली कै. रा. ब. निळकंठ जनार्दन कीर्तने यानी ग्रॅन्ट डफ्च्या इतिहासावर टीका म्हणून खरमरीत लेख प्रसिद्ध केला, आणि डफ्च्या इतिहासांत असलेल्या बऱ्याच वैगुण्यावर प्रकाश

टाकला. तेव्हा मराठ्यांच्या इतिहासाचे सर्व कागदपत्र शोधून मिळविण्याचे व प्रसिद्ध करण्याचे काम जिनसीवाले, चिपळूणकर, कीर्तने, साने, मोडक आदि मंडळींनी सुरू केले. विविधज्ञानविस्तारात ऐतिहासिक कागदपत्रे व बखरी प्रसिद्ध होऊ लागल्या, तरी इतिहासासाठी खास मासिकाची आवश्यकता भासून ह्या मंडळींनी " काव्येतिहाससंग्रह " मासिक जानेवारी १८७८ मध्ये सुरू केले. त्यात सुमारे ६,३०० पृष्ठांचे साहित्य प्रसिद्ध होऊन हे मासिक १८९९ मध्ये बंद पडले. इ. स. १८९६ साली पारसनीस यानी इतिहासास वाहिलेले " भारतवर्ष " मासिक काढले. ते तीन वर्षे चालले. त्याचे एकूण २४ अंक निघाले. त्यात अनेक बखरी व ऐतिहासिक कागदपत्र प्रसिद्ध झाले. याच्या आधी म्हणजे १८९४ साली प्रोफेसर विष्णु गोविंद विजापूरकर यांच्या संपादकत्वाखाली " श्रीमन्महाराज शाहू छत्रपति सरकार करवीर यांच्या महनीय आश्रयछत्राखाली प्रसिद्ध होणारी " ग्रंथमाला कोल्हापूर येथे सुरू झाली. या ग्रंथमालेत पुष्कळच ग्रंथ आणि ऐतिहासिक कागदपत्रें प्रसिद्ध झाली. त्यात राजवाडे यांचे खंड २ आणि ३ हेही प्रकाशित झाले. श्री. पारसनीस यानी सन १९०८ मध्ये " ऐतिहासिक संग्रह " मासिक सुरू केले. त्याचा उद्देशही ऐतिहासिक कागदपत्र व माहिती प्रसिद्ध करणे हा होता. या मासिकाचा अस्त इ. स. १९१६ जुलैमध्ये झाला. पारसनीसांच्या तोडीचे काम साने, खरे, भावे यानीही केले. इतिहासाचार्य राजवाडे यानी इ. स. १८९६ मध्ये त्यांच्या हातात ऐतिहासिक कागदांचा अमूल्य ठेवा पडल्यापासून इतिहास संशोधनास सुरुवात केली. इतिहासाच्या सर्व साधनांचा लाभ अभ्यासकास मिळावा म्हणून राजवाडे यानी तारीख ७ जुलै १९१० रोजी " भारत इतिहास संशोधन मंडळ " पुण्यास स्थापन केले. सांप्रत ही संस्था चांगली नावारुपास आली असून अनेक ऐतिहासिक साधने आणि दुर्मिळ ग्रंथ या संस्थेकडून प्रकाशित झाले आहेत. राजवाडे यानी अखंडपणे आजन्म इतिहासाची सेवा केली. " इतिहास आणि ऐतिहासिक " या राजवाडे संपादित मासिकातून शिवकालीन आणि पेशवेकालीन घराण्यांचे कागदपत्र प्रसिद्ध होत गेले. त्यानी संपादिलेल्या कागदपत्रांचे बावीस खंड प्रसिद्ध झाले आहेत. राजवाडे यांचे स्मरणार्थ धुळे येथे " राजवाडे संशोधन मंडळ " सुरू झाले आणि त्या मंडळाच्या वतीने १९३६ साली " संशोधक " हे त्रैमासिक काढण्यात आले. राजवाडे यांचे पुढील खंड या मंडळाच्या वतीने प्रसिद्ध करण्यात आले. धुळे येथेच " सत्कार्योत्तेजक सभा " स्थापिली जाऊन " रामदास व रामदासी " हे मासिक काढण्यात आले आणि या मासिकातूनही काही ऐतिहासिक कागदपत्र प्रसिद्ध

झाले. याशिवाय वाड, मावजी, पारसनीस यांनी संपादिलेल्या शाहू महाराज आणि त्यांचे पेशवे यांच्या रोजकीर्दी, कैफियती, वतनपत्रे, निवाडपत्रे, तसेच सनदापत्रातील माहिती यानी मराठ्यांच्या इतिहास साधनात मोलाची भर पडली. रियासतकार सरदेसाई यानी पेशवे दप्तरातील कागदपत्रे संपादण्याचे काम अंगिकारून त्याचे एकूण ४५ खंड प्रसिद्ध केले. काही ऐतिहासिक घराण्यांची कागदपत्रेही प्रसिद्ध करण्यात आली— वावडा दप्तर, चंद्रचूड दप्तर, दाभाडे दप्तर, हिंगणे दप्तर, पुरंदरे दप्तर, वैद्य दप्तर, इत्यादि दप्तरातून ऐतिहासिक कागदपत्र प्रसिद्ध झाले. महाराष्ट्र सरकारच्या पुरातत्व खात्याने प्रकाशित केलेल्या ऐतिहासिक प्रकाशन ग्रंथमालेतून काही कागदपत्र प्रसिद्ध झाले. श्री. वा. सि. बेंद्रे यानी " महाराष्ट्र इतिहासाची साधने ' संकलित केली. श्री. मा. वि. गजर यानी " करवीर छत्रपति घराण्यांच्या इतिहासाची साधने " प्रसिद्ध करून बहुमोल कामगिरी बजावली आहे. फारशी पंडीत श्री. सेतु माधवराव पगडी यानी फारशी कागद अनुवादित करून महाराष्ट्र इतिहासाच्या साधनात मोलाची भर घातली आहे. इतिहास संशोधकांची परंपरा महाराष्ट्रात श्री. बेंद्रे, खरे, प्रा. फाटक वगैरेनी चालू ठेविली आहे.

आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक साधनांचा ओझरता उल्लेख केल्यानंतर " तारावाईकालीन कागदपत्रे " या ग्रंथात प्रसिद्ध होणाऱ्या साधनांची थोडी माहिती देवून मराठ्यांच्या इतिहासात त्यामुळे काय नवीन भर पडते आहे ते पाहणे सयुक्तिक ठरेल.

परगणा कऱ्हाड येथील देशमुखी पूर्वापार यादवांची होती. परंतु आदिलशाही कारकीर्दीत मुधोजी वणगोजी निंबाळकर याने पुंडावा केला असता यादवांचे वाडवडील त्याला मिळाले म्हणून बादशहाने हे वतन खालसा केले. ते त्याने प्रथम रणदुल्लाखानास व नंतर शहाजी राजे याना दिले. शहाजी राजे यांच्यापासून ते वारसाहक्कानुसार शिवाजी महाराज यांच्याकडे आले असता त्यांच्या पदरी असलेला अर्जोजी यादव याने ते परत मिळविण्याची खटपट केली. अर्जोजी यादव हा मोठा स्थापत्यविशारद असावा. कारण त्याने शिवाजी महाराज यांचे आज्ञेवरून प्रतापगड व पावनगड या दोन्ही किल्ल्यांचे बांधकाम केले. शक्यतो देशमुखीसारखी वतने वंशपरंपरेने द्यायची नाहीत असा महाराजांचा कटाक्ष होता. त्यानी यादवांकडून जनार्दन नारायण हणमंते यांचा अधिक्षेप झाल्याच्या गुन्ह्यावरून त्यांची कसबा औंधची देशमुखीही सरकारजमा केली होती. अर्जोजीने ही दोन्ही वतने परत मिळावी म्हणून

महाराजांची विनवणी केली. महाराजानी या विनंतीस बगल देवून सांगितले की, कऱ्हाडची देशमुखी बादशहाकडून आम्हाला मिळाली असल्याने त्या वतनाशी यादवांचा संबंध नाही. तथापि त्याना कऱ्हाडची देशमुखी द्यायचीच झाली तर ती त्याना आमची म्हणून देवू (क्र. ३२२)

संभाजी महाराज यांच्या कारकीर्दीत कवि कलश हा औरंगजेबापासून मोहमंत्र शिकून आला व त्याची परिणती म्हणजे संभाजी महाराजाना दुर्बुद्धि सुचली, बादशहाच्या कन्येने संभाजी महाराजांची अभिलाषा बाळगली या सारखे बखरीतील उल्लेख ' परशुराम चरित्र ' काव्यात आढळतात.

यादव घराण्याच्या कागदपत्रात अर्जोजी यादव याने संभाजी महाराजांच्या आज्ञेवरून रायगडावर इमारत बांधिली व पाचवडात राजमंदीर उभारण्याचे काम केले आणि पाचवडातील राजमंदीर पाहून खुष होऊन येसूबाईनी अर्जोजीस पांच हजार रुपयांचे बक्षीस देण्याची आज्ञा केली असा उल्लेख सापडतो (क्र. ३२२). या कागदातील महत्वाचा निर्देश म्हणजे संभाजी महाराजांची राणी ' मातुश्री दुर्गाबाई ' चा होय. ही दुर्गाबाई दौलताबादेस मोगलाच्या कैदेत असता संभाजी महाराजानी तिच्या मुक्ततेची कामगिरी गिरजोजी यादवावर सोपविली होती. गिरजोजीने अनेक संकटाना तोंड देऊन दुर्गाबाईची भेट घेतली. परंतु तिची मुक्तता करणे त्याला जमले नाही. ही माहिती या कागदाशिवाय मराठ्यांच्या इतिहासात अन्यत्र कुठे सापडत नाही. मराठी इतिहास संशोधकाना या घटनेचे धागेदोरे लावण्याचे हे एक प्रकारे आव्हानच आहे.

राजाराम महाराजांच्या संदर्भात दि. ३-९-१६८९ चे पोर्तुगीज पत्र महत्वाचे आहे. त्यात राजाराम महाराज कर्नाटकात निसटण्याच्या प्रयत्नात असून पोर्तुगिजानी त्यांच्या हालचालीवर पाळत ठेवावी अशी विनंती मोगलानी केल्याचा उल्लेख आहे. दि. १६-१-१६९१ च्या पोर्तुगीज पत्रात बिदनूरच्या राणीने राजाराम महाराजाना आश्रय दिल्याचा उल्लेख आहे. राजाराम महाराजाना आश्रय दिल्याबद्दल औरंगजेबाचा बिदनूरच्या राणीवर रोष झाला, त्याने तिच्यावर आपला मुलगा सुल्तान ( कामबक्ष ) यास पाठविले. परंतु त्याने राणीशी तह केला व दरवर्षी सहा लक्ष पागोडा प्रमाणे अठरा लक्ष पागोडा खंडणी ठरविली अशी माहिती या पत्रात आढळते.

राजाराम महाराजानी रायगडाहून पन्हाळ्यास व पन्हाळ्याहून जिंजीस केलेल्या प्रयाणासंबंधीची पुढील माहिती पहिल्या प्रथम प्रकाशात येत आहे.

जुल्फिकारखान रायगडास वेढा घालावयास आला, तेव्हा राजाराम महाराज वेढ्यातून निसटून प्रतापगडास गेले. तिथून त्यानी गिरजोजी यादवास मातुश्री जानकीबाई व शाहूराजे याना आणण्यासाठी रायगडास पाठविले. त्यानी येण्यास नकार दिला. परंतु रायगडाहून जडजवाहीर घेऊन गिरजोजी पन्हाळ्यास आला ( क्र. ३२२ ). ही जानकीबाई कोण ? राजाराम महाराजांची ज्येष्ठ पत्नी जानकीबाई ही पूर्वीच मरण पावली होती असा उल्लेख अन्यत्र आढळतो. या ठिकाणी निर्दिष्ट केलेल्या जानकीबाई बरोबर शाहूराजे यानाहि आणण्याची कामगिरी राजाराम महाराजानी गिरजोजीवर सोपविली होती. म्हणजे ती राजघराण्यातील स्त्री होती हे स्पष्ट आहे. तेव्हा तिचाहि तपास करण्याची कामगिरी मराठी संशोधकावर येऊन पडते.

पन्हाळ्याहून राजाराम महाराज कर्नाटकात निघाले तेव्हा त्यांचेबरोबर हंबीरराव मोहिते व मानसिंगराव मोरे होते. परंतु ते वाटेतून मागे परतले व बहिरजी घोरपडे राजाराम महाराजाना भेटले.

शिमोग्याचे मुक्कामी सर्व मंडळी मोगलांचे तावडीत सापडली असता राजाराम महाराज तेथून निसटले. त्यावेळी जडजवाहीर सांभाळण्याची कामगिरी राजाराम महाराजानी गिरजोजी यादव व खंडो बल्लाळ यांच्याकडे सोपविली. त्यानी अनेक संकटाना तोंड देऊन जडजवाहीर जिंजीस राजाराम महाराजांकडे पोहोचते केले. त्या प्रवासात त्यांच्या बरोबर दमाजी सरखवास हाही होता. जिंजीस राजाराम महाराजानी अंतःपुराचा सरहवाला गिरजोजीस सांगितला. पुढे तो चौघी राण्यांसमवेत पालेकोटास गेला. मागे महादजी जगदाळे याने परगणा कऱ्हाड येथील तर्फ मसुरच्या देशमुखीची वतनपत्रे राजाराम महाराजांकडून घेतली.

जुल्फिकारखानाने जिंजीस वेढा घातला तेव्हा राजाराम महाराजानी तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आपला दासीपुत्र राजा कर्ण याला ओलीस म्हणून खानाच्या गोटात पाठविले. त्याच्याबरोबर गिरजोजी यादव, शंकराजी पंडीत सुमंत व बावाजी प्रभु यानाही पाठविले होते. तेथून राजा कर्णास गिरजोजीने सुखरूपणे माघारी आणले. पुढे जिंजीचा वेढा कडक झाल्यावर

राजाराम महाराज किल्ल्यातून निसटून वेलोरला गेले. मागे ताराबाई, शिवाजीराजे, राजसबाई व सोयराबाई, या राजघराण्यातील माणसांना वेढ्यातून सुखरूपपणे बाहेर काढून स्वराज्यात पोहोचविण्याची कठीण कामगिरी गिरजोजीला पार पाडावी लागली.

राजाराम महाराजांच्या मृत्युनंतर रामचंद्रपंत व परशुराम त्रिंबक यांचा ' गर्गशा ' लागला तेव्हा पन्हाळ्याच्या पायथ्याशी शाहूचा तोतया प्रकट झाला. हा खंडो लिंगो या नावाचा खटावचा कुलकर्णी होता. ' तोतया मोडला ' असा उल्लेख प्रस्तुत कागदात आढळतो. ही माहिती नव्यानेच पुढे येत आहे (क्र. ३२२). परशुराम चरित्रांमध्यें ताराबाईची स्तुति कवीने " राजाराम विदेश दक्षण दिशें चंदावरी राहिला । रोगें क्षीण परंतु सुकृतबळे तारामती रक्षिला ।। " अशी केली आहे. जिंजीचा किल्ला पडण्याच्या बेतात आला तेव्हा गिरजोजी यादव महाराणी ताराबाई व इतर स्त्रिया याना घेऊन किल्ल्यातून बाहेर पडला. त्याने ताराबाईंना जुल्फिकारखानाचा एक सरदार रामसिंग याच्या गोटात आणले (क्र. ६२). तिथून ताराबाई वेलोरास राजाराम महाराजापाशी आल्या. राजाराम महाराजानी कोकणची स्वारी केली, तेव्हा त्यांच्याबरोबर ताराबाई होत्या. पुढे काही दिवस त्यांचा मुक्काम सज्जनगडास झाला (३२२). ताराबाईंचा मुक्काम सातार्‍यास असता पालीच्या खंडोबाच्या यात्रेतील डबीच्या ऐवजावरून गिरजोजी यादव व धनाजी जाधव यांच्यामध्ये ' कथला ' सुरू झाला. तेव्हा ताराबाईनी गिरजोजीच्या बाजूने निकाल दिला (क्र. ७२). पत्र क्र. २५८ मध्ये ' स्वामीवरी व मातुश्री साहेबावरी (ताराबाई) संपूर्ण राज्याचा कसाला पडिला ' असा महत्वपूर्ण उल्लेख आहे. ताराबाईनी हिरोजी व प्रतापजी साठम याना १४ हजार लारी दिल्याचे रामचंद्रपंत लिहितात ( क्र. ३६९ ). बादशहाच्या दरबारात पोर्तुगिजाचा वकील म्हणून असलेल्या झुजे द सिल्व या नावाच्या पाद्र्यास गोव्याच्या व्हाइसरॉयने ज्या काही सूचना पाठविल्या त्यात त्याने ताराबाईंचा उल्लेख ' मराठ्यांची राणी ' असा केला आहे. याच पत्रात तो म्हणतो : 'आंग्र्यांविषयीही आपण मोगल बादशहास फितवावे. त्याने मराठ्यांच्या राजाशी मैत्री जुळविली आहे व मराठ्यांच्या राणीचे मांडलिकत्व त्याने स्वीकारले आहे हे आपण बादशहाच्या निदर्शनास आणावे ' ( क्र. १०३ ).

ताराबाईकालीन महालाची वाटणी या सदराखाली ताराबाईंच्याकडे १४ महाल होते असे म्हटले आहे. नेमाजी शिंदे, परसोजी भोसले, हंबीरराव मोहिते

सरलश्कर, इत्यादि सरदारांकडे असलेल्या महालांचाहि निर्देश क्र. २२९ मध्ये आढळतो. दि. १०–१–१७०६ या दिवशी व्हाइसरॉयचा चिटणीस हिंदूराव घोरपडे याना पाठविलेल्या पत्रात म्हणतो की, ताराबाईंच्या आज्ञेनुसार मराठ्यांचे सैन्य खेम सावंताच्या मदतीला जांबावली येथे आले आहे.

बावडा दप्तर प. क्र. ९१ व प. क्र. ९२ पत्रावरून कोल्हापुरात झालेली राज्यक्रांती दि. ११–७–१७१४ व दि. १४–१०–१७१४ या दरम्यानच्या काळात केव्हातरी झाली असे अनुमान काढण्यात आले होते (मराठी रियासत, पुण्यश्लोक शाहू : बाळाजी विश्वनाथ पृ. ७४). या तारखामधील अंतर ९४ दिवसांचे आहे. परंतु या खंडातील क्र. २९१ व क्र. २९२ या कागदांवरून उपरिनिर्दिष्ट राज्यक्रांती दि. २–८–१७१४ व दि. २५–९–१७१४ या दरम्यानच्या कालात झाली असावी असा निष्कर्ष निघतो. हे अंतर ५३ दिवसांचे आहे. पुनः गोव्याच्या व्हाइसरॉयने दि. ११–१२–१७१४ रोजी रामचंद्रपंत अमात्य याना जे अभिनंदनपर पत्र लिहिले ते कोल्हापुरातील सत्तासंक्रमणाचे दृष्टीने महत्वाचे आहे. त्या पत्रावरून प्रस्तुत सत्तासंक्रमणाचे मागे रामचंद्रपंतांचा हात होता या संशयाला चांगलीच पुष्टी मिळते.

ताराबाईंच्या पराक्रमी कारकिर्दीचे यथोचित गुणगान देवदत्त कवीनें केले आहे (क्र. २). त्यात 'दिल्ली झाली दीनवाणी दिल्लीशाचे गेले पाणी ताराबाई रामराणी भद्रकाली कोपली' असे ताराबाईचे वर्णन आहे.

मोगलाच्या कैदेतून सुटून आल्यावर शाहू महाराजानी सरंजामाचे आमीष दाखवून मराठा सरदाराना आपल्या पक्षात आणण्याचा प्रयत्न केला. त्यानी शंकराजी यादव यास कराडच्या देशमुखीचे वतन देऊ केले (क्र. १८८). बळवंतराव देवकातेस कडेवळीत प्रांताची सरगौडकी दिली (क्र. १९०). तसेच त्यानी विशाळगडचा कारखानीस महादजी काशी यालाही आपल्या भेटीस बोलाविले (क्र. १९४). दि. १३–३–१७०८ रोजी शाहू महाराजानी खेम-सावंतास पाठविलेल्या पत्रात त्याने निष्ठेने रहावे असे म्हटले आहे (क्र. ३७५).

शाहू महाराज सैन्यासह कोकणात गेले होते. बादशहाकडून आपणास कोकणची जहागीर मिळाली असल्याने या जहागिरीतील खेम सावंताने बळकावलेले बांदे, पेडणे, साखळी, मणेरी व डिचोली हे महाल व सोंधेच्या राज्यातील फोंडे व पंचमहाल हा सर्व मुलुख काबीज करण्याकरिता पोर्तुगिजानी आपणास

दारूगोळयाची, दाणागोटयाची व इतर वस्तूंची मदत करावी अशी मागणी शाहू महाराजानी गोव्याच्या व्हाइसरॉयकडे केल्याचा उल्लेख क्र. २०८ च्या पोर्तुगीज कागदात आला आहे.

दि. १८–९–१७०८ रोजी शाहू महाराजानी हिरोजी, बापूजी व प्रतापजी साठम याना मुलांस जमावानिशी पाठवून द्यावे म्हणून पत्र लिहिले (क्र. ३७९). क्र. २३७ मध्ये शाहू महाराजानी बाजी साठमास भेटीस बोलाविल्याचा उल्लेख आहे. क्र. २४६ मध्ये शाहू महाराजानी शिवाजी दुसरे यांचा घेतलेला महिपतगड चिमणाजी बल्लाळ याने शिवाजी राजे याना युक्तीने मिळवून दिला अशी माहिती आली आहे.

शाहू महाराज रामचंद्रपंताना आपणाकडे येण्यास कसे प्रवृत्त करीत होते हे त्यांच्यामध्ये झालेल्या करारावरून (क्र. २७४) दृष्टोत्पतीस येते. या करारात ' चिरंजीव राजश्री बाजीरावाच्या नावे मजमू देऊन बहुमाने चालवावे. आम्ही मान्य पुरुष हुकुमतपन्हा आहो ते चालवावे ' हे महत्वाचे कलम आहे.

मौजे सौंदुती हा गाव बाजीरावाच्या फौजेने लुटला तेव्हा तेथील मठालाही झळ पोहोचली होती. त्याबाबत तारागिरी गोसावी यानी शाहू महाराजांकडे तक्रार केली असता त्यानी गोसावी याना अभयपत्र पाठविले (क्र. ३५८).

उपरिर्निर्दिष्ट महत्वाच्या कागदाचे विवरण केल्यानंतर काही संकीर्ण कागदांचेही विवरण करावयास हरकत नाही.

दि. २०–४–१६८९ च्या पत्रात ( क्र. ३१ ) मौजदिन ( मुइजुद्दीन ) पन्हाळयास वेढा घालून बसला होता असे म्हटले आहे. ही माहिती पहिल्या प्रथमच उपलब्ध होत आहे.

खांदेरी व कुलाबा येथील मराठा शिपायानी पोर्तुगिजांच्या ताब्यातील तुर्भे या खेडयावर हल्ला केला म्हणून पोर्तुगिजानी खांदेरीची नाकेबंदी केली (क्र. ६१).

जजीच्या वेढयातून बाहेर पडण्यास राजाराम महाराजाना जुल्फिकार-खानाच्या तळावरील बिराडकर वाणी या गृहस्थाचा उपयोग झाला. त्याबद्दल राजाराम महाराजानी त्याला ४ हजार होन दिले. ( क्र. ६२ ).

क. ६४ मध्ये संभाजी दुसरे यांची जन्मतिथी अधिक ज्येष्ठ वद्य नवमी इंदुवार अशी दिली आहे. तर गदाधर प्रल्हाद शकावलीत ज्येष्ठ अधिक वद्य ८ सोमवार असा निर्देश आहे.

सातारच्या वेढ्यात बहादुरी गाजविल्याबद्दल परशुराम त्रिंबक यानी गण सावंत पंचहजारी खास शाबासकी दिली ( क. ८८ ).

क. ९१ मध्ये गोव्याचा व्हाइसरॉय म्हणतो की, मोगल सरदाराना इतरानी आपणास मदत करावी असे वाटते. परंतु दुसऱ्याना ते संकटप्रसंगी मदत करीत नाहीत. तसेच क. ३७ मध्ये गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालच्या राजास लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, मुसलमानाना शब्दाची किमत नसते. त्यांच्यावर कधीच विश्वास ठेवू नये.

'मुसलमानापेक्षा हिंदूचा शेजार बरा' असे गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालच्या राजास लिहिलेल्या पत्रात म्हणतो ( क. ९७ ).

पोर्तुगीज अधिकारी मराठे व मोगल यांच्याशी दुटप्पी धोरणाने वागत होते हे क. १०५, १०७, १२५, १२८, १४४ व १४६ वरून दिसून येते.

पोर्तुगिजानी पकडलेल्या कान्होजी आंग्रे यांच्या तांडेलांची मुक्तता करण्यासाठी बुऱ्हाणजी मोहिते यानी पोर्तुगिजांकडे मध्यस्थी केली होती ( क. १५० ).

हिंदुराव घोरपडे व गिरजोजी यादव हे दोघे राजाराम महाराजांबरोबर कर्नाटकात गेले, तेव्हा हिंदुराव घोरपडे यानी गिरजोजीस वचन दिले होते की, आपला भाग्योदय झाला तर तुम्हास त्याचा हिस्सा देऊ. त्या वचनाप्रमाणे हिंदुराव घोरपडे यानी गिरजोजीस वतनपत्र दिले. ( क. १५७ ).

खेम सावंत भोसले यांच्यासाठी हिंदुराव घोरपडे यानी गोव्याच्या व्हाइसरॉयकडे रदबदली केली होती हे क. १६५ वरून दिसून येते.

एकनाथ स्वामीच्या पुण्यतिथीचा उत्सव सुरळीत पार पडावा म्हणून शिवाजी दुसरे यानी स्वामीचे नातू उद्धव गणेश यास पन्हाळ्यानजीक मौजे वाठार तावडे हे गाव इनाम दिले ( क. १६७ ).

शिवाजी दुसरे यांच्या आरमाराचा सुभेदार दाऊदखान या नावाचा मुसलमान गृहस्थ होता हे क्र. १६८ वरून कळून येते.

क्र. १७० वरून परशराम त्रिंबक हे खेम सावंत ह्याना पोर्तुगिजांविरूद्ध मदत करण्यास सिद्ध झाल्याचे व क्र. १७१ वरून मराठ्यांचे सैन्य खेम सावंताच्या मदतीस जांबावली येथे आल्याचे दिसून येते.

विजयदुर्गचा किल्लेदार सूर्याजी इंगळे याचे जागी शिवाजी दुसरे यानी काशी रंगनाथ याची नेमणूक केली (क्र. १९३).

मोगल मराठा युद्धात रंगाऱ्यासारख्या लोकांची देखील मदत झाली हे क्र. २०४ व क्र. २११ वरून सिद्ध होते. या पत्रात नरसिंह व सिद्राम अंबाजी यानी पन्हाळ्याच्या वेढ्यात छत्रपतींना कापड पुरविले म्हणून छत्रपती शाहू यानी त्याना कापडावरील जकात व दुकानाचा सारा माफ केला.

खंडो बल्लाळला शाहूनी पन्हाळ्याच्या नाडगौडकीचे वतन दिले (क्र. २१७). वतने सहसा कुणाला द्यायची नावीत हे शिवाजी महाराजांचे धोरण होते. परंतु त्यानी आपले सचीव अण्णाजी दत्तो याला तर्फ संगमेश्वराच्या देशकुलकर्णाचे व कसबा संगमेश्वरच्या गावकुलकर्णाचे वतन दिले होते हे क्र. २१८ वरून कळून येते. याचा अधिक अभ्यास व्हावा लागेल.

शिवाजी महाराजानी मौजे नांदेडची निम्मी पाटिलकी विकत घेतल्याचा व ती बकाजी फर्जंदला शंभर होनास विकल्याचा उल्लेख क्र. २२४ मध्ये आढळतो.

बलुत्यांची कामे व त्यांचे पानमान या संबंधीचा क्र. २३० हा कागद महत्वाचा आहे.

'मराठ्यांच्या राणीचे (ताराबाईचे) सैन्य मोठ्या प्रमाणात गोव्याच्या हद्दीवर गोळा झाले आहे' असा उल्लेख गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालच्या राजास लिहिलेल्या पत्रात आढळतो (क्र. २३१).

मार्कंडेय डोंगरावर शिवाजी महाराजानी पावनगड बांधिला (क्र. २५७).

रायाजी मल्हार यास दौलताबाद व खानदेश प्रांतात नामजाद म्हणून पाठविण्यात आले असा उल्लेख क्र. २७२ मध्ये सापडतो.

क्र. २७३ मध्ये गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालच्या राजास ।लीहितो की त्यानी (आंग्र्यानी) एवढे मोठे सामर्थ्य संपादन केले आहे की, सगळयानाच त्यांचा वचक वाटतो. पुढे जानेवारी १७१३ च्या पत्रात व्हाइसरॉय म्हणतो. " सांप्रत आंग्रे हा ह्या राज्याचा सर्वात मोठा धोकेबाज शत्रू आहे. तो धनवान, बलाढ्य आणि संपन्न आहे....माझ्या काळजीचा तो एक मोठा विषय होऊन राहिला आहे " (क्र. २७७).

क्र. ३०९ मध्ये गोव्याचा व्हाइसरॉय आंग्र्यांचा नाश करण्याचे आवाहान बादशहाचा सरदार असिदन अलिखान यास करतो.

गोव्याच्या व्हाइसरॉयने संभाजी दुसरे याना आंग्र्याविरूद्ध मदत देऊ केल्याचा उल्लेख क्र. ३१२ च्या पत्रात आहे.

गोव्याच्या व्हाइसरॉयने मुंबईच्या नवीन गव्हर्नरचे स्वागत करून लिहिलेल्या क्र. ३१४ च्या पत्रात आंग्र्यांचा नाश करण्याकरता पोर्तुगिजाशी सहकार्य करण्याचे आवाहन केले आहे.

पोर्तुगीज आणि संभाजी दुसरे यांच्यामधील तह (क्र. ३१६).

सेनापती दाभाडे यानी पोर्तुगिजांच्या दमणच्या प्रदेशावर केलेल्या स्वारीची माहिती क्र. ३२३ च्या पत्रात आहे.

कुडाळचे नारबा सावंत यांचे विरुध्द संभाजी दुसरे यानी पोर्तुगिजांची मदत मागितली होती (क्र. ३२५).

रामराव व पिलाजी घोरपडे हे कोल्हापुरचे सरदार गोव्याच्या हद्दीवर संचार करीत असल्याचा व त्यानी पोर्तुगीज हद्दीत आक्रमण केल्याचा उल्लेख क्र. ३२६, क्र. ३२९ क्र. ३३० मध्ये आहे.

क्र. ३४८ त गोव्याचा व्हाइसरॉय मुंबईच्या सेनापतीस लिहिलेल्या पत्रात सूचना करतो की, पोर्तुगिज व इंग्रज या दोघांनी आंग्र्यांच्या अलीबागच्या किल्ल्यावर संयुक्तपणे हल्ला करावा.

मुंबईच्या सेनापतीने खांदेरी उंदेरी बेटावर केलेली मोहीम कशी अयशस्वी झाली त्याचा वृत्तांत क्र. ३४९ मध्ये आहे.

कोल्हापुरचे संभाजी दुसरे व आंग्रे यांच्या विरूध्द फोंड सावंतास मदत द्यावी म्हणून गोव्याच्या व्हाइसरॉयच्या सल्लागार मंडळात संमत झालेल्या ठरावाचा उल्लेख (क्र. ३५३) आहे.

धोंडो भास्कर कुलकर्णी याने रत्नागिरीच्या डोंगरावर किल्ला बांधून मोगलांची अनेक ठाणी घेतली असा निर्देश क्र. ३६२ मध्ये आढळतो.

या खंडातील पुरवणीत साठम घराण्यातील पुरुषानी पन्हाळा, सातारा, परळी इत्यादि किल्ल्यांच्या वेढयात जी मर्दुमकी गाजविली तत्संबंधीची पत्रे दिली आहेत.

मराठयांच्या इतिहासाच्या मराठी, पोर्तुगीज आणि फारशी साधनांतील ही बव्हंशी अप्रकाशित माहिती या खंडाचे द्वारा सादर करण्यात येत आहे. भावी इतिहासकाराना ह्या कच्च्या दुव्यांचा उपयोग होईल अशी उमेद वाटते.

**आप्पासाहेब पवार.**

# ऋण निर्देश

ह्या साधन ग्रंथ तयार करीत असताना ज्या अनक लोकांची मदत झाली त्यांचा नाम निर्देश करणे उचित ठरेल. श्रीयुत बाबासाहेब मोहिते तळबीडकर यानी आपल्या घराण्यांचे दप्तर दाखविले आणि त्याचा उपयोग करू दिला. त्याचप्रमाणे अनेक घराण्याचे कागदपत्र पहावयास मिळाले. त्या सर्वांचे ऋणी आहोत. जुने मोडी कागद वाचण्याच्या कामी आम्हाला श्रीयुत हंबीरराव चिटणीस, करवीर पुराभिलेख संग्रहालयाचे माजी क्युरेटर, श्रीयुत शिंदे व त्यांचे सहकारी श्रीयुत तोरस्कर यांचे सहाय्य झाले. तळबीड दप्तरातील फारशी फर्मानांचा गोषवारा सुप्रसिद्ध इतिहास लेखक आणि फारशी पंडित श्रीयुत सेतु माधवराव पगडी यानी करून दिला. त्याचप्रमाणे त्यानी या ग्रंथातील इतर मराठी कागद वाचून काही मौलिक सूचना केल्या. तसेच सुप्रसिद्ध इतिहास संशोधक आणि इतिहासकार श्रीयुत वा. सी. बेंद्रे यानीही काही कागदपत्र नजरेखालून घातले. या ग्रंथातील पोर्तुगीज कागदपत्रांपैकी काही पत्रे Arquivo Portugues Oriental संपादक डॉ. ए. द. ब्रागांस पेरैरा, यांच्या ग्रंथातून घेतली असून उरलेली Assentos do Conselho do Estado, संपादक डॉ. पांडुरंगराव पिसुर्लेकर या ग्रंथातून घेतली आहेत. डॉ. ब्रागांस पेरैरा हे आज हयात नाहीत. डॉ. पिसुर्लेकर यानी आपल्या ग्रंथातील कागदांचा अंतर्भाव आम्हाला या ग्रंथात करू दिला याचा खास निर्देश येथे करणे आवश्यक आहे. पोर्तुगीज कागदांचे मराठी भाषांतर श्री. स. शं. देसाई यानी केले आहे.

शेवटी शिवाजी विद्यापिठाच्या इतिहास विभागाचे प्रमुख. डॉ. व. दि. राव, संशोधन सहकार्यकर्ते श्री. स. शं. देसाई व संशोधन सहाय्यक श्रीयुत ज. भा. पवार यानी या ग्रंथाच्या संपादनाच्या कामी जे परिश्रम घेतले त्याचाही येथे उल्लेख करावयास हवा. डॉ. राव यानी कागदपत्रांचा इंग्रजी गोषवारा तयार केला. तो सुरूवातीसच क्रमवार दिला आहे. श्रीयुत देसाई आणि श्रीयुत पवार यानी छपाईचे सर्व काम तर पाहिलेच; शिवाय या ग्रंथाच्या सूचिपत्राचे कामही पूरे केले. या सर्व लोकानी या कामी जे हार्दिक सहकार्य दिले त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

आप्पासाहेब पवार.

# PREFACE

Tarabai Papers Volume–I contains source material for the history of the period ( 1680-1720 ). Many documents are being published for the first time The most important papers come from the records of the Yadav family, the members of which played an active part during the crucial period of the Maratha War of Independence ( 1689–1707 ). Among the remaining sources of the material, special mention must be made of the Kolhapur Archives; Alienation Office, Poona; Saraswati Mahal Library, Tanjore; Mackenzie Collection, Fort St. George, Madras; Mahalaxmi Papers and the Papers from the Satham family and the family of the Mohites of Talbid ( Tarabai was born in this family ). Marathi translations of the Portuguese documents, taken from the "*Arquivo Portugues Oriental*" and "*Assentos do Counselho do Estado*" make a substantial addition to the source material now available in Marathi.

It is not possible to describe fully the importance of all the papers that are being published here. The gist of the documents is given in the 'Summary'. Incidentally, it may be mentioned that the document No. 72 bears Tarabai's hand-writing.

A. G. PAWAR

## SUMMARY

( 1 ) This is an incomplete poem by Vitthaldas. The same poet has also written another work entitled '*Vidvajjivan*'. The present poem was discovered by Dr. A. G. Pawar in the Sarasvati Mahal Library at Tanjavar. Its Library index number is 2041.4.

( 2 ) In the poem, there is a graphic description of the the Maratha resistance at the time of the siege of Jinji. The poem refers to the exploits of Rajaram in facing the onslaught of the Moghuls. The names of Ramchandra Pant Amatya, Santaji Ghorpade and Dhanaji Jadhav are mentioned in the poem.

( 2 ) Kavindra Devdatta, the son of Kavindra Parmanand wrote a Marathi poem in honour of Tarabai. A copy of this poem was discovered by Shri K. N. Deshpande in the historical papers of the Rajopadhye family of Kolhapur. He published the same in the *Sardesai Smarak Granth* in 1938 ( pp. 184-185 ). Dr. Pawar found another copy of the same poem in the Sardesai Records. This copy is published in the present book as it seems to be a better version of the original.

Devdatta describes in this poem the plight of the Moghul army in the Deccan during the period of Tarabai. She led the Maratha state with such an outstanding ability that, as the poet describes, the throne of Delhi began to totter. The students of Maratha history know very well that this was not merely a poetic exaggeration.

( 3 ) Dr. Pawar found a manuscript entitled *Parshuram Charitra* in the Mackenzie Collection at Fort Saint George,

Madras. It is a historical poem divided in six chapters giving an account of the history of the Marathas up to the death of Peshawa Madhavrao I. Perhaps the anonymus poet was a contemporary of Madhavrao. A part of the poem relevant to the present volume is given in this book. In stanza No. 23 of the third chapter, the poet says: though Rajaram was weak in health, he was ably served by Tarabai. There is also a fine description of the prowess of Tarabai and the efforts she made to defend the Maratha state against the Moghuls.

Nos. 4 to 30 are Talbid Papers relating to Tarabai's family. The Talbid *Daftar* was personally seen by Dr. Pawar and members of the Department of History in the University. Although some of these papers were published by Rajawade in *Itihas Ani Aitihasik*, they are printed here as they throw some light on the family history of the great queen.

4 :

4-1-1623

An Adilshahi order to Shekh Malik of Kolhapur, asking him to check the miscreants who had become disloyal and were rising against the state.

5 :

10-1-1626

Grant of *Deshmukhi of* Talbid and Baleghat to Sambhaji and Dharoji Mohite at the request of Shahaji.

6 :

1626-27

This is an original document both in Persian and Marathi (in Modi script) corroborating the contents of the above.

7 :

30-5-1628.

An Adilshahi order to Siddi Hasan, the district officer of Karad, asking him to hand over the *Deshmukhi* of Tarale to Sambhaji and Dharoji Mohite.

8 :

23-3-1626

An order granting 360 *Bighas* of land in different villages to Sambhaji and Dharoji Mohite.

9 :

8-11-1630

A copy of a letter to Dharoji Mohite highly commending his valour on the battlefield.

10 :

24-1-1632

A copy of an order to Dharoji and Sambhaji Mohite asking them to march immediately against Magarrao ( ? ) who was invading the state.

11 :

25-2-1632

An order from an officer of Talbid to the local officers of six villages, informing them of the grant of certain rights to Dipaji Dharoji Mohite.

12 :

1632-33

An Adilshahi order to Mir Mohamad, the district officer of Karad, referring to the disturbances at Karad.

13 :

29-10-1633

A copy of an order to Dharoji Mohite asking him to be ready with his army to help the Prince who had reached Burhanpur.

14 :

26-11-1633

A copy of an order to Dharoji Raje Mohite asking him to join Ambarkhan together with his army.

15 :

1633 ( ? )

A copy of an order to Sambhaji and Dharoji Mohite asking them to join Ambarkhan immediately.

16 :

10-2-1636

On the receipt of information from (Randullakhan that Dharoji Mohite displayed great valour on a difficult occasion, a robe of honour was presented to him.

17 :

30-4-1637

A copy of a letter to Dharoji Mohite acknowledging the help he gave to Ambarkhan.

18 :

25-8-1639

Dharoji Mohite was ordered to contribute 86 *Hons* towards the cost of erecting the flagstaff.

19 :

27-10-1639

A village was given to Dharoji Mohite in 1630 but one Sayyad Umar Sayyad Taher misrepresented to the govrn-ment and got it transfered to him. On a complaint from Dharoji, a royal order was issued for handing it over to Dharoji and arresting Sayyad Umar.

20 :

27-6-1645

One Paroji Kavar created troubles in Dharoji's area. Orders were issued for his immediate arrest.

21 :

30-8-1645

On a complaint by Dharoji Mohite that Kalamba was attacked and looted by the officers of fort Chandan, the Adilshah repremands them and orders the return of the loot.

22 :

23-7-1651

A settlement between Hariprao Sambhaji Mohite and Dipaji Dharoji Mohite.

23 :

7-12-1652

An order of continuance of five percent revenue to the Mohites.

24 :

2-12-1660

Netaji and Dipaji, the sons of Dharoji Mohite were asked to meet the King as per their desire.

25 :

28-8-1661

An Adilshahi order to Abdul Mohamad of Devarashtre asking him to continue the *Watan* of Kaloji and Bahiroji, the sons of Sambhaji Bhosale.

26 :

13-1-1662

A partition deed between Netaji and Dipaji, the sons of Dharoji Mohite on the one hand and Hariprao, Hambirrao and Shankaraji, the sons of Sambhaji Mohite on the other. This is the first document which mentions Hambirrao, the Maratha General by name.

27 :

1662 ( ? )

A letter from Hariprao, Hambirrao and Shankaraji Mohite to Netaji and Dipaji Mohite referring to the partition.

28 :

23-9-1663

An order from Netaji Palkar adjudicating the partition between Netaji Mohite and Savuji Mohite. This is one of the rare and original letters of Netaji Palkar.

29 :

27-9-1663

Netaji Palkar's assuarance to Netaji Mohite.

30 :

14-2-1693

A grant from Rajaram to Rakhamaji Mohite as a reward for the services rendered by his father Udaji who was killed fighting Shekh Nizam near Vasantgad.

31 : 20-4-1689

A grant from Rajaram to Kashi Ranganath Varpe, for the services rendered during the siege of Panhala by Muijuddin. ( the son of the eldest son of Aurangzeb ).

32 : 20-4-1689

Rajaram reinstates a *Watan* of Vithal Narayan, which was confiscated by Kavi Kalash because Vithal Narayan had joined the Shirkes.

33 : 12-5-1689

A Portuguese letter from Don Rudrigo da Costa, the Viceroy of Goa to Bahadurkhan, stating that if Rajaram tried to cross the Portuguese territory on his way to Carnatic, the Portuguese would maintain strict watch and try to capture him.

34 : 21-6-1689

A letter from the Portuguese Viceroy to Yeshvantrao Dalvi, one of the *Sardars* of the Moghuls, stating that the Portuguese would have no objection to food being carried to the Moghuls from Goa. He refers to profiteering by the merchants.

35 : 3-9-1689

A letter from the Portuguese Viceroy to Bahadur-Khan, the *Subhedar* of Belgaum, stating that he had kept a strict watch on the route which Rajaram might undertake while escaping to Carnatic.

36 : 15-8-1690

A letter from the Portuguese Viceroy Don Miguel de Almeida to Abdul Raja Khan promising support to the Moghul Emperor against Rajaram.

37 : 16-1-1691

A report from the Portuguese Viceroy to the King of Portugal giving a detailed report about the Moghul-Maratha conflict. The Moghul army was interested in lengthening it as they reaped profits out of the war. The Viceroy significantly adds:- " One should never have faith in the Muslims as they do not value their words. "

38 : 27-3-1691

A letter from Ramaji Appaji to Sonajirao and Chandjirao Arulekar stating that on the recommendation of Khem Savant, he would request Ramchandra Pant to issue a grant.

39 : 26-7-1691

A letter from Ramchandra Pant to Girjoji Yadav, regarding his request for the *Deshmukhi* of Aundh.

40 : 10-9-1691

A sale-deed between Rakhamaji Khando and Kashi Rangnath.

41 : 15-1-1692

An order from Rajaram to Santaji Ghorpade informing him that Girjoji Yadav and his brothers were granted the *Deshmukhi* of fifty four villages, for the services rendered since the days of Shivaji the Great.

42 : March 1692

A letter from Hindurao Ghorpade to Shankaraji Gopal stating that he had transferred to Ranoji Ghorpade the *Deshmukhi* of Indapur.

43 : 21-6-1692

An order from Rajaram to Santaji Ghorpade asking him to see that the *Deshmukhi Watan* of twenty three villages is handed over to Girjoji Yadav and his brothers.

44 : 9-7-1692

A grant to Santaji Ghorpade for his loyal service to Rajaram.

45 : 29-7-1692

A grant to Santaji Ghorpade for defeating powerful Moghul generals like Shekh Nizam, Sarja Khan etc..

46 : 29-8-1692

Rajaram's grant to Rudraji Sonaji Salavi.

47 : 15-9-1692

An order from Rajaram to Sundar Tukdeo, informing him that out of the *Deshmukhi* of Karad of Raja Karna, the *Deshmukhi* of Umbraj and Targaon was granted to Girgoji Yadav.

48 : 15-9-1692

A grant from Rajaram to Girjoji Yadav.

49 : 16-10-1692

A grant to Rayaji Lingdev.

50 : 15-2-1693

A grant from Rajaram to Chandjirao Patankar for assisting Santaji Ghorpade with his force.

51 : 9-4-1693

A letter from Ganoji Kadam Chalkar and Shankaraji Vedaji to Senapati (Santaji Ghorpade) regarding the *Deshmukhi Watan* of Indapur. The writers report disturbed conditions in the area.

52 : 13-11-1693

A grant from Rajaram to Kashi Ranganath Varpe for services rendered by the latter during the Moghul siege of Panhala. (see No. 31)

53 : 1-1-1694

An order from Rajaram referring to a grant to the *Math* at Patgaon.

54 : 23-10-1694

A Portuguese letter from Conde de Villa Verde, the Viceroy of Goa to Khem Savant complaining about the looting of the Portuguese ships by the Marathas.

55 : 13-11-1694

A letter from the Viceroy of Goa to Rayaji Shamrao complaining about the incursions by the Maratha army in Bardesh and hinting that those neighbours who did not maintain peaceful relation with the Portuguese were destined to be ruined.

56 : 17-11-1694

The Portuguese Viceroy sends military assistance to the Moghul *Subhedar* at Phonda. The Viceroy complains about the Moghul policy of saving their skin.

57 : 25-11-1694

Chandjirao Arulekar was pardoned for joining the Savants. His *Watan* was also given back to him; and he was asked to rejoin the Maratha forces.

1694–95 (?)

58 :

Santaji Ghorpade writes to the high priest Siddhagiri requesting him to continue the fair which was discontinued during the disturbances.

15–6–1695

59 :

A letter from Conde de Villa Verde, the Viceroy of Goa to Maratha Officer Ganesh Raghunath, congratulating him on his new appointment. He however complains that Ramchandra Pant though outwardly friendly, acted quite the contrary. In spite of this, as Rajaram wanted to be friendly with the Portuguese, they would reciprocate if his navy also reciprocates.

10–8–1696

60 :

An order from Raja Karna to the officers of Umbraj and Targaon asking them to hand over the annual collection to Girjoji Yadav to whom Rajaram had granted the *Deshmukhi*.

18–9–1696

61 :

Proceedings of the Advisory Council of the Viceroy of Goa dated 18–9–1696 and the Viceroy's letter dated 15–12–1696 describing Maratha attack on a village (Turbhe) and the acts of reprisal undertaken by the Portuguese by besieging Khanderi.

62 :

A memorandum mentioning some interesting details about the siege of Jinji, in particular the part played by Raja Karna in this incident.

63 : After 23-5-1698

Rajasbai informs Girjoji Yadav of the birth of Sambhaji II. For the efforts made by Girjoji in bringing her safe, she pleaded with Rajaram for Girjoji's *Watan* and got it sanctioned. In the letter Rajasbai sends her greetings to Tarabai.

64 : 7-6-1698

On the occassion of the birth of Sambhaji II, Rajaram grants a *Watan* to Girjoji Yadav. The letter mentions the birth date of Sambhaji II ( Monday, the 23rd May, 1698 ).

65 : 7-6-1698

The grant of *Deshmukhi* of Umbraj and Targaon to Girjoji. The rest of the matter is the same as above.

66 : 14-7-1698

Dhanaji Jadhav refers to the grant of Devgaon-dui which was transferred by the king from Khandoji Thorat to *Matushri* Maikubai.

67 : 22-7-1698

By making false representations to Rajaram. Mahadji Jagdale had secured grant of a few villages which were under the *Deushmukhi* of Girjoji. By this order Rajaram cancels that grant.

68 : 21-8-1698

A letter from Burhanji Mohite to Girjoji Yadav requesting him to hand over to Tarabai a letter addressed to her by Bimbaji Palkar.

69 : 9-10-1698

Hindurao Ghorpade continues the *watan* of Dattaji Pisal. ( Hindurao is described here as *Mamalakatmadar* and Samasherbahadur )

70 : 1698-99

Rajaram acknowledges Piraji Ghatage's letter of welcome, on his return from Carnatic, and informs him that the army has been ordered not to trouble any one in the area.

71 : 21-2-1699

Because of a dispute between Dhanaji Jadhav and Girjoji Yadav about the rights of receiving the offerings of Pali *Yatra* ( the fair of Khandoba at Pali near Umbraj,

District Satara ) the said offerings were kept with the government. By this letter Ramchandra Pant informs Girjoji that Tarabai would give it to him. This and the following letters show that Tarabai had courage enough to give a decision in favour of Girjoji against Dhanaji.

72 : 21-2-1699

A letter from Tarabai to Girjoji Yadav. The matter is the same as above. The last two words are in Tarabai's handwriting.

73 : 21-2-1699

A letter from Mahadaji Raje Bhosale to Girjoji. The matter is the same as in No. 71.

74 : 21-2-1699

A letter from Khandoji Karajkar to Girjoji. The matter is the same as in No. 71.

75 : 1699

An incomplete letter from Khando Ballal and Khando Nibabhode ( ? ) to Girjoji. The matter seems to be the same as in No. 71.

17-8-1699

76 :

Rajaram continues the grant of Sayyad Ahmad Bekhari Pir.

27-8-1699

77 :

Rajaram's grant to Nilkanth Moreshwar for the great work done in building up the kingdom.

28-9-1699

78 :

A grant to Babade Bhat Narayan Bhat Thakar.

15-10-1699

79 :

A letter from Satvoji Sapa to Krishnaji Jadhav Patil offering to return the latter's farm.

28-11-1699

80 :

Rajaram reinstates Vyankaji Dado and others in the *deshmukhi watan*. Santaji Ghorpade had obtained the wantan by making a false representation (as alleged in the document) to Rajaram about the fidelity of Vyankaji Dado and others.

19-12-1699

81 :

Parsharam Trimbak informs Vyankaji Kashi that Jotaji Krishnaji had sold his *deshmukhi* of six villages to Lingo Bapuji to provide ransom.

82 : 8-1-1700

Sidoji Ghorpade's grant to Narhar Bhat.

83 : 25-1-1700

Mansingrao, the *havaldar* of Sindhudurg, is ordered to come immediately with his men.

84 : 27-2-1700

Parashuram Trimbak appreciated in glowing terms the resistance given by Gan Savant and his men to Aurangzeb when Satara was besieged.

85 : 23-3-1700

Antonio Louis Gonsalves da Camara Coutinho, the Viceroy of Goa, refutes the complaint of Parashuram Trimbak about the Portuguese war-ships entering the Maratha waters. On the contrary he alleges that the Marathas looted the Partuguese ships and demands the return of the loot.

86 : 30-3-1700

Parashuram Trimbak continues the grant of land to Yadav Shivdeo.

87 : 30-4-1700

The Viceroy of Goa, sympathises with Sayyad Ibrahim, the *Killedar* of Fonda, who was seriously wounded in a battle with Khem Savant.

88 :

8-5-1700

A condolence letter from the Viceroy of Goa to Basalat Khan on the death of Sayyad Gulam Ibrahim.

89 :

18-5-1700

The Viceroy of Goa promises help to the brother of Basalat Khan against Khem Savant.

90 :

18-5-1700

The Viceroy of Goa informs Isak Katulla the brother of Basalat Khan about the despatch of ammunition for his help.

91 :

21-5-1700

The Viceroy of Goa offers help to Rasul Khan, the *Killedar* of Fonda, but complains that the Moghuls do not help the Portuguese in times of difficulties.

92 :

28-5-1700

The Viceroy of Goa complains to Allavardi Beg Bagasi of Fonda that brother of Basalat Khan raised the siege of Dicholi without the knowledge of the Portuguese, in spite of the Portuguese were helping him with ammunition.

93 :

2-6-1700

The Viceroy of Goa complains to Basalat Khan about the peace treaty made by the Moghuls with Khem

Savant without the knowledge of the Portuguese. He further says that this action would bring disgrace to the dignity of the Moghul Emperor.

5-8-1700

94 :

A grant to Janardan Bhat of the right to collect duty at Patgaon and three other places.

12-12-1700

95 :

The Viceroy of Goa asks for the consent of the King of Portugal for the help given to the Moghuls.

30-12-1700

96 :

A grant from Shivaji II to Matyaji Ingavale. His father Shidoji died on duty at Sajjangad.

19-1-1701

97 :

A report from the Viceroy of Goa to the King of Portugal. He writes about the Arab invasion of Versova (about 15 miles from Bombay). The Arabs were defeated with heavy losses. He further explains how he followed a double policy of helping both sides in the Moghul-Maratha struggle. He states that the Hindus should be prefered to the Muslims as neighbours.

14-2-1701

98 :

The Viceroy of Goa informs Basalat Khan of the parleys on hehalf of the Moghuls with the Desais who were harassing the Moghul territory.

99 : 27-5-1701

A grant to Turtgiri Gosavi for the expenses of the Mounibawa Math at Patgaon.

100 : 23-7-1701

Shivaji II continues the *watan* of Turtgiri Gosavi.

101 : 25-7-1701

A grant from Shivaji II to Turtgiri Gosavi.

102 : 30-7-1701

An order from Shivaji II stating that the *deshmukhi* of Kare belonged to Girjoji Yadav; and that Chandji Patankar should not be allowed to create any trouble.

103 : 2-12-1701

A letter of instructions from Vasco Fernandes da Cezar Menezes to Jose da Silva, an envoy to the Moghul Court, instructing him to gain the favours of the Emperor and to see that the Angres, the Siddis and the Koli Raja were punished by the Emperor. He has mentioned the Angres as the feudatories of the Queen ( Tarabai ) of the Marathas.

104 : 1701-02 ( ? )

A letter from Surerao Pisal to Girjoji Yadav regarding a dispute about three villages.

105 : 4-1-1702

A letter from the Viceroy of Goa to the King of Portugal stating that it was in the interest of the Portuguese to come to terms with the Marathas, as that would put an end to the Maratha incursions into the Portuguese territory and their attacks on the navy.

106 : 12-1-1702

Parashuram Pant bestowes a grant upon Har Dalvi and his people.

107 : 13-2-1702

A letter from the King of Portugal to the Viceroy of Goa asking him to continue his policy of keeping the Marathas out of war. He, however, did not want to make peace with them, so that when an opportunity presented itself, the Marathas could be dealt with.

108 : 13-2 1702

The King of Portugal orders the Viceroy of Goa to help the Moghul Nawab of Fonda against Khem Savant Bhosale.

109 : 14-2-1702

A letter from Archbishop Primaz Don Vasco Luiz Coutinho on behalf of the Viceroy of Goa to Shivaji II stating that the people on the ship sunk near Anjediv island would be released.

110 :

25-2-1702

A letter from Archbishop Primaz Don Vasco Luiz Coutinho to Burhanji Mohite, the *Subhedar* of Malvan, requesting him to release a Portuguese ship which had to take shelter in Malvan harbour because of bad weather.

111 :

28-2-1702

Parashuram Trimbak Pratinidhi compliments Har Dalvi on his fight against the Moghuls.

112 :

9-3-1702

A letter from Archbishop Primaz Don Vasco Luiz Coutinho to Burhanji Mohite referring to his reply to the former's letter ( No. 110 ). The Archbishop again requests for the release of the ship. He reminds him of the good treatment given to a Maratha ship which had come to Goa.

113 :

16-3-1702

Shivaji II acknowledges the services of Har Dalvi.

114 :

22-3-1702

An order continuing the grant for religious rites of the Mahalaxmi temple.

115

22-3-1702

The acting Governor of Goa asks Burhanji Mohite to release the Portuguese ship detained at Malvan. In

# ताराबाई कालीन कागदपत्रें

**क्रमांक : १**

खालील काव्य 'विद्वज्जीवन' ग्रंथाचा कर्ता विठ्ठलदास याने लिहिले. सदर ग्रंथ त्याने इ. स. १६६९ साली लिहिला. खालील काव्यामध्ये त्याने जिजीच्या वेढ्याचे वर्णन केले आहे. दुर्दैवाने हे काव्य अपुरे आहे. ह्या काव्याचे हस्त-लिखित तंजावर येथील सरस्वति महाल ग्रंथालयामध्ये असून त्याचा क्रमांक २०४१.४ हा आहे.

**।। श्री रघुवीर समर्थ ।।**

वंदूनि आधी गजशुंड तुंडा
विद्या समुद्रा सुमति प्रचंडा
निर्विघ्न ग्रंथि करी कां कवितें
चाले गिरा हे मजसीं कवितें १

आरंभ काळी नमि भारथी हे
होईल माझी कवि भारथी हे
हंसा सवि ब्रह्मकुमारी का तूं
अज्ञान दैत्यात्मक मारि का तू २

यानंतरे वंदिन सद्‌गुरुसी
ज्याचे प्रसादे वरी सद्‌गतीसी
कृपा करावी कवि हर्षराया
वाचे करी स्फूर्ती कवी कराया ३

पूर्वि सिवाजि वदला स्वभावे
तो खेळवी बालक पुत्र मोहे
राज्याधिकारी सकला महीचा
हरिल हा भार धराधराचा ४

ते सत्य जालें कविता प्रसंगी
सव्हारती तांव्र पुढें प्रसंगी
वदेन ते कौतुक वाग्विलासे
स्रोते तुम्ही सादर सावकाषे ५

प्रार्थूनि येसे सकला जिनाला
आनंदराये मग [1]डास्तन केला
मानू नका मीथ्य धनं प्रमादे
सांगेन कौतूहल स्लोकबंधे ६

ज्या रामें अवतार पूर्ण धरिला पोटि सिवाचे पाहा
आला या करनाटका विधी वलें चंदी वसे राम हा
तो जैसा उधीदौ प्रदेसी जठरी लंका त्रिकूटा गिरी
पृथ्वी माजी विषेश दुर्ग उपमा चंदी नसे दूसरी ७

विषेश तांव्र तो हटी
वसोनी दुर्ग मेहटी
आलंग चालवि बळे
दीसे [2]जवासि आगळे ८

बहुलोक मावळे
मिळोनी ते भले भले
उगवले पराक्रमे
धरूनी धैर्य वीक्रमे ९

युधिं घोरपडा करीत रगडा तो कानडा नाइकु
जोडा या न दिसे उडि पडतसे फौजे महे [3]आतुकु
घेता सन्मुख भीम तांव्र मीलणी राहों शकें कोण हा
हाती खर्ग वीराजतो बहिरजि भंगार नाईक हा १०

१ प्रश्न. २ जनासि: ३ आसक = यत्न.

खर्चासी नाही वहु कष्टताति
चंदावरा हेजीव नित्य जाती
कोनेरी पंती वहु ख्याती केली
खर्ची बहु आणुनी पूरवीली ११

वसे दक्षिणेषि वहु पुन्य राषी
मही नाम साजें महाराज त्यासी
करी भोग देवेंद्र नाना विलासे
तसी संपत्ती भोगीतों सावकासें १२

वहुत लोक प्रेसिले
विषेश द्रव्य धाडिले
करूनी साह्य ये रीती
बलाढ्य भाव दावीती १३

परंतु तांब्र वीक्रमें
वीरश्रीचें नि संभ्रमें
अलंग जोर चालीला
मऱ्हाष्ट शक्ती मदला १४

बहुती जणिंते बहु कक्ष केले
बहुतेक ते लोक युधि नीमाले
पडेना पुरी सीणती सर्व तेथें
बळे वेढीला दुर्ग चत्वार पंथें १५

मार्गासी चाऱ्ही आवरोध केला
नाहीं जवार त्रण घोडीयाला
रात्रीच जाती मग वेटवाला
धान्या लवणाज्य विविला आणिल ज्याला १६

आलंग चाले चनदुर्ग पंथे
ना इड राखे बहु सीध तेथे

आहार निद्रा ताजिली तयाने
तो बैसला केवल सांभिमाने ॥ १७

भांडी थोर वीशाल दीर्घ उपमां देतां नसे दुसरी
दारु फार आपार येक समई गोले आलंगे वरी
मारा थोर कराल घोष उठतां कांपे महीचा सुत
यौसा दुर्ग वीचीत्र शीवर चना चंदी महा पर्वत ॥ १८

प्रती योंजीलीं ते आलंगेसी येत्रे
फीरगी कसे लक्ष लावीत मुत्रे
उडे कोट भीती वहु मार होतां
जनीं भावीलें पूर्ण प्राणांत आता ॥ १९

पडाया आलंगवरी सीद्ध जाले
वहु लोक [1]रुद्रात्मज प्रेरीयेले
बहु तांब्र सेनेसी होंताची संगु
जसे भूस्मती आगि मुखी पतंग (गु) ॥ २०

उठेना आलंगेसी सामर्थ्य गाढे
बहु धाडीले रामचंद्रासी जोडे
कस्या पत्रीका लीनता उतरांच्या
मती उपमे त्या नयेति सुरवरांच्या ॥ २१

येताना रामराजा तजुंनी वीभवा तांब्र युध्य प्रसंगे
सेना गेली दीशांगी अवचंट उरलो थोडके लोक संगे
धेर्य वीर्यें प्रतापा धरूनी मनी पाहा राज चंदीस आला
मागे त्या रामचंद्रे शीव वरद बले येत्न तो मांडीयेला ॥ २२

लोकांसी सांगे हीत तो आमात्य
संपूर्ण देंशासि करा निपात

---

१ राजाराम.

करूनि यैसि उदरासी शांती
ह्या राम फोजा म्हणवा दीगाती २३

पाटील सेटे कुणबी जुलाई
चांभार कुंभार परीट न्हावी
सोनार कोलि उदिमी फुलारी
या वेगळे लोक किती बीगारी २४

ढालां कटार तरवार आसंख्य भाले
घोडे बरे जलदे वैसोनिया नीघाले
सेना समूह रचला नीचरे समुदा
देष प्रजा करूनी उव्दस तांब्र बघा २५

आनी चार सेना विविधा प्रकारे
सेनापती दोघ समान वीरे
संपूर्ण घेति गड देष कोटा
वीध्वंसीले बहुत लोक अनेक पेटा २६

सेनो सहस्त्र दशकेंनीधी मुख संख्या
दीलीस्वरासी करीती बहु त्रास मुख्या
ऐकोनीया प्रभुवरे सीव सूत राजें
पाचारीले निजदला समयास काजे २७

जाणोनि केवळ नीदान अमात्य बोले
ज्याचे प्रताप महीमेस्तव शैन्य चाले
स्वामीसहित नगरी वीपरीत कालु
ग्रासीन मी म्हणतसे अवघा भुगोलु २८

रवाना पुढे तो धनाजी स्व सैन्ये
वसुसंख्य सेना असे उग्रसेने

तया पाटीसी धाविला वीर जाण
सवे भानु संख्या सहस्त्रा हीसे (न ?) २९

धनाजी पुढे पावला मीत्रनेने
बहु मूटला धाक त्या तांत्र सेने
धरीले बळे मीत्र ईस्माईलासी
करुनी सीमा भेटला त्या प्रभूसी ३०

---

क्रमांक : २

श्री. कृ. ना. देशपांडे, कोल्हापूर यांना कोल्हापूरच्या राजोपाध्ये घराण्यांत कांही ऐतिहासिक कागदपत्र मिळाले. त्यामध्ये 'शिवभारत' किंवा 'अनुपुराण' ह्याचा कर्ता कवीन्द्र परमानन्द याचा पुत्र देवदत्त याने रचलेले एक मराठी कवन सापडले. श्री. देशपांडे ह्यांनी ते सरदेसाई स्मारक ग्रंथामध्ये (पृ. १८४-१८५) प्रसिद्ध केले आहे. त्याचीच प्रत सरदेसाई यांच्या कागदपत्रांत शिवाजी विद्यापीठाचे कुलगुरु डॉ. आप्पासाहेब पवार यांना मिळाली. ती खालीं दिली आहे.

॥ श्री गोविंदो जयति ॥

तुळजा प्रसन्न झाली
पातशाही हाती आली
जय लक्ष्मी माळ घाली
शिवाजीस आदरे १

रामराणी खुशहाल
दत्त कवीसही निहाल
लोपलाहे कलिकाल
कीर्ति चंद्रिका भरे २

उभारिता भुजदंड
रूम शाम दता दंड
तपती प्रतापचंड
धाके दिल्ली आगरे ३

जगीं शिवराज्य नांदे
क्ष (मा) सिंधु यशें कोंदे
द्विज कुलही विनोदें
होती वाद्य सुस्वरे ४

रामराणी बखताची
वेळ आली तखताची
जय लक्ष्मी पहा साची
करी मंगल आरती ५

दत्त कवि वर्णी राज
अंगणी झुलती गज
दरबारीं जयध्वज
तकटीं उभारती ६

काही मांडतां निदान
अंबा देते वरदान
. . . . . . लेसदा हेमदाने
संकटे निवारती ७

शिवराजा महीपति
झाला जगी . . . . . . पति
रणरंगी दिल्लीपति
पातशाह झारती ८

दुंदुभीच्या भभकारे
चकित होय लंकेश
भीती सकल नरेश
सर्व मही चोपली ९

गलबला खड्गकाला
चोहूकडे मुंडमाला
महादेव घाली गळा
धूलि रक्तें लेपली १०

दिल्ली झाली दीनवाणी
दील्लीशाचे गेले पाणी
ताराबाई रामराणी
भद्रकाली कोपली ११

जाणा तुम्ही आजी साची
आज्ञा झाली शंकराची
सर्व सेना दिल्लीशाची
अंतकास वोपली १२

ताराबाईच्या वखतें
दिल्लीपतीची तखते
खचो लागलीं तें विभतें
कुराणें (ही) . . . खंडलीं १३

वजीरांस झोडि जे ते
मुगलांस तोडि जे ते
मशीदींस फोडि जे ते
म्लेंछ कुलें दंडिली १४

उमराव दस्त झाले
देव द्विजां बकसिले
दिगंतीं ती कीर्ति चाले
यशें जगें मंडिलीं १५

फिटे हिंदुची शिराणी
सुटे द्विजांची . . . .
जयवंत रामराणी
पहा महि मंडळी १६

दुंदुभी होती भीषण
भांबावला बिभीषण
आरंभिली प्रतिक्षण
पुष्प वृष्टि अमरीं १७

ज्या नगरी सुखें नाचे हर
दिल्लीशावरि कहर
होता रामराणीची नजर
जहराची लहरी १८

रामराणी कोपतांच
दिल्लीशा . . . .
भूतनाथ करी नाच
संगरी चहूंकडे १९

मूगुलांचा क्षय घडे
रुधिराचे होती सडे
धडावरी धड पडे
भूत मंडळीं जुडे २०

भैरवांचा समुदाय
सरजाची कीर्ति होय

वेताळही सुखें धाय
वाजवीत चौघडे २१

हांसतसे भद्रकाली
योगिनी तों देती टाळी
निरंतर युद्ध काळीं
दत्त कौतुकीं वुडे २२

कीर्ती वल्ली सरजाची
जगतींत दाटे त्याची
ज्याला भुज प्रतापाची
दिगंतरी भरली २३

धाक ती दिगंत करी
गर्जतात परोपरी
सागरानेंही लहरी
आवरूनि धरिली २४

असी धिंग रामराणी
नाचतसे वैंभवानी
मूर्तिमंत हे भवानी
जगीं अवतरली २५

मानहानी दिल्लींद्राची
सभा हासते इंद्राची
आजिकाल कवींद्राची
सर्व चिंता हारली १६

निरंतर चाल केली
पातशाही तळा नेली
दिल्लीचीही लज्जा गेली
म्लेंछ गवण (?) गळाला २७

आतां तरी तुम्ही जाणा
निज हीत मनी आणा
मनो भावे करा आणा
न लागतां पळाला २८

सांडूनी दुरभिमान
मनीं धरा साम (समा ?) दान
दावा आपला इमान
सोडून द्या कुचाला २९

रामराणी भद्रकाली
रणरंगी क्रुद्ध झाली
प्रलयाची वेळ आली
मुगल हो सांभाळा ३०

---

**क्रमांक : ३**

फोर्ट सेंट जॉर्ज (मद्रास) येथील 'मॅकेन्झी कलेक्शन' मध्यें डॉ. आप्पासाहेब पवार याना 'परशुराम चरित्र' नांवाचे ऐतिहासिक काव्य सापडले. या काव्याचे सहा अध्याय आहेत. त्यांत थोरल्या माधवराव पेशव्याच्या मृत्युपर्यंतच्या घटनांचा उल्लेख आहे. कवि माधवरावांचा समकालीन असावा असे वाटते. सदर काव्यातून आमच्या प्रस्तुत ग्रंथाच्या विषयास संबंधीत असलेले श्लोक येथे घेतले आहेत.

**।। अध्याय तिसरा ।।**

परंपरा पुरुष या भिधानी
भोगीत आले कुरु राजधानी
सामान्य सौख्यें जनवर्तताहे
पाहे कळिधर्म तया न साहे १

पाछा पदीं वर्तन वर्तमानी
शाहजां सुधी वर्णिनि लोकवाणी
चौघे तनुज्यांत माहा प्रतापी
औरंगजेबाख्यनि उग्र कोपी २

त्याचे शरीरीं कलि व्याप्त जाला
धरि पित्या कोंडुनि घात केला
पाछापदीं वर्तन राष्ट्र व्यापी
वर्णाश्रमा चार समग्र लोपी ३

ऐसा आलमगीर क्रुर यवना प्राबल्य त्या आश्रयें
देवागार अनेक दिव्य रचना विध्वंसिलीं आळयें
तेथें आकृति शून्यकार मसदी केल्याभिमानी खळे
हिंदु माल तयांसि धर्मछळना म्लेंछत्व देती बळें ४

नाना क्षेत्र आगाध तीर्थ महिमा तात्काळ देती फळें
तेथे धेनु अनेक दुष्ट वधिती दुर्गंधि केली जळें
नाना व्यक्ति प्रसिद्ध लिंग प्रतिमा भंगोनी केल्या शिळा
वृती ब्राम्हण भ्रष्ट दुष्ट दमिती ब्रम्हत्व गेली कळा ५

ऐसे सर्व अनेक पूर्व जलधी पासोनी देशावधी
ऊदीचि गिरि हिंम पर्वत दरी पंज्याब यांचै नदी
लाहोरादिक सिंधुसागर तिरा व्यापी प्रतीची दिशा
ऐसा उत्तर नर्मदा परतिरा भोगीत तो पातशा ६

दिशा पश्चम सागरा परतीरा हबसान मक्का असे
त्यापुढें गिरि पर्वतांतर दरी देत्यांश तीं मानुषे
तद्देशी हबसी धरोनि यवनी नौकांतरीं आणिले
ते सूर्तेत अपूर्व शूर म्हणुनि सौदागरीं ग्राहिलें ७

त्यांतुनी मग नाम याकुद असा दैवागळा उटिला
नौका सैन्य सजैनिदण दिशें सिंधु तिरा पातला
येतां राजपुरीस जीर्ण नगरी बेटांतरी जंजिरा
तेथें राहुनि दुर्ग थोर रचिला विख्यात देशांतरा ८

तो माहांशूर कोकणाधिश बळी आकांत जाला जना
नौका थोर लघु समुद्र फिरणें प्राबल्य दुर्वासना
ऐसा सुरत काळिकोट नगरा पर्यंत धांवे सदां
नाना ग्राम उपप्लवोनि हरिल्या लोकांचिया संपदा ९

ऐसे म्लेंछ बलिष्ट हिंदु गणना तृणा परि मानिती
राजे दक्षणा देश रक्षणा यथा शक्त्या करूं भाविती
त्यांते आलमगीर वस्य करणें ईछा धरी मानसें
भावी धर्म विनास जाणुनि सुरां इंद्रादि चिंता वसे १०

चौथें यूग निशित्ध अंत कळिचें भावी घडे भोगणें
तें हा काळ अकाळ कृत्य कळिचें सत्कर्म उछेदणें
सत्ता ब्रम्ह बळिष्ट जाउनि मही दुष्टां न शिक्षा घडे
या कार्यासि विचार सार करणें ऐसें पडे सांकडे ११

ते काळीं विर विक्रमें स्वस्मरणें प्रार्थी सुरेशादरें
मत्कर्मे शक देश दक्षिणा दिशा संकालिली उत्तरे
त्या योगासि अपाय कृत्य कळिचें तें राहिलें मानसीं
दुष्टां शिक्षुनि धर्म रक्षण तरी आज्ञा समर्पी शिशी १२

ऐकोनी उभयानकुळ मधवा हर्षेव देहें करीं
त्यागोनी सुरधाम विक्रम धरे प्राकृत देहा धरी
शाहाजी युग क्षेत्रि क्षत्र उदरी प्रत्यक्ष जन्मे निधी
शंभू शक्ति उपासना शिव प्रभु विख्यात देशावधी १३

देवागार द्विजादि तीर्थ महिमा धर्मांकुराचें अळें
तों हा दक्षण देश रक्षण करी राजा शिवाजी बळें

पाळी निर्मुनि दुर्ग रचना सेवा प्रजा सर्वही
रेवा दक्षण सेतु सागर शिमा स्ववस्य केली मही १४

देशीं भार्गव क्षेत्र सागर निरीं नाना स्थळें योजुनी
वांधी दुर्ग अनेक डोंगर गिरी बेटें वळें पाहुनी
ज्याहाजें अरमार भार जळधी दुष्टांसी शिक्षा करी
बारा मावळ देश पर्वत दरी वांधोनि किल्ले गिरी १५

येसा पूर्ण प्रताप म्लेंछ दमनी विख्यात जाला जगी
शीवाजी नरनाथ क्षत्रपति हा स्वतंत्र सन्मारगी
या कीर्ति अवंरंगजेव श्रवणीं जाता विचारीं पडे
करणे वस्य म्हणोनि यत्न रचिले तो योगही नाघडे १६

तेव्हां आलमगीर दक्षण दिशे केली चढाई बळें
रोहिले मोगल जाट हिंदु नृपती आलीं असंख्या दळें
आनागुंदी पतीकडील यवनी पुर्वी लघु पातशा
स्थाने सान स्वदेश भोगिति सुखें त्याला धरी शानशा १७

शेना स्वल्प परि माहाशूर नरें राजा शिवाजी लढे
संधी पाहुनि यावनि महाय लुटीत मागे पुढें
येसा काळ कितेक सख्य विरुधे वार्धिक्ये जाली दशा
राजा नीधन पावल्यावरि पुढें देशीं स्थिरे पातशा १८

होता तो शिव भुपती शिव पुढें उद्याम कर्मोपरी
संभाजी शिव सुत रक्षण करी विख्यात सर्वो परी
पाछा पासोनी मंत्र शास्त्रि कवजी आला नृपा आश्रये
संभाजीवर मोहमंत्र पडतां दुर्बुधी जाला स्वयें १९

मंत्री मुख्य करुनि तोचि कवजी होणार इच्छा हरी
राजा आप स्वकिये बोध करिती चितीं धरीना करीं
येवोनी मग सैन्य यावनी नृपा वेढोनि घेती बळे
राजा दस्त करोनी नीघती जयें पाछा असे ज्या स्थळें २०

पाहोनी नृप मुर्तिमंत पुतळा पाछा वपे कौतुकीं
संभाजी तुज योग्य यावनि दशा होवोनि होणें स्वकीं
ते काळीं नृप धैर्य आणुनि वदे कन्यार्पिसी पातशा
केल्या जावई वाक्य मान्य करणें होणार हो कां दशा २१

ऐसे लोक विरुध्द वाक्य श्रवणीं कोपोनि शिक्षा वदे
काढा नेत्र निशिध दूर करणें अद्यापि बोले मदें
ऐकोनी यवनी अपाय नयनी तात्काळ केला सुरी
पाछा पुत्रि विचित्र नृप श्रवणीं भार्ताभिलाषा घरी २२

राजा नष्ट अरिष्ट योग घडला दुर्गादि नाना स्थळे
घेती म्लेंछ समग्र देश हबसी प्राबल्य जालें बळें
राजाराम विदेश दक्षण दिशें चंदावरी राहिला
रोगें क्षीण परंतु सुक्रुत बळें तारामती रक्षिला २३

ताराबाई धैर्यपुरुषा शूरत्व आणि बळें
घेवोनी नृप राम स्वामि सह तेजे प्राप्त जाली दळें
लंघोनी परदेश दुर्गम स्छळें कृष्णा नदीचे तिरीं
सातारा गड रक्षिला स्वकिजनी जावोनि बैसे शिरीं २४

तारा रक्षी सतारा अवघड शिखरा लाविकाशा फरावरा
पाछा केला नगारा सह दळ निकरा येऊनी घाली घेरा
केले नाना उपाया न दिसत जया सोडि आशाभिमानी
जेजे किल्ले न आले वगळुनि तयां जात पाछा निदानी २५

× × ×

कसबा शिंधु तिरीं श्रीवर्धनपुरी विख्यात देशांतरी
सुभा राजपुरी प्रमुख पदवी महाल पंचावरी
देसाईवर बिप्र प्रौढ सुकुलीं विद्या कळा लेखकी
बाळाजी नर दिश्वनाथ सुत तो नानाख्य हे लौकिकी ४१

तेथे अंश प्रकाश बुत्धी करुनी तात्काळ कार्या घडे
तद्यंशी मम अंश देहे धरणे म्लेंच्छत्व यावत् वुडे
दुष्टांनिग्रह कार्य सर्व करणे सद्रक्षणें प्राक्रमीं
इंद्रा स्वच्छ समग्र कार्य घडलें जावें सुखें स्वाश्रमीं ४२

★

घेवोनी अभया सुरेश्वरपुरीं हर्षं विलासा करी
पाछाचे कृतकार्य सर्व घडले कन्या विशोका करी
संभाजी नरनाथ नाश तरी त्या वंशी पहा शोधुनी
कैसा हो परि अंक पुत्र करणें कीर्ति प्रकाशे जनी ४४

राजा शाहु हरांश शंभु नृपती क्षेत्रोदरीं जन्मला
ह्याचा शोध करोनी यावनपती पुत्रिपती दीधला
तीणे पालन लालनादि करुनी लग्नासि केले विधी
देवानूकुळ भाग्य काळ उदई गांभीर्य जाला सुधी ४५

पाछासुता शाहुसि पुत्र मानी
म्हणे तुतें दईन राजधानी
प्रार्थी पित्या नातु प्रबुत्ध झाला
देई बिदा दक्षण भुपतीला ४६

तो सित्ध सावृद्य प्रबुत्ध मुर्ती
चिन्हें म्हणें होईल चक्रवर्ती
जावें सुखें दक्षण देश भोगी
विप्रानुकुळें चिर राज योगीं ४७

द्यावी समृत्धी शुर सैनिकांतें
बिदा करावें नृप बालकातें

★ मूळ हस्तलिखितात ४३ वा श्लोक नाहीं.

त्या संधि रोगार्दित पातशाला
काळें वयें नाश देहांत जाला ४८

पुत्र त्रई बादरशामिधानी
सन्नीध होता पित राव खानी
तेणें स्वकी सैन्य शुरां सुरांते
घेऊनि पंथा क्रमि–उत्तरातें ४९

येकापुरी वेरूळ नाम ज्याचें
सन्नीध राजे स्छळ यावनाचें
तेथे भुगर्भि धरि पातशाला
लंघीत तापी नदि नर्मदेला ५०

मुख्य स्छळीं जाऊनि राजधानी
समग्र व्यापीन म्हणे भिमानी
पिता नीमाला क्रुर भातृ जाला
दिल्लीस बंधु धरिती बळाला ५१

पाछा सुता जाणुनि वीरूधाते
शाहूसि आज्ञापित दक्षणे ते
ठेवी शिरीं हात म्हणे सुपुत्रा
स्नेहा न टाकी जसि मानि मात्रा ५२

देवोनि स्वत्यैर्धन शेवकातें
जावें म्हणे दैव धरील हातें
आज्ञा पुसे वंदुनि तो निघाला
कष्टें स्वदेशासि प्रसिध जाला ५३

श्री भार्गवानुग्रह सिघ्र वाणी
तो योग उद्योग नसे पुराणी
अंशे उदे भास दिशा प्रतीची
दशा स्तयेथोनिच यावनाची ५४

श्रीमंतोत्कर्षय ग्रंथे त्रितीयाध्याय सांप्रतं
कलिक्लेश प्रजानर्थाद्यिलोक्य ममरेश्वरं ५५

प्रथित: भार्गवेंद्रस्य मभयं प्राप्तितं अपात्
तद्भाव दुर्लभ: प्रोत्कं सुलभं श्राव्य पाटको ५६

एवं श्रीमंतोत्कर्ष त्रितीयाध्याय:

---

## ॥ अध्याय चार ॥

× × ×

शैह्याद्रि पृष्टिवरि पर्वतानि
किल्ला सातारा गड राजधानी
तारामती मुख्य पदाधिकारी
शेनापती जाधव कारभारी ६

देहांत जाला यवनाधिशाला
शेना क्रमी देश दिशोतरेला
ऐकोनि तारा स्वकि शूर भारा
म्हणे धरा फौज करा नगारा ७

त्या संधी श्री भार्गव अंशधारी
बाळाजि नावाख्य पडे विचारी
स्वातंत्र भोगूं जरि हे धरत्री
पूर्वी दिल्ही दान द्विजेभ्य पात्री ८

दिल्हे स्वदतासि नये स्विकारूं
निमित्य अन्याश्रित हें विचारूं
कर्णे स्वयें सर्व मनी प्रतिज्ञा
राजा असें अन्य जनासि संज्ञा ९

या निश्चयें येऊनि राजधामी
दावी सभा चातुरि सर्वकामी
संतोष शेनापतिच्या मनातें
समीप ठेवी गुण सागरातें १०

पुढें चढे शुक्लकळा शशीतें
तैसी दशा प्राप्त द्विजोत्तमातें
दुष्टांसि शिक्षा क्रम अंशधारी
येथोनि जाले द्विज देह धारी ११

राजा शाहु समग्र यावनि विधी भीमा नदीचे तिरीं
शेना स्वल्प समीप जाणुनि मनें तारा विचारा करी
आहे कीं स्वकि राजबीज प्रतिमा सित्धांत याचा करा
आणा जाधवराव निश्चय खरा खोटा तरी जा धरा १२

होता आज्ञा प्रतिज्ञा करूनि चमुपति सित्ध जाला त्वरेनें
कर्णे सित्धांत होणें म्हणुनि निजाना घेतले साक्षपाने
संगे बाळाजि नाना हयगज रचना शूरवीरीं मिळोनी
आले भीमा तीरा तें हतगत प्रभुतें प्रीथ पाहों म्हणोनि १३

होता प्रत्यक्ष भेटी तनुघन भृकुटी रक्त चाकर्ण दृष्टी
नासाग्रं संललाटी रधर हनुवटी चारूजं कबुकंटी
वाणी माधुर्य माने प्रहसित वदने राजचिन्हें प्रभुला
पाहोनि स्वात्मिकांला स्वकि नृप गमला निश्चयो सित्ध जाला १४

त्यासंधी साम्यकर्णे बहुगुण प्रविणे यन् नानाख्य त्याणें
नाना शब्दे बोधें नृप मन हरणें जाधवा सख्य होणे
तैसे केले उपाया करूनि शुभजया घेउनी सैन्य भारा
हर्षे केला नगारा सहित नृपवरा पातले श्री सतारा १५

आला राजा ग्रहाते विभुषित सुत्कें पातले सर्व भेटी
तारा सारा विचारा करूनि नृपवरा स्छापिला राज्य पाटी

अष्टै स्वेधिकारी नरपति स्वशिरी शोभला छत्रधारी
जैसा तेजे तमारी प्रतिदिन प्रसरी सैन्य संभार भारी १६

देशीं म्लेंछां विशेषी भय मनि भरलें कंपजाला तयातें
पत्रें दिल्लीस गेलीं विनवित वकिली विस्मयो पातशातें
जाणें स्वात्मीक किंवा विरुध मनि वरो दृश्यता हे स्वभावे
प्रेरी पत्रा वकिलां स्वकि तरि समई स्वेदळे सात्ध व्हावे १७

ते काळीं नृपती म्हणे पदपती सर्वे विचारा करा
जाणें दुर्गम दुर देश विषमीं निःसंग दिल्लीपुरा
नाहीं देश समृद्रि द्रव्य बलपान हे कार्य कैसें घडे
नोहे उत्तर सर्व स्तब्ध बसले राजा विचारीं पडे १८

पाहोनी सकळां सचित विकळा बाळाजीनाना वदे
स्वामी कल्पतरूस गुण शिरसा का न्यन्यता संपदे
आज्ञा मात्र शिरीं समग्र श्रिहरीं कर्ताभिमानी स्वये
जातो दिल्लीसि सर्वकार्य करतों स्वामी कृपे निश्चये १९

अैसे वाक्य गंभीर धीर समई ऐकोनि राजा म्हणे
शेना साधन द्रव्य कोश समृधि कर्त्यासि नाहीं उणे
हर्षे हस्त उदार सादर सभा होवोनि ठेवी शिरीं
बाळाजी तुज योग्य मुख्य पदवी पंतप्रधानीं करीं २०

× × ×

मिरवत गजरो नीघती शस्त्रधारी
आज्ञे बाळाजीनाना नमि नृप चरणा प्रार्थुनी पुत्र दोन्ही
बाजी बंधु चिमाजी नरमणि उभयां ठेविले सन्निधानी २१

शेना साधुनि संगे क्रमित लगबगे पावले जैपुराते
राजा जैसिंग सात्धे प्रहृषित अभयें भेटलें पातशातें
तेणें बाळाजिनाना बहुगुण सगुणा पाहुनी प्रीय मानी
सांगे कार्ये तयाते निशिदिन जपुनी रक्षिली सावधान २२



कोल्हापुरच्या परिसरातील पुंडाना तंबी द्यावी, म्हणून निघालेले आदिलशाही फर्मान. क्रमांक : ४; पृ. २१--२२

सौदे स्वातंत्र भेदें धरि मनि विरूधें इछि नाना धराया
कोण्ही काळी कुचाळी अनुचित श्रवर्णा सिव्ध जाले लढाया
जैशिगाचे विचारे उटउनि शिबीरें दक्षणे कुच केले
मार्गी वर्गी बळानें न टरति नृपति सैन्य देशासि आलें २३

उत्सा झाला समस्तां शिव प्रभु असतां कार्ये यैसे न जाले
तें हें बाळाजिनाना करूनि चमुधना आणितां येश आले
राजा लोभति शोभे करूनि स्वकि सभे त्या चमू ईश केला
दिल्हा किल्ला पुरंध्रा सहपुर कसबा ते स्छळीं वास केला २४

जाली पंतप्रधानी नरपति सदनि योग्य पुर्वी तपाचा
शेना स्वातंत्र होणे जन श्रम हरणें अंश हा भार्गवाचा
काळे मनुष्य देहा कुविधि विलया नेमिला नेम तेणे
जाला श्रेहांत्व याणा विषम बुधजना क्लेश नाना प्रयाणें २५

---

दि. ४–१–१६२३

**क्रमांक : ४**

कोल्हापुरच्या परिसरांत ' पुंड लोक उठाव करीत होते '. तो थांबविण्याबद्दल काढलेले आदिलशाही फर्मान.

फारशी शिक्का

शेख मलिक सरेसिम्त व कारकून परगणे कोल्हापूर यास बादशहाचे फर्मान :

या सुमारास आमच्या कानावर आले की पुंड लोक हे आक्रमण व हरामखोरी करून उठाव करीत आहेत आणि देशात धामधूम माजवित आहेत. याचा अर्थ काय ? या वेळी तुम्ही आसपासच्या महालांचे ठाणेदार व कारकून यांच्याशी मिळून परस्परांच्या सहकार्याने पुंडांना तंबी द्यावी. हे पुंड पुनः देशात ढवळाढवळ करणार नाहीत

अशी व्यवस्था करणे. अशा प्रकारे सहकार्य करुन पुंडांना तंबी देण्याचे काम तुम्ही केले नाही तर याचा परिणाम बरा होणार नाही. ही कडक ताकीद आहे असे समजून आज्ञेप्रमाणे वर्तावे.

तारीख १२, रविलावल, १०३२.

परवाना हुजुर.
शहानवाजखान
यांच्या द्वारे.

फारशी शिक्का

'आदिलशहा'
फारशी शिक्का

---

**क्रमांक : ५** दि. १०-१-१६२६

शहाजी राजे भोसले यांचे विनंतीवरून संभाजी व धारोजी मोहिते यांचे नांवे कर्यात तळबीड व वालेघाट येथील देशमुखी आदिलशहाने एका फर्मानाने कायम केली. त्या फर्मानाच्या समकालीन भाषांतराची मोडीत लिहिलेली नक्कल येथे दिली आहे. शिवाय फारशी नकलेचा गोषवारा दिला आहे.

सीका

नकल फरमान पादशाई पारसीची फरमान पादशाई सादर जाहाला. बेनाम बडे सरदार आलीशाहा आलीज्याहा मामलेदार बमर्द बाहादारी कारकूनान किले पनाला दरविला इजतपना रफात-दस्तगा सुज्यात इस्तीव आमदुहुल उमराये कयेक मेहरबानगी व कयेक कृपा शाहाजी भोसले सरलस्कर याणी आर्जदास्त केला की बादरगा पादशा सिलेमानआशा दरबारात आहे त्यास देसगत कर्यात तळबीड व बालाघाट किले मजकूर पुरुष दर पुरुष मिरास समजी व धारोजी मोहिते यासी द्यावी. हाली दसगत मजकूर वसाड पडली आहे. दसगत

चालवण्यास कोणी नाही. याजकरिता पादशा याणी मेहेरबानगी करून मोहिते मजकूर यास देसगत प्रांताप्रमाणे देण्याविसी हुकुम व्हावा. त्याजवरून देसगतीचो मेहरवानगी बीना आबरा आज सुरू सन सीत आशरीन आलफ देसगत कर्यात मजकूर व बालाघाट बरहुकूम सदरी लिहिल्याप्रमाणे देणे. समजी व धारोजी मोहिते यासी मुकरर करून दिल्ही आसे. दुमाला करणे. मोहिते मजकूर जमायद व महामत, आज देसगत मशारनिल्हे याजकडे ज्यारी इनाम पूर्ववत प्रमाणे चालवणे व भोसले सरलस्कर व म।।रनिल्हे याचा आर्ज पादशा याणी खातरेस आणून देसगतीची वहाली करून दिल्ही असे. दरीबाब ताकीद जाणून फरमानाची तालीक दप्तरात घेऊन आसल फरमान मोहिते याजकडे देणे. बर हुकूम फरमान बे हुजूर देसगत चालेवणें. ताहारीरफी. तारीख २१, माहे रबीलाखर, सन १०३५.

दि. १०–१–१६२६

( फारशी नकलेचा गोषवारा )

नक्कल

बादशहाचा फर्मान अमलदार व हवालदार व कारकून किल्ले पन्हाळा यांचे नांवे.

या सुमारास इज्जतपन्हा ..........शहाजी सरलस्कर यानी दरबारांत विनंती केली की कर्यात तळबीड आणि बालेघाट किल्ले मजकूर येथील देसकत पिढ्यान पिढ्या संभाजी व धारोजी मोहिते यांच्या मिराशीत होती. यावेळी सदर देसकत ही मोकळी पडली आहे. तेथें यावेळीं कोणीच काम करीत नाही. पिढ्यानपिढ्या ही देसकत चालावी अशा अर्थाचा फर्मान यापूर्वी देण्यांत आला होता. त्या फर्मानाच्या आधारे सु।। सित अशरीन अलफपासून कर्यात मजकूर व बालाघाटाची देसकत मागीलप्रमाणे संभाजी व धारोजी मोहिते

यांच्या नांवानें कायम करून फर्मान देण्यांत येत आहे. तो दुमाला झाल्याची नोंद घ्यावी आणि या फर्मानाच्या तारखेपासून देसकत चालू करावी. हा फर्मान सरलष्कराच्या विनंतीवरून देण्यांत आला आहे. ही ताकीद जाणून याची नोंद दप्तरात घ्यावी आणि अस्सल फर्मान परत देण्यांत यावा. फर्मानाप्रमाणे अंमल करण्यात यावा.

२१ शहर रविऊस्सानी (रबिलाखर)
सन १०३५.

---

**क्रमांक : ६** **इ. स. १६२६–२७**

शहाजी भोसले सरलष्कर यांचे विनंतीवरुन संभाजी व धारोजी मोहिते याना कर्यात तळबीड व बालेघाट येथील देशगत दिल्याबद्दलच्या फर्मानाचा उल्लेख. सदर कागद सन सबा अशरीन व अलफ (इ. स. १६२६–२७) चा असून अस्सल आहे. त्यातील मजकूर फारशी व मोडी लिपीत दिला आहे. अशाच मजकुराचा मोडी लिपीतील कागद सापडला त्याचे लिप्यंतर पुढे दिले आहे.

+ + + शहाजी भोसले सरलस्कर यानें पादशाही हुजुरास अर्ज केला की देशगत कर्यात तलबीड व कर्यात बालेघाट किल्ले मजकूर पुरुष दर पुरुष मिरास संबाजी व धारोजी मार हली देशगत मजकूर रिकामी पडली आहे. कोणी येक मनुष्य त्या जाग्यावर नाही. पादशहाचा फर्मान + + देशात + + पुर्वीप्रमाणे संबाजी व धारुजी मोहिते मुकरर करुन + + दुमाला उभयता मशारनिल्हे मजकूर देशगतीचे काम उभयता याजकडून + + घेत जावे. सरलस्कराचे विनंतीवरुन अयनाली नकल दप्तरी दाखल करुन असल परत द्यावे. पादशाहाचे हुकूमावरुन चालावे. सिका करुन + + + +

---

**क्रमांक : ७** **दि. ३०-५-१६२८**

तपे तारळेची देशमुखी संभाजी व धारोजी मोहिते याना देण्यात आली होती. परंतु ती त्यांचे दुमाला झाली नाही. ती त्याना ताबडतोब मिळावी म्हणून बादशाही फर्मान.

सर्व मुलुख परमेश्वराचा

(शिक्का)

बादशाही फर्मान सिद्दी हसन सरेसिम्त (प्रांताधिकारी) आणि कारकून पाा कऱ्हाड याचे नांवे की सुहुरसन समान सलासीन अलफ-पासून तपे तारळा पाा मजकुरची देसकत संभाजी व धारोजी यांचे नांवे करण्यात आली + + +

त्यांनी दरबारात जाहीर केले की तपे मजकुरचे देसकतीचे फर्मान झाले पण अद्याप आपल्या नांवे दुमाला झाले नाही. याचा अर्थ काय ? आता हा फर्मान मिळताच तपे मजकुरची देसकत मागील हुकुमास अनुसरुन सगळे हक्क लवाजीमा व इनाम व इतर आवश्यक बाबीसहित कांही आक्षेप न घेता दुमाला करुन देणे. पुर्वीच्या देसायांच्या मुलाना किंवा नातेवाईकाना कोणत्याहि प्रकारे या देसकतींत ढवळाढवळ अगर हरकत करूं न देणे. मोहिते मशारनिल्हे यांच्या नंतर (ती देसकत) यांच्या मुलांच्या (मोहिते मजकुरच्या) नांवाने चालूं ठेवावी आणि दप्तरी नोंद घेऊन अस्सल फर्मान परत द्यावे. या फर्मानाप्रमाणे अंमल करण्यात यावा.

तारीख

६ शव्वाल, १०३७

क्रमांक : ८ दि. २३–३–१६२९

संभाजी व धारोजी मोहिते याना दिलेले इनामपत्र.

दंडवत नक्कल

अज रख्तखाने मा॥ हजरती राजश्री साटेराउ राजे साटेसो दामदौलतहु ता॥ कारकूनानि व मोकदमानि व दर वस्तीचे कसबे तळवीड किले पनाळा चिदानंद की. दहाय सुरु सन तीसा अशरीन अलफ. मा॥ अनाम संभाजी मोहिते व धारोजी मोहिते देहाये कर्यात मजकूर मर्द हलालखोर अजि सबब मरामती इनाम दर गावास कर्याती मजकूर वा॥ पाटिल मौजे मालगाव चावर .॥. व मौजे उरल चावर .॥. व मौजे मुढे चावर .॥. मौजे वलेफळे चावर .॥. मौजे कोरविळे चावर .॥. व कसबे मजकूर चावर .॥. येकूण पड जमीन दर गावास पडीचे + + व देखील कुलबाव अज मरामती केले असे + + दिवाण नफराईत करतील हाये ये हाक सदरहू जमीन इनाम दस्तीबाद राखुनु हदमहदूद घालुन वाऔलादी व अफलादी देसाई मजकुरास दुमाला केला असे. दुमाला करणेस दरसाल खुर्दखताचा उजुर न कीजे. तालीक लिहुन घेउनु असल देसाई मजकुरास दीजे. मार्तब असे.

तारीख ७, माहे साबान.

---

क्रमांक : ९ दि. ८–११–१६३०

धारोजी मोहिते याने लढाईत शत्रूचा पराभव करून त्यास कैद केले. त्याने मिळविलेल्या या यशाबद्दल शाबासकी देणाऱ्या पत्राची नक्कल.

तालीक

सर्व शुरातील मुख्य व सर्वासन्नीधचे काम + + तील प्रमुख राजश्री धारोजी राजे मोहिते यासी आज्ञा केली अैसीजे. तुम्ही पादषाही आत्यंत कृपेनें व पादषाही मेहर्बानगीनें योग्यता वाढविण्याने

श्रेष्ठता पावोन जाणावे की तुम्ही युत्धप्रसंगी पुर्ण पराक्रमानें युत्ध केले आणी शत्रुकडील फौजेचा मोड केला व शत्रुचे जमातीस तरवारीचे धारेने भाजुन घेतले. म्हणीजे मोठा शस्त्र पराक्रम केला आणी शत्रूस पकडुन कैद केले. हा अती पराक्रम केला हे सर्व वर्तमान सरकारात जाहीर जाहाले. शाबास तुमची व तुम्ही निरंतर संतोषात असा. कारण की तुम्ही लढाईचे दिवसी बहुत शुरत्व केले. ही गोष्ट पादषाही कृपेस पात्र जाहाली. या उतम सेवेचे फळ तुम्हास दिवसेदिवस अदीक प्रात्प होउन सरकारातुन कृपाळु होउन तुमची योग्यता वाढविली जाईल. ता. १३, माहे राकार सन १०४०

परवानगी हुजुर

सही मुस्त्रुफाखान

---

**क्रमांक : १०** दि. २४–१–१६३२

मगरराव (?) लढाईकरिता चालून येत आहे. तरी तुम्ही त्वरीत हुजूर निघून यावे म्हणून धारोजी व संभाजी मोहिते याना हुकूम देणाऱ्या पत्राची नक्कल.

मोहर तालीक

सर्व शुरातील मुख्य राजश्री धारोजी मोहिते व सर्व उपमेची खाणी राजश्री संबाजी मोहिते यासी आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही पादषाही आत्यंत कृपेने व पादषाही मेहर्बानगी व योग्यता वाढविण्याने श्रेष्ठता पावोन जाणावे की मगरराव लढाईकरिता हुजूर चालून येत आहेत असी सूचना आली आहे. अद्यापी येऊन पोहोचले नाहीत. तुम्हीही येविसी बातमी ठेऊन हुशार राहावे. सर्व सताधारी ईश्वर आहे. आनी तुम्हास हे आज्ञापत्र सादर कर्ण्यातील तात्पेर्य हे आहे की

कोणाचा तर्क न चाले इतका तुम्ही लढाईविसी यत्न करून शुरत्व करून दाखवावे म्हणिजे ही गोष्ट ईश्वरास फार पसंद येईल. सदरहु शत्रु सत्वर येऊन पोहोचत आहे असे लिहून आले आहे. याजकरिता हा हुकुम दाखल होताच जलद हुजुर येऊन पोहचावे. तारीख १२, रजब, सन १०४१

परवानगी हुजुर.

सही मुस्तफखान.

---

**क्रमांक : ११** **दि. २५-२-१६३२**

दिपाजी राजे मोहिते याना सहा गावातून वेगार राबणुकीचा (वेठबिगार) हक्क मिळाला असून तो त्यांचेकडे बिनतक्रार चालवावा म्हणून प।। कऱ्हाड व क।। तळबीड येथील ठाणेदारांचे सहा गावांच्या मोकदमाना पत्र.

(शिक्का) आज दिवाण ठाणा देहाये प।। करहाड व क।। तळबीड ताहा हुदेदारानी हाल व इस्तकबाल व मोकदमानी मौजेन.

देह ६ क।। मजकूर विदानंद की हर्चि सु।। इसने सलासीन अलफ. आजरामरामत राबुनुक बेगारी नफर १ दर वज्ञ बदल नफराई इस्मि दिपाजी बिन धारोजी राजे मोहिते देसमुख कर्याती मजकूर बद रजा हुजराती इनाम करून दिला असे. दरगावासि राबुणुक महिने २ येकून १२ माहे वि।।

| | | |
|---|---|---|
| कसबे माहे २ | उरुल माहे २ | कोलवरे माहे २ |
| वेलफले माहे २ | मुढे माहे २ | माजगाऊ माहे २ |

येणे प्रमाणे गाऊगन्ना बेगारीयाचे राबुणुका देववणे. हर साला ताजा मिसलीचे उजुर न करीता चालवणे. मुसलमान या हिंदु होऊन यासी इस्कील करील तरी त्याचे आपले आपले महजबामधील बुरी सोगद आहे. तालीक लिहून घेऊन आसल मिसली फिरऊन दिजे.

तेरीख १४, माहे शाबान.

मोर्तब

शिक्का

---

**क्रमांक : १२** **इ. स. १६३२–३३**

कऱ्हाड प्रांतात झालेल्या पुंडगिरीचा उल्लेख करणारे फर्मान.

सर्व मुलुख परमेश्वराचा

(शिक्का)

बादशाही फर्मान मीर महमद काजिम सरेसिम्त (प्रांताधिकारी) व कारकून प॥ कलहर (कऱ्हाड) यांचे नांवे--

सु॥ सल्लास सल्लासिन अलफ...... या सुमारास दरबारात विनंती केली की कहनाजी (?) देसाई + + + येऊन पुंडगिरी करून + + न देऊन देश उध्वस्त केला. सेकोजी + + देसाई तपे मार + + + एक वर्षाची शेरणी + + + पूर्वीप्रमाणे करावे व सु॥ सलासिन अलफ + + पाचशे + + + + +

---

क्रमांक : १३ दि. २९-१०-१६३३

शाहाजादा बुऱ्हाणपुरावर येऊन पोचला आहे, तरी तुम्ही तुमच्या सर्व सरंजामासह तयार असावे आणि शाहाजाद्याचा हुकूम येताच त्याला जाऊन मिळावे म्हणून धारोजी मोहिते याना आज्ञापत्र.

सर्व मुल्क ईश्वराचा आहे

मोहर तालीक

राजेश्री धारोजी मोहिते यास आज्ञा केली येसीजे. तुम्ही पादशाई कृपेने व पादशाई मेहरबानगीने श्रेष्ठता पावोन जाणाव की हाली शाहाजादा बुराणपुरावर येऊन पोहोचला आहे म्हणोन वर्तमान कळले. यास्तव तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी येविसी तुम्ही खबर ठेउन सर्वराईचा सरंजामासुधा तयार असावे. अणी शाहाजादा याचा हुकुम येउन पोहोचताच तुम्ही आपले स्वार सिबंदी वगैरे जमातीसुधा शाहाजादा याजपासी हजर होउन हुकुमाप्रमाो चाकरी बजाऊन येक पळभर देखील अंतर न करिता स्वामी से (वा) करून दाखउन योग्यतेस पावावे. तारीख ५, माहे जमादिलावल, सन १०४३

परवानगी हुजुर.

क्रमांक : १४ दि. २६-११-१६३३

तुम्ही आबरखान ( अंबरखान ) यास मिळून शत्रूचा पराभव करावा म्हणून धारोजी मोहिते याना आज्ञापत्र

मोहर तालीक

राजेश्री धारोजी राजे मोहिते यास आज्ञा केली अैसीजे. तुम्ही पादशाई कृपेने योगेता पावोन जाणावे की ह्याली लडाईचे कामावर सभावितपणाची आहे रहाणी ज्याची व सुरत्वाच पराक्रमाचे आहे चीन जयास व कृपा करण्यास यौग व उपकार व मेहेरबानी करण्यास पात्र अस जे आबरखान याजला नेमल आहे. त्याचे पत्र येऊन पोहोचताच तुम्ही खुद जातीन फौज सुधा खान मारनिल्हे याजपासी पोचून उभयेता मिलोन शेत्रु पराभव जिवांदारभे येत्ने करावा. या प्रकर्णी ही श्रेष्ट ताकीद जाणोन सत्वर खान मारनिल्हे याजपासी जाऊन मिलावे आणि पूर्ण मसलतीने स्वामी सेवा उतमपणानी करावी. ता ४ माहे जमादिलाखर, सन १०४३

परवानगी हुजुर.

सई मुसरफखान.

क्रमांक १५ इ. स. १६३३ (?)[1]

आमरखान ( अंबरखान ) ह्याच्या मदतीस जावे म्हणून संभाजी व धारोजी मोहिते याना आज्ञापत्र.

सर्व मुलुक ईश्वराचा आहे

तालीक

राजश्री सभाजी व धारोजी मोहिते यास आज्ञा केली येसीजे. तुम्ही पादशाई आत्यात कृपेने योगेता पाऊन जाणावे की हाली प्रथेवी-समान व सुरयासारख श्रेष्ट हुकुम तुम्हास सादर केला अस. तर तुम्ही खुद जातीन सभावितपणाची आहे रहाणी जयाची व श्रेहेष्ट आहे योग्यता जयाची आसले आमरखान याजपासी जाऊन मिलाव. या कामास येक पळभर देखील आवकाशे किव्हा सुर्त्ती (स्ती) करू नये.

या सदेचे[2] माथेवर मोहर आस.

---

क्रमांक : १६ दि. १०-२-१६३६

धारोजी मोहिते यानी कठीण प्रसंगी आमचे बरोबर मोठा पराक्रम गाजविला असे रणदुल्लाखान याने कळविल्यावरून बादशहाने खूष होऊन धारोजी मोहिते याना उंची पोषाख पाठविला.

सर्व मुलुक ईश्वराचा आहे

मोहर तालीक

सर्व शुरातील मुख्य व सर्व संन्नीधचे कामदारातील प्रमुख राजश्री धारोजी मोहिते यासी आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही पादशाही

---

१ क्रमांक १४ हे पत्र अशा बाबतचेच आहे: यावरून चालू पत्र १६३३ सालचे असावे.

२ सद – आदिलशाही फर्मान.

कृपेने श्रेष्ठता पावोन जाणावे की हाली सर्वश्रेष्ठ वजीरातील मुख्य व सर्व मुसलमान जातीचे अमीर लोकातील श्रेष्ठ व सर्व खान मंडळीतील योग्य व थोरपणा व संभावीतपणाची आहे रहणी ज्याची व भारीपणा व शुरत्वाची आहे योग्यता ज्याच व पादशाही कृपेस योग्य व उंचेत्वास थोरपणास फारच लायक व रणभूमीतील व युत्धप्रसंगातील धीर व महान पराक्रमी शुर व सुंदरपणाचे आहे चिन ज्यास व सांप्रतचे रुस्तुमच असे जे रणदुल्लाखान याणी लिहिले की दौलतीचे कल्याण इछिणार राजश्री धारोजी मोहिते याणी महान कठीण प्रसंगाचे समई यश प्राप्तीचे वेलेस आमचे समागमे बहुत पराक्रम केला म्हणोन सरकारात विनंतीपत्र लिहून पाठविले व मुलुक घेऊन फते जाल्याचे व शुरत्वाने शत्रु पराजय करून यश प्राप्तीची खुष खबर म्हणोन संतोषाचे वर्तमान जाहीर केले. ते ऐकोन स्वामी तुम्हावर कृपाळु होऊन तुम्हास भारी किमतीचा पोषाख प।। आहे. यात सहस्त्रावधी प्रकारचे कल्याण आहे असे जाणोन आंती आदेर करून घेऊन जीवादारभ्य असीच स्वामी सेवा करण्याविसी कंबर बांधून सेवा करून पादषाही आत्यंत कृपेस पात्र होऊन योग्यता पावोन असावे. आणि निरंतर विनंतीपत्र पाठवित जावे व सांप्रतचे केवळ रुस्तुमच व शुरत्वाचे आहे चिन ज्यास असे जे रणदुल्लाखान हे दौलतीचे कल्याणार्थ तुम्हास आज्ञा करतील त्यातच आपले सर्व कल्याण आहे. असे जाणोन त्याचे आज्ञेत वागावे व त्याचे हुकुमाविसी कदापी विरुत्ध वागो नये आणि कधीही आंतर करू नये.

तारीख १२, रमजान, सन १०४५

**क्रमांक १७** **दि. ३०-४-१६३७**

धारोजी मोहिते यानी प्राण पणास लावून राजसेवा केल्याचा उल्लेख.

सर्व मुलुक ईश्वराचा आहे

मोहर तालीक

राजश्री धारोजी राजे मोहिते यासी आज्ञा केली अैसीजे. तुम्ही पादषाही आत्यंत कृपेने व पादषाही मेहर्बानगी व योग्यता वाढविण्याने श्रेष्ठता व थोरपणा पावोन जाणावे की हाली संभावितपणाची आहे रहाणी ज्याची व शुरत्वाचे आहे चिन्ह ज्यास व श्रेष्ठ आहे स्थान व योग्यता ज्याची व आत्यांत कृपा करावयास योग्य व उपकार व प्रीती करण्यास पात्र असे जे आंबरखान नवल्ली याणी सर्व जालेला मार लिहिला की धारोजी राजे मोहिते याणी स्वामी सेवेस प्राण अर्पण करावा अशा प्रकारची सेवा करण्यात किंचितही आंतर केले नाही व धण्याचे चाकरीत जीव खर्च करावा यदर्थी काही येक वारीक विचार मनात न आणिता आंतर न करीता स्वामी सेवा करून दाखविली म्हणोन लिहिले ते जाहीर जाले. त्याजवरून तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी तुम्ही सत्य जाणावे की ही शेवा स्वामीचे मनोदयानुरुप तुम्ही केली. या उतम शेवेचे फळ दिवसे दिवस तुम्हास आदीक प्राप्त होऊन तुमची योग्यता वाढविली जाईल. ता. १४, माहे जिल्हेज, सन १०४६

---

**क्रमांक : १८** दि. २५-८-१६३९

धारोजी मोहिते यानी झेंडा उभारणीसाठीं वजीर लोकाकडे ८६ होन पाठवावे म्हणून आज्ञापत्र.

सर्व मुलुक ईश्वराचा आहे

मोहर तालीक

राजश्री धारोजी मोहिते यासी आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही पादषाही आत्यंत कृपेने श्रेष्ठता पावोन जाणावे की हाली आनंदाचे दिवसात हुजुरून श्रेष्ठ वजीर लोक त्याणी तालोक्यात झेंडा उभारणे ठराविले आहे. तरी झेंडा खडा करण्याचे हकाबद्दल ८६ शाऐसी होन वजीर लोकाकडे हे आज्ञापत्र दाखल होताच तुम्ही पाठऊन द्यावे. या कामास किंचितही आवकाश करू नये.

ता. ५, जमादिलावल, सन १०४९

---

**क्रमांक : १९** दि. २७-१०-१६३९

मौजे येरपाळे हा गांव धारोजी मोहिते याना बादशहाने कुलबाबीसह दिला होता. तो सय्यद उमर ह्याने गैरप्रकाराने आपल्या नांवावर घेतला असल्याची तक्रार धारोजी मोहिते यानी केल्यावरून सय्यद उमर ह्याचे फर्मान रद्द करून बादशहाने तो गांव धारोजीकडे पूर्ववत चालू ठेवून सय्यद उमर यास कैद करण्यास फर्माविले. सदर फर्मान अस्सल असून त्याचा गोषवारा येथे दिला आहे.

फारशी शिक्का

फर्मान देसाई परगणे कराड यांचे नांवे :

धारोजी मोहिते यानी विनंती केली की मौजे येरपाळे परगणे मजकूर हा गांव सन १०४० सालापासून कुलबाबीसहित आपल्याला

फर्मानाने देण्यात आला होता. मध्या सय्यद उमर सय्यद ताहेर यानी गैरवाका समजाऊन फर्मान संपादन केला असून तो परगण्याला आणला आहे. तरी आपल्यावर कृपा करून तो फर्मान त्यांच्यापासून काढून घेऊन पूर्वीप्रमाणे आपल्या नांवाने कायम करावा. यावरून आज्ञा करण्यात येते की मौजे मजकूर हा धारोजीचा इनाम समजून मागील फर्मानाप्रमाणे कुलबाबीसहित दुमाला करण्यात आला आहे. गैरवाका समजाऊन फर्मान संपादन केला आहे त्याना कैद करण्यात यावे आणि त्यांच्याकडून फर्मान लवकर काढून घेण्यात यावा. याबाबतीत ताकीद जाणून दुसऱ्या फर्मानाचा उजर न करणे व त्याना कोणत्याहि प्रकारचा त्रास न देणे. जाणिजे.

ता. १०, माहे रजब १०४९

परवानगी हुजुर.

---

**क्रमांक : २०** **दि. २७–६–१६४५**

मौजे आर्पशिगे हा गांव धारोजी मोहिते यांचेकडे असताना परोजी कावर त्या गांवाची खराबी करीत आहे. तेव्हा त्यास तावडतोब कैद करावे म्हणन आज्ञापत्र.

सर्व मुलुक ईश्वराचा आहे

तालीक

आदीलषाहा पादषाहाचा सीका आहे

कारकून व हवालदार व अमलदार व ठाणेदार ईलाखा सरकार यास हे आज्ञापत्र सादर केले जाते जे सूाा खमस आर्बेन व आलफपासून मौजे अर्पसिंगे किले ताथवडा या गावची वहिवाट शूर विरोपम



मौजे येरपाळे हा गाव पूर्वीप्रमाणे धारोजीस इनाम देण्यात आला आहे म्हणून फर्मान. क्रमांक १९; पृ. ३५-३६

धारोजी मोहिते याजकडे चालू आहे. असे असता हाली सरकारात जाहीर जाले की परोजी कावर + + हा मौजे मारचे निमे गावकरी घेऊन दावा करण्याचे ईराद्याने मौजे मार येथुन पळोन जाऊन गावोगावी राहून हरामखोरी म्हणीजे बेमानपणाने मौजे आर्पासिंगे या गावासी दावा करून गावची खराबी करीत आहे. याजकरिता पृथ्वीसमान व सूर्यासारिखा श्रेष्ठ असा सरकारचा हुकूम सादर जाहाला आहे. तरी परोजी हरामखोर मजकूर हा जेथे असेल तेथे पकडून कैद करून आणून तालुकेदार मोहिते मारनिल्हे याचे हवाली करावा. कारण की तो मनुष्य फार हरामखोर आहे. या प्रकर्णी हा हुकूम पुर्ण सीक्षारुप जाणोन सदरहु आसामीस कैद करणेविसी येक पळभर देखील सुस्ती करू नये. आणी सदरी लिहिलेप्रमाणे आमलात आणावे.

ता १२, माहे जमादिलावल, सन १०५५

परवानगी हुजुर

---

**क्रमांक : २१** दि. ३०-८-१६४५

धारोजी मोहिते यांच्या मौजे कळंबा ह्या गांवावर धाड घालून अब्दूल महमद हवालदार व दादाजी खंडेराव या किल्ले चंदनच्या ठाणेदारानी गांवची रयत व गुरेढोरे पकडून नेली. धारोजी यानी तक्रार केल्यावरून सदर फर्माना-द्वारे बादशहाने ठाणेदाराना लुटलेला माल व गुरेढोरे परत करण्याची ताकीद दिली आहे.

फारशी शिक्का

फर्मान अब्दूल महमद हवालदार व दादाजी खंडेराव ठाणेदार व कारकून किल्ले चंदन यांचे नांवे की सुहूरसन खमस अर्बैन व अलफ

या सुमारास धारोजी मोहिते यानी दरबारात विनंती केली की ठाणेदार मशारनिल्हे याने किल्ले मजकुरच्या पुंड-नायकवाडी यांच्या सांगण्यावरुन कांही माणसे बरोबर घेऊन आमचे वास्तव्याचे गांव मौजे कळंबा पाा कऱ्हार (कऱ्हाड) याच्यावर चाल केली. सगळे गांव गारद केले. गुरे, ढोरे, माल व रयत याना पकडून घेऊन गेला आणि कैदखान्यात ठेवले. यांनी (धारोजी मोहिते) बादशाही ममलतीची कामे जिवापाड केली आहेत + + + गांवची जी खराबी केली त्याची कल्पना ठाणेदारास काय असणार? आता हा बादशाही फर्मान मिळताच या गांवाची गुरेढोरे व सामानसुमान जी ठाणेदार किल्ले मजकुर याने गारद केली आहेत ती लवकर परत देण्यात यावीत आणि रयतेला सोडून देऊन त्याना तावडतोब गांवाकडे परत पाठवावे. ही ताकीद जाणावी. पुनः त्या गांवाचे नांव न काढावे + + + या पुढे नाईकवाडी यांच्या सांगण्यावरून असे वागाल तर तुम्ही आणि नाईकवाडी याना योग्य फळे मिळतील आणि त्याना त्यांच्या कर्माची सजा मिळेल. जाणिजे. फर्मानाप्रमाणे अंमल करण्यात यावा.

| परवानगी | तारीख |
|---|---|
| हुजूर. | १८ रजब, १०५५ |

---

**क्रमांक : २२** **दि. २३-७-१६५१**

कसबा तळवीडच्या देशमुखीची व मोकदमीची वाटणी दिपाजी धारोजी मोहिते व हरीपराव संभाजी मोहिते यांच्यात झाली. त्यावेळी हरीपरावाने लिहून दिलेला महजर.

माहाजर व तेरीख छ १४ माहे श्याबान सु॥ इसने खमसैन अलफ. बि॥ हाजीर मजालसी

| | | |
|---|---|---|
| अपाजी तमाजी पंडित हवालदार देहाये इस्तकामत वजारतमाब भोरपडे—— | तिमाजी गिर-माजी पंडित मुजुमदार देहाये मजकूर छ १७ माहे शाबान | सुरो पंडित हुदेदार मौजे पाली ( अष्टपैलू फारशी शिक्का) |
| (वर्तुळाकार फारशी शिक्का) | | |
| रायाजी त्रिमल हुदेदार क॥ तल बीड—— | नागोजी पटेल मोकदम, मौजे पाली. | लखमोजी पटेल मोकदम, कसबे उंबरज. |
| ( अष्टपैलू फारशी शिक्का) | ( वर्तुळाकार फारशी शिक्का) | (निशाणो नांगर) |
| बाबाजी पटेल मोकदम मौजे साकुर्डी. | रखमाजी पंडित कुलकर्णी मौजे पाली. | गणोजी खातु वाडी कसबे तल बीड. |
| क॥ सालगाऊ. | सही | (निशाणी नांगर) |
| (निशाणी नांगर) | सही | |
| देवजी चौगला क॥ तलबीड | माहाल सेठीची वाडा मौजे पाली | बाजी राजे सिदे लस्करी बारगीर स्वार रा मोकरम |
| (निशाणी नांगराची) | सही | (निशाणी कटचार.) |

या हुजूर दिपाजी बिन धारोजी राजे मोहिते कसबे तलबीड यासी हरीफराउ बिम संबाजी राजे मोहिते यांनी लिहुऊन दिल्हा

माहाजर येसाजे. देसमुखी काा मजकूर व मोकदमी काा मजकूर याचे हक लाजिमा व इनामपालक व पटी पासोडी व बाजे हक तमाम पेसजी राजेश्री धारोजी राजे यानी तकसीमवार वाटून घेतले अहे. तेणे प्रमाणे तुम्ही अपले तकसीम खाऊन सुखे असावे व अम्ही आपले तकसीम प्रमाणे खाऊन सुखे असावे. राजे मशारनुलेने वाटीले खेरीज सिका देसमुखीचा व नांगर मोकदमीचा व पाने सुमार १५० दरोज व तेल वजन ३८८९ व पडिद वाटपा येसे होते. पैकी सदरहू हजीरमजालसी यानी मनास आणुन दिपाजी राजे यांस देविले. देसमुखीचा सिका व पाने निमे ७५ सदरहू पैकी व तेल निमे रोजीना १॥४॥ प्राा वजन व पडिद निमे प्राा देविले. हरीफरायास विचारुन अत्मसंतोसे हरीफरायाने दिल्हे असे. दिपाजी राजे यानी अपले हक लाजिमा व इनाम पालक व सदरहू हाली दिल्हा हाक तो खाऊन दिवानीचा नफराई करुन सुखे असणे व देसमुखीचे गांव ६ पैकी हरीपरायाने ३ गावीचे इनाम व जे हक तेथी असेल तो खावे व दिपाजी राजे यानी ३ गावीचे इनाम व पटी पासोडी व बाजे हक जे असेल तो खावे. साहि गावीचा कारभार देसगतीचा चालऊन दिपाजी राजे यानी दिवाण नफराई चालवावी. सदरहू प्राा निवाडा हाजीर मजालसी यां हुजूर जाहाला असे. निवाडा प्रमाणे हर दो जणानी वर्तावे. सदरहू माहाजर दिपाजी राजे यासी हरीफरायाने लेहून दिल्हे असे. हा माहाजर. सही येकूण बोली ३६.

बि॥ बोपाजी बहिरऊ कुलकर्णी
मौजे उरुल काा माा.

क्रमांक : २३ दि. ७–१२–१६५२

मोहिते देशमुख याना शेंकडा पांच होन प्रमाणें महसूल देण्याबाबतचा उल्लेख या पत्रात आहे.

अज दीवाण ठाणा देहाये पाा करहाड व कर्याती तलबीड तांहा हुदेदारानी हाल व ईस्तकबाल व मोकदमानी कर्याती मजकूर देह

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ( अष्टपैलू फारशी शिक्का) | कसबे | १ | मौजे मुढीये | १ |
| | मौजे उरुल | १ | मौजे माजगाऊ | |
| ( अष्टपैलू शिक्का मराठी) | मौजे कोलविरे | १ | मौजे वेलफले | १ |

बीदानंद के हर्चो. सु॥ सलास खमसिन अलफ. हक तावूद देसमुख मोहिते नि॥ गैर महसूल दर सदे होन ५।० पाच प्रमाणे चालीले आहे. दरीवरु भोगवटा तुटला होता. अजि सबब हक पावत नव्हता. हाली देसमुखानी अर्जदास्त केले कीं साहेबी नजर येनायेत फर्माउन अपला कदीम हक मरामत करून नफराई घेतली पाहीजे म्हणोन. तरी देसमुख मजकूराचे कदीम भोगवटा चालीला आसे. बीलाकुसूर नि॥ गैरमहसूल हक दर सदे होन ५।० प्रमाणे अदा करीत जाणे. अउलाद आहफवाद चालवणे. दरसाल ताजा मिसलीचे उजूर न कर्णे.

मोर्तबु

( कागदाच्या पाठीवरील मजकूर )

तेरीख १५, माहे मोहरम

---

**क्रमांक : २४** **दि. २-१२-१६६०**

नेताजी मोहिते व घारोजी मोहिते ह्यांची आपल्या भेटीस येण्याची इच्छा बादशहाला अब्दुल रहिम बहुलोलखान ह्याच्या मार्फत कळाल्यावरून त्याने या फर्मानाद्वारे त्याना आपल्या फौजेसह बोलाविले. हे फर्मान अस्सल आहे.

(फारशी शिक्का)

बादशहाचे फर्मान की धारोजी मोहिते यांची मुले नेताजी व दिपाजी यानी बादशहाची आपल्यावर पूर्ण कृपा आहे अशी खात्री बाळगून जाणावे की, या सुमारास नवाब अब्दुल रहिम बहलोलखान याच्या मार्फतीने तुमच्या निष्ठेची व तिकडे येण्याच्या इच्छेची माहिती मिळाली. आम्हाला परम संतोष झाला. तुम्ही पुर्णपणे खातरजमा बाळगून चांगल्या फौजे सहित येथे यावे. म्हणजे तुमच्यावर बादशहाची कृपा होईल.

बादशहाचा परवाना. ८ रविऊस्सानी १०७१

---

**क्रमांक : २५** **दि. २८-८-१६६१**

अब्दूल महमद व इतर अधिकारी मामले व कसबा देवराष्ट्रे यांचे नांवे बादशहाचें फर्मान की, काळोजी भोसले व बहिरोजी भोसले यांचे पाटिलकीचे वतन व इनाम पुर्ववत बादशहाने चालू ठेवले असून ते बिनतक्रार चालवावें.

सर्व मुलुख परमेश्वराचा

(फारशी शिक्का)

बादशाही फर्मान अब्दूल महमुद हवालदार व कारकून मामला व पाटील व मिरासदार व जमिनदार व तमाम मुकादम मामले कसबा देवराष्ट्रे सरकार पन्हाळा यांचे नांवे–

सुहुरसन सलास सितेन व अलफ. या सुमारास काळोजी व वहिरोजी वल्लद संभाजी भोसले पाटील का देवराष्ट्रे यानी विनंती केली की आपल्या नांवे पाटीलकीचे वतन व इनाम एक चावर व एक चावर पालक व अर्धी चावर इनाम जमिन हक्क व रुसुम व बागाईत शेरी चावर जिराईत एक गोणी धान्य व एक होन व एक मण कापूस व + + शेर...... जिन्नस दोन पायली व एक दोर (?) हक्कदारी पट्टी .....व किरकोळ बाब व शंभर...... बैलामागे एक फुलुस व तेल्याच्या दुकानावर पावशेर तेल व मानपान व...... पुर्वीप्रमाणे चालत आलेले आहे. परंतु बादशहानी कृपेची दृष्टी ठेवावी आणि आम्हाला फर्मान करून द्यावा. ही विनंती मनास आणून काळोजी व बहिरोजी वल्लद संभाजो पाटील का देवराष्ट्रे येथे इनाम एक चावर जमिन व हक्क व रुसुम व मानपान पुर्वीच्या वहिवाटीप्रमाणे फर्मान करुन देण्यात आला आहे. इनाम जमिन मार व नगद इनाम व कुलबाबी व पटचा व पैकार व फर्माइशी व पायपोसी......इस्मि व रस्मि (नांवाने व अधिकाराने) पुर्वीप्राो जसे वरच्या कचेरीत नोंदले गेले आहे तसे चालावे. भोगवटचाप्रमाणे चालू ठेवावे. या इनामात कोणी अधिकारी ढवळाढवळ करील तर तो गुन्हेगार समजला जाईल व त्याचा धिक्कार होईल. जर कोणी हिंदु उपसर्ग देईल तर त्याला काशीमध्ये गाय मारल्याचे पातक लागेल. दरवर्षी फर्मानाचा उजर करुं नये. बादशहानी कृपावंत होऊन हा फर्मान जारी केला आहे. त्याप्राो अंमल व्हावा.

१२ मोहरम १०७२

---

१ याच मजकुराचे आणखी एक फारशी फर्मान आहे. फरक एवढाच की त्यांत वरील फर्मानातील अब्दूल महमुद हवालदाराचे नांव नाही. तसेच, शेवटी १२ मोहरम ही तारीख सारखींच असली, तरी सन १०६८ हा देण्यांत आला आहे.

क्रमांक : २६ दि. १३-१-१६६२

महजर. नेताजी आणि दिपाजी मोहिते व हरीफराव, हंबीरराव आणि शंकराजी मोहिते, या मोहिते घराण्याच्या दोन शाखांमध्यें झालेल्या वाटणीचा महजर.

माहाजर व तेरीख छ २ माहे जमादिलाखर सु॥ इसने सितैन अलफ. वी हुजूर हाजीर मजालसी यानी वि॥

राजमुद्रा

गंगाजीराम पंडित
नामजाद देहाये तर्फ
पडळी
(फारशी अष्टकोनी शिक्का)

तिमाजी गिरमाजी पंडित
मजमुदार.
रुजु सुद
रघो केशव पंत
निघावने (?)

अंतो नरसिंह पत
हुदेदार क॥ तलबीड
(अष्टकोनी फारशी शिक्का)

गोविंद बाबाजी
निसिंदे क॥ तलबीड

गावगना मोकदमानी

विटोजी पटेल
मौजे कोणेगवाण
(निशाणी नांगर)

वणजी सदनसीव
मोकदम मौजे घोणसी.
(निशाणी नांगर)

नरसोजी पटेल
मौजे सिरवडे
(निशाणी नांगर)

रभाजी पटेल मौजे
तासवडे
(निशाणी नांगर)

विठोजी पटेल मौजे
नडसी

(निशाणी नांगर)

गोपजी पटेल
मौजे वाबगाऊ

(निशाणी नांगर)

लखमोजी पटेल
मौजे शापुर

(निशाणी नांगर)

नागोजी पटेल
व काऊजी चौगला
मौजे मुढे

(निशाणी नांगर)

कसबे तलबीड

आबाजी पटेल
मेसजी पटेल

अपाजी पटेल
हंसाजी पटेल

तिमाजी रुद्र
कुलकर्णी

रेखजी व लखमोजी
चौगला

या हुजूर जाहला माहजर येसाजे. अगरवादी नेताजी राजे व दिपाजी राजे मोहिते देसाई व पछमवादी हरीफराऊ व हंबीरराऊ व शंकराजी राजे देसाई क।। तळबीड व क।। वांगी या उभे वर्गामध्ये देसाई याचे वेव्हार समंध होता. उभे वर्गाची उतरे मनासी आणिली. धर्मता मनासी आणिता संबाजी राजे व धारोजी राजे या उभयता दोघे बंधु वर्गानी दोनी स्तलीचे जोड व्रिती करून घेतले. बाा फर्मान दोघे भाऊ वाटून खात होते. दोघासीहि देवाज्ञा जाहाली. त्यावरी शंकराजी राजे व नेताजी राजे व्रितीसमधे भांडो लागले. मग सभानाईक मिलोन मुनसिफी पाहाता जोड व्रिती दोघासी बराबरी वाटून द्यावे सिके दोघानी करावे. दर कर्यातीस यैसा तह देत असता शंकराजीराजे

बोलिले जे आपण वडील भावाचा लेक. आपण हिंगणगादे इनामाचे गाव घेईन व सिका अपण करीन. वरकड तकसीम निमे वाटून देईन. त्यावरी गोत नाईक बोलिले की जोड व्रिती देणे. पातशाचे दोघासी मऱ्हामत केली तोफा घेतला तो दोघानी दिल्हा. जे वख्ती इनाम दिल्हा ते वख्ती इनामाचे गाव नव्हता. त्यावरी पादसाई यापासून देसमुखीस इनाम हिंगणगादे करून घेतले ते आपण न दिल्यावरी सभा नाईक बोलिले की वडिलाचे व्रितीवरी पैदा केले ते दोनी ठाई घेवे. त्यावरी संक्राजी राजे कबूल न करीत. मग सभा नाईकानी तह दिल्हा जे जोड व्रिती आहे. पडिले पान दोघानी वाटू घेवे. त्यावरी शंकराजी राजे यानी मशाखत करून व्रितीवरी गाव इनाम करून घेतला. अजी सबब मौजे मजकुरीचे तीन तकसीमा करून गोत नाईकी शकराजी राज यास दोनी तकसीमा देविले. तिसरे तकसीम नेताजी राजे यास व दिपाजी राजे यास देविले व गावीचे राविता वेगारी व अडीफाली व सेवाधार शंकराजी राज्यास द्यावें. वरकड गाव बीाा तकसीमा दोनी तकसीमा शकराजी राज्यानी घ्यावे. येक तकसीम नेताजी राज यानी व दीपाजी राज्यानी घ्यावे व देशमुखीचे सिके दोघानी करावे. विलायत व कसवा बराबरी दो ठाई वाटून तारेतार खावे. दोनी तर्फा करून घेवे. अधी सिका व पान व तश्रीफ शंकराजी राजे यानी घ्यावे. मागून सिका नेताजी राज यानी करावे व पान व तश्रीफ मागून नेताजी राजानी व दिपाजी राजानी घेवे. मौजे हिंगणगादेचे तपसील सदरहू लिहिलेप्रमाणे खावे व बाजे देशमुखीचे हक लाजीमा इनाम व बाजेवाव पडिले पान निसबत देशमुखी तारेतार दोनी ठाई खाऊन बिलाकुसूर असोन दिवाण नफराई करून दोघानी सुखें असावे. या खेरीज देसमुखीची गावे गेली आहेत ती दोघानी साधून घेवे. जो कोणी मदत न करी त्यास व्रितीसी समध नाही. व्रितीवरी जे काही नवी जोडी साधितील ते दोघानी बराबरी वाटून घेवे व वडिलाचे व्रितीखेरीज जेथें व्रिती साधून घेतील ते अपले

अपण घेवे. कसवे तलबीडीचे पटेलगीचे नागर हरीपरायाने करावे. नि।। संवाजी राजे. नागरास मान बेगारी व सेवधार व पाने व पडि दर पडि (?) घेवे. वरकड पडिले पान दोनी ठाई वाटून खावे. हा जाहाला माहाजर सही. वली १०६ येकसे साहा.

---

**क्रमांक : २७** **इ. स. १६६२ ?**

नेताजी व दिपाजी मोहिते याना हरीपराव, हंबीरराव व संक्राजी मोहिते यानी कसबा तळबीड व कसवा वांगीच्या देशमुखीबद्दल व कसबा तळबीडच्या पाटीलकी-बद्दल लिहुन दिलेले पत्र.

तालीक

श्री चिरंजीव बहुत अयुष होणे राजमान्य राज्यश्री नेताजी राज व दीपाजी यास यासी स्नेहपुर्वक हरीपराव व हंबीरराव व संक्राजी राजे मा० अनेक असीर्वाद. उपरी तुम्हामध्ये व आम्हामधे देशमुखी कर्यात तलबीड व कर्यात वांगी व पटलगी कसबे तळबीड याचा वेव्हार होता. मग तुम्ही व आम्हीं वेव्हार राजश्री साहेबी चवघे ग्रहस्ते हामेशाई मोकदम मीलऊन निवाडा केला.

बि

सीका

ईनाम हिंगणगादे दोन
तक्षीमा आंम्ही खाव्या
येक तक्षीम
तुम्ही खावी. बेगारी
राबता आटफली
आम्हाकडे व सेवधार
आम्हाकडे.

ताा

देशमुखी कर्यात तलबीड
व कर्यात वांगी पडील पान
दोन ठाई व माकदमी पडील
पान दोन ठाई.

येणेप्रमाणे[१] निवाडा जाहला आहे. देशमुखीचे सीका दोघानी करावा. पटलगी नांगर हरीपराव याणी करावा. येणे प्राो निवाडा जाहला आहे. यास आम्ही राजी असो. दुसरा कुमूर करू तरी आम्हास गुरुची अण असे. लेकराचे लेकरी बकुमूर चालावे. मोर्तब असे.

---

क्रमांक : २८ दि. २३-९-१६६३

नेताजी पालकर यानी केलेला निवाडा. यात सावजी मोहिते व नेताजी मोहिते यानी चिठ्या टाकून जमिनीची वाटणी करावी असे म्हटले आहे.

फारसी सिका

श्री

मसुरल राजमान्य राजेश्री समस्त गोतानी हमेशाही देहाय व समस्त रयानी लाहान थोर कसबे तलडीड व बारा बलुत्यानी काा मजकुर यासी प्रति नेताजी पालकर सरनोवत जोहार अनुकर्मे लेहावया कारण येसाजे. सुाा आर्वा सीतैन अलफ. माा साऊजी मोहिते व नेताजी मोहिते मोकदम काा मजकूर या हर दोजणामध्ये मोकदमीचा निवाडा होणे होते. सबब हर दो वादी आमच्या थलास येऊन उभे राहिले की साहेब धर्मपरायेण दर हक निवाडे करून बहुतास वर्तविले आहे हे कीर्ती यैकोन आपलेही दर हक निवाडा करून द्यावा. पुढे लेकराचे लेकरी निवडिलेप्रमाणे नादावे याबद्दल आलो आहे. साहेबी गोतन्याये निवडून हर दो जण बकुसूर वर्तोन यैसे केले पाहिजे म्हणोनु अर्ज केला. याउपरी सभानायक व मजालसी भले लोक बैसोन हर दो वादीयापासून कतबे जमानता व राजिनामे घेऊन श्री देवाची साक्ष व आपले पुर्वज स्मरोन धर्मता हर दो जणाचा निवाडा केला. निवडियास हर दो जण राजी घेऊन निवाडियाचे महजर करून हर दो जणापासी दिधले. तेथे निवाडियाचा बयान तपसिले निवडिला आहे. त्यासी

---

[१] मोहिते मंडळीच्या दि. ३१-१-१६६२ च्या महजराला धरूनच हे पत्र आहे

निवाडियामधे इनामती व पालक जमीन हर दो जणास बराबरी निमेप्रमाणे दिधली आहे. यास जमीन कुळवायाची येथून निवडून घ्यावी. तरी जमीन नजरेस देखिल्यावेगली वाटिता पुरवत नाही. याबदल तुम्हीही गोत आहा. निवाडियाप्रमाणे तुम्ही तेथे जमीन कुल नजर गुजार करून लाखे घालून आवल दुसीमा टुकडियाचा टुकडा आपले पूर्वज स्मरोन धर्मता निमेप्रमाणे लाखे घालून त्यावरी चिटिया ठेऊन जे चिटी निघेल तेणेप्रमाणे हर दो जणानी बेकुसुर वर्तोन सुरलित चाले यैसे करणे. इनाम जो वाटणे तो कुल कदीम व जदीद व पालक येसे मिलोन बराबरी निमे करुन हर हक लाखे करुनु वाटून देणें. सदरहू निवाडा थली होऊन सुखे नादावे यैसे करून दिधले आहे. देसमुखी नेतोजी मो। याचे नि।। आहे. येणेप्रमाणे निवाडा जाला असे. तुम्हीहि समस्त गोत हमेशाही असा. सदरहुप्रमाणे मोकदमी क।। मजकुरीचा निवाडा जाला आहे. तेणेप्रमाणे दोघाजणास लेकराचे लेकरी वर्तविले पाहिजे व साऊजीने आपले तर्फेचा देसमुखीचा हक देववावा. नेतोजी देसमुख यास देवावा.

छ १, रबिलोवल. हे विनंती

(षट्कोनी फारशी शिक्का)

---

**क्रमांक : २९** **दि. २७-९-१६६३**

नेताजी पालकर सरनोबत यांचे नेताजी मोहिते याना आपल्या परिवारासह मौजे येलफले या गावी रहाण्याबद्दलचे अभयपत्र.

राजश्री नेताजी मोहिते मोकदम देसाई क।। तलबिडी गोसावी यास

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य प्रति नेताजी पालकर सरनोबत जोहार. उपरी तुम्ही रदबदल केली की आपण आपले किबलीयानसी मौजे येलफले क।। मजकुर तेथे असोनु येविसी

अभये जाले पाहिजे म्हणऊनु. तरी सुखे मौजे मजकुरी किविलायनसी राहाणे. आमचे तरफेने येक जरा तसवीस लागणार नाही. येविसी इमान आहे. छ ५, रविलावल सु॥ अर्बा हे विनंती.

(षट्कोनी फारशी शिक्का)

मागे फारशी शिक्का आहे.

---

**क्रमांक : ३०** दि. १४–२–१६९३

रखमाजी मोहिते याचे वडील उदाजी मोहिते वसंतगडाजवळ शेख निजामाशी झालेल्या लढाईत ठार झाले. त्याचे चीज म्हणून रखमाजीला एक गांव इनाम द्यावा म्हणून संताजी घोरपडे यानी विनंती केलेवरुन राजाराम छत्रपतीनी मौजे न्हावी हा गांव इनाम दिला.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषक शके १९ अंगीरानाम संवत्छर माघ बहुल चतुर्थी भोमवासर क्षत्रियकुलावंतस श्री राजाराम छत्रपति याणी

श्री राजाराम
नरपति हर्षनिदान
मोरेश्वर सुत नीळकं
ठ मुख्य प्रधान.

श्री लक्ष्मी
नृहरिप्रीतेः
मुद्रा निराजि
जन्मनाः॥ राजा
राम प्रतिनिधेः
प्रल्हादस्य
विराजते।

राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी सुभा प्रांत खटाव यासी आज्ञा केली येसीजे. रखमाजी बिन उदाजी मोहिते याचे विशई राजश्री संताजी घोरपडे सेनापति याणी चंदीचे मुकामी स्वामि समिप येऊन विनंती केली की रखमाजी

मोहिते यांचे पिते उदाजी मोहिते सन इहिदे[1] मधे वसंतगडाखाले सेख निजामाचे युध्यात समरंगणी ठार जाले. तरी यास येक गाव इनाम देविले पाहिजे म्हणोन विदित केले. त्याजवरुन स्वामि रखमाजी मोहिते याजवरी कृपाळू होऊन यांस नुतन इनाम मौजे न्हावी कर्याती वांगी प्र।। मजकूर देह १ येक रास कुलबाब कुलकानु हलीपटी व पेस्तरपटी झाड झाडोरासहित खेरीज हकदार व इनामदार करून इनाम दिल्हा आसे. तरी गांव याचे स्वाधिन करुन यांस व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणे. या पत्राची प्रती लिहून घेऊन मुख्यपत्र यांस परतोन देणे. निदेश समक्ष.

मर्या
देयं बिरा
जते

पाठीमागे

सुद रुजु

तेरीख १८, जमादिलाकर

जमादिलाकर सु।। सलास

बार सुद सुरु सुद बार.

---

**क्रमांक : ३१** **दि. २०-४-१६८९**

पन्हाळ्याच्या वेढ्यात काशी रंगनाथने मदत केल्याबद्दल छत्रपती राजाराम ह्यानी त्याला मौजे सेबावणे हा गांव इनाम दिला.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १५ शुक्लनाम संवछरे वैशाख शुध्द येकादसी मंदवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती स्वामी

---

१. २४ मे १६९० ते २३ मे १६९१.

याणी राजश्री कासी रंगनाथ उपनाम वोर्पे
मिका मिका वास्तवे किले विशाळगड यासी आज्ञा केली
गेमीजे. तुम्ही आमच्या राज्यातील पुरातन
सेवक. राजश्री कैलासवासी छत्रपती स्वामी यांचे कारकीर्दीस कष्ट मशागती केल्या आहेत. सांप्रत किले पनाळेस मोगल गनीम मौजदिन[1] वेढा घालून बसला होता. त्याप्रसंगी कित्येक स्वामीकार्यानिमित्य शेवा येकनिष्टपणे केली. स्वामीचे पायासी येकनिष्ट बहुत. या करिता तुम्हावर स्वामी कृपाळु होऊन मौजे सेवावणे तपे मलकापूर हा गाव नूतन इनाम करार करून दिल्हा असे. तरी जे मजकुरात विशाळगडकरी लोक सेतसनदी आहेत ते व हकदार व इनामदार खेरीज करून सदरहू गाव तुम्हास इनाम करार करून दिल्हा असे. तरी तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंश परंपरेनें सदरहू गावचा उपभोग करून सुखरुप राहाणे.

लेखनालंकार. सिक्याचे मोर्तब

रुजु

वार सुरु सुद बार

---

सदरहू असल सनद प्रतिनिधि यांचे प्रांतावर हुजुराचा इलाखा आहे त्याचे पुराव्यास कागद रवाना धारवाडास अजम अडसन साहेब बाहादुर पोलटक्याल येजंट याकडे जाहाले त्यात दिल्ही असे. तसलमात रा॥ गुरुनाथ कोंडो निसबत न्यायाधिशी सु॥ सलास सलीन मयातैन व अलफ. छ २० रजब.

---

१ औरंगजेबाचा मोठा मुलगा 'मुअज्जम' ऊर्फ शाहा आलम ऊर्फ बाहादुर शाहा (इ. स. १७०७-१७११) ह्याचा मोठा मुलगा. हा पुढे जाहांदरशाहा ह्या नांवाने बादशहा झाला. (इ. स. १७१२-१७१३)

क्रमांक : ३२ दि. २०-४-१६८९

मौजे पाडळी ह्या गावाची खोती विठ्ठल नारायणकडे होती. परंतु तो शिरक्याना मिळाला म्हणून कवि कलशाने त्याची खोती काढून घेतली होती. छत्रपती राजाराम ह्यानी ती त्याला परत केली.

स्वस्ती श्री राज्याभिषेक शके १५ शुक्लनाम संवत्सरे वैशाख शु।। ११ मंदवासरे क्षत्रीय कुलावंतस श्री राजाराम छत्रपती याणी राजश्री नरसो सुरा देशाधीकारी तर्फ खिलणा प्रांत राजापुर यासी आज्ञा केली ऐसीजे. मौजे पाडळी ताा देवले या गावची खोती विठल नारायण यास बहूत दिवस होती. सांप्रत सिरके याची सोबत केली. त्या प्रसंगी कवी कलश येऊन यावरी निमीत्य ठेऊन यासी धरुन विशालगडी बंदात ठेविले. घरदार लुटून गुरे सेत आदी करुन सर्वही दिवाणात नेले. आणखी करुन सदरहू आवजी (?) यासी त्या गावानिमीत्य यासी खंड पडीला. तेंव्हा सर्वस्व गेले. असे असता याचा गाव कृष्णाजी गोंडा हवलदार इमारती विशालगड यासी दिल्हा म्हणोन हूजूर विदीत जाहले. त्याजवरुन हे आज्ञापत्र सादर केले असे. विठल नारायण यास बहुत दिवस विस पंचवीस वर्षे खोती गाव चालीला. त्यामुळे कष्टीही जाले. या उपरी त्याचा गाव त्यास खोती करार केला असे. तरी तुम्ही या उपरी कृष्णाजी गोंडा याची खोती दूर करुन यास खोती देणे. लावणी पेसजीचे वीवस्तेने करितील. पेस्तर सालीची उगवणीची कबुलायत नी।। प्रमाणे करुन घेणे. खोतीची घालमेली येकंदर न करणे. हुजूर बोभाट येवीसी येऊ न देणे. लेखनालंकार.

**क्रमांक : ३३** **दि. १२-५-१६८९**

छत्रपती राजाराम हे गोवामार्गे कर्नाटकात निसटू नयेत म्हणून गोव्याच्या हद्दीवर सर्वत्र पहारे बसविण्यात येत आहेत असे आश्वासन गोव्याचा व्हाइसरॉय दों रुद्रिगु द कॉश्त हा मोगल सरदार बहादुर खान ह्याला देतो.

" मोगल बादशहाचे सरदार नबाब बहादुर खान ह्यांस—

आपले पत्र मिळाले. आपली ख्याली खुशाली कळून व आपण आमच्या शेजारी आल्याचे पाहून आनंद झाला. आपल्या इच्छेप्रमाणे आपणालाहि आयुरारोग्य आणि सुखसौख्य इच्छितो. आपल्या पत्रात आपण बातमी दिली आहे की, राजाराम रायरीच्या किल्ल्यातून जावळीच्या किल्ल्यात गेला आहे. पण त्याला आपण जावळीच्या किल्ल्यात गेलो असल्याची हूल उठवून कर्नाटकांत जायचे आहे. बादशहाने आपणाला आज्ञा केली आहे की, राजाराम जर आमच्या राज्यांतून निघाला तर त्याला पकडण्याची आमच्याकडे मागणी करावी. + + + + आमच्या राज्याशी असलेली बादशहाची मैत्री लक्षात घेऊन व राजारामाची शिक्षा त्याला टळू नये म्हणून मी आवश्यक ते पहारे सगळीकडे बसवित आहे............. ..."

देव आपले भले करो.

गोवा, १२ मे १६८९

दों रुद्रिगु द कॉश्त

---

**क्रमांक : ३४** **दि. २१-६-१६८९**

यशवंतराव दळवी ह्या नावाच्या मोगलांच्या सरदारानें कुडाळ येथे एक विजय मिळविला म्हणून गोव्याचा व्हाइसरॉय त्याचे अभिनंदन करतो. प्रस्तुत पत्रांत त्याने मोगलाना पोर्तुगीज प्रदेशांतून रसद पुरविण्यास आपली आडकाठी नाही असे म्हटले आहे.

" मोगलांच्या घोडदळातील सेनापती यशवंतराव दळवी याना : आपले पत्र मिळाले. आपण कुडाळ येथे शत्रूवर विजय मिळविल्याची वार्ता ऐकून आनंद झाला. असेच विजय आपणाला वरचेवर मिळतील व सबंद कोकण प्रांत बादशहाच्या अमलाखाली येईल अशी आशा आहे. आपण मला लिहिता की आपल्या सैन्यातील जनावरासाठी आपणाला साठ खंडी हरबरे उडीद आणि इतर कडधान्य हवे आहे. आमच्यापाशी जर ही कडधान्ये अमती तर आम्ही ती आपणाला आनंदाने पुरविली असती. ही कडधान्ये आमच्या राज्यात पिकत नाहीत. ती आम्हाला बाहेरुन आणावी लागतात. इतर अन्न सामग्रीच्या बाबतीत मी आपणाला कळवू इच्छितो की ती सामग्री आमच्या राज्याच्या हद्दीपलीकडे जाण्यास आमची आडकाठी नाही. आणि मला खबर मिळाली आहे की व्यापारी लोक धान्य इकडून तिकडे वरचेवर नेऊन भरमसाट नफा मारतात. इकडे तो माल त्याना किफायतशीर मिळतो."

गोवा २१ जून १६८९

**दों रुद्रिगु द कॉश्त**

---

**क्रमांक : ३५** **दि. ३-९-१६८९**

**पोर्तुगीज व्हाइसरॉय दों रुद्रिगु द कॉश्त हा मोगल सुभेदार बहादुरखान ह्याला कळवितो की, छत्रपती राजाराम ह्यांच्या हालचालीवर पाळत ठेवण्यात येत असून पहारे दुप्पट करण्यात येत आहेत.**

" बेळगावचे सुभेदार बहादुरखान ह्यास–

आपले पत्र दोन मार्गांनी पाठविले ते मिळाले. पैकी एक अहमद सारंग ह्याने आणले आणि दुसरे जहाजाने आले. आपण विनंती केली आहे की, राजारामाला कर्नाटकात एक खजिना मिळावयाचा

आहे व तो तिकडे निसटण्याचा वेत करीत आहे. तरी त्याच्यावर समुद्रावर तशीच खुष्कीच्या मार्गावरहि पाळत ठेवावी. ह्याच विषया-संबंधाने आपण मला आणखी एक पत्र लिहिले होते व त्याप्रमाणे मी दोन्हीहि मार्गावर पहारे बसविले होते. आतां हे पत्र मिळाल्यावर पहारे दुप्पट करीत आहे. म्हणजे तो आमच्या बाजूने आला तर त्याला अटक करता येईल. पण मला वाटते तो दुसऱ्या बाजूने + + + आपल्या दोन्ही राज्यांच्या मैत्रीस अनुसरून + + + "

देव आपले भले करो.

गोवा ३ सप्टेंबर १६८९

दों रुद्रिगु द कॉश्त

---

**क्रमांक : ३६** **दि. १५–८–१६९०**

छत्रपती राजाराम ह्याना सामील झालेल्या मणेरी व साखळी येथील देसायांचा आपण बंदोबस्त करतो, असें आश्वासन गोव्याचा नवीन व्हाइसरॉय दों मिगेल द आल्मैद हा मोगल सरदार अब्दुल राजाखान ह्यास देतो.

" मोगल बादशहाचे सरदार अब्दुल राजाखान ह्यांस :–

अहमद सारंग ह्याने आपले पत्र आणून दिले. त्यांत माझ्या पूर्वीचे व्हाइसरॉय दों रुद्रिगु द कॉश्ता ह्यांच्या निधनाबद्दल आपण दुःख व्यक्त केले आहे व त्यांचे जागी व्हाइसरॉय म्हणून माझी नेमणूक झाल्याबद्दल माझे अभिनंदन केले आहे. तसेंच, माझ्या कारकीर्दीत + + + मोठी वाढ व्हावी अशीहि आपली इच्छा आहे. माझ्या पूर्वीच्या व्हाइसरॉयचा व आपला विशेष संपर्क + + + असे आपण + + + पण मला कळले आहे की, ते आपले

पुष्कळच चाहते होते. आपण बादशहाचे सरदार असल्याने त्यांच्या-कडून आपलें कौतुक झालें असल्यास नवल नाही. कारण बादशहांशी आमचे शांततेचे आणि मैत्रीचे संबंध आहेत. ह्या राज्याच्या राज्य-कारभाराबाबत आपण जी सदिच्छा दर्शविली आहे, त्याबद्दल मी आपला आभारी आहे. आपण निश्‍चित असावे की, मोगल बादशहाचे बाबतींत माझ्याकडून ज्या गोष्टी पार पडायच्या आहेत त्या पार पडण्याचे कामी माझ्याकडून कसूर होणार नाही. आपण माझ्याकडे मागणी केली आहे की, मणेरी व सांखळी येथील जे देसाई बादशहा-विरुद्ध बंड करून उठले आहेत, त्यांना व सोनु शेणवी ह्याला कैद करावे. ही मागणी आपण मागच्या पत्रातहि केली होती. त्याला मी उत्तर पाठविले होते की, ज्या भागांत ही मंडळी वावरत आहे, त्या भागांत पहारे बसवून मी त्यांचा बंदोबस्त केला आहे. ह्या बाबतीत राज्याला सर्व प्रकारची काळजी घ्यावी लागते. आणि म्हणून माझ्या पूर्वीच्या व्हाइसरॉयनी ती गोष्ट लक्षांत घेऊन असें ठरविले होते की, सदहु देसाई कुटुंबांना बार्देशबाहेर जाऊं देण्यास मनाई करावी. परंतु आपण पत्रें पाठवून आणि विनंत्या करुन अशी हमी दिली कीं, ते बादशहाशी एकनिष्ठ आहेत, तरी त्यांना बार्देश बाहेर जाऊं द्यावे. आणि आपल्या रदबदलीमुळे मला आपली मागणी मान्य करावी लागली. + + + त्यांच्याबरोबर मणेरीच्या देसायालाहि. आणि आतां ज्या अर्थी मला कळले आहे कीं, त्यांचा उठाव रामराजामुळें[1] झाला आहे, त्या अर्थी त्यांचा बंदोबस्त + + + घोडदळ आणि पायदळ पाठवावे. त्याचबरोबर त्यांचा नाश करण्यासाठीं यत्किंचितहि विलंब न लावता आपल्या हाताशी असलेली माणसें पाठवावी. कारण आपण दाखवून दिलेंच आहे की, ते बादशहाशीं बेइमान झाले आहेत. + + + ह्या लोकांचा संभाजीशी बेबनाव झाला, तेव्हा आम्ही त्यांची बाजू घेतली होती. पण तो उपकार विसरून जाऊन

---

१ राजाराम.

त्यानी कुंभारजुवे बेटावरील आणि वार्देशमधील लोकांची त्या बाजूला चरावयास गेलेली गुरे चोरली. आतां ते रामराजाला सामील झाले आहेत. रामराजा ह्या राज्याचा शत्रू असल्याने त्यांच्या हातून आणखी मोठे गुन्हे घडण्याचा संभव आहे. म्हणून + + + बाजू घेऊन रामराजाने ह्या राज्याविरुद्ध काही वाईट कृत्य केले तर ते हाणून पाडावे म्हणून जमिनीच्या बाजूने तशीच नद्यांच्या बाजूने काळजी घेतलेली बरी असे मला वाटले. पोतुर्गीज हे कोणत्याहि प्रसंगी बादशहाचे मित्र आहेत हें आपण बादशहाच्या निदर्शनास आणून दिलेच आहे."

देव आपले भले करो.

गोवा, १५ ऑगष्ट १६९०
दों मिगेल द आल्मेद.

---

**क्रमांक : ३७** **दि. १६–१–१६९१**

गोव्याचे व्हाइसरॉय पोर्तुगाल येथील आपल्या राजाना वेळोवेळी सविस्तर पत्रे पाठवून आपल्या राज्यांत व आवती भोवती घडलेल्या घटनांचें वर्तमान कळवीत असत. तशाच स्वरुपाचे हे एक पत्र आहे.

" महाराज

आमच्या राज्यात शांतता आणि स्वास्थ्य नांदत आहे. त्याचे कारण हे की, आमच्या राज्याच्या सीमाना ज्या दोन राजांच्या राज्यांच्या सीमा भिडल्या आहेत ते दोन्ही राजे परस्पराशी युद्धात गुंतले असल्याने त्यांचें आमच्याकडे दुर्लक्ष झाले आहे. ह्या दोन्ही राजांमध्ये जे युद्ध चालू आहे त्याचा वृत्तांत मी आपणाला प्रस्तुत पत्राचेद्वारा सादर करीत आहे.

महाराज, मोगल बादशहाने संभाजीला पकडून त्याचा वध केल्यावर तो त्याचे राज्य जिंकण्याच्या मार्गास लागला. संभाजीचा भाऊ राजाराम ह्याने पन्हाळयाच्या टेकडयांचा आश्रय घेतला होता. मोगलानी पन्हाळयास वेढा घालताच राजाराम तेथून निसटला व त्याने कर्नाटकाच्या राणीच्या राज्यातून पुढें प्रयाण केले. ही वातमी बादशहाला कळताच त्याने कर्नाटकाच्या राणीवर सैन्य धाडले. ह्या सैन्याचे अधिपत्य राजपुत्र सुल्तान[1] याच्याकडे होते. ह्या राजपुत्राने राणीचे काही किल्ले घेऊन तिची राजधानी बिदनुर सर केली. राणीने राजधानीतून कधीच पळ काढला होता. तिने राजपुत्राशी तहाच्या वाटाघाटी सुरु केल्या. तिने त्याला तीन किल्ले देऊन दरवर्षी सहा लक्षाप्रमाणे अठरा लक्ष पागोडा युद्धखंडणी देण्याचे कबूल केले. हे अठरा लक्ष पागोडा म्हणजे खरोखर अठरा कोट आहेत. राणीने तहाच्या कराराप्रमाणे राजपुत्राला सहा लक्ष पागोडा दिले. बादशहाला जेव्हां ह्या तहाच्या कराराची वार्ता कळली तेव्हा आपल्या मुलाने आपणाला न कळविता तो करार केल्याचे पाहून तो त्याच्यावर भयंकर संतप्त झाला व त्याने त्याला माघारा बोलविले बादशहाला बिदनुरच्या राणीशी तह करायचा नव्हता. विजापूर आणि गोवळकोंडा ह्या राज्यांप्रमाणे त्याला तें राज्य खालसा करायचे होते. राजपुत्र सुल्तान बापाच्या आज्ञेप्रमाणे माघारा परतला नाही. कारण, आपले भवितव्य त्याला माहीत होते. बादशहाच्या क्रोधाची त्याला कल्पना होती. त्याचा थोरला भाऊ शहा आलम (Xa Alam) इ. स. १६८४ साली कोकणच्या स्वारीवर गेला तेव्हा त्याला कोकण न जिंकता आलेले पाहून तो बादशहाच्या मर्जीतून उतरला होता व त्याने त्याचा शिरच्छेद केला होता.[2] आपलीहि गत तीच होईल ह्या भीतीने त्याने बापाची आज्ञा धुडकावून एका दुर्गम पर्वताचा आश्रय घेतला. त्याचे हे कृत्य म्हणजे उघड उघड बंडखोरीच आहे.

---

१ शाहजादा कामबक्ष.

२ ही हकीकत बरोबर नाही.

बादशहाची छावणी विजापूरपासून जवळच एका खेड्यात होती. त्याला ज्या मुलुखात सैन्य पाठवावयाचें असते तिकडे तो आपल्या सरदाराना पाठवीत असतो. आम्ही असें ऐकतो की, त्याच्या सैन्यात पटकीच्या साथीचा प्रादुर्भाव झाला असून पुष्कळ माणसें, घोडे, उंट आणि हत्ती मेले. ते पाहून बादशहानें आपली छावणी बेद्री (?) (Bedry) ह्या नावाच्या खेड्यात हलविली. परंतु बादशहाचें सैन्य आता पुष्कळच कमी झालें होतें. ती संधी साधून राजारामाच्या सरदारानी मोठें घोडदळ आणि पायदळ आणून शाही सैन्याला उपद्रव देण्यास प्रारंभ केला. परंतु, बादशहाच्या छावणीला तोफांचें संरक्षण असल्याकारणें त्यावर समोरासमोर हल्ला करण्याचें धाडस मराठे सरदाराना झालें नाही. तथापि त्यानी मोगल सरदाराना लांच चारून युद्धाचा जोर कमी केला. दोन्हीहि बाजूंची हानी होऊ नये अशा रीतीनें त्यानी हे युद्ध चालू ठेवलें आहे. मोगल सरदारानाहि ह्या युद्धाचा निकाल झटपट लागलेला नको आहे. कारण, युद्ध चालू असते, तेव्हा ह्या लोकांची चंगळ असते. त्याना खाण्यापिण्याला भरपूर तर मिळतेच; शिवाय अवांतर कमाईहि होते. फक्त बादशहाच्या डोळ्याना पाणी लावण्यासाठी ते युद्धाचा बहाणा करतात. एकूण ती एक दिशाभूलच आहे.

कर्नाटकाच्या राणीला मोगलाना मोठी खंडणी द्यावी लागल्यानें तिला आपल्या प्रजेवर कर बसविणें भाग पडलें. परंतु कर बसवून देखील खंडणीचा पैसा गोळा होणें अशक्य झाल्यानें तिला बार्सेलोर (?) नदीवरील एक किल्ला अडराय[१] (?) ह्याला तीन लक्ष पागोडाना विकावा लागला. राणीला पैसे लवकर हवे आहेत. तर अडराय किल्ला ताब्यात मिळाल्याखेरीज पैसे मोजण्यास तयार नाही.

---

१ कोदंडराय (?) हा बेदनूरचा माजी प्रधान असावा.

इकडे कोकणात मोगल बादशहाची पकड ढिली झाल्याने व त्याने दिल्लीहून मागविलेली कुमक न आल्याने तिथल्या देसायानी बादशहाची सता झुगारून देऊन राजारामाशी संधान साधले आहे. तसे पाहिले तर राजारामानेच त्याना बादशहाविरुद्ध चिथावणी दिली आहे. ते मोगलावर उलटले त्याचे कारण हे की ते राजारामाच्या जातीचे आहेत हे तर झालेच; परंतु मुसलमानांच्या अरेरावीची आणि उर्मटपणाची त्याना चीड आली आहे. मुसलमानानी हिंदु स्त्रिया व हिंदु मंदिरे भ्रष्ट केल्याने हे देसाई त्यांच्याविरुद्ध उठले असल्यास नवल नाही. सर्व देसायानी एकत्र होऊन फोंड्याचा सुभेदार सरबज़खान व सरदार अब्दुल राजाखान ह्यांच्याविरुद्ध उठाव केला. अब्दुल राजाखान कुडाळला होता. तो डिचोलीला पळून आला आहे. ह्या दोघा मोगल सरदाराना राजारामाच्या सैन्याची भीति वाटते.

मराठ्यानी फोंड्याच्या जवळपासची खेडी लुटली व फोंड्यास वेढा घातला. मोगलापाशी घोडदळ नाही. जे काय फार थोडे घोडदळ होते ते मरून गेले आहे. सरदार अब्दुल राजाखान ह्याने आपली बायकामुले आणि इतर चीजवस्तु नदींतील एका बेटावर सुरक्षिततेसाठी पाठवून दिली होती. ह्या बाबतीत त्याला आमची थोडी मदत झाली. त्याला बादशहाने आपणाकडे बोलाविले असल्याने तो आपल्या जनानखान्यासह तिकडे रवाना झाला आहे. निघताना पत्र लिहून त्याने आमचे आभार मानले होते व बादशहापाशी आमचे काही काम असल्यास ते आपण आनंदाने करू असे पत्रात लिहिले होते. आम्ही त्याला उलटपत्री त्याने जो मुलुख काबीज केला त्याबद्दल त्याचे अभिनंदन केले व आमच्याशी मैत्रीचे संबंध ठेवून पत्रव्यवहार चालू ठेवण्याची इच्छा दर्शविली.

एके बाजूने आम्ही बादशहाच्या प्रजाजनाना आमच्या राज्यातून बाहेर जाण्यास वाट देत आहोत, तर दुसऱ्या बाजूने राजारामाशीहि

धूर्तपणाने वागत आहोत. राजारामाने व्हाइसरॉय दों रुद्रिगु द कोस्त व व्हाइसरॉय दों मिगेल द आलमेद ह्या दोघाना पत्रे लिहून त्याचे वडील शिवाजीराजे ह्यांच्याशी आमचे जसे मैत्रीचे संबंध होते, तसेच मैत्रीचे संबंध आपणाशीहि ठेवण्याची विनंती केली होती. त्याला आम्ही उत्तर पाठवून कळविले कीं, त्याच्याशी मैत्रीचे संबंध ठेवण्याची आमची इच्छा आहे.

अशा रीतीने बादशहाचे अधिकारी आणि राजाराम ह्या दोघांचाही विश्वास आम्ही संपादन केला आहे. दोघेहि आम्हाला मानतात व आम्ही त्यांचे मित्र आहोत असे समजतात. अशी बातमी आहे की, राजारामाच्या लोकांनी आणि देसायानी फोंड आणि डिचोली हे दोन्ही प्रांत घेतले आहेत. आमच्या राज्याला मुसलमानापेक्षा हिंदु शेजारीच बरे असे आम्हाला वाटते. मुसलमानावर कधीच विश्वास ठेऊ नये. कारण त्याना वचनाची किमत नसते. ते उर्मट आणि भांडखोर असतात. तथापि असे जरी असले, तरी दोघाशीहि आमचे तटस्थतेचे संबंध आहेत असे आम्ही भासवितो. त्यांच्याशी असलेले मतभेद आम्ही कधीच उघड केलेले नाहीत. आम्ही नेहमीच जागरुक आणि तयारीने असतो. आम्ही हत्यारबंद असून आमची ठाणी सुरक्षित आहेत. नदीत जहाजांची टेहळणी असून त्यांचे नेतृत्व कप्तान मोर यांच्याकडे आहे. माझ्या बलाढ्य आणि सर्वश्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य आणि सुखसमृद्धि देऊन त्याचे रक्षण करो.

गोवा १६ जानेवारी १६९१

---

**क्रमांक : ३८** **दि. २७–३–१६९१**

रामाजी आपाजी सभासद, नामजाद व कारकून कसबा कुडाळ हा सोनजीराव व चांदजीराव अरुळेकर ह्याना कळवितो, कीं खेमसावंत भोसले ह्यांच्या शिफारसीवरून तुमच्या वतनाबाबत रामचंद्रपंत ह्याना लिहिण्यांत येत आहे.

श्री

राजश्री सोनजीराऊ व चांदजीराऊ अरुळेकर गोसावी यास स्नेहांकित रामाजी आपाजी सभासद नामजाद व कारकून सुभा कसबा कुडाळ व महालानिहाय आसीरवाद. सु॥ इहिदे तिसैन अलफ. राजश्री पील सावंत सरदेसाई प्रा कुडाळ याचे तहबदल आम्ही वाडीस आलो. ते समई तुम्ही येऊन आमची भेटी घेतली. तुमचेविसी राजश्री खेम सावंत सरदेसाई याणी सांगितले की सोनजीराऊ (व) चांदजीराऊ अरुळेकर याचे पटेलगीचे गाऊ तर्फ खारेपाटण

| मौजे अरुळे, | मौजे येडगाऊ, | मौजे वाईबसे. | |
|---|---|---|---|
| १ | १ | १ | |
| मौजे सागुळवाड, | मौजे नावले, | मौजे वाभवे, | मौजे मांगवली. |
| १ | १ | १ | १ |
| मौजे सोनाळी, | मौजे कुंभडे, | मौजे कसूल, | बागायत नाडण. |
| १ | १ | १ | १ |
| जकातदार बावडा, | मौजे केरे. | | |
| १ | १ | | |

मौजे वतनी खाते व कुलकर्ण येणे प्रा पटलकीचे देहाये ११ अकरा व बागाईत नाडण ब जकात चोरगे घाटबावडा सालाबाद चालू आहे व गाऊगन्ना जमेस पालक चालले आहे. ऐसीयास हे आम्हा बा होते. आम्ही तुमच्या कार्यात सामील जाहलो तेव्हा येही सामील जाहले. तरी सदरहू गावीची सरपाटिलकी व बागायेत व चोरगे याचे दुबाले केलेवरी किर्दीमहामुरी करतील व यकनिष्टपणे वर्ततील म्हणोनु मशारनिले जे सांगिले त्यावरुन येविशी राजश्री पंत स्वामीचे सेवेसी विनंतीपत्र पाठऊनु सनद आ + + देऊनु. तेणे प्रमाणे चालेल. जाणिजे

रा छ ६, रजब. मोर्तब सुद्र.

मोर्तब
सुध

**क्रमांक : ३९** **दि. २६–७–१६९१**

औंधची देशमुखी आपल्या नावे चालविण्याची विनंती गिरजोजी यादव ह्यानी रामचंद्र नीलकंठ अमात्य ह्याना केली होती. ती त्यानी मंजूर केली.

श्रीराम वरद

राजश्री गिरजोजी यादव नाईक
दि॥ ग्यान्हक (?) गोसावी यास—

श्ने॥ रामचंद्र निळकंठ आमात्य आसीर्वाद. सुहुरसन इसने तिसैन व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले की आउंदची देशमुखी आमची येविसी राजश्रीची पत्रे स्वामीस आहेत. त्याची तालीक पाठविली आहे. स्वामीनेही चालवावे म्हणून. त्यावरून खटाऊच्या सुभेदारास पत्र दिल्हे आहे. ते सुर चालवितील. व आमचा महीन[1] त्या प्रांते आहे. हरयेकविसी स्वामीने चालवावे व आप्तविशई लोक स्वामीजवळी येतील त्यास अन्ने सांगोन चालवावे. म्हणून कितेक लिहिले. तरी बहुत बरे. तुमच्या कार्यास अंतर न पड. जाणिजे.

छ १०, जिल्काद, निदेश समक्ष

लेखन
सीमा समु मोर्तब
ल्लसती

---

**क्रमांक : ४०** **दि. १०–९–१६९१**

रखमाजी खंडो, बाळोजी खंडो व रामजी मल्हार ह्यानी मौ. आकुर्डे ह्या गावचे आपले कुलकर्ण काशी रंगनाथ ह्यास १७५ रुपयास विकले.

---

१. महीन (माही) = सरंजाम.

सिका पारसी अक्षराचा

पाच ओळी पारसी लिपीच्या आहेत

तालीक

स्वस्ती श्री नृप शालीवान शके १६१३ प्रजापतो नाम संवत्सरे भाद्रपद वधी त्रयोदसी बृहस्पतीवारी छ २७ जिल्हेज. सु।। इसने तीसेन अलफ. तत् दिनी रखमाजी खंडो व बालाजी खंडो व रामजी मल्हार देसकुलकर्णी तर्फ असंडोली व गावकुलकर्णी मौजे आकुर्डे ता। मजकूर पा। कोल्हापूर यानी राजश्री कासी रंगनाथ गोसावी यास लिहून दिल्हे क्रयपत्र ऐसाजे. आमचे मिरासी कुलकर्णी मौजे मजकूर आहेत. आपणास दिवाणीचे तगादा पडला म्हणूऊन आपण विकत होता. गोसावी यासी पाहिजे म्हणऊन माघीतले. तरी मौजे मजकूरचे कुलकर्ण विकत गोसावी यास किमती रुपये १७५ पावणेदोनसे रुपयेसी खंडून दिल्हे. सदरहू पैके आपण घेऊन मौजे मजकूरचे कुलकर्ण तुम्हास विकत आपले आत्मसंतोसे गाईब्राह्मण साक्षे करून आपले वडिलाचे सुकृतपूर्वक कुलकर्ण दिल्हे आसे. कुलकर्णासी इनाम व हक वर्तना सालाबाद चालत आहे बी तपसील :

इनाम जमीन कुडो गला — ८=॥·

हक लाजीमा प।। बाजू — ६ खु।।

तुप मापी — ८४॥·

गला हक कुडो — ·॥ — १८

कागद बाब

·।।· मोसबे खर्च

·।।· दसरा

८

येणेप्रमाणे आहेते. सदरहू कुलकर्ण आपले मिरासी तुम्हासी विकन दिल्हे असे. तुम्ही लेकराचे लेकरी खाऊन सुख असणे. सदरहू कुलकर्णासी आपणासी व आपले लेकराचे लेकरासी व डाईज[1] गोत्रीज भाउबंद कोणासी अर्थे अर्थ संमध नाही. पेस्तर कांही सदरहू गावीचे कुलकर्णाचे लाग लिगाड आलीया आम्ही वारून. हे क्रयपत्र.

सही.

बी।। रखमाजी खंडो

साक्ष हजीर मजालसी माजी

आबाजी देवजी देसाई व बाजी भेरपा देसाई
कसबा हवेली प।। मजकूर
नांगर असे

नाईकवाडी प।। कोल्हापूर
सवडजी नाईक पेसजी नाईक
चोंडाजी नरसिह व हरी भिकाजी कुलकर्णी
कसबा मजकूर

मोकदम पेट केसापूर चीरगोडा पटेल
नांगर असे

आबाजी रामकृष्ण
देसकुलकर्णी
क।। हवेली प।। म।।
पत्र–
प्रमाणे साक्ष

मादगोंडा पटेल
प।। कोल्हापूर
नांगर असे

नरसोजी फिरंगोजी नाईक
क।। कोल्हापूर
त।। आसंडोली

जोतजी देसाई देसकुलकर्णी
१ रामजी मल्हार
१ भागोजी बाबाजी
——
२

---

१. दायाद.

नरमोजी देसाई—

बानबाजी अनंत कुलकर्णी मौजे सातरडे पैकी कोल्हापूर या पत्रास

साक्ष—

धोंडो खंडो मल्हार
किले पनाला

भोगनाथ कुलकर्णी
ता॥ बोरगाव
पत्र प्रमाणे साक्ष

---

**क्रमांक : ४१** **दि. १५–१–१६९२**

गिरजोजी यादव ह्यानी शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीपासून राज्याची बहुमोल सेवा केली होती. त्याबद्दल छत्रपती राजाराम ह्यानी त्याना व त्यांच्या भाऊबंदाना तपे उंब्रज व तपे तारगाव ह्या महालांची देशमुखी दिली.

स्वस्ति श्री राज्याभिषक शके १८ प्रजापतिनाम संवत्सरे माघ शु॥ ७ सप्तमी भृगुवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपति याणी समस्त सेना धुरंधर राजमान्य राजश्री संताजी घोरपडे सेनापति यासी आज्ञा केली ऐसीजे. पिराजी बिन चौंडाजी यादव व गिरजोजी यादव बिन मुधाजी व पदाजी बिन आबाजी यादव व मकाजी बिन आणाजी यादव देशमुख ता॥ उंबरज व ता॥ तारगाऊ प्रा॥ सातारे याणी चंजीचे मुकामी स्वामी संनीध येऊन विनंती केली की आपली देशमुखी उंबरज महाल देहे ३० तीस व तारगांव महाल देहे २४ चोविस पूर्वी परंपरेने चालिली होती. त्यास इदलशाहाचे कारकिर्दीस देशमुखी अमानत केली होती. ते राजश्री माहाराज साहेबी आपणास मागोन घेतली. त्यापासून हे वतन स्वामीस अजि ता॥ चालत अले आहे. ऐसियास आम्ही पुरातन वतनदार आहो व गिरजोजी यादव हे

स्वामीसेवा येकनिष्टपणे करीत आहे. स्वामी प्रजापालक धर्मप्रभु आहेत. कृपाळू होऊन पुरातन अमचे वतन आम्हास देऊन स्थापना केलि पाहिजे. आपण या वतनानिमित्य स्वामीस सेरणीं होन दोनी हजार २००० देऊन देशमुखीची सेवा करूं म्हणोन विदित केले. ते मनास आणून गिरजोजी बिन मुधोजी यादव हा स्वामीचा पुरातन सेवक सेवा बहुतच निष्टेने केली आहे व राजेश्री कैलासवासी स्वामीचे वेळेस वरीच सेवा केली. या उपरी सांप्रतही स्वामीच्या पायाशी येकनिष्ठपणे वर्तणूक करितात व हे पुरातन वतनदार आहेत. यांचे चालवणे स्वामीस अगत्य. यास्तव यादव मजकुरीवरी स्वामी कृपाळू होऊन याजपासून सेरणी होन २००० दोन हजार घेऊन तपे उमरज[1] माहाल ३० तीस गांव तपे तासगाव माहाल चोविस गांव या दो माहालाची देसमुखी यास अजरामऱ्हामत करुन वतन दिल्हे असे. या वतनास हक लाजिमा व इनामती पूर्वीपासून जे मोईन[2] चालली असेल तेणे प्रमाणे चालवावयाची आज्ञा करून राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यास आज्ञापत्रे व प्रांत मजकूरच्या देशाधिकारी याच्या नांवे सनद व यादव मजकुरास भ्रितिपत्रे सादर केले असे. तेणेप्रमाणे सदहू दोही माहालीची देसमुखी यादवाच्या स्वाधीन करून स्वामी सेवा घेतील. तुम्ही ही सदहूं वतन यादवास चाले हक लाजिमा इनाम अनभऊन सुखरुप राहेत ते करणे. अंतर पडो न देणे. जाणिजे लिहिणे. तरी सुज्ञ असा--

---

**क्रमांक : ४२** **मार्च १६९२**

हिंदुराव घोरपडे ह्याना इंदापुरची देशमुखी होती. ती राणोजी घोरपडे ह्याना दिल्याचा उल्लेख.

---

१. उंब्रज. २. नेमणूक.

श्री शंकर

राजश्री शंकराजी गोपाळ
मुतालिक देशमुखी
पो। इंदापूर गोसावी यास—

ऽ अखंडित लक्षमी अलंकृत राजमान्य स्नो हिंदुराऊ घोरपडे दंडवत. सुा इसने तिसैन अलफ. इंदापूरची देशमुखी आम्हास राजश्री स्वामीनी दिल्ही होती. तेथे तुम्हास मुतालिकीस पाठविले होते. सांप्रत देशमुखी चिरंजीव राजश्री राणोजी घोरपडे यास दिल्ही असे. तरी तुम्ही त्यांचे आज्ञेप्रा। वर्तणूक करून ते देसमुखी साधणे. तुमचे-विसी आम्ही त्यासहि लिहिले आहे. ते तुमचे चालवितील. ते तुमचे देसमुख तुम्ही त्यांचे मुतालिक. त्यांचे आज्ञेप्रा (व)र्तणूक करणे जाणिजे.

छ — माहे रजबू

मोर्तब

(हिंदुरावांचा चौकोनी शिक्का)

---

**क्रमांक : ४३** दि. २१–६–१६९२

गिरजोजी यादव व नरसिंगराव यादव ह्यांची कसवा औंधची तेवीस गावाची देशमुखी त्यांचेकडे चालविण्याबद्दल छत्रपती राजाराम ह्यांचे संताजी घोरपडे ह्याना आज्ञापत्र.

श्री

स्वस्ती श्री राज्याभिशेक शके १९ अंगिरानाम संवत्सरे आशाड बहुल त्रितिया भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छेत्रपती याणी

समस्त सेनाधुरंधर राजमान्य राजश्री संताजी घोरपडे सेनापती यास आज्ञा केली यैसीजे. का। अउद प्रां। कराड या माहालची देशमुखी पूर्वीपासून मा। गिरजोजी यादव व नरसिंगराऊ यादव याची होती. ते दिवाणास अमानत केली होती. त्यास अलीकडे मा। गिरजोजी यादव याणी स्वामी सेवा येकनिष्ट केली याकरिता स्वामी कृपाळु होऊन का। मजकूरची देसमुखी गिरजोजी यादव व नरसिंगराऊ यादव यास करार करून सनदापत्रा पहिले राजश्री रामचंद्रपंत अमात्य याचे नावे व देशाधिकारी याचे नावे सादर जाल्या आहेती. तेणेप्रमाणे याचे देशमुखीचे वतन याचे स्वाधीन होय आणि गुरळीत चाले ते करणे. का। मजकुराखालील गाव २३ तेवीस तळघाटी आहेती. ते कमावीस कऱ्हाडीच्या सुभियाकडे व काही सातारिया सुभियाकडे लागले आहेती. त्या गावीची देशमुखी गिरजोजी यादव व नरसिंगराऊ यादव याची यास चाले येविशी पूर्वी पत्रे पाठविली असती. परंतु ते गाव याचे देशमुखीखाली चालत नाही म्हणऊन विदीत जाले. तरी तुम्ही कारकुनास ताकीद करून तळघाटीचे तेवीस गाव याचे देशमुखीकडे चालविणे. हक लाजिमा व वाजे पूर्वीपासून मोईन चालत अली असल तेणेप्रमाणे यास चाले येसे करणे. हरयेकविशी याचे चालवित जाणे. जाणिजे. बहुत लिहिणे तरी सूज्ञ असा—

---

**क्रमांक : ४४**

दि. ९–७–१६९२

स्वराज्यरक्षण करीत असता बजाविलेल्या कामगिरीबद्दल संताजी घोरपडे ह्याना तीन चावर जमीन इनाम दिल्याचे रामचंद्रपंत, त्र्यंबक शिवदेव ह्याला कळवितात.

श्री

राजश्री त्रिंबक सिवदेऊ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी
प्रांत खटाव गोसावी यांस——

६) अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवक रामचंद्र निळकंठ आमात्य नमस्कार. सु॥ सलास तिसैन अलफ. राजश्री संताजी बिन मालोजी घोरपडे सेनापती ल———— राजश्री छत्रपती स्वामीने कर्नाटक प्रांतात जाते समई या प्रांती ठेऊन गेले. त्या समई इकडे गनिमाची धामधुम होऊन कितेक देशदुर्ग हस्तगत केली होती या राज्यात काही अर्थ उरला नव्हता. ते प्रसंगी याणी यकनिष्ट धरून जिवाभ्य श्रम केले राज्य रक्षण केले. पुढेहि स्वामीच्या पायासी निष्ठा धरून वर्तत आहेत. याणी विनंती केली की खटाव प्रांती गोवारे गावीची (पटेलगी) पुरातन चालत आहेत. त्यास इनाम कदीम आहे. त्यातून इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून. त्यावरून मनास आणून स्वामीकार्याच म्हणून त्यास पाटेलगीच कदीम अहेत. त्या खेरीज इजारा वतन करून दिल्हे असेत. जमीन चावर तीन ३ बी तपसील :

क॥ वांगी जमीन चावर

·।॥· अवल जमीन जिरात

·।· पाटस्थल

१८

कसबे भालवणी जमीन चावर

·।॥· अवल जमीन जिरात

·।· पाटस्थल

१

मौजे ढवळेश्वर कर्यात इटे जमीन चावर

·।· अवल जमीन पाव चावर जिरात

·।· पाटस्थल पाव चावर

·॥·

मौजे चिकलवाहाळ कर्यात आऊध जमीन चावर

·।· अवल जमीन पाव चावर जिरात

·।· पाटस्थल

·॥·

या पटेलगी वतन गावचारी यासी इजारा इनाम जमीन चावर तीन रास करून दिल्हे असेत. तरी यास व याचे पुत्र पौत्रादि परंपरेस चालवणे. या पत्राची तालीक लेहून घेऊन मुख्य पत्र परतून भोगवटियासी मारनिले जवळी देणे. नूतन पत्राचा आक्षेप न करणे. सदरहुप्रमाणे देहाये मजकुरी इनाम जमीन नेमून हदी'म्हदुदी घालून देणे. जाणिजे. छ ४ जिलकाद, निदेश समक्ष.

लेखन
सीमा समु
ल्लसती

---

१ (महदूद) = मर्यादा.

**क्रमांक : ४५** दि. २९-७-१६९२

संताजी घोरपडे यानी औरंगजेबाचे स्वारीचे वेळी जी बहुमोल कामगिरी केली त्याचे चीज म्हणून छत्रपती राजाराम ह्यानी त्याना मिरज प्रांतीं बावीस देशमुखांचे वतन इनाम दिल्याचे रामचंद्र नीलकंठ अमात्य यांचे पत्र.

तालकेची तालीक

श्री

राजश्री संताजी घोरपडे गोसावी
यासी

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य

स्नेो रामचंद्र नीलकठ आमात्य आसीर्वाद सुा सलास तिसैन अलफ. राजश्री छत्रपती स्वामी कर्नाटकात जाते समई तुम्हास या प्रांती ठेऊन गेले. त्या समई इकडे गनिमाची धामधुम बहूत होऊन कुलदेश दुर्ग हस्तगत केलो होती. राज्यामध्ये काही अर्थ उरला नाही.

कुल म्हराठी यानी इमान खता करून गनिमाकडे गेले. परंतु तुम्ही ईनाम खता न करिता राजश्रीचा पायासी बहूतच येकनिष्ठा धरून जमाव करून सेख निजाम व सर्ज्याखान व रणमस्तखान व ज्यानसरखान येसे उमदे वजीर बुडविले. जागा जागा गनिमास कोठ्या घालून नेस्तनाबूद केले आणि देश सोडविला. राज संवरक्षणाचे प्रसंगास असाधारण श्रम केले. अवरंगजेबास दहशत लाविली. पुढेही कितेक स्वामी कार्याचे ठाई हिमत धरिता. याकरिता तुम्हावर राजश्री स्वामी संतोष होऊन मामले मिरज कर्याती बेवीस येथील देशमुखी होते ते नस्तनाबूद जाह्ले त्याचे वंसी कोणी नाही त्याचे मुतालिक होते ते बोलावून देशमुखी वतन खात होते तेही दूरबुधी धरून गनिमानी मिलोन फिसात केली. एकनिष्ठा धरून इकड येऊन भेटले नाहीत म्हणोन त्याची देशमुखी दूर करून तुम्हास अजरामत देशमुखी मामले माारची आवलाद आपलाद वतन करून दिल्हे आस. पुत्र पौत्री चालवून देशमुखीचा हक लाजिमा व इनामत व इसाफतीचे गाव सालाबाद पहिले देशमुखास चालले असतील ते प्राा खाऊन वतनाचा मामला चालवून सुखरुप राहाणे. तुम्हास देशमुखी नुतन करून अजरामराहमत दिल्ही म्हणोन सेरणी तुमचे माथा व्होन पातशाई ५००० पाच हजार करार केले आसेत. याचा वसूल हुजुर घेतला.

छ २४, जिलकाद. प्राा हुजुर

| बर्षशके | राजशक |
|---|---|
| १६१४ | १९ |

---

क्रमांक : ४६

दि. २९–८–१६९२

रुद्राजी सोनजी साळवी ह्याने छत्रपतींच्या घराण्याची बहुमोल सेवा केली म्हणून छत्रपती राजाराम ह्यानी त्याला सुभाप्रांत राजापूरमध्ये एक गाव नाम दिला.

तालीक

श्री

सिका

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १९ अंगिरानाम संवत्सरे अधिक भाद्रपद वहुल त्रयोदसी इंदुयासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती स्वामी याणी रुद्राजी बिन सोनजी साळवी यासी दिल्हे वृतीपत्र यैसेजे.

सिका

तुम्ही पुरातन स्वामीचे सेवक यकनिष्ठपणे सेवा करीत आहा. स्वामी सेवेचे ठायी यक चित. यास्तव तुमचे ऊर्जित करून वंशपरंपरेने चालवणे हे स्वामीस अगत्य. या करता स्वामी तुम्हावर कृपाळू होऊन तुम्हास नूतन इनाम मौजे फणसद तपे हराचिरी सुभा प्रांत राजापूर देखिल वाडिया देह यक रास कुलवाव कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी झाडझाडोरा पडिले पान सहित खेरीज हकामदार व हकदार करून गाव इनाम दिल्हा असे. चतु:सिमा भूमि पूर्वील मर्यादेप्रमाणे गाव आपले स्वाधीन करून घेऊन तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें इनाम अनभऊन सुखरुप असणे. या वृतीस जो कोणी हिंदु अगर मुसलमान होऊन इस्किल करील त्यास आपल्याला महज(बाची) अण असे. हे पापे जाणोन तुम्हास वृति सुरळीत चालवितील. जाणिजे. निदेश समक्ष.

मर्यादेयं
विराजते

तारीख २६
जिल्हेज, सुा सलास तिसैन अलफ

---

**क्रमांक : ४७** दि. १५–९–१६९२

कऱ्हाड प्रांतातील राजा कर्णाच्या देशमुखीपैकी उंब्रज व तारगाव ह्या दोन तर्फांची देशमुखी गिरजोजी यादव ह्याना देण्यात आली.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक १९ अंगिरानाम संवत्सरे भाद्रपद शुध पौर्णमा गुरुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी राजमान्य राजश्री सुंदर तुकदेव यासि आज्ञा केली ऐसीजे. देशी खासा स्वामीची वतन होती. त्या मधून पाा कऱ्हाड येथील देसमुखी चिरंजीव राजश्री कर्ण राजा यास वतन दिल्हे. तेथील कमाविशी कारबार तुम्हाकडे लाविला आहे. ऐशास ताा उंबरज व ताा तारगांव येथील देशमुखी दिवाणात पूर्वी अमानत होती. ते राजश्री गिरजोजी यादव यास दिल्ही. त्याची पत्रे पूर्वीच सादर केली आहेत. तरी तुम्ही उंबरज (व) तारगांव येथील देसमुखी गिरजोजी यादव यास चालो देणे. येविशई तुम्हास रवाना करिते समई स्वामीने आज्ञा केली आहे व हे पत्रही लिहिले असे. तरी उंबरज व तारगांव दोन्ही तर्फे खेरीज करून कऱ्हाड प्रांतीचे देशमुखीचा आटोप करून चिरंजिवाकडे वतन चालवणे. या दोन्ही माहाली कथला कुसूर न करणे. गिरजोजी यादव यास देसमुखी चालो देणे. जाणिजे.

---

**क्रमांक : ४८** दि. १५–९–१६९२

तर्फ उंब्रज व तर्फ तारगावची देशमुखी गिरजोजी यादव ह्याना दिली असून सुंदर तुकदेव ह्याना तसे समक्ष सांगितले आहे असे ह्या राजपत्रांत म्हटले आहे.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १९ आंगिरानाम सवछरे भाद्रपद शुध पौर्णमा गुरुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी

राजश्री गिरजोजी यादव यास आज्ञा केली येसीजे. तुम्हास स्वामीने ताा उंबरज व ताा तारगाव येथील देशमुखी दिल्ही आहे. त्यास चिरंजीव राजश्री श्रीकर्ण राजा यास कऱ्हाडची देशमुखी वतन दिल्हे. तेथील कमाविसीस राा सुंदर तुकदेव यास पाठविले अहे. तुम्हास वतन दिल्हे ये बाबे स्वामीने स्वमुखे त्यास सांगितले आहे व हालीही आज्ञापत्र सुंदर तुकदेव यास पाठविले आसे. पावते करणे अणी उमरज व तारगाऊ येथील देशमुखीचे वतन अनभवीत जाणें. कोण्ही कथला कुसूर तुमचे वतनासी करणार नाहीं. अविछिन्न चालेल. जाणिजे.—

---

**क्रमांक : ४९** दि. १६–१०–१६९२

रायाजी लिंगदेव कुलकर्णी ह्याला त्याच्या धामधुमीच्या काळातील कामगिरी-बद्दल मौजे कळवे येथे अर्धा चावर जमीन दिली असल्याचे रामचंद्र नीलकंठ ह्यांचे पत्र.

श्री

राजश्री देशधीकारी व देशलेखक वर्तमान व भावी प्रांत पनाला——

अखंडीत लक्ष्मी आलेंकृत राजमान्य शेवक रामचंद्र निलकंठ अमात्य नमस्कार. सुाा सलास तीसेन अलफ. रायाजी लिंगदेऊं कुलकर्णी मौजे कलबे कर्यात ठाणे प्रांत मजकूर याणी या राज्याशी निष्टापूर्वक बहुत दिवस सेवा केली आहे व पुढें शेवा ही करावयाची उमेद धरीत आहेत. धांमधुमेच्या प्रसंगात रामजी राऊत यास बरोबर वरघाट प्रांते स्वारीस दिल्हे होते. तेथेंही निष्ठापूर्वक शेवा केली आहे. याचेविसी राजश्री काशी रंगनाथ व रामजी राऊत यांणीं विनंती केली कीं हें स्वामी कार्याचे आहेत. यास मौजे मजकुरी नूतन इनाम देऊन

उतरोत्तर चाले असी आज्ञा करावी म्हणून. त्यावरून मनांस आणून याचे चालवणे हे जाणोन यास नूतन इनाम मौजे कलबे का। ठाणे प्रांत मजकूर येथे पडी जमीन अवल दुमां सीम तीन्ही प्रतीची मिळोन विसापांडांच्या बीघीयाने चावर ·।।· नीम यास ठिकाणयाची बतवी व आर्जी.

बी तपसील :

| | |
|---|---|
| याचे कुलकर्णाचे बाबूल सेत ठिकाणे पाच येकी याचे रकमेचे सेत | बा। माहादेव साबत रकम ठिकाण येक पाच येकर ठिकाण |
| १ | १ |
| रकम येक साडेतीन येकर १ | |

यकूण ठिकाणे तीन सदरहु अर्धे चावर जमीनीस देवीली आहेत. त्यास तुम्ही विसापांडाच्या बिघीयाने सदरहू टिकाणे मोजून चतु:सीमा करुन अर्ध चावर जमीन मोजून देणे. अर्ध चावराहून जास्ती जमीन होईल ते दिवाणात अमानत करणें. कम सदरहू ठिकाणची जमीन जाली तरी दुसरे जागाहून पूरऊन देऊन अर्ध चावर जमीन कूलबाब कूलकानू हालीपटी पेस्तरपटी सहीत खेरीज हकदार करून यास याचे पुत्रपोत्री वंशपरंपरा उत्तरोत्तर चालवणे. नवीन पत्राचा अक्षेप प्रतीवर्षी न करणें. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र परतून कुलकर्णी मजकुराजवली देणे. छ १५ सफर, पा। हुजूर. मोर्तब असे सुरु सुद.

क्रमांक : ५० दि. १५-१-१६९३

संताजी घोरपडे ह्यांच्यासमवेत ससैन्य राहून बजावलेल्या कामगिरीबद्दल छत्रपती राजाराम ह्यांनी चांदजीराव पाटणकर ह्याना पाटण महाल इनाम दिला.

श्री

तालिक

सिका छत्रपती

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १९ अंगिरानाम संवत्सरे माघ बहुल पंचमी भौमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी

सिका सिका चंदजीराव विन नागोजीराव पाटणकर देशमुख परगणा पाटण.

राजाराम छत्रपती हर्ष
निधान मोरेश्वर सुत
नीलकंठ मुख्य प्रधान

यासी दिल्हे वृतिपत्र ऐसिजे. तुम्ही स्वामीचे पुरातन सेवक. सेवा बहुत निष्टेने केली आहे व तुम्ही जमावे घेऊन कर्नाटकात राजश्री संताजी घोरपडे सेनापति या समागमे येऊन शेवा करीत आहा. यास्तव स्वामी तुम्हावर बहुत संतोषी होऊन तुम्हावर स्वामी कृपाळू होऊन तुम्हास इनाम पूर्वी परगणे पाटण खाते गाव ११ अकरा व मौजे अडुळ पा। कराड देह १ येक येकूण वारा गाव चालत आहेत. त्यादेखील परगणे पाटणा म्हाल सारा इनाम कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी झाड झाडोरा पडले पान सहित खेरीज हकदार व इनामदार करून माहाल इनाम दिल्हा असे. तुम्ही महाल अनभवे

स्वाधीन करून घेऊन लेकराचे लेकरी इनाम अनभऊन सुखरुप असणे. यावृत्तीस भोसला होऊन इस्कील करील तो भोसल्याचे वंशीचा नव्हे. यासी आणिक कोणी अन्यथा करील त्यास धर्म शास्त्रीचे वचन ।। श्लोक ।। स्वदत्ता परदत्तायोहर वसुं(ध)रा ।। शष्टी वर्ष(स)हस्त्राणि विष्टायां जायते कृमि ।। १ ।। हे पातक जाणोन तुम्हास इनाम चालविणे. तुम्ही देशमुखीची सेवा करून सुखरुप असणे. जाणिजे निदेश समक्ष. मोर्तब असे.

रुजु

तेरीख १९, जमादिलाकर सु।। सलास तिसैन
बार सुद.

---

दि. ९-४-१६९३

क्रमांक : ५१

गणोजी कदम चलकर व शंकराजी वेदाजी ह्या दोघानी सेनापती संताजी घोरपडे ह्यांना लिहिलेल्या प्रस्तुत पत्रात त्यांच्या इंदापूर परगण्यातील देशमुखीचा हाळहवाल सादर केला आहे.

तालीक

शंकर

अखंडीत लक्षमी आलंकृत
राजमान्य राजेश्री शेयनापती
स्वामी गोसावी यासी

ठेवणाईत[1] गणोजी कदम चलकर व शंकराजी वेदाजी बा। देसमुखी पा। इंदापूर जोहार आसीरवाद विनंती. सु।। सन सलास तिसैन

---

१ गुमास्ता.

अलफ. ताा छ १२ शावान परीयेत वर्तमान साहेबाचे कृपाद्रिस्टीकरून येथास्तित असे. तुमचे निरोप घेऊन इंदापुरीचे देसमुखीचे कागदपत्र घेऊन माहालीचे सुभेदार याचे भेटी घेतली. त्यास कागदपत्र विदित केले. त्याचा ताकीदरोखा माहालास करून घेतला. तो रोखा व रो छत्रपती स्वामीकडील पत्र तैसे मुलुकीच्या पाटिलासी दाखविली. त्यानी माबे केली. त्यासी मुलुकीच्या मामला तो गु।। पाऊसाकरिता ना पेरा जाहाला. कुलदाणा जाहाला नाही. येणेकरून रयेत बहुत रंजीस आहे. त्यास बाळाजी मल्हारी सुभेदार याने आखेर साली मोहीमपटी म्हणऊन संभरी रुपेये दाहा रुपेयेप्रमाणे धामधुम केली आहे. साहेबाकडील व रो जोगोजी गाइकवाड याकडील रोखा व रा त्रिबक विठल याकडे स्वार येऊन तमाम गावोगावी दाहा वीस स्वार मामोरी[1] करून मुलुकीचा मामला आहेसा केला. त्यास तमाम पाटील अम्हासी बोलतातो. जे रो शेनापती यास देसमुखी जाहली अणि अम्हावरी हा काहर होता. त्याची देसमुखी जाहलिया आम्ही सुखे राहावे. आम्हास बहुतच खोली लागले. रो स बखैर लिहून मुलुकात अजार न पावे तैसे करणे. त्यास्तव मुलुकीचे जाहाले वर्तमान सेवेसी लिहिले आहे. तुमची देसमुखी आहे अणी जाहाले वर्तमान तुम्हास लिहिले आहे. यामधे तुम्ही धणी आहे व इसाफताचे गाऊ मौजे बोरी व मौजे नाहावी हे दोनी गावी रो त्रिबक विठल यानी मारिता मारिता रुपये २६ घेतले आहेत. तरी साहेबी या दोही गावास आपला कौल व पंचहजारी व पागा शिलेदार यास दो गावास पत्र करून पाठविणे. जे आपले देसमुखीचे इनाम गाव आहे ते यास कोण्ही घासदाणा व येक रुका न घेणे. जैसी कळतील तैसे ताकीदपत्रे पाठऊन दिल्हेया गावीची मामुरी होईल. अणी माहालीचे सुभेदार यासही येक व आपले पत्र जे अमचे देसमुखीचे मुतालिक अहेत त्याचे गुजारतीने मुलुकात पटी करीत जाणे. अगर जे कांही घेणे देणे मुलुकीचे ते मुतालिकाची गुा तीने घेत जाणे.

---

१ आबादी.

मुतालिकाखेरीज रोखे करून गाव उठविले म्हणजे त्या गावीचे जो आकार होईल तो सुभेदारापासी घेऊन म्हणवून माहालीचे सुभेदार याची पत्रे आलीयाने तुमचे देसमुखीस चौका बैसोन मुलुक कुल तुम्हाकडे येईल. जे रोास देसमुखी जाहालियाकरिता सुखरुप राहिलो. आम्ही सेवक लोक अहो. जाहले वर्तमान सेवेसी लिहून पाठविले आहे. यामधे साहेबाचे चितास जे येईल ते केले पाहिजे. रोा रखमाजी महिपतीराऊ पूर्वी देसमुखीस मुतालिक होते. त्यासी येक आपले हेच(?) करून पाठवणे. हक लाजिमा पूर्वी हकाचा जाबिता असेल त्याचे तालीक करून तुमचे मुतालिकास देणे म्हणऊन त्यास पत्रे साहेबी पाठवणे. त्यावरून ते पूर्वीचे जाबिताप्रमाणे कळो येईल. हे विनंती.

---

दि. १३-११-१६९३

**क्रमांक : ५२**

मोगल फौजांनी पन्हाळयास वेढा घातला तेव्हां काशी रंगनाथ वरपे ह्याने उल्लेखनीय कामगिरी बजावली म्हणून छत्रपती राजाराम ह्यानी त्याला एक चावर जमीन इनाम दिली.

स्वस्ती श्री राज्याभिषेक शके २० श्रीमुखनाम संवत्सरे कार्तिक बहूल दशमी रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी राजश्री कासी रंगनाथ उपनाव वरेपे यास आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही या राज्यातील पुरातन शेवक. राजश्री कैलासवासी छत्रपती स्वामीचे कारकीर्दीस कष्ट मशागत केल्या आहेत. सांप्रत किले पनालियास मोगल गनीम मोजदीन वेढा घालून बसला होता त्या प्रसंगी तुम्हास कितेक स्वामी कार्यानिमित्य किलेवर नामजाद ठेविले होते. तेथे तुम्ही स्वामीशेवा एकनिष्ठेने केली. स्वामी कार्यास आणि स्वामीच्या पायासी एकनिष्ट आहा. याकरिता स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन तुम्हास नूतन इनाम दिला असे. जमीन चावर १

ता। मलकापूर सुवा प्रांत प्रा। पैकी जमीन चावर ·।-।१०

·।· भातरोपी ॅ१५ मळी जमीन

ॅ१५ माल जमीम ॅ१० माल जमीन

४०।·

यास तपसील

मौजे वटारपैकी

ॅ१५ भात रोपे ॅ७॥ मळी

ॅ७॥ माल

ॅ३०

मौजे घोलसवडेपैकी

ॅ५ भात रोपे ॅ२॥ मळी

ॅ२॥ माल

ॅ१०

मौजे करांगलपैकी

ॅ५ भात रोपे ॅ५ मळी

ॅ२॥ माल ॅ१० माल

ॅ२२॥·

मौजे कासर्डेपैकी

ॅ२॥ भात रोपे ॅ१। माल

ॅ३॥।·

मौजे खरले नजीक माल

ॅ२॥ भात रोपे ॅ१। माळ

ॅ३॥।·

सुभा प्रांत पनालापैको जमीन चावर ·।२०

तपसील

तर्फ कोडोली जमीन

ॅ१५ माल जमीन

ॅ१५ माल जमीन

३०

मौजे कविटे पिराचे जमीन

ॅ१० मळी जमीन

ॅ१० माल जमीन

२०

येणेप्रमाणे एक चावर जमीन आपल्या राज्यात बिघावणी चालत आहे. तेणेप्रमाणे इनाम दिल्हे असे. मलकापूर प्रांते भात रोपे तीस बिघे जमीन दिल्ही असे. ये जमिनीचे कीर्दीस करल गवत पाहिजे ते सालाबादप्रमाणे दिले असे. याच्या सनदा आलाहिदा दाही सुभ्याच्या देशाधिकारी यास सादर केल्या असेत. त्याप्रमाणे सदरहू जमीन तुम्हास मोजून बिघावणी करून नेमून चतु:सीमा करून देऊन तुमचे दुमाले करतील. ते घेऊन पुत्रपौत्रादि वंशपरंपरा आवलादी आफलादीस उपभोग करणे. जाणिजे.

लेखनालंकार.[1]

तेरीख

२०

रबिलावल, सुभा आर्बा तिसैन अलफे.

दि. १-१-१६९४

**क्रमांक : ५३**

छत्रपती राजाराम ह्यानी नामजाद व कारकून सुभा प्रांत तारळे ह्याना कळकिले कीं, पाटगाव येथील मठास मौजे पणदुर व मौजे वासनुली हे दोन गाव इनाम दिले आहेत.

मौनी बाबा

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २० श्रीमुखनाम संवत्सरे पोष्य शुध पूर्णिमा इंदुवासरे क्षेत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी राजश्री नरसो सुरो सभासद नामजाद व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत तारळे यांस आज्ञा केली येसिजे.

---

१ याच तऱ्हेचे एक आज्ञापत्र भानजी रघुनाथ देशाधिकारी व लेखक सुभा प्रा मलकापूर यांचे नावे पाठविलेले आहे.

राजश्री— याचा मठ कसबा पाटगावी आहे. त्यास त्याचे पूजेस व मटी अतीत आभ्यागत येताती. त्याच्या भंडारीयास पहिले कुडाली सुभाहून होन ७०० सातसे निशानी पावत होते. सांप्रत धामधुमेच्या प्रसंगात पावत नाही. म्हणून याचे शिष्य मुरतगिरी हुजुर आले. त्यानी विदीत केले त्यावरून मनास आणून पूजा पुरस्कार चालोन आतीत अभ्यागत येतात त्यास भंडारा जाहला पाहिजे म्हणून सदहूंपैकी सुभा कुडाळ येथे पणदूर हे कुलबाब कुलकानु होन नि।। ४०० चारिसे होनाचे ऐवजी दिल्हा. त्याची सनदी आलाहिदा सादर असे. तेणेप्रमाणे चालवितील. बाकी होन नि।। ३०० तिनशे याच्या येवजास मौजे वासनुली तर्फ खानापूर सुभा प्रांत मजकूर हा गाव बावा स्वामीस इनाम कुलबाब कुलकानु इनाम दिला + + + + +

तारीख १४ जमादीलावल
सन अर्बा तीसैन अलफ

---

**क्रमांक : ५४** **दि. २३–१०–१६९४**

मराठ्यांच्या जहाजांकडून पोर्तुगीज जहाजांवर हल्ले होत होते. त्याचा उल्लेख गोव्याच्या व्हाइसरॉयने खेमसावंत ह्याना दि. २३ आक्टोबर १६९४ रोजी पाठविलेल्या पत्रात आढळतो.

" खेम साबंत ह्यांस :

खेम सावंत सरदेसाई यांचे पत्र मिळाले व ते वाचून मजकूर समजला. राजापूर नदींतील चाच्यांच्या नौकांबाबत त्यानी जी कामगिरी बजावली त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत. मला माहीत आहे की, खेम सावंत सरदेसाई हे आमचे हितचिंतक आहेत. हल्लीं मराठ्यांच्या जहाजांकडून आम्हाला पुष्कळच उपद्रव होऊं लागला आहे. ते आमचे मित्र म्हणवितात आणि आमचीं गलबतें

खुशाल लुटतात. गेल्या वर्षी त्यानी ह्या बंदरातील एक जहाज लुटले. त्यांची जहाजे समुद्रावर भक्षांच्या शोधार्थ हिंडत असतात. त्यांतील एका जहाजाचा आमच्या जहाजाने पाठलाग केला. तें जहाज एका खेड्याच्या किनाऱ्याला लागले असता आमच्या लोकानी त्या किनाऱ्यावर उतरून ते खेडे जाळून बेचिराख केले.

सरदेसाई खेमसावंत ह्याना माझी विनंती आहे की, राजापूर आणि मेलुंडी येथील चाच्यांच्या कप्तानाशी आणि मराठ्यांच्या ठाणेदारांशी त्यांचा जर पत्रव्यवहार असेल, तर त्यानी त्याना कळवावे की, पोर्तुगिजांच्या पारिपत्याचा तो एक नमुना होता. त्याना जर आमच्याशी शांततेचे आणि सलोख्याचे संबंध ठेवायचे असतील, तर त्यांनी आमची जहाजे आम्हाला परत करावी व यापुढे आमच्या जहाजावर हल्ले करण्याचा उद्धटपणा करू नये. ते जर माझ्या सूचनेप्रमाणे वागले, तर माझी मर्जी संपादन करण्यात त्याना यश येईल. सरदेसाई ह्यानी जो विजय संपादन केला, त्याबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो. देव आपले भले करो वगैरे.

पानेली, २३ अक्टोबर १६९४
कौंट द व्हिला व्हेर्द

---

दि. १३-११-१६९४

**क्रमांक : ५५**

मराठा सैनिकानी बार्देशमध्ये शिरून लुटालूट केली अशी तक्रार गोव्याचा व्हाइसरॉय रायाजी शामराव ह्याना पाठविलेल्या पत्रात करतो.

" रायाजी शामराव ह्यास—

मागे आपणामार्फत रामचंद्र पंडीत व संताजी घोरपडे ह्यांच्याकडून जी पत्रे आली, त्यावरून माझी समजूत झाली की,

आपण ह्या राज्याचे मित्र आहांत. कारण त्याचा अर्थ नसाच होत होता व आपण पत्रात ह्या राज्याचे मित्र असल्याचे कबूल केले होते. पण आज उलटें दिसत आहे. कारण, आपण घाट उतरून आमच्या राज्यात शिरलात व लुटालूट केलीत. हे कृत्य अत्यंत विलक्षण आहे. त्यामुळे आपणावर विश्वास ठेवणे कठीण झाले आहे. मी चौलला कुलावा व खांदेरी ही बेटे व्यापण्याचा व त्या बेटांकडे अन्न सामग्री न पाठविण्याचा हुकूम धाडला होता. हा हुकूम अमलात आलेला पाहून आपण गडबडून गेला असाल. मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे की, पोर्तुगीज लोक तशाच काही सबळ कारणावांचून आपल्या मित्राकडील संबंध तोडीत नाहीत. मला वाटते आपल्या ज्या शिलेदारानी बार्देश-मध्ये शिरून जी लुटालूट केली, त्याची आपणाला माहिती नसावी. म्हणून माझी आपणाला विनंती आहे की, आपल्या सैनिकांच्या बेशिस्तपणाची चौकशी करून आपण त्याना योग्य ती शिक्षा करावी. तसेंच आपणाला युद्ध कीं शांतता हवी आहे तेंहि आम्हाला कळवावे. आमच्याशी जर आपणाला युद्ध करायचे असेल तर त्याला आमची तयारी आहे. आणि आमचे सैन्यहि लढाईला उत्सुक आहे. आपणाला युद्ध नको असल्यास आपण ते प्रत्यक्ष कृतीने दाखविले पाहिजे. आपण आमच्या राज्यांत शिरलेल्या आपल्या सैन्याला माघारा आणावे व त्याच्याकडून यापुढे आमची आगळीक न होऊ देण्याची खबरदारी घ्यावी. तसेच आपण आमच्याशी तहहि करावा. माझी अशी समजूत आहे की, आमच्या राज्याला लागून जी राज्यें आहेत त्यानी आमच्याशी मैत्री ठेवली नाही म्हणून त्यांचा नाश झाला. आपण आमच्याशी सलोख्याचे संबंध ठेवू इच्छिता त्याचे कारण हें की, माझ्या हाताशी मोठे सैन्य असून युरोपातून आम्हाला मोठी कुमक आली आहे हे आपणाला कळले आहे.

मी हे पत्र रामकृष्ण कृष्ण नाईक बरवे ह्यांच्या बरोबर पाठवित आहे. ते आपणाला काय करायचे ते सर्व समजाऊन सांगतील. मी अधिक काही लिहीत नाही."

गोवा, १३ नवंबर १६९४
कौंट द व्हिला व्हेर्द

---

दि. १७-११-१६९४

क्रमांक : ५६

मणेरी व साखळी येथील देसायानी मोगलांविरुद्ध बंडाळी माजविली होती. ह्या बंडाळीला छत्रपती राजाराम यांची फूस असल्याचा मोगलाना संशय येत होता. मणेरीच्या देसायांची बंडाळी मोडून काढण्यासाठी पोर्तुगिजानी मोगलाना कशी मदत केली ते गोव्याच्या व्हाइसरॉयच्या पुढील पत्रावरून कळून येते.

'फोंड्याचे सुभेदार ह्यास

अहमद सारंग ह्याच्याकडे आपण जो निरोप पाठविला त्याप्रमाणे मी मणेरीला एक हजार बंदुकधारी व पन्नास घोडेस्वार पाठविले. ते तेथे काल सकाळी दहा वाजता जाऊन पोहोचले. ते लगेच आघाडीवर रवाना झाले. परंतु तिकडे त्याना कुणीच आढळले नाही. माझी अशी समजूत आहे की, माझे सैन्य बलाढ्य असल्या-कारणे शत्रूने पळ काढला असावा, आमच्या सैन्याच्या सेनापतीने शत्रूचा दोन कोस पाठलाग केला. आपण मला लिहिले होते की, आपलेहि सैन्य तिकडे असेल. परंतु आपले सैन्य आमच्या सैन्याला आढळले नाही. त्यावरून असा निष्कर्ष निघतो की, आमच्या सैन्याला शत्रूच्या तोंडी देण्याचा आपला विचार होता किंवा शत्रूशी मुकाबला करण्यास आपणापाशी सैन्य नव्हते. आणि आपण आता लिहिता की डिचोलीला शक्य तितक्या लवकर सैन्य पाठवावे. ही गोष्ट अशक्य आहे. कारण मी सैन्य साष्टी व बार्देश येथे पाठविले आहे. त्या सैन्याची जुळवाजुळव करण्यास उशीर लागेल. पण आपण शत्रूच्या

इतक्या जवळ असून त्याचा प्रतिकार का करीत नाही त्याचे मला आश्चर्य वाटते. आपल्या माणसाना उपद्रव देऊ नये म्हणून मी भाणस्तरीच्या लोकाना आजच हुकूम पाठवित आहे. आपल्या माणसाना उपद्रप झाला ही बातमी खोटी आहे. कारण आमच्या नद्यांच्या कॅप्टनने आपल्या काही लोकाना आमच्या होड्यांतून नदीपार केले आहे.

कौंट द व्हिला व्हेर्द.

---

**क्रमांक : ५७** **दि. २५-११-१६९४**

**चंदजीराव आरुळेकर हा पळून जाऊन सावंतांच्या आश्रयास राहिला होता. रामचंद्र पंत अमात्य ह्यांनी त्याला अभयपत्र पाठवून आपल्या मुलुखास येण्याचे आवाहन केले.**

श्री

(शिक्का)

अभयपत्र समस्त राजकार्य धुरंदर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रामचंद्र पंडीत अमात्य हुकुमतपन्हा ता। मा। चांदजीराऊ अरुलेकर सुहूर सन खमस तिसैन व अलफ, दिल्हें अभयपत्र येसेजे. पूर्वी धामधुमीच्या प्रसंगात तुम्ही परांगदा होऊन सावताकडे जाऊन राहिलेस. हल्ली आपलाले गांवीं येऊनु निष्टेनें वर्तोन स्वामीसेवा करावयाची उमेद धरिता. ये गोष्टीस हुजुरून कौल पाहिजे म्हणून तुमचे बाबेमा। कृष्ण ठाकूर देसाई ता। खारेपाटण यांणी विनंतीपत्र पाठविले. त्यावरून तुम्हांवर कृपाळू होऊन हें अभयपत्र सादर केले असे. यापूर्वी तुम्हापासून निष्टेस अंतर पडोन अन्याय जाहले आहेती ते अवघे क्षमा केले आहेती. ते गोष्टींचे लिगाड लागणार नाहीं कोणबाबे शंका अंदेशा न धरितां आपल्या कबिल्यानसी सुखरूप तुम्ही व सोनजीराऊ, संभाजीराऊ, कानोजीराऊ, देवजीराऊ, जिजीराऊ, बालुजीराऊ, भिवजी मुंदले यैसे आपलाल्या गांवास येऊन वसाहत करून मामुरी करणें. तुम्ही खासे

खासे कृष्ण ठाकूर समागमे घेऊन भेटीस येणें. नाहीं तर तुमचा तुम्ही मनास आणून खासा तुम्ही आपल्या पंचसह श्री + + + याद सरंजाम वतन देऊन तुम्हापासून लाईख जामीन घेऊन तुमचे सर्व प्रकारे चालऊन जैसे खानवलकर निष्टेने सेवा करिताती कबिले विशाळ-गडी ठेऊन स्वामीकार्य करून दाखविताती त्याच रितीनें तुम्हीही आपले कबिले गडावरी ठेऊन स्वामी कार्य करीत जाणें आणि आपला मुजुरा करून घेणे. तुमचे वतनही पूर्वी चालिले असेल ते मनास आणून कृष्ण ठाकूर यांचे विद्यमानें तुमचे तुमच्या दुमाला केले जाईल. आपला दिलासा असो देणे. दरीबाब कौल असे. वतन तुमचे असेल त्याचा तह करून देऊन त्याप्रमाणे चालऊ. छ १७ रबिलाखर. निदेस समक्ष.

शिक्का

सुरु सुद्र

---

१६९४-१६९५ (?)

**क्रमांक : ५८**

लढाईच्या धामधुमीमुळे बंद पडलेली सिदगिरी या देवाची जत्रा नेहमी-प्रमाणे भरवावी म्हणून मठाच्या गोसावी बुवाना संताजी घोरपडे ह्यानी विनंती केली.

सिदगिरी

श्रीमंत सकल गुणालंकृत राजेश्री गोसावी बावा यांचे सेवेसी कृतानेक स्नेहांकित संताजी घोरपडे सेनापती व कारकून दंडवत. विनंती. उपरी येथील कुशल जाणोन तुम्ही आपले कुशल लिहित + + + विशेष तुमचेविशी म॥ रागोजी पटेल मौजे सावगाव यानी येऊन विदित केले की प्रति वर्षी जात्रा श्री देव-

येथील जात्रा भरत असती. त्यास धामधुम करि (ता) राहिलेली + + + + यास्तव यात्रा भरत नाही. तरी आपल्यास मुखामासी येऊन श्रीचा महोछाव करावा. वाटेस उपद्रवाविशी आनमान कराल तरी साहसा उपद्राव होणार नाही. तरी आपणा (?) येऊन मोहछाव केला पाहिजे हे विनंती.

मोर्तब

(शिक्का)

---

**क्रमांक : ५९**                    **दि. १५–६–१६९५**

गोव्याच्या व्हाइसरॉयचे गणेश रघुनाथ ह्याला पत्र. रामचंद्र पंत अमात्य ह्यानी गणेश रघुनाथ ह्याची कोकणांत नेमणूक केल्याबद्दल त्याने आनंद व्यक्त केला आहे. पण त्याचबरोबर रामचंद्र पंतांच्या पोर्तुगिजांबाबतच्या संदिग्ध वागणुकीबद्दल नाखुषी दर्शविली आहे.

गणेश रघुनाथ ह्यांस

रामचंद्र पंडीत ह्यानी कोकणच्या प्रदेशात तुमची नेमणूक केल्याबद्दल आम्हाला फार आनंद झाला. तुम्ही आमचे मित्र आहात हे कृतीने सिद्ध कराल अशी आशा आहे. पोर्तुगिजांशी जे मैत्रीने वागतात त्या सगळ्यांशी आम्ही मैत्री ठेवतो. तुमच्या बाबतीत त्याची प्रचीति आम्हाला येईल असे आम्ही धरून चालतो. परंतु रामचंद्र पंडीत ह्याच्या वागणुकीचे मात्र आम्हाला गूढ वाटते. ते जरी वरकरणी ह्या राज्याचे मित्र असल्याचे भासवित असले, तरी त्यांची कृति त्याच्या उलटी आहे. कारण, त्यांच्या सुभेदारांची गलबते आमच्या पाण्यात संचार करून आमच्या गलबताना उपद्रव देतात. आणि त्याला रामचंद्र पंताची संमती आहे दुसरी गोष्ट अशी की, आमच्या शत्रूशी ते मैत्रीचे संबंध ठेवतात. म्हणून मी राजापूरच्या

बंदरात अरबांच्या शोधार्थ गेळो होतो. राजे ( Principe ) राजाराम ह्यांना आमच्याशीं मैत्री हवी आहे. म्हणून ते आपल्या बंदरात आमच्या शत्रूला थारा देण्यास संमती देणार नाहींत. कारण तसे जर झाले, तर त्याना आमच्या मैत्रीचा लाभ होणार नाही. राजे राजाराम ह्यांच्याशी मैत्रीचे संबंध ठेवण्यास आम्ही तयार आहोत. मात्र त्यांच्या आरमारातील अधिकाऱ्यानी आमच्याशीं मित्रत्वानें वागले पाहिजे. पण ते जर आमच्या गैर विश्वासास पत्र झाले आणि त्या लुच्च्यांच्या गलबतानी लूटमारीचें सत्र चालूच ठेवले, तर त्याना आम्ही शासन केल्यावांचून राहाणार नाही.

सत्रोजी राणे ह्याच्या हातून जो गुन्हा घडला, त्याबद्दल त्याला अटक व शिक्षा करण्याचा हुकूम मी केला होता. परंतु त्याच्या हातून तो गुन्हा घडला नसल्याचे सिद्ध होताच मी त्याची शिक्षा रद्द केली. आतां ज्या अर्थी तो आपल्या मुलुखात गेला आहे त्या अर्थी तो खरोखरच गुन्हेगार असल्याची आपली खात्री झाल्यास त्याला शिक्षा करता येईल.

पानेली, १५ जून १६९५
कौंट द व्हिला व्हेर्द.

---

दि. १०-८-१६९६

**क्रमांक : ६०**

उंब्रज व तारगांव ह्या दोन्ही तर्फांचे उत्पन्न गिरजोजी यादव ह्याना देण्याबाबत राजा कर्ण ह्यांचे आज्ञापत्र.

श्री भवानी शंकर

(षट्कोनी शिक्का)

आज्ञापत्र राजश्री राजा कर्ण ताा मोकदमानी देहाय ताा उंबरज ——— ताा तारगाव सुाा सबा तिसैन व अलफ. दोनी तर्फेची

देशमुखी राजश्री स्वामीनी यादवास दिल्ही आहे. तरी सालाबाद हक लाजिमा जो गावगना चालिला असेल त्याप्रमाणे विलाकुसूर गिरजोजी यादव यास देत जाणे. जाणिजे. छ २१, मोहरम ————

मोर्तब

(शिक्का)

---

**क्रमांक : ६१** **दि. १८–९–१६९६**

पोर्तुगीजांच्या ताब्यात असलेल्या तुर्भे गावावर खांदेरी येथील काही मराठा सैनिकांनी हल्ला करून काही माणसे गिरफदार करून नेली होती. ह्या हल्ल्याचा बदला घेण्यासाठी गोव्याच्या व्हाइसरॉयने खांदेरीस वेढा घालण्याचे ठरविले व तो ठराव गोव्याच्या सल्लागार मंडळासमोर ठेवला.

चौलचा किल्लेदार व उत्तरेकडील प्रदेशाचा सेनापती ह्या दोघांच्याहि पत्रांवरून कळून आले कीं, दि. २४ ऑगस्टला खांदेरी व कुलाबा येथील मराठा शिपायानी तुरुंबा[1] ह्या खेड्यावर हल्ला करून ते लुटले. त्यानी दों आंतॉनियु येंरिकिज ह्याच्या घरांत शिरून त्याच्या बायकोस व इतर कुटुंबियांना गिरफदार करून नेले.

उपरिनिर्दिष्ट हल्ल्याचा बदला म्हणून चौलच्या किल्लेदाराने मराठ्यांच्या प्रदेशांतील काही माणसें कैद केली. ही माणसे चौलच्या हद्दीत बिन परवानगीने आली होती. एक पुरुष आणि काही बायका अशी ती माणसे आहेत. बायका खांदेरीच्या किल्लेदाराच्या नात्या-पैकी आहेत. ह्या राज्याची प्रतिष्ठा टिकावी व दों आंतॉनियु ह्यांची

---

१. तुर्भे

पत्नी व त्यांचे कुटुंबीय ह्यांची मुक्तता व्हावी म्हणून खांदेरीवर हल्ला करण्याचा चौलच्या कप्तानाचा विचार आहे. पण ह्या कामी त्याला युद्धनौकांची मदत हवी आहे. दमणहून तीन युद्धनौका येऊ शकतील. पण त्या पुरणार नाहीत. कमीत कमी बारा युद्धनौका तरी पाहिजेत. तरच वेढा यशस्वी होऊ शकेल असे चौलच्या कप्तानाचे मत आहे. सिद्दी याकुतखान खुष्कीच्या बाजूने मदत करण्यास तयार आहे. आम्ही ह्या बाबतींत जो निर्णय घेऊं तो चौलचा कप्तान अमलांत आणील. तरी सल्लागार मंडळाने ह्या ठरावावर उचित तो निर्णय घ्यावा.

---

उपरिनिर्दिष्ट घटनेबाबत गोव्याचा व्हाइसरॉय दि. १५ डिसेंबर १६९६ रोजीं आपल्या राजास लिहिलेल्या पत्रात म्हणतो :

चालू वर्षाच्या ४ डिसेंबर रोजी खांदेरी बेटावरील मराठ्यानी तुरुंबा खेड्यावर हल्ला केला. ही माणसें सुमारे एक हजार होतीं व तीं पंधरा नौकानी आली होती. त्यानी खेड्याबर जो जोरदार हल्ला केला तींत त्यानी साठ माणसाना गिरफदार केलें. त्यात खेड्यांतील प्रमुख नागरिक दों आंतॉनियु येंरिकिज ह्यांची बायको ही एक होती. त्यानी खेड्यांतील बहुतेक सर्व चीजवस्तु नेली. कल्याण व भिवंडी येथील नद्यांतील काही नौकानी शत्रूचा पाठलाग केला. पण तो निष्फळ ठरला. ह्या अपमानाचा बदला घेण्याकरीता मी खांदेरी बेटाची नाकेबंदी करण्याचा निर्णय घेऊन तो सल्लागार मंडळासमोर ठेवला. सल्लागार मंडळाची संमती मिळाल्यावर वेढ्याचे काम हातीं घेण्यात आले. वेढा इतका परिणामकारक झाला कीं, मराठ्यांनी दों आंतॉनियु येंरिकीज ह्यांची पत्नी व आणखी काही माणसें परत केलीं. त्यांना कोणत्याहि प्रकारचा उपद्रव मराठ्यांनी केला नव्हता. पकडलेली माणसें परत केल्यावर वेढा उठविण्यात आला. शत्रूला चांगलीच अद्दल घडविण्याचा माझा विचार होता. परंतु चौलच्या कप्तानाने वेढा उठविला. वेढा उठविण्याचा निर्णय त्याने मला न विचारता घेतला.

शत्रूला आणखी कुरापत काढण्याचे धाडस होऊं नये म्हणून त्याला धडा शिकविण्यासाठी मी खांदेरी वेटास पुनः वेढा घालण्याचा हुकूम केला आहे. ह्या वेढ्याच्या यशाची वार्ता महाराजांना कळविण्यांत येईलच.

---

**क्रमांक : ६२**

यादव दप्तरातील हे टीपण जिंजीच्या वेढ्यासंबंधी आहे. विशेषेकरून या वेढ्यातून महाराणी ताराबाई अणि त्यांचा पुत्र शिवाजी वगैरे राजघराण्यातील मंडळीची सुटका कशी करण्यात आली त्याचे वर्णन आहे. दुर्दैवाने टीपण अपुरे असेच मिळाले.

सेवेशी अर्जी सुरराव यादव.

श्री गज्यानन समर्थ. श्रीमंत माहाराज थोरले माहाराज पुंडावे करीत असेत समई जवळ आमचे बावा गिरजोजी बावानी सेवा केली. चुलते आर्जोजी यादव व हिरोजी फर्जन हे दोघे इमारतीचे हवालदार. याजजवळ आठरा हजार माणूस इमारतीचे. येकाचे नऊ हजार व येकाचे नऊ हजार. येकून आठरा हजार. जितका माहाराजानी किला बांधला त्या किल्यास हिरोजी फर्जन याचा हवाला व आर्जोजी बावाची सरनोबती वतनीबाब याप्रमाणे माहाराजानी करून दिली. गिर्जोजी बावा व दमाजी गाईकवाड सरखवस ये माहाराजाची रूमाल व फिरंग घेऊन सेवा करीत आले. माहाराज तखती बसले त्यासमई दोघे दोहीकडे येके बगेस गिर्जोजी ऐका बगेस दमाजी बावा सरखवस यानी येकाने मोरचेल व येकाने रूमाल फिरंग घेऊन सेवेसी उभे राहिले. तकती बसलेवर नऊ वरसे राज्य त्यानी केले. त्यावरी थोरले माहाराज कैलासवासी जाल्यावर मग श्रीमंत माहाराज संभाजी माहाराज तखती बसले. त्यांची सेवा उभयेंता बावानी व गाईकवाड सरखवस यानी केली, साडेआठ बरसे राज्य माहाराजानी केले. त्याजवरी

श्रीमंत माहाराज राजाराम साहेब राज्यास निघालेवर मोंगलाच्या भयामुळे रामचंद्रपंत यांचे आध्यान सारे किले करून त्याजपासी खंडोजी दाभाडे हुजरे ठेऊन मग आपण राजारामसाहेब चंदीस निघोन गेले. तेथे नऊ वर्षे राज्य चंदीस केले. त्यासमई आवरंगजब पाछा यास खबर लागली की गलीम कर्नाटकांत गेला. ते समई पाछा याने आस्तखान दिवान पाछाचा त्याचा वडिल लेक झुल्पकार हा सुभा फौजे सुधा कर्नाटकात चंदीवर रवाना केला. त्यास येक उनाळा चंदीस जाताना वाटेस लागला. पावसाळा आला. ते समई झुल्पकाराने चंदीस माहाराजासी सला केला. त्या समई राजा कर्ण माहाराजाचे नाटकसालेचा लेक हा झुल्पकाराजवळ गाहाणास दिल्हा. त्याजबराबर मातबर कारभारी कोणी जावयास पाछा याचे धास्तीमुळे पाय घेइनासे जाले. तेथे माहाराजाजवळ गिर्जोजी बावा सेवसी होते. मग त्यास माहाराजानी आज्ञा केली जे तुम्ही राजा कर्ण याज बराबर झुल्पखाना-कडे जाणे. यैसी आज्ञा होते समई मग बावा राजा कर्ण याज बराबर झुल्पखानाचे फौजेंत गेले. तेथे येक पावसाळा त्याजपाशी राहून मग राजा कर्ण व गिर्जोजी बावा हे चंदीस निघोन माहाराजाकडे गेले. मागे झुल्पखान मोगल बळावला. त्याची फौज भारी जाली. उनाळा आला. ते समई मोगलाने चंदीस वेढा देऊन शाहा देऊन बसला. मग च्यार महिने चंदी भांडली. तेव्हा जेर जाहाली. ते वेळेस माहाराज बाहेर निघेनासे जाले. परम संकट प्राप्त जालेवर गिर्जोजी बावानी मोगलाचे फौजेतील बिराडकर वाणी यासी + + + केले आणि च्यार हजार होन वाणी यास देऊन त्याचे स्वाधीन माहाराजास बावानी करून येंळीरास पोहचऊन दिल्हे. आपण पाठिमागे राहून वरकड राण्या व नाटकसाला महाराजांच्या याचे आईबाप तेथे होते त्याचे घरास घालऊन दिल्या. श्रीमंत तारा आईसाहेब व राजस आईसाहेब या उभयेतास बावानी आपले घरास तेथे चंदीस चंदीत आणिले.

राजा गेल्यावर तीन रोज चंदी मोगलासी भांडली. वस्तभाव व जड होती ती तेथें कडपाखाली आवघड जाग्यात नेऊन बावानी पुरून ठेवली. तीन रोज कसाला हा जाहाला. चवथे दिवसी झुल्पकार मोगल चंदीस रात्रसमई सांजे चडिला. ते समई उभयता आईसाहेब व बावानी आपली मुले माणसे घेऊन निघाले. ते वेळेस सिवाजीराजें यांस माहीजी बावा (?) जवळ दिले व लेकीस व तारा आईसाहेबा-जवळ + + + + + बसनेहुयास घोडे मोठे दिल्हे. रामसिंग हा कपा झुल्पकाराचा सरदार पाचसे रावताचा त्याचे डेऱ्यास घेऊन रात्री आले. त्याचे डेऱ्यास आपली मुले माणसे ठेऊन उभयेता आईसाहेब यास घेऊन गिर्जोजी बावा निघाले ते समई रामसिंग हजारी याने च्यार घोडी आपली बावा बरोबर

(पुढे मजकूर गहाळ)

---

**क्रमांक : ६३** **दि. २३ मे १६९८ नंतरचे पत्र**

राणी राजसबाई ह्यानी गिरजोजी यादव ह्याना लिहिलेल्या या पत्रात पुत्र झाल्याची वार्ता कळविली असून सौ।। मातुश्री ताराबाई ह्यांना दंडवत सांगितला आहे.

श्री शंकर

राजश्री गिरजोजी यादव यांसी

प्रति सौ।। वज्रचुडेमंडित राजसबाई–उपरी. तुम्ही गेलियावरी कागद पाठवून समाचार घेतला नाही. तरी हे तो उचित नव्हे. संतोषाचें वर्तमानपत्र संताजी चव्हाण या बरोबर पाठविले होते. त्यास त्याने ते पत्र तुम्हास न देता परभारे राजश्रीस भेटला. त्यावरून त्यास बाद केले आहे. तुम्ही जे काही श्रम केले आहेत त्या श्रमाचे ईश्वर सार्थ केले. पुत्र जाला. राजश्री येथे आलियावरी

तुमचेविसी रदबदली जाली. तुमचे वतन तुम्हास दिल्हे. त्याचे कागद जाले असतील तेहि तुम्हास पावले असतील. यादोपंताबरोबर पाठविले आहेत. कळले पाहिजे. कोणे गोष्टीचीं चिंता न करणे. जाणीजे. सौ. मातुश्री ताराबाईस दंडवत पावत करणे. कळले पाहिजे.

---

**क्रमांक : ६४** **दि. ७–६–१६९८**

गिरजोजी यादव ह्यानी जिंजी येथें जी असामान्य कामगिरी बजावली त्याबद्दल त्याना छत्रपती राजाराम ह्यानी तर्फ तारगाव व तर्फ उंब्रज येथील स्वतःचे देशमुखीचे वतन दिले.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषक शके २४ बहुधान्य संवत्सरे जेष्ठ शुद्ध नवमी भोमवासरे क्षेत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी

श्री राजाराम<br>नरपति हर्षनिदान<br>मोरेश्वरसुत नीलकं<br>ट मुख्य प्रधान

राजश्री भानजी गोपाळ मुख्ये देशाधिकारी व लेखक प्रांत कऱ्हाड यास आज्ञा केली यैसीजे. गिरजोजी यादव यावर स्वामी कृपाळू होऊन ताा उंबरज व ताा तारगाऊ प्रांा मजकूर येथील देशमुखीचे वतन पूर्वी यादवाचे होते ते अजरामऱ्हामत करून दिल्हे आहे. परंतु प्रांत मजकूरचे देशमुखीचे वतन खासा स्वामीचे आहे. याकरिता यास न चालवावे यैसा निर्वाह केला होता. ऐसीयास गिरजोजी यादव यानी चंजीच्या प्रसंगी चिरंजीव राजश्री सिवाजी राजे यास स्वामी संनीध आणिले व स्वामीची सेवा बहुत निष्टेने केली. याकरितां सांप्रत स्वामीस आधिक जेष्ट वदे नवमी इंदुवारी[1] स्वामीस पुत्र

---

१ गदाधर प्रल्हाद शकावली (शिवचरित्र प्रदीप पृः ६६) मध्ये ज्येष्ठ अधिक वद्य ८ सोमवार असा निर्देश आहे. जंत्रीत ९ मीचा लोप दाखविला आहे. इंग्रजी ता. २३–५–१६९८ पडते.

जाहाला. चिरंजीव राजश्री संभाजी राजे नांव ठेविले. त्याप्रसंगे मारनिलेवर स्वामी कृपाळू होऊन उंबरज तारगाऊ या माहालची देशमुखी यास अजरामऱ्हामत करून दिल्ही असे. ते निर्वाहिरूप चालवावी ऐसी आज्ञा करून हे आज्ञापत्र प्रविष्ट केले असे. तरी तुम्ही हे जाणोन उंबरज–तारगाऊ या माहालची देशमुखी गिरजोजी यादव याचे स्वाधीन करून यास व याचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. या वतनास हक लाजिमा इनामत इसापत पानमान तश्रीफ पूर्वी चालली असल त्याप्रमाणे यास चालऊन हे त्या वतनावर राहोन सेवा करीत ते गोष्टी करणे. यांच्या वतनास अत:पर खलेल व कुसूर येकंदर होऊं न देणे. या पत्राची प्रत लेहून घेऊन मुख्य पत्र देशमुख मजकुराजवळ परतोन देणे. हक वर्तना राजश्री रामचंद्र पंत अमात्य याणी लेहून दिल्हे आहे त्याप्रमाणे चालविणे. लेखनालंकार––

मर्या<br>देयंविरा मोर्तब<br>जते

---

**क्रमांक : ६५** **दि. ७–६–१६९८**

क्रमांक ६४ प्रमाणे खुद्द गिरजोजीला दिलेली सनद.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषक शक २४ बहुधान्य संवत्सरे जेष्ट शुध नवमी भोमवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजाराम छत्रपतीं याणी राजश्री गिरजोजी यादव यास आज्ञा केली यैसीजे. ताा उंबरज व ताा तारगाऊ प्रांत कऱ्हाड येथील देशमुखीचे वतन पूर्वापार तुमचे होते. ते स्वामीने तुम्हास अजरामऱ्हामत करून देऊन कागदपत्र पूर्वी करुन दिल्हे आहेत.

श्री राजाराम<br>नरपति हर्षनिदान<br>मोरेश्वरसुत नीलकं<br>ठ मुख्य प्रधान.

ऐसीयास आलाकडे ते वतन खासा स्वामीचे आहे याकरिता तुम्हास न चालवावे ऐसा निर्वाह केला होता. ऐसीयास चंजीच्या प्रसंगे तुम्ही स्वामीच्या पायासी निष्ठा धरुन चिरंजीव राजश्री सिवाजी राजे यास स्वामीसंनीध आणून पावविले. याकरिता सांप्रत स्वामीस पुत्र जाहाला. चिरंजीव राजश्री संभाजी राजे हे नांव ठेविले. त्या प्रसंगे स्वामी तुम्हावर कृपाळू होऊन उंबरज तारगाऊ येथील देशमुखीचे वतन तुमचे तुम्हास अजरामऱ्हामत करुन दिल्हे आहे. ते निर्व्हारुप तुम्हास चालवावयाची आज्ञा करुन प्रांत मजकुरच्या देशाधिकारी याचे नावे आज्ञापत्र सादर केले आहे. तेणेंप्रमाणे वतन आपले स्वाधीन करुन घेऊन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन सुखरुप राहाणे. लेखनालंकार.

मर्या
देयं विरा
जते.

---

दि. १४-७-१६९८

**क्रमांक : ६६**

धनाजी जाधव ह्यांचे खंडोजी थोरात ह्याना पत्र की, मौजेदेवगाव दुई हे त्यांचे मोकाशाचे गांव छत्रपती ह्यानी मातुश्री मैकुबाई ह्याना इनाम करून दिले आहे.

श्री

राजश्री खंडोजो थोरात
रुस्तमराऊ बारा हजारी
गोसावी यासि

६) अखंडित लक्ष्मी आलंकृत + + मान्य + + + स्नेे।।

जयेसिंगराऊ + + पति जोहार. सु।। तिसा तिसैन अलफ.

मौजे देऊगाऊदुई ताा पटस हा गाऊ पेशजी तुम्हाकडे मुकासा दिल्हा होता. त्यास साल मजकूर तुम्हाकडून दूर करुन राजश्री छत्रपती स्वामी याणी मातुश्री मैकूबाई यास इनाम करुन दिला असे. तर तुम्ही आपली दखलगीर येकजरा मौजे मजकुरास न करणे आगर उपसर्ग न लावणे. जाणिजे. छ १५, मोहरम. हे विनंति.

श्री
राजाराम
चरणी दृढभा
व सेनापती +
नाश्री जाध +
राव

विल + +

लेख + + +

---

**क्रमांक : ६७** **दि. २२–७–१६९८**

छत्रपती राजाराम ह्यांचे तर्फ उंब्रज व तर्फ तारगावमधील एकूण चौपन्न गांवच्या मोकदमाना पत्र की, सदहू गावच्या देशमुखीचे वतन गिरजोजी यादव ह्याना देण्यात आले आहे. महादजी जगदाळे ह्याचा त्या गावांबर कोणताच अधिकार नाही.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २५ बहुधान्य संवत्सरे आषाढ बहुल दशमी भृगुवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपति याणी मोकदमानी देहाय ताा उंबरज व तारगाव यास आज्ञा केली यैसीजे. राजश्री गिरजोजी यादव देशमूख प्रांत कराड याणी हुजुर विदित केले की ताा उंबरज व ताा तारगाऊ देहे बी ताा[1]

श्री राजाराम
नरपति हर्षनिदान
मोरेश्वरसुत नीळकं
ठ मुख्य प्रधान.

× × ×

---

१ तपशील घेतलेला नाही.

येणेप्रमाणे चोपन गावीचे देशमुखीचे वतन पुरातन आपले आहे. याकरिता स्वामीने कृपाळू होऊन सदरहू गावीचे देशमुखीचे वतन आपले स्वाधीन करून चालवावयाची पत्रे करून दिल्ही तेणेप्रमाणे आपण देशमुखीचे वतन अनभवीत आहो. यैसियास माहादजी जगदाळा चंजीचे मुकामी स्वामी संनीध जाऊन मसूर तर्फेची देशमुखी आपली आहे म्हणोन गैरवाका विदित करून स्वामीची पत्रे करून घेतली आणि या प्रांते येऊन तांम्राची पाठी करून आपल्या वतनासी कथला मांडिला आहे. यैशास सदरहू दोही तर्फांचे देशमुखीचे वतन पुरातन आपले आहे. आपला भोगवठाही चालत आला आहे. यैसे असता माहादजीस या वतनासी कथला करावयास काय समंध आहे. आपण स्वामीची येकनिष्ठेने (सेवा) करीत आहो. तरी स्वामीने कृपाळू होऊन आपले वतन आपणास बिलाकुसूर चाले ऐसी आज्ञा केली पाहिजे म्हणोन विनंती केली. त्यावरून कळो आले. ऐसियास चंजी तांम्रानी हस्तगत केली ते प्रसंगी गिरजोजी यादव याणी बहुतच येकनिष्ठेने सेवा करून स्वामीचा कबिला व चिरंजीव राजश्री शिवाजी राजे व चिरंजीव सोइराबाई आऊ यास त्या संकटातून काढून वेळुरी स्वामी संनीध आणून पावविली. त्याउपरी स्वामी स्वार होऊन या प्रांतास आले. येता मार्गी याणी बहुतच सेवा करून स्वामीस संतोषी केले. याकरिता यांचे चालविणे स्वामीस अगत्य. यैसियास चिरंजीव राजश्री संभाजी राजे हे स्वामीस पुत्र जाले ते समई स्वामी यावरी कृपाळू होऊन हे देशमुखीचे वतन पूर्वी यास दिल्हे आहे ते याचे यास निर्वाहरुप चालवावे यैसा निर्वाह केला. कऱ्हाड व सातारा या प्रांताचे कितेक वतनदार हुजुर आले होते. त्यासी याच्या वतनाची गोही साक्षी मनास आणिता माहालीचे देशमुखीचे वतन याचे खरे आहे म्हणून साक्ष दिल्ही. याकरितां तर्फ उंबरज व तर्फ तारगाऊ येथील देशमुखीचे वतन गिरजोजी यादव यास अजरामऱ्हामत करून दिल्हे असे. येविसीचे आज्ञापत्र देशाधिकारी प्रांत सातारा याचे नावे सादर

केले आहे. तरी तुम्ही हरदू माहालीचे देशमुखीचे वतन गिरजोजी यादव यास चालऊन हक लाजिमा इनामत इसाफत पानमान तश्रीफ पटी पाछोडी सालावाद चालत आले आहे त्याप्रमाणे चाले ऐसे करणे. माहादजी जगदाळा याणे समंध नसता गैरवाका विदित करून मसूर तर्फेची देशमुखी आपली म्हणोन पत्रे करून घेतली आहेत ते रद केली असत. त्यास याच्या वतनासी कथला करू न देणे. जाणिजे.[१]
लेखनालंकार.[२]

मर्या
देयं विरा
जते

---

**क्रमांक : ६८** दि. २१-८-१६९८

बिवाजी पालकर ह्यानी ताराबाई ह्याना पाठविलेले पत्र त्यांच्याकडे पोहोचते करणे असे बुऱ्हाणजी मोहिते हे गिरजोजी यादव ह्याना लिहितात.

श्री

राजश्री गिरजोजी यादव
गोसावी यास--

ॐ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित बाऱ्हानजी मोहिते हवालदार किले सजनगड जोहार. सुा तिसा तिसैन अलफ. विशेष राजश्री बिबाजी पालकर यानी वज्रचुडे मंडित सौभाग्यवती ताराबाईस

---

१. तिमाजी यमाजी सुभेदार व कारकून सुभा प्रांत सातारा ह्यानी सखोबा वजेर हवालदार व कारकून प्रांत सातारा ह्याना दिलेली दि. १२-८-१६९८ ची ह्या पत्राची नक्कल उपलब्ध आहे.

२. अक्षरे निराळ्या वळणाची.

पत्र पाठविले आहे. ते प्रविष्ट करणे व तुम्हांस व रा बाजी कदमास पत्रे पाठविली आहेती त्याप्रमाणे त्याचे पारपत्य करुन देविले पाहिजे. बहुत ल्याहावे तरी गोसावी सुग्न (ज्ञ) आहेती. कृपा असू देणे. छ २४, सफर. हे विनंती.

मो
तंब सु
द

श्री
राजाराम छ
त्रपति तस्य से
वक बऱ्हानजी
मोहिते

---

क्रमांक : ६९ दि. ९-१०-१६९८

दत्ताजी नाईक पिसाळ ह्याचे वतन बिनतक्रार चालवावे म्हणून हिंदुराव घोरपडे ह्यांची जोहार खोऱ्याच्या मोकदमास ताकीद.

श्री राजारामचरणो
त्पतेर्मालोजी घो
र्परे: । सुतस्यष्व
जे मुद्राषण्मुख
स्वेव राजते ।।

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री हिंदुराव घोरपडे ममलकतमदार शमशेरबहादुर ता मोकदमानी जोहार खोरे प।। वाई सु।। तिसा तिसैन अलफ. र।। दत्ताजी नाईक पिसाळ याचे वतन सालाबाद जैसे चालविले तेणेप्रमाणे चालवणे. दरम्याने हर कोण्ही कथला करितील त्यावरी न जाणे. बिलाकुसुर चालो देणे. नाहीतरी ताकीद होईल हे बरे समजोन लिहिल्याप्रमाणे वर्तणुक करणे. जाणिजे. रा. छ. १४, रबिलाखर.

---

**क्रमांक : ७०** **सन १६९८–९९**

छत्रपती राजाराम ह्यांचे स्वदेशी आगमन झाल्याप्रीत्यर्थ कागलचे पिराजी घाटगे यानी त्याना पत्र धाडून आनंद व्यक्त केला होता त्याबाबतचे छत्रपतींचे उत्तर.

श्री

तालीक

आखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य राजश्री पिराजी घाटगे यासी प्रती राजश्री राजाराम छत्रपती. उपरी तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ठ जाले. स्वामी करनाटक प्रांतातून या प्रांतास आले हे वर्तमान ऐकून बहूत समाधान पावले म्हणून वर्तमान तपसील लिहिल. कितेक विदीत जाहले. ऐशासच्या आगमने तुम्हास संतोष वाटावा हे उचितच आहे व या प्रांती स्वामीच्या लस्कराचा कैकी बहूत उपसर्ग दिला हे काही बलराहीक नाही. फुडेहि उपसर्ग देतच आहेत म्हणून हे वर्तमान तपसिल लिहिल तेही विदीत जाहले. ऐशास लस्कराच्या लोकास ताकीद पत्र पाठविल आहेत. ती याउपरी उपसर्ग देणार नाहीत. तुम्ही आपल समाधान + + देणे. बहुत काय लिहिण. तरी तुम्ही सुज्ञ असा. मोर्तब.

---

**क्रमांक : ७१** **दि. २१–२–१६९९**

खंडोबाच्या यात्रेच्या डबीचा ऐवज सरकारजमा झाला होता तो महाराणी ताराबाई ह्यांच्याकडे दिला आहे. त्या तो तुमच्या हवाली करतील, असे रामचंद्र पंत ह्यांचे गिरजोजी यादव ह्याना पत्र.

श्री

राजश्री गिरजोजी यादव देसमुख ता। उबरज तारगाव गो यासी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य————————स्ने॥

रामचंद्र नीळकंठ आशीर्वाद. सुहूर सन तिसा तिसैन आलफ. पालीच्या यात्रेचे डबीचा पैका व वस्त्रे दिवणात अमानत ठेविली होती. ते येणेप्रमाणे हुजूर सौभाग्यवती ताराबाई साहेबाकडे दिल्ही. सदरहू ऐवज बि॥ देशमुखी उबरज तारगाऊ.

श्रीरामचं<br>द्र चरण नील<br>कंठ सोनदे<br>व शरण

| खुर्दा | वस्त्रे |
|---|---|
| १३० | १ खेडा[1] |
| | १ मोडासा |
| रुपे वजन | —— |
| ८८८१ | २ |

लग

०

हे राजश्री जाधवरायाच्या कठल्याकारिणे ठेविले होते ते दिल्हे. सौभाग्यवती मातुश्री आईसाहेब तुम्हास देतील. जाणिजे. छ ३० साबान.

लेखन<br>सीमा समु<br>ल्लसती

१ उणाख शेला.

क्रमांक : ७२ दि. २१-२-१६९९

महाराणी ताराबाई ह्यांचे पालीच्या खंडोबाच्या जत्रेतील ऐवजासंबंधी गिरजोजी यादव ह्यांना पत्र.

श्री

" सही "

सक (ल) सौभाग्यवती वज्रचुडेमंडित ताराबाई याणी गिरजोजी यादव देशमुख ताा उबरज व तारगाव सू।। तीसा तीसैन अलफ. मौजे पाली ताा मजकूर येथील देश (मुखीच्या) हकाचा कथला राजश्री जाधवराव व तुम्हात लागला होता. या करीता पालीचे जत्रेची डबी आमानत केली आण हुजुर आणऊन राजश्री रामचंद्रपत याचे स्वाधीन केली. त्याउपरी किले सजनगडी तुमची त्याची कटकट जाली. त्यास राजश्री पती सदरहू डबीच्या ऐवज आम्हाकडे पाठवीला. त्यास तुमची तुम्हास दिल्ही.

बि।।

| खुर्दा टके | रुपे वजन ताो |
|---|---|
| १३० | ८८८० |

सनगे

| | |
|---|---|
| १ खेडा | लग |
| १ मुडांसे | ० |

येणेप्रमाणे सदरहू ऐवज अमानत केला होता तो तुमचा ऐवज तुमचे स्वाधीन केला असे.

" सही "

(पाठीमागे)

छ ३० , साबान.

---

" " हस्ताक्षर महाराणी ताराबाईसाहेबांचे.



महाराणी ताराबाई यांचे गिरजोजी यादव यांस पत्र. "सही" ही अक्षरे महाराणी ताराबाई यांच्या हातची. क्रमांक : ७२; पृ. १०६



माद्दजी राजे भोसले यांचे गिरजोजी यादव यांस पत्र. ह्यात महाराणी ताराबाई यांचा उल्लेख आहे. क्रमांक : ७३; पृ. १०७

क्रमांक : ७३ दि. २१-२-१६९९

पालीच्या खंडोबाच्या जत्रेंतील डबीच्या ऐवजाबाबत गिरजोजी यादव व धनाजी जाधव ह्या दोघांमध्यें तंटा उद्‌भवला होता. महाराणी ताराबाई ह्यानी ह्या प्रकरणी हस्तक्षेप करून सदहू ऐवज गिरजोजी यादव ह्याना द्यावयास लावला.

श्री

राजश्री गिरजोजी यादव देशमुख
पा। कऱ्हाड गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नें॥ माहादजी राजे भोसले रामराम. सुाा तिसा तिसैन आलफ. मौजे पा(ली) ता। उंबरज येथील यात्रा डबी यैवज देशमुखीचा याविसी तुम्हामध्ये व राजश्री धनाजी जाधवराऊ यामध्ये कथला लागला म्हणौन सौभाग्यवती वज्रचुडेमंडित ताराबाई याही डबीचा यैवज हुजूर आणून रा पंत आमात्य याकडे ठेविला. त्यास सजनगडीच्या मुकामी तुम्हामध्ये व राजश्री जाधवरायामध्ये कटक(ट) जाहाली तेव्हा सौभाग्यवती ताराबाई याही राजश्री पंताकडून डबीचा यैवज तुम्हास दिला.

| टके | कापड सणगे |
|---|---|
| १३० | १ खेडा |
| रुपे वजन | १ मुंडास |
| ८८८१ | २ |

येणेप्रमाणे यैवज तुम्हास दिल्हा असे. छ ३० साबान.
"सही"

" " हस्ताक्षर माहदजी भोसले ह्यांचे.

क्रमांक : ७४ दि. २१-२-१६९९

गिरजोजी यादव ह्याना खंडोजी करजकर ह्यांचे पालीच्या यात्रेच्या डबीबाबत पत्र.

श्री

राजश्री गिरजोजी यादव देशमूख पा। कराड
गोसावी यासी——————

ॐ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य——————

स्ने।। खंडोजी करजकर अर्जनीस रामराम विनंती उपरी. सुहूर तिसा तिसैन अलफ. मौजे पाली ता। उबरज येथील यात्रेचा डबीचा कथला तुम्हास व राजश्री धनाजी जाधवराऊ यामध्यें लागला म्हणोन सौभाग्यादिसंपन्न मातुश्री आईसाहेब याही डबीचा ऐवज आणून राजश्री पंत आमात्य यापासी ठेविला. त्यास किले सजनगडीच्या मुकामावर राजश्री जाधवराव व तुम्हामध्ये कटकट लागली तेव्हा सौ।ावती मातुश्री आईसाहेबी देशमुखीचे डबीचा ऐवज राजश्री पंताकडून आणून तुम्हास दिला.

| खुर्दा टके | कापड नग |
|---|---|
| १३० | १ खेडा |
| | १ मुंडासे |
| रुपे वजन | —— |
| ८८८० | २ |

येणे प्रमाणे तुम्हास दिले आसे.
छ ३०, साबान. "हे विनंती"

" " हस्ताक्षर खंडोजी करजकर ह्यांचे.

क्रमांक : ७५ इ. स. १६९९

गिरजोजी यादव ह्याना खंडो बल्लाळ व खंडो निबाभोडे ह्यांचे पालीच्या यात्रेच्या डबीबाबत पत्र.

श्री

राजश्री गिरजोजी यादव
देशमुख प्रांा कऱ्हाड गाो

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये श्नाौ खंडो बलाल व खंडो निबाभोडे (?) रामराम विनंती उपरी. सु।। तिसा तिसैन अलफ. मौजे पाली पाा मजकूर येथील यात्रेच्या डबीचा कथला तुम्हामधे व राजश्री जाधवराऊ यामधे जाहाला होता. त्यास डबीचा येवज हुजूर आणोन साौ मातुश्री आईसाहेब यानी पाा + + + + +

(पुढील मजकूर गहाळ)

---

क्रमांक : ७६ दि. १७–८–१६९९

मौजे कनवाड हा गाव सय्यद अहमद पीर ह्यास इनाम होता. तो पूर्वीप्रमाणे चालवावा म्हणून छत्रपती राजाराम ह्यांची देशाधिकारी प्रांत पन्हाळा ह्यास आज्ञा.

स्वति श्री राज्याभिषेक शके २६ प्रमाथी नाम संवत्सरे भाद्रपद शुध त्रीतीया गुरुवासरे क्षत्रिये कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी राजश्री भानजी गोपाळ मुख्य देशाधिकारी प्रांत पनाळा यांस आज्ञा केली यैसीजे.

रायाजी बापोजी याणे हुजूर येऊन विदीत केले की हजरत सैद अहमद बेखारी पीर मु।। कनवाड ताा आलते प्रांत मजकूर यास मौजे

मजकूर पूर्वीपासून इनाम चालत आहे. तेणेप्रमाणे उत्तरोत्तर इनाम चालवायाची आज्ञा केली पाहिजे म्हणोन विदीत केले. त्यावरून हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी तुम्ही मौजे कनवाड हा गाव सैद आहमद पीर यास सालावाद चालत आहे तेणेप्रमाणे पुढेहि विलाकुसूर इनाम चालो देणे. त्या गावास हरयेकविशी उपसर्ग न देणे नाकीद असे. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र परतोन देणे. जाणिजे.

निदेश समक्ष.

---

**क्रमांक : ७७** **दि. २७-८-१६९९**

छत्रपती राजाराम ह्यानी नीळकंठ मोरेश्वर ह्याना दोन गाव स्वामी सेवेबद्दल इनाम दिले.

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषक शके २६ प्रमाथी नाम संवछर भाद्रपद शु॥ १२ भानुवासर क्षेत्रीय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी राजेश्री नीलकंठ मोरेश्वर यांसी इनामपत्र दिल्हे यसीजे. तुम्ही

सिका प्रति निधि

या राज्यातील पुरातन सेवक. स्वामीच्या राज्यानिमित्य साहास अतिशयेसी केले. या निमित्य तुमचे चालवणे स्वामीस बहुत अगत्य. याकरिता तुमचे वतनी कुलकर्णाचे गाऊ दोन. मौजे वाठार ता। तारगाव मौजे लाटापूर ता। कोरेगाव सुभा प्रांत सातारा गाऊ--प्रांत वाहेगाऊ येकूण दोनी गाऊ स्वामी तुजवरी संतोषी होऊन इनाम करून दिले असेत. कुलबाब कुलकानु देखील हलीपटी व पेस्तरपटी झाडझाडोरा जलतरु पाषाण विधिनिक्षेप खेरीज हकदार व इनामदार पडिलेपान सहीत चतु:सीमा पुरवक मर्यादेप्रमाणे दोनी गाऊ इनाम दिल्हे आसे. येविसी प्रांत मारंच्या कारकुनास सनदा

सादर आहेती. तरी गाव आपले दुमाला करून पुत्रपौत्रादि वौंश-परंपरेने उपयोग करणे. जाणिजे. निदेश समक्ष.[1]

---

**क्रमांक : ७८** दि. २८-९-१६९९

श्रीकराचार्य पंडीतराव ह्यांचे देशाधिकारी व देशलेखक प्रांत कुडाळ ह्याना पत्र की बाबेदभट ठकार ह्या ब्राह्मणाला मौजे अंतुरळी ह्या गावी दहा बिघे जमीन इनाम दिली असून त्याचा पूर्वीचा धर्मादाय रद्द केला आहे.

श्री सकल गुणालंकृत अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्ये राजेश्री देशाधीकारी व देशलेखक वर्तमान व भावी सुभा प्रांत कुडाळ गोसावी या प्रती · श्रीकराचार्ये पंडीतराऊ आसीर्वाद. राज्याभीशेक शके २६ प्रमाथीनाम संवछरे आश्विन शुध पोर्णीमा गुरुवासरे वेदमुहुर्ती बाबदे भट बिन नारायण भट उपनाम ठकार वास्तव्य का।। पाटगाव प्रा मजकूर याणी हुजूर सातारेयाचे मुक्कामी येऊन विदीत केले जे आपणास धर्मादाय तांदूळ खंडी येकी आहे. तेणे करून आपला योगक्षेम चालत नाही. स्वामी धर्मपरायण आहेत. तरी स्वामीने आपणास कांही इनाम जमीन दिल्हेयाने स्नान संध्या करून राजेश्री छत्रपतीचे राज्यास कल्याण इछून राहून. त्याजवरुन मनास आणिता ब्राम्हण भले योग्य कुटूंबवछल पाहून यास इनाम जमीन बिघे १० दाहा मौजे अंतूरळी तालूका पाटगाव पैकी दिले असे. पेसजीचा धर्मादाये आहे तो दूर केला असे. सदरहु जमीन आवल दुम सीम तीन प्रतीने विसापांडाचे

---

१ मौजे लाटापूर हा गांव नीलकंठ मोरेश्वर ह्याना इनाम दिल्यावर आणापा जनार्दन देशाधिकारी प्रांत वाई ह्याना पाठविलेल्या आज्ञापत्राची नक्कलहि उपलब्ध आहे. तिची तारीख १०-९-१६९९ ही आहे.

माईननें नेमून चतू:सिमा करुन भट गोसावि याचे स्वाधीन करणे.

छ १४ माहे रबोलाखर सूहुरसन मया व आलफ.

पं ॥ छ ६ रजब सन सलास मया आलफ[1]

---

क्रमांक : ७९ दि. १५-१०-१६९९

तुमचे शेत आम्ही तुम्हांला परत करू, काळजी नसावी, असे सटवोजी सापा ह्याचे कृष्णाजी जाधव ह्याला पत्र.

श्री

रा॰ कृष्णाजी जाधव पाटील मौजे अतीत यासि सटवोजी सापा पा॰ मौजे मा॰र सु॥ मया अलफ. आम्ही तुमचे इनामाचे सेत केले आहे म्हणून तुम्ही कस्टी अहा. तरी तुम्ही अपली पिके काडून घेऊन तुमचे सेत तुमचे स्वाधीन येथाविभागे करून. तुम्ही जे असल तें अपले समाधान असो देणे. तुझें जे पुरातन सेत जे असेल ते तुझे हवाला करून. हे अपले वडिलाए सत्य असे हे लिहिले.

सही छ १, जमादिलावल.

(पाठीमागे निशाणी नांगर)

---

क्रमांक : ८० दि. २८-११-१६९९

संताजी घोरपडे ह्यांच्या स्वामिसेवेबद्दल रामचंद्र नीळकंठ अमात्य ह्यानी त्याना मिरज प्रांतात बावीस कर्यातीच्या देशमुखीचे इनाम दिले होते. परंतु त्या कर्यातीच्या मूळ देशमुखानी राजाराम महाराजांकडे तक्रार करतांच राजाराम महाराजांनी संताजी घोरपडे ह्यांचे इनाम रद्द केले.

---

१. १५ नोव्हेंबर १७०२.

तालीक

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषक शके २६ प्रमाथी नाम संवत्सर मार्गसीर्ष बहुल द्वितीया भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती (यानी) राजश्री देशाधिकारी वर्तमान भावी प्रांत मिरज यासी

आज्ञा केली यैसिजे. व्यकाजी दादो व आदनाईक सावत व तमाजी नरसिंव्ह व आणाजी आदनाईक देशमुख मामले मोर्तजाबाद उर्फ मिरज यापैकी तमाजी नरसिंव्ह याचा भाऊ नरहरी बलाळ व सिदोजी बिन हरमाजी देशमुख याणी हुजुर येऊन विदीत केले की मामले माार कर्याती बावीस

| | | | |
|---|---|---|---|
| १ का।। तासगाव | १ का।। रुकडी | १ हवेली मिरज | १ का।। बडग |
| १ का।। मने राजुरी | १ का।। इचलकर्जी | १ का।। भिलवडी | १ का।। उदगाव |
| १ का।। आंजनी | १ का।। कवठ येकद | १ का।। कवठ माहाकाल | १ का।। सागली |
| १ का।। भालवणी | १ का।। वीट | १ का।। देसिंग | १ का।। खानापूर |
| १ का।। आष्ट | १ का।। सावर्ड | १ का।। म्हैसाल | १ का।। इसापूर |
| | | १ का।। सिरटी | १ का।। ढालगाव |
| ५ | ५ | ६ | ६ |

येणेप्रमाणे बावीस कर्यातीचे देशमुखीचे वतन पुरातन आमचे. सदरहू चौघा जणाचे पिढी दर पिढी चालत आले आहे. आसे असता संताजी घोरपडे चंदीचे मुकामी फौज घेऊन गेले ते समई स्वामीस

गैरवाका विदीत केले की प्रांत मा।रचे देशमुख मोगलाकडे मिळाले आहेत. स्वामीकडे रुजु होत नाहीत. या करिता स्वामीनी प्रांत मा।रचे देशमुखीचे वतन आपणास अजरामरामत करून दिल्हे पाहिजे. त्यावरून स्वामी याणी सदरहू बावीस कर्यातीचे देशमुखीचे वतन संताजी घोरपडेस देऊन पत्र करून दिल्हे. येसियास आपण पुरातन वतनदार आहो. स्वामीचे पायाची यकनिष्टेने वर्तणुक करितो. स्वामीनी आत:कर्णास आणोन कृपाळू होऊन आपले देशमुखीचे वतन आपणास दुमाला करून चालवावयास आज्ञा केली पाहिजे म्हणोन विदीत केले. त्याजवरून मनास आणिता सदरहू बावीस कर्यातीचे देशमुखी व्यंकाजी दादो व आदनाईक सावत व तमाजी नरसिंव्ह व आणाजी आदनाईक याचे दुमाला केली आसे. तरी तुम्ही हे पत्र पाहून प्रांत माारचे देशमुखीचे वतन याचे स्वाधीन करून पूर्वापार चालत आले आहे त्याप्रमाणे पुढेहि यासी पुत्रपौत्रादी वंशपरंपरा चालवावे. हक लाजिमा इनामती इसाफत इजाफत सुराफत व पालक सालाबाद चालत आले आहे त्या प्रो। चालवून याचे हाते वतनाची सेवा घेत जाणे. संताजी घोरपडे यास वतनाची पत्रे लिहून दिल्ही होती ती दूर जाहली असेत. उपरी घोरपडे याचा वंशपरंपरा वतनास समंध नाही व प्रांत माारचे नाडगौडीचे वतन व्यकाजी दादो व आदनाईक सावत व तमाजी नरसिंव्ह व आणाजी आदनाईक याचे पुरातन पिढी दर पिढी चालत आले आहे त्या प्रो। पुढे वंशपरंपरा याचे वतन यासी चालवून हक व लाजिमा व इनामती व इसाफत व बाजे जे काय असेल त्या प्रो। चालवून यापासून वतनाची सेवा घेत जाणे. या पत्राची तालीक लिहून घेऊन मुख्य पत्र देशमुख माारापासी भोगवटियासी देणे. जाणिजे. निदेश समक्ष. सिक्याचे मोर्तब.

---

क्रमांक : ८१ दि. १९-१२-१६९९

जोतजी कृष्णाजी तुवार देसाई ह्याला मोगलानी पकडून नेले असता खंडणी भरून सुटका भरून घेण्याकरता त्याने आपल्या देशमुखीच्या सहा गावचे वतन लिंगो बापूजी ह्याला विकले होते. ते सदर्हू लिंगो बापूजी याच्या नांवे करावे असे परशराम त्र्यंबक प्रतिनिधी ह्यांचे पत्र.

श्री

तालीक

राजश्री व्यंकाजी कासी सुभेदार व कारकून
व सुभा प्रांत तारळे गोसावी यास

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य सेवक परशराम त्र्यंबक प्रधान नमस्कार. सु॥ मया व अलफ. राजश्री मल्हार नरहरी हे किले सजनगडचे मुकामी दर्शनास आले ते समई विदित केले की जोतजी बिन कृष्णाजी तुवार देसाई तर्फ असडोली यास कोलापूरकर ताम्र याणे कबिलियासहीत धरून नेऊन अटकेमधे ठेविला होता. खंड बांधिला त्याचा तगादा लाविला. देशमुख मारापासी उसूल द्यावया ताकत नाहीसी जाहाली. याब॥ जोतजीने आपले देशमुखी पै॥ गाव ६ बी त॥

| | | | |
|---|---|---|---|
| मौजे सेळोसी | १ | मौजे खेरिवडे | १ |
| मौजे कडव | १ | मौजे बावेली | १ |
| मौजे जरगी | १ | मौजे अणदूर | १ |

येणेप्रमाणे साहा गाव मशरुल लिंगो बापूजी यास विकत दिल्हे. हो ३०० तीनशे घेतले. सदरहू साहा गाव दिल्हे म्हणोन वतंदाराचे

निशाणीनिसी महजरहि करून दिल्हे आहे. लिंगो वापूजीनें महजर आपणास दाखविले. त्याजवरून या गावीची देशमुखी त्याचे दुमाला केली. शेरणी रुो १०० शंभर द्यावयाचा तह केला आहे. तरी स्वामी कृपाळू होऊन सनद सादर केली पाहिजे म्हणून विनंती केली.

त्याजवरून सदरहु गाव लिंगो वापूजीचे दुमाला (सिका) देशमुखी केली असे. शेरणी याचे माथा रुो १५० पेशजी रा मल्हारपंती तह करून हाळी ज्या कागददिल्हे आहेत. येकूण दीड (शे) रुपये राज्याचा वसूल राजश्री मल्हारपंत घेतील. पावलियाचा जाब देतील. त्या प्रा मजरा असे. लिंगो वापूजीच्या हाते देशमुखीची सेवा वंशपरंपरेने घेत जाणे. जोतजी देसाई याची गावगना पटीपछोडी व इनामती असतील त्या प्रा या गावी असतील ते लिंगो बापूजीस देत जाणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र भोगवटीयास परतून देणे. प्रतिवर्षी मूतन पत्राचा अक्षेप करीत नव जाणे. छ ७, रजेब. निदेश समक्ष. जोतजी बिन कृष्णाजी याणे आत्मसंतोषे गोताचे विद्यमाने जरी काही यास साहाची देशमुखी दिल्ही असेल तरी हे खरे चौकशीने मनात आणून कागदपत्र करून देऊन दुमाला करणे आणि याचे पुत्र पौत्री चाळववणे.

मोर्तब असे.

---

**क्रमांक : ८२** **दि. ८-१-१७००**

सिदोजी घोरपडे ह्यानी नरहरभट ह्या नांवाच्या ब्राह्मणास मौजे दटवाद (दत्तवाड) येथे १५ बिघे जमीन इनाम दिली.

श्री

तालीक

वेदमूर्ती राजेश्री नरहर भट बिन सिवराम भट गोत्र काश्यप सूत्र अश्वलायेन सेकीन कसबा सावगाव वास्तवे क्षेत्र करवीर यासी

प्रति सिदोजी घोरपडे वजारतमाब दंडवत. सुा मया आलफ्. तुम्ही भले ब्राह्मण कुटुंबवत्सल. सुविद्या आलेया ब्राम्हणास आन्न उदक सारे दिन नवरात्रात आन्नशांती करितां. तुमचे योगक्षेमाची स्वस्था आसलिया उत्तम. हे जाणून आमचा मोकासा मौजे दटवाद[1] का। इचलकरंजी प्रांत मिरज येथे तुम्हास इनाम बिघे १५ पंधरा करार करून म्हसूल सुधा दिली आसे. तर तुम्ही आमचे कल्यान इछून स्नानसंध्या सेटकर्म आचेरुन तुमचे पौत्रपोत्रादि वौशेपरंपरेने आनभऊन सुखरुप राहाणे. आमच्या वौशात चालवणेविसी कोन्हीहि आंतर करनार नाही हे लिहून दिल्हे.

सही. र॥ छ २७, रजब.

---

क्रमांक : ८३

दि. २५-१-१७००

सिंधुदुर्ग किल्ल्याचे हवालदार मानसिंगराव ह्याना सदहु किल्ल्याचा बंदोबस्त करून आरमारकरी लोकांसह येण्याची आज्ञा.

श्री

राजश्री मानसिंगराव हवालदार जंजिरे सिंधुदुर्ग यास आज्ञा केली ऐसिजे. सु॥ मया व अलफ. जंजिरे मारचे आरमारकरी

---

१ दत्तवाड.

लोक हुजुर पाठऊन देण्याची आज्ञा जाहाली आसे. तरी राजश्री बच्याजी आनंत या समागमे आरमारकरी लोक सत्वर हुजूर पाा देणे. सदरहु तुम्ही जंजिरे माारचा वंदोवस्त करून तुम्हीच लोक घेऊन सत्वर हुजूर येणे. जाणिजे. रा। छ १४, शावान. लेखनसीमा.

विलस
ती लेख
नावधि

---

क्रमांक : ८४ दि. २७–२–१७००

औरंगजेब सातार्‍यास येऊन तीन महिने झाले तरी तिथल्या शिबंदीने त्याची डाळ शिजूं दिली नव्हती. सदर्हु शिबंदीच्या शौर्याचे कौतुक करून परशुराम त्र्यंबक प्रतिनिधी ह्यानी गणसावंत "पंचहजारी" या शिलेदारास लिहिलेले पत्र.

श्री

तालीक

मा। अनाम गण सावत पंचहाजारे हशम याशी परशराम त्र्यंबक प्रधान सु॥ मया अलफ.

श्री आई आदि
पुरुष प्रा श्रीराजा-
राम चरणी हर्ष
निधान त्रिबक
सुत परशराम
मुख प्रधान

आजी औरंगजेब सातारियाच्या पाई येऊन बसला आहे. त्यास तीन महिने जाहाले. त्याणी उपाय मात्र करून डोईफोडी केली आहे. परत त्याचा उपाय तुम्ही चौकीकार गार होऊ दिला नाही. इति मर्दीनसी तडाख देऊन त्याच हात खर्च केले आहे. तरी शाबास तुमची. तुम्ही लौकी निदान कबूल करून ह्या गोष्टी केल्या. येणेकरून तुमची किर्ती काही सामान्य जाहाली नाही. राजश्री––स्वामीस

व आम्हास तुम्ही लौकी बहुत संतोषात पावविले आहे. तुमच्या श्रमाचे सार्थकही श्री च्या दयेकरुन शीघ्र कालच होईल. कोण्हेविशी चिंता तुम्हामध्ये यतच असा कोणेविसी फिकीर न करणे. तुम्हास निदान पडेल तेव्हा तुमच्या जिवास वोपोन देऊन आम्ही आपले जीव वाचऊ हे घडत नाही. यैसी आपला निशा असो देणे. छ १७, रमजान. निदेश समक्ष. मोर्तब असे.

सुरु सुद्र

---

**क्रमांक : ८५** **दि. २३–३–१७००**

पोर्तुगीज युद्धनौकानी मराठ्यांच्या एका नदीत अतिक्रमण केल्याबद्दल परशुराम पंत प्रतिनिधी ह्यानी गोव्याच्या व्हाइसरॉयकडे तक्रार केली होती. त्या तक्रारीला व्हाइसरॉयने पुढील उत्तर धाडले.

" रामराजे ह्यांचे विश्वासू परशुरामपंत ह्यांस :

आपले पत्र मिळाले: झमझिगर[1] नदीत आमच्या युद्धनौकानी प्रवेश केल्याबद्दल आपण जी तक्रार केली आहे ती निराधार आहे. आपण म्हणता की, रामराजे ह्यानी आमच्या राज्याशी सलोख्याचे संबंध ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु ह्या राज्यांतील माझ्या कारकीर्दीत तर अनुभव उलटा आहे.

गेल्या वर्षी आमच्या उत्तरेकडील प्रदेशांतील खेडीं दोनदा लुटण्यात आली. आणि आपल्या जहाजानीहि आमच्या जहाजांवर हल्ले करून तीं लुटली. तीं जहाजे अन्नधान्य घेऊन ह्या शहराकडे येत होती. आणि वर आपण म्हणता की आपण शांततेचे पालन

---

१. डॉ. पांडुरंगराव पिसुर्लेकर संपादीत Assentos do Conselho do Estado मध्ये झमझिगार म्हणजेच 'संकेश्वर' असे म्हटले आहे.

करीत आलों आहोत. मी आपणाला कळवूं इच्छितो की ह्या कुरापती आम्ही चालू देणार नाही. आमच्याशी जर आपणाला सलोख्याचे संबंध ठेवावयाचे असतील तर गेल्या वर्षी लुटण्यात आलेला आमचा माल आम्हांस परत करावा. "

गोवा, २३ मार्च १७००

आंतोनियु लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु

---

क्रमांक : ८६ दि. ३०-३-१७००

यादव शिवदेव ह्याचे वतन सुरळीत चालवावे म्हणून परशराम त्र्यंबक ह्यांचे देशमुख व देशपांडे कसबा कापशी ह्याना पत्र.

श्री

म॥ अनाम देशमूख व देशपांडे क॥ कापसी यास परशराम त्र्यंबक प्रधान उमदेतुलमुलुक सु॥ मया अलफ. मौजे खानवेल क॥ मजकूर येथे यादव सिवदेऊ नाडगौडा यास इनाम ·।· पाव चावर पहिले पासून आहे. तेणेप्रो॥ सुरळीतपणे चालवणे. याचे इनाम यासी कथला न करिता (चालवणे). कौणाचा उपसर्ग लागो न देणे. जाणिजे. छ १९, शैवाल हुजुर मोर्तब असे.

---

क्रमांक : ८७ दि.३०-४-१७००

फोंडयाचा किल्लेदार सय्यद गुलाम इब्राहिम हा भोसल्यांशीं झालेल्या एका लढाईत प्राणांतिक जखमी झाल्याची बातमी गोव्याच्या व्हाइसरॉयला कळली, तेव्हा त्याने त्याला खालील सहानुभूतीपर पत्र पाठविले.

" फोंड्याचे किल्लेदार सय्यद गुलाम इब्राहिम ह्यांस.

भोसल्याशी झालेल्या एका लढाईत आपण प्राणांतिक जखमी झाल्याचे नार्वेच्या किल्लेदाराकडून कळले. ही बातमी ऐकून मला फार वाईट वाटले. तरी हे पत्र मिळताक्षणी आपल्या जखमा गंभीर स्वरुपाच्या आहेत की काय आणि आपणाला औषधांची जरुरी आहे की काय ते त्वरीत कळवावे.

मी नार्वेच्या किल्लेदारास आज्ञा केली आहे की, आपले जे जखमी सैनिक आमच्या हद्दीत येतील त्याना मोगल बादशहाशी असलेल्या आमच्या मैत्रीस अनुसरुन चांगली वागणूक द्यावी."

गोवा, ३० एप्रिल १७००

आंतोनियु लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

---

**क्रमांक : ८८** **दि. ८--५--१७००**

फोंड्याचा मोगल किल्लेदार सय्यद गुलाम इब्राहिम हा सावंतांशी झालेल्या एका लढाईत प्राणांतिक जखमी झाला होता. तो मरण पावल्याची बातमी कळताच गोव्याच्या व्हाइसरॉयने बसलतखान ह्यास दुखवटयाचा संदेश धाडला :

" बसलतखान ह्यांस

आपले पत्र मिळाले. माझ्या पत्रातील मजकूर आपण जाणून घेतला ह्याबद्दल समाधान वाटले. ज्या राजाशी आमची मैत्री आहे त्या मोगल बादशहाचे सहीद[1] हे प्रजाजन असल्याने त्याना मी अटक करणे शक्य नव्हते. फोंड्याच्या किल्लेदारास मदत पाठवून मी आमची मैत्री प्रकट केलीच आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही की,

१. हे कोणाला उद्देशून आहे समजत नाही.

सदर्हु फोंड्याचे किल्लेदार हे भोसल्याशी झालेल्या लढाईत प्राणांतिक जखमी होऊन निधन पावले. ते जखमी झाल्याचे मला कळले तेव्हा मी त्याना पत्र घालून औषधोपचारासाठी इकडे बोलविले होते. परंतु माझे पत्र मिळण्यापूर्वीच त्यांचे देहावसान झाले. ती बातमी ऐकून मला मनस्वी दु:ख झाले. कारण ते एक मोठ्या तोलाचे शिपायीगडी होते. आम्ही आपल्या दु:खात सहभागी आहोत.

आपणाला मदत करण्यास माझ्याकडून कधीच कसुर झालेली नाही. बादशहाना आपण जी माहिती दिलीत त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे.

देव आपले भले करो. "

गोवा, ८ मे १७००

आंतोनियु लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु

---

**क्रमांक : ८९** **दि. १८-५-१७००**

बसलतखान ह्याच्या बंधूस भोसल्यांविरुद्ध मदत करण्याचे आश्वासन गोव्याचा व्हाइसरॉय देतो.

" बसलतखान ह्यांस---

आपले पत्र मिळाले. आपल्या बंधूना खेमसावंत ह्यांचे पारिपत्य करण्यासाठी पाठविले असल्याचे आपल्या पत्रावरून कळले. आपण आमच्यापाशी आपल्या बंधूस मदत करण्याची मागणी केली आहे. आपणाला माहीत आहेच की, आम्ही आपणाला नेहमीच मदत करीत आलो आहोत. आमच्यामधील मैत्रीला अनुसरून या वेळीहि मी

आपणाला मदत करण्याचे बाबतीत मागे राहाणार नाही. त्याबद्दल निश्चित असावे.

देव आपले भले करो "

गोवा, १८ मे १७००

आंतोनियु लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

---

**क्रमांक : ९०** **दि. १८-५-१७००**

दारूगोळयाची मदत पाठवितो म्हणून गोव्याच्या व्हाइसरॉयचे मोगल सरदारास पत्र.

" बसलतखान ह्यांचे बंधू इसाक कातुला ह्यांस—

आपले पत्र मिळाले. आपण अडचणीत असल्याचे वाचून फार वाईट वाटले. बादशहाच्या सैन्यास पुष्कळ कुमक यावी अशी इच्छा करतो. आपल्या मागणीप्रमाणे दियोग मिनेझिश ह्यांच्याकडे दारूगोळा पाठवीत आहे. आपण यशस्वी झालात तर मला आनंद होईल.

देव आपले भले करो "

गोवा, १८ मे १७००

आंतोनियु लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

---

**क्रमांक : ९१** **दि. २१-५-१७००**

मोगलावर संकट आले असता आम्ही त्याना जशी मदत करतो, तशी मदत ते आम्हाला करीत नाहीत. आणि ज्यावेळी त्याना आमच्या मदतीची आवश्यकता नसते तेव्हा ते आम्हाला विसरून जातात, अशी तक्रार गोव्याचा व्हाइसरॉय करतो.

" फोंडयाचे किल्लेदार रसूलखान ह्यांस—

आपले पत्र मिळाले व ते वाचून बादशहाचे सैन्य भोसल्यांचे पारिपत्य करण्यासाठी डिचोलीला येऊन दाखल झाल्याचे कळले. माझ्या हाताशी जी साधनें आहेत त्यानुसार मी ह्या सैन्याला शक्य तेवढी मदत केली आहे आणि यापुढेहि ती करीत राहीन. परंतु अरब लोक जेव्हा आमच्या राज्यावर आक्रमण करतात तेव्हां मोगल राज्यावर संकट आले असतां आम्ही ज्याप्रमाणे त्यांच्या मदतीला जातो, तसे मोगल आमच्या मदतीला येत नाहीत. इतकेच नव्हे, तर मोगल सरदाराना अशा प्रसंगी आम्ही जी मदत करतो त्याची वार्ता बादशहाच्या कानावर घालण्याचे सौजन्य देखील ते दाखवित नाहीत. तरीहि आम्ही बादशहाच्या मैत्रीस अनुसरून त्याच्या सैन्याला मदत करतो. पण ज्यावेळी बादशहाच्या सरदाराना आमच्या मैत्रीची आवश्यकता नसते तेव्हा ते आम्हाला विसरून जातात. "

गोवा, २१ मे १७००

आंतोनियु लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

---

**क्रमांक : ९२** **दि. २८-५-१७००**

बसलतखान नामक मोगल सरदाराच्या भावाने डिचोलीस वेढा घातला होता. पोर्तुगिजांकडून त्याला मदत होत होती. तरीहि त्याने भोसल्यांच्या भयाने वेढा उठवून पळ काढला म्हणून गोव्याचा व्हाईसरॉय फोंडयाच्या किल्लेदारास लिहिलेल्या पत्रांत खेद व्यक्त करतो.

" फोंडयाचे अल्लावरदी बेग बगासी ह्यांस

आपणाला मी बऱ्याच दिवसांमागे लिहिले होते व त्यानंतर सुरतेच्या नबाबाकडून आलेलीं पत्रेहि आपणाकडे रवाना केली होती.

त्याचे उत्तर मला लवकर हवे आहे. कारण पावसाळा सुरू होण्यापूर्वी मला गलबत पाठवून द्यायचे आहे. डिचोलीला वेढा घालून बसलेला बसलतखानाचा भाऊ आपल्या सैन्यासह माघारा गेला असल्याचे कळले. भोसल्याच्या सैन्याने त्याला वेढले होते व अन्नाची टंचाईहि त्याला भासत होती म्हणून त्याने वेढा उठविला असे कळते. मला आपणास कळवायचे आहे की, माझ्या हुकुमानुसार त्याला ह्या शहरातून आणि शहरालगतच्या बेटांतून मदत जात होती. आणि मला विदीत झाले आहे की, ह्या शहरांतील व्यापाऱ्यानीहि त्याला पैशाची मदत केली होती. पुनः त्याने माघार घेईपर्यंत त्याला ह्या राज्यांतून दारुगोळा पाठविण्यात येत होता. फार कशाला, माझे अधिकारी त्याला माझ्या किल्ल्यांतून त्याच्या तोफखान्यासाठी गोळे पोहोचवित होते. आणि हें सर्व मी बादशहाशी असलेली आमची मैत्री आणि शांतता व आपणाशी असलेले माझे मैत्रीचे संबंध ह्यांसाठी केले. मला फार वाईट वाटले ते ह्याबद्दल की, मला न कळविता त्याने माघार घेतली. त्याने माघार घेण्याचे ठरविले असल्याचे जर मला कळविले असते तर मी त्याला त्यापासून परावृत्त केले असते. मी त्याला आणखी मदत पाठविली असती. आणि आपणहि मला त्याविषयी कळविले होते. पण ते एक तासभर देखील थांबले नाहीत. आपण ही हकीकत बादशहाना कळवावी. त्यामुळे मी मदतीच्या बाबतीत हलगर्जीपणा केला नाहीं हें त्यांच्या निदर्शनास येईल. + + + + + + + निःशंक असावे. फोंडा + + + आपण बादशहाचे प्रजानन आहात. ज्या ठिकाणी रहायचे आहे त्या जागेचो निवड करून मागणी करावी. म्हणजे त्वरीत हुकूम काढता येईल."

गोवा, २८ मे १७००

आंतॉनियु गोंसाल्विज लुईज द कामारा कौतिन्यु

क्रमांक : ९३ दि. २–६–१७००

मोगलानी डिचोलीचा वेढा उठविल्याबद्दल गोव्याचा व्हाइसरॉय वसलतखान ह्या मोगल सरदाराला लिहिलेल्या पत्रात विषाद व्यक्त करतो.

"वसालतखान ह्यांस--

आपले दि. २४ मे चे पत्र मिळाले. डिचोली येथील मोगल सैन्याला मदत करण्याची आपण आम्हाला विनंती केली होती. ते सैन्य तिकडे असेपर्यंत आम्ही त्याला आमच्याशी असलेल्या साधनांच्या मर्यादेत मदत केली. परंतु आता असे कळते की, त्या सैन्याने आमच्या नकळत भोसल्यांशी तह करून वेढा उठविला आहे. महान मोगल बादशहांच्या इभ्रतीला कमीपणा आणणारी मोठ्या नामुष्कीची ही गोष्ट आहे. आपण वेढा उठविणार असल्याचे जर मला अगोदर कळले असते तर मी आपणाला तसे न करण्याचा सल्ला दिला असता आणि आपणाला आणखी मदत पाठविली असती. पण ज्या अर्थी आता वेढा उठविण्यात आला आहे व सैन्य निघून गेले आहे आणि पावसाळाहि डोक्यावर आला आहे, त्या अर्थी आता लष्करी हालचाली सुरुं करणे ही कठीण गोष्ट आहे. तथापि एक गोष्ट आपण ध्यानात ठेवावी ती ही की, मोगल बादशहाच्या शत्रूंचा निःपात करण्यास हे राज्य त्याला केव्हांहि मदत करील.

देव आपले भले करो."

गोवा, २ जून १७००

आंतोनियु लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

क्रमांक : ९४ दि. ५-८-१७००

पाटगावच्या जनार्दन भट ह्या विद्वान ब्राह्मणाला दिलेली सनद.

राजश्री जगजीवन बयााज सुभेदार व कारकून वर्तमान व भावी प्र।। कुडाळ गोसावी यास

ी अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य

सेवक मल्हार नरहरी नमस्कार. सुहूर सन इहिदे मया व अलफ. वेदमूर्ती राजश्री जनार्दनभट बिन रामभट आग्नीहोत्री वास्तव्य पेट पाटगाव येही हुजूर येऊन आपले कितेक वर्तमान विदित केले. त्यावरून मनास आणिता हे ब्राह्मण थोर आग्नीहोत्री वेदशास्त्रसंपन्न भगवत-परायण सात्विक स्वधर्माचरणनिष्ठ माहायोग्य महंत वीरक्त. याचे पिते रा।। रामभट म्हणजे प्रसिद्ध आबाल वृद्धासी वारणसी पावेतो जाणेता. आसाधारण त्याची योग्यता. त्याच स्थितीने त्याचे पुत्र जनार्दनभट हेही बहूत वित्पन्न सुसील आग्नीहोत्री. सर्वदा आग्निश्रुषा होऊन सदाचारधर्मी सुखरूप काल भगवद्भक्तीने क्रमून सहकुटुंब सुखरूप यजन याजन अध्ययन आध्यापन करून होते. अलीकडे तांब्राचे उलबण दिवसेदिवस फार जाहले. काल एक प्रकार पडित आला. राजग्रहीहून धर्मादायाचा परामृष प्रतिवर्षी पूर्वी होत होता तो राहिला. आणखी उपाय नाही. तशामध्ये कोणापासी याचक वृत्तीने कांहीं इच्छावे तरी तेही घडोनयाचे वस्तू नये. यैसीयास याचे कुटुंबाचे योगक्षेम चालोन आग्निहोत्र स्तान होय. येणेकरून या राज्याचे कल्याण आहे. याकरिता यास विस्वा दर गोणीस नूतन रूक ८।। आडिका पाटगावीचे जकायतीस घाट हणमंता व घाट धोटगा व रांगणा व बाजार दरवाजा येणेप्रमाणे चारी घाटी विस्वा व नूतन सदरहू आडिका विस्वा करून दिल्हा असे. तरी तुम्ही महालचे कारकुनास व देशमुखास व जकायतीचे कमाविसदारास सांगोन सालदरसाल सदरहू

आडिकाप्रमाणे दर गोणीस परभारे वाणीयाचे निसवतीने भट गोसावी यास प्रविष्ट होय ते करणे. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप करीत नव जाणे. प्रति लेहोन घेओन मुख्य पत्र भट गोसावी या जवळी भोगवटीयास परतून देणे. राजश्री चांदो नारायण याचेही पत्र सन तिसा तिसैन मध्यें होते. भोगवटा चालिला नाही म्हणून हे पत्र करून दिल्हे असे. तरी विलाकुसुर चालवणे. छ ३०, सफर. पैं।। छ. मजकूर.

---

**क्रमांक : ९५** **दि. १२-१२-१७००**

गोव्याच्या व्हाइसरॉयने फोंड्याच्या मोगल सैन्याला जी मदत केली होती तिला मंजुरी मिळावी अशी विनंती तो आपल्या राजास करतो. त्याचप्रमाणे मोगल सैन्याची शत्रूविरुद्धची कारवाई अत्यंत सावकाशीने चालली आहे असेहि तो पत्रात म्हणतो.

" महाराज

फोंड्याच्या नबाबाला आमच्याकडून जी मदत झाली तिला आपण मान्यता द्यावी अशी विनंती प्रस्तुत पत्राचे द्वारा करीत आहे. मोगल बादशहाशी ह्या राज्याची असलेली मैत्री टिकावी म्हणून मदत चालू ठेवित आहे. ज्याअर्थी मोगल अधिकारी युद्ध सावकाशीने चालवित आहेत आणि त्याना खेम सावंत ह्याला अद्याप हुसकून लावता आलेले नाही, तसेच खेडीं ज्या अर्थी शत्रूच्या ताब्यात आहेत, त्या अर्थी निश्चित तपशील मी महाराजाना सादर करू शकत नाही. हरि गावस ह्याला दिलेला शब्द त्याने प्रामाणिकपणे पाळला. महाराजांच्या खजिन्यात दोन हजार पार्दाव भरण्यात आले आहेत. एका कामगिरी-बाबतची ही सूट आहे. ह्या बाबतीत आणखी जे काय घडेल त्याचा

तपशील मी आपणाला सादर करीन. माझ्या बलशाली स्वामीस देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो."

गोवा, १२ डिसेंबर १७००

---

**क्रमांक : ९६** दि. ३०-१२-१७००

मत्याजी इंगवले ह्याचे वडील सिदोजी इंगवले हे सज्जनगडच्या लढाईत मारले गेल्याचा उल्लेख ह्या सनदेत वाहे.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषक शके २७ विक्रमनाम संवत्सर पौष्य शुद्ध प्रतिपदा सहद्वितीया इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपती स्वामी याणी ——————————

| सिका पेशवा | सिका प्रतिनिधि | राजश्री यादवराऊ सिउदेऊ देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रा अजरे यासी आज्ञा केली यसीजे. मा मत्याजी इंगवले नाईक दिमत पाकालय |
|---|---|---|

याणी स्वामीचे सेवेसी विनंती केली की आपले बाप सिदोजी इगवले याणी तीर्थरुप राजश्री कैलासवासी स्वामीची सेवा मनोभावे केली. याकरितां तीर्थरुप राजश्री कैलासवासी स्वामी याजवरी मेहेरबान होऊन कर्यात नूल प्रा अजरे येथें यक चावर जमीन इनाम आजरामरामत करुन दिल्ह होत. त्याप्रा माहाली देशाधिकारी याणी गावगना जमीन नमून देऊन आजिवर चालविले आहे. येसियास अपले बाप स्वामी कार्यावर किले सजनगडी पडला व इनामाचे कागद

होते तेही गलबलेयाचे प्रसगात गेले. पुढे उतरोतर भोगवटा इनामाचा करुन परंपरेने चालला पाहिजे. तरी साहेवी मेहेरवान होऊन नवीन सनद द्यावयास आज्ञा केली पाहिजे म्हणोन. त्याजवरून मनास आणिता सिदोजी इगवले याणी तीर्थरुप राजश्री कैलासवासी स्वामीची सेवा यका आतःकरणें केली. याकरितां त्यास यक चावर इनाम दिल्हे होते. हाली त्याचे लेकराचे लेकरी चालवणे स्वामीस आगत्य. यानिमित्य मताजी इंगवले यावरी स्वामी कृपालु होऊन का नुली पाौ जमीन खरीज हकदार पेषजी सिदोजीस इनाम दिल्ह होत तयासी अजरामरामत करुन दिल्ह असे. तर पेषजी गावगना इनाम चालत आहे त्याजप्राा यासि व याचे वंशपरंपरे चालवणे. दरसाल ताजा सनदेचा हुजूर न करणें. तालीक लहून घेऊन असल सनद भोगवटचास याजवल परतून देणें. जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब.

तारीख २९, रजब, सु।। इहिदे
मया

---

**क्रमांक : ९७** **दि. १९-१-१७०१**

अठराव्या शतकाच्या सुरुवातीला गोव्याच्या व्हाइसरॉयने हिंदुस्थानातील तत्कालीन घडामोडीचा आढावा घेऊन आपल्या राजास पत्र लिहिले. त्यांतील काही परिच्छेदांचे भाषांतर येथे दिले आहे. 'मुसलमानापेक्षा हिंदूंचा शेजार बरा' असे पत्रात म्हटले आहे.

"...... ....................... ...........................

...............................................................

...........मी उत्तरेकडे दोन फ्रिगेटस्, तीन जहाजे आणि चार मचवे पाठवून दिले. ही आरमारी तुकडी चौलच्या बंदरात गेल्या वर्षीच्या

२७ फेब्रुवारीला जाऊन पोहोचली. तिकडून बातमी आली की, साष्टी बेटांत अरबांच्या सात युद्धनौका आल्या असून त्यानी वर्सोवानजिक दोन हजार माणसे उतरविली आहेत. साष्टीची बेटे वसईच्या नियंत्रणाखाली येतात. अरबांनी लगेच वर्सोवा बेटावरील किल्ल्यावर हल्ला चढविला. त्यानी समुद्र किनाऱ्यावरील बरीच खेडीं जाळली व नंतर ते बांद्रेडा येथे गेले. त्या ठिकाणी संघाच्या पाद्र्यांची एक पाठशाळा आहे. अरब हल्लेखोरांचे आगमन होताच पाठशाळेंतील पाद्री व पाठशाळेचे रक्षण करणारे लोक पळून गेले. उत्तरेकडील प्रदेशाचे गव्हर्नर पाद्री व्हाज सोआरिश ह्यानी अरबांचा प्रतिकार करण्यासाठी माणसें गोळा करण्यास प्रारंभ केला. माणसें फारच थोडी होती. कारण पाद्री सोआरिश ह्यानी झंमझिगार नदीवरील संभाजीची खेडीं जाळण्यासाठी सहाशे माणसें पाठविली होती. संभाजीचे लोक व त्यांची गलबतें आमच्या उत्तरेकडील ठाण्याना उपद्रव देत होती. तो उपद्रव बंद पाडावा म्हणून ही मोहीम आखण्यात आली होती. पाद्री सोआरिश ह्यांच्या लोकानी बऱ्याच खेड्यांची व पांच गलबतांची जाळपोळ करून काही माणसें धरून आणली. त्यात बरेच मुसलमान लोकहि होते. आमच्या लोकानी लूटहि आणली. मुसलमान लोक मोगलांचे प्रजाजन असल्याने त्यांची मुक्तता करण्याचा मी हुकूम दिला. अरबानाहि आम्ही चांगलेच शासन केले. तेव्हापासून आजतागायत ते आमच्या उत्तरेकडील प्रदेशाकडे फिरकलेले नाहीत.

अरबांच्या आक्रमणाची बातमी मला ४ मार्चला कळली. त्याबरोबर मी झंमझिगार नदीकडे गलबतें रवाना केली. त्यांचे नेतृत्व दोमिगुश द मासेदु रा + + + ह्यांच्याकडे होते. वारा प्रतिकूल असल्यामुळे त्याना तिकडे लवकर जाता आले नाही. म्हणून मी आमच्या उत्तरेकडील आरमाराचे कॅप्टन फेर्नांव सोद्र पेरैरा यांच्या मदतीला आणखी एक गलबत पाठविले. 'सां ज्योआंव द देऊश्' च्या दिवशी म्हणजे दि. ९ मार्च रोजी अरबांची व आमच्या सैन्याची लढाई

झाली. अरबांची संख्या दोन हजाराहून अधिक होती तर आमच्या सैन्यांत ४०० गोरे आणि ३०० काळे सैनिक होते. लढाई सकाळी सुरू होऊन संध्याकाळी संपली. अरबांची ६०० माणसें ठार होऊन त्यांचा सेनापती मस्कतला पळून गेला. आमचे ६० ठार आणि जखमी झाले. जखमी झालेल्यात कॅप्टन मोर फेर्नाव सोद्र पेरैरा हे एक आहेत. .......................................

... ........ ... ..... बादशहाच्या सरदारांचे अरबांशी सूत आहे. ते आमच्याशीं लढाई करण्याची व सुरतेचे बंदर आमच्या नौकांना बंद करण्याची धमकी देतात. ते बादशहाच्या हुकुमाप्रमाणे वागत नाहीत व त्यामुळे बादशहाशीं आमचा जो तह झालेला आहे त्याचा भंग होतो, ही गोष्ट बादशहाचे कानावर घालण्यासाठी फ्रेइ लुईज द पिएदाद ह्या नावाच्या मिशनऱ्याला आमचा वकील म्हणून बादशहाकडे पाठविले. बादशहाचें व मराठ्यांचे सांप्रत युद्ध चालले असून बादशहा गेल्या पांच महिन्यापासून ज्या ठिकाणी तळ देऊन आहेत तेथें हा वकील त्याना जाऊन भेटला. बादशहाचे छावणीत त्याचे चांगले स्वागत झाले. ... .. ..... .. ..... ........ .. .....

खोरजुवे बेट आम्हाला देण्याचे बादशहाचे फर्मान निघाल्यावर ते खाली करण्याबद्दल मी खेम सावंत ह्यांच्याकडे मागणी करणार आहे. खेम सावंतानी बादशहाविरुद्ध बंडखोरी करून हे बेट बळकावले आहे. हे बेट आमच्या बार्देश प्रांताच्या जवळ असल्याने आम्हाला तें उपयुक्त आहे. त्याचें दहा हजार अश्रफांचे उत्पन्न तूर्त येतें. पुढें हें उत्पन्न वाढू शकेल.

बंडखोर खेम सावंत ह्यानी नार्वेच्या किल्ल्यासमोर एक वखार उघडली असून आमचे जे प्रजाजन त्यांच्या हद्दीत गवत व लांकडे आणण्याकरता जातात त्यांना ते त्याबद्दल पैसे भरावयास लावतात. वखारीच्या जागी कदाचित ते एक किल्ला बांधण्याची शक्यता होती

म्हणून ती वखार पाडून टाकण्याची मी त्यांच्याकडे मागणी केली आणि त्यानी जर ती पाडून टाकली नाही तर ती बळजवरीने मी पाडून टाकीन अशी त्याना धमकी दिली. तें पाहून त्यानी वखार हलबिली व त्या जागीं वखार उभारणार नाही असे आम्हाला आश्वासन दिले.

............... .. ................ . ..... ... ......

..........चार वर्षामागे फोंड्याच्या मोगल सुभेदाराने आमच्या बार्देश प्रांताच्या हद्दीवर एक किल्ला बांधून सिद्दी अबदुल ह्या नावाच्या मुसलमानाची तेथें किल्लेदार म्हणून नेमणूक केली. हा किल्लेदार गोणीच्या बैलावर भरमसाट कर वसूल करीत असे. माझे इकडे आगमन झाल्यानंतर काही महिन्यानी खेम सावंत भोसले ह्यानी मोगलांविरुद्ध उठाव केला. आमच्याशिवाय त्याना आणखी कुणाकडून अन्नाची बेगमी मिळत नसे. परंतु ज्या वाटेने त्याना आमच्याकडून अन्नधान्य आणि इतर वस्तु मिळत असत त्या वाटेवर हा किल्ला होता. तो आमच्या हद्दीच्या शेजारी असल्याने आम्हाला उपद्रवकारक होता. मी त्या किल्ल्याच्या किल्लेदारास कळविलें कीं, तो किल्ला जर खेम सावंत ह्यानी घेतला तर त्याचा आम्हाला आणि तुम्हालाहि उपद्रव होईल. म्हणून तो पाडून टाकण्यास आपण आपल्या वरीष्ठाना प्रवृत्त करावे. मुसलमान किल्लेदारास माझें म्हणणे पटले. त्याने तो किल्ला पाडून टाकला. अशा रीतीने रस्ता मोकळा झाला. त्यामुळे खेम सावंत भोसले ह्याना मोगल बादशहाचे साखळी व डिचोली हे दोन्ही प्रांत घेणे शक्य झाले. आता आमच्या राज्याला चांगला शेजार लाभला आहे. मोगलानी आमच्या शेजारी येऊ नये म्हणून त्यांच्या मार्गात हा चांगला अडथळा आहे. ते चांगले शेजारी नव्हते. मुसल-मानापेक्षां हिंदूंचा शेजार बरा असे आम्हाला वाटते. आम्ही जाहीरपणे मोगलाना व आतून खेम सावंताना मदत करतो. अशा रीतीने गेल्या

दोन वर्षांपासून ह्या राज्यांत शांतता नांदू देण्यास मी यश संपादन केले आहे. दोघेहि आमच्याशी कृतज्ञतेने वागतात."

गोवा, १९ जानेवारी १७०१

---

**क्रमांक : ९८** **दि. १४–२–१७०१**

गोव्यातील काही देसाई इनामदाराकडून मोगल प्रदेशाला उपद्रव होत होता सर्व्हू देसायांशी तडजोड करण्याचे काम मोगल अधिकाऱ्यानी पोर्तुगिजांवर सोपविले होते. त्याचा उल्लेख व्हाइसरॉयने बसालत खान ह्या मोगल सरदाराला लिहिल्या पत्रात आहे.

" बसालत खान ह्यांस

आपणास चांगले आरोग्य इच्छितो. देसायांकडून बादशहाच्या प्रदेशाला उपद्रव होऊ नये म्हणून त्यांच्याशी तडजोड करण्याच्या कामात मी सांप्रत गुंतलो आहे. बोलणी संपल्यावर तहाचा मसुदा मी आपणाकडे पाठवून देईन. मसुदा आपणाला अनुकुल असाच असेल अशी आशा आहे. ह्या पत्राबरोबर आपणाकडे बादशहाचा परवाना पाठवित आहे. तो मी बादशहांकडे आमच्या राज्यासाठी मागितला होता. खोरजुवे बेटासंबंधीची माहिती पाठविण्याची आज्ञा बादशहानी तुम्हाला परवान्यामध्यें केली आहे. हे बेट अजून खेम सावंत भोसले ह्यांच्या ताब्यात आहे. तिकडे एक बांध उभारण्याचा माझा विचार आहे. त्याचा आपणा दोघांच्याहि राज्याना उपयोग होईल. पण त्यासाठी आपला शेजार चांगला असला पाहिजे. परवान्यावर आवश्यक ती माहिती लिहून आपण तो पाठविल्यावांचून राहाणार नाही ह्याची

मला खात्री आहे. पत्रोत्तराची वाट पाहात आहे. परवाना फर्माना-साठी बादशहाकडे पाठवायचा आहे."

गोवा, १४ फेब्रुवारी १७०१
आंतॉनियु लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

---

**क्रमांक : ९९** **दि. २७-५-१७०१**

मौनी बावा ह्यांच्या का पाटगांवच्या मठास मौजे कोडोसी तर्फ खानापूर हा गांव इनाम देण्यांत आला.

राजश्री भानजी नीळकंठ सुभेदार व कारकून हाल व इस्तकबाल प्रांत तारळे गोसावी यासी——

श्री अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य सेवक रामचंद्र नीलकंठ नमस्कार. सुहूर सन इसने मया अलफ. श्री मोनी बावाचा मट कसबे पाटगावी आहे. तेथील आधीपत्यास गुरुभक्त परायेण तूर्तगिरी बावा आहेती. त्यास मठी अतीत आभ्यागत येतो. त्यास आंन द्यावे लागते व श्रीच्या महोछावास खर्च लागतो. तो चालिला पाहिजे. हे धर्मकृत्य आहे. धर्म संस्थापन झालियाने राज्यास वृद्धी आहे. याकरिता नूतन इनाम मौजे कोडोसी तर्फ खानापूर हा गांव (कुलबाब कुलकानु दिला इ. इ.)

छ २९, जिल्हेज.

---

**क्रमांक : १००** **दि. २३–७–१७०१**

पाटगाव येथील मठाचे इनाम निर्वेध चालवावे म्हणून छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे आज्ञापत्र.

मोनीबावा

स्वस्ति श्री राज्याभिषक शके २८ वृशनाम संवत्सरे आषाढ वहुल चतुर्दशी सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शिव छेत्रपति याणी राजश्री देशाधिकारी प्रांत तारळे यास आज्ञा केली येसीजे. श्री ________ याचा मठ व समाधीस्थल कसबे पाटगाव आहे. तेथे अतीत आभ्यगत तडो तापडो येत असताहेत. त्याचा भंडारीयास तीनशे होनाच्या येवजास मौजे वासनोली ता॥ खानापूर हा गाव गुरूभक्त परायण तूर्तगिरी गोसावी याकडे तीर्थरूप कैलासवासी स्वामीने दिल्हा आहे. यैशास तेथील बिलाकुसुर तूर्तगिरी गोसावी याकडे पावत नाही म्हणोन विदित जाले. त्यावरून हे आज्ञापत्र सादर केले असें. तरी तुम्ही हे जाणून गोसावी याकडील येवजास मौजे मजकूर दिल्हे आहे ते कैलासवासी स्वामीचे सनदेप्रमाणे ब्रिलाकुसुर चालवणे. या गावास कोन्हाचा उपसर्ग न लागे. येवज बिलाकुसुर मटास पावे येसी गोष्टी करणे. या पत्राची तालीक लेहून घेऊन हे पत्र गोसावी याजवळ परतोन देणे. जाणिजे. लेखनालंकार.

---

**क्रमांक : १०१** **दि. २५–७–१७०१**

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे तूर्तगिरी गोसावी, पाटगाव ह्याना मठाच्या इनामाबाबत पत्र.

मोनीबावा

श्रीभजनपरायण तपोनिधि तूर्तगिरी गोसावी यास

प्रति राजश्री राजा शिव छत्रपति. उपरी तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ठ जाहाले. लेखनार्थ अवगत जाहाला. श्री चा मट

समाधीस्थल कसबे पाटगावी आहे. त्यास कैलासवासी स्वामीनी इनाम खेडी दिल्ही होती ते अलीकडे चालत नाही. त्यास राजश्री रामचंद्रपंत पंडित आमात्य येथे आले होते त्यास सविस्तर वर्तमान सांगितले. त्याणी मनास आणून पूर्वील खेडियांचे ताकीद रोखे दिल्हे व नूतन इनाम मौजे कोडोसी ताा खानापूर हा गाव दिल्हा. त्यास श्री स इनाम चालोन मठी माहोत्सव व अन्नदान सांग चालिले पाहिजे. यास्तव आतीत स्वामी समीप पाठविले आहेती. स्वामीने सनदा करून द्यावया आज्ञा केली पाहिजे म्हणोन लिहिले. येसीयास श्री स कैलासवासी स्वामीनी गाव व इनाम दिल्हे आहेत. ते चालवणे व पुढे श्री ची ऊर्जा आविछिन चालवणे हे स्वामीस बहुत आवश्यक. येदनिमित्य पूर्वील इनामाच्या सनदांच्या तालिका पाठविल्या होत्या त्याप्रमाणे हाली सनदा सादर केल्या आहेती व मौजे कोडोसी हा गाव नूतन इनाम करार केला आहे. त्याप्रमाणे माहालचे कारकून इनाम चालवितील. तरी तुम्ही तेथील येवज आणऊन श्री चा महोत्साव व मठी आनंदान सांग चालवणे. स्वामीकारणे श्री चा प्रसाद व वस्त्र पाठविले ते प्रविष्ठ जाहाले. हाली तुम्हास सेला १ येक व समाधिवरी घालावयास सेला १ येक येकून दोनी सनगे पाठविली आहे. ती घेणे. जाणिजे. छ २९ सफर[1]. बहूत काय लिहिणे.

---

**क्रमांक : १०२** **दि. ३०-७-१७०१**

मौजे करे हा गाव गिरजोजी यादव ह्यांच्या वतनाचा असतां चांदजी पाटणकर हा त्या गावाबाबत तंटा करतो असें कळते. तरी चांदजी पाटणकर ह्याला तंटा करूं नको म्हणून सांगावे, अशी छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांची नामजाद प्रांत कऱ्हाड ह्यास आज्ञा.

---

१. क्रमांक ९९ चे पत्र अशाच मजकुराचे असल्याने छ २९ सफर ही तारीख ह्याच वर्षाची (इसने मया व अलफ) धरली आहे.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषक शके २८ वृषनाम संवत्सरे श्रावण शुध सप्तमी सौम्यवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी राजमान्य राजश्री त्रिवक कृष्ण नामजाद प्रांत कराड यास आज्ञा केली ऐसीजे. मौजे करे प्रांत मजकूर हा गाव र।। गिरजोजी यादव देशमुख प्रांत मजकूर याचे देशमुखीचा आहे. त्यासी चांदजी पाटणकर कटकट करितात म्हणोन हुजुर विदित जाले. तरी त्यास कथला करावया काय गरज आहे. हाली चांदजी पाटणकरास आज्ञापत्र सादर केले असे. तुम्ही त्यास सांगोन त्याचे देशमुखीच्या हकासी कथला करूं न देणें. जाणिजे. बहुत काय लिहिणे.

मर्या<br>
देयं विरा<br>
जते

---

**क्रमांक : १०३** **दि. २-१२-१७०१**

गोव्याच्या व्हाइसरॉयने झुजे द सिल्व्हा ह्या नावाच्या ख्रिस्ताच्या संघातील एका पाद्र्याला मोगल बादशहाकडे पाठविले होते. व्हाइसरॉयने त्याला ज्या सूचना केल्या त्या पुढीलप्रमाणे आहेत :

'सोबत पाठवित असलेल्या स्मरणिकेतील भेटी आपण बादशहाला सादर कराव्या.

आपण बादशहाला विनंति करावी की, आमच्या उत्तरेकडील प्रवेशाच्या सीमेलगत बादशहाचे जे नबाब आणि सेनाधिकारी आहेत, त्याना त्याने आज्ञा करावी की, त्यानी आंग्रे व कोळी राजा ह्याना मदत करू नये. कारण, आंग्रे आणि कोळी राजा हे पुष्कळ चोऱ्या-

मान्या करतात. मी बादशहाला जे पत्र लिहित आहे त्यात हे नमूद केले आहे.

बादशहाने आंग्रे, सिद्दी व कोळीराजा ह्या तिघाना शासन करावे म्हणून बादशहाची मर्जी संपादन करावी. ह्या कामी आपणाला पाद्री ज्युआंव आंब्रेव व ज्युलियाना दिआश दा कॉश्त ह्या दोघांची मदत होईल. त्या दोघाना जी पत्रे जात आहेत ती त्याना द्यावी.

आंग्रे व कोळी राजा ह्या दोघाना शासन व्हावे म्हणून आपण शक्य तो प्रयत्न करावा. त्याची कारणे आपणाला अज्ञात नाहीत. कोळी राजाने आमच्या उत्तरेकडील प्रदेशांतील खेड्यांत आक्रमण सुरू केले आहे. तसेच त्याने चौथिया राजाचा मुलुख जिंकल्याने त्याच्या सामर्थ्यांत वाढ झाली आहे.

आंग्र्याविषयीहि आपण मोगल बादशहाला फितवावे. त्याने मराठ्यांच्या राजाशीं मैत्री जुळविली आहे व मराठ्यांच्या राणीचे मांडलिकत्व त्याने स्वीकारले आहे हें आपण बादशहाच्या निदर्शनास आणावे. सदर्हू राणीने त्याला आंतेकेरी येथें एक किल्ला दिला आहे हेहि आपण बादशहाच्या कानावर घालावे. वगैरे."

गोवा, २ डिसेंबर १७०१

व्हाश्कु फेर्नांदिश द सेझर मिनेझिश

---

इ. स. १७०१–०२ (?)

**क्रमांक : १०४**

वाईचे सुरेराव पिसाळ व गिरजोजी यादव ह्या दोघांमध्यें तीन गावच्या गुरांसंबंधी वाद निर्माण झाला होता. त्या बाबतचे हे पत्र आहे.

श्री

राजश्री गिरजोजी यादव देसमुख ताा उंबरज व तारगाव
प।। कऱ्हाड गोसावी यासी--

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री ——— स्नेहांकित

सुरेराऊ पिसाळ देसमुख प।। वाई रामराम विनंनो. उपरी तुम्ही आपले देसमुखाचे गाव म्हणऊन गुरे अणिली. गावगना वी त।। ——— मौजे कडेगाऊ मौजे अहेरी व चिमणगाऊ हे तिन्ही गाऊ आपले म्हणऊन गुरे आणिली. यैसियास सदरहू ती गावीचे पाटील व बारा बलुते अणऊन किले सातारियास प्रतिपदा दिपवाळीची जालियावरी आपण येऊन तुम्हीही येणे. तुम्हास व आम्हास जे गोत सांगेल त्याप्रमाणे तुम्ही व आम्ही वर्तणूक करूनु. प्रस्तुत गुरे आणिली ती आपले सांभाळी केली. ते आपणास पावली. दुपवाळी जालियावरी आपण येऊनु. न यो तरी गोताचे गुन्हेगार. वहुत काय लिहिणे. छ २३ रबिलाखर.

(पाठीमागे शिक्का)

---

**क्रमांक : १०५** **दि. ४-१-१७०२**

मराठ्यानी आमच्या उत्तरेकडील प्रदेशाच्या गव्हर्नरकडे तहाचा प्रस्ताव धाडला आहे. त्याने युद्धबंदी केली आहे. परंतु आम्ही मराठ्यांशी तह केला, तर मोगल बादशहाचा आमच्यावर रोष होईल. तथापि मराठ्यांशी आमचा तह झाला, तर त्यांच्याकडून आमच्या प्रदेशावर होणारे हल्ले थांबतील व आमची नुकसानी टळेल, असे गोव्याचा व्हाइसरॉय आपल्या राजास लिहितो.

" महाराज

गेल्या वर्षी आमच्या उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती पेद्रु व्हाज

सोआरिश बार्सेलार ह्यांच्याकडे शिवाजीने[1] दूत पाठवून तहाचा प्रस्ताव सादर केला. सेनापतीनी तहास नकार दिला नाही. त्यानी गोळीबार बंद करून मराठ्यानाहि गोळीबार बंदी करावयास लावली. त्यानी त्याना सांगितले की व्हाइसरॉयचा निर्णय कळेपर्यंत मी युद्ध बंद ठेवतो. नंतर बातम्या आल्या की, उत्तरेकडील सेनापतीनी आपल्या बुद्धीने मराठ्यांशी तह केला आहे. ही वार्ता जर बादशहाला कळली तर आपल्या शत्रूशी आम्ही तह केला म्हणून त्याचा आमच्यावर रोष होईल. परंतु वस्तुस्थिति अशी आहे की, हा तह आमच्या फायद्याचा आहे. त्याचे कारण हे की, मराठ्यांकडून आमच्या प्रदेशावर जे वारंवार हल्ले होतात ते बंद होतील. तसेंच आमच्या प्रदेशांत शिरून ते ज्या चोऱ्यामाऱ्या करतात व आमच्या नौकायनाला उपद्रव देतात त्याला हा तह झाला तर आळा बसेल.

माझ्या बलाढ्य स्वामीस देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो."

गोवा, ४ जानेवारी १७०२

---

**क्रमांक : १०६** **दि. १२-१-१७०२**

हरदळवी ह्यानी धोंडो भास्कर ह्यांचे बरोबर स्वामी कार्य केल्याबद्दल परशरामपंत प्रतिनिधि ह्यांनी त्यांना व त्यांच्या इतर लोकाना दिलेला सरंजाम.

श्री

तालीक

श्री आई आ
दि पुरुष श्रीराजा
शिवछत्रपतीस्वामि
कृपानिधि तस्य परश
राम त्र्यंबक प्रतिनिधि

---

१ जुन्या इंग्रजी आणि पोर्तुगीज कागदपत्रात "शिवाजी", "शिवाजीस" (Sivagis) हे संबोधन "मराठे" या अर्थाने वापरलेले आढळते.

पत्र वेतन : लकोजी सुभा हरदळवी पदात पंचहजारी चाकऱ्या सुहूरसन इसने मया व अलफ. याहि धोंडो भास्कर सभासद सेवक राजमंडळ या बराबरी राहून स्वामीकार्य करावयाची उमेद धरिली आहे. याकरिता राजश्री परशराम पंडित प्रतिनिधी कृपाळू होऊन जदीद[1] लोकाचो सरंजामो केलो दखोल चाकर सालिना होन पादशाई

१६५१

ये।। सोळासे येकावन होन प।। रास

तपसील

खासा हजारो

| | |
|---|---|
| ४०० | खासा हरदळवी पंच्यहजारी |
| १२५ | हिरोजी दळवी जु।।[2] |
| १२५ | येसजी दळवी जु।। |
| ३६ | कृष्णाजी सावंत नाईक |
| ४८ | राघोजी कदम धुंदी |
| ३६ | गुणाजी कदम धुंदी |
| ३६ | कानाजी घडसी |
| २४ | दताजी कदम धुंदी |
| ४८ | बाबाजी वालकर धुंदी |
| ३६ | दताजी दळवी |
| ४८ | मदाजी पवार धुंदी |
| १२५ | रामजी दळवी जु।। |
| ३६ | तानजी तळेकर |
| ४८ | हरजी पवार |
| ४८ | सोनजी हळचा |
| १२१९ | १५ |

सुभा तुळाजी आरगी

| | |
|---|---|
| ३०० | खासा हजारी |
| ४८ | हिरोजी चवकर |
| २४ | माहादजी कदम |
| ३६ | रामजी कानडा |
| २४ | हिरोजी चवद |
| ४३२ | |

---

१ नवीन;

२ जु।। = जुमलेदार.

येकूण आसामी वीस यास तैनात होन पादशाई सोळासे येकावन रास केले असत. इ।। छ मारापासून वजावटीस पडलाप्रमाणे वजा होऊन उक हक तहप्रमाणे पावत जाईल. तैनातीचे रवश[1]प्रमाणे चाकर ठेऊन हजीर कराल ते तेरिखेपासून चाकराचा हक पावत जाईल. जाणिजे निदेश समक्ष.

मोर्तब.

तेरीख २४ साबान.

---

**क्रमांक : १०७** **दि. १३–२–१७०२**

पोर्तुगालचा राजा गोव्याच्या व्हाइसरॉयला लिहितो कीं, त्याने गोळीबार बंद करून मराठ्यांना तटस्थ ठेवण्याचें जे धोरण अवलंबिले तें स्तुत्य आहे. तो म्हणतो कीं, हें धोरण पुढे चालू ठेवावे. पण मराठ्याशीं तह करूं नये. म्हणजे संधि सांपडतांच त्यांचा नाश करता येईल.

" राजा हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयला आपली सदिच्छा पाठवित आहे. आपले दि. १२ डिसेंबर १७०० चे पत्र पाहिले.

चौल समोरील ज्या दोन छोट्या बेटांवरून मराठ्यांचा जो उपद्रव त्या शहराच्या रहिवाश्याना होत होता तो टाळण्यासाठीं आपण जो पवित्रा घेतला त्याचा तपशील निदर्शनास आला. मराठे आपणाशीं तहाची मागणी करीत आहेत, पण आपण त्यांच्याशीं तह केला नाही. मात्र त्याना तटस्थ ठेवून उपरिनिर्दिष्ट शहराच्या रहिवाश्यांचा उपद्रव टाळला आहे. माझे असे मत आहे कीं, मराठ्यानी आपणाकडे तहाची मागणी केली असता आपण त्याच्याशी तह केला नाही, पण त्याना तटस्थ ठेवलेंत हें चांगले केलेत. आपण त्याना सदहूं बेटांवरून हुसकून

---

१ रवेश : चाल, वहिवाट.

लावूं शकत नाही. परंतु संधि सांपडली तर ती मोहीम आपणाला पार पाडतां येईल हे लक्षांत ठेवून आपण त्याना आणखी काही काळ तटस्थ राहाण्यास भाग पाडावें. म्हणजे ह्या राज्याची आतापर्यंत अतोनात हानि करणाऱ्या त्या शत्रूचा नाश करता येईल."

लिस्बन, १३ फेब्रुवारी १७०२
राजा

---

**क्रमांक : १०८** **दि. १३-२-१७०२**

खेम सावंत भोसले ह्यांच्याविरुद्ध फोंड्याच्या मोगल नबाबाला पोर्तुगीजांकडून जी मदत होत होती, ती चालू ठेवावी, असे पोर्तुगालचा राजा गोव्याच्या व्हाइसरॉयला लिहितो.

" राजा हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयला आपली सदिच्छा पाठवीत आहे.

दि. १२ डिसेंबर १७०० चे पत्र माझ्या अवलोकनात आले. आपणाला केलेल्या आज्ञेप्रमाणे आपण खेमसावंत भोसले ह्याच्याविरुद्ध फोंड्याच्या नबाबाला मदत करीत आहात हे कळले. मला आपणास सांगावेसे वाटते कीं आपण ही मदत चालू ठेवावी."

लिस्बन, १३ फेब्रुवारी १७०२

राजा

---

**क्रमांक : १०९** **दि. १४-२-१७०२**

आंजेदिव बेटानजीक मराठ्यांचे एक जहाज बुडाले होते. त्याबाबत छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी गोव्याच्या व्हाइसरॉयला लिहिले असतां, त्यांच्या जागी राज्यकारभार पाहात असलेल्या हंगामी गव्हर्नरने छत्रपती शिवाजी ह्याना कळविले कीं, सदहू नौकेवरील लोकाना मुक्त करण्यात येईल.

" शिवाजी राजे ह्याना

व्हाइसरॉयना पाठविलेले आपले पत्र मिळाले. मी त्यांचे जागी राज्यकारभार पाहात आहे. आपल्या पत्रात आंजेदिव बेटानजिक बुडालेल्या जहाजासंबंधी मजकूर आहे. हे जहाज त्याच्यावरील सर्व सामानासह बुडाले आहे. ही नौका बुडाल्याने आपल्या मंत्र्याना जो ताप झाला तत्संबंधी आमच्या भावना काय आहेत तें आपल्या निदर्शनास आणण्यास मी असमर्थ आहे. आपणाशी असलेली आमची चांगली मैत्री लक्षांत घेऊन सदर्हू जहाजावरील लोकांची मुक्तता करण्यात येत आहे. "

आर्चबिशप प्रिमाज
दों व्हास्कु लुईज कौतिन्यु.

---

क्रमांक : ११० दि. २५–२–१७०२

पोर्तुगिजांचे एक जहाज वाईट हवेमुळे मेलुंदी बंदरात शिरले होते. त्याला अटक करण्यात आली. त्याची मुक्तता करावी अशी विनंति गोव्याचा हंगामी गव्हर्नर जनरल मेलुंदीचे सुभेदार बुऱ्हाणजी मोहिते ह्याना करतो.

मेलुंदीचे[1] सुभेदार बुऱ्हाणजी मोहिते ह्यांस

आपले पत्र मिळाले. त्यात आपल्या आरोग्याची व आपल्या यशाची बातमी आहे. आमच्याकडील आपले जुने संबंध आणि मैत्री चालू रहावी अशी इच्छा आपण पत्रात व्यक्त केली आहे. आपणाला आमच्याकडून एकाद्या गोष्टीची आवश्यकता भासल्यास आम्हास

---

१ डॉ. पांडुरंगराव पिसुर्लेकर संपादीत Assentos do Conselho do Estado मध्यें Mellundi ( Malwan ) असें म्हटलें आहे.

नेहमी प्रमाणे लिहावे. परशुराम पंडीत ह्यांचेकडून जो मनुष्य इकडे आला होता त्याला इकडे अनिर्बंधपणे आम्ही हिंडू फिरू दिले. त्याची रवानगी आम्ही केली आहे.

ज्या मचव्याची वातमी आपल्या पत्रात आहे, तो आमचा आहे. तो आपल्या बंदरात केवळ वाईट हवेमुळेंच गेला असे नव्हे, तर आपणाशी आमची मैत्री आहे म्हणूनहि गेला. आपण तो मचवा मुक्त करून आमच्या मैत्रीला उजाळा द्यावा. त्याच्यावरील कोणतीच वस्तु आपण काढून घेऊं नये. कारण तें मैत्रीच्या विरुद्ध आहे.

आपल्या पत्रात आपण आमच्याकडे वकील पाठविण्यासंबंधी लिहिले आहे. आम्ही त्याचे आनंदाने स्वागत करू. परंतु सांप्रत आम्हाला वेळ नाही. आम्ही सुरतेला एक मोठे आरमार पाठविण्याच्या गडबडीत आहोत. सुरतेहून हे आरमार नंतर मस्कतला जाईल. तेथे इराणच्या राजाच्या शत्रूचा समाचार घेण्यासाठी जे शाही आरमार तळ देऊन राहिले आहे, त्याला आमचे हे आरमार जाऊन मिळणार आहे. हे काम आटोपल्यावर आपण आम्हाला आपल्या वकिलासंबंधी लिहावे. आपण आमच्या जवळच असल्या कारणे आपणाला त्याबाबत सवडीने लिहिता येईल. आपणाला आमच्याकडे वकील पाठविता येईल. आम्ही त्याचे आनंदाने स्वागत करू. हे पत्र सैनिक फ्रान्सिस्कु द सिल्वा व गुणाजी अंताजी ह्या दोघांबरोबर पाठवित आहे. ते आपणाला आमची मैत्री कळतीलच.

गोवा, २५ फेब्रुवारी १७०२

आर्च बिशप

दों व्हास्कु लुईज कौतिन्यु.

क्रमांक : १११ दि. २८-२-१७०२

आंबा घाटात शत्रूशी लढाई केल्याबद्दल परशरामपंत प्रतिनिधी ह्यांचे हरदळवी ह्याना शाबासकी देणारे पत्र.

श्री

तालीक

अनाम हरदळी यासी परशराम त्र्यंबक प्रतिनिधि सु॥ इसने मया व अलफ. तुम्ही हमेशा राजश्री धोंडो भास्कर याजबरोबर राहोन स्वारी सिकारीकरिता सांप्रत आंब्याघाटी जाऊन गलिमासी मारामारी केली. यक उंठही जातीनिसी पाडाव करून आणिले. हे मशारनिल्हेचे लिहिल्यावरून तुमचा मजुरा जाहला. या उपरीही मशारनिलेचे आज्ञेत वर्तोन स्वामी सेवेसी अंतर न कर्णे. तुमचा मजुरा होईल. जाणिजे. छ ११ सवाल. निदेश समक्ष. सिक्याचे मोर्तब.

राजते
लेखना
वधी

---

क्रमांक : ११२ दि. ९-३-१७०२

मेलुंडीच्या बंदरात पोर्तुगीजांचे एक जहाज अटक करून ठेवण्यात आले होते. त्यांची मुक्तता करावी, अशी विनंती गोव्याचा हंगामी गव्हर्नर जनरल बुऱ्हाणजी मोहिते ह्याना करतो.

" मेलुंडीचे सुभेदार ह्याना

आपले पत्र मिळाले. मेलुंडीच्या बंदरात आमचे जे जहाज

अडवून ठेवण्यात आले आहे, त्याची मुक्तता करावी म्हणून आम्ही आपणाला जे पत्र धाडले होते त्याचे हे उत्तर आहे. सदहूं जहाजावर त्याच्या संरक्षणासाठी जे सामान आणि दारुगोळा होता त्याला हात न लावता त्याची मुक्तता करावी अशी आम्ही आपणाला विनंती केली होती. आपण तें मान्य केले आहे. तरी त्या जहाजाची दुरुस्ती संपल्यावर ते मुक्त करावे. काही दिवसामागे गोव्याच्या बंदरात मराठ्यांचे[१] जे एक जहाज आले होते, त्या जहाजाला मिळालेली चांगली वागणूक लक्षात घेऊन आपणहि आमच्या जहाजाला चांगली वागणूक द्याल अशी आशा आहे. मराठ्यांच्या जहाजाला आमच्याकडून चांगली वागणूक मिळाली हें आपणाला कळलेच आहे."

गोवा, ९ मार्च १७०२

आर्चबिशप प्रिमाज
दों व्हास्कु लुईज कौतिन्यु.

---

**क्रमांक : ११३** **दि. १६-३-१७०२**

**धोंडो भास्कर ह्यांच्या बरोबर राहून असेच स्वामीकार्य करावे म्हणून छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे आज्ञापत्र.**

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २८ वृशानाम सवसरे फाल्गुन

---

१: मूळात "शिवाजीचे जहाज" असा शब्दप्रयोग आहे. पूर्वी म्हटल्याप्रमाणे "शिवाजी" हे मराठादर्शक सर्वनाम आहे.

श्री राजाशि
व नरपती हर्ष
नीधान मोरे
श्वरसुत नील
कंठ प्रधान.

श्री आईभा
दि पुरुष श्री
राजा शिवछत्र
पती स्वामी कृपा
नीधी तस्य परशराम
त्रिबक प्रतिनीधी.

बहुल चतुर्दशी इंदुवासरे क्षत्रीये कुलावतंस श्रीराजा सिव छत्रपति याणी हर दळवी यासी आज्ञा केली यैसीजे. तुम्ही रा। धोंडो भास्कर या समागमे राहून स्वारी शिकारी स्वामीकार्य करता हे वर्तमान मशारनिलेने हुजुर लिहिले. त्याजवरून तुमचे सेवेचा मजुरा जाला. पुढेही येच रितीने स्वामीकार्य करून आपला चाकरीचा मजुरा करून घेणे. म्हणजे स्वामी तुमचे ऊर्जित करतील. निदेश समक्ष.

सिक्याचे मोर्तब
रुजु सुरुनिविस

---

**क्रमांक : ११४** **दि. २२–३–१७०२**

महालक्ष्मीच्या देवस्थानाला लाटी, सावगांव व सदलगे ह्या कर्यातींतील उत्पन्न होते. पण ते देवस्थानाकडे जात नसल्याची तक्रार बसव प्रभू देसाई ह्यांचेकडे गेल्याने त्यांनी प्रस्तुत कर्यातींच्या मुतालिकाना ते बिनतक्रार महालक्ष्मीच्य देवस्थानाकडे पोहोचते करण्याची ताकीद दिली.

श्री शंकर

प्रा। माहालक्षुमी देव

माहमेरा[1] राजश्री मुतालिकानी
काहाये गोसावी यासी

स्नेहांकित बसव प्रभु देसाई व देवाणा डोगर अजमर देसाई

---

१. माहमेरा = मामूर (?) (फा.), मामूर = नेमलेले.

पा हुकेरी व सरदेसाई का नूली व नेसरी कापसी शरण शरणार्थी. उपरी. सु॥ इसन मैया अलफ. श्री————करवीर क्षेत्र याचे माहाबत कदीम हक चालत आहेत. काहाये--

बी———————————————

का लाटी  का सावगाऊ  का सदलगे

यैस तीनी कर्यातीस दर गावास हक चालते असता हाली चालत नाही म्हणौउन आइकिले. तरी श्री——देवीचे काम. या कामास तुम्ही आपले कर्यातीस गावगनास ताकीद करून पेसजी जेणेप्रमाणे चालत अले असेल तेणप्रमाणे बिलाकुसूर पावीत जाणे. ताजा सनदाचे उजूर न करणे. पुढे (?) साले सनदेचे उजूर न करितां श्री——देवीचा हक बिलाकुसूर पाविते जाणे. तालीक लिहून घेऊन असल फिराऊन देणे. जाणिजे. रा चैत्र सुध पंचमी रविवार शके १६२४

मोर्तब

---

**क्रमांक : ११५** **दि. २२-३-१७०२**

मेलुंडीच्या बंदरात गेलेल्या पोर्तुगीज जहाजाची मुक्तता न झालेली पाहून गोव्याचा हंगामी गव्हर्नर बुऱ्हाणजी मोहिते याना धमकी देतो.

" मेलुंडीचे सुभेदार बुऱ्हाणजी मोहिते ह्यांस--

काही दिवसामागे मी आपणाला एक पत्र पाठविले होते. त्याला आपण उत्तर धाडले की, आमच्या बंदरात जे आपले जहाज आहे तें त्याच्यावरील खलाशासह मुक्त केले जाईल. आमच्या खलाशाना आपणाकडून जी वागणूक मिळाली त्याबद्दल मी आपले

आभार मानले होते. परंतु नुकतेच मला त्या जहाजाच्या कप्तानाकडून जे पत्र आले आहे, त्यावरून स्पष्ट होते कीं, तें जहाज सोडून देण्याचे बाबतीत आपल्याकडून कोणतीच हालचाल झालेली नाही. आपण ते जहाज इतके दिवस कां ठेवून घेतले तेच आम्हाला कळत नाही. शिवाजो राजे ह्यांचे आणि आमचे संबंध चांगले असता आपणाकडून आम्हाला अशी वागणूक मिळावी ह्याचे आश्चर्य वाटल्यावांचून राहात नाही. आमच्यामधील चांगल्या संबंधाचा पुरावा म्हणजे शिवाजी राजे ह्यानी परशुराम पंडीत ह्यांच्यामार्फत आम्हाला पाठविलेलें पत्र. तें आम्ही आपले निदर्शनास आणलेच आहे. तरीहि ज्याअर्थी आपण आमचे जहाज अटकेत ठेवले आहे, त्याअर्थी शिवाजी राजे ह्यांचे आणि आमचे संबंध बिघडवून टाकण्याचा आपला विचार आहे हे त्यावरून सिद्ध होते.

आपण जर आमच्या जहाजाची मुक्तता त्वरीत केली नाही, तर ती करण्याचा जो मार्ग आम्ही स्वीकारू तो आपणाला खचितच रुचणार नाही. तरी प्रकरण त्या थरापर्यंत जाऊं नये म्हणून जहाजाची मुक्तता करावी.”

गोवा, २२ मार्च १७०२

---

**क्रमांक : ११६** **दि. १६-४-१७०२**

मौजे बोरवडे येथील मालजी व तुळोजी पाटील ह्या दोघांच्या बापाला बाबाजी घाटगे देसाई ह्याने ठार मारून त्यांचे वतन बळकावले होते. त्याबाबत वरील दोघानी सरकारात तक्रार केली असता त्यांचे वतनासंबंधी झालेले निवाडपत्र.

तालीक

महजर ब तारीख २९ माहे जिल्काद सन ११११ सु॥ इसने

मय्या आलफ. दरजागा कसबा कागल प्रां मा।र सरकार रायबाग सुभे 'दारुलजफर'[1] विजापूर हुजीर मजालसी बी ता।

महाराज राजश्री पिराजी राजे घाटगे जहागीरदार व फौजदार पा॥ मा॥र
सिका

राजश्री हिरोजी राजे जाधव नायब फौजदार पा॥ मा॥र

राजश्री नरसोजी भानजी भोसले देसाई ता। तारळे पा॥ कोल्हापूर
सिका

भिकाजी परसोजी देसाई नाडगौडा प्रांत रायबाग
सिका

भानजी गोपाळ मुतालिक देसाई

कलसोजी आण्णाजी खासनी स ता। देसगत पा॥ मा॥र

हेलराज पारसीहरक याचा सिका

नरसोजी नारायण मजमुदार पा॥ मा॥र बी॥ खुद

खळो कानोजी देसाई ता। आजरे
देवजी तमाजी नाडगौडा मोकदम पा॥ मा॥र

राजश्री राणोजी बाजी घाटगे देसाई नि॥ नारो कोन्हेर हवाला देसगत पा॥ मा॥र
सिका

राजश्री आनंद भिकाजी देशपांडे नि॥ चौंडो सिदनाथ मुतालिक पा॥ मा॥र

जिवाजी लक्ष्मण कुलकर्णी मौजे सरवडे ता। तारले

मोकदमान क॥ कागल रायगौडा पा॥ का॥ मा॥र निशाण नांगर

रामाजी तिमाजी मुतालिक कुलकर्णी

---

१ दारुलजफर अथवा दारुज्जफर = विजयाचे स्थान. सरकारी कागदपत्रात विजापुरला मोगला दारुज्जफर विजापूर असे म्हणत असत.

जाहला माहजर यसाजे. कानोजी पटेल व गंगोजी पटेल वलद राऊजी पटेल मौजे वोरवडे हे आपले गाव वसात करून दिवाण कामावर दुरस्त आसता राजश्री आवाजी बाजी घाटगे देसाई पो मार बाहीर पडून दावे करीत फिरत होते. मौजे मजकुरावरी स्वारी करून दोघे भाऊ पटेल यास जिवे मारले. गावीचा सत्यानास केला. त्यावर ठाणे मालजी वलद कान्होजी तुळजोजी वलद गांगोजी पटेल हुजूर येऊन आहवाल जाहीर केला जे देसाई यानी नाहक आपल्या बापासी मारिले. येसीयास साहेव सदर धणी मायबाप आसा याचा दाद घेऊन पेस्तर सरफराजी आपले वतन पटेलगी मौजे सोनाळी पो मार पुरातन आहे. दरम्यान आफतफितरत[1] सबब रेडेकर म्हणून शिरले होते. त्यावर आपल्या वडिली मुतालिक ठेऊन गाव वसात पेषजी केला होता. त्यावर धामधूमी करता गाव वैरान मजरा पडला. साहेब मेहेरबान होऊन आपले वतनावर स्थापना कराविया साहेब धणी आहा. हकीकत मनास आणून दिवाण देसक मेहेरबान होऊन हर दोघे जणासही पटेलगीचे वतन आजरामरामत करून दुमाला कुल हक्क जवरापे विद्यमान पिडी दरपिडी चालावियास कोणी हिला हरकत करावया गरज नाही. हा जाहला माहजर. सही

पु।। गोही

| | | |
|---|---|---|
| खान नाईक बिन मौल नाईक क।। हवेली | सेख मलिक नाईक क।। चिखली | विर नाईक बिन जख नाईक क।। मांजरी |
| खान बिन खान नाईक क।। दिगरज दि।। | लिगगौंडा कडक पटेल क।। सावगांव बु।। नि. नांगर | पिराजी देसाई क।। कविटे पिराचे किले पनाळा विनंती |
| मोकदमानी क।। दिगरज बु।। | गोविंद साबाजी दि।। देसगत व पटेलगी सिका | आबाजी चौगुला आण्णाजी कृष्णाजी कुलकर्णी |

---

१. आफत फितरत = भांडखोर; संकट आणण्याचा स्वभाव

माकरणा चौगुला

मोकदमानी मौजे दिगरज खु॥

गोविंद महादाजी हवाला राचाइ पाटलीन रामाक्का पाटलीण

पटेलकी —— सिका निशाण नांगर निशाण नांगर

जिवाजी नागनाथ फिरगणा चौगुला

कुलकर्णी चिकटबंदावरी मोर्तब पारसी दोन

नाईकवाडीयान परगणे मार लाडजी नाईक बिन कामाजी

गोसो बाळाजी सबनीस नाईक क॥ मुरगुड

सय्यद मखदुम बिन सैदमियानी क॥ वाळवे

---

**क्रमांक : ११७** **दि. १८-४-१७०२**

कानोजी व गंगोजी या दोघां भावाना आबाजी घाटगे देसाई ह्याने ठार करून त्यानी वसविलेल्या बोरिवडे गावची वाताहात केली होती. पिराजी घाटगे ह्यानी नष्ट झालेले वतन मयताच्या मुलाना परत केले.

श्री

तालीक

पिराजी राजे घाटगे

श्नो राजश्री मोकदमानी मौजे सोनाळी काा वाळवे प्रांा कागल

यांशी देशकानी व देशपांडे पोा मार सन ११११. बरहुकूम परवाना माहाराज राजश्री —————— जाहागीरदार व फौजदार प॥ म॥ तेथे आज्ञा की कानोजी व गंगोजी वलद रावजी पटेल मौजे बोरिवडे हे आपला गाव वसात करुन दिवाण कामावर दुरुस्त असता मौजे मारावर राजश्री आबाजी बाजी घाटगे दोई प॥ मार बाहेर पडून दावा करीत फिरत होते. मौजे मारावर स्वारी करून दोघे भाऊ पटेल

यासी नाहाक जिवे मारिले. गांवीचा सत्यानाश केल्यावर हुजूर मालजी वलद कानोजी व तुळजोजी वलद गंगोजी पटेल येऊन आपला आहावाल जाहीर केला. जे देसाई यानी आपले बापास जिवे मारिले. यैसियासी

सिका — साहेब सदर धणी आसा यावरील दाद घेऊन सरफराजी आपले वतन पटेलगी मौजे सोनाळी प॥ मार पुरातन आहे. दरम्यान आत्फफितरत

करितो. रेडेकर म्हणून शिरले होते.

त्यावरी आपले मुतालिक देऊन गाव माग वसीत केला होता. त्यावरी धामधूम करिता गाव मजरा पडला. यैसियासी साहेब मेहेरबान होऊन आपले वृतीवर स्थापना कराविया धणी आसा. यावर साहेब मेहेरबान होऊनु उभयता मालजी व तुळजोजीस पटेलगीचे वतन आजरामरामत करून दिल्हे असे म्हणवून हुकुम. तरी पटेल मारास पिडी दरपिडी पटेलगीचे वतन चालवित जाणे. दरम्यान कोणी हरकत करतील त्यास हिंदू लोकास गाई ब्राह्मणाची आण असे. मुसलमान खलकास आपले महजबाची सवगंद असे. दरसाल ताजा कागदाचे उजूर न कर्णे. तालीक लिहून घेऊन असल कागद पटेल मारापासी फिरोन देणे. जाणिजे. रा छ १, जिल्हेज. मोर्तब असे.

---

**क्रमांक : ११८** **दि. ३०–६–१७०२**

नरसो गौरदेब ह्याच्यापाशी एक घर गहाण होते. हे घर गाव जळाला तेव्हां जळून गेले असता सदर्हू नरसो गौरदेव ह्याने त्याची जागा महालक्ष्मीचा पुजारी शामभट तुकणभट ह्यास दिली.

तालीक

येथे — सिका — पारसी

पारसी मजकूर

स्वस्ति श्री नृप शालिव्हान शके १६२४ वरशे चित्रभानूनाम छवछरे अशाड वदि द्वितीया भोमवासरे तददिनी वेदमूर्ती राजेश्री शामभट वलद तुकणभट पूजारी श्री-----स्वामी यासी नरसो गौरदेऊ मो॥ का॥ कोल्हापूर लिहून दिल्हे पत्र यैसेजे. थेरवावा व माधव नाईक याचा घर अपणापासी गाहाण होत. पा॥ ७०॥ साडे सतरीस आम्ही घेतले होते. त्यास वहुत दिवस जाहाले. इमारती हौनूड (?) पादशा जाले. + + + त्याचे दउडमधे गाव जळाला त्यामधे जळून गेले. स्थल रिकमे आहे. ते स्थल तुम्हास अपले अत्मसंतोशे दिल्हे असे. किमती होन पा॥ ७०॥ साडे सतरीस दिल्हे असे. घर हद महदूद पुरे (पूर्व) पछेम (पश्चिम) हात सु॥र ४७

उतर दक्षण हात सुमार ३२ घराचे सेजार. पूर्वेस दिवाकराचे सेजार. पछमेस पोतदार. दक्षणेस बाळो पदामाजीचे घर. उतरेस मार्ग. येणेप्रमाणे घराची हद माहदूद असे. सदरहू घर तुम्हास दिल्हे. राऊन राहटून सुखरूप राहणे. कदाचित घराचा सवाद (सवाल?) अला तरी सदरहु पैके साडसगी होन व इमारतीचे लागवड घेऊन घरटा त्यास देणे. हे लिहून दिल्हे पत्र. सई

तारीख १५ माहे सफर सु॥ सलास मया अलफ.
सन हजार १११२ सन ४६ जुलुसवाला

गोई

| नाईकवाडीयान | | | देसकानी क॥ हवेली | |
|---|---|---|---|---|
| वली इभराईम | सटवोजी | | अनंदराऊ | अबाजी वा॥ |
| सागुरु | हर ना॥ | | समजी | केळोजी |
| दत्ताजी जाधव | दसजी ना॥ | मुकंद नारा- | गु॥ रुद्रो | देसाई व |
| सुभानजी ना॥ | व भोवानजी | येण सरदेसाई | पतका नि॥ | आबाजी |
| लिंगणभट | ना॥ | सिका पारसी | | वलद भैरपा |
| धर्माधिकारी | ——— | | | देसाई का॥ |
| | | | | हवेली |

| मेलगिरी शकर | मादगौडा |
|---|---|
| गाा सदासीव | पटेल काा |
| बिजराज | मजकूर |
| नाडगौंडा पाा | निशाणी |
| माार | नांगर |

| नाईकवाडीयानी सिदाजी (?) | देसकानी का। हवेली पत्रप्रो साक्ष भागा पोतदार प।। कोलापूर | हा। अपाजी राम कृष्ण देसपांडे का। हवेली प।। मा।र<br>हरी भिकाजी कुल-करणी का। मजकूर |
|---|---|---|

---

**क्रमांक : ११९** **दि. ९–७–१७०२**

'गिरजोजी यादव हवालदार सेवक राजमंडळ सन्निध मातुश्री आईसाहेब' ह्या ना छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांनी बाग दिली आहे असें सुभेदार जावळी ह्याचे मोकदमानी मौजे भरोसी ह्यास पत्र.

श्री

श्रीगंगेव व<br>धिता प्राप्ता जन्हुसा<br>गर नंदिनी विठल<br>स्य माहां बुद्धे मुंद्रा<br>भद्राय राजते.

आज सुभा राजश्री विठल गोपाळ सुभेदार व कारकून सुभा जावली ताा माो मौजे भरोसी ता।। आठगाड सू।। सलास मया अलफ. बाा सनद राजश्री छेत्रपती स्वामी छ २ जीलकाद सन ईसने मया अलफ.[1] पै छ २४ सफर साल म।।[2]

---

१. दि. २० मार्च १७०२; २. दि. ९ जुलै १७०२.

आज्ञापत्र सादर जाले तेथे आज्ञा की राजश्री गिरजोजी यादव हवालदार सेवक राजमंडळ सनीध मातुश्री आईसाहेव याणी मौजे मार येथे बाग केला. त्या वागामध्ये तीर्थस्वरुप राजश्री कैलासवासी स्वामी गेले. वाग संपूर्ण पाहिल्यानंतर वाग हवासीर देखोन संतोसी होऊनू वाग मानुलेपासी कृपाळू होऊनू कुलबाव कुलकानू देखील हालीपटी व पेस्तरपटी अजरामऱ्हामती करुन ईनाम दील्हा. यैसीयास ते समई ईनामाचे सनद करून घ्यावी ते घेतली नाही. याकरीता मानुले येही प्रतापगडीचे मुकामी वागेचा वृतात सवीस्तर स्वामीस निवेदन केला. त्यावरून मनास आणिता मौज माचा वाग राजश्री कैलासवासी स्वामीने ईनाम दील्हा परंतु सनद जाली नाही. यास्तव मौजे मारी मानुलेचा बाग आहे तो ईनाम कुलवाव कुलकानू देखील हलीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार व ईनामदार करुन अजरामऱ्हामत दील्हा असे. जमीन वीघे ८३ तीन बीघे रास दील्हा असे. तरी तुम्ही सदरहू बाग मानुलेचे स्वाधीन करुन यास व याचे पुत्र पौत्रादी वंश-परंपरेने सुरक्षीत चालवीत जावे. प्रतीवर्षी नवीन पत्राचा अक्षेप करीत न जाणे. या पत्राची तालीक लिहून घेऊन असल पत्र भोगवटीयास मानुले याजपासी परतोन देणे म्हणोन राजपत्र सादर जाले. त्यावरून सुभाहून सनद सादर केली असे. तरी सदरहूप्रमाणे चालवणे. छ २४ सफर. मोर्तब सूद.

---

क्रमांक : १२० दि. १६–७–१७०२

हरदळवी ह्याने स्वामी सेवा इमाने इतबारे केली ह्यास्तव त्याला मौजे मुरसी येथे दोनशे करी जमीन इनाम दिली आहे, असे परशराम त्रिंबक प्रतिनिधी ह्यांचे सुभेदार व कारकून प्रांत राजापूर ह्याना पत्र.

तालीक

राजश्री गोविंद पुरुषोतम सुभेदार
व कारकून वर्तमान व भावी प्रांत राजापूर
गोसावी यास––

श्री अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य सेवक परशराम त्रिंबक

प्रतिनिधि नमस्कार. सुहुर सन सलास मया व आलफ. हरदळवी पदात पंच्यहजारी सेवक राजमंडळ याणी स्वामी सेवा येक निष्ठेने केली. याजकरिता याजवरी कृपाळू होऊन मौजे मुरसी त।। देवाळे या गावापै।। पडी जमीन हाली निरख प्रो इनामती खेरीज हकदार कर २०० दोनसे करची जमीन देविली असे. वतनदाराची भूमि खेरीज करून नेमून देणे आणि पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. दर साला ताजा सनदेचा उजूर न करणे. तालिक लेहून घेऊन असल सनद परतोन भोगवटियास देणे. छ १ रावल प।। हुजुर मोर्तब.

शिका

श्री आई आदी पुरुष
श्री राजा सीव छत्रप
ती स्वामी कृपानिधी
तस्य परशराम त्री
बक प्रतिनिधी

---

**क्रमांक : १२१** **दि. २७–७–१७०२**

बसरोजी[१] घोरपडे हे कोकणात उतरले असून त्यानी भीमगडचा हवलदार व तिथले इतर अधिकारी ह्याना अटक केली आहे, अशी बातमी खेम सावंत भोसले ह्यांनी गोव्याच्या गव्हर्नरला कळविली होती. गव्हर्नरने त्याबद्दल खेम सावंत भोसले ह्यांचे आभार मानले.

"कुडाळचे सरदेसाई खेम सावंत ह्यांस—

सरदेसाई खेम सावंत ह्यांचे पत्र मिळाले, मजकूर समजला.

---

१. मुळात Basrogi Gorpado असे नाव आहे. बहुतेक बहिरजी घोरपडे असावेत.

बसरोजी घोरपडे कोकणात उतरले असल्याची वातमी कळविल्याबद्दल खेम सावंत ह्यांचे आम्ही आभारी आहोत. + + + + भीमगडावर त्यानी हवालदार व इतर अधिकारी ह्याना कैद केले. त्यांचा हेतु काय आहे तेही कळले. त्यांना तोंड देण्याबाबत आम्ही खेम सावंत ह्याना इशारा देऊन ठेवित आहोत. त्यांचा उद्देश जर अन्य कोणता असेल तर त्याबद्दल आम्हाला काळजी करण्याचे कारण नाही. खेम सावंत ह्यानी आणखी काही ऐकले तर आम्हाला इशारा द्यावा. त्याना मदत करण्यास आम्ही सदैव तयार आहोत."

गोवा, २७ जुलै १७०२

आर्चविशप प्रिमश दों व्हाश्कु लुईज कौतिन्यु.

---

**क्रमांक : १२२** **दि. ३१-७-१७०२**

राणोजी घोरपडे ह्यांचा कर्यात मनेराजुरी येथील मोकासा ते "स्वामी कार्यावरी खर्च" झाल्यावर त्यांचे बंधू पिराजी घोरपडे ह्याना देण्यात आला आहे, असे छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे आज्ञापत्र.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २९ चित्रभानु संवछरे श्रावण बहुल चतुर्थी भ्रगुवासरे क्षत्रीय कुलावंतस श्रीराजा शीव छत्रपती याणी मोकादमानी व रयानी कर्यात मनेराजूरी प्रांत मिरज यासीं आज्ञा केली ऐसीजे. कर्यांत मजकूर पेशजी रा राणोजी घोरपडे याकडे जमावाचे ऐवजी मुकासा होता. येसीयास माानीले स्वामी कार्यावरी खर्च जाले. हाली त्याचे भाऊ राजेश्री पिराजी घोरपडे याकडे मोकासा करार केला असे. तरी माानिलेचे रजातलबेत[1] वर्तोन खंडणी प्रमाणे यैवज पावणे

---

१ आज्ञेत.

कर्यात माचा यैवज दुसरीयाकडे न देणे निदेश समक्ष

मर्यादयं
विराजते

सुरु सुद

तेरीख १६ समंत सुद
रालवल सुा सलास मया
बार सुरु सुद बार

---

**क्रमांक : १२३** **दि. २७-८-१७०२**

हर दळवी ह्याने धोंडो भास्कर ह्याचे बरोबर राहून चांगली मर्दुमकी गाजविली ह्या बद्दल छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी त्याला शाबासकी दिली आहे.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २९ चित्रभानु नाम सवछरे भाद्रपद बहुल प्रतिपदा गुरुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा सिव छत्रपति स्वामी याणी हर दळवी यासी आज्ञा केली यैसीजे. राजश्री धोंडो भास्कर जमावानिसी रत्नागिरीस जाऊन नेवात्याच्या फौजदारास नतीजा पावविला व लोकाच्या फौजदारास जिव मारिला. ते प्रसंगी तुम्ही

श्री राजा
शिव नरप
ती हर्ष नीधा
न मोरेश्वर
सुत नीलकं
ट प्रधान

श्री आई आदि पुरुष
श्री राजा शिवछत्रपती
स्वामी कृपानीधी त
स्य परशराम त्रिंबक
प्रतिनीधी

कस्त बरी केली म्हणोन हे वर्तमान मशारनिलेनी हुजुर लिहिले. त्याजवरून तुमचे सेवेसी मजुरा जाहला. तरी तुम्ही यक निष्ठेने शेवक

कार्याचा मर्दान तैसच आहा. पुढेही येचरीतीने तुम्ही आपल्या जमावा-निसी धोंडो भास्कर याजवळ राहून दमेदार कस्त करून त्या प्रांती सलाबत होऊन ताम्राची ठाणी असतील ती मारून मोकळी करणे. स्वामी तुमची सर्फराजी करितील. निदेश समक्ष. सिक्याचे मोर्तंब.

---

**क्रमांक : १२४** **दि. १-१०-१७०२**

गिरजोजी यादव ह्याना छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे मौजे गोवारे गांवचे इनामपत्र.

श्री

प्रतिपच्चंद्र
लेखेव वर्धिष्णुर्वि
श्ववंदिता। रामसू
नोः शिवस्यैषा मुद्रा
भद्रा विराजते।।

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक २९ चित्रभान सवत्सरे आस्विन बहुल शष्टी गुरुवासर क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शिवछत्रपति याणी

श्रीशि
व नरपति
हर्षनिदान मो
रेश्वर सुत नील
कंठ प्रधान

श्री आई आ
दि पुरुष श्री राजा
शिव छत्रपती स्वामि
कृपानिध्रि तस्य प
रशुराम त्र्यंबक
प्रतिनिधि

राजश्री गिरजोजी बिन मुधोजी यादव यास दिल्हे इनामपत्र यैसेजे. तुम्ही स्वामीचे राज्यातील पुरातन सेवक. तीर्थस्वरूप थोरले कैलासवासी स्वामीपासून सेवा करीत आले अहा. सांप्रत स्वामीची सेवा अंतःकर्णपूर्वक करिता. याकरिता स्वामीस तुमचे वंशपरंपरेने चालवणे बहुत अवस्य. याकरिता स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन तुम्हास नूतन इनाम कुलबाब कुलकानू देखील हलीपटी व पेस्तर पटी झाड झाडोरा पडिले (पान) सहीत

खेरीज हकदार व इनामदार करून पूर्व मर्यादेप्रमाणे चतु:सीमा मौजे गोवारे ताा हवेली प्रांत कऱ्हाड हा गांव इनाम अजरामऱ्हामत करून दिल्हा असे. तरी तुम्ही मौजे मजकूर आपल्या दुमाले करून घेऊन इनाम तुम्ही व तुमच्या पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन स्वामीची सेवा करून सुखरूप राहाणे. स्वामी तुम्हास इनाम सुरक्षित चालवितील. निदेश समक्ष.

मर्या
देय विरा मोर्तब
जते

(पाठीमागे)

तारीख १८

जमादिलावल सन सलास मया अलफ.

---

**क्रमांक : १२५** **दि. १२–१०–१७०२**

पोर्तुगिजांच्या उत्तरेकडील (चौल, वसई वगैरे) प्रदेशाच्या सेनापतीने मराठ्याशी तह केल्याची वार्ता पोर्तुगालच्या राजास कळविण्यात आली होती. त्याने गोव्याच्या हंगामी गव्हर्नरला लिहिले की, मराठयांशी पोर्तुगिजानी तह केला तर त्यामुळें मोगल बादशहाचा पोर्तुगिजांवर रोष होईल, म्हणून मराठ्याशी तह न करतां युद्ध न करण्याच्या धोरणाने वागावे.

गोव्याच्या गव्हर्नरना राजा आपली सदिच्छा पाठवित आहे. उत्तरेकडील प्रदेशाचे गव्हर्नर पेद्रु व्हाज सोआरिश बासेलार ह्यानी मराठ्यांशी आपल्याच मुखत्यारीत तह केला असल्याची जी बातमी माझ्याकडे पाठविण्यात आली होती, ती माझ्या अवलोकनात आली होती. आपण म्हटले होते की, हा तह झाला, तर मोगल बादशहाचा आमच्यावर रोष होईल. कारण मराठे हे बादशहाचे शत्रु आहेत. त्यावर मी आपणाला कळविले होते की, जनरल पेद्रु सोआरिश इ बासेलार

ह्यानी हा तह जर आपल्याच मुखत्यारीत केला असेल, तर त्यांच्या हातून घडलेल्या ह्या शिस्तभंगाबद्दल त्याना योग्य ते शासन झाले पाहिजे. परंतु आतां असे कळते की, त्यानी केवळ शस्त्रसंधी केली आहे. त्यांच्या हातून घडलेल्या गुन्ह्याबद्दल त्याना शासन करायचे झाल्यास प्रथम त्यांच्या गुन्ह्याची चौकशी झाली पाहिजे. मी आपणाला आज्ञा करतो की, सदहू सेनापतीच्या वर्तनाचा तपशील मला कळवावा. तसेच मी आपणाला बजावतो की, मराठ्यांशी तह कधीच करता कामा नये. त्यामुळे मोगल बादशहाला वाईट वाटेल व त्याचे शत्रुत्व आम्हाला पत्करावे लागेल. तो आमची मोठी नुकसानी करुं शकेल. तथापि मराठ्यांशी तह न करतां शस्त्रसंधी चालू आहे ती तशीच ठेवावी.

लिस्बन, १२ अक्टोबर १७०२
राजा

---

**क्रमांक : १२६** दि. ४–११–१७०२

मराठ्यांनी फोंड्याच्या किल्ल्यास वेढा घातला असता बेळगावचा नबाब सैफखान ह्याने पोर्तुगिजाकडे फोंड्याला दोनशे सैनिकांची कुमक धाडण्याची विनंति केली होती. त्याला गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले.

बेळगांवचे नबाब सैफखान ह्यांस,

आपले पत्र मिळाले. आपण म्हणतां की आमची हरकत नसल्यास फोंड्याकडे दोनशे सैनिकांची कुमक धाडावी. त्यांत काही गोलंदाजहि असावेत अशी आपली मागणी आहे. मोगल बादशहाच्या मदतीला जाण्यास आम्हास आनंद वाटला असता. परंतु वस्तुस्थिती अशी आहे की, शत्रूने फोंड्याची नाकेबंदी करून सर्व रस्ते रोखून धरले आहेत. आपल्या पत्रांत आपण ह्या गोष्टीचा निर्देश केलाच आहे. अशा परिस्थितीत कुमक कशी पाठवायची? शत्रूचा सर्वत्र

पहारा असता ह्या सैनिकाना किल्ल्यात पाठविण्यात मोठाच धोका आहे. दुसरी गोष्ट अशी की, शत्रू सुसज्ज आणि संख्येनेहि मोठा असल्याने त्यांच्यासमोर ह्या दोनशे सैनिकांचा निभाव कितपत लागेल हा प्रश्नच आहे. आमचे आरमारहि सांप्रत इकडे नाही. आरमार उत्तरेकडे निघण्याचे तयारीत असता काही सैनिक आजारी पडले. उरलेले सैनिक आमच्या राज्याचे रक्षण करीत आहेत. शत्रूने आमच्या राज्यात शिरून लूटमार करू नये म्हणून ठाण्याचे रक्षण करावे लागते. परिस्थिती जर अशी नसती, तर आपल्या मागणीप्रमाणे मी कुमक पाठविली असती.

फोंड्याच्या नबाबानेहि आमच्याकडे दारु गोळ्याची मदत मागितली होती. नबाबाचे विश्वासू दूत अहंमद सारंग ह्यांच्याबरोबर ती पाठवून दिली आहे. मागितलेला सगळाच दारुगोळा मी पाठवित नाही. कारण, रस्ते मराठ्यांचे हातात असल्याकारणे हा दारुगोळा त्यांचे हातात पडण्याचा धोका आहे. मी मोगल बादशहाशी असलेल्या ह्या राज्याच्या मैत्रीस अनुसरून काही पोर्तुगीज सैनिकाना फोंड्याच्या मदतीस जाण्यास संमती दिली आहे.

देव आपले रक्षण करो.

गोवा, ४ नवंबर १७०२

कायतानु द मेलु द कास्त्रु.

---

**क्रमांक : १२७** **दि. १२-११-१७०२**

गिरजोजी यादव ह्यांचे बंधु अर्जोजी यादव ह्यानी स्वामीसेवा निष्ठेने केली होती. त्यांच्या मृत्युनंतर त्यांच्या मुलामाणसांचा योगक्षेम नीट चालावा म्हणून छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी गिरजोजी यादव ह्याना मौजे सोनसळ हे गाव इनाम दिले,

श्री

श्री
प्रतिपच्चंद्र
लेखेव वर्धिष्णुर्वि
श्ववंदिता ।। रामसु
नो : शिवस्यैपा मुद्रा
भद्रा विराजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक २९ चित्रभानु सवत्सरे मार्गसीर्ष शुध चतुर्थी गुरुवासर क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिवछत्रपति याणी

श्रीशि
वनरपति
हर्षनिदान मो
रेश्वर सुतनील
कंठ प्रधान

श्री आई आ
दि पुरुष श्री राजा
शिवछत्रपती स्वामी
कृपानिधी ।। तस्य प
रशुराम त्र्यंत्रक
प्रतिनिधि

राजश्री गिरजोजी बिन मुधोजी यादव यास दिल्हे इनामपत्र यैसेजे. तुम्ही विनंती केली की आपले बंधु रा। अर्जोजी यादव याणी राजश्री थोरले कैलासवासी स्वामीचे वेळेस शेवा निष्ठेने केली. त्याउपरी ते मृत्यु पावले. त्याची मुले माणसे आपणाजवळ आहेत. त्याचे संरक्षण जाहाले पाहिजे. याकरिता चंजीचे मुकामी तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामी यांसी विनंती केली त्यावरून मौजे सोनसाळ कर्यात आऊंद प्रांत खटाऊ हा गाव इनाम दिल्हा आहे. परंतु धामधुमेच्या प्रसंगाकरिता भोगवठा चालोन आला नाही. यैसीयास त्याचे मुलामाणसाचा योगक्षेम आपल्यास चालवावा लागतो. याकरिता नूतन सनद करून देऊनु मौजे मजकूर उतरोतर इनाम चाले ते केले पाहिजे म्हणून तपसिले विदित केले. त्यावरून मनास आणिता रा। अर्जोजि यादव याणी राजश्री थोरले कैलासवासी स्वामीचे वेळेस शेवा बहूत निष्ठेने केली आहे. त्याचे मुलामाणसाचे संरक्षण तुम्हास करावे लागते. याकरिता तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामीने मौजे मजकूर पेशजी इनाम दिल्हा आहे. त्याप्रमाणे हाली स्वामीने त्याचे मुलामाणसांचे संरक्षणाबद्दल मौजे मजकूर कुलबाब कुलकानू झाडझाडोरा जलतरूपाषाणसहित देशील

हालीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार इनामदार करून पूर्व मर्यादेप्रमाणे देह १ यक देऊनु देशाधिकारी प्रांत खटाऊ याचे नावे अलाहिदा सनद सादर केली आहे. तरी तुम्ही मौजे मजकूर आपले स्वाधीन करून घेऊनु अनभवीत जाणे. स्वामी तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवितील. जाणिजे. निदेश समक्ष.

मर्या
देयं विरा मोर्तब
जते

(पाठीमागे)

तेरीख ३

रजब. सन सलास मया अलफ.

---

**क्रमांक : १२८** **दि. ११-१२-१७०२**

पोर्तुगिजांच्या उत्तरेकडील ठाण्याच्या सेनापतीने मराठ्यांशी तह केला असल्याची बातमी पोर्तुगालच्या राजास कळल्यावरून सदहु सेनापतीच्या वर्तनाची चौकशी करण्याचा हुकूम त्याने गोव्याच्या हंगामी गव्हर्नरला केला होता. गव्हर्नरने त्याला कळविले की, सदहू सेनापतीने तह न करता शस्त्रसंधी केली आहे. ती आपल्या हिताची आहे असे तो म्हणतो.

महाराज

पेद्रु व्हाज सोआरिश द बासेलार हे उत्तरेकडील ठाण्यांचे सेनापती होते तेव्हां त्यानी आपल्याच मुखत्यारीत मराठ्यांशी तह केल्याचा त्यांच्यावर आरोप होता. त्यांच्या ह्या वर्तनाची चौकशी केल्यावर मला कळले की, त्यानी तह न करता फक्त शस्त्रसंधी केली. त्यानी त्याची खबर व्हाइसरॉय आल्मोतास मोर ह्याना दिली होती. व त्यानीहि ही शस्त्रसंधी चालू ठेवावी अशी आज्ञा पेद्रु व्हाज सोआरिश द बासेलार ह्याना दिली होती. सदहू सेनापतीला वाटले

की मोगल बादशहाना नाराज न करता शस्त्रसंधी अमलात आणून अनावश्यक खर्च टाळता येईल. ही शस्त्रसंधी उत्तरेप्रमाणे गोव्यातहि अमलात आहे. विशेषत: उत्तरेकडील प्रदेशात त्याची फार आवश्यकता आहे.

अशा रीतीने मी ह्या शस्त्रसंधीला मंजुरी देऊन मराठ्यांशी दळणवळण चालू ठेवले आहे. मात्र मोगल बादशहाला त्याचा सुगावा लागू नये म्हणून दक्षता घेण्यात येत आहे. माझ्या बलशाली स्वामीस देव उदंड आयुष्य देऊन सुखी ठेवो.

गोवा, ११ डिसेंबर १७०२

---

**क्रमांक : १२९** दि. १४–१२–१७०२

सेनापती हिंदुराव घोरपडे ह्यानी पोर्तुगिजांकडे खास दूतामार्फत पत्रे पाठवून उभय पक्षामध्ये मैत्रीचे संबंध प्रस्थापित व्हावेत अशी मागणी केली होती. त्या पत्राना गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले.

हिंदुराव ह्यांस

आपली दोन्ही पत्रे मिळाली. पहिल्या पत्राचे उत्तर लगेच पाठविले नाही, कारण ते पत्र घेऊन आलेले आपले जासूद गणेश विठ्ठल हे लवकरच आपले दुसरे पत्र घेऊन येणार आहेत असे कळले होते. त्याप्रमाणे त्यानी ते पत्र आणून दिले.

आपल्या दोन्ही पत्रावरून कळून चुकले की, माझे वडील ह्या राज्याचे व्हाइसरॉय होते, तेव्हां ज्याप्रमाणे आपले स्वामी छत्रपती ह्यांचा आणि पोर्तुगिजांचा सलोखा होता, तसाच सलोखा आताहि उभय पक्षामध्ये प्रस्थापित व्हावा अशी आपली इच्छा आहे. मी आपणाला कळवू इच्छितो की, असे संबंध प्रस्थापित होण्याच्या मार्गात आमची

कोणतीच आडकाठी नाही. तरी आपण आपल्या समुद्रावरील आणि जमिनीवरील सैन्याला हुकूम द्यावा की, त्यानी आमची कोणत्याच प्रकारची कुरापत काढू नये व आमच्या प्रजेला उपद्रव देऊ नये आणि आमच्या आरमारावरहि हल्ले करू नयेत. आपल्या पत्रात आपण काही विजय मिळविले अशी बातमी आहे. ती बातमी ऐकून आम्हाला आनंद झाला. आपणाला असेच विजय मिळावेत आणि त्यांची सुरुवात आमच्या हद्दीला लागून असलेल्या ठाण्यापासून व्हावी अशी इच्छा करतो. त्यामुळे आपण जें काय गमावले ते पुनः मिळवू शकाल. आपल्या इच्छेप्रमाणे आपले दूत गणेश विठ्ठल ह्यांच्याशी माझ्या दोन मुलाखती झाल्या. त्याना जी माहिती हवी होती ती मी तोंडीच दिली आहे. ते आमच्या मुलाखतीचा अहवाल आपणाला सादर करतीलच. त्याचप्रमाणे आपणाला उपयुक्त अशा आणखीहि काही गोष्टी मी त्याना विदीत करणार आहे, कीं ज्यामुळे आमच्यामधील सलोखा टिकेल आणि तो वृद्धिगत होईल अशी मला आशा वाटते.

देव आपले भले करो.

गोवा, १४ डिसेंबर १७०२

कायतानु द मेलु द कास्त्रु

---

**क्रमांक : १३०** **दि. १४-१२-१७०२**

हिंदुराव घोरपडे ह्याचा पोर्तुगिजांशी पत्रव्यवहार होता. असाच पत्रव्यवहार कृष्णाजी अनंत ह्यानीहि पोर्तुगिजांशी ठेवला होता. पोर्तुगीज व्हाइसरॉयने त्याना लिहिलेल्या खालील पत्रांत 'कुष्टाजी अनंत ऊर्फ कृष्णाजी अनंत' असे संबोधिले आहे. त्याना वारंवार मोठे विजय प्राप्त व्हावेत अशी इच्छा त्याने दर्शविली आहे.

कुष्टाजी पंत ऊर्फ कृष्णाजी अनंत ह्यांस

आपले पत्र पावले. आपल्या सैन्याने शत्रूवर एक मोठा विजय मिळविला असल्याचे त्यावरून कळले. आपणास असेच विजय मिळत रहावेत अशी इच्छा करतो. ह्या देशातील सर्व राजेरजवाड्यांशी आमचे मैत्रीचे संबंध असावेत ही माझी इच्छा आहे. सरदार हिंदुराव ह्यानाहि पाठविलेल्या पत्रात मी ही इच्छा व्यक्त केली आहे. गणेश विठ्ठल ह्यांच्याकडून मला नवीन बातम्या कळतीलच. मी त्यांचे आनंदाने स्वागत करीन. आपणाला मोठे यश मिळावे अशी इच्छा करतो.

गोवा, १४ डिसेंबर १७०२

---

**क्रमांक : १३१** **इ. स. १७०२(?)**

पत्र लेखक पिराजी यादव व पदाजी यादव देशमुख हे उदाजी पंत ह्याना लिहितात की वतनाचा मामला " शिजत आहे रुपया येक थोरला " पाहिजे.

श्री

राजश्री उदाजी पंत
गोसावी यास———

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये स्ने।। पिराजी यादव व पदाजी यादव देसमूख प।। कऱ्हाड दंडवत विनंती. उपरी येथील क्षेम जाणून आपले क्षेम लिहित गेले पाहिजे. या नंतर येथील प्रसंग यादोपंत मुख वचने सांगता कळो येईल. तर हे प्रसंगी रु।। १ यक थोरला पाठविलायाने वतनाचा मामला सिजोन येत आहे. यैन प्रसंग येऊन लागला अहे. मग तुम्ही म्हणाल की आम्हास सूचना लिहिली

नाही. याकरिता लिहिले आहे. तर लिहिलेप्रो सत्वर पाठविणे. कृपा असो दीजे. हे विनंती.

मोर्तब

पाठीमागे

( पाठीवर पिराजी यादवाचा शिक्का व पुढील मजकूर )

द।। अपाजी शंकर नमस्कार

विनंती उपर कितेक वर्तमान यादोपंत मुख वचने सांगता विदित होईल.

---

**क्रमांक : १३२** **इ. स. १७०२**

पिराजी यादव व पदाजी यादव हे दोघे गिरजोजी यादव ह्याना लिहितात की, वतनाचे कामासाठी ' रु।। १ ' पाठवावा.

श्री

राजेश्री गिरजोजी यादव
गोसावी यास

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य श्नै।। पिराजी यादव व पदाजी यादव देसमुख जोहार विनंती. उपरी येथील क्षेम जाणून आपले क्षेम लिहित गेले पाहिजे. या नतर येथील वतनाचे प्रसंग लागला आहे. तर हे समई तुम्ही रु।। १ + + + करून पाठविलेयानी वतनाचे काम दुरुस्त होईल. येथील प्रसंग कितेक रा। यादोपंतामुखे सांगता विदीत होईल. बहुत काये लिहीणे हे विनंती.

**क्रमांक : १३३** **दि. ६–१–१७०३**

गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालच्या राजास दि. ६ जानेवारी १७०३ ला जे पत्र लिहिले त्यात त्याने कोकणातील तत्कालिन घडामोडीचा आढावा घेतला आहे.

मी इकडे आलो तेव्हा मराठ्याशी आमचे युद्ध चालू नसल्याचे मला कळले. सांप्रत इकडे शांतता आहे. आमच्याशीं आपणाला शांततेनें वागायचे आहे हे मराठ्यांनी आमची जी दोन गलवते वाईट हवेमुळे राजापूरच्या बंदरांत शिरली होती ती सोडून दाखविले आहे. इतकेच नव्हे तर, समुद्रावर चांचेगिरी होते म्हणून मराठ्यांच्या युद्धनौकानी त्या गलवताना संरक्षण देऊन येथपर्यंत आणून पोहोचविले. अशा रीतीनें मराठ्यांशीं आमचे शांततेचे संबंध प्रस्थापित झाले आहेत.

मराठ्यांच्या आणि आमच्या चकमकी मुख्यत्वें आमच्या उत्तरेकडील प्रदेशांत होत आल्या आहेत. तेथें आतां कोणत्याहि परिस्थितीत युद्धाचे निमित्त घडता कामा नये. मोगलानी मराठ्यांची जी ठाणी घेतली होती तीं परत घेण्याचे प्रयत्न मराठ्यानी सुरूं केले आहेत. मी इथला राज्यकारभार हाती घेतल्यावर थोड्याच दिवसानी मराठ्यांनी फोंड्यास वेढा घातला. फोंडे पडले. पण गड पडला नाही. तो अजून मोगलांच्या हाती आहे. ते कुमकेची वाट बघत आहेत. परंतु पुरवठ्याच्या अभावी ते गड सोडून देण्याची शक्यता आहे.

फोंड्याच्या नबाबाने माझ्याकडे दारूगोळयाची व मनुष्यबळाची मदत मागितली होती. मी त्याला कळविले की, आमचे आरमार बाहेर असून काही सैनिक आजारी आहेत. उरलेले सैनिक आमच्या ठाण्याचे व किल्ल्यांचे रक्षण करीत आहेत. दारूगोळा मात्र थोडा

पाठवून दिला. मदतीची मागणी बादशहाच्या थोरल्या उमरावानेहि बादशहाच्या वतीने केली होती. त्यालाहि मी वरचीच सबब सांगितली. जे जासूद पत्रे घेऊन आले होते त्याना मी खुष करून पाठवून दिले.

शिवाजी राजे ह्यानीहि फोंडे घेतल्यावर पत्र पाठवून आपल्या वाडवडिलांप्रमाणे आमच्याशी शांततेचे संबंध ठेवण्याची इच्छा दर्शविली. ह्या बाबतींत मी राज्य सल्लागारांचे म्हणणे ऐकून घेऊन शिवाजी राजे ह्याना उत्तर पाठविले. त्याना मी कळविले की त्याना जर आमच्याशी खरेखुरे मैत्रीचे संबंध ठेवायचे असतील तर मीहि तशी मैत्री ठेविन. कारण, मैत्रीचे संबंध ठेवण्यासाठी दोन्ही बाजूनी इच्छा असावी लागते. महाराजांच्या हितसंबंधाना बाध न येता व नवीन तह न होता जुन्या तहानुसार शिवाजीशीं जर आमचे मैत्रीचे संबंध जुळत असतील तर तें आमच्या फायद्याचें आहे. कारण, मोगलानी मराठ्यांची जी ठाणी घेतली होती तीं त्यानी परत घेण्यास प्रारंभ केला आहे.

गोवा, ६ जानेवारी १७०३

---

**क्रमांक : १३४** **दि. ९-३-१७०३**

फोंड्याचे हवालदार कुष्टाजीपंत ह्यानी पोर्तुगिजांकडे अन्नधान्याची मागणी केली होती. त्याला व्हाईसरॉयने पुढील उत्तर धाडले.

फोंड्याचे हवालदार कुष्टाजीपंत ह्यांस--

कुष्टाजीपंत ह्यांचे पत्र मिळाले व त्यांचे क्षेमकुशल कळून आनंद झाला. त्यानी माझ्याकडे अन्नधान्याची मदत मागितली होती. तत्संबंधाने त्यांना मला कळवायचे आहे की, आमच्या राज्यात ह्या

वस्तूंची टंचाई असल्याने त्यांची निर्यात मला थांववावी लागली होती. परंतु आतां ती टंचाई दूर झाली असल्याने कुष्टाजीपंत ह्यांच्या मागणीकडे लक्ष देऊन त्या वस्तू पाठवित आहे. मला कुष्टाजीपंत ह्यांच्या निदर्शनास आणायचे आहे की, सिंधुदुर्ग किल्ल्यातील संभाजीच्या[1] सैनिकानी आमचे एक जहाज पकडून दोन पाद्री आणि चार इतर लोक ह्याना सिंधुदुर्ग किल्ल्यात कैद करून ठेवले आहे. एके ठिकाणी आमचे आणि तुमचे संबंध चांगले आहेत, तर दुसरे ठिकाणी ते शत्रुत्वाचे आहेत. हे कसे काय त्याचा उलगडा होत नाही. मला आपणाकडून ह्या गोष्टीचा खुलासा हवा आहे. म्हणजे मलाहि माझ्या बुद्धीप्रमाणे वागता येईल.

पणजी गोवा, ९ मार्च १७०३

कायतानु द मेलु द कास्त्रु

---

**क्रमांक : १३५** **दि. ७–५–१७०३**

नारो खंडेराव ह्याना मौजे सिरढोण वतनी मोकासा दिला आहे म्हणून राणोजी घोरपडे ह्यांचे आज्ञापत्र.

श्री

तालीक

आज्ञापत्र समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री राणोजी घोरपडे सेनापती ताा मोकदमानी मौजे सिरढोण तर्फ रुकडी सुाा आर्वा मया अलफ. सरदेशमुखीचे वतनाखाली मौजे माार इनाम आहे. त्यास हाली नारो खंडेराव यास वतनी मोकासा वतनाचे

---

१. पोर्तुगीज व्हाईसरॉयने 'संभाजी' हा शब्द मराठे ह्या अर्थाने वापरलेला दिसतो.

येवजी करुन दिल्हा आहे. तरी त्याचे वंशपरंपरेस आकाराप्रमाणे मशारनिल्हेकडे वसूल देत जाणे. जाणिजे. छ १, मोहरम. मोर्तब सुद.

---

**क्रमांक : १३६** **दि. ८–८–१७०३**

**हरि गांवस देसाई ह्या नावाच्या कोंकणातील एका देसायाची खेम सावंत भोसले ह्यानी बरीच हानी केली होती. तो त्याचा सूड उगवूं पहात होता. गोव्याचा व्हाईसरॉय हरि गांवस ह्याला कळवितो कीं, हिंदुराव घोरपडे ह्यानी खेम सावंताविरुद्ध मोहिम काढली तर त्याना मदत करू.**

हरि गांवस ह्यांस

देसाई हरि गांवस ह्यांच्या पत्रावरून कळून आले की, ह्या राज्याला मदत करण्याची त्यांची इच्छा आहे. परंतु अति पर्जन्यवृष्टी-मुळे खेमसावंत ह्याना शासन करण्याच्या कामात अडथळे येत आहेत. ज्या वेळी हिंदुरावांना भोसल्याविरुद्ध आमच्या मदतीची आवश्यकता भासेल तेव्हा त्यानी आम्हाला लिहिले पाहिजे. कारण, भोसल्यानी हिंदुरावाचे किल्ल्ले, माणसे, वगैरे घेऊन त्यांची फार नुकसानी केली आहे. आमची भोसल्यानी परांगी (होडी) घेतली. त्याच्याकडून झालेल्या ह्या आगळीकेबद्दल मी त्याला योग्य वेळी शासन केल्यावांचून राहाणार नाही. त्याना हा इशारा मी त्यांच्या ब्राह्मण वकीलामार्फत दिलाच आहे. मला हरि गांवस ह्याना विचारायचे आहे की, ह्या मोहिमेला ते किती माणसांची मदत देऊ शकतील, ते आम्हाला कळवावे. सांप्रत पावसाळा असल्याने ही मोहीम सुरू करता येत नाही. परंतु हिंदुराव घोरपडे ह्यांचेकडून मदतीबाबतचे पत्र आले, तर बंडखोर खेमसावंत ह्याचा नाश व्हावा म्हणून मी हिंदुराव ह्याना मदत

केल्यावांचून राहाणार नाही. हिंदुरावांचे दूत केशव पंडीत ह्याना आपणाला हे कळविता येईल.

गोवा, ८ ऑगस्ट १७०३

कायतानु द मेलु द कास्त्रु

---

क्रमांक : १३७ दि. १०–९–१७०३

खेम सावंत भोसले ह्यानी पोर्तुगिजांची कुरापत काढल्याने त्यानी खेम सावंताविरुद्ध मोहीम सुरू केली होती. परंतु मालोजी घाटगे नामक गृहस्थाने पोर्तुगिजांकडे खेम सावंताबाबत रदबदली केली असतां पोर्तुगिज व्हाइसरॉयच्या चिटणिसाने घाटगे ह्याना पुढील पत्र पाठविले.

मालोजी राजे घाटगे ह्यांस

नामदार व्हाइसरॉय ह्याना जी पत्रे येतात त्यांतील तपशील त्याना सादर करणे हे माझे काम असते. त्याप्रमाणे आपल्या पत्रातील तपशील त्याना विदीत केला असतां आपली मागणी मान्य करण्यास त्यानी नकार दर्शविला. खेम सावंत भोसले ह्यांच्यासाठी आम्ही जें काय केले त्याची आपणाला माहिती असून देखील आपण त्यांच्या विषयीं रदबदली करतां हें पाहून नामदार व्हाइसरॉय ह्याना नवल वाटले. खेम सावंत भोसले ह्यांचा उद्धटपणा फार मोठा आहे. त्यानी इकडे येणाऱ्या जहाजांची लुटालुट केली, इतकेच नव्हे, तर ह्या राज्याच्या काही प्रजाजनानाहि त्यानी ठार मारले. अशा बंडखोराना क्षमा करण्याची नामदार व्हाइसरॉय ह्यांची पद्धत नाही.

खेम सावंत भोसले हे ह्या राज्याची क्षमा आपणामार्फत मागत आहेत. पण ही पद्धत बरोबर नाही. मोठमोठ्या राजेरजवाड्याना जेव्हां आमच्याशीं बोलणी करायची असतात तेव्हां ते आमच्याकडे

आपले वकील पाठवितात. आपणाला जर वरील प्रश्नासंबंधी आमच्याशीं बोलणी करायची असतीं तर मी आपणासाठीं इकडे येण्याचा परवाना नामदार व्हाइसरॉय ह्यांच्याकडून काढला असता. ह्या बाबतीत मी आपणाला मदत केली असती. अशी प्रत्यक्ष बोलणी करण्यात फायदा असतो. नाही तर वाटाघाटींची वेळ टळून गेल्यावर नामदार व्हाइसरॉय हे बंडखोरविरुद्ध इलाज करतात. तसें झाले कीं, बंडखोराला आमच्या राज्याचें संरक्षण नाही हें त्याच्या शेजाऱ्यांच्या निदर्शनास येते. आणि त्याच्या दृष्टीनें ह्या सारखे दुर्दैव दुसरे कोणते नसते.

गोवा, १० सप्टेंबर १७०३

आंतोनियु द फ्रैर द आंद्राद

---

क्रमांक : १३८ दि. २०–९–१७०३

मेलुंडीचे किल्लेदार बुऱ्हाणजी मोहिते ह्यानी गोव्याच्या व्हाइसरॉयला लिहिले होते कीं, पोर्तुगिजांची जीं जहाजें त्यांच्या उत्तरेकडील ठाण्याहून गोव्याला जातील त्याना आपला परवाना घ्यावा लागेल. त्या पत्रास व्हाइसरॉयच्या चिटणिसाने पुढील उत्तर पाठविले.

मेलुंडीचे किल्लेदार बुऱ्हाणजी मोहिते ह्यांस

नामदार व्हाइसरॉय ह्याना तुम्ही जे पत्र पाठविले होते तें राज्याचा चिटणीस म्हणून माझ्याकडे देण्यात आले. तें मी नामदार व्हाइसरॉय ह्यांच्या निदर्शनास आणले असतां तें संतप्त झाले. त्यानी मला तुम्हाला लिहावयास सांगितले कीं, मेलुंडीच्या लोकांकडून जी दगलबाजी झाली त्याची आपणाला आठवण आहे. मेलुंडीच्या किल्ल्यांतील लोकांकडून पोर्तुगीज नागरिकांना उपद्रव झाला. त्यानी त्यांची गलबतें लुटली व त्याना पकडून मेलुंडीला नेले. त्यांच्या ह्या

अत्याचारांतून गरीब बिचारे पाद्री देखील सुटले नाहीत. आणि त्याने तुमचे समाधान न होऊन तुम्ही आतां लिहितां कीं, आमच्या उत्तरेकडील प्रदेशांतून जी बिन लढाऊ जहाजें इकडे येतील त्याना तुमचा परवाना बाळगावा लागेल. नामदार व्हाइसरॉय हे संभाजी राजे ह्यांच्याकडून ह्या घटनेच्या खुलाशाची वाट पाहात आहेत. संभाजी राजे ह्यांच्याशी आमची मैत्री असून ती पुरातन काळापासून चालत आली आहे. संभाजी राजे ह्याना जर ही घटना माहीत नसेल तर आम्ही असें समजूं की, तुम्ही त्यांच्या नकळत ही बंडखोरी केली आहे. आणि तसें जर झालें तर तुमच्या स्वामीकडून तुम्हाला त्याचे प्रायश्चित मिळाल्या-वांचून राहाणार नाही. आम्ही तुमच्या हातून घडलेली आगळीक त्यांच्या निदर्शनास आणीत आहोत. त्याचा खुलासा झाल्यावांचून तुमच्या सूचना आणि नजराणे आम्हाला स्वीकारता येणार नाहीत.

ज्या दोन लहान होड्यांविषयी तुम्ही लिहिलें आहे, त्या होड्या खेम सावंत भोसले ह्यांच्या समजून शापूरच्या किल्लेदाराने पकडल्या. त्यांत जो माल होता तो दोनशे अश्रफीहून अधिक नव्हता. शिपायांनी तो माल विभागून घेतला. त्या होड्या मेलुंडीच्या होत्या हें जर त्याना कळलें असतें तर त्या होड्यांच्या नावाड्यांची धडगत नसती. कारण, त्याना मेलुंडीला जे घडले त्याची आठवण आहे. ह्या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन तुम्ही सदर सारख्या घटना घडू नयेत म्हणून योग्य ती उपाय योजना करावी व तुमचा नाश टाळावा. कारण नामदार व्हाइसरॉय ह्या गोष्टी चालूं देणार नाहीत. ते तुमच्याशीं युद्ध जाहीर केल्यावांचून राहाणार नाहीत.

गोवा, २० सप्टेंबर १७०३

फ्रान्सिश्कु द आझावेद सांद.

क्रमांक : १३९ दि. २१-१०-१७०३

नरसिंगराव यादव ह्यानी गिरजोजी यादव ह्याना सादर केलेल्या प्रस्तुत निवेदनात औंध कर्यातीच्या देशमुखीचा इतिहास दिला असून तिच्या विभागणीचाहि तपशील सांगितला आहे.

श्री

राजश्री गिरजोजी यादव देसमुख
का। आऊद गो॥

ळ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित नरसिंगराव यादव देशमूख का॥ मजकूर सु॥ सन अर्बा मया अलफ. कर्याती मजकुरची देसमुखी वतन पुरातन आपले आहे. त्यासमधे मुधोजी वणगोजी निंबाळकर याणी पुंडावे केले. त्या समई अपले वडील त्यास भेटोन कर्याती मजकुरीचा तह केला. हे वर्तमान कराडी फौजदार होता त्याने अदलशा पातशास वाका दाखल केला. त्यावरून यादवाची देसमुखी अमानत करून बारा वजिरास दौलतेचे पुरवणीस दिल्हे. त्याकडून दूर करून रणदुला खानास दिल्हे. त्याकडून दूर करून माहाराज राजेश्री शाहाजी राजे भोसले त्यास दिल्हे. त्या तागाईत भोसले वतन अनभवीत आले. यैसीयास तुम्ही अपले भाऊ. राजेश्री थोरले कैलासवासी स्वामीसनीध सेवा करीत होतेस तेव्हा आपले वडील तीर्थरूप राजश्री जैतोजी यादव देसमूख याणी तुम्हास व तुमचे भाऊ रा। अर्जोजी यादव यास येऊन सांगितले जे कर्याती मजकुरीचे देसमूखी दिवाणात अमानत होऊन भोसले याकडे चालत आहे. तरी तुम्ही या वतनाचा येत्न करून वतन सोडवणे. म्हणिजे अपण सदरहू वतनाची तिसरी तकसीम तुम्हास देऊ म्हणोन कबूल केले. त्यावरून तुम्ही उभयता बंधुनी वतनासाठी बहुतच श्रमसाहास केले. राजश्री थोरले कैलासवासी स्वामीचे वेळेसी रा। अर्जोजी यादव यास

पावनगडीचे इमारतीचा कार्यभाग होता तेव्हा इमारती पाहून राजश्री कैलासवासी स्वामीनी दोनी हजार होन २००० बकसीस दिल्हे. ते तुम्ही अपले पोता आणून मागती हुजूर सेरणी नेऊन दिल्हे. आणि कर्याती मजकुरीचे वतन मागितले. त्याउपरी राजेश्री संभाजी राजे छत्रपती याचे समई सेवा बहुतच येकनिष्ठपणे केली. खासा आपणास राहावयाबदल पाचवडामधे वाडा बांधावयाचे अज्ञा केली. आज्ञेप्रमाणे वाडा मुस्तेद[1] केला. तेव्हा वाडा पाहून राजेश्री बहूत संतोस पावोन दोनी हजार होन बकसीस दिल्हे. ते अपण घेऊन मागती हुजुर सेरणी देऊन कर्याती मजकुरीचे वतन मागितले. त्या उपेरी राजेश्री कवजी बावा याणी पाचवडामधे आड खाणावया हुकुम केला. त्याचप्रमाणे आड मुस्तेद केला. ते समई त्याणी होन बारासे बकसीस दिल्हे. ते हुजूर राजेश्री छत्रपती स्वामीस सेरणी देऊन कर्याती मजकुरीचे वतन देसमुखी मागितले. त्या उपरी पनाळाचे मोकामी घोडा येक येकून किमती होन येकसेसाठी दिल्हे व राजेश्री येसजी फर्जंद यास नख्त खुर्दा टके येक हजार देऊन राजेश्री छत्रपति स्वामीस अर्ज करून वतन देसमुखी मागितली. त्याउपरी राजेश्री राजाराम छत्रपति यांचे वेळेसी तुम्ही श्रम बहुतच केले. रायगडीहून पनाळेस गेले. ते समई तुम्ही सोने व वस्तभाऊ राजेश्रीचे नेऊन पनाळा प्रविष्ठ केले तेव्हा बकसीस दिल्हे ते हुजुर सेरणी देऊ(न) अपले वतन देसमुखी मागितली. त्या उपरी राजेश्री स्वार होऊन करनाटकास चालिले. मार्ग दुघ्रट देखोन आपले जडावस्तभाऊ सिवमोघ्याचे मोकामी देऊन आपण चंजीस गेले. ते समई तुम्ही आपले जिवाभ्य श्रम करून सदरहू जवाहीर वस्तभाऊ नेऊन राजेश्रीस प्रविष्ट केली. तेव्हा मेहेरबान होऊन पाच हजार चक्र बकसीस दिल्हे. ते हुजुर सेरणी देऊन कर्याती मजकुरीचे देसमुखी मागितली व अणिखीही कितेक वतनासाठी श्रम करून देसमुखी सोडऊन राजेश्री छत्रपति स्वामीची दुमाला पत्रे करून घेऊन आम्हाकडे पाठविली.

---

१ तयार.

त्यावरून वतनाचा अमल सुरळीत चालो लागला. यैसियास तुम्ही व आपण भाऊ आहो. पुर्वी तुम्हासी तीर्थरूप राजश्री जैताजी यादव देसमुख याणी मान्य केले आहे त्याप्रमाणे तकसिमेचा कथला तुटोन भावाभावानी सुरळीत वर्तावे याबदल अपण तुम्हाकडे अलो अणी सविस्तर अर्थ विदित केला. यैसियास तकसिमेचा कथला तरी तीर्थरूप जैताजी यादव याणी पदाजी यादव यास भाऊ करून गाव तीन वतन करून दिल्हे. बी ता॥

| मोजे कडेगांऊ | मौजे साखळी | मौजे कुंभारगाऊ |
|---|---|---|
| १ | १ | १ |

येकून तीन गाव दिल्हे. बाकी उरले देहे २४ चौवीस. पैकी वजा यादव कडेफुरकर याकडे देह मजकूर पूर्वी पासून चालत अले अहे ते हली व पेस्तर चालवावे लागते. यैसियास आपण दोघे भाऊ. त्यास गाऊ चालविला तरी तुम्ही चालवावा. आम्ही तेथे काही हक लाजिमा व इनाम घेऊन दखलगिरी तेथे करून तरी सदरहूची तिसरी तकसीम तुम्ही घ्यावी. आम्ही न घे तरी तुम्ही न घ्यावी. बाकी उरले देहे तेवीस. यैसियास सदरहूमधे इसाफतीचे गाऊ २ दोनी अम्हाकडे चालतील. तुम्ही त्यात काही न मागावे. बाकी उरले देहे २१ येकवीस. पैकी देसकुलकर्णी याचा इसाफतीचा गाऊ आहे. तेथील हक न घ्यावा व त्यानी अपले इसाफतीचे गावी हक न घ्यावा. त्यानी घेतला तरी अपण मौजे मजकुरी हक घेऊन त्यामधे तिसरी तकसीम तुम्हास देऊन बाकी देह २० वीस उरले. यैसियास सदरहूमधे तकसिमा तीन. राजेश्री सोमा जैताजी देसाई व रताजी देसाई व तुम्ही. यैसिया तीन तकसिमा येथाविभाग्ये अनभऊन सुखरूप असावे. त्यास खासा आमची तकसीम व सुलतानजी यादव यांची तकसीम कसबे मजकुरीचे देसमुखीच्या दोनी तकसिमा व गाव दस्तामलावरून वाटणी केली त्याप्रमाणे दोनी तकसिमा आम्हा उभयेता भावाकडे चालतील. बाकी

यक तकसिम तिसरा वाटा वसबे मजकुरीचे देसमुखी व दस्तामलावरून गाऊ तुमचे वाटणीस अले अहेत ते तुम्ही अनभऊन सुखरूप असावे. गाऊ बी ता ——————

| मौजे सोनसळ | मौजे सोनकीर | मौजे सिरसगाऊ | मौजे नेरली |
|---|---|---|---|
| १ | १ | १ | १ |

| मौजे व्याहापूर | मौजे हिंगणगाव बु॥ —— |
|---|---|
| १ | १ |

यकूण देहे साहा गाव व कवसाची देसमुखी तिसरी तकसिम तुम्हास दिल्हे आहे. देसमुखीची इसाफती जे असेल ते अमची आम्हाकडे चालेल. त्यामधे तुम्ही काही न मागावे. याप्रमाणे तकसीमाचे कथले तुटोन वाटणी जाहाली आहे. तरी तुम्ही आपली सदरहु तकसीम पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभऊन सुखरूप असणे. वडीलपणाचा सिका अम्ही करून तुमचे तकसिमेचा सिका तुम्हास दिल्हा आहे. तरी अपले तकसिमचा हक लाजिमा इनाम इसाफती कारभार करून असणे. यामधे अपण अगर सुलतानजी यादव अगर अपले भाऊबंद आणीही कोण्ही असतील त्याणी तुम्हासी कथला करावया समध नाही व तुम्ही सदरहु वाटणीखेरीज ज्याजती कथला करावयास समध नाही. हे जाणोन तुम्ही आपली तिसरी तकसिम पिडी दरपिडी अनभऊन सुखरूप असणे. जो कथला करील त्यास अपले बैतालिसाचे व श्री मुळपीठ देवीचे व श्री डोंगरजाईचे आण असे. हे जाणिजे. सदरहूप्रमाणे लेकराचे लेकरी सुरळीत वर्तावे. तुम्ही व आपण भाऊ असो. वडीलपणाचा सिका पानमान तश्रीफ कारभार दिवाणीचा आपणाकडे चालेल. तुमचे तकसिमांचा सिका तुम्हास दिल्हे अहे. त्याप्रमाणे आपला कारभार करीत जाणे. छ २० जमादिलाखर. स्वस्ति श्री शके १६२५ सुभान नाव सवस्तरे अस्विन

वदी सप्तमी तदिनी तक्षीमपत्र जाहले. सही. वळी सुमार १८७ येकसे सत्यायैसी.

मोर्तब

(पाठीमागे)

सिका

बी कलम———
कान्हो गुरुनाथ
गु॥ दि॥ जोती कृष्ण
देशपांडे क॥ मजकूर

---

**क्रमांक : १४०** **दि. २१–१०–१७०३**

नरसिंगराव यादव व गिरजोजी यादव ह्यांच्या कर्यात औंधच्या देशमुखी-संबंधी झालेला महजर.

श्री

स्वस्ति श्री नृप सालिवान शके १६२५ सुभाननाव संवस्तरे अस्विन बहुल सप्तमी गुरुवासर सुा सन अर्बा मया अलफ. छ २० जमादिलाखर. स्थल जागा कसबे पारसुभा जावळी. गोत हजीर मज्यालसी.

देसमुक

बी॥ कानो गुरुनाथ
गुमास्ते जोती कृस्ण
देशपांडे क॥ मजकूर

कर्यात मजकूर

मलोजी पाटील क॥ सेलगाव परगणे मजकूर
(निशाणी नांगर)

कृष्णाजी पाटील मौजे कडेपूर
(निशाणी नांगर)

सताजी पाटील मौजे
नेरली ———————
(निशाणी नांगर)

सैवखान पाटील मौजे कडेगाऊ
(निशाणी नांगर)

सिदोजी पाटील मौजे
सोनसळ ———————
(निशाणी नांगर)

आवाजी वताळ मौजे सुर्ली
(निशाणी नांगर)

वी।। बाबाजी जिवाजी परगणे कराड
कुलकर्णी मौजे सिरस-
गाव मौजे सोनसळ

सिदोजी पाटील मौजे वेहे
(निशाणी नांगर)

रामजी पाटील मौजे कासीळ
(निशाणी नांगर)

मौजे वाठार ता। तारगाव

राजजी पाटील व तानाजी पा।।
(निशाणी नांगर)

बहिरो मोरे
स्वरकुलकर्णी

तुळाजी ——————— नाईकवडी
(निशाणी कटचार)

कर्यात सिदाळे

संभाजी पाटील मौजे बोरगाव
(निशाणी नांगर)

वौजाजी न।। नाईकवडी
(निशाणी कटचार)

कर्यात निबवसोड (निंबसोड?) व मायेणी

मलजी पाटील मौजे चिखली
(निशाणी नांगर)

तुकोजी पाटील मौजे सिरवडी
(निशाणी नांगर)

ता। पाटण

संभाजी पाटील मौजे दिवसी
(निशाणी नांगर)

देवजी इडिळकर देसमुख
ता। मजकूर
(निशाणी कटचार)

दत्ताजी रणनवरे पाा मौजे राक प्रां।। पुणे
(निशाणी नांगर)

सुभानजी वलद भिकाजी मंडलीक देशमुख
तपे बारसी ——————————

(निशाणी नांगर)

त।। परेळी सुभा प्रांत सातारा

जनार्दन कासी देसकुलकर्णी
व गाव कुलकर्णी ताा माार

नागोजी तांबोळी ताा माार
(निशाणी पांटी?)

सांा कोरेगाऊ प।। वाई

नाईकजी बाजी प।।
व नाईकजी बाबाजी
पाटील मोकदकम क।।
कोरेगाऊस।। मजकूर
(निशाणी नांगर)

काा रहमतपूर
विठोजी पाटील
मोकदम
(निशाणी नांगर)

सकर सेटी सेटी खस-
व सदा सेटी सेटी खवसी
व सेटी माहाजन
(निशाणी तागडी)

त्रिबकराम कुलकर्णी
क।। माार
नाईकजी कडतोजी व
अणाजी शिबाजी पाा
मो।। मौजे धामणे
(निशाणी नांगर)

शामजी नरसिंह
कुलकर्णी मारफती
नरहरी तुकदेऊ
माहादजी वलद
मसजी नाईकवडी

मल्हारी चौगला

सजाजी प।। मोा मौजे
येकंब ——————————
(निशाणी नांगर)

संभाजी प।। मौजे लाहासुर्णे
(निशाणी नांगर)

माहातोजी पाटील मो।। मौजे तडवळ तुकाजी प।। मौजे

तुळाजी प।। मौजे कटडूर
(निशाणी नांगर)

मार ————
(निशाणी नांगर)

कि।। कर्यात अउद

जोती प।। मौजे बाऱ्हापूर
(निशाणी नांगर)
हणगोजी चौ।। मौ।।
मार

याच विदमान राजश्री नरसिंगराव यादव देसमुख का आऊद यानी राजश्री गिरजोजी यादव देसमुख क।। मजकूर यासी करून दिल्हा महजर यैसाजे. कर्याती मजकुरीची देसमुखी पुरातन आपली आहे. त्यासमधे मुधोजी वणगोजी निंबाळकर यानी पुंडावे केले. त्यासमई अपले वडील त्यास भेटोन कर्याती मजकुरीचा तह केला. हे वर्तमान कऱ्हाडी फौजदार होता त्याने अदलशाा पातशा यास वाका दाखल केला. त्यावरून यादवाची देसमुखी अमानत करून बारा वजिरास दौलतेचे पुरवणीस दिल्हे. (इ. इ. पत्र क्र. १३९ प्रमाणे पुढील मजकूर आहे म्हणून तो येथे दिला नाही).

---

**क्रमांक : १४१** **दि. ३–११–१७०३**

एलिएनेशन् ऑफिसमधील शाहू दप्तरातील हा उतारा आहे. दि. ३–११–१७०३ रोजी निघालेल्या राजपत्रांचा यांत उल्लेख आहे.

राजमंडल

सू॥ अर्बा मया व अलफ

फेरिस्त कागद दी॥ रा॥ नागोजी गोविंद सभासद नामजाद जकाती माहालानीहाये प्रांत कल्याण भीवडी व सुभा जुनर सू॥ आर्बा मया व अलफ. छ ४ रजब.

लस्करचे सरदारास रह–दारीची पत्रे वाणी अमदरत्फी करती त्यास वाटेस उपसर्ग न करावा म्हणोन पत्रे ११ जकातीचे साहीतेविसी पत्रे.

राजश्री प्रधान पंतास पत्रे

१ साहेतेविसी

१ येसु तेली उबरे यावीसी

---

२

१ रा॥ केदारजी धोत्रे बारा हजारी यास

३ हवालदार कीलेहाये

१ किले श्रीवर्धन.

१ किले मनरंजन.

१ किले सुधागड.

---

३

वाणीयार परमुलुखी पाठवावयास अभयपत्रे डोले सुमार १३

येसु तेली उबरे यांस साल गुदस्ता रा॥ प्रधान पंती राज-माचीस धरून नेऊन धामधूम केली. त्याचा यक बैल व यक घोडे घेतले. त्याचे त्यास परतवून देवीले आहे. आणि त्यास पुढे आमदरत्फी अभयपत्र १.

रा॥ हिंदुराव घोरपडे यां-कडील सरदेशमुखीचा यैवज जमा तिकडील हुजूर ठेवीला तो उसूल नागोजी गोविंद याकडे लाविला आहे याविसी पत्र.

किर्द रोखे कमावीसदारानी

१ जकाती मीठबंदर पेडी

१ जकाती तळघाट तेल बैला

गोरोजी लोहर ( ट ? ) व मंबाजी सावंत व सखोजी शिंदे व सोन सावंत व गुणाजी सीदे सरदार हशम जमाव राजमाची यास पत्र.

रा॥ बयाजी रघुनाथ सुभेदार प्रांत कल्याण भीवडी

३ मोकादम सेटीये व माहा-जन सुभा जुनर याणी जकातीचे पथकीयांस गावात जागा देऊन जकाती सुरलीत चालती करावी यास पत्रे

१ कसबे खेड.
२ तळेगांव गाधाडी.
३ कसबा पाबल.

---

३

म्हसाजी फडतरे दी॥
सेनापती

येसजी कुडवे जंजीरे खांदेरी यास पत्र

---

१३

सुभेदार माहालनिहाये यास पत्र जान सेठी ...... इंदापूरकर यास गंव्या विसी मार्गी तोस्ट लावावयास गरज नाही म्हणोन पत्र १.

रा ॥ तिमाजी जगदाले व खंडो वैजनाथ ठाणे पणवेली पर-राज्यात पत्र १.

वसील पत्र ईरसाल रसद जमा यैवज हुजूर छ २ जमादिलावल रु॥ व जमा व रुपये २९८॥।

क्रमांक : १४२ दि. ११-११-१७०३

कर्यात हुकेरीचा मोकासा पिराजी घोरपडे ह्यांच्याकडे असून सदर्हु कर्यातीतील सात खेड्यांच्या मोकाशाचा कारभार नारो महादेव ह्यांच्याकडे दिला असल्याचे छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे आज्ञापत्र.

श्री

असल बा। नकल

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ३० सुभानु संवत्सर कार्तिक शुध्घ चेतुर्दसी गुरुवासर क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शिव छत्रपती याणी ______________________

| सिका पेशवे | सिका प्रतिनिधी | देशमुख देसपाडे कर्याती प्रात हुकेरी यासी आज्ञा केली येसिजे. कर्यात मजकूर पैकी खेडी साल गुदस्ता राजश्री पिरजी घोरपडे याकडे मोकासा आहे. बी तपसील |
|---|---|---|

| पटणकुडी | वालकी | सिरगोपी | निपाणी तमाणा देसाई |
|---|---|---|---|
| १ | १ | १ | १ |
| गडइगलज आणापा डोगरे | आकोबा आणापा डोगरे | | कुटाली आनापा डोगरे |
| १ | १ | | १ |

येकूण सात खेडी मोकासा आहेत तेणेप्रमाणे साल मजकूरी करार केली असती. येसियास मशारनिलेचा कारभार राजश्री नारो महादेव यास सागितला आहे. तरी तुम्ही नारो महादेव याचे आज्ञेप्रमाणे वर्तोन सदहू गावीचे खंडणीप्रमाणे येवज याकडे बिलाकुसूर पावीत

जाणे. खलेल एक जरा न करणे. निदेस समक्ष. मोर्तब सिकायाचे.
रुजु सुरुनिसी

---

**क्रमांक : १४३** **दि. २८-११-१७०३**

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांच्याकडून गिरजोजी यादव ह्याना मिळालेली एक महत्वाची सनद.

श्री
प्रतिपच्चंद्र
लेखेव वर्धिष्णुर्वि
स्ववंदिता रामसू
नो: शिवस्यैषा मुद्रा
भद्राय राजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ३० सुभानु संवत्सरे मार्गसीर्ष शुध प्रतिपदा रविवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति

श्रीशि
व नरपति
हर्षनिदान मो
रेश्वर सुत नील
कंठ प्रधान

श्री आईआ
दिपुरुष श्रीराजा
शिवछत्रपती स्वामि
कृपानीधि तस्य प
रशुराम त्रिंबक
प्रतिनीधि

याणी राजश्री गिरजोजी बिन मुधोजी यादव देशमुख पाा कराड यास दिल्हे वृतिपत्र ऐसेजे. तुम्ही किले प्रतापगडीचे मुकामी स्वामी समीप विनंती केली की पाा मजकुरची देशमुखी व मौजे गोवारे ताा हवेली कऱ्हाड येथील मुकादमीचे वतन पुरातन यादवांचे. त्यास पूर्वी अदलशाहा विजापुरी पातशाही करीत असता (मुधोजी) वणगोजी निबाळकर याणी पुंडावे करून मूलुक मारू लागला. त्याकरिता यादव देशमुख (मुधोजी) वणगोजी निंबाळकर यास भेटोन परगणियास कौल घेतला. हे वर्तमान कऱ्हाडी पातशाकडील मुकासदार होता त्याणे हुजुर लिहिले की यादव (मुधोजी) वणगोजी निंबाळकरास भेटोन परगणियाची

खंडणी देताती. आपणाकडे सुरळीत वर्तत नाही. त्यावरून पातशा इतराज होऊन पाा मजकूरच देशमुखीचे वतन मौजे गोवारे येथील मुकादमीचे वतन अमानत करून वजिरास दौलतेचे पुरवणीस दिल्हे. सवेच दुसऱ्या वजिराचे दौलतेचे पुरवणीस दिल्हे. या प्रकारे ज्या वजिरास कऱ्हाड मुकासा देत आले त्याचे दौलतेचे पुरवणीस दोन्ही वतनें देत आले. ऐसे साता आठा वजिराचे दौलतेस मुकासा देत आले. त्याउपरी रणदुलाखानाचे दौलतीचे पुरवणीस वतन दिल्हे. त्याकडे कितेक दिवस चालत असता पातशाहानी रणदुलाखानाकडून दूर करून माहाराज राजश्री शाहाजी राजे यास देशमुखीचे व गोवारीचे मुकादमीचे वतन दिल्हे. त्या दिवसा पासुन त्याकडे चालत होते. त्याउपरी थोरले कैलासवासी स्वामीनें कऱ्हाड प्रांत कबज केलीयावरी पाा मजकुरचे देशमुखीचे व गोवारीचे मुकादमीचे वतन आपणच अनभविले. पाा अउद देह २७ सतावित येथील देशमुखीचे वतन पूर्वापार यादवांस चालत होते. त्यास थोरले कैलासवासी स्वामीचे वेळेस राजश्री जनार्दन नारायण सरकारकून आउदास श्री येमाईच्या दर्षेनास अले तेव्हां यादवापासून कांहीं अंतर पडिलेसें समजोन अउंदची देशमुखी अमानत केली. त्या दिवसापासून पाा कऱ्हाड व अउंद येथील देशमुखीचे वतन व गोवारे याचे मुकादमीचे वतन दिवाणात चालिले. त्याउपरी या प्रांते ताम्राचे उलंबण विशेष जाहाले या निमित्य कैलासवासी स्वामी निघोन कर्नाटकप्रांते चंजीस गेले. तेथे आपण जाऊन निष्ठेने सेवा केली. वतनानिमित्य शेरणीही दिवाणात दिल्ही. याकरिता कैलासवासी स्वामीनें पाा अऊंद देह २७ सताविस येथील देशमुखी वतन अजरामऱ्हामत करून दिल्हे. त्या उपरी आपण दिवाणात शेरणी होन प्रलयेघटी २००० दोनी हजार देऊन वतनाविषी विनंती केली. तेव्हा मेहेरबान होऊन ताा उबरज देह ३० तीस व तर्फ तारगाव देहे २४ चोविस येकून चोपना गावीची देशमुखी अजरामऱ्हामत करून देऊन

पत्रे दिल्ही. वरकड पाा कऱ्हाड देह ८७ सत्यांइसी येथील देशमुखी दिवाणातच चालत होती. त्याउपरी माहादजी जगदळा मसूरचा पाटील याणें चंजीचे मुकामी कैलासवासी स्वामीसनीध जाऊन गैरवाका विदित करून ताा मसूर येथील देशमुखी मागोन घेऊन पत्र करून घेतले. याप्रकारें कितेकानी या वतनाविषी गैरवाका विदित करून पत्रें घेतली आहेत. त्यानंतर स्वामीचा जन्म शुभकाली चंजीमधे जाला. हे संतोष वर्तमान आपण कैलासवासी स्वामीस श्रुत केलें तेव्हा कृपाळू होऊन वकसीस नेमिले. ते आपण दिवाणात शेरणीस देऊन वतनाविषी विनंती केली. तेव्हां मेहेरवान होऊन पा। मजकुरचे वतन अजरामऱ्हामत करून द्यावेसे अभये दिल्हे. जुलपुकारखान बाहादुर याने चंजीस परीघ घालून चंजी हस्तगत केली. कैलासवासी स्वामी अगोधर स्वार होऊन वेळुरास आले. स्वामी कोटात असता परमसाहास करून ताम्राचे सेनेतुन स्वामीस व मातुश्री आई साहेबास काहाडून वेळुरास आणून पाविले. तेथून कैलासवासी स्वामीचे व स्वामीचे आगमन या प्रांते विशाळगडास जाहाले. त्याउपरी कितेका दिवसी कैलासवासी स्वामी जालन्हापूरचे स्वारीस जाऊन परतोन किंले सिहगडास आले. तेथे त्यास कैलासवास जाला. हे राज्य श्रीचे वरदी सताविस पिढियाचे. या राज्याचे संरक्षण जाले पाहिजे म्हणोन स्वामी सुमुर्ते सिंव्हासनारूढ जाले. ते प्रसंगी आपणावरी कृपाळू होऊन आपणापासून पूर्वी सेवा घडोन आली त्याचे स्मरण करून पा। कऱ्हाडचे देशमुखीचे वतन व मौजे गोवारचे मुकादमीचे वतन अजरामऱ्हामत करून दिल्हे. परंतु ते वतन अपणास सुरलित चालत नाही. ऐशास आपण स्वामीचे कदीम सेवक. यकनिष्ठ आहों. आपले वडील भाऊ अर्जोजी यादव याणी व आपण स्वामी सेवा बहुतच निष्ठेने केली आहे. सांप्रत आपणही निष्ठेने सेवा करीत आहो. वतनाविषी थोरले कैलासवासी स्वामीचे वेलेस व राजश्री संभाजी राजे काका यांचे वेलेस व राजश्री कैलासवासी स्वामीचे वेलेस प्रसंग करीत आलो आहो. कैलासवासी स्वामीने सारे वतन

आपणास मेहरबान होऊन दिल्हे. स्वामीनेहि दिल्हे आहे. ते सुरलित चाले ऐसी आज्ञा केली पाहिजे म्हणोन विदित केले. त्यावरून देशमुखीच्या वतनाचे व मुकादमीचे वर्तमान पूर्वोतर मनास आणिता पूर्वी अदलशाहाचे कारकिर्दीस व मुग्दोजी (मुधोजी) निंबाळकर याणी पुंडावे करून देशास आजार दिल्हा म्हणोन यादव देशमुख याणी कौल घेऊन उपद्रव वारिला. याबदल पातशाहानी इतराजी मानून देशमुखीचे वतन व गोवारियाचे मुकादमीचे वतन अमानत करून सात आठ वजिरास व रणदुलाखानास दौलतेचे पुरवणीस मुकासा दिल्हा. त्याकडून दूर करून माहाराज राजश्री शाहाजी राजे यास दोन्ही वतने दिल्ही. त्या दिवसापासून देशमुखीचे वतन व मुकादमीचे वतन दिवाणात चालिले. थोरले कैलासवासी स्वामीचे वेलेस पनालियाचे मुकामी अर्जोजी यादव व पदाजी यादव याणी जाऊन वतनाविषी रदबदल केली ते प्रसंगी थोरले कैलासवासी स्वामीने सिवसेटी सेटया काा कऱ्हाड यास मधे उभे करून बोलले की पाा मजकुरची देशमुखी व गोवारेची पाटेलगी यादवांची होती. परंतु पादशाहानी आमानत करून वजिरास मुकासा देत आले. त्याउपरी माहाराज राजश्री शाहाजीराजे यास दिल्हे. त्या दिवसापासून देशमुखीचे व पाटेलगीचे वतन आपण अनभवीत आहो. यादवाचा बहुत दिवस भोगवटा तुटला. याउपरी यादवास या वतनाविषी रदबदल करावयास संमध नाही म्हणोन आज्ञा केली. त्याउपरी पावनगडची इमारत पाहात असतां हिरोजी फर्जंद याणे थोरले कैलासवासी स्वामीजवळ विनंती केली की अर्जोजी यादव याणी स्वामीची सेवा बहुत निष्ठेने केली. सांप्रत इमारतीच्या कामावरी सीमे परता श्रम करीत आहे. त्याकरिता स्वामीने कृपाळू होऊन पाा मजकुरचे देशमुखीचे व मुकादमीचे वतन यास मऱ्हामत केले पाहिजे. त्यावरून थोरले कैलासवासी स्वामीनी अर्जोजी यादव यास बोलाऊन आणून मेहेरबानीने बोलले की तुम्ही निष्ठेने सेवा करीत अहा. या करिता हे वतन तुम्हास देऊन ऐसे अभये दिल्हे.

ऐशास गिरजोजी यादव याचे भाऊ अर्जोजी यादव या राज्यातील कदीम सेवक सेवा यकनिष्ठेने करीत आले आहेती. थोरले कैलासवासी स्वामीची सेवा उभयता बंधूनी बहुतच निष्ठापूर्वक केली. प्रतापगडची इमारत त्वरेने मुस्तेद करावी म्हणोन थोरले कैलासवासी स्वामीने प्रतापगडी अर्जोजी यादव यांस इमारतीचा सुभा सांगितला ते समई कस्त करून स्वामीचे आज्ञेप्रमाणे सारी इमारत सिध करून किला मुस्तेद केला. त्याउपरी किले पावनगड नवा वसविला. तेथील इमारत मुस्तेद करावयाविषी आज्ञा केली. त्याप्रमाणे त्याणी तोहि किला मुस्तेद केला. थोरले कैलासवासी स्वामी इमारत पाहोन मेहरबान होऊन बकसीस होन पा। ५००० पाच हजार नेमिले. ते मशारनिलेनी दिवाणात शेरणीस देऊन वतन मागितले. ते समई त्याहि हे वतन तुम्हास दिल्हे ऐसे अभय देऊन स्वार होऊन रायगडास गेले. अर्जोजी यास पावनगडी ठेविले. वतनाचे कागदपत्र करून द्यावे तो इतकियात थोरले कैलासवासी स्वामीने रायगडी कैलासवास केला. कागदपत्र व्हावे तो प्रसंग तैसाच राहिला. त्याउपरी राजश्री संभाजी राजे काका सिव्हासनारूढ जाले. त्यांचीही सेवा यकनिष्ठेने तुम्ही उभयता बंधूनी बहुतच केली. पनाळियाचे मुकामी तुम्ही दिवाणात शेरणीस होन पा। १०० येकसे व खुर्दा टके १००० यक हजार व खासा स्वारीस घोडा आरबी उतम १ यक ऐसे देऊत वतनाविषी विनंती केली. तेव्हा रायेगडास गेल्यावरी वतनाची पत्रे देऊन म्हणोन अभय देऊन स्वार होऊन रायगडास आले. तेव्हा रायगडचे माचीस खासा राहावयास पाचवडामधे राजमंदीर मुस्तेद करावयाविषी अर्जोजी यादव यास आज्ञा केली. ते त्यानी आज्ञेप्रमाणे श्रम करून राजमंदीर मुस्तेद केले. तेव्हा राजश्री संभाजी राजे काका याणी मेहरबान होऊन बकसीस होन पा। ५००० पाच हजार देविले. ते मारनिलेनी दिवाणात शेरणीस देऊन या वतनाविषी विनंती केली. तेव्हां राजश्री संभाजी राजे काका यांणी हे वतन मशारनिलेस द्यावे असा निर्वाह केला.

ते प्रसंगी कारबाराचा येख्तीयार कवि कलश यावरी होता. ते सनीद नव्हते म्हणोन कागदपत्र होऊन आले नाही. मातुश्री दुर्गाबाईसाहेब ताम्राचे निर्बंधी दौलताबादेस होती. त्यांचे वर्तमान न कळे तेव्हा परामर्षो करावयास संभाजी राजे काका याणी तुम्हास पाठविले. तेथे तुम्ही जाऊन जिवाभ्य श्रम करून संकट प्रसंगात त्याची भेटी घेऊन येऊन वर्तमान श्रुत केले. त्याउपरी संभाजी राजे काका कोकणचे मसलतेस गेले होते. कवि कलशासमागमे असता संगमेश्वरच्या मुकामी तुम्ही वतनाविषी विनंती केली तेव्हा नख्त सेरणी होन २००० दोनी हजार दिल्हे. ते प्रसंगी रा। संभाजी राजे काका मेहेरबान होऊन पा। मजकूरचे देशमुखीचे व गोवारेचे पाटेलगीचे वतन आजरामऱ्हामत करून पत्रे देविली. राजमुद्रा होऊन पत्रे कारकुनाकडे सिके निशाणास गेली. सरकारकुनाची निशाणे सिके होऊन पत्र सिध्द करून द्यावी तो तेच दिवशी सेख निजाम गनीम याणे छापा घातला. रा। संभाजी राजे काका व कवि कलश ताम्रास हस्तगत जाले. ते समई ती वतनाची पत्रे गेली. तोही प्रसंग तैसाच राहिला. त्याउपरी तीर्थस्वरूप कैलासवासी राजश्री स्वामी रायगडी सिंव्हासनारूढ जाले. तेव्हा तुम्ही समीप जाऊन त्याची सेवा निष्ठापूर्वक करून लागलेस इतकियात ताम्राची फौज रायगडास आली म्हणोन कैलासवासी स्वामी स्वार होऊन प्रतापगडास आले. तेथून तुम्हास सोने व जवाहीर आणावयास रायगडास पाठविले. प्रतापगडी मुकाम असता हा देश ताम्राक्रांत जाला. म्हणोन कैलासवासी स्वामी स्वार होऊन किले पनाळियास गेले. रायगडाकडील मार्गावरोध जाला. ऐशा प्रसंगात तुम्ही रायगडाहून सोने व जवाहीर परम संकटातून आणोन पनाळियास पाविले. तेव्हा कैलासवासी स्वामीने हे वतन तुम्हास दिल्हे म्हणोन अभय दिल्हे. इतकियात तेथे ताम्राच्या फौजाची रेज[1] जाहाली. तेथून कैलासवासी स्वामी स्वार होऊन

---

१. रांग.

कर्नाटकात चालिले. मार्गी जात असता सिवमोघाचे मुकामी ताम्रानी गाठ घातली. फौज ताम्रास हस्तगत जाली होती. लक्षाचे जवाहीर तुमचे स्वाधीन करून कैलासवासी स्वामी जरोर निघोन कर्नाटक प्रांते चंजीस गेले तेव्हा तुम्ही मागे राहोन संकट प्रसंगात जिवाची आशा सोडून दो ती लक्षाचे जवाहीर बहुत येत्ने करून मार्गीचे संकट सोसून नेऊन चंजीस पाविले. तेव्हा जवाहिराच्या वस्ता उंच उंच वडिलार्जित अक्षतमरिष्ठ[1] होऊन आले. तया करितां कैलासवासी स्वामी संतोषी होऊन पारतोषिक नेमिले. ते तुम्ही दिवाणात शेरणीस देऊन हे वतन मागितले. ते समई कर्यात अऊंद देहे २७ सतावीस यथील देशमुखीचे वतन अजरामऱ्हामत करून देऊन राजपत्रे दिल्ही आणि तुम्हास दरूनी माहालाकडील सरहवाला सांगितला. तेथें निष्ठेने सेवा करीत असता सौ. सोइराबाईचा जन्म जाहाला. ते वर्तमान तुम्ही कैलासवासी स्वामीस श्रृत केले. त्यावरून संतोषी जाले. तेव्हाही हे वतन तुम्हास दिल्हे म्हणोन आज्ञा केली. ते प्रसंगी तुम्ही होन प्रलये-घटी २००० दोन सहस्त्र दिवाणात शेरणी दिल्हे. तेव्हा तर्फ उबरज देहे ३० तीस व तर्फ तारगाव देहे २४ चोविस येकूण चौपन गावाची देशमुखी तुम्हास अजरामऱ्हामत करून देऊन राजपत्रे दिल्ही. त्याउपरी तेथे माहादजी जगदळा मसूरचा पाटील जाऊन गैरवाका विदित करून तर्फ मसूर यथील देशमुखीचे पत्र करून घेतले. तरी मसूर काही सतंतर माहाल नव्हे. कऱ्हाड परगणियाखालील मसूर तर्फ आहे. या करिता माहादजी जगदाळा याणे मसूर तर्फेचे देशमुखीचे पत्र करून घेतले ते बास्कलच[2] घेतले. त्यास देशमुखीसी समंध नाही व पत्र करून घेतले ते प्रमाण नाही. तदनंतर शुभकाली स्वामीचा जन्म जाहला. हे संतोष वार्ता तुम्ही कैलासवासी स्वामीस श्रुत केली. पुत्रोत्सव जाला म्हणोन कैलासवासी स्वामीने संतोषें करून पारतोषिक तुम्हास द्यावयास नेमिले.

---

१. कांहीं इजा न होता.

२. बाष्कळ, खोटे.

तेही तुम्ही दिवाणात सेरणीस देऊन या वतनाविषी विनंती केली. तेव्हा राजश्री स्वामीने कृपाळू होऊन ताा मजकुरचे देश मुखीचे व पाटेलगीचे वतन द्यावयाचा निर्वाह केला. पत्रे करून द्यावी तो ताम्राची फौज जुलपुकार खान गनीम चंजीस परीघ घालावयास आला तेव्हा कैलासवासी स्वामीने राजकारण प्रसंग जाणोन ताम्रासी सख्य केले. ते प्रसंगी राजा कर्ण भोसले यास ताम्राकडे पाठवावयाचा निश्चय जाला. समागमे मतबर मनुश्ये असावी काय निमित्य की ताम्रासी सख्य रक्षून संकट प्रसंगी राजा कर्णास काहाडून आपणासनीध आणावे. या निमित्य राजश्री शंकराजी मल्हार सुमंत व तुम्ही शाहाणे युक्तवान म्हणोन राजा समागमे देऊन जुलपुकारखानाचे सेनेत पाठविले. तेथे जाऊन तुम्ही राजश्रीचे आज्ञेप्रमाणे सेवा करून राजकारण प्रसंग रक्षून राजा कर्णासमागती अक्षतमरिष्ट राजश्रीसनीध आणिले. ते समई राजश्री स्वामी संतोषी होऊन शंकराजी मल्हार यास पारतोषिक चक्रे १००००० यक लक्ष चक्रे व तुम्हास चक्रे ५०००० पनास हजार दिल्हे. पंनास सहस्र चक्रे म्हणजे यक लक्ष रुपया जाहाला. तो तुम्ही शेरणीनिमित्य दिवाणात देऊन या वतनाविषी विनंती केली. तेव्हा सारे देशमुखीचे वतन व गोवारांचे पाटेलगीचे वतन द्यावयाची आज्ञा करून पत्रे देविली. पत्र सिध करून द्यावी तो इतकियात ताम्राने चंजीस लगट केला. संकट प्रसंग जाणोन मातुश्री आईसाहेबास व मातुश्री राजसबाई साहेबास व सौ।। सोइराबाईस व स्वामीस चंजीमधे ठेविले ते समई चिरंजीव राजश्री संभाजीराजे यांचा संभव मातुश्री राजसबाई साहेबाचे उदरी जाला होता. म्हणोन जवळ तुम्हास ठेऊन कैलासवासी स्वामी निघोन वेळुरास गेले. ताम्राने लगट करून चंजी हस्तगत केली. चंजीमधे मनुश्यमात्र होते तितके ताम्रास हस्तगत जाहाले. ऐशा दुर्घट प्रसंगात तुम्ही परमसाहास करून स्वामीस व सौ।। सौइराबाईस व उभयता मातुश्री आईसाहेबास

बहुत युक्तीने काहाडून आणून वेळुरास पाविले. तेव्हा कैलासवासी स्वामी कृपाळू होऊन जिवावितरिक्त जे तुम्ही मागाल ते देतो म्हणोन आज्ञा करून सारे वतन तुम्हास देविले. पत्रे करून द्यावी तो सवेच राजश्री स्वामी स्वार होऊन देशास चालिले. मार्गी स्वामीची व मातुश्री साहेबाची सेवा तुम्ही बहुतच केली. देशास आलियावरी चिरंजीव संभाजीराजे यांचा उदरी संभव होता म्हणोन मातुश्री राजसबाई साहेबास विशाळगडी ठेऊन कैलासवासीने स्वामी समागमे घेऊन प्रतापगडास श्री च्या दर्षेनास आले. परतोन हेळवाकच्या मुकामास गेले तो चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांचा विशाळगडी जन्म जाहाला. हे वर्तमान हेळवाकच्या मुकामास आले ते तुम्ही राजश्री स्वामीस श्रृत केले. त्या संतोष समई वतनाविषी विनंती केली तेव्हा सारे वतन द्यावयाची आज्ञा केली. परंतु लष्करचा मनसबा किले सातारियास जाऊन करणे आहे म्हणोन तेच समई मातुश्री आईसाहेबास व स्वामीस पुढे केले. सजनगडास रवाना करून राजश्री स्वामी चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांचे नामकर्ण करावया निमित्य स्वार होऊन विशाळगडास गेले. नामकर्ण मुहुर्तसमई मातुश्री राजसबाई साहेबी विनंती केली की गिरजोजी यादव याणी संकट प्रसंगातून चंजीहून आपणास काहाडून आणिले याकरिता कराडचे देशमुखीचे व गोवाराचे पाटेलगीचे वतन यास दिल्हे पाहिजे. तेव्हा राजश्रीने सारे वतन द्यावयाचा निश्चय करून पत्रास परवानगी दिल्ही. ते समई तुम्ही विशाळगडी नव्हतेस. स्वामी जवळ सजनगडी होते. म्हणोन राजपत्रे जाली नाहीत. सवेच कैलासवासी स्वामी फौजेनसी पून्हा कर्नाटकात स्वारीस गेले. परतोन विशाळगडास आले. तेथे मातुश्री साहेब व स्वामी सजनगडीहून आले. त्याउपरी चिरंजीव सौ॥ अंबिकाबाई यांचा जन्म जाहाला. त्या संतोष समई तुम्हास वतनाची पत्रे द्यावयाची आज्ञा केली. पत्रे व्हावी तो कैलासवासी स्वामी कोकणातून किले सातारियास गेले. तेथून मातुश्री

आईसाहेबास व स्वामीस विशाळगडास रवाना करून आपण जालन्हापुराकडे स्वारीस गेले. परतोन सिंहगडास आले तेव्हा त्याणी तेथे कैलासवास केला. याकरिता तुम्हास वतनपत्रे होऊन यावी ते न जाली. त्याच वेळेस साऱ्या वतनाची पत्रे जाली नाहीत. का। आऊद व ता। उबरज व तारगाव येथील देशमुखीची राजपत्रे कैलासवासी स्वामीची जाहाली आहे ती सारे वतनाविषी वाचादत जाले होते. त्याउपरी विशाळगडी स्वामी सिहा(सना)रूढ जाहालियाउपरी स्वामी निमित्य व स्वामीच्या राज्यानिमित्य बहुतच श्रमसाहास करीत आहा. पुर्वीपासून श्रम साहास व निष्ठेने सेवा करावयास अंतर केले नाही. याकरिता तुमचे वंषपरंपरेने चालवणे स्वामीस अवश्य म्हणोन स्वामी कृपाळू होऊन पा। कऱ्हाडचे देशमुखीचे वतन व मौजे गोवारे पा। मार येथील मुकादमीचे वतन तुम्हास अजरामऱ्हामत करून दिल्हे. ते समई तुम्ही रा। विठोबा नाईक सत्यवादी साहुकार याचे कर्ज घेऊन दिवाणांत शेरणी रुपये ५००० पाच हजार रोख दिल्हे. इतकियात खटावीच्या कुलकर्णी खंडो लिंगो याणे तोतया करून राजश्री संभाजी राजे याचा पुत्र आपण शिवाजी राजे आपले नाव म्हणोन राज्यात डोहणा आरंभिला. ते प्रसंगी परस्पर सर कारकुनात हर्षामर्ष निर्माण जाहाला. तेव्हा धामधुमेत पत्र जाहले ते जयसिंग जाधवराऊ सेनापति याणी आड घालून पिराजी यादव व पदाजी यादव व गिरजोजी यादव व समध नसता धनाजी जाधव देशमुख पा। मजकूर म्हणोन पत्र आपलेच विद्यमाने लेहोन गलबलियात मुद्रा करून घेतले. तुम्ही आपले नावे पत्र करून घ्यावे तरी पनाळियास औरंगजेब पातशा येऊन बिलगला. तो किला हस्तगत करून विशाळगडास आला. दिवसेदिवस संकट प्रसंग होत चालिला. स्वामीस विशाळगडाहून प्रतापगडास यावे लागले. यामुळे गडाकिल्याची बेगमी करणे व स्वामीची सिश्रूशा करणे या कसालियामुळे तुम्हास वतनाची खटपट करावयास अनकुल पडिले नाही. हाली वतनाविषी तुम्ही विनंती केली त्यावरून मनास आणिता

व शास्त्र संमते कडून निर्णय पाहता प्रांतमजकूरची देशमुखी व गोवाराची पाटेलगी यादवाचे वतनपूर्वी होते ते दूर होऊन बहुत दिवस भोगवटा तुटला आहे. या करिता अतःपर वरकड यादवास सदरहू दोन्ही वतनासी अर्थाअर्थी समंध नाही. तोतयाच्या प्रसंगात जाधवराऊ याणी आड घालून समध नसता पत्र करून घेतले ते प्रमाण नाही. तुम्ही थोरले कैलासवासी स्वामीचे वेळेपासून निष्ठेने सेवा बहुतच करीत आले अहा. वतनानिमित्य टका पैका होन हालगा दिवाणात दिल्हा अहा. रुपये येकंदर बेरीज वी त॥————

रोख दिवाणात पोता रसद दिल्ही रुपये————

७१७५ रा संभाजीराजे याचे वेळेस

६५०० पाचवडीहोन

पा। २०००

दर ३॥ रुा या।

६७५ पनाळीयाचे मुकामी दिल्हे————

३५० टके १०००

३२५ होन पा। १००

———

६७५

———

७१७५

तुम्हास बकसीस दिल्हे होते ते तुम्ही दिवाणात शेरणीस दिल्हे रुपये

१६२५० थोरले कैलासवासी स्वामीचे वेळेस प्रतापगड व पावनगड मुस्तेद केला म्हणोन अर्जोजी यादव यास बकसीस दिल्हे होन पा। ५००० दर ३। ये.

१६२५० रा संभाजी राजे काका याचे वेळेस पाचवडी राजमंदीर मुस्तेद केले तेव्हा अर्जोजी यादव यास बकसीस दिल्हे होन पा। ५००० दर ३। येकून रुपये

७५०० कैलासवासी स्वामीचे वेळेस पावले मुकाम चंजी होन प्रलयघटी २००० दोन हजार दर रुा ३।।। प्रो

५००० विशाळगडाचे मुकामी दिवाणात दिल्हे गुा विठोबा नाईक

———

१९६७५

राजश्री संभाजी राजे काका याचे वेळेस पनाळियाचे मुकामी घोडा आरबी खासा बैसावयास दिल्हा उच माली रास............

१

१००००० कैलासवासी स्वामीचे वेळेस राजा कर्ण भोसले यास ताम्राचे सेनेतून आणिले म्हणोन बकसीस दिल्हे चक्रे ५०००० या

———

१३२५००

कैलासवासी स्वामीचे वेळेस शिवमोघाहून जवाहीर चंजीस नेले ते प्रसंगी स्वामीचा जन्म जाहला ते समई बकसीस नेमिले होते.

येणेप्रमाणे तुम्हाकडील द्रव्य व घोडा दिवाणात सेरणीस पावले. याकरिता स्वामी कृपाळू होऊन पा। मजकुरचे देशमुखीचे सारे वतन व गोवाराचे मुकादमीचे वतन बहुत दिवस दिवाणात चालिले ते खासा स्वामीचे वतन म्हणोन तुम्हास अजरामऱ्हामत करून दिल्हे आहे. वतन बी।। ————

तीर्थस्वरूप कैलासवासी स्वामीने देशमुखीचे वतन तुमचे दुमाला करून राजपत्रे दिल्ही आहेती[1] ——

[1] येथें गांवांचा तपशील आहे. तो घेतलेला नाही.

हाली स्वामीनें तुम्हावरी कृपाळू होऊन देशमुखीचे व मुकादमीचे वतन अजरामऱ्हामत करून दिल्हे आहे. पा। कऱ्हाड येथील देशमुखी देहे.[1]

मौजे गोवारे पा मार येथील मुकादमीचे वतन दिल्हे आहे. देहे १ येणेप्रमाणे येकसे अष्टष्ठी देहे गावीची देशमुखी व मौजे गोवारे येथील मुकादमीचे वतन अजरामऱ्हामत करून दिल्हे आहे. सनद निराळी देशाधिकारी प्रां मजकूर याचे नावे सादर केली आहे. तरी तुम्ही हे वतन सदरहूप्रा देशमुखीचे व मुकादमीचे वतन पुत्र-पौत्रादि वंषपरंपरेने अनभवीत जाणे. या वतनास हक लाजिमा इनामत इसापति पानमान तश्रीफ सिका नांगर पालक व बाजेबाब पुर्वी चालल्याप्रमाणे तुम्ही वंषपरंपरेने अनभवित जाणे. या वतनाचा यादवास भोगवटा बहुत दिवस तुटोन वतन स्वामीने अनभविले. यादवास अर्था अर्थी या वतनासी समध नाही. तुम्ही स्वामीसेवा बहुत निष्ठेने केली व वतनानिमित्य सेरणीस द्रव्यही बहुत दिल्हे म्हणोन हे वतन खासा स्वामीचे ते स्वामीने कृपाळू होऊन तुम्हास दिल्हे आहे. या वतनामधे वरकड यादवास व माहादजी जगदाळा पाटील मसूर यास व वरकड कोणास कथला करावयास गरज नाही. राजश्री शंकराजी पंडित सचीव याणी कैलासवासी स्वामी सनीध दिवाणात सेरणी हो ७००० सात हजार देऊन पा मजकुरचे देशमुखीचे पत्र करून घेतले आहे. तेही स्वामीने दूर करून हे वतन राजेश्री गिरजोजी यादव यासच दिल्हे आहे. शंकराजी पंताजवळ कैलासमासी स्वामीचे पत्र आहे ते रद असे. या उपरी त्यासही कथला करावयास गरज नाही. वरकड यादवाचा समंध या वतनासी तुटला आहे. थोरले कैलासवासी स्वामीचे वेळेस अगर राजश्री संभाजी राजे काका यांचे वेळेस व तोर्थस्वरूप राजश्री कैलासवासी स्वामीचे वेळेस

---

१. यापुढे गांवांचा तपशील आहे. तो घेतलेला नाही.

गैरवाका विदित करून मालुमातीने या सदरहू वतनाची पत्रे ज्या ज्याणी करून घेतली असतील अथवा या पत्रापूर्वी स्वामीची पत्रे घेतली असतील अगर पेस्तर हर कोण्ही गैरवाका विदित करून तुमच्या वतनात कुसुर करून पत्रे घेतील तरी ती पत्रे कुल रद असेत. तुम्ही या पत्राप्रमाणे वतन वौषपरंपरेने अनभवीत जाणे. या वतनास भोसल्याचे वंषीचा होऊन कथला करील व हिंदू जो कोणी कथला करील त्यास श्रीचा व वाराणसीमधे गोहत्या ब्रम्हहत्या केल्याची शफत असे. मुसलमान होऊन जो कोणी या वतनास खलेल करील त्यास मकेमधे सौर मारून खादल्याची सौगध असे. ही पातके जाणोन सदरहू वतन तुम्हास वंषपरंपरेनें चालवितील. अभय असे. लेखनालंकार[1].

मर्या
देयं विरा
जते[2]

(चिकटबंदाच्या जोडावर पाठीमागे पुढील शिक्का आहे)

लेखन
सीमा समु
लसति

---

**क्रमांक : १४४** **दि. ११–१२–१७०३**

गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालच्या राजास लिहितो की, मोगल अधिकाऱ्यांना संशय येणार नाही, अशा रीतीने शिवाजीशी युद्ध टाळण्याच्या सूचना आपल्या फौजांना देण्यात आल्या आहेत.

---

१. 'लेखनालंकार' ही अक्षरे निराळ्या वळणाची आहेत.

२. या प्रमाणे याच तारखेच्या निरनिराळ्या गावच्या मोकदमाना लिहिलेल्या एकंदर १३१ सनदा आहेत.

महाराज

पेद्रु व्हाज सोआरिश वासेलार हे उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती असता त्यानी शिवाजीशी तह केल्याची वार्ता आपणाला कळल्यावरून आपण त्याची चौकशी करण्याचा हुकूम सोडला होता. चौकशीअंती कळले कीं त्यानी फक्त युद्धबंदी केली. व्हाइसरॉय आल्मोतास मोर ह्याना त्यानी ही गोष्ट कळविली होती. ही युद्धबंदी उत्तरेप्रमाणे गोव्यांतहि अमलात आहे. उत्तरेकडील प्रदेशांतील युद्ध आम्हाला पुष्कळच हानिकारक ठरले आहे. मोगलाना संशय येणार नाही अशा रीतीने ही युद्धबंदी चालू ठेवून मराठ्यांशी संपर्क व दळणवळण ठेवावे अशा सूचना मी आमच्या सैन्याला केल्या आहेत.

गोवा, ११ डिसेंबर १७०३

---

क्रमांक : १४५ इ. स. १७०३ (?)[1]

पत्र ठिकठिकाणी फाटले असून पत्रातील मजकूर अंतस्थ स्वरूपाचा आहे. कामबक्ष ह्याने वासुदेवपंतास गिरजोजीकडे पाठविले होते असा उल्लेख आहे.

श्री

राजश्री गिरजोजी यादव गोसावी

यांसी————

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ जोहार विनंती. येथील कुशल जाणून आपले कुशल लेखन आज्ञा केली पाहिजे. उपरी

---

१. इ. स. १७०३ च्या नोव्हेंबर डिसेंबरमध्ये बादशहाने शाहूला मराठे सरदारांच्या ताब्यात देण्याचा विचार केला तेव्हा कामबक्ष मध्यस्थ होता. त्या सुमाराचे हे पत्र असावे.

कामबक्षानी रा।। वासुदेऊपंतास तुम्हापावतो पाठविले होते. वस्त्रेही राास पाठविली आहेत. त्यास आपली + + पावतो बोलावावे होते. मग कामकाज करा + + ते करावे होते अगर न करावे याचे त्या + + स्वाल जाब करावा होता. वस्त्रे घ्यावी यैसे + + ते स्वाल जाब न होता दुसरे स्थली दिसोन येते. जे गुण मामला आहे यास्तव लिहिले जाते. तरी रदबदली करून उतर पाठविले पाहिजे की त्यास आपलियापासी बोलाविता किवा निरोप देता यैसे लिहिले पाहिजे. त्या सारिखे त्यास वाठे लाऊन व तुम्ही लिहिले होते की निंबालकरास आणणे म्हणून. त्यावरून तलास करून निंबालकर आणावया कारणे तलास करून निबालकर आणिले. त्यानी पत्र पाठविले. त्याची तालिक बजिनस पाठविली आहे. त्यावरून कळो येईल. तरी त्याचा सरंजाम जाला पाहिजे. विशेष काय लिहिणे. हे विनंती.

---

**क्रमांक : १४६** **दि. १०–१–१७०४**

मोगल आणि मराठे ह्या दोघांशी गोव्याच्या व्हाइसरॉयने जे धोरण ठेवले होते ते पोर्तुगालच्या राजास मान्य होते. मोगलांची अवकृपा होण्यासारखें कोणतेंच कृत्य करूं नये असा सल्ला तो व्हाइसरॉयला देतो.

हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयला राजे सदिच्छा पाठवित आहेत. त्यानी मोगल व मराठे ह्या दोघांना जी मदत केली त्याचा माझ्याकडे पाठविण्यात आलेला अहवाल मी नजरेखालून घातला. तह चालू रहावा अशी विनंति त्यानी पत्रात केली असून राजकीय कारणा- वरून आपणाला हा तह चालू ठेवणे भाग पडत आहे असे म्हटले आहे.

मोगल व मराठे ह्या दोघानाहि मदत देण्याचे जे धोरण त्यानी अवलंबिले आहे ते बरोबर आहे. परंतु मोगलाना हे कळू न देण्याची

दक्षता घेतली पाहिजे. कारण मोगल बादशहा हा आशिया खंडातील बलाढ्य राजा असून तो नाराज होईल असें कोणतेच कृत्य त्यानी आपल्या हातून घडू देता कामा नये. मराठ्यांशी चालू असलेली शांतता त्याबद्दलची वाच्यता न करतां जितके दिवस चालू ठेवता येईल तितके दिवस ठेवावी.

लिस्बन, १० जानेवारी १७०४
राजा.

---

**क्रमांक : १४७** **दि. १८–३–१७०४**

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी आपल्या काही मुलुखाचा राज्यकारभार श्रीनिवास माधवराव ह्यांच्याकडे सोपविल्याचे गोव्याच्या व्हाइसरॉयला कळले, तेव्हां त्याने शिवाजी राजे ह्याना पुढील पत्र पाठविले.

शिवाजी राजे ह्यांस

आपले पत्र मिळाले. आपल्या राज्यापैकीं काही मुलुखाचा राज्यकारभार आपण श्रीनिवास माधवराव ह्यांच्याकडे सोपविल्याचे कळले. श्रीनिवास माधवराव ह्यानी आमच्या राज्याला लागून असलेल्या काही जिल्ह्यांचे कारभारी म्हणून सोनू शेणवी ह्यांची नेमणूक केली आहे. त्यानी आम्हाला पत्र लिहून कळविलें आहे की, खेम सावंत ह्यांचा नाश करण्याचा आपला विचार आहे. आम्ही त्यांच्या पत्राचे उत्तर पाठविले असून त्याबद्दल ते श्रीनिवास माधवराव ह्याना लिहोतिलच. खेम सावंत ह्यांचे शक्य तें वाईट व्हावे ही आमचीहि इच्छा आहे हें श्रीनिवास माधवराव ह्याना कळावें हा तें पत्र पाठविण्यामागील माझा हेतु होता. आमच्या राज्यांतील काही प्रजाजनाची गलबतें खेम सावंत ह्यानी लुटली. म्हणून त्याना त्याबद्दल शासन

करण्याचा माझा निर्धार आहे. त्यांच्याशी युद्ध करून जो कुणी त्यांचा नाश करील त्याला आमचा पाठिंबा मिळेल.

गोवा, १८ मार्च १७०४
कायतानु द मेलु द कास्त्रु.

---

**क्रमांक : १४८** **दि. १८–३–१७०४**

श्रीनिवास माधवराव ह्यानी खेम सावंत ह्यांचे पारिपत्य करण्याची कामगिरी फोंड्याचे सर सुभेदार सोनाजी शामराज ह्यांच्याकडे सोपविली, तर आपणालां आनंद वाटेल, असे गोव्याचा व्हाइसरॉय सोनाजी शामराज ह्याना लिहिलेल्या पत्रांत म्हणतो.

फोंड्याचे सर सुभेदार सोनाजी शामराज ह्यांस

शिवाजी राजे ह्यांचे पत्र मला मिळाले. त्यावरून मला कळले कीं, त्यानी आपल्या राज्यापैकी काही मुलुखाचा कारभार श्रीनिवास माधवराव ह्यांच्याकडे सोपविला आहे. श्रीनिवास माधवराव ह्यानी खेम सावंत ह्याना शासन करण्याचे काम हाती घेतले व सोनाजी शामराज ह्यांच्याकडे ती कामगिरी सोपविली, तर मला आनंद वाटेल, ह्या मोहिमेला आमचाहि पाठिंबा राहील. कारण खेम सावंत ह्यानी ह्या राज्याच्या काही प्रजाजनाना लुटलें म्हणून त्याना शासन करण्याचा आमचा निर्धार आहे. सोनाजी शामराज ह्यानी आमचा हा निर्धार श्रीनिवास माधवराव ह्याना कळवावा. म्हणजे त्यानाही मोहीम सुरू करण्याबाबत आत्मविश्वास वाटेल.

---

**क्रमांक : १४९** **दि. १९–५–१७०४**

सिदगिरी मठाच्या वहिवाटीबद्दल कटकटी उद्भवल्याचे ह्या पत्रावरून दिसते.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३० तारण नाम संवत्सरे वैशाख बहुल द्वादशी भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री शिव छत्रपती याणी देशमुख व देशपांडे पा। हुकेरी यासि आज्ञा केली ऐसीजे.

शिक्का शिक्का

मो।। सिदगिरी पा। मजकूर येथे काडसिध जंगम याचे गुरु बहुत थोर होते. त्यासी मठ आहे. मठीं पट्टशिष्य काडसिद गोसावी आहेत. त्यास मठास वृत्ति आहे. तिचे पारपत्य उपभोग पट्टशिष्य यानी करावा. वरकड शिष्यास समंध नाहीं. ऐसे असता गुडीवाडीकर जंगम या मटीचे पदाधिकारी नसता मुडीदमणाची (?) पाटी करून या मटाचा कांही इनाम आपले स्वाधीन करून घेतला आहे म्हणून हुजुर विदित जाले. तरी गुडीवाडीकर जंगमास समंध नसता ऐसी गोष्टी करावया गरज काय. हाली तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी तुम्ही पूर्वापार चालत आले असी त्याप्रमाणे काडसिद गोसावी मटचे पट्टशिष्य याजकडे बिलाकुसुर चालवणे. वरकड शिष्यास व त्यांस नसता कथला कांही करूं न देणे. जो नवा कथला करील त्यास ताकीद करून दुरुस वर्तवणे. जाणिजे निदेश समक्ष.

मोर्तब

---

क्रमांक : १५०

दि. १२-७-१७०४

कान्होजी आंग्रे ह्यांच्या आरमारातील काही तांडेलाना पोर्तुगिजानी कैद केले होते. त्यांची मुक्तता त्यांनी बुऱ्हाणजी मोहिते ह्यांच्या विनंती वरून केली होती. बुऱ्हाणजी मोहिते ह्यानी त्याबद्दल गोव्याच्या व्हाइसरॉयचे आभार मानले असता व्हाइसरॉयने त्याना पुढील उत्तर पाठविले.

मेलुंडीचे सुभेदार बुऱ्हाणजी मोहिते ह्यांस

तुमचे पत्र मिळाले. माझ्या हुकुमावरून ज्या तांडेलाना इकडे अटक करून ठेवण्यात आले होते, त्यांची सुटका झाल्याबद्दल तुम्ही माझे आभार मानले आहेत. त्या तांडेलांची सुटका व्हावी म्हणून तुम्ही कन्होजी आंग्रे ह्यांच्या वतीने माझ्याकडे रदबदली केली होती. कान्होजी आंग्रे ह्यांच्याशी आमचे चांगले संबंध आहेत. ह्या राज्याच्या प्रजाजनाना व रहिवाशांना त्यांच्याकडून अनेक वेळां जी चांगली वागणूक मिळाली तें लक्षांत घेऊन मी तांडेलांची मुक्तता लगेच केली. आणि तुम्ही जर आमच्याशी कान्होजी आंग्रे ह्यांच्या धोरणानुसार वागलांत तर माझ्या सदिच्छेची तुम्हाला प्रचीति आल्यावाचून राहाणार नाही. तुम्हाला जर तुमच्या जहाजातून गोव्याला अन्नधान्य पाठवायचे असेल तर तें पाहून + + + तरी तुमचा करार करावा. शिवाजी राजे ह्यांच्या बाबतींत मला तुम्हास कळवायचे आहे कीं, माझ्याकडे तपशील पाठविला तर मी त्याना उत्तर पाठविन.

गोवा, १२ जुलै १७०४

कायतानु द मेलु द कास्त्रु

क्रमांक : १५१ दि. २१–७–१७०४

हे एक स्थळपत्र असून ह्यांत सिंहगडाखाली बादशहाचे लष्कर बसल्याचा उल्लेख आहे.

नक्कल

थळपत्र श्री शके १६२६ तारणनाम संवत्सरे श्रावण शुद्ध १ शुक्रवार ते दिवशी स्थळ महास्थळ मोकदम व समस्त दाहीजण थळ वेवहारा बलुते समाकुल पांढरी थळ नाईक मौजे दिवें कर्यात सासवड सु॥ खमसै मय्या अलफ. सन १११४ बो मालजी नाईक बिन केर नाईक बिन भिक नाईक बिन दाद नाईक बेरड मौजे मजकूर यास पुरातन रा गण पाटील दुसरी वली शीवभोज पाटील याचा लेंक गणजी याचा लेंक सूर्याजी याचा लेंक रुपाजी याचा लेंक विठ पाटील याचा लेंक शिद पाटील याचा गोयाजी पाटील हल्ली आतां संभाजी पाटील यांनीं पूर्वीं पासून थळ धामणसी दांग रुके ।४ सोळा त्या पैकीं दाद नाईक याचे थळ रुके ०८ होते. ते हल्लीं दुकाळ बहुत पडिला या करितां घर परागंदा होऊन गेले होते. हल्ली याचा वंशीक मालजी पाटील आपले थळ म्हणून उभा राहिला. ऐसीयास समाकुल पांढरी मिळोन मालका पुसिलें तो आपला भाऊ मिरासी भाऊ म्हणोन हातीं धरिला. माघें ही पांढरीचे शिरीं कस्त बहुत जाहली म्हणोन समस्त कृपाळू होऊन आणि थळ रुके ०८ त्या पैकीं एक रुका सोडून दिल्हा असे. वरकड रुके ०७ सात थळ असे. सुखरुप कीर्द करणें आणि पांढरीची चाकरी करणे. वकरड थळ ते भाऊबंद आहेत त्यांस जो कसाला पडेल त्या प्रमाणें देणें. पांढरीचे चाकरीस नष्टाई एकंदर न करणें. पूर्वीं पासोन तुमचे वडील चालत आले त्या प्रमाणें तुम्ही चालणें. कण्हेर विहिरीचा रुका ०१ येक तुम्हास इनाम दिल्हा असे. कुल बेरड तुमचे भाऊबंद आहेती. त्यांमध्यें वडीलपण मानपान तुमचा असे. मावजी वा। देशमुख याचे हरकोणी आपला पुढे वंशीक

मोडील त्यावर गडधूचा आण असे व वडिलांचे पलीकडे काय काय केलें होतें त्या मागें पूर्वी वडिलीं तुम्हास पांढरीची चाकरी केली· इनाम रुका ८१ त्या प्रमाणें आपण ही चालवून तुमच्या कार्यास महार एक देऊन पातशाही लस्कर येऊन नजीक सिहगडाखालें बैसलें आणि तुफानें पडलीं. दुष्काळ बहुत पडिला. जाहागिरदाराची बाकी शेकली. कांही पैका भरुन मागितला. कुल कुळें पळालीं. बाकी कुळें पांढरी खती पडत होती. ऐसीयास आपला भाऊ मालजी होता त्यापासुन पैका मागून घेतला आणि दिवाणाची बाकी रुपये ५०० पांचशें घेऊन वारिली आणि पांढरी मोकळी केली असे. ही सही.

पाटील

१ संभाजी पाा बिन गोयाजी पाा
१ सयाजी पाा बिन सुर्याजी पाा
१ तुळाजी बिन नाईकजी

---

३
खंडोजी पाटील बिन गणोजी पाा
यमाजी ढुमा खलवे
गोंद माळी बिन होन माळी
सुर्याजी पाा बिन सीद पाा
फिरंगोजी पाा कसबे सुपें
कुंभार बापुजी बिन मालजी
खंडोजी भाऊ बलकर
येसाजी सुपेकर

महार

१ रामनाक बिन यकनाक
१ राऊ नाईक बिन बहिरजी नाक.

गोही

बि।। कुलकर्णी मौजे माा पानसी चौगुले.
१ मावसळोजी बिन लक्ष्मजी काळे भापकर
१ पुताजी चौगुले भागोजी बिन राहुजी झेंडे व खलोजी भापकर.
संभाजी बकुराव वाडीकर
सुभानी भापकर
तुळा सुतार बिन नाम सुतार.
गण महाना बिन परस महना.
कोयाजी रणनवरे पाा मौजे पाला.
येसाजी गुरव बिन खंडोजी चांभार (?).
साल मेहेतर बिन भोज मेहेतर.
बहिर मेहेतर बिन भवानी मेहेतर.
रामा मांग बिन नाना मांग.

क्रमांक : १५२ दि. ५-९-१७०४

मराठ्याना खांदेरी बेटातून हुसकून लावण्यासाठीं पोर्तुगिजांना मोगल बादशहा आरमारी मदत देण्यास तयार आहे असें बादशहाच्या एका नबाबाने पोर्तुगिजाना कळविलें होते. ह्या प्रस्तावाचा शहानिशा करण्याबाबत पोर्तुगीज राजदूताला लिहावे, असें गोव्याच्या राज्य सल्लागार मंडळाने ठरविले.

पोर्तुगालचे राजे, व्हाइसरॉय व हिंदुस्थानचे कॅप्टन जनरल ह्यांच्या राज्य सल्लागार मंडळाच्या विद्यमाने व्हाइसरॉय सिजोर कायतानु द मेलु द काश्त्रु ह्यानी राज्य सल्लागार मंडळाच्या सदस्यांची बैठक दि. ४ सप्टेंबर १७०४ रोजी शस्त्र भांडाराच्या इमारतीच्या सभागृहांत बोलाविली. उत्तरेकडील सैन्याच्या गव्हर्नरने व्हाइसरॉयना लिहिलें होते कीं, खांदेरी बेटांतून मराठ्यांना हुसकून लावण्यासाठीं मोगल बादशहा पोर्तुगिजांना त्याच्या आरमाराची व सैन्याची मदत देण्यास तयार असल्याचें बादशहाच्या एका नबाबाने त्याला आपल्या एका दूतामार्फत कळविलें आहे. पत्र बैठकी समोर वाचण्यांत आलें. त्यावर सर्व सदस्यानीं मत व्यक्त केलें कीं, सदहू प्रस्ताव जरी चांगला असला, तरी, तो मोगल बादशहाचाच आहे, कीं, त्याच्या नबाबाचा तों एक डाव आहे, त्याची शाहानिशा करण्या बाबत आपल्या राजदूताला लिहावें.

---

क्रमांक : १५३ दि. ३०-१२-१७०४

रामचंद्रपंत अमात्य ह्यानी गोव्याच्या व्हाइसरॉयनें एक पत्र धाडले होते. त्या पत्राला व्हाइसरॉयनें जें उत्तर पाठविले त्यात तो म्हणतो कीं बंडखोराला शिक्षा करण्याकरिता आपणाला मदत करण्यास मी तयार आहे.

शिवाजीचे अमात्य रामचंद्र पंत ह्यांस

अंताजी राम ह्यानी मला आपले पत्र आणून दिले. त्यावरून मला कळले की, आमच्या राज्याचे व महाराजांच्या वाडवडिलांचे

स्नेहाचे संबंध असल्याने त्यास अनुसरून आपण मला एक नजराणा पाठविण्याचा विचार करतां आहांत. महाराजांशीं मीहि स्नेहाचे संबंध ठेवू इच्छितो परंतु मला एक गोष्ट खटकली ती ही की, ह्या राज्याचा व्हाइसरॉय म्हणून मी इकडे आलों तेव्हां आमच्या शेजारच्या सर्व राजेरजवाड्यानो पत्रें पाठवून माझें स्वागत केले, त्यांत महाराजांचे पत्र नव्हते. हा शिष्टाचार महाराजानी न पाळलेला पाहून मला दुःख झाले. हा प्रसंग जर घडला नसता तर महाराजांकडे मी माझा वकील पाठविला असता. माझ्या ह्या निष्काळजीपणाची जापण मला आठवण करून दिली आहे. माझ्या मतें दोन्ही बाजूनी हा जो निष्काळजीपणा घडला त्याचे कारण राजकीय आहे. आमच्या दोन्ही राज्यामध्यें जी मैत्री आणि शांतता नांदत आहे ती गुप्त रहावी व बादशहाला त्याचा सुगावा लागूं नये म्हणून हे घडले असावे. आमची मैत्री टिकावी व तिची वृद्धि व्हावी अशी माझी इच्छा आहे. इतर तपशिलाबाबत मला जे काय सांगायचे आहे ते मी अंताजी राम ह्याना तोंडीच सांगितले आहे. ते आपणाला तें कळवितीलच. आमच्या राज्य सचिवाना आपले जें पत्र आले त्याचे उत्तर ते आपणाला पाठवितील. त्याना मी सांगितले आहे की, बंडखोराला शिक्षा करण्याकरिता आपणाला मदत करण्याची माझी इच्छा आहे. हें आपणाला कळवावे.

गोवा, ३० डिसेंबर १७०४
कायतानु द मेलु द कास्त्रु

---

**क्रमांक : १५४** **दि. ३०-१२-१७०४**

गोव्याच्या व्हाइसरॉयने आपला वकील छत्रपतींकडे पाठविला नाही म्हणून बुऱ्हाणजी मोहिते ह्यानी व्हाइसरॉयकडे तक्रार केली होती. व्हाइसरॉयने त्याना पुढील उत्तर पाठविले,

मेलुंडीचे सुभेदार बुऱ्हाणजी मोहिते ह्यांस

रामचंद्र पंताचे व आपले दोन्ही पत्रें मिळाली. त्यांवरून मला कळले कीं, छत्रपतीकडे मी माझा वकील पाठविला नाहीं ही गोष्ट आपल्या ध्यानांत आली. पण ह्या बाबतींत माझीहि एक तक्रार आहे. मी इकडे व्हाइसरॉय म्हणून आलो तेव्हां, आमच्या शेजारच्या राजेरजवाड्यांनी पत्रे पाठवून माझें स्वागत केले, तसें स्वागत महाराजांनी माझे केले नाही. म्हणून मी माझा वकील त्यांच्याकडे पाठविला नाही. परंतु मी वकील पाठविला नाही हें चांगले झाले असें मला वाटते. कारण मी जर महाराजांकडे वकील पाठविला असता तर बादशहाला आमच्या मधील मैत्रीचा व शांततेचा सुगावा लागला असता. अंताजी राम ह्यांची व माझी जी मुलाखत झाली त्याचा अहवाल ते आपणाला कळवितीलच. त्याना मी जें काय सांगितलें आहे त्यांत माझ्या तक्रारीचे समर्थन मी केले आहे. आमच्या दोन्ही राज्यांमधील मैत्री टिकेल व तिची वृद्धी होईल अशी मला आशा आहे.

गोवा, ३० डिसेंबर १७०४
कायतानु द मेलु द काश्त्रु

---

**क्रमांक : १५५** **दि. ३०-१-१७०५**

छत्रपती शिवाजी दुसरे हे जकात अधिकाऱ्याना आज्ञा करतात की, मोनी-बावांच्या मठाच्या भंडाऱ्यासाठी परपेठेतून जे जिन्नस येतील त्यांच्यावर जकात आकारूं नये.

मोनी बावा

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३१ तारण संवत्सरे माघ बहुल द्वितीया भोमवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी कमाविसदारानी व लोकानी जकायत माहालानिहाये यास आज्ञा केली येसीजे. श्री चा मट पाटगावी आहे. तेथे भंडारियास गला व हर

जिनस पाहिजे. या करिता श्री कडील कोटीचे बैल ३० तीस हरयेक पेटेतून गला व जिनस भरून पाटगावास पाठवितील त्यास तुम्ही जकायत यकंदर यक रुका न घेणे व काही खलेल न करणे. सुखरूप येऊ जाऊ देणे. येविसी बोभाट आलीया मुलाहीजा होणार नाही. जाणिजे.

---

**क्रमांक : १५६** **दि. ६–६–१७०५**

खेम सावंत भोसले ह्यांच्या हाती असलेला फोंड्याचा किल्ला मोगलांचा एक सेनाधिकारी गझनाफर अली खान ह्याने घेतल्याचे गोव्याच्या बादशहाला कळले तेव्हां त्यानें गझनाफर अलीस पत्र पाठवून त्याला सर्व प्रकारची मदत करण्याचे आश्वासन दिले.

मोगल बादशहाचे फोंड्याचे सुभेदार गझनाफर अली ह्यांस

आपले पत्र मिळाले. बंडखोर खेम सावंत ह्यांच्या दगलबाजीस न जुमानता फोंड्याचा किल्ला आपण घेतल्याचे आपल्या पत्रावरून कळले. ज्या अर्थी आपण म्हणता की, ह्या मोहिमेवर आपणाला बादशहानी पाठविले आहे, त्या अर्थी बादशहाचे व आमचे मैत्रीचे संबंध लक्षांत घेऊन मी आपणाला सर्व प्रकारची मदत करण्यास कमी करणार नाही. बादशहाच्या मैत्रीसाठीं आम्हाला तुम्हास मदत करणे भाग आहे. त्याचप्रमाणे बंडखोर खेम सावंत ह्यानी जरी आम्हाला अलीकडे फारसा उपद्रव दिला नसला, तरी बादशहासाठीं मी त्यांच्या विरुद्ध कारवाई करीन. सांप्रत पावसाळ्याचे दिवस जवळ आले असल्याने मोहीम सुरू करणे कठीण आहे. तथापि मी आपणाला दारूगोळा पुरवून आमच्या राज्यांत आपणाला अन्नाची बेगमी खरेदी करण्यास परवानगी देऊन बादशहाशीं असलेली आमची मैत्री सिद्ध करीन. आपणाला ही बेगमी फोंड्याच्या किल्ल्यात नेता येईल. वाटा

बंद करण्यात आल्या असून अडथळे उभारण्यात आले आहेत. दोन्ही बाजूच्या लोकाना इकडून तिकडे व तिकडून इकडे येऊं जाऊ न देण्याचा हुकूम मी काढला असल्याने तिकडून जे लोक इकडे येतील त्याना माघारा परतवावे लागेल.

गोवा, ६ जून १७०५
कायतानु द मेलु द कास्त्रु

---

क्रमांक : १५७ दि. ३-७-१७०५

छत्रपती राजाराम कर्नाटकाचे आश्रयास गेले तेव्हां त्यांचे बरोबर हिंदुराव व गिरजोजी यादव हे दोघे होते. हिंदुराव घोरपडे ह्यानी त्या प्रसंगी गिरजोजी यादव ह्याना वचन दिले होते की, आपला भाग्योदय झाला तर त्याचा हिस्सा तुम्हास देऊं. पुढे घोरपडे ह्याना सवंध राज्याची सरदेशमुखी मिळाली. गिरजोजी यादव ह्यानी हिंदुराव घोरपडे ह्याना त्यांच्या वचनाची आठवण करून दिली तेव्हा त्यांनी त्याना हे वतनपत्र दिले.

श्री शंकर सुबराज

श्री सुब्रम्हणेस्वरस्वामी

राजश्री गिरजोजी यादव देशमुख
पाा कऱ्हाड गोसावी यास——

ऽ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य—— स्ने।।—— हिंदूराव घोरपडे सरदेशमुख जोहार. सु।। सित मया अलफ. राजश्री—— कैलासवासी स्वामी पहिले देशीहून कर्नाटक प्रांतास जातेसमई समागमे आम्ही होतो. तुम्हीही समागमे होता. राजश्री—— स्वामीस सिवमोघ्याचे मुकामीहोन कर्नाटकास पाये उतारा घेऊन जावयाचा निर्वाव्ह जाहाला. तेसमई तुमचे आमचे कितेक स्नेहवादे बोलणे जाहाले.

तेव्हा तुम्ही आम्हास बोलीलत जे राजश्री स्वामी कर्नाटकात कुशलरुप-पावताच तुमचे उर्जित विषेशेकरुन स्वामी करतील. भाग विषेश जाहाल्यानें आपणास भाग्याचा विभाग पावला पाहिजे म्हणऊन अतिशय स्नेह दर्षविला. ते समई आम्ही तुम्हास बोलिलो जे राजश्री स्वामी स्वस्तक्षेम कर्नाटकात पावल्यानंतर आम्हास भाग्य जे येईल त्याचा विभाग देऊ यैसे बोलिलो होतो. त्यास श्री कृपेनें राजश्री—— स्वामीस कुशलरुप कर्नाटकास पावल्यानंतर आम्हास कृपाळु होऊन संपूर्ण राज्यातील सरदेशमुखी अजरामऱ्हामत शफतपूर्वक वतन दिल्हे. त्याउपरी तुम्ही कर्नाटकांत आम्हासी स्नेहवादे बोलणे बोलोन मार्गी यता शिवमोघ्याचे मुकामी भाग्याचा विभाग देऊ यैसे वचन दिल्हे आहे. त्यास अगदी राज्याची सरदेशमुखी वतन राजश्री—— स्वामीने दिल्हे आहे. या पै॥ प॥ कऱ्हाडची देसमुखीचे वतन आपणास आहे. येथील सरदेसमुखी वतन करून देऊन विभाग देविला पाहिजे म्हणोन बोलिलेत. त्यावरून मान्य करुन वचन दिल्हे होते. सांप्रत किल्ले प्रसिद्धगडचे मुकामी राजश्री—— छत्रपती स्वामीच्या दर्षणास आलो. ये प्रसंगीही तुम्ही रदबदली केली जे प॥ कऱ्हाडची सरदेशमुखीचे वतन देऊ यैसे बहुत दिवस वचन गुंतले आहे. ते ये प्रसंगी सत्य करून दिल्हे पाहिजे म्हणौन बोलिला. त्यावरुन श्री—— स्वामी संनीध तुमचे व आमचे कितेक बोलणे चालणे होऊन उभयपक्षी वंषपरंपरेने स्नेहवादे वर्तणूक करावी दिवसे दिवस स्नेहवृधीने वर्तावे पूर्वी तुम्हास प्रांत कऱ्हाडची सरदेशमुखी वतन देऊ यैसे वचन गुंतले होते. ते निर्वाव्ह श्री—— स्वामी सनीध शफत पूर्वक करुन दिल्हे असे. बी ता॥ ————————

पा॥ कऱ्हाड देहे ९२[1]

का॥ आउंद देहे २९[2]

---

१, २. तपशील घेतलेला नाही.

किता तर्फ तारगाव व उबरज दोनी तरफा कऱ्हाड माहालाखालील सातारचे सुभाकडे आहे ती येथील सरदेशमुखी चिरंजीव राजेश्री सिदोजी यास वतन दिल्हे आहे ते काहाडिता येत नाही. ये निमित्य या माहालीच्या मुबदला माहाल निघले असे. बी ताा—.[1]

येकूण देहे १९६ येकसे स्यानवद व धनगरवाडे २ दोनी आरा माहाल ४ च्यारी रास येथील सरदेशमुखी तुम्हास व तुमचे पुत्रपौत्र वंषपरंपरेने शफतपूर्वक वतन दिधले असे. या वतनाचा हकलाजिमा इनामती गांव मौजे सिरटे पाा कऱ्हाड व इनाम दर गावास दर सदे दोनी चावर व जकाती विस्वा उभामार्ग व स्थलभरित व स्थल मोडी व सिंग सिगोटी व सेवधार व फसकी व राबिते बिगारी कुलबाब कुलकानु देखील इनाम गावाची हालीपटी व पेस्तरपटी व मोहतर्फ व मुजरी व जलतरु पासाण निधीनिक्षप झाडझाडोरा देखील आपले स्वाधीन करुन घेऊन तुम्ही व आपले पुत्रपोत्रादि वंषपरंपरेने सुखरुप अनभवीत जाणे. या वतनास आमच्या वतनाचा वंषाचा होऊन जो कोण्ही इस्कील करील त्यास श्रीची शफत आसे. आणि तो आमच्या वंषाचा नव्हे. निर्वाव्हरुप आम्ही व आमच्या अवलादीनें तुम्हास व तुमच्या अवलादीस बिलाकुसूर चालवावयाचा निर्वाव्ह केला असे. येणेप्रमाणे आविछिन चालेल. जाणिजे. छ २२ माहे रबिलावल. बहुत काय लिहीणे.

लेखन
मर्यादा

( पाठीमागे चौकोनी शिक्का )

---

१. तपशील घेतलेला नाही.

क्रमांक : १५८ दि. ३–७–१७०५

हिंदुराव घोरपडे हे शिदोजी घोरपडे ह्याना लिहितात की, औंधची सर-देशमुखी जरी त्याना पूर्वी दिली असली तरी ती आता गिरजोजी यादव ह्याना दिली आहे.

श्री

राजश्री सिदोजी घोरपडे
गोसावी यास––

अखंडित लक्षमी आलंकृत राजमान्य–– स्ने।। हिंदुराऊ घोरपडे जोहार. सु।। सित मया अलफ. संपूर्ण राज्यातील सरदेशमुखीचे वतन आमचे आहे. या पै।। क।। आंऊद येथील सरदेसमुखी तुम्हास पेसजी दिल्ही होती. यैसीयासि राजश्री गिरजोजी यादव देशमुख प।। कऱ्हाड यासि कर्नाटक प्रांती असता बहुत दिवस आमचे वचन गुतले आहे. करिता प।। कऱ्हाड व क।। आउंद ये दोन माहाल काले व तारळे व नाणेघोल यैसे माहालची सरदेशमुखीचे वतन माारनिलेस शफतपूर्वक दिले आहे. तरी काा अउंद येथील सरदेशमुखीची दखलगिरी न करणे. माारनिलेकडे सुरक्षित क।। आऊद माहालची सरदेसमुखी चालेल. जाणिजे. छ २२ माहे रबिलावल.

---

क्रमांक : १५९ इ. स. १७०५–०६

कऱ्हाडची सरदेशमुखी गिरजोजी यादव ह्याना दिल्याचे हिंदुराव घोरपडे ह्यांचे छत्रपतीना पत्र.

श्री

माहाराज राजश्री–– छत्रपती
स्वामीचे सेवेसी––

सेवक हिंदूराव घोरपडे सरदेशमूख कृतानेक विज्ञापना. ता. छ ४ मोहरम. स्वामीचे कृपाद्रिष्टी करून सेवकाचे वर्तमान यथास्तित असे. स्वामी कृपाळू होऊन सपूर्ण राज्याची सरदेसमूखी अजरामऱ्हामत पहिलेच दिल्हे आहे. त्यापैकी प्रांत कऱ्हाड येथील सरदेसमुखी अम्ही आपले तरफेनें रा। गिरजोजी यादव यास दिल्ही आहे. तरी प्रांत मजकुरचे सरदेसमुखीविशी साहेबी कृपा करून सनद लेहून देण्यास आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विनंती.[1]

---

**क्रमांक : १६०** **दि. ८–७–१७०५**

**मौजे पाटगांव येथील मठास हिंदुराव घोरपडे ह्यानी आपल्या सरदेशमुखी मधील मौजे बालेघोल हा गांव इनाम दिला.**

नक्कल

मोहिनीबाबा

राजश्री कारकुनानी माहाल सरदेसमुखी वर्तमान भावी प्रांत अजरे गोसावी यांस

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित हिंदूराव घोरपडे सरदेशमुख दंडवत. सु।। सीत मया आलफ. पार्थीवनाम संवत्सरे आषाढ बहुल चतुरदसी भानुवारी श्री मठगाव याचे विशई तूर्तगिरी गोसावी यानीं येऊन विदित केले की पाटगावी मठ आहे. त्यास अतीत अभ्यागत येताती. अन्नौदक द्यावयाचा परीपाठ पाळिला आहे. यैसीयासी देश स्वस्त होता तो सीश वर्ग व उदमी लोक व ग्रहस्त अनकूलता करून देत होते. तेणे करून चालत होते. सांप्रत धामधुमेचा प्रसंग आला. मार्ग चालत नाही व सीशवर्ग व ग्रहस्तापासून काहीं

---

१ 'हे विनंती' ही अक्षरे बालबोध आहेत.

उत्पन्न होऊन येत नाही. नित्य संकल्प चालिला पाहिजे. येसीयासी तुम्ही मऱ्हाष्ट न (?) रक्षिता देव ब्राह्मणाची स्थापना करिता. यामध्ये मठाचा योगक्षेम चाले यसी स्वस्ता करून दिल्हीयाने त्या अन्नोदक चालऊन राज्यास कल्याणाभि(वृ)धी चिंतून सुखरूप राहून म्हणोन विदित केले. त्यावरून मनास आणिता मठ बहुत थोर. बहूतानी याचे चालविले. येशा स्थली स्वस्ता करून देऊन चालविली—या बहुतच पुण्य आहे आणि राजश्री स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण आहे. येसे जाणून मौजे बालेघोल कसबा कापसी सरदेसमुखीचा इनाम गाव कुलबाब कुलकानू खेरीज हकदार व इनामदार करून दिधला असे. तरी तुम्ही सीश तूर्तगिरी गोसावी याचे दुमाला करून यासी व त्याचे सीश शिशपरंपरेनें अविछीन चालवणे. या गावास जो उपद्रव देईल त्यास त्याच्या पूर्वज्याची अण असे. येसे जाणोन निरपद्रव चालवणे. प्रति वरुषी नूतन पत्राची अपेक्षा करीत नव जाणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र सिषाजवळ परतून देणे. जाणिजे. रा छ २१[1] माहे रबिलावल. मोर्तबसुद.

---

**क्रमांक : १६१** **दि. ९–७–१७०५**

हिंदुराव घोरपडे ह्यांचे तूर्तगिरी गोसावी ह्याना पत्र की, मठासाठी एक गाव इनाम दिला आहे.

मोनीबावा

गुरुभक्तिपरायण राजश्री तुर्तगिरी बावा गोसावी यासी———

स्नेहांकित हिंदुराव घोरपडे सरदेसाई दंडवत. सु॥ सीत मया अलफ. श्री मठ पाठगाव या स्तली आम्ही येऊन राहिले असता

---

१. छ २७ पाहिजे. नक्कल करताना चुकलेले दिसते.

तुमची आमची मठांत भेटी जाहली. ते समई तुम्ही मठीचे वर्तमान सांगितले. त्यावरुन येथील आनोदक चालिले पाहिजे या बद्दल मौजे बालेघोल का। कापसी प्रांत अंजिरे सरदेशमुखीचा इनाम गाव आमचा वतनाचा हा गाव तुम्हास इनाम कुलबाब कुलकानु खेरीज हकदार व इनामदार करुन दिधला असे. हा गाव तुम्ही व तुमचे शिश्यवर्ग वंशपरंपरेने आनभवणे व आमचे वंशपरंपरेनें चालऊन. जाणिजे. रा,छ २८ माहे रबिलावल. बहुत काय लिहिणे.

मोर्तब आहे.

---

क्रमांक : १६२ दि. ३–१०–१७०५

गोव्याचा व्हाइसरॉय छत्रपती शिवाजी दुसरे ह्याना लिहितो की मेलुंडी व खांदेरी उंदेरी येथून पोर्तुगीज नागरिकाना जो उपद्रव होतो त्याला आळा घालण्याची व्यवस्था करावी.

शिवाजी राजे ह्यांस

गोविंद परबु ह्यांनी मला आपले पत्र आणून दिले. तत्पूर्वी आमचे एक नागरिक दुलबा नाईक व हरि गावस हे दोघे मला येऊन भेटले होते. त्या दोघानी मला जे काय सांगितले, त्यावरून व आपल्या पत्रावरून मला कळून आले की, आपणामध्यें व आमच्यामध्यें मैत्रीचे संबंध चालू राहावेत अशी त्या दोघांची इच्छा आहे. आपले वडील व आजोबा ह्या दोघांची आमच्याशी मैत्री होती. तें लक्षांत घेऊन आमच्याशी मैत्रीचे संबंध ठेवण्याची आपली इच्छा आहे. ही मैत्री प्रस्थापित होण्याच्या मार्गांत माझ्याकडून तरी अडथळा येणार नाही. अडथळा येतो तो मेलुंडीच्या किल्ल्यांतील व खांदेरी उंदेरी बेटांतील अधिकाऱ्यांकडून. विशेषतः मेलुंडीच्या किल्ल्यांतील

लोकांचा आम्हाला पुष्कळच उपद्रव होतो. त्यांचे वर्तन जवळ जवळ चाच्यांसारखेच आहे. आमच्या राज्याच्या प्रजाजनांची त्यानी फार हानि केली आहे. त्यांनी त्यांची लुटमार तर केलीच; परंतु काहीना ठार मारून काहीना तुरुंगातहि टाकले. आपण त्याना योग्य ते शासन कराल व आमच्या प्रजाजनांची त्यानी जी लूट केली आहे ती त्याना परत करण्यास भाग पाडाल अशी आशा आहे. किंवा ते लोक आपल्या आज्ञेत नसल्यास आम्ही त्यांची खोड मोडावी की काय ते आपण मला कळवावे. हे प्रकार बंद झाल्याखेरीज आमच्या दोन्ही राज्यांमधील जुनी मैत्री प्रस्थापित होणार नाही व आमची बंदरे सुरक्षित होणार नाहीत. गोविंद परबु ह्याना मी ही वस्तुस्थिती कथन केली असून ते आपणाला सर्व तपशील विदीत करतीलच. त्याचप्रमाणे हरि गांवस ह्यानाहि मी आपणाला ह्या विषयीं लिहावयास सांगितले आहे.

देव आपल्यावर अनुग्रह करो.

गोवा, ३ अक्टोबर १७०३

कायतानु द मेलु द काश्त्रु.

---

**क्रमांक : १६३** **दि. ३–१०–१७०५**

छत्रपती शिवाजी दुसरे व गोव्याचा व्हाइसरॉय ह्या दोघांमध्ये शांतता व सलोखा निर्माण व्हावा म्हणून काही लोकांनी प्रयत्न चालविले होते. तत्संबंधाने गोव्याच्या व्हाइसरॉयने रामचंद्रपंत अमात्य ह्याना लिहिलेले एक पत्र.

रामचंद्रपंत ह्यांस

आपले पत्र मला गोविंद परबु ह्यानी आणून दिले. त्यानी मला जें काय विदीत केले त्याचे उत्तर मी त्याना दिले आहे. हे राज्य व

शिवाजी राजे ह्यांच्यामध्यें स्थीर मैत्री आणि शांतता प्रस्थापित व्हावी म्हणून त्यानी प्रयत्न चालविले आहेत. त्या बाबतीत मी त्याना काही सूचना केल्या आहेत. माझ्या पूर्वीचे व्हाइसरॉय व शिवाजी राजे ह्यांच्यामध्ये मैत्री आणि सलोखा होता हे मला आठवते. त्यावरून आमच्या मध्यें मैत्री आणि सलोखा निर्माण होण्यास अडचण पडणार नाही अशी मला आशा वाटते. गोविंद परबु हे आपणाला ह्या विषयासंबंधीचा सर्व तपशील कळवितीलच. त्याच प्रमाणे ह्या राज्याचे एक नागरिक दुलबा नाईक हेहि आपणाला ह्या संबंधी लिहितील. आमच्यामध्यें मैत्री आणि शांतता प्रस्थापित व्हावी म्हणून आपण खटपट कराल अशी आशा आहे.

गोवा, ३ अक्टोबर १७०५

---

क्रमांक : १६४ दि. ११-१०-१७०५

गोव्याच्या व्हाइसरॉयने फोंड्याच्या मोगल फौजदारास भोसल्याविरुद्ध मदत केल्याबद्दल बादशहाने त्याला पत्र लिहून त्याचे आभार मानले होते. त्या पत्राच्या संदर्भात रायजादा सय्यद कुतुबुद्दीन ह्याला लिहिलेल्या पत्रात गोव्याचा व्हाइसरॉय म्हणतो की, पोर्तुगिजांनी खेम सावंत भोसले ह्यांच्याशीं युद्ध पुकारून फोंड्याचा फौजदार सय्यद गझनाफर ह्याची खेम सावंत ह्यांच्यापासून मुक्तता केली.

बादशहाच्या छावणीतील रायजादा सय्यद कुतुबुद्दीन ह्यांस. पत्र मिळाले. बंडखोर खेम सावंत भोसले ह्यांच्याविरुद्ध सय्यद गझनाफर ह्याना मी मदत केल्याबद्दल बादशहानी त्या पत्रात माझे आभार मानले आहेत. मी बंडखोर खेम सावंत ह्यांच्याशी युद्ध पुकारून त्यांची बरीच हानि केली व सय्यद गझनाफर ह्यांची त्यांच्यापासून मुक्तता केली. माझी मदत जर त्याना मिळाली नसती, तर त्याना फोंड्याचा किल्ला

व त्याच्या कक्षेतील प्रदेश हाती ठेवता आला नसता. बादशहाना हे कळल्याबद्दल मला फार आनंद झाला. पोर्तुगीज हे बादशहाचे मित्र आहेत. आणि ते मी आणखी एकदा सिद्ध केले आहे. मी बादशहाना रेव्हरंड फादर मानुएल द सा ह्यांच्यामार्फत लिहीत आहे......

गोवा, ११ अक्टोबर १७०५
कायतानु द मेलु द काश्त्रु

---

क्रमांक : १६५ दि. २–११–१७०५

हिंदुराव घोरपडे ह्यानी गोव्याच्या व्हाइसरॉयला विनंती केली होती की, त्यानी खेम सावंत भोसले ह्याना क्षमा करावी. व्हाइसरॉयने हिंदुराव ह्याना नकार दिला.

हिंदुराव घोरपडे ह्यांस

बाळाजीराम व आपाजी नीळकंठ ह्या दोघानी मला आपले पत्र आणून दिले. माझ्या पूर्वीचे व्हाइसरॉय व कुष्टाजी पंत ह्या दोघांचे संबंध चांगले होते असें आपण म्हणतां. कुष्टाजी पंत हे त्यावेळी आमच्या हद्दीला लागून असलेल्या प्रदेशाचे कारभारी होते. आपल्या आठवणीचे मला कौतुक वाटले. सिंधुदुर्ग व खांदेरी उंदेरी येथून आमच्या नौकावर दरोडेखोरांकडून जे हल्ले होतात त्याबद्दल मी आपणाकडे तक्रार केली आहे. तथापि असे असून देखील मी आपणापाशीं सलोखा ठेवण्याचा प्रयत्न करीन. आमच्या नौकांवर जे हल्ले होतात त्याबद्दल मी संभाजी[1] राजे ह्यांच्याकडे तक्रार गुदरविली असल्याने गुन्हेगारांना शासन करण्याची मोहीम मी हातीं घेतलेली नाही. संभाजी राजे काय उपाय योजना करतात त्याची मी वाट पाहात आहे. मागे त्यांचे मला पत्र आले होते. मी त्याना जें उत्तर पाठविले त्यांत ह्या घटनांचा उल्लेख केला आहे व आमच्या

---

१. शिवाजी राजे पाहिजे.

प्रजाजनांची लूट थांबवावी व त्यांचा लुटला गेलेला माल त्याना परत मिळावा म्हणून उपाययोजना करण्याची त्याना विनंति केली आहे. आमच्या मागण्या जर मान्य झाल्या तर संभाजी राजे व हे राज्य ह्यांच्यामध्यें सलोख्याचे व मैत्रीचे संबंध प्रस्थापित होण्यास अडचण उरणार नाही. खेम सावंत भोसले ह्याना क्षमा करण्याची विनंती आपण करता. त्याना क्षमा करण्याचा माझा बिलकूल विचार नाही. दुसरी गोष्ट अशी कीं तें आमच्याहून बलाढ्य नसल्याने त्यांची खोड मोडण्याकरितां मला दुसऱ्यांची मदत घ्यावी लागणार नाही. आपण मला जो नजराणा पाठविला आहे तो मी ह्या कारणावरून स्वीकारू शकत नाही. परंतु नजराणा अर्पण करण्यामागील सदिच्छेबद्दल मी आपला आभारी आहे. तसेच बाळाजी राम व आपाजी नीलकंठ ह्या दोघानी माझ्यासाठीं जें काय केले त्याबद्दलहि मी आभारी आहे.

गोवा, २ नवंबर १७०५
कायतानु द मेलु द कास्त्रु

---

**क्रमांक : १६६** **दि. ९-१२-१७०५**

*डिचोली येथील किल्ला व तटबंदी ह्यां बाबत गोव्याच्या राज्य सल्लागार मंडळाने घेतलेला निर्णय व व्हाइसरॉयने त्या ठरावाची केलेली अंमलबजावणी.*

पोर्तुगिजानी खेम सावंत भोसले ह्यांचेकडून डिचोली येथील किल्ला घेतला. ह्या मोहिमेत त्याना खेम सावंत भोसले ह्यांचे शत्रु हरी गांवस व राम सावंत ह्या दोघांची मदत झाली. सदर्हू किल्ला त्या दोघांचे ताब्यांत ठेवावा कीं तो उडवून जमीनदोस्त करून टाकावा तत्संबंधीचा निर्णय घेण्यासाठी पोर्तुगीज हिंदुस्थानचे व्हाइसरॉय व कॅप्टन जनरल कायतानु द मेलु द कास्त्रु ह्यानी राज्य सल्लागार मंडळाची बैठक दि. ९ डिसेंबर १७०५ रोजी बोलविली. राज्य

सल्लागार मंडळाचे सर्व सदस्य डिचोलीच्या मोहिमेत गव्हर्नर जनरल बरोबर सामील झाले होते. त्याना नंतर धर्मगुरु आर्चबिशप प्रिमाझ हे येऊन मिळाले. किल्ला व तटबंदी हरी गांवस व राम सावंत ह्या दोघांचे हाती ठेवूं नये असे सगळ्यांनाच वाटत होते. कारण त्या दोघावर त्यांचा विश्वास नव्हता. ते दगलबाजीने किल्ला आणि तटबंदी मराठ्यांना विकून टाकतील अथवा, त्यांचा शत्रु खेम सावंत ह्यांच्याशी समझौता करून त्यांच्या हवाली ती करतील अशी त्याना भीति वाटत होती. फोंडा येथील मोगल फौजदारानेहि व्हाइसरॉयना हरी गांवस व राम गावंत ह्या दोघां देसायांवर न विसंबण्याचा इशारा दिला होता. दुसरी गोष्ट अशी कीं मोगल व मराठे ह्या दोघांचाही सदहू किल्यावर दावा होता. म्हणून भांडणाचें हें कारणच नष्ट करण्यासाठीं राज्य सल्लागार मंडळाने किल्ला व तटबंदी उडवून जमीनदोस्त करून टाकण्याचा निर्णय बहुमताने घेतला. व्हाइसरॉयनी तो निर्णय त्वरीत अमलात आणला.

---

**क्रमांक : १६७** **दि. १४-१२-१७०५**

छत्रपती शिवाजीं दुसरे ह्यांनी श्री एकनाथ स्वामींच्या पुण्यतिथीचा उत्सव व्यवस्थित पार पडावा म्हणून स्वामींचे नातू उद्धव गणेश ह्याना पन्हाळ प्रांतातील मौ. वाठार तावडे हे गाव इनाम दिले.

श्री येकनाथ

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३२ पार्थिवनाम संवत्सरे पौष शुध दशमीं भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी राजश्री उधव बिन गणेश गोसावी यांस दिल्हे दानपत्र ऐसीजे. तुम्ही स्वामी सनीध येऊन विदित केले की आपण श्री स्वामीचे[1] नातु.

---

१. एकनाथ जन्म : शके १४७० (इ. स. १५४८), मृत्यु : शके १५३१ (इ.स. १६०९).

पैठणी आजीवरी मठ आहे तेथे राहात होतो. सांप्रत या प्रांते खडकलाटीस येऊन राहिलो आहो. श्री स्वामीची पुण्यतीत व उत्सव करून प्रतिवर्षी श्री पंढरपुरची यात्रा करून माहाराजाचे राज्यास कल्याण चिंतून आहो. यैशासी श्री स्वामीची पुण्यतीथ व उत्छव सांग चालावयास काही माहाराजे इनाम करून दिधलियाने श्रेय विशेष आहे. आपलाही वंश श्रीचा आहे म्हणून. त्यावरून स्वामीने मनास आणिता श्री वहूत थोर परमेश्वरपरायेण. याची पुण्यतीथ उत्छव सांग चालिल्याने स्वामीच्या राज्यास व स्वामीस कल्याण आहे म्हणून मौजे वठार तावडे ताा आळते सुभा प्रांत पनाळा (हा गांव इनाम दिला[1] इ. इ.) तारीख ८ रमजान सु॥ सीत मया.

---

क्रमांक : १६८ दि. १८–१२–१७०५

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांच्या आरमाराचे सुभेदार दाऊदखान ह्याना गोव्याच्या गव्हर्नरला दारूगोळयाची मदत पाठविण्याबद्दल पत्र पाठविले होते. त्या पत्रास गोव्याच्या राज्य सचिवाने पुढील उत्तर पाठविले.

शिवाजीच्या आरमाराचे सुभेदार दाऊदखान ह्यास

नामदार व्हाइसरॉय ह्याना आपले नुकतेच जे पत्र आले त्याचे उत्तर पाठविण्याची आज्ञा त्यानी मला राज्याचा मुख्य सचिव ह्या नात्याने केली. आपले पत्र वाचले गेले. मजकूर समजला. सांप्रत आरमार देशी पाठविण्याची घाई असून त्यांतच नामदार व्हाइसरॉय ह्यांची प्रकृति जरा नादुरुस्त आहे. म्हणून त्यानी मला आपणास उत्तर पाठविण्यास सांगितले. आपण खेम सावंत भोसले ह्यांच्या नौकांवर हल्ले चढविण्याचा जो निर्णय घेतला आहे, तो

---

१. सदर मजकूर नेहमीसारखा म्हणून घेतला नाही-

नामदार व्हाइसरॉय ह्याना पसंत असल्याचे त्यानी मला आपणास कळविण्यास सांगितले. आमचे आरमार लवकरच दक्षिणेकडे निघणार असून त्याला आपणास मदत करण्याचा हुकूम दिला जाईल. खेम सावंत भोसले ह्यांची जहाजें ज्या बंदरात आहेत, त्या बंदरांत एका जहाजांत घोडे आहेत. हें जहाज जर आपणाला पकडतां आले तर त्यांतील घोडे आपण आमच्याकडे पाठवून द्यावे. त्यांची किमत आम्ही त्वरीत फेडून टाकू. आपण ज्या दारूगोळ्याची मदत पाठविण्या-बद्दल लिहिले आहे, तेवढा दारूगोळा आम्हाला पाठविता येणार नाही. कारण, आम्हाला दारूगोळा लागणार आहे. डिचोलीच्या मोहिमेत दारूगोळा फार लागला. बंडखोर खेम सावंत ह्यांचे तिकडे जे दोन किल्ले होते ते आम्ही घेतले व दारूने उडवून जमीनदोस्त केले. त्या कामासाठी दारूची पिपे बरीच लागली. दारू बनविण्याचे काम सांप्रत चालू आहे. गोळे मात्र आम्ही आपणाला पुरवू शकू. वरील कारणामुळें गलबत इकडे तूर्त पाठवूं नये.

गोवा, १८ डिसेंबर १७०५
फ्रान्सिश्कु द आझावेद द सांद.

---

**क्रमांक : १६९** **इ. स. १७०५–०६**

गिरजोजी यादव ह्याना एका गावच्या सरदेशमुखीचे वतन दिल्याचे हिंदुराव घोरपडे ह्यांचे आज्ञापत्र.

श्री

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री हिंदूराऊ घोरपडे सरदेसाई ता मोकदमानी मौजे............ ता सु॥ सित मया अलफ. संपूर्ण राज्यातील सरदेसमुखीचे वतन

अमचे अहे व त्यापैकी मौजे मजकुरीचे सरदेसमुखीचे वतन राजश्री गिरजोजी यादव देसमुख पाा कराड यासि वौंशपरंपरे दिले अहे. तरी तुम्ही याचे अज्ञेप्रमाणे वर्तणूक करून सरदेसमुखीचा यैवंज माारनुलेकडे वौंशपरंपरेने सुरक्षित चालवणे. सरदेसमुखीचा हक लाजिमा व इनामती व कुलबाब कुलकानु जे असेल त्य माारनुलकडे उसुल देत जाणे.

---

**क्रमांक : १७०** **दि. १०-१-१७०६**

परशुरामपंत हे खेम सावंताना लष्करी मदत देण्याचा विचार करीत असल्याची बातमी गोव्याच्या व्हाइसरॉयला कळली असतां त्याने छत्रपतीकडील आपल्या वकिलास गोव्याच्या राज्यसचिवाला पत्र घालावयास सांगितले कीं ही मदत मी सावंताना मिळू नये म्हणून त्याने प्रयत्न करावा.

गोंविंदजी नाईक ह्यांस

ह्या राज्याची सेवा आपण कशी निष्ठेने करता त्याची नामदार व्हाइसरॉय ह्याना कल्पना आहे. या निष्ठेचा वारसा आपणाकडे आपल्यां वडिलांकडून आला आहे. ते देखील ह्या राज्याचे निष्ठावंत प्रजाजन होते. खेम सावंत भोसले ह्याना मदत मिळू नये म्हणून आपण प्रयत्न केलेत. नामदार व्हाइसरॉय ह्यांची प्रकृति नादुरुस्त असल्याने त्यानी मला हे पत्र आपणास लिहावयास सांगितले. आपल्या कामगिरीवर ते खुष आहेत. त्यानी आपणाला कळवावयास सांगितले आहे की, खेम सावंत भोसले ह्याना मदत मिळण्याचा प्रस्ताव पुढे येऊ नये म्हणून आपण दक्षता घ्यावी. अलीकडेच आम्हाला बातमी लागली आहे की, परशुरामपंत हे खेम सावंताना सैन्याची मदत पाठविण्याचा विचार करीत आहेत. हा ठराव अमलात येऊ नये

म्हणून आपण प्रयत्न करावा. ह्या संबंधीचा वृत्तांत आपण मला किवा नामदार व्हाइसरॉय ह्याना कळवावा.

१० जानेवारी १७०६

फ्रान्सिश्कु द आझावेद द सांद

---

क्रमांक : १७१ दि. १०–१–१७०६

मराठ्यांचे सैन्य खेम सावंत भोसले यांच्या मदतीला जांबावली येथें आल्याचे कळल्याने गोव्याच्या व्हाइसरॉयच्या चिटणीसाने हिंदुराव घोरपडे याना पुढील पत्र लिहिलें.

हिंदुराव याना

हे पत्र तुम्हाला नामदार व्हाइसरॉय यांच्या आज्ञेवरून लिहित आहे. ह्या राज्याशी तुमचे जे सलोख्याचे संबंध आहेत त्यांचे नामदार व्हाइसरॉय याना केवढी आस्था वाटते ते कळविण्यासाठी म्हणून तुम्हाला हे पत्र पाठविण्यात येत आहे. तुमच्या आणि आमच्या राज्याच्या मैत्रीत बिघाड व्हावा म्हणून खेम सावंत भोसले यानी तुमच्याकडे आमच्याविरुद्ध मदत मागितली. पण ती मदत तुम्ही त्याना दिली नाही. ही गोष्ट तुमच्या आमच्याविषयींच्या धोरणाला अनुसरूनच आहे. कारण तुम्हाला जुनी मैत्री टिकवून ठेवावयाची आहे. नामदार व्हाइसरॉय यानी ह्या गोष्टीची दखल घेतली असून प्रसंगी त्याची फेड ते केल्यावांचून राहाणार नाहीत. परंतु नुकतीच त्याना बातमी कळली आहे की, जांबावली येथे काही सैन्य आले असून ते राणीच्या[1] संमतीने खेम सावंत भोसले यांच्या मदतीला आले आहे.

---

१. ताराबाई.

हा निर्णय राणीने आपल्या सल्ल्याने कसा घेतला त्याचे आम्हाला आश्चर्य वाटते.

खेम सावंत भोसले हे राणीचे शत्रु होते, इतकेच नव्हे, तर राणीने नामदार व्हाइसरॉय याना कळविले होते की, खेम सावंत भोसले यांचा निःपात होईपर्यंत त्यांच्याशी युद्ध करण्याचा आपला विचार आहे. आणि आतां राणी खेम सावंत ह्याना मदत पाठविते हे कसे काय ते आम्हाला कळत नाही. खेम सावंत भोसले ह्यानी राणीला एखादे अभिवचन दिले आहे का? तसे असेल तर तिने त्याच्या वचनावर मुळीच विसंबून राहू नये. कारण हा मनुष्य वचन पाळणारा नाही. नामदार व्हाइसरॉय हे तुम्हाला विनंती करतात की तुम्ही ह्या गोष्टीचा पूर्ण विचार करावा. तुम्हाला ती गोष्ट मान्य होणार नाही असे त्याना वाटते.

गोवा, दि. १० जानेवारी १७०६
फ्रान्सिस्कु द आझावेद द सांद

---

**क्रमांक : १७२** **दि. २०-३-१७०६**

रामचंद्रपंत अमात्य ह्यानी गोव्यास शंभर बैल पाठविण्यासाठीं गोव्याच्या व्हाइसरॉयकडे परवानगी मागितली होती. व्हाइसरॉयने त्याना खालील पत्र पाठविले.

रामचंद्र पंडीत ह्यांस

आपले पत्र मिळाले, मजकूर समजला. आपणाला जीवनौपयोगी व इतर वस्तूंची आवश्यकता भासत असून त्या नेण्याकरतां आपण आमच्या बार्देशच्या प्रदेशांत शंभर बैल पाठविण्याचा विचार चालविला आहे व आमची परवानगी मागितली आहे. त्याचप्रमाणे आपल्या वाई येथील जहागिरीतील व्यापाऱ्याना व त्यांच्या मदतनिसानाहि इकडे

व्यापारासाठी येण्यास परवानगी मिळावी अशी आपली इच्छा आहे. परंतु खेम सावंत भोसले ह्यांच्याशी आमचे युद्ध चालू असून इकडे येणाऱ्या बैलाना त्यांच्या प्रदेशातून यावे लागते म्हणून आम्ही त्याना बंदी केली आहे. खेम सावंत हे इकडून जाणाऱ्या बैलावर जकात वसूल करतात. तथापि आपली अडचण लक्षांत घेऊन मी शंभर बैलांना इकडे येण्यास परवानगी देईन. आणि ज्या वेळी आपण खेम सावंत ह्यांच्याशी युद्ध सुरू कराल तेव्हां आपल्या सर्व लोकाना आणि व्यापाऱ्याना इकडे येणाऱ्या वाटा खुल्या करूं व व्यापार करण्यास परवानगी देऊं. मागें शिवाजी राजे ह्यानी मला पत्र लिहून खेम सावंत ह्यांचा नाश करण्यास प्रवृत्त केले होते. माझ्या बरोबरच तेहि खेम सावंताशी युद्ध करणार होते. असे जर घडले तर त्या लुच्च्यापासून आपण मुक्त होऊं. त्यामुळे आज आपणामध्यें जी शांतता नांदत आहे ती कायम टिकेल व व्यापार आणि दळण वळण ह्यांत वाढ होईल. ती परिस्थिती आज नाही म्हणून व्यापारी व प्रवासी ह्याना उपद्रव होत आहे.

गोवा, २० मार्च १७०६

कायतानु द मेलु द कास्त्रु

---

क्रमांक : १७३ दि. २९–७–१७०६

भगवंत मल्हार व गोपाळ मल्हार कुलकर्णी ह्यांनी कासी रंगनाथ बरपे ह्याला लिहून दिलेले हे क्रयपत्र आहे. शेख निजाम जेव्हा कोल्हापुरला आला त्यावेळी ह्या कुलकर्णींना शंभर रूपये शामजी नरसिंह देशकुलकर्णी प्रा। पन्हाळा ह्याला द्यावे लागले. त्यासाठी त्यानी जे कर्ज काढले ते कासी रंगनाथकडून पैसे घेऊन भागविले. परंतु कासी रंगनाथचे पैसे ते देऊ न शकल्याने त्यांनी आपले मौजे पाटपनाळे तर्फ बोरगांव ह्या गावचे कुलकर्ण कासी रंगनाथला विकले,

भोमाजी बिन
बाजी देसाई
ताा मजकुर
(नांगर)
बी कलम
वेताळजी बिन
बाबाजी देसाई
ताा कळे
(सिका)
बी कलम
रुद्राजी सिवदेऊ
देशकुलकर्णी
ताा मलकापूर.
बी नरसो
रखमांगद
देसकुलकर्णी
ताा असडोली.

स्वस्ति श्री नृप शालीवाहन शके १६२८ व्ययनाम संवत्सरे श्रावण शुद्ध प्रतिपदा इंदुवासरे छ २९ रबिलाखर सुहूर सबा मया अलफ. तदिनी भगवंत मल्हार व गोपाळ मल्हार कुलकर्णी मौजे पाटपनाळा तर्फ बोरगाव प्रांत पनाळा याणी राजश्री कासी रंगनाथ वरपे किले विशाळगड स्वामीचे शेवेसी लेहून दिल्हे ऋयपत्र ऐसाजे. आपले पिते मल्हार भोगनाथ असता त्याणी स्वामी पनाळाला असता रुपये १०० एकसे रुपये कर्ज मागण्यासी आले. त्यावरी तुमी त्यासी पुसीले की ये समई कोणता तगादा निकडीचा लागला जे पैका मागता. यावरी त्याही स्वामीपासी वर्तमान सांगितले की सेख निजाम मोगल याने कोल्हापुरास आला तेव्हा शामजी नरसिह देशकुलकर्णी प्रांत पनाळा यासी पैकीयाचा तगादा लागला. त्यासी द्यावयासी नाही. त्या बाा एका ब्राह्मणाचे कर्ज रुपये १०० एकशे रुपये दिल्हे. त्या ब्राह्मणाची मुदती जाहली. त्याने उपोषण करीत बैसला आहे. त्यासी द्यावयासी पाहिजे म्हणोन वर्तमान सांगितले. यावरून नक्त रुपये १०० शंभर दिल्हे. त्यासी कमबेश वरिसे पंधरा होतील. त्याउपरी धामधुम जाहली म्हणून परागंधा होऊन देशावरी गेलो. त्यावरी माणसे घेऊन मागी बोरगावासी आलो. साहा महिने जसे तैसे तेथे राहिलो. मग टिकाव नव्हे देखले. स्वामीच्या गावास कौलवया येथे येऊन कौलवयात राहिलो. तेथे कर्ज गला खंडी ८३ तीनी घेतले. त्यासी कमबेश दाहा वरूष होतील. त्यावरी कुडाळ प्रांतास गेलो. तेथे आपला पिता मृत्यु पावला. ते समई सांगितले की स्वामीचे कर्ज फारीख करावे. त्यावरी

घाटावरी आलो. धामधुम थोर. जीवमात्र रक्षून होते. याउपरी विशाळगड मोगलानी घेतला. स्वामीचे सर्वस्व जाऊन तुम्हीही वेळूरासी आलेती. ते समई तुमचेही समय कठीण. त्याकरिता आमाकडे माणसे पाठविली. आमी येऊन मुदती फुरसती केली. मुदतीस ही पैसे पोल नाहीत. किरकोळ रुपये ३६ छतीस पावले. वरकड पैका व बयाने पावत हिशेब करिता कळंतर व गळिवाची वाडी मिळोन बे मोबलग हिशेब होतो. शेवटचा हिशेब + + + + श्री विज्ञानेश्वर माा करता दामदुसर का। तीसर ऐसे म्हणता नक्त रुपये १०० एकूण दुसर २०० दोनीसे गल्ला मुदलखंडी ८३ तीनी एकूण तिसर खंडी नऊ दर खंडीस रुपये ५० पनास एकूण रुपये ४५० एकूण साडे साहासे रुपये जाहाले. त्यापैकी छत्तीस रुपये पावले. बाकी ६१४ साहासे चवदा रुपये राहतात. त्यासी द्यावयासी ताखत नाही. पुढे काही सुगम नाही. याकरिता राा आंताजी सुखदेऊ व सिवजी तुकदेव कात्लजवडकर यासी मधस्त घालून मौजे पाटपन्हाळे ताा मजकूर हा गाव आपला कुलकर्ण्याचा घेऊन उत्तीर्ण करणे म्हणऊन सांगितले. त्यावरी स्वामीचे फुरपैकी म्हणून मान्ये करीत ना. परंतु द्यावया ताकत नाही. याकरिता ग्रहस्थानी सांगितले त्यावरून स्वामीनी मान्य केले. त्यावरून स्वामीस सदरहू पैके बा। गाव विकते देऊन दिल्हा. यासी हक लाजिमा इनामती पेसजीप्रमाणे

| इनामती | हकबेल |
|---|---|
| १५ बालकृष्ण पाटील | २ लायजमा १ कागद बाये |
| | ४ कुलकर्णी मुशारा |

७

येणेप्रमाणे आहे व कुलकर्ण आपले मिरास तुम्हास सदरहू पैकी बा। विकत दिले. तुमी लेकराचे लेकरी खाऊन सुखरूप राहणे. सदरहू वतनास आपले लेकराचे लेकरी भाऊबंदास दाईज गोत्रजास आर्थआर्थी संबध नाही. सदरहू कुलकर्णास काही लागलीगाडी लागल ते आमी

वरानयास चुकले त्यासी गाईब्राह्मणाची शफत असे व पूर्वजाचे शफत असे.

साक्ष

माणकोजी बिन लखजी पटेल
मौजे वोकली ताा मजकूर
मादजी बिन बाबाजी पाटील
मौजे पोरळे ताा मजकूर
नांगर असे.
तुकाजी पाटील मौजे घाणपे
ताा माा नांगर असे.
बाबाजी बिन रावजी पाटील
मौजे मानपड ताा माा
नांगर असे.
रामजी पाटील मौजे परली
तर्फ मजकूर नांगर असे.
इरदोजी पाटील मौजे माजनाळ
तर्फ माार नांगर असे.
वाधरोजी पाटील मौजे पुशोटे
तर्फ मजकूर नांगर असे.
कृष्णाजी पाटील मौजे नसलीदर
तर्फ मजकूर नांगर असे.
मौजे रेटरे पा। सिराळे सुभा
परगणे मलकापूर.
धर्माजी बिन गंगाजी पा।
नांगर असे.
नारोजी बिन फिरगोजी पाा
आजमोजी बिन सिदोजी पाा
मुक्षेजी काटकर मखदूम.

खळोजी बिन व्हनाजी पटेल
राईभागाय नांगर असे.

धयाजी बिन पोसजी पाटील
मौजे वारनूळ नांगर असे.

कामजी पाटील पाटील सतपणा
मौजे उतुरी ताा मजकूर
नागर असे.

उमाजी पाटील
मौजे जाधगाय (?) तर्फ मजकूर
नांगर असे.

दसाजी बिन आबाजी पाटील
मौजे घुगुरी तर्फ मजकुर नांगर असे
खेमाजी पाटील मौजे दिगवड
तर्फ मजकुर नांगर असे.

आपाजी पाटील मौजे कोतोली
ताा मजकूर नांगर असे.

**क्रमांक : १७४** **दि. ४–९–१७०६**

रामचंद्र पंत ह्यानी गोव्याच्या व्हाइसरॉयला एक पत्र पाठविले होते. परंतु ते पत्र पंताचे नसल्याचा व्हाइसरॉयच्या सेक्रेटरीस संशय आल्याने त्यानें ते स्वीकारले नाही.

शिवाजीचे विश्वासू रामचंद्र पंडीत ह्यास व्हाइसरॉयच्या सेक्रेटरीचे पत्र.

आपला जासूद बाळाजी नारायण हा इकडे नामदार व्हाइसरॉय ह्याना देण्याकरिता आपले पत्र घेऊन आला. राज्याचा सचिव ह्या नात्याने ते पत्र माझ्याकडे देण्यात आले. पण मी ते नामदार व्हाइसरॉय ह्यांच्या अवलोकनार्थ पाठविले नाही. कारण, त्याचा मायना बरोबर नव्हता. नामदार व्हाइसरॉय ह्यांचा दर्जा राजेरजवाड्यांसारखा असल्याने आशिया खंडांतील राजे व महाराज ह्याना जशी सन्मानपूर्वक पत्रे लिहितात, तशीच पत्रे त्यानाहि लिहिली पाहिजेत. त्यामुळे आपल्या पत्राच्या खरेपणाविषयी मला संशय आला, कदाचित, खेम सावंत ह्यानीहि ते आपल्या नावे लिहिले असण्याची शक्यता होती. त्यांचे आणि आमचे सांप्रत युद्ध चालू असल्याने त्यांच्या राज्यात ज्या वस्तूंचा तुटवडा आहे त्या वस्तु आपल्या नावे आपणाकडे नेण्यासाठी त्यानी ते पत्र लिहिलें असावे असा मला संशय आला. तरी यापुढें आपण नामदार व्हाइसरॉय ह्याना पत्रे लिहाल तेव्हा त्यांचा मायना बरोबर लिहावा. आपला इसम इकडे आमच्या परवान्यानुसार आला होता. त्याला आल्या वाटेने परत पाठविला आहे.

गोवा, ४ सप्टेंबर १७०६

फ्रान्सिश्कु द आझावेद सांद

क्रमांक : १७५ दि. ५–१०–१७०६

पिलाजी जाधव ह्यानी शंकराजी बकाजी फर्जंद ह्याची मौजे नांदेडची निम्मी मोकदमी या खरेदीपत्राद्वारे विकत घेतली.

श्री

खरेदीपत्र शके १६२८ व्ययनाम संवत्सरे आश्वीन शुद्ध विजयादशमी सणवार[1] ते दिवशी पिलाजी जाधव बिन चांगोजी जाधव मौजे दिवे कसबे सासवड याशी शंकराजी बिन बकाजी फर्जंद निमे मोकदम मौजें नांदेडे तर्फ खडकवासले कर्यात मावळ सुर सन सब्बा मय्या अलफ लेहून दिले खरीदी खत ऐसेजे. मौजे मजकुरची मोकदमी निमे वडील नांव नांगराची तक्षीम आपले वतन आहे. त्यास आपणास मौजे मजकुरची लावणी होत नाही. नातवानी जाहली. कर्जदार जाहलो. याकरिता आपले स्वसंतोषे खुश रजावंदीने दिले असे. यासी जो कोणी हिला हरकत करील व आपला भाऊबंद मुजाहीम होईल तो आपण वारून आपला महजर व खुर्द खत आपणाजवळ होते ते व जिन्नस तुम्हांस दिले असे. श्रावणमासी सीवझडे मोकदम व देशमुख व देशपांडिये कसबे मजकूर जमा करून तुमच्या नांवाचा महजर करून देऊन आपली आई रुपाई व आपण उभयतां येक दिल होऊन खुश रजावंद होऊन आपली तक्षीम दिली असे. आपला हक्क इनाम घरठाव देखील काळी पांढरी निमे मोकदमी दिली असे. हे खरीदीपत्र. सही. तेरीख १० रज्जब मुक्काम मुरटी–मोढवे प्रा सुपें वोळी सुमार ३१

बी कलम राघो अनंत निशाणी
गोही – ( – ० नांगर

---

१. वाराप्रमाणे तारीख दिली आहे.

रतनोजी आढाव मोकदम मौजे
अरणगांव प्रा रांजणगांव
सरकार जुन्नर
. ( – ० निशाणी
नांगर

बायाजी कापरा मौजे आंबेगांव
प्रा पुणे

शिवाजी वासवडे मौजे आंबेगांव
प्रा पुणे

जावजी चावट मोकदम मौजे
हिंगणे प्रा पुणे
– ( – ० निशाणी
नांगर

भुतोजी राणबा वरे मोकदम मौजे
आरणगांव ता कडें प्रा कडे वळीत
निशाणी
नांगर . ( – ०

---

**क्रमांक : १७६** **दि. २३–१०–१७०६**

स्वरुपजी, सुभानजी, पिराजी आदि गिरजोजी यादवांच्या भाऊबंदानी त्यांच्या देशमुखीतील दहा गाव धनाजी जाधवाना विकले होते. ते गिरजोजीना परत करावे म्हणून त्यानी धनाजी जाधवांना पत्र लिहिले.

श्री

राजश्री धनाजी जाधवराऊ
गोसावी यास

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये— स्नेहांकित सुभानजी यादव व स्वरूपजी यादव बिन पिराजी यादव व पदमोजी यादव बिन सिवाजी यादव व पदाजी यादव बिन अबाजी यादव राम राम विनंती.

सु॥ सन सबा मया अंलफ. पाा कऱ्हाडची देशमुखी वतन राजश्री छत्रपति स्वामीचे. त्यास या राज्यात गिरजोजी यादव याने चंदी ताा कस्ट मेहनत व टका पैकियानेही खस्त केली अणि स्वामीसेवा येकनिस्टपणे केली म्हणून माहाराज राजश्री स्वामी कृपाळू होऊन पाा मजकुरची देसमुखी गिरजोजी विन मुधोजी यादव यास दिल्ही. त्यास अम्ही भाऊबंद म्हणऊनु मोंगलाचे तरफेस जाऊन देसमुखी खादली अणि देसमुखीपैकी गाव विकिले म्हणऊनु हुजुर माहाराज राजश्री——स्वामीपासी फिरयाद जाहाली. त्यावरून हुजूर आपणास बोलाऊन अणून हुकूम केला की तुम्हास देसमुखी खाण्यास काये गरज अणि विकावयास काये समध. वतन दिवाणीचे गिरजोजीस दिल्हे असता तुम्हास प्रयोजन नाही. म्हणऊन अन्याये ठेविली. अम्हास देसमुखीस समध नाही. देसमुखी दिवाणची दिवाणे गिरजोजी यादवास दिल्ही. अम्हास तालुक नाही तुम्हास अम्ही देह सुमार १० दाहा विकून टकापैका घेतला अहे. तरी सदरहू गाव तुम्ही गिरजोजी यादव याचे यास देणे. अम्ही तुम्हापासून टका घेतला अहे तो अम्ही तुम्हास देऊन तुम्हास त्याच्या वतनासी कथला करावयास प्रयोजन नाही. तुम्हास देह १० दाहा विकीत दिल्हे असेत. बी ताा.

| पाली | इदोली | हिंगनाळे | अतीत | नागठाणे |
|---|---|---|---|---|
| १ | १ | १ | १ | १ |
| वाहगाऊ | बेलवडे | नबसी | घोणसी | सोडूसी |
| १ | १ | १ | १ | १ |

येकूण देहे दाहा येणेप्रमाणे तुम्हास दिल्हे अहेत. ते तुम्ही राजश्री गिरजोजी यादव याचे यास देणे. विशेष काय लिहिणे. कृपा असो दिजे. छ २६ माहे रजब. ही विनंती.

मोर्तब

बी कलम रुद्राजी चंदो देसकुलकर्णी
परगणे कराहाड

( पाठीवर पिराजी यादव ह्यांचा शिक्का )

---

क्रमांक : १७७ दि. २३-१०-१७०६

सुभानजी, स्वरुपजी, पद्मोजी व पदाजी यादव हे यासिनखान ह्यांस लिहितात की, गिरजोजी यादवाच्या देशमुखीपैकी जी बारा गावे आम्ही तुम्हास विकली होती, ती गिरजोजीस परत करावी. त्या गावांचा आम्ही घेतलेला पैसा तुम्हास परत करू.

दरबदगी कमब यासीनखानसाहेब
साहेबाचे बंदगीस

अर्जदास्त सेरीकर सुभानजी यादव व स्वरूपजी यादव बिन पिराजी याद्रव व पदमोजी यादव बिन सिवाजी यादव व पदाजी बिन आबाजी यादव सु।। सन हजार १११६ सन सब्रा मया अलफ.

बे।। ता छ २६ माहे रजब पावेतो साहेबाचे नेक नजरेकरून वर्तमान येथस्थित असे.

बे।। पा कऱ्हाडची देसमुखी वतन राजश्री—— छेत्रपती स्वामीचे. त्यास राज्यामधे गिरजोजी यादव यानी चंदी ता कस्ट मेहनत व टका पैकीयाने खस्त केली आणि स्वामी सेवा येकनिष्ठपणे केली म्हणुनु माहाराज राजश्री—— स्वामी कृपाळू होऊन पा मजकूरची देसमुखी गिरजोजी बिन मुधोजी यादव यास अजराहा— म्हरामत दिल्ही. त्यास अम्ही भाऊबंद म्हणून पा मजकुरच्या ठाणियात जाऊन देसमुखी खादली आणि देसमुखीपैकी गाव विकिले म्हणऊन

हुजूर माहाराज राजश्री——— स्वामीपासी फिरयाद जाहाली. त्यावरून हुजूर आपणास बोलाऊन अणून हुकूम केला की तुम्हास देसमुखी खावयास काये गरज आणि विकावयास काये समध. वतन दिल्हे असता गिरजोजीस तुम्हास प्रयोजन नाही म्हणऊन अन्याये ठेविला. अम्हास देसमुखीस संमध नाही. देसमुखी गिरजीजी यादव यास दिल्ही आम्हास वतनासी तालुका नाही. तुम्हास अम्ही देह सुमार बारा १२ विकिले आणि टका पैका घेतला आहे. तरी सदरहू गाव तुम्ही गिरजोजी यादव याचे यास देणे. अम्ही तुम्हापासून टका घेतला आहे तो आम्ही तुम्हास देऊन. तुम्हास त्याच्या वतनासी कथला केला न पाहिजे. अम्ही साहेबास देह १२ बारा विकित दिल्हे आहेत. बी ताा

| विग | ———डु | दुलसणी | सवदे | येवती | कालवडे |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ | १ | १ | १ | १ |

| कासार सिरसाल | हुरबे | जिती | येणदे | माहासुली | कुंभारगाव |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ | १ | १ | १ | १ |

यकूण देहे बारा येणेप्रमाणे दिल्हे अहेत. ते सदरहू देहे साहेबी राजश्री गिरजोजी यादव याचे यास दिल्हे पाहिजे. बंदगीस रोश न होय. हे अर्जदास्त.

(पिराजी यादव ह्यांचा शिक्का)

बी कलम रुद्राजी चंदो देसकुलकर्णी
परगणे कराहाड.

---

**क्रमांक : १७८** **दि. २८–१०–१७०६**

सुभानजी, स्वरूपजी व पद्‌मोजी हे गिरजोजी यादवाचे तिघे भाऊबंद जाहीर करतात की, कऱ्हाड प्रांताची देशमुखी व मौजे गोवारेची पाटीलकी गिरजोजी यादवांची आहे. त्यांच्या वतनाचे अपहरण करून आम्ही देशमुखीपैकी पंचवीस गांव विकले.

( वरील जागा कोरी )

द।। बे।। सुभानजी यादव व सरूपजी यादव बिन पिराजी यादव व पदमोजी बिन सीवाजी यादव सु।। सन सबा मया अलफ. कारणे लेहून दिला कतबा यैसाजे. प्रां। कऱ्हाडची देसमुखी व मौजे गोवारे येथील पाटीलकी ही वतने साहेबाची. त्यास गिरजोजी बिन मुधोजी यादव यानी या राज्यात माहाराज राजश्री........................थोरले कैलासवासी साहेब यापासून च्यार पिढचा कष्ट मेहनत केली व वतनानिमित्य टका पैका खर्च करून खस्त खादली व चंदीचे प्रसंगीही बहुतच येकनिष्ठपणे स्वामीसेवा केली. त्यावरून साहेब कृपाळू होऊन प्रां। मजकुरची देसमुखी व मौजे मजकुरची पाटीलकी गिरजोजी बिन मुधोजी यादव यास अजरामऱ्हामत करून दिल्ही. त्यास अपण मोगलाचे तरफेस चाकरी करीत होतो. अपण यादव म्हणऊन परखूर होऊन हरामखोरी करून याचे वतन प्रांत मजकुरचे देसमुखी पैकी गाव विकिले. देहे सुमार २५

धनाजी जाधवराऊ देहे १०

| | | | |
|---|---|---|---|
| पाल | १ | वडगाऊ | १ |
| अतीत | १ | होळवडे | १ |
| नागठाणे | १ | नडसी | १ |
| हिंगनोळे | १ | घोणसी | १ |
| इंदोली | १ | खोडसी | १ |
| | ५ | | ५ |

यासनखान देहे १२

| | | | |
|---|---|---|---|
| कासारसिरबे | १ | सवादें | १ |
| साळसिरबे | १ | वोड | १ |
| तुळसणी | १ | विंग | १ |
| कुंभारगाऊ | १ | येवती | १ |
| कालवडे | १ | येणदे | १ |
| जिती | १ | माहासुली | १ |
| | ६ | | ६ |

तुकोजी यादव देहे २

१ मौजे कोडोली

१ मौजे कोरगाऊ

२

तांबोळी देहे मौजे येरोळे १

येणेप्रमाणे देसमुखी पैकी गाव विकून टका पैका घेऊन वतनाची खरावी केली. हे वर्तमान हुजूर साहेबास विदित जाले. त्यावरून साहेबी आपणास तलव करून हुजुर अणून हुकुम केला की तुम्ही हरामखोरी करून दुसरियाचे वतन विकावयास काय समंध यैसे हरामखोर म्हणऊन तकसीर साहेबी ठेविली. त्यावरून आपण साहेबास अर्ज केला की अपण हरामखोरी करून परकीयानेच वतन दुसरियाचे विकून टकापैका घेतला आहे. ते सदरहू गाव त्यापासून सोडऊन देईन. ज्याचा टका पैका आपण घेतला आहे तो त्याचा त्यास देऊन त्याचे लिगाड वारून म्हणऊन अर्ज केला. त्यावरून साहेब कृपाळू होऊन तकसीर माफ केली. गिरजोजी बिन मुधोजी यादव देसमूख व आपणही यादव. परंतु प्रां। मजकुरचे देसमुखीसी व मौजे मजकुरचे पाटीलकीसी अपणास समंध नाही. अपण यादव म्हणऊन वतनासी कथला करावयास लेकराचे लेकरी समंध नाही. आपले भाऊबंद आदल्या घराणियातील कोणी असतील त्यास हे वतनास समंध नाही. साहेबी गिरजोजी यादव यास वतन देसमुखी व पाटीलकी दिल्ही आहे ते यानी आपले लेकराचे लेकरी खाऊन सुखी असावे. हा कतबा लेहून दिल्हा. सही. सके १६२८ व्ययेनाम संवत्सरे कार्तिक सुध त्रितिया सोमवार वळी सुमार ४६ सेताळीस. यैन वळी ४२. तूट वळी च्यार

तेरीख १ शाबान — ( पिराजी यादव ह्यांचा शिक्का )

बी कलम रुद्राजी चंदो देसकुलकर्णी
परगणे कऱ्हाड

गोही

का। कऱ्हाड — मौजे कारवे अंबाजी बिन बजाजी पा। (निशाणी नांगर)

मलजी पाटील मौजे वडगाव (निशाणी नांगर)

येसाजी पाटील व विठल हरी कुलकर्णी मौजे मजकूर. (निशाणी नांगर)

लखमाजी पाटील
मौजे येवती
(निशाणी नांगर)

मौजे रेटरे
(निशाणी नांगर)

मौजे गोदी
(निशाणी नांगर)

मौजे येरवले
(निशाणी नांगर)

राजजी पटेल
मौजे केसे
(निशाणी नांगर)

सताजी पाटील
मौजे तुळसणी
(निशाणी नांगर)

सुळकाई पाा
व गोसो हरी
कुलकर्णी
मौजे सवदे
(निशाणी नांगर)

जोती पाटील
मौजे नेळुलिद

धारोजी पाटील
मौजे सिरटे
(निशाणी नांगर)

लखमाजी बिन तुळाजी
पाा ठारगाव
(निशाणी नांगर)

सुभानजी पाटील ठाणे
(निशाणी नांगर)

---

**क्रमांक : १७९** दि. २८-१०-१७०६

सुभानजी, स्वरुपजी, पद्मोजी, आदि गिरजोजी यादवाच्या भाऊबंदानी त्यांच्या कऱ्हाडच्या देशमुखीपैकी पंचवीस गाव विकले होते. त्याबद्दल छत्रपतीनी त्यांच्यावर ठपका ठेवला. ते गिरजोजीना लिहितात कीं, तुमच्या वतनाशी आपला संबंध नाही. गाव विकून घेतलेला पैसा आम्ही ज्याचा त्याला परत करू.

श्री

तालीक

राजश्री गिरजोजी बिन मुधोजी यादव देशमुख
पाा करहाड गोसावी यास

ॐ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य-----स्नेहांकित सुभानजी यादव व स्वरूपजी बिन पिराजी यादव व पदमोजी बिन सिवाजी यादव रामराम. सुहूर सन सबा मया अलफ कारणे लेहून दिल्हे पत्र

यैसीजे. पाा मजकुरची देशमुखी व मौजे गोवारे येथील पटेलगी वतन माहाराज राजेश्री------ साहेब यांचे. त्यास तुम्ही राज्यात माहाराज राजश्री--- थोरले कैलासवासी यांपासून कस्ट मेहनत च्यार पिढ्या केली व चंदीचे प्रसंगीही बहुतच येकनिस्टपणे स्वामी सेवा केली. वतनानिमित्य टका पैका देऊन खस्त खादली. त्यावरून माहाराज राजश्री----- साहेब याणी कृपाळू होऊन पाा मजकुरची देशमुखी व मौजे मजकुरची पटेलगी ही वतनें तुम्हास अजरामऱ्हमत करून दिली. त्यास आम्ही मोगलाचे तर्फेस ठाणियात चाकरी करीत होतो. माहाराज राजश्री----- साहेबी तुम्हास वतनें दिल्ही. त्यास वतनें तुमची. आपणास पाा मजकुरचे देसमुखीसी व मौजे मजकुरच्या पटेलगीसी समंध नसता आपण यादव त्यावरून देशमुखीस व पटेलगीस परखूर होऊनु पाा मजकुरचे देशमुखी पैा। देह २५ पंचवीस दुसरियाचे विकून टका पैका आपण घेतला म्हणून हे वर्तमान माहाराज राजश्री----- साहेब यास विदित जाले. त्यावरून माहाराज राजश्रो----- साहेबी आपणास हुजूर बोलाऊन आणून हुकूम केला की तुम्हास प।। मजकुरचे देशमुखीसी व मौजे मजकुरचे पटेलगीसी समध नसता दुसरियाचे वतन तुम्ही दरम्याने विकून खराब केले. असे हरामखोर म्हणून तकसीर[1] साहेबी ठेविली. त्यावरून आपण तुम्हास बोलिलो की माहाराज राजश्री----- साहेबी वतनें तुम्हास दिल्ही. त्या वतनास आम्हास समंध नसता तुमच्या वतनास आपण परखूर होऊ नये व विकू नये. असे असता आपण तुमच्या वतनास परखूर होऊन दुसरियास वतन देशमुखीचे विकून टका पैका घेतला आहे हे आपणापासून सर्वस्वे अंतर पडिले आहे. त्यास प्राा मजकूरचे देशमुखीपैकी देह सुमार २५ विकिले आहेत. बी ताा[2]

---

१. गुन्हा.

२. गावांचा तपशील क्रमांक १७८ मध्ये आला आहे.

धनाजी जाधवराऊ देहे सुमार १० यासीनखान देहे सुमार १२
तुकोजी यादव देहे सुमार २ तांबोळी देहे मौजे येरोळे

येणे प्रमाणे देहे विकून आपण टका पैका घेतला आहे. तो आम्ही ज्याचा त्यास टका पैका देऊन लिगाड वारून. तुम्ही आपले वतन देसमुखी व पाटीलकी सुखरूप घेणे. आम्हास दोनी वतनासी समंध नाही यैसे बोलिले. त्यावरून तुम्ही राजश्री परशराम पंडित प्रतिनिधि याच्या विद्यमाने माहाराज राजश्री——साहेबास अर्ज करून आमचा गुन्हा माप करून घेतला. आम्ही तुमच्या वतनापैकी गाव विकून टका पैका घेतला आहे तो आम्ही ज्याचा त्यास देऊन लिगाड वारून. तुम्हास त्याच्या टकियासी निसबत नाही. तुम्ही आपले वतन सुखरूप खाणे. आपणास व आपल्या घराणियातील भाऊबंद यादव कोणी असतील त्यास तुमच्या वतनासी लेकराचे लेकरी समंध नाही. तुम्हास साहेबी कृपाळू होऊनु देशमुखी व पटेलगी दिल्ही आहे ती तुम्ही आपले लेकराचे लेकरी प॥ मजकुरची देशमुखी व मौजे मजकुरची पटेलगी खाऊन सुखरूप असणे. सदरहू लिहिल्याप्रा वर्तणूक करावी. बिला हरकत न करावी म्हणून माहाराज राजश्री———साहेबी आपणास जमान मागितला. तरी सदरहू लिहिल्याप्र॥ वर्तणूक करून बिला हरकत करणार नाही म्हणून आपण जमान दिल्ह असोत. हे लेहून दिल्हे पत्र. सही. शके १६२८ व्ययेनाम सवत्सरे कार्तिक सुध त्रितिया सोमवार. वळी सुमार ७४. येकवळी ६३ त्रेसष्ट तूट वळी आठ. श्रीकार याच्या वळी तीन. यकून वळी सुमार चौऱ्याहतर रास. तेरीख छ १ शाबान

बी कलम रुद्राजी चदो देशकुलकर्णी प॥ कऱ्हाड

गोही

| | | |
|---|---|---|
| क॥ कऱ्हाड | मौजे कारवे अंबाजी पाटील १ | मलजो पाटील मौजे वडगाव १ |

| | | |
|---|---|---|
| मौजे वोड | लखमाजी पाटील<br>मौजे येवती १ | मौजे रेटरे<br>अश्वदजी पटेल व<br>भिकाजी व |
| मौजे येरोळे<br>१ | मौजे गोदी<br>१ | खेमाजी कुलकर्णी |
| राजजी पटेल<br>मौजे केसे १<br>जोती पाटील<br>मौजे रेटरे खुर्द १ | संताजी पटेल<br>तुलसणी १<br>धारोजी पा<br>सिरट १<br>सुभानजी पटेल<br>मौजे सेणे १ | तुळबाई पाटलीण व<br>गोसो हरी कुलकर्णी व<br>लखमाजी बिन तुळाजी<br>पटेल मौजे चोरगाऊ १ |

---

**क्रमांक : १८०** **इ. स. १७०६–०७**

कऱ्हाडची सरदेशमुखी गिरजोजी यादव ह्याना देण्यांत आली आहे. परंतु अलीकडे धनाजी जाधव ह्यांच्याकडून तीत व्यत्यय येत आहे. तरी ताराबाई-साहेबाना विनंती करून सदर्हु देशमुखीसंबंधी सरकारी अधिकाऱ्याना ताकीद द्यावयास लावावी असे हिंदुराव घोरपडे धोमाजी त्रिमल ह्याना लिहितात.

श्री सुबराज

राजश्री धोमाजी त्रिमल
गोसावी यासि

ॐ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने।। हिंदूराऊ घोरपडे ममलकतमदार दंडवत. उपरी कऱ्हाडची सरदेसमुखी राजश्री गिरजोजी यादव यासि आम्ही दिल्ही आहे. त्यास अलीकडे राजश्री जयेसिंग जाधवराऊ सेनापति याणी कागदपत्र चालऊन मामल्यास

इस्किलीचा प्रसंग होतो. यैसे गोष्टीस राजश्री गिरजोजी यादव याणीही राज्यात श्रमसाहास काही समान्य केले नाहीत. त्याच्या श्रमाचे जाणते धणी आहेती. येविशी तुम्ही मातुश्री आईसाहेबांचे सेवेसी विनंती करून कऱ्हाडच्या सरदेसमुखीविशी देसकास ताकीदपत्रे करून घेणे आणि ती राजपत्रे राजश्री गिरजोजी यादव याजकडे देणे. जाणिजे. छ १९ साबान. विशेष काय लिहिणे.

मोर्तब

( पाठीमागे चौकोनी शिक्का व पैवस्ती छ २० शाबान )

---

**क्रमांक : १८१** **इ. स. १७०६–०७**

गिरजोजी यादव ह्यानी संताजी मुळीक व महिपतराव ह्या दोघाना पाठविलेले हे पत्र आहे. त्यावरून जाधवरावांशी त्यांचे संबंध नीट नव्हते असे दिसते.

श्री

राजश्री संताजी मुळीक गोसावी यास
व राजश्री महिपत गोसावी यास

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये— श्ने।। गिरजोजी यादव रामराम. विनंती. उपरी पत्र पाठविले यावरू (न) वर्तमान कळो अले. लिहिले की जाधवरायाचे[1] लोक घर बांधावयास आले होते. त्यास पाटलाने सांगोन राहाविले हे गोष्ट बरीच केली. व सासपड्यात

१. पत्र क्र. १८० मध्ये जयसिंग जाधवराव सेनापती हे गिरजोजीच्या देशमुखीत व्यत्यय आणतात असा उल्लेख आहे. त्यावरून हे पत्र त्या सुमाराचे असावे असे वाटते.

सारीक कुअही (?) ठेविला म्हणून लिहिले व बाब मण गला व बाब पांच रुपये दिल्हे म्हणून लिहिले. तरी तेही गोष्ट बरीच केली व इहिरनाक मांग करार करून पाठवणे म्हणून लिहिले. तरी करार करून पाठविला आहे. हरयेक कार्य योजून सांगणे. कळले पाहिजे. बहुत काय लिहिणे. कृपा असो दिजे. विशेष आंबाजी यादवाचे सोइरिकीविशी प्रेत्न करणे. कळले पाहिजे. हे विनंती.[२]

---

**क्रमांक : १८२** **इ.स. १७०६–०७(?)**

गिरजोजी यादव ह्यानी संताजी मुळीक व यादोपंत ह्या दोघाना लिहिलेले हे पत्र आहे. पत्रात धनाजी जाधवांच्या हालचालीची बातमी कळविण्याची सूचना आहे.

श्री

राजश्री संताजी मुळीक व राजश्री
यादोपंत गोसावी यास

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—— श्नो। गिरजोजी यादव रामराम विनंती. उपरी सांप्रत तुम्हाकडील वर्तमान कळत नाही. याकरिता चितास श्वस्ता येत नाही. बाइकामुळे तुम्ही तिकडेस घेऊन गेला त्याचेही काही वर्तमान तुम्ही लिहून पाठविले नाही. याउपर हली राजश्री केदारबा व सुभानजी गायकवाड व संकराजी जाधव व आणखीहि सात पाच माणसे कदीम सजनगडीहून घेऊन आली. त्यासी तिकडे पाठविले आहे. तरी ये प्रसंगी कटपट करावयाचे मान आहे. तरी तुम्ही अवघेजण येका मते तजवीज करुन चार माणसे हाती

---

२. ' हे विनंती ' ही अक्षरे बालबोध.

धरून कार्य करावे यैसा विचार आहे. त्यास जे तुमचे हाते होऊन येईल ते केले पाहिजे व राजश्री जाधवराऊ त्या प्रांते आले आहेत. समागमे चिरंजीव व शंकराजी आले असतील त्याकडील घोडी व त्याचे सविस्तर वर्तमान मनास आणून लिहून पाठविणे व तुमची घोडीयाचे वर्तमान व माणसाचे वर्तमान सविस्तर लिहून पाठवित जाणे. येणार माणसाहाती सविस्तर लिहित जाणे. हे विनंती[1]

---

क्रमांक : १८३ इ. स. १७०६–०७ (?)

गिरजोजी यादवांचा एक भाऊबंद स्वरूपजी यादव ह्याने लिहिलेले हें पत्र आहे. त्यांत त्यानें माधवराव व बहिरो हरि ह्या दोघांशी झालेल्या एका चकमकीचा वृत्तांत दिला आहे व गिरजोजीच्या साह्याची अपेक्षा केली आहे. पत्र दोन तीन ठिकाणी फाटले आहे. त्यामुळें संदर्भ नीट लागत नाही.

श्री

राजश्री गिरजोजी यादव ——————

देशमुख पा। कऱ्हाड गोसावी यासी.

अखंडीत लक्ष्मी अलंकृत स्ने।। सरूपजी यादव जोहार विनंती. उपरी येथील क्षेम जाणून आपले क्षेम लिहित गेले पाहिजे. विशेश तुम्ही कृष्णाजी मात्याबरावरी पत्र पाठविले व कितीयक जबानीही त्याने सांगितले त्यावरून कळो आले. त्यावरी कोणी भला मनुश पाठविणे + + + करुन म्हणून + + + आम्ही योजीले होते जे परकी भला माणूस पाठवावा काय निमित्य.

---

१. 'हे विनंती' ही अक्षरे बालबोध.

दिपवाळी जाहालियावरी आपण येऊन भेटीही होईल. अवघे वर्तमान कळो येईल. जे असेल ते निर्वाद ब ज + + + करून घ्यावा. विल्हे लावावा म्हणून तजविजे करून सिध जाहलो होतो तो अकस्मात खान साहेब जलद म्हणून दोनी प्रहर रात्री निघाले. त्याबाार जाणे जाले. गडापासी गेलो तो हरकार्ने खबर देविली की बहिरो हरी व माधवराऊ कराडावरी मुस्तेद होऊन येताती. पाहाडापासी आले. आम्ही रस्त्यावरून पुढे चालिलो. यैसियास आपणा माघे होता. तमाम प्यादे मराहटे पुढे होते. तो लश्कर उतरले होते तेथे बरी दऊड जाहाली. त्याची आमची गाठी पडली. तेथे + + + निलास जाला. पं॥ रायाजी पंत जखमी होऊन खाली आले म्हणून आम्ही पाय उतारा केला. तेथे अगदी भाऊबंद देखील आम्हीच राहिलो. वरगड बाजे लोक आम्हास सोडून निघाले. दोनी हजार स्वार आम्ही कोठे कसे संभाळावे. आपले लस्कर आहे. जे होणार ते जाले. आपण सिपाई असो. त्यावरी प्रसंगी तुम्ही वडील असता काय चिंता आहे म्हणून आम्ही पालाच्या डेरेस गेलो. घोडी चौघानी नेली. तेच समई आमचे भाऊबंद देखील घोडे २०।२५ गेली. आम्हास त्यानी बैसविले. असे व्हावे तुम्हास वर्तमान कळावे म्हणून लिहिले असे. त्यांचे पारपत्य करणे ते करून त्यास पत्रे पाठऊन आम्हास आपणाकडे घेऊन गेले पाहिजे. नाहीतरी लौकिकात विदित न होणारिजे. या उपरी तुम्ही विवेकी असता विस्तार काय लिहिणे. कृपा निरंतर असो दिली पाहिजे. हे पत्र सहस्र पत्राचे जागी जाणून साहेता केली पाहिजे. हे विनंती.[१]

---

१ 'हे विनंती' ही अक्षरे बालबोध.

क्रमांक : १८४ इ. स. १७०६–०७ (?)

यादवांच्या वतनासाठी पंत अमात्य ह्याना शेरणी द्यावी लागली. त्यासाठी भरावयाचे पैसे नसल्यामुळे धनाजी जाधव ह्याना पाच गाव द्यावे लागले त्याचा उल्लेख या पत्रात आहे.

श्री

राजेश्री गिरजोजी यादव
गोसावी यासी

अखंडित लक्षुमी आलकृत राजमान्य स्ने।। + +

पिराजी व नरसिंगराव व पदाजी यादव जोहार. येथील क्षेम जाणून तुम्ही आपले क्षेम लेखन केले पाहिजे. विशेष तुम्ही ता। उबरज व ता। तारगाऊ या दोनी कर्याती देह चौपन ५४ देसमुखीची दुमाले पत्रे पाठविली. ती राजपत्रे घेऊन राजेश्री पंत अमात्य याचे भेटीस गेलो. त्यानी सिरणी देणे म्हणून मजकूर घातला. राजेश्री धनाजी जाधवराव यानीही जेथवरी मदत करावयाची ते केली. पुरातन गोत्रज सिरणीचा प्रसंग जरुरच पडिला. पाच हजार त्रिसाला मुदती करून कबूल केले. येसा तह केला. बी।।

| सन खमस | सन सीत | सन सबा |
|---|---|---|
| २५०० | १५०० | १००० |

असी दुमाले पत्र छ १७ रबिलाखर सन खमसात घेतले. पुढे पैकेचे अनुकुलता नाही यास्तव रा।। जाधवराउ यास देहे पांच देसमुखी देऊ केली की पैकेस व हर बाबेस मदत करावी. देह पाच नागठाणे १ अतीत १ हिंगणोले १ ईखली १ सरिगाव १ यागावी हक लाजिमा व इनाम देऊ केला. वरकड कारबार सिका आमचा आम्हाकडे येसे नेम केला असे. आम्हीही जो

शिक्का

तलास करावयाचे तो करीतो. व + + + येथीलहि दुमाला पाहिजे म्हणून तेथवरी जाऊन सातसे रुपये कबूल केले. दुमाला पत्रे घेतली. आमचा मागला निपट नातवानगीचा बहुतच असे. क्षेत्र सोडावयास राजेश्री स्वामीचे अभय जाले म्हणून सांगोन पाठविले. तरी याहून काये थोर असे तोही तलाश केला पाहिजे. आमचे वतन आम्हास दिल्हे. स्वामीस पुत्रपौत्री कल्याण होईल. यैसे श्री देवापासी निरतर मागतो की भोसलेचे (?) कल्याण. तुम्ही सर्वज्ञ असा. बहुत काय लिहिणे. हे विनंती.

शिक्का

---

क्रमांक : १८५ इ. स. १७०६–०७

पिराजी घोरपडे, हिंदुराव घोरपडे व कृष्णाजी घोरपडे ह्या तिघांच्या सरंजामाचा तपशील.

नक्कल

राजमंडळ

सरंजाम लश्कर सु॥ सबा

सरंजाम राजेश्री पिराजी घोरपडे व हिंदुराव घोरपडे व कृष्णाजी घोरपडे याचा सरंजाम प्रसिद्धगडचे मुक्कामीचा.

| | |
|---|---|
| ६६९००० | सुभे ७ |
| १७८४००० | महाल १०९ |
| १३६७०० | देहे ६३ एकूण रुपये |
| २५८९७०० | |

कदीम

| | | |
|---|---|---|
| १२८४००० | कदीम | |
| ५२५००० | सुभे ५ | |
| १३६७०० | देहे ६३ पे॥ | |
| १९४५७०० | | |

नवीन महाल ४७ एकूण बेरीज रुपये ५००००० नरगुंद व नवलगुंद सुभे २ पैकी वजा पथकास ऐवज देविला

हिंदुराव घोरपडे............ १४४०००

| | |
|---|---|
| ५२५००० | सुभे ५ एकूण |
| ९५५००० | महाल ४३ एकूण |
| १८००० | देह २१ एकूण |
| १४९८००० | |

सुभे व महाल

| | सुभे | महाल | एकूण बेरीज रुपये |
|---|---|---|---|
| पे॥ मिरज | ० | १ | १०००० |
| १०००० पे॥ कवटे महांकाली एकूण किता गांव..................... | ० | ५ | ३३००० |

| | | |
|---|---|---|
| १०००० | मालगांव | १ |
| १०००० | कोलापूर | १ |
| ३००० | शिरगाव | १ |
| ७००० | कुसबाड | १ |
| ३००० | रांजणी | १ |
| ३३००० | | ५ |

| | सुभे | महाल | एकूण बेरीज रुपये |
|---|---|---|---|
| ता॥ खानापूर प्रांत तारळे | ० | १ | १२००० |
| सुभा बेळगाव | १ | ० | ५०००० |
| प्रांत बंकापूर | १ | ० | २५००० |

| | सुभे | महाल | एकूण बेरीज रुपये |
|---|---|---|---|
| पे॥ करडीकल | ० | १ | १०००० |
| पे॥ गद्देकल | ० | १ | १०००० |
| पे॥ खानापूर | ० | १ | १५००० |
| पे॥ चांदगड | ० | १ | २००० |
| पे॥ मनोळ | ० | १ | ४००० |
| + + + | ० | १ | १०००० |
| पे॥ हुकीरी | ० | १ | १००००० |
| रेवकुंदे | ० | १ | १५००० |
| पेाा मणूर | ० | १ | ३०००० |
| पेाासत्यगीरे | ० | १ | २०००० |
| पाा गलगले | ० | १ | १५००० |
| ब्रिलनी | ० | १ | १५००० |
| माा सिदपूर | ० | १ | १०००० |
| मुसकी | ० | १ | १०००० |
| इंचोळी | ० | १ | १०००० |
| तालेकोट | ० | १ | २०००० |
| मुळकूड | ० | १ | २०००० |
| रायचूर | ० | १ | १०००० |
| पाा गदग | ० | १ | ७५०० |
| पाा राय हुबळी | ० | १ | ३०००० |
| पाा कोकटनूर | ० | १ | २५०० |
| कृष्णगी | ० | १ | १२०० |
| यलबर्गे | ० | १ | १२०० |
| सलाबत खानाचे केरूर | ० | १ | ३००० |
| पो मुरगूड | ० | १ | २५००० |
| हल्याळ | ० | १ | १२००० |
| पो सावराणी | ० | १ | १२००० |

| | सुभे | महाल | एकूण बेरीज रुपये |
|---|---|---|---|
| सुभा लखमेश्वर | १ | १ | ७५००० |
| पो॥ कौलापुर | ० | १ | १२००० |
| बदामी | ० | १ | ६०००० |
| कलादगी | ० | १ | १५००० |
| पातशाहापूर | ० | १ | २५००० |
| बंगडकोट | ० | १ | १००००० |
| होनगुंदे | ० | १ | १००००० |
| गाझीकोट | ० | १ | १५००० |
| तालरगीरे | ० | १ | १००००० |
| बागलकोट | ० | १ | १५००० |
| कटकीळ | ० | १ | १००००० |
| सुभा संपगाव | १ | ० | ७५००० |
| | ५ | ४३ | १४८०००० |

देहे

| कर्यात सदलगे | | | कर्यात येकसंबे | | |
|---|---|---|---|---|---|
| ५००० | भोरवडी | १ | २००० | रांगोळी | १ |
| १००० | बस्तगांव | १ | १००० | द्रेमसरवाडी | १ |
| ५०० | टाकली | १ | १५०० | तरेवाडी | १ |
| ३०० | बेडकीहाळ | १ | ४५०० | | ३ |
| ७०० | चनेवाडी | १ | | | |
| १००० | रेणखल | १ | | | |
| ८५०० | | ६ | | | |

**क्रमांक : १८६** **दि. ४-४-१७०७**

पंत अमात्य ह्यांचे आज्ञेवरून तर्फ मलकापूरचे देशक व देशकुलकर्णी ह्याना २५ बिघे जमीन इनाम दिली आहे असे चिमणाजी बल्लाळ नामजाद व कारकून सुभा प्रांत मलकापूर हा हवालदार व कारकून तर्फ मलकापूर ह्यास कळवितो.

श्री

राजश्री हवालदार व कारकून ताा मलकापूर गोसावी यास

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य ———— स्ने।। चिमणाजी बलाल नामजाद कारकून सुभा प्रांत मलकापूर नमस्कार. सु।। सबा मया अलफ. बाा सनद राजश्री पंत प्राा छ १७ राा।ल सन खमस. पो छ. १ रााार ( रबिलाखर ) तेथे आज्ञा जे देसक व देशकुलकर्णी तााा माार याणी हुजुर सारंग (ग) डचे मुकामी येऊन विनंति केली कीं धामधुमीच्या प्रसंगाकरितां विलायत खराब पडली. जुजबी लागवड जाहली. त्यास दुतर्फामुळे दुबार राहात नाही. आपण स्वामीच्या पायासी येकनिष्टता करून सेवा करितो. परंतु मुलकांत वसात नाही. यामुळे आपला योगक्षेम चालत नाही. कुटुंबवत्सल आहे. स्वामीनी कृपालु होऊन कांही जमीन इनामत करून दिल्ही तरी त्याची कीर्द करून उपभोग करून. त्यावरून मनास आणून तर्फ माारचे देसक या राज्यांत इमाने वर्तोन स्वामी कार्य करीत आहेत. आणि योगक्षेम चाले याकरितां कृपालु होऊन यास नूतन इनाम पड जमीन वीसापांडाचे बिघ्याप्रमाणे देविले असे म्हणोन आज्ञा. त्यावरून जमीन बिघे ३० तीस वजा आलाहिदा सनद विठोजी बिन कुबाजी दलवी देसक देहे २८ बिघे ८५ बाकी बिघे जमीन ४१ देहे येकेचाळीस यकूण बिघे २५ पंचवीस देविले असे. बी ताा[1]

---

१. तपशील घेतलेला नाही.

येकूण येणेप्रो वीसापांडाचे बिघेने बिघे ०२५ पंचवीस नेमून दिल्हे असेत. तरी पड जमीनपैकी नेमून देणें. या पत्राची तालीक लेहून घेऊन अस्सल पत्र भोगवटीयास देणे. नूतन पत्राचा आक्षेप न कर्णे. छ ११ मोहरम. मो असे.

---

क्रमांक : १८७ दि. ११-११-१७०७

बादशहाच्या कैदेतून सुटल्यावर ताराबाईकडील सरदार आपल्या बाजूला वळविण्याचा उद्योग छत्रपति शाहु ह्यानी आरंभिला. प्रस्तुत पत्रद्वारे त्यानी शंकराजी यादवाना त्यांच्या जमावानिशी आपणाला मिळण्याचे आवाहन केले आहे. सोबत सरंजामाचेहि आश्वासन दिले आहे.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित नाम सवछरे कार्तीक बहुल त्र्ययोदसी भोमवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री संकराजी यादव यास आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही विनंतीपत्र पाठविले ते पावोन लेखनार्थ विदित जाला व गोपाळपंत पाठविले ते व सरंजामाची यादस्त व रा नागोजी बाबाजी यास पत्र पाठविले ते ब जिनस स्वामीस दाखविले. यादही पाहिली व कितेक मुखोगते सांगितले तेही विदित जाले. तरी तुम्ही कदीम स्वामीचे येकनिष्ट सेवक. स्वामीस तुमचे ऊर्जित करावे हे आगत्य आहे. तरी तुम्ही आपले जमावनिसी सत्वर दर्शनास येणे. यादीप्रमाणे सरंजामाच्या सनदा करुन द्यावयाचा निश्चये रा नागोपंतासी केला आहे. त्याप्रमाणे स्वामी करून देत आहेत. तरी दिरगावरी न घालणे.

तुम्हास सिरपाव वस्त्र मंदील १ येक पाठविले आहे ते घेणे. बहुत अविलंबे स्वार होऊन येणे. जाणिजे. छ २६ साबान.

मर्या
देयं रा
जते.

---

**क्रमांक : १८८** **दि. १५-११-१७०७**

छत्रपति शाहु शंकराजी यादव ह्याना लिहितात कीं तुमच्या मागणी प्रमाणे कऱ्हाडची देशमुखी तुम्हास देऊ केली आहे, तरी लवकर भेटीस यावे.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित नाम संवछरे मार्गसिरीश सुध द्वितीया मंदवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी राजश्री सकराजी यादव यास आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही विनंतीपत्र पाठविले पावोन लेखनार्थ विदित जाला. तुमच्या सरजामाविसी रा॥ हैबतराव निबालकर सरलस्कर याणी विनंती केली. तरी तुमचा कदीम सरंजाम जो आहे तो स्वामीनी करार केला असे व कऱ्हाडची देसमुखी तुम्हास दिल्ही आहे तेही स्वामीनी करार केली यसे. भेटीनंतर तुमच्या मनोगतानुरुप आणखीही सरंजाम स्वामी देऊन तुमचे ऊर्जित करितील. यैसे जाणून सत्वर येणे. विलंबावरी न घालणे. जाणिजे. छ १ रवाना

मर्या
देयं रा
जते.

---

**क्रमांक : १८९** **दि. १८-११-१७०७**

कडसिद्ध स्वामी मठाचे जे वर्षासन चालत आले आहे ते चालवावे म्हणून भावकर वज़ारतमाब ह्यांची मोकदमानी कसबा हवेली ह्याना ताकीद.

सिध कोडश्वर देवरु

शिक्का

आज सुभा राजेश्री भावकर वजारत माब ता।। मोकदमानी देहाये का।। हवेली प्रा।। कोल्हापूर सूरसन समान (आलफ) मया आलफ. का।। मजकुरी श्री स्वामी आला (?) आहे म्हणोन श्री स्वामीच्या कारकुनानी येऊन विदीत केले. त्यावर मनास आणिता स्वामीचा नंदादीप व इत्यादि खर्च चालिला पाहिजे. माहास्थल आहे म्हणोन सालाबाद चालत आले आहे. तैसेप्रमाणे कर्यात मजकुरी करून दिल्हे आहे. तरी मठास अविछिन पावीत करीत जावोन बिन बोबाट येऊन देणे. वरुषी प्रती वर्षी नवीन पत्रासाठी आक्षेप करीत न जाता या पत्राची प्रती लिहून घेऊन मुखे पत्रावरून श्री स्वामीकडे भोगवटीयास देणे. जाणिजे. रा।। छ ४ रमजान. मोर्तब सुद.

(शिक्का) मोर्तब

---

**क्रमांक : १९०** **दि. २१-११-१७०७**

छत्रपती राजाराम ह्यानी बलवंत धर्माजी देवकाते ह्याला कडेवळीत प्रांताच्या सरगौडकीचे वतन दिले होते. हे वतन पुढे चालवावे अशी विनंती सदहु देवकाते ह्याने छत्रपती शाहू ह्याना केली असता त्यानी ती मंजुर केली.

श्री

शिका

स्वस्ति श्री राज्याभीशेक शके ३४ सर्वजीतनाम सवछरे मार्गेश्वर शुध अष्टमी भृगुवासरे क्षेत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यांनी राजश्री बलवतराऊ बीन धर्माजी देवकाते यास आज्ञा केली की तुम्ही स्वामीच्या दर्शनास आलेत ते समई विनंती केली की आपण चंदीस राजेश्री कैलासवासी यांच्या दर्शनास गेलो होतो. ते समई विनंती केली की आपण स्वामीचे पूर्वापार सेवक. सेवा केली आहे व सांप्रत जमावानसी चंदीचे मदतीस आलो. स्वामाने कृपाळू होऊन वतन मऱ्हामत केले पाहिजे. यावरून ते कृपाळू होऊन सेवाश्रम सायासी पाहोनु अजरामरमऱ्हमत वतन सर गौडकी प्रा कडेवळीत करुन दिल्हे आहे. तेणेप्रमाणे महाराजे आपले वतन मऱ्हामत करून नुतनपत्र करुन दिल्हे पाहिजे म्हणून विनंती केली. त्यावरून तुमचे पत्र आणुन पाहिले आणी तुम्हास त्याप्रमाणे हाल नुतन पत्र करुन दिल्हे असे. वतन अजरामर मऱ्हामत वतन सरगौडकी प्रा।। कडेवळीत करून दिल्हे असे. बी।।

ता। पेडगाऊ १ ता। चांभारगोंदे १ ता। रासीन १
ता। हवेली नगर १ ता। मांडोगण १ ता। कडे १ ता। अष्टी १
ता। जामखेड १

एकूण महाल आठ येथील वतन सरगौडकी करून दिल्ही असे. हक लवाजिमा पहिले सनदेप्रमाणे बिन।।

दर गावास दर सदे रु।। २६ दर गावांस दर वावरास गला मण ✓।।

दर गावास तूप घागर १ ये।। तुप ✓ १
दरगावास कोष्टी याच्या मागास पासोडी १
दर गावास खुटेकरी याच्या मागास कांबळा १

एकूण दर सदे वर गाबास रु. दोनी व दर गावास दर वावरी गला अधमण व दर गावास तूप घागर येक. एकूण एक मण व दर गावास कोस्टी याच्या मागास पासोडी एक दर गावास खुटेकरीच्या मागास काबला एक. येणेप्रमाणे हक ठराव नेमणूक मोईन करुन दील्ही असे. यासि तुम्ही व तुमचे वौशपरंपरा वतन अनभवणे. यास कोण्ही स्वामीचे वौशाचा हिला हरकत करील त्यासी श्री वाराणसीमधे गोहत्येच पातक व हिंदु होऊन कोण्ही हरकती करील त्यास दोबार पातक असे व मुसलमान घेऊन हिला हरकत करील त्यास मकेमधे शूकराची शपथ असे. छ ८ रमजान.

शिक्का

---

**क्रमांक : १९१** इ. स. १७०७–०८

शाहू छत्रपती ह्यांचे पिराजी घाटगे ह्याना भेटीबाबत पत्र.

श्री

तालीक

राजश्री पिराजी सर्ज्याराव घाटगे
गोसावी यांस

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य——प्रती राजश्री राजा शाहू छत्रपती. उपरी तुम्ही विनंती पत्र पाठविले ते प्रविष्ठ जाले. लेखनार्थ आवगत जाला. राजश्री हिमतराऊ जाधव याणी तुमची भाव भरी निष्ठा सांगितली. भेटीचा निस्छय उद्याचा केला. त्यावरून स्वामी बहुत संतोषी जाहले. ऐसियास तुम्ही आप्त विषयी लोक. स्वामीची ममता धरिता. या करिता स्वामीस तुमची भेटी घेयासी हेच आपषक आहे. तरी स्वामी उदइक सम साह स्वार होऊन येतात. दुसरा अर्थ

काही नाही. तुम्हास कळावे म्हणोन लिहिल आस. प्रात:काली स्वार होऊन येतात. येविसी संदह न करणे. तुम्ही स्वामीस चाहता. थोरपण करिता यास्तव लिहिल. स्वामी तुम्हास चाहतात. दुसरा अर्थ नाही. जाणज. बहुत काय लिहिण. मोर्तब.........................................

---

**क्रमांक : १९२** **इ. स. १७०७–०८**

काडापा मठास सालाबादप्रमाणे धर्मादय पाठविण्याची मोकदमानी देहाय कसबा हुवेली कोल्हापूर ह्याना अण्णा आबाजी सभासद ह्यांची आज्ञा.

शिका

आज स्वारी राजश्री आणा बाबाजी सभासद नामजाद प्रांत तारळे व महालानिहाय ता॥ मोकदमानी देहाय क॥ हुवेली कोल्हापूर सु॥ समान मया आलफ. मठ श्री काडापा यास सालाबाद मठाकडे धर्मादाय पावीत होता त्याप्रमाणे हाली देत जाणे. सालाबादप्रमाणे चालवणे. छ १.

मोर्तब

---

**क्रमांक : १९३** **दि. ८–१–१७०८**

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी विजयदुर्गचा मुद्राधारी सूर्याजी इंगळे ह्याला माघारा बोलवून त्याचे जागी काशी रंगनाथ ह्याची नेमणूक केली.

श्री

नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वधारीनाम[1] संवत्सरे पौष

---

१. खरे जंत्रीत 'सर्वजित' संवत्सर आहे.

बहुल द्वादशी गुरुवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति स्वामी याणी राजश्री सुर्याजी इंगळे मुद्राधारी जंजिरे विजयदुर्ग यासी आज्ञा केली ऐसीजे. तुमचा हवाला दूर करून स्वामीनी हुजुर यावयाची आज्ञा केली असे. तरी तुम्ही देखत आज्ञापत्र हुजुर येणे. तेथील पारपत्यास राजश्री कासी रंगनाथ यास पाठविले आहेत. याचे स्वाधीन किल्या कुलपे परवानगी मामला करणे व स्वामीचे आज्ञेप्रमाणे तेथील धंदा करणे तो करतील. लेखनालंकार. मोर्तब असे.

---

**क्रमांक : १९४** **दि. ४–३–१७०८**

विशाळगडचा कारखानीस महादजी काशी हा आपणाला एकनिष्ठ असल्याचे कळल्यावरून छत्रपती शाहू ह्यानी त्याला आपल्या भेटीस बोलविले.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित नाम संवत्सरे फाल्गुण बहुल नवमी गुरुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री माहादाजी कासी कारखाननीस किले विशाळगड यासी आज्ञा केली यसीजे——

तुम्ही स्वामीचे पायासी येकनिष्टतेने वर्तणूक करिता हे वर्तमान राजश्री कृष्णाजी परशराम याणी लिहिले. त्याजवरून तुमचे सेवेचा मजुरा जाहाला. हली मशारनिलेस हुजूर पावयाची आज्ञा केली आहेत. हुजूर येतील त्या समागमे तुम्ही हुजूर दर्शनास येणे. स्वामी तुमचे ऊर्जित करतील.

---

**क्रमांक : १९५** **दि. १२–३–१७०८**

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी गोव्याच्या व्हाइसरॉयला पत्र पाठवून पोर्तुगिजांशी सलोखा आणि मैत्री ठेवण्याची इच्छा दर्शविली होती. त्या पत्रास व्हाइसरॉयने पुढील उत्तर लिहिले.

शिवाजी राजे ह्यांस

शंकराजी नारायण व देवजी + + + ह्या दोघानी मला आपले पत्र आणून दिले. त्यात आपण आमच्याशी मैत्रीचे संबंध ठेवण्याची इच्छा दर्शविली आहे. + + + आपण तहाची बोलणी करण्यासाठी पुरेशे अधिकार देऊन आपला वकील आमच्याकडे पाठवावा.

भिकाजी मल्हार हे ह्या शहरी पोहोचलेले नाहीत. तसेच शंकराजी नारायण व देवजी सोळेकी ( सोळंकी ? ) ह्या दोघानी पत्रांतील आशयापलीकडे मला अधिक काही सांगितलेले नाही.

आपणावर देवाचा अनुग्रह होवो.

गोवा, १२ मार्च १७०८
दों रुद्रिगु द कॉश्त.

---

**क्रमांक : १९६** **दि. ३–४–१७०८**

मौजें वेरळे तर्फ लाझें हे गाव गणसावंत ह्याच्याकडे मोकाशादाखल होते. ते त्याच्याकडे पूर्ववत चालू ठेवले आहे, असे शाहू छत्रपती ह्यांचे हवालदार, कारकून व देसकानी तर्फ लाझे ह्याना पत्र.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वधारी नाम सवछरे चैत्र बहुल ९ मंदवार क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती याणी हवालदार व कारकून व देसकानी तो लाझे क॥ राजापूर यास आज्ञा केली यैसीजे. मौजे वेरळे ता मजकूर हा गाव जसाव दि॥ गण सावंत देहात याजकड मुकासा पेशजी चालत असल तेणेप्रमाणे हलीं करार

श्री
शिवनरपती ह
र्ष निधान मोरेश्व
र सुत भैरव मुख्य
प्रधान

करून दिल्हे असे. गावीचा यैवज होईल तो दिमतवाराकडे पावणे. जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब असे.[1]

---

दि. १६-४-१७०८

**क्रमांक : १९७**

गिरजोजी पिसाळ ह्याच्याकडे पूर्वीपासून जे गाव मोकासे आहेत आणि त्याला जे गाव आणखी मोकासा म्हणून दिले आहेत ते चालविण्याची शाहू छत्रपति ह्यांची महादजी बापूजी ह्याला आज्ञा.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिशेक शके ३४ सर्वधारी नाम सवत्सर वैशाख शुध सप्तमी भृगुवासरे क्षीत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी राजमान्य राजश्री माहादाजी बापूजी यासी आज्ञा केली यसीजे. राजश्री गिरजोजी पिसाळ हशमाच्या जमावानिसी नासूरच्या

---

१. अशाच आशयाची आज्ञा शाहू छत्रपती ह्यानी खोत मौजे वेरळे ह्याला केली आहे. ते आज्ञापत्र दि. १४-४-१७०८ चे आहे.

मोर्च्यावर ठेविले आहेत. त्या हशमाच्या सरदाराकडे गाव मोकासे पेसजीपासून चालत आहेत व हाली दिल्हे आहेत ते—

नागोजी सिंदे पदात पैा याजकडे गाव सुभा प्रांत राजापूर—

१ मोजै रिगणे पेशजीपासून आहे
१ मौजे दुसूर हाली देविले आहे
विठोजी आदरराऊ पदात
दिा दार

—

२

३ तपे राजापूर
१ मौजे पाचळ
१ मौजे यरडव
१ मौजे कोरिवली

—

३

२ ता देवाळ पैा खराबगाव

१ मौजे कारले
१ मौजे वडगाव

—

२

१ देवरूख ता चाकाडे इनाम आहे

—

६

दिा परसाजी पार्टे ता संदल पैा

गण सावत पदात पैा याजकडे गाव ———

७ ता ———

४ कोर राजापूर
१ झरये
१ येलवण
१ मौजे भावडे
१ मौजे वेरळे ता लांजे

—

४

३ ता देवाळ खराब
१ कोळेबाडी
१ कोडसी पोरु
१ कोड हसाळे

—

३

७

१ धामणद ता राजापूर

—

८

विठोजी व चागोजी केसरकर
२ तो सौदल
१ काजिरडे
१ मौजे कोळंब

—

२

१ मौजे नरेळ पेशजी
१ हाली मौजे ताम्हने
—
२
दिा दसोजीराऊ पाटोळे यांचे गांव
सोनजी चवाण बंदूकबारदार

१ मौजे पागेर ताो मजकूर
खासग सेत
—
३
दिा हरजी जाधव ताा राजापूर
पैाा
१ पेशजी मौजे हरळ
१ हाली मौजे वाडदे हसोळ
—
२
दिा सूर्याजी माने याचे गाव
लिंबाजी मान्ये बंदूखबारदार

येणेप्रमाणे हशेमाकडे गाव पेशजी व हाली नेमून देऊन माहालास सनद आहेत. तरी तुम्ही या गावात लोकांचे सेतास व वसुलास व लोकांचा बोभाट लागो न देणे. हे लोक मोर्च्यास आहेत त्याचा रोज बोभाट येऊं न देणे. जाणिजे. मोरतब आसे.

सुर सुद

---

**क्रमांक : १९८** दि. २७–४–१७०८

सिदगिरी मठाचे तेहतीस गावचे वर्षासन चालू ठेवावे म्हणून दिवाण कोट कोल्हापूर ह्याची गांवोगावच्या मोकदमाना आज्ञा.

श्री सिधिगिरी काडेश्वर

शिक्का

आज दिवाण कोट कोल्हापूर ताा मोकदमानी देहाय गाव याना काा हवेली सुाा समान मया आलफ. श्री—— देव जाग्रत स्थळ

याचे पूर्वीपार सालाबाद धर्मादाव देवचा आहे. तो आलीकडे दंगेमुळे आलेकडे पावत नाहीं. तरी पेसजीप्रो देत जाणे. गावगना बी ता——[1]

एकूण देह तेतीस येथें पूर्वीपार श्रीकडे वरषासन जे आहे ते व इनाम जे गांवी असतील ते पूर्वापार प्रमाणे चालवीत जाणे. फिरोन बोभाट येऊ न देणे. जाणिजे. रवाना छ १६ माहे सफर. मोर्तब सुद.

मोर्तब

---

**क्रमांक : १९९** **दि. १२–५–१७०८**

छत्रपती व गोव्याचा व्हाइसरॉय या दोघांमधील संबंधांबाबत गोव्याच्या व्हाइसरॉयचे पत्र.

गंगाधर पंडीत सुमंत ह्यांस.

जासुदामार्फत आलेले गंगाधर पंत सुमंत ह्यांचे पत्र मिळाले. शिवाजी राजे यांच्याशी मी संपर्क वाढवावा अशी त्यानी पत्रात विनंति केली आहे. शिवाजी राजे व या राज्याचा व्हाइसरॉय ह्या दोघांमध्यें जो सलोखा नांदत आहे तो पुढे चालू राहाण्याची मागणी करण्यात काही गैरवाजवी नाही. भिकाजी मल्हार हे अद्याप इकडे आलेले नाहीत. आणि शंकराजी नारायण व देवजी सोळेकी (?) या दोघानी शिवाजी राजे व गंगाधर पंडीत या दोघांच्या पत्रातील मजकुरापलीकडे अन्य काही मला सांगितलेले नाही. तहाच्या करारातील कलमे मंजुर करण्यासाठी आवश्यक ते अधिकार असलेला मनुष्य इकडे पाठविणे आवश्यक आहे.

गोवा, १२ मे १७०८

---

१. गावाचा तपशील येथे दिलेला नाही.

क्रमांक : २०० दि. १४-५-१७०८

छत्रपती शिवाजी दुसरे ह्याना गोव्याच्या व्हाइसरॉयने लिहिलेल्या खालील पत्रांत तहाच्या वाटाघाटी करण्यासाठीं वकील पाठवावा असे म्हटले आहे.

शिवाजी राजे ह्यांस

शंकराजी नारायण व देवजी सोळेकी (साळुंके ?) ह्या दोघांकडे मला जे आपण पहिले पत्र पाठविले, त्यांत आपण माझ्याशी मैत्रीचे संबंध ठेवण्याची इच्छा दर्शविली होती. आमच्या राज्यांतील प्रजा-जनानीहि आपणाशीं मैत्री ठेवावी म्हणून आपण मागणी केली होती. त्या पत्राचे उत्तर मी त्या दोघांकडे पाठविले होते. परंतु आपणाला ते पत्र मिळाले नसावे असे वाटते. कारण, अहमद सारंग ह्याने आपले जे पत्र आणले त्यांत माझ्या उत्तराच्या मजकुराचा उल्लेख नाही. मी आपणाला पाठविलेल्या उत्तरात म्हटले होते कीं, आपणाला जर आमच्याशी मैत्रीचे संबंध ठेवावयाचे असतील तर तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आवश्यक ते अधिकार देऊन आपला वकील आमच्याकडे पाठवावा. आपणावर देवाचा अनुग्रह होवो.

गोवा, १४ मे १७०८

दों रुद्रिगु द कॉश्त.

---

क्रमांक : २०१ दि. १४-५-१७०८

तहांच्या वाटाघाटी करण्यासाठी आवश्यक ते अधिकार देऊन वकील पाठविण्याबद्दल छत्रपती शिवाजी दुसरें ह्याना लिहिले आहे, असे गोव्याचा व्हाइसरॉय बुऱ्हाणजी मोहिते ह्याना लिहिलेल्या पत्रात म्हणतो.

\+ + + चे किल्लेदार बुऱ्हाणजी मोहिते ह्यांस

अहमद सारंग याच्याकडे पाठविलेले पत्र मिळाले. माझी ख्याली खुशाली जाणून घेण्याची जी इच्छा आपण दर्शविली आहे त्याबद्दल मी आपला आभारी आहे. माझ्याबद्दल आपण जें प्रेम व्यक्त केले आहे त्याबद्दलही मी आभारी आहे. शिवाजी राजे ह्याना मी तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी हुषार आणि विश्वासू मनुष्य आवश्यक ते अधिकार देऊन पाठविण्याबद्दल लिहिले आहे.

गोवा, १४ मे १७०८

दों रुद्रिगु द कॉश्त.

---

**क्रमांक : २०२** **दि. २०-५-१७०८**

हिंदुराव घोरपडे ह्यांच्या विनंतीवरून छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी तारागिरी महंत गोसावी ह्याना मौजे सौंदुत्ती हे गाव इनाम दिले.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३४ सर्वधारी नाम संवत्सरे जेष्ठ शुद्ध त्रयोदशी गुरुवासर[1] क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी प्रांत रायबाग यास आज्ञा केली ऐसीजे. राजश्री हिंदूराव घोरपडे ममलकतमदार याणी विनंती केली की तपोनिधि तारागिरी महंत गोसावी बहूत थोर तपस्वी आहे. याचे मानस आहे की एक स्थळी मठ बांधोन रहावे आणि स्वामीस कल्याण इच्छावे ऐसे आहे. तरी स्वामीने यास एक ग्राम इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून. त्यावरून मनास आणिता तारागिरी गोसावी बहूत थोर भले तपस्वी आहे. याणी येकस्थली राहोन तपचर्या केल्याने स्वामीस श्रेयस्कर आहे. याकरिता स्वामी

१. वाराप्रमाणे तारीख काढलेली आहे.

यावरी कृपाळू होऊन (मौजे सौंदत्ती कसबा रायबाग हा गाव इनाम दिला आहे. इत्यादि इत्यादि)

तेरीख १० रबिलावल सू॥ समान मया अलफ.

---

**क्रमांक : २०३** **दि. २१–५–१७०८**

मौजे संवजुत्ती हा गाव तारागिरी महंत ह्याला दिल्याचे छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे देशमुख व देशपांडे परगणा रायबाग ह्याना आज्ञापत्र.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारी नाम संवत्सरे जेष्ठ शुद्ध त्रयोदसी भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी देशमुख देशपांडे परगणा रायबाग यास आज्ञा केली ऐसीजे. तपोनिधि तारागिरी महंत यास स्वामीने मौजे संदुति परगणा मजकुर हा गाव कुलबाग कुलकानु इनाम देऊन सनद निराळी सादर केली आहे. त्याप्रमाणे मौजे मजकूर गोसावी याचे स्वाधीन करून इनाम शिष परंपरेने बिलाकुसुर चालवणे.

---

**क्रमांक : २०४** **दि. २७–६–१७०८**

नरसिंह व सिद्राम अंबाजी कोल्हापूरकर ह्यांनी पन्हाळ्यास मोगलांचा वेढा पडला असतां छत्रपतीना कापड पुरविले होते. त्याबद्दल छत्रपती शाहू ह्यानी संदर्हू रंगाऱ्याना कापडाची जकात व दुकानाचा सारा माफ केला.

श्री

श्री<br>
वर्धिष्णु विक्रमो<br>
विष्णोः सार्मूतिरिव<br>
वामनी शंभुसूनो<br>
रसौ मुद्रा शिवरा<br>
जस्य राजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारी संवत्सरे अषाढ बहूल पंचमी रविवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी——— नरसी व सिद्राम बिन अंबाजी रंगारी कोल्हापूरकर हाली वस्ती पेट नेबापूर किले पनाळा यांसी दिल्हे अभयपत्र यसीजे. तुम्ही किले पनाळाचे मुकामी स्वामीसंनीध्ध येऊन विनंती केली की आपण पूर्वीपासून किले पनाळा राहतो.

श्री
शाहू नर ॥
पति हर्षनि ॥
धान मोरेश्वर ॥
सुत भैरव ॥
॥ प्रधान ॥

पनाळीयासी तांन्राचे वेढे आले त्या वेढियात दोनी वेळा आपण राहून कापड आणोन दिल्हे व भाडीयास खलित्या पुरविल्या. त्यावरून आपणावरी राजश्री———स्वामी कृपाळू होऊन पेट मजकुरी दुकानास सारा व आपणावरील घर टका व कापडाचे जकाती छावपावणी माफ करून राजपत्रे व हरकारकुनाची पत्रे दिल्ही आहेत तेणेप्रमाणे अजीवर चालत आले. पुढेही स्वामीने चालवावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणोन विनंती केली व पूर्वील पत्रही आणून दाखविली व किलाचे कारकूनही तुझेविसी विनंती केली. त्यावरून स्वामी कृपाळू होऊन तुवा पूर्वी वेढियात कष्ट केले कापड पुरवले खलित्या भाडीयास पुरविल्या त्यावरून तुम्हास येका दुकानचा सारा व वणी घर टका व कापडाची जकाती व छ्यावपाणी माफ करून चालत अले आहे तेणेप्रमाणे स्वामीने ही माफी केली असे. तू पेट मजकुरी राहोन उदीम वैवसाय करून सुखरूप असणे. कोणेविसी शंका न धरणे. अभय असे. नेबापुराखेरीज तुम्ही जेथे स्वामीच्या राज्यात दुकान घालाल तेव्हा तुम्हास सदरहू प्रमाणे माफ असे. जाणिजे.

---

**क्रमांक : २०५** **दि. १४–७–१७०८**

पोर्तुगीज व छत्रपती ह्यांच्यामधील मैत्रीत खंड पडू नये अशी आपली इच्छा आहे, असे गोव्याचा व्हाइसरॉय रामचंद्र पंताना लिहिलेल्या पत्रात म्हणतो.

शिवाजी राजे ह्यांच्या मातेचे विश्वासू रामचंद्र पंत अमात्य ह्यांस.

आपले पत्र मिळाले. माझ्याविषयी आपणाला जे प्रेम वाटते त्याचे मला कौतुक वाटते. आपणाला चांगले आरोग्य लाभावे व नेहमी + + + राज्यकारभारांतील अनेक गोष्टीत व्यग्र असल्याने व काही वैयक्तिक तक्रारीमुळे लिहिण्यास + + + नाही. परंतु ह्या कारणावरून शिवाजी राजे ह्यांच्याशी ह्या राज्याची जी मैत्री आहे तींत खंड पडावा असे मला वाटत नाही. उलट ह्या मैत्रीत आतापर्यंत पुष्कळच वाढ झाली आहे + + +

गोवा, १० जुलै १७०८

दों रुद्रिगु द कॉश्त

---

**क्रमांक : २०६** **दि. १८-७-१७०८**

श्रीनिवासाचार्य ह्या नावाच्या ब्राह्मणाला पाव चावर इनाम दिल्याची मिरजेच्या मोगल अधिकाऱ्याची आज्ञा.

श्री

मुदसदीयानी हाल व इस्तकबाल देशमुखानी व देशपांडेयानी व मोकदमानी साया व मुजारीयानी मौजे दानोली तर्फ उदगाव व सरकार मोर्तजाबाद उर्फ मिरज सुभे दारुलजफर बिजापूर बीदानंद के दरीविला श्रीनिवास आचार्य बिन नरसिंह अचार्य सांगलीकर यानी जाहीर केले की आपले इनाम शेत पाव ·।· चावर पुरातन पासून चालत होते. दरम्यान गनिमाचे सिलसिलेमुळे सनदपत्र गमावले. आता उमेदवार आहे की बदस्तुर कदीम सनद इजायत करावे. बरा ये अर्ज खातरीस

अंणोन मौजे मारी ·।· पाव चावर जमीन लायक जिरायत इनाम व दस्तुर कदीम मुकरर करून दिल्हे असे. सदरहू जमीन मशारनिलेचे दुबाला कर्णे. तेथील माहसूल खाऊन पादशाहचे हकामध्ये दुवा करतील. अवलाद अपलाद चालवणे. दरसाल ताजा सनदेचा हुजूर न करिता नकल लेहून घेऊन असल सनद भोगवटेस देणे. दरीबाब ताकीद असे. छ ११ माहे जमादिलावल सन ११२० हिजरी सन.

---

**क्रमांक : २०७** **दि. २८–७–१७०८**

या सनदेत " खंडोजी खराडे मुद्राधारी व कारकून किले पावनगड " असा उल्लेख आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारी संवत्सरे श्रावण बहुल सप्तमी सौम्यवासरे क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती याणी राजश्री खंडोजी खराडे मुद्राधारी व कारकून किले पावनगड यासी आज्ञा केली यैसिजे. मौजे बारपाडळे कसबा सातवे प्रांत पनाळा येथे वेदमूर्ति शामराजभट बिन हरभट यास इनाम बिघे ८७ सात चालत आहे त्याप्रमाणे हली करार करून हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी मौजे मजकूर पैकी बिघे ८७ भट गोसावी यास चालिले असेल तरी चालविणे. जाणिजे.

---

**क्रमांक : २०८** **दि. ८–८–१७०८**

छत्रपती शाहू महाराज ह्यानी गोव्याच्या व्हाइसरॉयकडे आपला एक वकील पाठवून काही मागण्या सादर केल्या होत्या. त्या मागण्या व्हाइसरॉयने राज्य सल्लागार मंडळासमोर ठेवल्या असता मंडळाच्या सदस्यानी वेगवेगळीं मतें प्रकट केली.

पोर्तुगीज हिंदुस्थानचे व्हाइसरॉय व कॅप्टन जनरल दों रुद्रिगु द कॉश्त ह्यानी दि. ८ ऑगस्ट १७०८ रोजी दारुगोळ्याच्या इमारतीच्या सभागृहांत राज्य सल्लागार मंडळाची सभा बोलाविली. त्यानी सभेला विदीत केले की, शाहू राजे ह्यानी आपले वकील बाळाजी महादेव ह्यांच्यामार्फत माझ्याकडे एक पत्र पाठविलें आहे. त्या पत्रात त्यानी तक्रार केली आहे की, ते ( शाहू राजे ) आपल्या सैन्यासह कोकणांत आल्याची बातमी मला कळली असून देखील मी त्यांच्याकडे एकादि वजनदार आसामी पाठवून त्यांचे स्वागत केले नाही. पोर्तुगीज व मराठे ह्यांच्यामध्ये मैत्रीचे संबंध असल्याने, माझें कृत्य त्या मैत्रीच्या विरुद्ध आहे असें शाहू राजे ह्यांचे म्हणणे आहे. सांप्रत शाहू महाराजांचा तळ रांगणा किल्ल्यावर आहे. त्यानी पत्रात म्हटले आहे की, मला तुम्हास जें काय कळवायचें आहे तें बाळाजी महादेव हे तुम्हाला तोंडीच तपशीलवार सांगतील.

व्हाइसरॉय पुढें म्हणाले कीं, पोर्तुगीज व मराठे ह्यांच्यामधील मैत्री टिकावी म्हणून आम्ही त्यांच्या सूचना स्वीकारल्यावांचून राहाणार नाही अशी आशा शाहू राजे ह्यानी पत्रांत व्यक्त केली होती. मी शाहू राजे ह्यांच्या वकिलाना सांगितलें कीं, त्याना मला जें काय सांगावयाचे असेल तें त्यानी लेखी सादर करावें. ह्या सूचनेप्रमाणे त्यानी काही दिवसानी एक कागद मला सादर केला. तो त्यांच्या भाषेत असल्याने मी तो भाषांतरीत करून घेतला. त्यातील कलमे थोडक्यांत पुढीलप्रमाणे आहेत.

मोगल बादशहा जेव्हां कोकणचे स्वामी होते तेव्हा कोकणचे सुभेदार व आपणापूर्वीचे गोव्याचे व्हाइसरॉय ह्यांच्यामध्ये चांगली मैत्री होती. कोकणचा कारभार चालविण्यासाठीं शाहू महाराजांचे जे कारभारी कोकणात येणार आहेत त्यांच्याशी आपण तपूर्व मैत्रीनुसार वागावे.

शिवाजी महाराज व पोर्तुगीज ह्यांच्यामध्यें चांगली मैत्री होती. त्या मैत्रीप्रमाणे परस्पर व्यापार वृद्धि होत असे. शाहू महाराजांशी आपण ती मैत्री ठेवून व्यापार वृद्धिला बळकटी आणावी.

मोगल बादशहानी कोकणचा प्रांत शाहू महाराजाना जहागीर म्हणून दिला आहे. ह्या जहागिरींत खेम सावंत ह्यानी बळकावलेले बांदे, पेडणे, सांखळी, मणेरी व डिचोली हे महाल व सोंधेच्या राज्याच्या ताब्यांतील फोंडे व पंचमहाल ह्यांचा अंतर्भाव होतो. हा प्रदेश त्या दोघांनी बऱ्या बोलाने महाराजांना परत केला नाही, तर त्या दोघांविरुद्ध लष्करी बळाचा उपयोग करावा लागेल. त्यासाठो एक सरदार सैन्य घेऊन येईल. त्याला दारुगोळा, दाणागोटा आणि इतर वस्तूंची आवश्यकता भासेल. आपण त्याना त्याची मदत करावी.

खेम सावंत भोसले ह्यानी डिचोली महालांत आपल्या राज्या-विरुद्ध कारवाई आरंभिली, तेव्हां आपल्या पूर्वीच्या व्हाइसरॉयनी खोरजुवे व पानेली ही दोन बेटें घेतली होती. सदहूं बेटांचा अंतर्भाव डिचोली महालांत होत असल्याने आपण ती बेटे महाराजाना परत करावी.

महाराजांच्या खासगी उपयोगासाठीं व त्यांच्या लष्करासाठी कापड, मखमल व चिनी रेशमी कापड खरेदी करण्याचा हुकूम आहे. परंतु हें कापड न्यावयाचे झाल्यास आपली परवानगी हवी. ती आपण द्यावी.

वरील तपशीलाबाबत आपण विचार करून त्याचा जबाब मला कळवावा. कारण मला तो कोकणांत उतरणाऱ्या शाहू महाराजांच्या सैन्याला कळवायचा आहे. तें सैन्य कोकणांत येईपर्यंत मी माझा मुक्काम इकडेच करावा अशी मला महाराजांची आज्ञा आहे.

व्हाइसरॉयने शाहू महाराजांची कलमें सल्लागार मंडळासमोर ठेवली व त्यांवर मत प्रदर्शीत करण्याची मंडळाच्या सदस्यांना विनंती केली. त्याप्रमाणे सदस्यानी आपापली मतें व्यक्त केली. गोवा शहराचा कोतवाल दों मानुएल सोतो मायॉर हा म्हणाला की शेजाऱ्यांशी नेहमी मैत्रीचे संबंध ठेवणे चांगले: त्यानुसार व्हाइसरॉयनी शाहू महाराजांच्या तक्रारीबद्दल त्याना पत्र पाठवून व दिलगिरी व्यक्त करून परिमार्जन करावे. अर्थात हे पत्र एकाद्या वजनदार व्यक्ति मार्फतच पाठवावयाला पाहिजे असे नाही. ते एकाद्या साध्या मनुष्यामार्फत किंवा महाराजांच्या वकिलाकरवीही पाठविता येईल. शाहू राजे ह्यांचे सैन्य कोकणात उतरलें व तें सोंधेचा राजा व खेम सावंत ह्या दोघांच्या पारिपत्यास आले, तर त्याला दाणागोटयाची व दारूगोळयाची मदत अवश्य करावी. परंतु त्याने जर खोरजुवें व पानेली ही दोन्ही बेटें घेण्याचा प्रयत्न केला, तर त्याचा प्रतिकार करावा. व्यापारहि शाहू महाराजांच्या प्रजाजनाशी नेहमीप्रमाणे चालू ठेवावा.

राज्याचा फडणीस डॉ. जोसेफ द आब्रेव हा म्हणाला कीं, शाहू राजे ह्यांची तक्रार फेटाळून लावावी. कारण, व्हाइसरॉयचे पोर्तुगालहून इकडे आगमन झाले तेव्हां शाहू राजे ह्यानी त्यांचे अभिनंदन केले नाही. ह्याच्या उलट शाहू राजे ह्यांचे चुलतभाऊ शिवाजी राजे, सोंधेचा राजा व इतर शेजारी राजांनी त्यांचे अभिनंदन केले. दुसरी गोष्ट अशी की शाहू राजे ह्यांचे कोकणांत आगमन झाल्याची वार्ता ह्या शहरी पुसट अशी आल्याने व त्यांचा मुक्काम कोठे होता ते आपणाला माहीत नसल्याने त्यांचे स्वागत करण्यास आपण बांधलेलो नव्हतो. डॉ. आब्रेव ह्यानी वजनदार व्यक्ति शाहू राजे ह्यांच्याकडे पाठविण्याची आवश्यकता नसल्याचें सांगितलें. कारण, व्हाइसरॉयकडे आलेला महाराजांचा वकील वजनदार नाही असे ते म्हणाले. पत्र पाठवायचेंच झाल्यास तें साध्या माणसाबरोबर किंवा ते बाळाजी महादेव ह्यांच्याबरोबर पाठवावें असे मत त्यानी व्यक्त केले. महाराजांच्या

सैन्याला दारुगोळ्याची व इतर वस्तूंची मदत करावी, मात्र त्या सैन्याने खोरजुवे व पानेली ही बेटे घेण्याचा प्रयत्न केल्यास त्याचा प्रतिकार करावा असे ते म्हणाले.

डॉ. आब्रेव ह्यांच्या म्हणण्याला इतर दोन सल्लागार मानुएल दुश सांतुश व दों क्रिस्तोव्हांव द मेलु ह्या दोघांनी पाठिंबा दिला.

शेवटीं व्हाइसरॉय म्हणाले कीं मी सल्लागारांच्या मताप्रमाणे वागेन.

---

**क्रमांक : २०९** **दि. १८–८–१७०८**

नारो महादेव ह्याला संताजी घोरपडे हे अपत्यवत मानीत असत. तो संबंध लक्षात घेऊन हिंदुराव घोरपडे ह्यानी त्याला आजरे महालाची सरदेशमुखी दिली.

तालोक

श्री सुब्रम्हणेश्वर

राजेश्री नारो माहादेव गोसावी
यासी ————

ॐ अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य——— श्ने।। हिंदुराव घोरपडे दंडवत. सु।। तिसा मया अलफ. तुम्ही तीर्थरुप राजेश्री संताजी घोरपडे कैलासवासी याजपासी पूर्वी येकनिष्टपणे सेवा केली. त्याणी लेकपणे तुमचे सर्वस्वे गोजाय करून चालविले. याजकरिता सांप्रत आम्हापासी येऊन आपली माया भावनस्रीने (?) येकनिष्टा दर्शवून अंतःकर्ण सुप्रवर्तीन आम्हासी वर्तणुक करू लागला.

सिका

त्यावरून तुमचे सर्वश्वे अभिमान धरून तीर्थरुप कैलासवासी याचे पुत्रपणे जसे होतेस तद न्याये आमचे पुतणे

जाणोन तुमचे उर्जित करून खासगत कबिलीयाचे बेगमीस संपूर्ण राज्याची सरदेशमुखी खासगत आम्हास वतन आहे त्या पैो ता।। आजरेची सरदेशमुखी अजरामऱ्हामत वंशपरंपरेने दिधले असे. तरी तालुके मारचा हक लाजिमा व इनाम गाव व जकाईती वरचा जो सरदेशमुखीचा असेल तो आपले स्वाधीन करून घेऊन या प्राो जो आकार होईल त्याचा श्री स्वामीस दाईजा[1] देऊन बाकी अेवज सुखरूप आनभवणे. आम्हासी व आमचे वंशपरंपरेने तुम्ही व तुमचे वंशपरंपरेने एकनिष्ठेने वर्तणुक करावयास अंतराये न करणे. जाणिजे. छ १२ माहे जा।।कर. बहूत काय लिहिणे. मोर्तब असे.

| राज शके | शालिवान शके |
|---|---|
| ३५ | १६३० |

---

**क्रमांक : २१०** दि. ४–११–१७०८

बहीरजी तुकोजी व नरसोजी फिरंगोजी जाधव नाईकवाडी ह्याना वीस बिघे जमीन इनाम दिल्याचे छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे आज्ञापत्र.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारीनाम संवत्सरे मार्गेश्वर शुध्ध त्रितिया गुरुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यानी राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी पाो कोल्हापूर यासी आज्ञा केली एशीजे.

शिका शिका बहीरजी तुकोजी व नरसोजी फिरगोजी जाधव नाईकवाडी कोट कसबे मजकूर याणी हुजूर येऊन स्वामीसंनीध विनंती केली की आपण स्वामी सेवा कष्ट

---

१, हिस्सा.

मेहनत केली. म्हणऊन राजश्री परशराम त्रिबक प्रतिनिधि याणे कसबे मजकुरी हर दो जणास इनाम बिघे वीस पेशजी दिल्हे आहे. त्यास जमीन नेमून दिल्ही नाही तरी साहेबी कृपाळू होऊन जमीन नेमून दिल्ही पाहिजे म्हणोन विनंती केली. त्यावरून स्वामी कृपाळू होऊन सदरहू बिघे ८२० वीस पेसजी सनदेप्रमाणे करार असत. तरी तुम्ही कसबे मजकुरीस सदरहू इना + + + मुख्य पत्र भोगवटयास परतोन देणे. जाणिजे लेखनालंकार. मोर्तब असे. रा छ. ५ रमजान.

तेरीख १ रमजान माहे रमजान
सुरू सन तिसा मया

---

**क्रमांक : २११** **दि. २४-११-१७०८**

पन्हाळ्यास मोगलांचे वेढे पडले तेव्हां सिद्राम, नरसिंह व जोती ह्या तिघां नामवंशी कोल्हापूरकर बंधूनी वेढ्यातील लोकांची बहुमोल सेवा केली होती. त्या सेवेबद्दल छत्रपतीनी त्याना दुकानाचा फाळा व कापड छपावणीचा कर माफ केला होता. त्यानी आपल्या सवलती पूर्वीप्रमाणे चालू ठेवाव्या अशी छत्रपतीना विनंती केली असता ती मंजुर झाल्याचे नामजाद किल्ले पन्हाळा यांचे पत्र.

श्री

अज दिवाण राजश्री महीमाजी राऊ काकडे नामजाद किले पनाळा ताा सिदराम व नरषीहे व जोती बिन आंबाजी नामवंशी कोल्हापूरकर हली वस्ती पेट शिवापूर सु॥ तिसा मया अलफ. तूंवा येऊन विदित केले की आपण पेट मजकुरी उदीम करून होतो. त्यास किले मजकुरी गनीमाचे वेढे तिनी आले. मौदिनाचा वेढा १८ अठरा महिने बेदर बक्षचा वेढा १९ महिने खासा पादशहाचा वेढा ९ महिने येऊन बसला तेव्हा पेट वोस होऊन मुलकावर गेली. आपण खासा

जातीनिसी दोघे भाऊ व येक दोघे माणसे घेऊन गडावरी येऊन राहिलो. चौगीर्द वेढा बसला तेव्हां मार्ग नाही तसेच संकटात जाऊन कापड आणून पुरविले. भाऊ यास खलितिया करून पुरविल्या. आपले कष्ट पाहून पूर्वील किल्याचे हकीम होते तेही माहाराज राजश्री कैलासवासी स्वामीयासी व सरकारकून यापासी विनंती करून आपणास वाणी घरटका दुकान फाळा कापड छपावणी जकायती कुलबाब कुलकानू माफ करून वतनपत्रे करून दिल्ही. तेणे ह काल पावेतो चालीले. याउपरी माहाराज राजश्री छत्रपति स्वामी विजई होऊन आपले राज्यात आले तेव्हा आपण किले मजकूरचे मुकामी विनंती केली. स्वामी कृपाळून जुनी पत्र मनास आणून नूतन पत्र भोगवटियास करून दिल्हे तेणेप्रमाणे स्वामीने पत्र दिल्हे पाहिजे म्हणून. तरी पूर्वील पत्रें म्हाली अनूकर्दे मनास आणून तुज पत्र दिल्हे आहे. तेणेप्रमाणे पेठ शिवापूर इगमामपूर (?) व आणखी गडा मु॥ (?) साल पेटेंस मामुरी होईल ते जागा दुकान घालोन आपण उदीम व्यवसाय गडावरी गडाखालते पुत्रपौत्र वंशपरंपरेनें करीत जाणे. वाणी घरटका दुकान फाळा छापावणी जकायती माफ केली आहे. सुखरूप राहोन आपला व्यासंग करणे. जाणिजे. छ २२ रमजान. मार्गेसीर वदी पचमी[1] सर्वधारी संवत्सर. मोर्तब. सुद्र मोर्तब अर्धचंद्रकार.

---

**क्रमांक : २१२** **दि. २६–४–१७०९**

नीलकंठ बाळाजी यांच्या दि. २६–४–१७०९ च्या पत्रातील भाग. मराठ्यानी विशाळगड किल्ला घेताना जी मर्दुमकी गाजविली त्याचा उल्लेख यात आहे.

---

१. खरे जंत्रीत तिथि अष्टमी आहे.

रा।। शामजी रंगनाथ उपनाम पोतदार किले खिळणा राजश्री स्वामीच्या राज्यांत सेवा येकनिष्टेनें बहुत दिवस केली. किले विशालगडास मुख्य शत्रु आला त्या प्रसंगी कस्त करून किला भांडविला. त्याउपरी किला त्याणे घेऊन उदीतसिंग ठेविला होता. तो निघोन जाता किले मजकुरी लोक ठेवीले होते. त्यावरी जमावानिसी येऊन कस्त केली. साखरपेच झुंजी ( ? ) ला. त्यास बरा ठेचगा दील्हा. किला हस्तगत करावयाची खटपट केली. राजश्री स्वामीचे पुन्ये किला हस्तगत जाहाला त्या प्रसंगी राजश्री परशराम पंडीत प्रतिनिधी यांणी सर्वांचे श्रम जाणोन ज्याणे मेहनता केल्या त्याचे उर्जीत केले.

---

**क्रमांक : २१३** **दि. २९-५-१७०९**

शिवाजी मायदेव, संभाजीराम, गुणाजी भास्कर व चिमणाजी बल्लाळ हे चौघे व दत्ताजी महादेव, आबाजी सावाजी, बाबाजी रंगनाथ व मोरो त्रिमल हे चौघे ह्यांचेमध्यें कसबे प्रभावळीच्या कुलकर्णाबद्दल तंटा होता. तो सामोपचाराने मिटला. दुसऱ्या चौघानी पहिल्या चौघांकडून अडीचशें रुपये घेऊन कुलकर्णाचा हक्क द्यावा असे ठरले.

श्री राम

तालीक

राजश्री सिवाजी मायेदेऊ व संभाजीराम व गुणाजी भास्कर व चिमणाजी बलाल शेणवी गोसावी यास

श्नेहपुर्वक दताजी महादेऊ व आबाजी साबाजी व बाबाजी रंगनाथ व मोरो त्रिमल देशकुलकर्णी मामले प्रभानवली शके १६३१ जेष्ट शुा प्रतिपदा विरोधी संवत्सरे तदिन लेहून दिल्हे येसेजे. कसबे प्रभानवलीचे कुलकर्ण तुमचे वडील करीत होते. हशमास कसबा तनखा

दिवणातून जाहाला. सिवार जंगल राई नाईकवाडी यासी वाटून दिल्हे त्याचे लिहिणे हशमनिसीमुळे तुम्ही करीत आलेत. मुलकाची पहाणी करुन समजाविसी करून देत होते. तेव्हा दर आसामीस तुम्हास तुट दर रुके ६ साहा रहेतपासून होते. ते तो भोगवटा मुसलमानाचे कारकिर्दीस चालिला. अलाकडे राजश्री छत्रपती स्वामीचे काबजाद जाहली. त्यावरी कारकिर्दी सुभा राजश्री राउजी सोमनाथ तुम्ही कसबाचे लिहिणे केलेत. त्या अलिकडे आम्ही कसबाचे कुलकर्ण अजी तगायत करीत आलो. त्यामुळे तुमचा आमचा कुलकर्णाचा वेव्हार होत आला. हाली राजश्री निलकंठ बलाल या जवल विशाळगडचे मुकामी वेव्हारास आलो. येथे वेवहार करीता साक्षी ग्वाईनी पुर्वी भोगवटा तुमचा जाहला. आलिकडे आम्ही चालविले. आमचा भोगवटा तुम्हा पुर्वी चालिला म्हणोन वडील सांगत होते ऐसे आम्ही दिवाणांत म्हणीतले. यासी साक्ष ग्वाई कागद पत्र नाही. या करिता दिव्य करून भोगवटा खरा जाहला. तुमी कुलकर्ण घ्यावे म्हणऊन आम्हास आज्ञा केली. त्यावरुन आम्ही दिव्य करावे तरी पुर्वील भोगवटीयाचा विचार पुरता ठाऊका नाही. यावरुन आम्ही दिव्य न करीता कुलकर्ण तुम्हास द्यावे आणि आम्हा जवळून कुलकर्णसमधे रुपये २५० अडीजशे राजश्री परशराम त्रिंबक प्रतिनिधी याचे कारकिर्दीस घेतले आहेती ते तुम्ही आम्हास द्यावे ऐसे आम्ही राजीपणे राजश्री गणोवा नाईक सरदेसाई व चौघे ग्रहस्थ याकडून दिवणांत अर्ज करविला. त्यावरून अडीजशे रुपये तुम्हा जवळून घेऊन गाव कुलकर्ण तुम्हास दिल्हे. या उपरी तुम्ही वडीलाचे वंशपरंपरेने कसबाचे गाव कुलकर्ण चालऊन सुखरुप राहाणे. आम्ही कुलकर्णाचा वेवहार तुम्हासी करून तरी आम्हास गोहत्येचे पातक आहे. आम्ही आपले राजीपणे तुम्हास हे पत्र लिहून दिल्हे आहे. आमचे वंशीचा असेल त्याने तुम्हासी वेवहार सांगो नये. (यापुढे दोन ओळी असून अक्षरे पुसट असल्यामुळे लागत नाहीत) सु।। सन अशर मया व अलफ + +

| | |
|---|---|
| दिा आबाजी साबाजी | दत्ताजी महादेव |
| बाबाजी रंगनाथ | मोरो त्रिमल |

साक्ष

| | |
|---|---|
| ब॥ हुजुर राजश्री गणोबा | सोमोबा नाईक सरदेसाई |
| नाईक सरदेसाई मामले | किले विशालगड |
| प्रभानवली व मामले | प्रभानवलीकर |
| दाभोल व ता॥ मलकापूर | |
| असोडली | |
| गोविंदभट बिन सिऊभट | वांड (?) जोतोसी |
| सातपुते ज्योतीसीमान | संभ सेट बिन हर सेट |
| ता॥ मलकापूर बडपाध्ये | चौघुले |
| देशकुलकर्णी याचे | मालसेट सेटचा बिन |
| | विठ्ठलसेट सेटचा |

---

**क्रमांक : २१४** **दि. १०–८–१७०९**

नीलकंठ बल्लाळ हे चिमणाजी बल्लाळ ह्याना लिहितात की, विठ्ठल खंडो गोलक ह्याने मौजे करंगूळ ह्या गावचे कुलकर्ण दादाजी बल्लाळ व प्रल्हाद बल्लाळ शेणवी ह्याना विकले आहे.

श्री

राजश्री चिमणाजी बलाळ नामजाद व कारकून
सुभा प्रांत मलकापूर गोसावी यास.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य–––––स्नेहांकित निळकंठ बलाळ विनंती. सुरू सन आशर मया व अलफ. दादाजी बलाळ व प्रहलाद बलाळ शेणवी प्रभावळीकर याणी हुजुर किले विशाळगडचे

मुकामी येऊन विदित केले की विठल खंडो गोलक कुलकर्णी देहे ४ तर्फ मलकापूर. बी तपशील

| मौजे केळाणे | मौजे करंगुळ | मौजे नोळ | मौजे वारूळ |
|---|---|---|---|
| १ | १ | १ | १ |

याणे आम्हास सदरहू गावापै।। मौजे करंगूळ येथील गाव कुलकर्ण आपल्या आत्मसंतोष विकत दिल्हे. रुपये १०० सेहे घेतली आणि विकरीतपत्र लिहून दिल्हे आहे. तरी स्वामीन पत्र मनास आणोन मौजे मजकूरचे गावकुलकर्ण आपल्या स्वाधीन करून देऊन चालवावे याची आज्ञा केली पाहिजे म्हणोन. त्याजवरून विठल खंडो गोळक यासी हुजुर आणोन मनास आणिले. त्याणे स्वमुखे सांगितले की आपण नातवान[1] जाहालो अवकात[2] चालत नाही म्हणोन आपले राजीपणे मौजे करंगूळचे गावकुलकर्ण आपले पुरातन ते दादाजी बलाळ व प्रहराद बलाळ यास विकत दिल्हे. रुपये १०० येकशेंहे रोख याजवळोन घेतले. याउपर आपणास करुंगूळचे कुळकर्णास वौषपरंपरेनें समंध नाही म्हणोन प्रभावळीकर शेणवी यासी मौजे मजकूरचे गावकुलकर्ण करार करून दुमाला करविले असे. या वतनास यापासून दिवाणात शेरणी रुपये २५ पंचवीस घेऊन पोता जमा केले. तरी तुम्ही मौजे मजकूरचे गावकुलकर्ण दादाजी बलाळ व प्रलाद बलाळ शेणवी यांचे दुमाला करून चालवणे. हक लाजिमा इनामपूर्वीपासून चालत आलें आसेल तेणेप्रमाणे चालवीत जाणे. या पत्राची तालीक लिहून घेऊन आसल पत्र भोगवटियासी देणे. शेणवी गावकुलकर्णी यापासी देणे. छ १४ जमादिलाखर. मोर्तब असे.

पै।। छ १४ मिनहू.[3]

---

१. गरीब, दुबळा, असमर्थ.

२. बळ, उपाय, प्राज्ञा.

३. त्याच महिन्याचा, वर सांगितलेल्या महिन्याचा.

क्रमांक : २१५ इ. स. १७०९–१०

एलिएनेशन ऑफीसमधील शाहू दप्तरातील एक यादी.

श्री

हिसेब जमा जमादारखाना खा।। राजश्री स्वामी सुहुरसन अशर, मया आलफ.

| | सनगे | किमती रुपये |
|---|---|---|
| माहे रबिलाखर | ३ | १९६।· |
| माहे रबिलौवल | २ | १७५।· |
| माहे रजब | ४ | ४१॥=। |
| माहे साबान | १० | ११६८ |
| माहे रमजान | २ | ५६ |
| | २१ | १६३७८=। |

माहे रबिलाखर सनगे ३ येक की।। रुपये १९६।.

ता।।

छ २४ रोज राजश्री गंगाराम यादव यास पुणाची फौज भारी करार करून रवानगी केली ते समयी वस्त्रे दिल्ही

| | सनगे | कि।। रुपये |
|---|---|---|
| दुपटा | १ | १२५ |
| मदील | १ | ६० |
| | २ | १८५ |

छ २५ रोज शामजी कान्हो कारखानीस किले प्रचंडगड यास कारखानिसी सांगितली. रवाना केले ते समई वस्त्र तिवट[1] दिल्हे सनग १ येक.

कि।। रुपये
११।·

१. पागोटे.

माहे जमादिलोवल सनगे २ येक रुो
१७५।

ता॥

छ ३ रोज राजश्री सुलतानजी जाधव यास सुधगडीचा हवाला सांगितला. ते समई दिल्हे मंदील १ येक कि॥ रुपये
७५

छ १० रोज रा॥ मालजी भोसले यास किले प्रचंडगडचा हवाला सांगोन रवाना केलें तें समई मंदील ता॥ संताजी चव्हाण सनग दिल्हे १ येक कि॥ रुो
१००।

माहे रजब छ २९ रोज गु॥ बापूजी चव्हाण अफराद जमा जमादारखाना ता॥ येसाजी जामदार मावले लोकास द्यावयास तिवटे[1] दिल्ही

| | सनगे | | | किमती रुपये |
|---|---|---|---|---|
| प्रा | १ | ... | ... | २०। |
| प्रा | १ | ... | ... | ७॥ |
| प्रा | १ | ... | ... | ७॥ — । |
| प्रा | १ | ... | ... | ६। = |
| | ४ | | | ४१॥≡। |

माहे साबान छ ८ रोज विजयादशमी राजश्री स्वामीस दुस्त दिल्हा सनगे १० यो॥ कि॥ रुो
११६८

---

१. भरजरी वस्त्र.

त॥

| राजश्री स्वामीस सनगे | | | कडीयात सनगे ५ ये॥ रुो | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ | येाा कि॥ रुो | | ३७५ | पावले कुसुबी | |
| २०० | मदील सरासरी | १ | | २२५ प्रती | १ |
| ३२५ | चादर | १ येक | | १५० प्रती | १ |
| २०० | जामेवार | १ | | ३७५ | २ |
| ५० | पटका | १ | ३० | कीनखाप फडकयास | १ येक |
| | | ४ | २८ | चोळखण | २ ये॥ |
| ६७५ | | | ४३३ | | ५ |

राजश्री फतेसिग भोसले मदील १ येक रुो ६० माहे रमजान छ २९ रोज सनगे २

९ किमती———————————रुपये

४९॥ येक अष्टगोली सिफेद गु॥ बापूजी चव्हाण मोघम ताा येसाजी जामदार विद्यमान राजश्री यादव गोपाल............

६॥ तिवट राजश्री......... स्वामीनी (मु)सलमानास काजीस द्यावयाबद्दल देविले ते दिल्हे. विद्यमान राजश्री कृष्णाजी कासी

यादी गणती लोक फुटपथ हशम सु॥ इहिदे अशर मया. सुा छ २८ रजब.

| असामी तेनाती रोजी आहिरे | | पंचहजारी | हजारी | सुभदार | हवालदार | नाईक | रजपूत |
|---|---|---|---|---|---|---|---|
| दिमा | | | | | | | |
| रतजी आहिरे | १ | ३॥ | ० | | | | |
| येसजी आहिरे | १ | ० | ३ | ० | ० | ० | ० |
| आनाजी भोसल | १ | ० | ३ | -- | -- | -- | -- |
| उदाजी मान्या | १ | ० | ० | २॥ | -- | -- | -- |
| बाबाजी मान्या | १ | -- | -- | २॥ | -- | -- | -- |
| रघोजी सिध | १ | -- | -- | -- | २॥ | -- | -- |
| कोनाजी अहिरा | १ | -- | -- | २॥ | -- | -- | -- |
| | ७ | ३॥ | ६ | ७॥ | २॥ | ० | ० |
| रतजी जाधव | १ | ३॥ | -- | -- | -- | -- | -- |
| पुनाजी जाधव | १ | ३॥ | -- | -- | -- | -- | -- |
| रामाजी जाधव | १ | -- | ३ | -- | -- | -- | -- |
| हिरोजी जाधव | १ | -- | ३ | -- | -- | -- | -- |
| दमोजी जाधव | १ | -- | ० | -- | -- | -- | -- |
| चंद्राजी जाधव | १ | -- | -- | २॥ | -- | -- | -- |
| धारोजी जाधव | १ | -- | -- | -- | -- | -- | -- |
| धारोजी पदाजी | १ | -- | ३ | २॥ | -- | -- | -- |
| | ८ | ७ | ९ | ५ | ० | ० | ० |

क्रमांक : २१६ इ. स. १७०९–१०

एलिएनेशन ऑफीस मधील हिशेबाची एक यादी.

श्री

१
१७

हिसेबु इजमाईली दीा खासगी स्वामी राजेश्री सीवाजी भस्कर सुा असर मया अलफ. ईा छ ९ साबान[1] ताा छ ४ रबीलाखर[2] अखेर साल येकून जमा रुपये.

रुपये ५३७५॥=।.

तरवरा ईजाई २
इगरजे १ बडी लहान

तेरीज

रुपये
तरवरा
ईगरेज बडी लहान
१ १

येक जमा बेरीज
रुपये ३८४५॥–

सुभे हाये वसूल

तेरीज

गांवगना बेरीज रुपये
३६८४०≡

सुभा प्राा कऱ्हाड
गांवगना वसूल रुपये
देहाये २३ येाा
वसूल रुपये
१६४५ ।॥·।·

सुभा प्र॥ सातारा देहाये
७
वसूल जमा रुपये
मौजे पाली
कसबा उबरज
मौजे सावडे
तासवडे
नागझरी
करपी
चीचोरे

१३९४॥.।

प्रा. कऱ्हाड देहाये १५ येाा
मौजे केसे
मौजे वीरवडे
मौजे करवडी
वाघेरी.

१. (२–१०–१७०९). २. (२२–५–१७१०).

सेवरे.
मोदी.
कोले नरसापूर.
कालिये.
तुलसणी.
सवदे.
कासार सिरबे.
उडाले.
मणू.
येवती.

१६४५ ।।।·।·

मौजे बाहे ताा मरळी
पाठवणे ताा माणेघाट.
ताा तारळे.
मौजे बेपासे.
मौजे कलहे.
बाबवडे.
ताा काले.
२ मौजे कसपी.
५ कालगाव.
१।। नीवी

८।।

२२५६।।=।.

सुभा मलकापूर चिटी
मसालेमुळे वसूल रुपये
नदगांव ता।। सिराले
कोडोली ता सिराले

ता।। वरुण
पराले.
मौजे खडे
टीचोवळी
नवरे.
सीराले.
फेजवडे.
अरले.
तोंडाली.

३३

तेरीज सुभे बाबे रुपये.
२२५५।।=। सुभा कऱ्हाड.
१३९४।।-। सुभा सातारा.
३३ सुभा मलकापूर.

३६८४०=

कमावीस जमा रुपये.

| | |
|---|---|
| रु. १७ | नजर भेटी गु।। पाटील गांवगना |
| १०० | द (ख?) ड गु।। रामाजी सिवदेव कमवीसदार माजी मौजे पाली. |
| १।– | पाडा जमा (?) |
| १४ | खुद जमाले.<br>६ गु। रामाजी सीवदेव कमा (वीस) दार माजी मौजे पाली.<br>८ धणगर मौजे वबगाऊ.<br>१४ |
| १६८= | जकाती काले वरसे पैकी जमा वसूल मुळे.<br>११=॥ येक रुपये<br>४।≡ खुर्दा ठके १४।१।। दर ३।· ये।। |
| १३८= | पैं हास्त गु।। अत्तोजी यादव मौजे......... व नतोजी पाटील मौजे कोडोली प्रा।। वरुण. राा परसोजी भोसले याकडे लस्करास जात होते ते वाटेतून धरून अणीले त्यापासी झाडा घेता सापडले ते जमा.<br>येक रुपये १३= तरवरा ईजाई २<br>१ थोर ईगरेज<br>१ बडी लहान<br>२ |
| २ | |
| १६१।= | |

तेरीज येक जमा रुपये.

| | रुपये | तरवारा ईजाई |
|---|---|---|
| सुभे हाय—— | ३६८४८= | ० |
| कमावीस | १६१।= | २ |
| | ३८४५॥– | २ |

ईजाफती व कर्ज रुपये १५३०८–।·

| ईजाफती रुपये | | कर्ज गु॥ बाबे रुपये | |
|---|---|---|---|
| ११ | स्वारी रा॥ अंताजी त्रिमल मु॥ वसंतगड | २५० | गु॥ मोरो शंकर व नारोराम कमावीसदार सुभा मलकापूर. |
| २ | सुभा मलकापूर. गु॥ जीवाजी लिबजी. | २०० | गु॥ दत्ताजी रघुनाथ मजमदार सुभा साबजी भोसले. |
| १२ | सुभा कऱ्हाड स्वारी भीकाजी उधव मसाले गांवगनापैकी | ५२ | गु॥ प्रयोग अनंत. |
| | | २६४॥· | गु॥ रामाजी नाईक वाईकर. |
| २५ | | २०५८≡ | गु॥ भगवंत वेकटेश. |
| | | ८= | गु॥ बाळाजी नाईक. |
| | | ३८६।॥– | गु॥ सावजी येसाजी. |
| | | ११७ | गु॥ तुकोजी...... |
| | | ॥= | गु॥ रामणा मोचोर. |
| | | २ | गु॥ बळवंतराऊ. |
| | | ·।· | गु॥ रामचंद्र मल्हार. |
| | | १ | गु॥ विस्वनाथ भट. |
| | | १ | गु॥ संभाजी खोपडा. |
| | | ·॥· | गु॥ भीकाजी उद्धव. |
| | | १४ | गु॥ तुकोजी काजी. |

२८≡।· गु॥ बकाल वसंतगड.
|||≡ माहाद सेटी.
१।८।· मल सेटी.
२८≡।·

१५०५८–।·

तेरीज जमा येकंदर

| | रुपये | तरवरा | ईजाई | इगरेज | बु॥ |
|---|---|---|---|---|---|
| यैन जमा | ३८४५॥– | २ | | १ | १ |
| इजाफती कर्ज | १५३०८–। | ० | | ० | ० |
| | ५३७५॥=।· | २ | | १ | १ |

खर्च रुपये ५३३६॥=।.

हुजाराती रुपये २९८६॥–

ता।

त॥ हवेली. रु॥

१५६६ जमा पोता हुजूर.

१००० छ ९ साबान
गुा रामजी ना वाईकर

४० छ १० साबान
गुा माणको बापूजी.

१७० छ १० रमजान
दी॥ जाबा छ ११

...............

१९३ छ २६ रमजान
गु॥ तुको भीकाजी
मजमदार रु॥ २००
ब नाब हुडा रु॥

कारकून हुजराती रुपये

४३ कृष्णाजी रुद्रराज. श्री भट गोसावी याकडे पादशाही लस्करास रवाना केले. परवानगी राजेश्री यादवपंत.

१ अंताजी त्रिमल मोकाम वसंतगड खरीदी तामुले (?)

१० गोविंद माहादेव
गु॥ माणको बापूजी

२० विठल लक्षुमण

१०३॥। माणको बापूजी ह॥ सनद.

८२ भगवंत वेकटेश फडणीस ह॥ सनद परभारे गाव रुपये १०० पैकी अदेसुद.

२५ छ १२ सवाल हा। जाब
मोजे चिचणेर.

१० छ १७ रमजान मौजे
करदी दी॥ जाब कृष्णाजी
बलाल सुभेदार
प्रा॥ सातारा.

३ छ १७ सैवाल मौजे करपी
गु॥ सभाजी साबला व
भिकाजी भोसला जासूद.

७० छ ११ मोहरम गु॥ मानाजी
निकम हा॥ जाब छ १८ रोज

१५६६

३३ जमा जामदारखाना
गु॥ सावजी भास्कर
खरीदी कापड गु॥ वेकाजी
नाईक बाजार लस्कर रुपये.
१८ मुपट
१५ कोचकी
३३

११॥ रुपये पागा हुजूर
१ बराबरी विठल
लक्षमण घोडे रास २
येकून बाणहारभरे
॥२॥ येकून रु॥

१०॥ हा॥ सकाजी खोपडे
हा॥ छ १२ जिल्हेज
ता॥ छ ३ मोहरम घोडा
थोर (?) दररोज हरभरे
॥१॥ येकन रुपये

११॥

२० बहिरो वेकाजी गु॥ सावजी
भास्कर

७७ जानो कासी चिटनीस हा॥
सनद गलारूढी १ पैकी
अदेसुद.

१२ कृष्णाजी शंकर हा॥ सनद
छ २५ रमजान रु॥ २५ पैकी

१० माहालो हरी लिहीणार हा॥
सनद छ २ सैवाल रु॥ दी॥
खासगी.

२० नरसोराम लिहीणार हा॥
कागद माणको बापोजी
छ २३ साबान दि॥ मजमु
लिहीणार.

१ गणेश प्रभु दी॥ चिटनिसी

॥ यादवराव पारसनीस.

८ सीवाजी रामजी हा॥ सनद
छ ११ रबिलावल रु॥ १५
पैकी

६०८।

जासूद हुजराती रुपये

४ सिवाजी पवार हा। सनद
छ १० जिल्हेज रुपये ३ पैकी
आदा

३= जोत्याजी पवार हा॥ सनद

४ नागोजी धस हा॥ सनद
१० जिल्हेज

१॥ रुद्रोजी कामगारी मसाला
रामाजी सिवदेव कमाविसदार
माजी मौजे पाली

२६२॥ रद कर्ज हुजरात ५० गु॥
अताब नाई(क) ह॥ सनद
रुपये १०० पैकी आदा
गु॥ गोविंद रघुनाथ
६२॥ गु॥ म्हाळोजी
गायेकवाड व सयाजी घुला
ह॥ सनद हुजाराती
१५० बाळाजी पीलदेव
ह॥ सनद रु॥ ७०० पैकी

१८७३

संभाजी खोपडे बारगीर
हुजूर पागा कामगारी नसद
ह॥ कागद विठल लक्षुमण
रु॥ ३० अदे सुद रु॥ ७२॥
हरकारे हुजराती रुपये
१॥ तमाजी अपाजी छ २२ रावल
२ बाळाजो हरी छ १० रमजान

३॥

अफराद
४ खळोजी नाईक
४। सिदोजी गोरा[1]

१९॥

मोघम लोक हुजराती[1]

११०॥

दी॥ सुभे दुमले हशेम
पावलोक[1]

१५।

दुमला सुभानजी दीगे[1]

३१।

३॥।- मानाजी गायेकवाडी ह॥
सनद रु॥ १० पैकी आदा
१०॥ तुकोजी ?
सुभाजी माहाडीक
..................
८॥ हैबती जाधव
छ ९ जिल्हेज
१०८= रायाजी सीदा
६।ः चादजी कदम
२३।= मोरोजी कदम
२७।= रघोजी यादव
१५८= संताजी साबला
१८॥- अतोजी सीदा
५ नीबाजी साबला
छ ७ जिलकाद
॥- होनाजी मोहिता
नी॥ सुनजी भोसला
छ ८ रावल
९।≡ सीवाजी इंगळा.
४ संभाजी साबळा.
२ तुकाजी भोसला.
१॥ लिंगोजी सावंत.
१३॥= सुभानजी बागुळ ह॥ सनद
रा॥ छेत्रपती परभारे
क॥ उबरज

---

१ अनेक नांवें आहेत. ती सर्व घेतलेली नाहीत.

२०।।।- दि।। गंगाजी खाडे[1]

७२।।।-

महाल मजकूर खर्च
कारकून आदेसुद रु।।
(खालील व्यक्तींच्या पुढे
आकडे आहेत )

सिवाजी भास्कर.

तुको भिकाजी मजमदार.

जगन्नाथ भिकाजी फडणीस.

बाळाजी पीलदेव सभासद
नामजाद ता।। हवेली कऱ्हाड.

गोविंद रायाजी मजमदार
ता।। हवेली कऱ्हाड.

विठल रघुनाथ मजमदार
ता।। हवेली कऱ्हाड.

नारो मुरार हवलदार
सुभा सातारा.

गोविंद रघुनाथ मजमदार
सुभा सातारा.

अंताजी नारायण कमवीस-
-दार. मौजे पाली.

सिवाजी लिबाजी हवलदार
ता।। कोले.

नारोराम मजमदार सुभा
मलकापूर

९५६।।।-

कीलहाये व लस्कर व हशम
पावलोक कामगारी वसूल रु।।

३ संताजी माहाडीक
१।। राणोजी नाईक
८= सखोजी चवाण
१५८= सोमाजी भणगा[1]

२२१८≡

तेरीज हुजरात रुपये.

१८७३ ता।। हवेली खर्च
५०८।॰ कारकून
२२१८≡ जासूद
७२।।॰ बारगीर
३।।॰ हरकारे
१९।।॰ अफराद
११०।।।॰ मोघम लोक
७२।।।- दी।। सुभेहाय
व हशम पावलोक
५८- बाजे लोक

२९८६।।-

पावलोक असामी
रामचंद्र मल्हार सीपाई
जीवजी लिबाजी
बजाजी निकम
काळोजी सीगटा
गणोजी चतूर
दताजी रोजणी
विठोजी चतूर
सुभानजी घोरपडा
हसनभाई
हरी सिवदेव[1]

---

अनेक नांवे आहेत. ती सर्व घेतलेली नाहीत.

५६।– किले वसंतगड ह्॥
लोक कामगारी चीटी मसाले

१२८।· किले सातारा ह्॥ लोक
कामगारी वसूल गु॥ नारो
मुरार

५ किले गुणवंतगड काम-
गारी स्वारी त॥ कोले गु॥
सीवाजी लिबजी हवलदार
आसामी ५ येकून रुपये

५॥=। सुभा परसोजी भोसले देणे
भिकाजी कदम. वसंतगडास
धरून नेला त्यास खर्च

३७८– दी॥ डोगरोजी यादव
कामगारी वसूला बद्दल

३०८≡ सुभा होनाजी अनंत
कामगीरी वसूलाबद्दल
बाळाजी पिलदेव याणी
स्वार आणिले ह्॥ सनद
छ १४ सैवाल गु॥
बाळाजी पिलदेव.

२६८= स्वारी मोरो सामराज
व भिकाजी उधव कामगारी
स्वार वसूलास पाठविले
यास रोजमरा दीला.

४८ लोक दी॥ दताजी साल
( + + + )
(सालोखे ?) कामगारो
स्वारी त॥ कोले गु॥
शिवाजी लिबजी आसामी
४ येकून रुपये.

८० लोक दि॥ सताजी
गायेकवाड पाठणकर
कामगारी स्वारी त॥ काळे
गु॥ सिवाजी लिबजी
असामी ८ येकून रु॥

१८४।=

बाजे खर्च रुपये

९॥ दप्तर खर्च खरीदी
कागद व दीवहती शाई सीरे.

५०॥ तरीफा.

६ आबाजी पाटील
५ भीकाजी कदम
दि॥ परसोजी भोसले
१९॥ यासीन खान याचे
भेटीस बाळाजी
पिलदेव गेले त्यास
दिले तिवट १
२० स्वरुपजी यादव
देशमुख व रुद्राजी
पंत देशपांडे तिवटे २

५०॥

२॥।≡ अडीसेरी बदवन[1]
१।– अडीसेरी मल्हार...
१०– सेरणी श्रीदेव चदण[2]
वसंतगडी सबब
व (वा?) रणेचे पाटील
सापडावे म्हणोन वाटीली

६५०≡

११४३॥।-।

तेरीज महाल मजकूर

९५६॥। कारकून
१८४।= जमा व खर्च
११४३॥।-। पावलोक
६५०≡ बाजेखर्च

२३५००=।

१. बराच तपशील आहे तो घेतला नाही.
२. वसंतगडावर चंदोबाचे देवालय आहे.

तेरीज खर्च रुपये.

२९८६॥ हुजराती
२३५०८= महालमजकूर
५३३६॥=

बाकी ता॥ छ ४ रबिलाखर अखेर साल रुपये ३९८

तरवारा ईजाई २
इगरेज वडीलहान
१ १

---

**क्रमांक : २१७** **दि. २७-१-१७१०**

खंडो बल्लाळ प्रभु ह्याने छत्रपतींची जी निष्ठेने सेवा केली ती लक्षात घेऊन छत्रपती शाहू ह्यानी त्याला पन्हाळ्याच्या नाडगौडकीचे वतन दिले. हे वतन पूर्वी नागोजी भास्कर ह्या नावाच्या गृहस्थाचे होते. परंतु त्याचे घराणे निर्वंश झाले होते.

श्री

नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक ३६ विरोधी नाम संवत्सर माघ शु॥ नवमी भृगुवासरे[1] क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी राजश्री खंडो बलाळ प्रभू नाडगौडा मामले किले पनाळा यासी दिल्हे वृतिपत्र ऐसाजे. तुम्ही पुरातन स्वामीच्या राज्यातील

सिका सिका

सेवक. पूर्वी + + + येक निष्टेने सेवा करीत आले आहा.

---

१. वाराप्रमाणे तारीख घेतली आहे.

प्रस्तुत स्वामीची सेवा येकनिष्टपणे करिता. यास्तव तुमचे वंशपरंपरेने चालवणे स्वामीस आगत्य. म्हणून प्रांत मजकुरचे नाडगौडकीचे वतन पूर्वी इदलशादी कारकिर्दीस नागोजी भास्कर याचे होते. भोगवटा इदलशाही कारकिर्दीस चालिला होता. आलीकडे थोरले कैलासवासी स्वामीस देश आर्जानी जाहाल्यावरी हा कालपर्यंत चालला नाही व नागोजी भास्कर याचे वंशीचे कोण्ही नाही. वतन नकल जाहाले आहे ऐसे जाणोन स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन मामले किले पनाळा येथील नाडगौडकीचे वतन आजरामरहमत करून दिल्हे असे.

बी तपसील--

सुभा प्रांत पनाळा

कर्यात फुटगाव

१ कर्याती ठाणे
१ कर्यात बोरगाव
१ कर्यात सातवे
१ कर्यात कोडोली
१ कर्यात वडगाव
५

१ कसबे पेट
१ मौजे आकलसोदे
१ मौजे कविटे पिराचे
१ मौजे बावची
ताा आस्टे

सुभा प्रांत तारळे

१ ताा आसंडली देहे १९
१ ताा सावर्धान (?)
२ देहे २६

सुभा खटाव पैकी
कर्यात वांगी--१
सुभा कराड पैकी
तळबिड

सुभा प्रांत मलकापूर

१ कर्यात कोतेगाऊ
१ ताा मलकापूर पैकी देहे शामजी नरसिंह देशपांडिया प्रांत पनाळा याचे देश-कुलकर्ण चालत असेल ते देहे कलम
२

तेरीज

| कर्यात | देहे | फुट | किता देहे |
|---|---|---|---|
| सुभा पनाळा | ५ | ४ | ० |
| सुभा तारळे | २ | ० | ० |
| सुभा खटाव | १ | ० | ० |
| सुभा कराड | १ | ० | ० |
| सुभा मलकापूर | १ | ० | १ |
| | १० | ४ | १ |

येन कर्यात मलकापूर पैकी
१ देहे कलम येक
१

येकूण कर्याती दाहा व कसबा देखील फुटगाव च्यार व तर्फ मलकापूर पै।। शामजी नरसिंह याचे कुलकर्ण चालते. देहे येणेप्राो येथील नाडगौडकीचे वतन स्वामीनी तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने वृति करून दिल्ही आसे. सदरहू वेतनास हक लवाजिमा व इनाम पानमान तश्रीफ नीशान पूर्वी नागोजी भास्कर याचे वेळेस चालिले आसेल त्याप्रमाणे करार केले आसे. याखेरीज सदरहु कर्यातीस व फुटगावी जकायती आसतील तेथे दर गोणास हक रुका ॰१ येक करार करून दिल्हा आहे. याप्रमाणे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन सुखरूप राहाणे. जाणिजे. लेखनालंकार. मोर्तब.

---

**क्रमांक : २१८** **दि. २६–२–१७१०**

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी अण्णाजी दत्तो ह्यांच्या मुलास वतन दिल्याची सनद. या सनदेत अण्णाजी दत्तोच्या घराण्याची थोडी हकीकत येते.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३६ विरोधी सवत्सर फाल्गुन शु।। ९ रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी पारपत्यगार व लेखक त।। संगमेश्वर प्रांत राजापूर यासी आज्ञा केली येसीजे. राजश्री आणाजी दत्तो याची स्त्री

सिका सिका लक्ष्मीबाई व पुत्र राघो आणाजी याणी हुजुर येऊन विदित केले की अनाजीपंत थोरले कैलासवासीचे वेळेस सचीवपणाचा अधिकार करीत असता बहुत निष्टेने सेवा करून

दया संपादून नामना करून घेतली. त्याजवरून थोरले कैलासवासी स्वामी मेहेरबान होऊन ता। मा।र येथील देशकुलकर्णव का। संगमेश्वरचे गावकुलकर्णाचे वतन अजरामऱ्हामत करून दिल्हे. ते अनभवीत असता कैलासवासी स्वामीस कैलासवास जाहाल्यानंतर राजश्री संभाजी राजे राज्याधिकारी जाहाले. त्यानी अनाजीपंतावर राज्यकार्य भाग प्रसंग निमित्य ठेऊन निर्बंध केला. ते समई आम्ही गावी होतो. ते निर्बंध्धी असता निग्रह विशेष केला. याप्रसंगी नाश होऊन गेला. आपणास निर्बंधी ठेविले होते. बहुता काली मुक्त केले. मूल लहान योगक्षेम चालिला पाहिजे त्यास वतनावर स्थापना करून वंशपरंपरे चालवावया आज्ञा केली पाहिजे म्हणोन विनंती केली. त्याजवरून विदित जाहाले. अशास पूर्वी अनाजी दत्तो सचीव होते त्याचा राजकार्य भाग प्रसंगे कडून नाश जाहाला व स्त्रीपुत्र निर्बंधी याजलाही मुक्त केले हे गोष्ट यथार्थ आहे व कसबे मा।रचे कुलकर्ण व माहालचे देशकुलकर्णाचे वतन करून अनाजी पंतास दिल्हे आहे ते चालवणे स्वामीस परम आवशक जाणून चालवावे यैसी आज्ञा केली आहे. तरी तुम्ही जाणोन ता। मा।रचे देशकुलकर्णाचे वतन व कसब्याचे कुलकर्णाचे वतन वंशपरंपरे चालऊन याचे हातून वतनाची सेवा घेत जाणे. याचे वतनाचा हक लाजिमा इनामत पहिल्यापासून चालत असेल त्याप्रमाणे चालवणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन असलपत्र परतोन भोगवटीयास देणे. निदेश समक्ष. मोर्तब असे.

---

**क्रमांक : २१९** **दि. २६–२–१७१०**

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी अण्णाजी दत्तो ह्यांचा मुलगा राघो अण्णाजी ह्यास तर्फ संगमेश्वर येथे देशकुलकर्णाचे वतन आणि कसबे संगमेश्वर येथील गाव कुलकर्णाचे वतन इनाम दिले. वतनपत्रामध्ये हे इनाम शिवाजी महाराजानी अण्णाजी दत्तो ह्याना दिले होते असा उल्लेख आहे.

श्री

आसल बरहुकुम तालीक

सिका आहे

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३६ विरोधी नाम संवत्सरे फाल्गुन शुध्ध नवमी रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शिव छत्रपति (यानी) पारपत्येगार व लेखक ता। संममेश्वर प्रात राजापूर यासी आज्ञा केली यैसीजे. राजश्री आणाजी दत्तो याचे पुत्र

सीका सीका

राघो आणाजी याणी हुजुर येऊन विदित केले की आणाजीपंत थोरल्या कैलासवासी स्वामीचे व्येळेस सचीवपणाचा आधिकार करीत आसता बहुत निष्टेने सेवा करून दया संपादून नामना करून घेतली. त्यावरून थोरले कैलासवासी स्वामी मेहेरबान होऊन तर्फ मजकूर येथील देश कुलकर्णाचे वतन व कसबे संगमेश्वर येथील गावकुलकर्णाचे वतन व मौजे आंबेडू खुर्द येथील कोड इनाम व गावगना जमीन इनामती बिघे ८१० बी॥ गाव आणाजी दत्तो याचा धारा

·।।।· ·।।।·२। मौजे डिगणी ८१॥
·।।।· यैन
८।।।· २। बर हुकुम कसर
·।।।· ·।।।· २।

·।।· ।। १॥ मौजे आंबव ८१
·।।· यैन
८।। १॥ बा॥ कसर
·।।· ·।।· १॥

·।।।· ।।। २। मौजे करजुवे ८१॥
·।।।· यैन
८।।।. २। बा॥ कसर
·।।। ·।।।· २।

·।। २।।। मौजे कलबस्त ८१॥
·।। २ यैन
८।।।· बा॥ कसर
·।। २ ।।।·

·।।· ।। १॥ मौजे पिरदवण ८१
·।।· यैन
८।। १॥ बा॥ कसर
·।।· ।। १॥

·।· ।· ।।।· मौजे सोनवडे ८।।·
·।· यैन
।· ।।।· कसर
·।·।·।।।·

| | |
|---|---|
| ·॥·॥· २। मौजे सरद ८१॥ | ·।·॥· मौजे तरये ८॥· |
| ·॥· यैन | ·।· यैन |
| ८॥२। बा॥ कसर | ८।·॥· बा॥ कसर |
| ·॥·॥ २। | ·।·॥· |
| ·।· ·॥· मौजे वोझरखाले | ·।·।॥· मौजे कुरधोड |
| ·।· यैन | ·।· यैन |
| ८।·॥· बरहुकुमकसर | ८।·॥· बा। कसर |
| ·।·।·॥· | ·।·।·॥· |
| ३८३॥· | १॥४।·॥· |

५८३८॥·

येकूण इनामती जमीन बिघे दाहा. येकूण भात पांच खंडी तीन मण पाऊण पायेली इनामती व मीट बंदर येथील हक जकायेत व आंबेडु खुर्द खोती व तेली याचे खुटास तेल वजन ८८२॥ सेर व चांभार याचे दुकानास जूत येक व कुंभार कामर घरास मडकी डाल येक व म्हरी व आवत व गावगना हक कहारी दाभोळी तीन सेर दर साडेतीन कहारी प्रमाणे शो साडे पंचायैसी तीन आणे व बंदरी मिठाचे तारेवे येतात त्यास दर तारवास मिटाची पाटी एक चार पायलीची व गवळी माहालीवरी हक येणे वतन अजरामरामत करून दिल्हे ते आनभवीत असता कैलासवासी स्वामी कैलास (वास) जाहाल्यानंतर राजश्री संभाजी राजे राज्याधिकारी जाहाले. त्यानी अणाजी पंतावर राजकार्य प्रसंगे निमित्य टेऊन निरबंद केला. ते समई आम्ही गावी होतो. ते निरबंदी आसता निग्रह विशेष जाहाला. त्याप्रसंगी नाश होऊन गेला. आपणास निरबंदी ठेविले होते. बहुत काली मुक्त केले. वतनसमध कागदपत्र गेली. भोगवटियास स्वामीनी पत्रे करून देऊन वतन वंशपरंपरा चालवावयास आज्ञा केली पाहिजे, म्हणोन विनंती केली. त्याजवरून विदित जाहाली. यैशास पूर्वी

आणाजी दत्तो सचिव होते. त्याचा राजकार्य प्रसंगे कडून नाश जाहाला व माहालचे देशकुळकर्ण्याचे वतन व कसबे संगमेश्वरचे गाव कुलकर्ण वतन मौजे आंबेडु खुर्द येथील कोड इनाम व गावगना इनामती जमीन बिघे १० आणाजी दत्तो याचे धारयाने भात खंडी पांच खंडी तीन मण पाऊण पायली इनाम व मीट बंदर येथील हक व आंबेडु खुर्द खोती व हक तेली चांभार व माहारी व आवते व गावगना हक व कहारी दाभोळी तीनसेहे या रु।। ८५॥≈ व हक मीट बंदरी तारवास पाटी मिटाची येक चार पायलीची व गवळी माहालीवरी हक येणेप्रमाणे वतन करून दिल्हे. ही गोष्ट यथार्थ आहे. तेणेप्रमाणे चालवणे स्वामीस परम आवश्येक. यैस जाणोन चालवावे यैसी आज्ञा केली आहे. तरी तुम्ही जाणोन तर्फ मजकुरचे देशकुलकर्णी व कसबे मजकुरचे गाव कुलकर्णी व मौजे आंबेडु खुर्द येथील कोड इनाम व भात जमीन बिघे दाहा गावगना अणाजी दत्तो याचे धारयाने वर्तवळा कसर सुधा व मीट बंदर येथील हक व आंबेडु खुर्द येथील खोती व तेली याची खुटास तेल आडीच सेर व चांभार याचे दुकानास जुत येक व म्हरी व आंवते गावगना हक कहारी दाभोळी तीनसेहे. यकूण रुा साडे पंचेयैसी तीन आण व बंदरी मिठाची तारवे येतात त्यास दर तारवास मिठाची पाटी येक चार पायलीची व हक जकायत व गवळी माहालावर हक येणेप्रमाणे वतन राघो आणाजी याजकडे व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरा चालऊन याचे हातून वतनाची सेवा घेत जाणे. हे मुतालिक ठेवितील तो याचे कहबेरदार न वर्ते तर दुसर मुतालिक ठेवतील त्याच्या हातून वतनी सेवा घेत जाणे. या पत्राची प्रती लेहोन घेऊन असल पत्र माघारी फिरोन भोगवटियास देणे. छ ११[१] मोहरम निदेश समक्ष. मोर्तब असे.

---

१. मुसलमानी व हिंदु तारखा जुळत नाहीत. ११ मोहरमप्रमाणें १-३-१७१० इ. ही पडते.

क्रमांक : २२० दि. ५-३-१७१०

दादाजी बल्लाळ व प्रल्हाद बल्लाळ हशमनीस मामले प्रभावळी ह्यांचा पतकीचा हुद्दा वतनी करून दिला आहे, असे नीलकंठ बल्लाळ ह्यांचे सरसुभेदार व कारकून प्रांत मलकापूर ह्याना पत्र.

श्री तालीक

राजश्री चिमणाजी बलाळ सुभेदार व कारकून वर्तमान भावी प्रांत मलकापूर गोसावी यास

॥ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये-----स्नेहपूर्वक निलकंठ बलाळ विनंती. सु॥ अशर मया व अलफ. दादाजो बलाळ व प्रल्हाद बलाळ हशमनीस मामले प्रभावळी हाली पतकी जकात वरघाट व आडमार्ग नाटवडे परगणे वारूण याणे हुजूर येऊन विदित केले की जकात मजकुरी डांगिया आहे. पतकी मिरासदार नाही. ऐसियास स्वामीने कृपाळू होऊन पंतक वतनी करून दिल्हीया शरणी वज माफिक दिवाणात देऊ म्हणून विनंती केली. त्यावरून मनास आणिता पतकी मिरासदार नाही. याकरिता यास वतन पतक द्यावेसें करून शेरणी देखील बाबती रुपये १०० यकसे करार केले आहेत. याचा उसूल घेऊन हुजूर रसद पाठवणे आणि पतक यास पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवीत जाणे. यास हक व लाजिमा चालवणे. या पत्राची तालीक लेहून घेऊन असल पत्र भोगवटियाजवळ परतोन देणे. छ १५ मोहरम. मोर्तब.

क्रमांक : २२१ दि. १७–५–१७१०

आपणास "शाकभाजी स्थल" द्यावे म्हणून यादव शिवदेव ह्यानी विनंती केलेवरून त्याना रामचंद्र पंत अमात्य ह्यानी हे वतन दिले.

श्रीराम वरद राजमूर्ति

सिका

मो अनाम यादव सिवदेव नाडगोंडा का॥ कापसी यास रामचंद्र निलकंठ अमात्य हुकमतपन्हा सु॥ अशर मया अलफ. तुम्ही येऊन रांगणेचे मु॥ विनंती केली की आपल्याला शाकभाजी स्थल यक द्यावें त्यावरून का॥ मा॥र पैकी मौजे मानवेल येथील केळेवाडी इनाम वतनी करून दिल्हा असे. पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभवणे. वतन समधें सेरणी रुपये १०० शंभर पोता जमा जाहाले. जाणिजे. छ २८ रबिलावल. निदेश समक्ष· मोर्तब असे.

---

क्रमांक : २२२ दि. १९–५–१७१०

शिवापूर, दौलतपूर व रामापूर ह्या तीन पेठांचे कुलकर्ण व रामापूर पेठेची महाजनकी अशी चार वतने यादव शिवदेव रखमांगद ह्याना देण्यात आली.

श्री

राजश्री बाजी मेढे नामदार व कारकून किले भुदरगड गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—— श्री रामचंद्र निलकंठ अमात्य हुकुमतपन्हा आसिर्वाद आणि नमस्कार. सु॥ अशर मया अलफ.

किले मारचे माचीस पेटा आहेत. पेट सियापूर व पेट दौलतपूर व पेट रामापूर येशा तीन पेठा आहेत. त्यास मोहतर्फेच्या हिशेबास पेटी कुल समजाविसीस लिहिणार पाहिजे व पेठ रामापूर येथें माहाजन असावा लागतो. येणेकरून पेठांची अबादानी होईल. याकरितां राजश्री यादव सिवदेव रखमांगद हरित गोत्री शारदा अश्वलायनी याणी किले मारचे मु॥ हुजूर येऊन विनंती केली कीं आपण स्वामीचे यकनिष्ट सेवक. अपले वतन नाडगोंडीचे खानापूर व कापसी येथील आहे. येशास पेठा मारीची कुलकर्णे व महाजनकी येसी च्यार वतने आपणास पुत्रपौत्रादि नूतन वतन करून दिल्हिया वतना + + + शेरणी कबूल करू म्हणून विनंती केली. त्यावरून मनास आणिता पेठ मारी कुलकर्णी व महाजन पाहिजे. यामुळे पेठेचा हिशेब कितेब दुरुस होईल. माहाजन असलिया पेठेची अबादानी होईल. रा। यादव सिवदेव हे या राज्यातील पुरातन सेवक विश्वासु. याबद्दल तीनी पेटांची कुलकर्णे ३ तीन व माहाजनकी यक येसी च्यार वतने नूतन यास दिल्ही असेत. यास हक लवाजिमा येणेप्रो परभारे करार केले असे.

बी ता। ———

पेट सिवापूर येथील कुलकर्ण दिल्हे यास मोईन ———

| पालक | हक मोर्तबास यैन |
|---|---|
| १ दुकान | अकारास दर र- |
| १ घर | मियास खुर्दा सिव- |
| ३ बैल पाटाचे | राई रुके ॰६ |
| १ म्हैसी | |
| ६ | |

पेठ रामापूर येथील कुलकर्ण व व महाजनकी वतने २ यास

| पालक | विश्वा निमा चुवथ |
|---|---|
| २ दुकाने | सिरु दरबदल तुपास |
| १ कुलकर्णी | सिवराई रुके |
| १ महाजन | १ कुलकर्णी |
| २ | ॰॥. माहाजन |
| | ॰१॥ |

विश्वा पेठ मार फसगी दलगिसे
फसगी बा गिसे — पेंढारी
व निमा चऊथेस या कलम
रु. व दर बाद १
रु. यास
सिवराई रुका
८१

पेठ दौलतपूर येथील कुलकर्ण
दिल्हे यास ——————

पालक सिका मोर्तबास यैन
१ घर दस्तास दर रु. यास
१ दुकान सिवराई खुर्दा ८६
३ बैल पाटास
१ म्हैसी
—
६

विश्वा पेठ मार
निमा चुवथेस रु.
सदर बाद रु. यास
सिवराई रुका
१

२ घरे
१ कुलकर्ण
१ महाजान फसकी दल
— ——————
२

६ बैल पाटाचे
३ कुलकर्णी
३ माहाजन
—
६

१ कुलकर्णी
१ माहाजन
—
२

२ म्हैसी
१ कुलकर्णी
१ माहाजन
—
२
—
१२

सिका मोर्तबास यैन
अकारास कुलकर्णी
यास———
दर— यास सिवराई
रुके ८६
फसगी दलगिसे

————————

यकून वतने कुलकर्णे तीन व महाजनकी यक यकून च्यार वतने दिल्ही असेत. यास हक तीनी पेटानी रुके साडेतीन व———

पालक चवीस व व + + + फसगी दल गिवेस व थल मलके च्यार रास मोईन करून दिल्ही असे. अलाहिदा पेठानी पत्रे करून दिल्ही असेत. याचे माथा शेरणी देखील बाबती रु. २०० दोनसे रास ठेविले बी ता——

| | कुलकर्णीस रु. | | महाजनकी पेठ रामापूर रु. |
|---|---|---|---|
| | ७५ | पेठ सिवापूर | ५० |
| सिका | २५ | पेठ दौलतपूर | |
| | ५० | पेठ रामापूर | |
| | १५० | | |

येकून दोनसे रु. सदरहू वतना वाफीम सेरणी ठेविली असे. यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अजरामऱ्हामत नूतन वृति करून दिल्ही असे. तरी तुम्ही यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवीत जाणे. या पत्राची तालीक प्रति लिहून घेऊन असल पत्र कुलकर्णी व माहाजन माराजवळी भोगवटियास परतोन देणे. शेरणीचे उसुलाचा निर्वाह हुजूर घेऊन पावलियाची हुजत वतनदार मारास सादर होईल तेणेप्रा मजरा असे. जाणिजे. छ १ राखर. बहुत काय लिहिणे. मोर्तब अस.

---

**क्रमांक : २२३** **दि. २४-६-१७१०**

मौनी बाबांच्या मठास कर्यात पाटगाव येथे साठ रुपये इनाम होते. ते चालत नसल्याची तक्रार तुर्तगिरी गोसावी ह्यानी छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांच्याकडे केली असतां त्यानी मठास मौजे मट कर्यात पाटगाव हा गाव इमाम दिला.

## मौनी बावा

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ३७ विकृति नाम संवत्सरे आषाढ शुध नवमी मंदवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत कुडाळ यास आज्ञा केली ऐसीजे. तपोनिधि तुरुतगिरी गोसावी याणी प्रसिद्धगडचे मुकामी येऊन विनंती केली की श्री याचे समाधीस्थल मठ कसबे पाटगावी आहे. तेथे आतीत आभ्यागत येतात. त्यास अन्न द्यावे लागते व समाधी स्थली पूजा नैवेद नंदादीप उछाह चालवावा लागतो. यैशास माहाराजानी पूर्वी दोनी गाव दिल्हे आहेत. तेणेकरून सांग चालत नाही. या करीता राजश्री कैलासवासी स्वामी संनीध वर्तमान विदीत केले. ते समयी त्याणी मौजे मठ कर्यात पाटगाव या गावापैकी इनाम रुपये ६० साठी करून दिल्हा होता. परंतु सदरहू इनाम चालिला नाही. याकरिता माहाराजे सदरहू गाव श्रीच्या मठास इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून. त्यावरून मनास आणिता श्री हे बहूत थोर सत्पुरुष होते. त्याचे समाधि स्थली पुजा उत्छव नंदादीप नेवेद्य आनदान चालील्याने स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण आहे. पूर्वी तीर्थरूप कैलासवासी स्वामीने साठी रुपयाचा इनाम मौजे मजकूरपैकी दिल्हा होता. तो चालिला नाही. कैलासवासी स्वामीची सनद आणून दाखविली. या करिता हाली श्रीस नूतन इनाम[1] (कुलबाब इ. इ. "मौजे मट कर्यात पाटगाव" दिला असे.)

तेरीख ७, जमादिलावल सु।। ईहिदे अशर अलफ.

---

१. नेहमीचा मजकूर म्हणून संक्षिप्त घेतला आहे.

क्रमांक : २२४ दि. २८-६-१७१०

कर्यात मावळच्या देशमुख व देशपांडे ह्याना नारो शंकर सचीव ह्यांचे मौजे नांदेडच्या पाटीलकीबाबत पत्र. शिवाजी महाराजानी (थोरले कैलासवासी राजेश्री स्वामी) पाटिलकीची निम्मी तक्षीम बकाजी फर्जंद ह्यास शंभर होनास विकल्याचा उल्लेख ह्यांत आहे.

श्री

शिक्का

मसुरल आनाम देशमुख व देशकुळकर्णी तर्फ कर्यात मावळ प्रांत मावळ यांसी नारो शंकर सचीव. सुहुर सन इहिदे अशर मय्या अलफ. मौजे नांदेड तर्फ खडकवासले ता। मजकूर येथील पाटीलकी पहिले रानवडे यांची होती. त्याने सदाजी पोळ यास दिल्ही. निमे तकसीम नांव नांगराची विकत दिधली. निमे कीर्दीची राहिली. ते धुली यांस विकत दिल्ही. त्यावर सदोजी पोळ याची निमे तकसीम नांव नांगराची राजेश्री कैलासवासी यांणी विकत घेतली. ते निमे तकसीम थोरले कैलासवासी राजेश्री स्वामीनी कृपाळू होऊन बकाजी फर्जंद यासी शंभरा होनांस विकत देऊन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने खाणे म्हणून पत्र दिल्हे. तेणेंप्रमाणे बकाजी फर्जंद पाटीलकी खात आला. हल्लीं बकाजीचा पुत्र शंकराजी आहे त्यांणी आपले जवंदीने निमे तकसीम नांव नांगराची पिलाजी बिन चांगोजी जाधव यास विकत दिल्ही म्हणून वर्तमान शंकराजी बिन बकाजी फर्जंद याणे हुजूर येऊन विदित केले व राजेश्री थोरले कैलासवासी स्वामीचे खुर्दखत सीकीयाचे व गोताचा महजर त्यापाशीं होता तो त्याणें दाखविला. ते पूर्वील पत्रें मनास आणून मागातीं शंकराजी मजकुरास आरमा केली कीं हे वतन तुवां आपले संतोषें दिल्हे आहे कीं काय? त्यास शंकराजी मजकुराने सांगितले कीं आपण आपले संतोषपूर्वक दिल्हे आहे म्हणून

शफतपूर्वक बोलिला. त्यावरून पिलाजी बिन चांगोजी जाधव यास खरीदीच्या पत्राप्रमाणे वृत्तिपत्र करून देऊन शेरणीचा निर्वाह् करून घेऊन हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी मौजे मजकुरची निमे मोकदमीचा नांव नांगराचा महजर यास करून देणें. निमे तकसीमेस पान मान व हक लाजीमा पाळणूक पूर्वापार चालत आली असेल त्याप्रमाणे हक लाजीमा पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने भोगवटा अनुभवून पाटीलकीचा कारभार सुखरूप करीत जाणे. जाणिजे. छ ११ जमादिलावल. परवानगी हुजूर.[१]

मोर्तब
सुद

---

**क्रमांक : २२५** **दि. ४–८–१७१०**

**शामजी हरी नामजाद सुभा मावळ ह्यांचे पिलाजी जाधव ह्याना मौजे नांदेडची निम्मी पाटिलकी सुखरुप अनुभवावी म्हणून अभयपत्र.**

(नांदेड येथील ताम्रपत्राची नक्कल)

श्री
श्रीमत् स्वामी सेवेचे
ठायीं तत्पर शामजी
हरी निरंतर

---

१. ह्याच तारखेचे शामजी हरी नामजाद व कारकून सुभा प्रांत मावळ ह्याचे देशमुख व देशकुलकर्णी कर्यात मावळ ह्यांस पत्र की तुम्ही समस्त गोत मिळून पिलाजी जाधव ह्यांच्या निम्या मोकदमीचा महजर करून घेऊन सुभ्यास येणे.

प्रस्तुत सनदेच्या संदर्भात शामजी हरी हा दि. १२–७–१७१० रोजी मुरार नारायण हवालदार व कारकून ताा कर्यात मावळ ह्यास लिहितो की, सुभ्याची हरकी म्हणून पिलाजी जाधव ह्यांच्याकडून शंभर रुपये घेऊन मौजे नांदेडची निम्मी मोकदमी त्यांचे स्वाधीन केली आहे. तरी त्यांचे चालवणे.

कौलनामा आज सुभा राजेश्री शामजी हरी नामजाद सुभा मावळे ताहां पिलाजी बिन चांगोजी जाधव निमे मोकदम मौजे नांदेड तर्फ खडकवासलें ता कर्यात मावळ सुर सन इहिदे आशर मय्या आलफ. यादे कौलनामा ऐसाजे. शंकराजी बिन बकाजी फर्जंद याची मौजे मजकुरची मोकदमी नाव नांगराची होती. ते त्याने आपले स्वसंतोषें तुम्हास विकत देऊन खरीदीपत्र करून दिल्हे. त्याप्रमाणे राजेश्री पंत सचीव स्वामीनी हुजूर शेरणीचा निर्वाह करून घेऊन अभयपत्र तुम्हास करून दिल्हे[1] व सुभापत्र सादर केले की मौजे मजकुरचे निमे मोकदमी नांव नांगराचा महजर करुन देविणें. त्यावरुन तुम्हापासून सुभाची हरकी १०० येकशें माथीं ठेवून सुभीचे पत्र व गोताचा महजर करून दिल्हा असे. त्या प्रमाणें मौजे मजकुरची निमे मोकदमी नांव नांगराची पानमान हक लाजीमा व धार पुरातन चालत आली असेल त्याप्रमाणें आपले वंशपरंपरेने अनुभवून सुखरुप राहणे. दरीबाब कौल असे. रवाना छ १९, जमादिलाखर. मोर्तब शुद्ध.

मोर्तब
सुद

---

**क्रमांक : २२६** **दि. ४–८–१७१०**

पिलाजी चांगोजी जाधव ह्यांच्या मौजे नांदेडच्या निम्या मोकदमी संबंधी झालेला महजर.

श्री

महजर श्री शके १६३२ विकृतीनाम संवत्सरे श्रावण बहुल सप्तमी भृगुवार[2] सन इहिदे अशर मय्या अलफ. तेरीख १९ माहे

---

१. हे अभयपत्रही आहे. पण मजकूर तोच असल्यामुळे येथे घेतलेले नाही.
२. वाराप्रमाणे तारीख काढलेली आहे.

जमादिलाखर मुकाम मौजे नांदेड ता। कर्यात मावळ ब हुजूर हजीरमजालसीं व राजमुद्रा राजेश्री शामजी हरी सुभेदार प्र।। मावळ.

राजेश्री यादवराम मुजुमदार
सुभा प्र।। मावळ ब दस्तुर

श्री
नृसिंह स्वामी सेवेसी
निरंतर शामजी
हरी

राजश्री गोविद लिंगोजी
सभासद नामजाद दु माहाल
तर्फ कर्यात मावळ खेडेबारे

श्री
शिवचरणारविंद
गोविंद लिंगोजी

राजेश्री मुरार नारायण
हवलदार तर्फ मजकूर.

श्री रघुनाथ चरणी
दृढभाव मुरारसुत
निळकंठराव

नरहरी आबाजी मुजुमदार
दु माहाल तर्फ कर्यात मावळ
व खेडेबारे.

खंडोजी नाईक थोपटे
सरनाईक किल्ले
सिंहगड.

मालोजी नरसिंगराव व गोविंदराव शितोळे
देशमुख परगणे पुणे.

श्री
मालोजी नरसिंगराव
शितोळे देशमुख
परगणे पुणें

दिपाजी रवीराव पायगुडे
देशमुख तर्फ मजकूर.

श्री
दिपाजी रवीराव पायगुडे
देशमुख कर्यात मावळ
(निशाणी नांगर)

कान्होजी देवराव पायगुडे
देशमुख तर्फ मजकूर

जाखोजी सर्जाराव पायगुडे
देशमुख

शिवजी नाईक पायगुडे व
जोमाजी नाईक पायगुडे

खंडोजी बिन जैतजी
करजवणे भालेराव
देशमुख तर्फ मजकूर

श्री
खंडोजी बिन जैतजी
करजवणे देशमुख कर्यात
मावळ
(निशाणी नांगर)

रखमाजी बिन विसाजी
करजवणे अढळराव
देशमुख तर्फ मजकूर

श्री
रखमाजी करजवणे देशमुख
तर्फ कर्यात मावळ
(निशाणी नांगर)

नामाजी आरदेव व माहादजी आरदेव लांडे देशपांडिये तर्फ मजकूर व रामचंद्र यादव लांडे देशपांडिये तर्फ मजकूर.

राघो अनंत आत्रे कुलकर्णी मौजे पाडेश्वर तर्फ कडेपठार परगणे पुणे.

रायाजी नाईक इतबार हुक सरनाईक घेरा किले सिंहगड.

लांडे खासनीस दिमत देशमुख तर्फ मजकूर.

मालजी नाईक जगथाप देशमुख कर्यात सासवड.

जनाजी पायगुडे देशमुख.

मालजी बिन फिरंगोजी पाटील जगताप मोकदम कसबे सासवड.

बाकोजी नाईक पाटील झावरे.

पाटील पुणे मोकदम कसबे पुणे.

(निशाणी नांगर)

बि कलम नरसो त्रिमल आजहृत
कुलकर्णी पुणे. मालजी बिन
मिरजोजी पाटील मते मोकदम
मौजे खडकवासले तर्फ मजकूर.

(निशाणी नांगर)

बि कलम सिदो मोरदेव ठकार
जोशी कुळकर्णी मौजे मजकूर.

तुळाजी पाटील मोर सेट्या गते.
मौजे मजकूर.

(निशाणी तागडी)

सोनजी विसाजी माझेरे मोकदम
व खेवजी पाटील माझेरे मोकदम
मौजे भुगाव तर्फ मजकूर

गणाजी बिन लखमाजी बोऱ्हाटे
मोकदम मौजे कोथरुड
तर्फ मजकूर.

(निशाणी नांगर)

बागोजी मोकाते चौगुले
मौजे मजकूर मेजे.

महादजी पाटील बिन सूर्याजी
दागट मोकदम मौजे शिवणे
निमे पाटील.

(निशाणी नांगर)

बि कलम शंभुभट ठकार जोशी
कुलकर्णी मौजे मजकूर

(निशाणी नांगर)

माउजी बीबने चौगुले
कसबे पुणे.

आबाजी पाटील बिन नाईकजी
पाटील. धावडे मोकदम मौजे
कोंढ तर्फ मजकूर.
बिरादर बाकाजी धावडे

(निशाणी नांगर)

बि कलम शंभु भट ठकार जोशी
व कुलकर्णी मौजे मजकूर.

पदाजी पाटील बिन तान्होजी
पाटील. पोकळ मोकदम मौजे
धावेरो तर्फ मजकूर

(निशाणी नांगर)

बि कलम लक्ष्मण मोरदेव
कुलकर्णी ठकार.

शंकराजी बिन बकाजी फर्जंद
मोकदम मौजे खामगाव तर्फ
मजकूर

(निशाणी नांगर)

बि कलम महादजी कुलकर्णी
मौजे मजकूर.

गुणाजी बाळगुडा चौगुले
मौजे मजकूर.

जनाजी पाटील पायगुडे मोकदम
मौजे आहाळ कसबे मजकूर.

(निशाणी नांगर)

बि कलम शिवाजी महादेव कुलकर्णी
मौजे मजकूर

सोमाजी ठकार चौघुला. संभाजी बिन सुर्याजी पाटील दागट मोकदम मौजे वडगाव बुद्रुक तर्फ मजकूर. मकाजी कुदळे चौगुला. कुरणाजी बिन सिदोजी जाधव मोकदम मौजे किरकटवाडी तर्फ मजकूर. गुमास्ता रुपाजी रानवडा मौजे मजकूर

(निशाणी नांगर)

बि कलम शंभू भट ठकार जोशी कुळकर्णी मौजे मजकूर. गोदजी बिन चापाजी पाटील कोटुलकर मोकदम मौजे आंबेगाव बुद्रुक तर्फ मजकूर.

(निशाणी नांगर)

बि कलम शंभू भट ठकार जोशी कुळकर्णी मौजे मजकूर. यमाजी चौगुला चावट. नागोजी पाटील कामथे मोकदम मौजे कोढवें तर्फ मजकूर. बिरादर बाबाजी कामथा.

(निशाणी नांगर)

बि कलम बिनाजी बापुजी कुळकर्णी. भिकाजी पाटील खरीड मोकदम मौजे गोऱ्हे बुद्रक तर्फ मजकुर. बिरादर हंसाजी रिवरीड. (?)

(निशाणी नांगर)

दसजी बिन शीवजी पाटील घुले मोकदम मौजे उंडरी तर्फ मजकूर.

(निशाणी नांगर)

संताजी ताकदोहे चौगुले मौजे मजकूर. चाहुजी बिन येल्होजी पायगुडे मोकदम मौजे जेडो तर्फ मजकूर.

(निशाणी नांगर)

बि कलम महादजी आपदेव लांडे कुलकर्णी मौजे मजकूर. येत्नोजी बिन मालोजी पाटील रानवडे मोकदम मौजे नऱ्हे ताा मजकूर.

(निशाणी नांगर)

बि कलम शंभू भट ठकार जोशी कुलकर्णी मौजे मजकूर. संभाजी कुरा चौगुला. राबाजी बिन भिवजी चोथा निमे मोकदम मौजे भुगाव. बिरादर मालजी चोथा.

(निशाणी नांगर)

कुसणोजी लोणकर मोकदम मौजे कोढवे खुर्द तर्फ मजकूर . गुमास्ता बहीरजी लोणकर

(निशाणी नांगर)

तेजगावडा चौगुले. जानोजी बिन कावजी पाटील रावट मोकदम मौजे हिंगणे खुर्द तर्फ कर्यात मावळ निमे पाटीलकी

(निशाणी नांगर)

बि कलम शंभू भट जोशी कुलकर्णी मौजे मजकूर.

आबाजी बिन पयाजी बऱ्हाटे
मोकदम मौजे वारजे तर्फ मजकूर
बिरादर गोदजी बऱ्हाटा.
(निशाणी नांगर)

दिपाजी पाटील व कन्होजी पाटील
पायगुडे मोकदम मौजे कुडीजे
तर्फ मजकूर.
(निशाणी नांगर)

बि कलम माहादाजी आपादेव
लांडे कुळकर्णी मौजे मजकूर.
(निशाणी नांगर)

संताजी माजरा चौगुला.
संताजी पाटील बिन मोत्याजी
पाटील व रायाजी बिन भिकाजी
पाटील जवळकर मोकदम
मौजे खानापूर तर्फ मा.
(निशाणी नांगर)

सोयरो माणकेश्वर मौजे मजकूर
कुळकर्णी.

संताजी पवार चौगुला
मौजे मजकूर.

संभाजी सोतुळ चौगुला
मौजे बावथण खुर्द तर्फ मजकूर.

येजाजी पाटील वाळके मोकदम
मौजे दिघी प्रगणे पुणे.
(निशाणी नांगर)

खंडोजी चावट चौगुला मौजे मजकूर
गोदजी बिन तावजी बऱ्हाटे मौजे
हिंगणे बुद्रुक तर्फ मजकूर बिरादर
मावजी बऱ्हाटे.
(निशाणी नांगर)

नावजी फेगसा चौगुला मौजे मजकूर.

कान्होजी बिन जाखोजी पायगुडे
मौजे मांडवी बुद्रुक.
(निशाणी नांगर)

बाजी बिन संताजी पायगुडे देशमुख
मौजे कोपरें.

बाणाजी पायगुडे देशमुख
मौजे डोणजें.

चाहुजी बिन बावजी पाटील
वांजळे मोकदम मौजे आहिरे
तर्फ मजकूर.
(निशाणी नांगर)

जावजी चोरघा मोकदम मौजे
राहाटवडे तर्फ खेडेबारें.
(निशाणी नांगर)

संताजी पाटील बिन सोम पाटील.
राजगुरु मोकदम मौजे येरवडे
प्रांत पुणे.
(निशाणी नांगर)

तावजी पांगारा मोकदम मौजे वेळु
तर्फ खेडेबारें.
(निशाणी नांगर)

मुभाजी नाईक व बखाजी नाईक
जाचकटाणे नाईक परगणे पुणे.
(निशाणी काठी)

पानसरे तर्फ कर्यात मावळ.
इभ्रामखान वलदे येसवंतखान व
वलोखान. गुणाजी नाईक
जाचकटाणे नाईक कसबे पुणें.
(निशाणी काठी)

नवलाजी बिन संताजी तावरे
मोकदम मौजे पर्वती प्रांत पुणे.
(निशाणी नांगर)

बि कलम शंभू भट ठकार जोशी
कुलकर्णी मौजे मजकूर.

बखाजी नाईक नीवगणे देशमुख
मोसेखोरे.

संताजी बिन रामाजी पाटील
माणकर मोकदम मौजे सागरुण
तर्फ मोसेखोरे.

भिकाजी पाटील नलवडा
मौजे निगडे तर्फ मोसेखोरे.

जावजी पाळा पाटील मौजे
गावेसानापूर तर्फ मोसेखोरे.

संभाजी कोकाटे चौगुला मौजे
पासीणे तर्फ मजकूर.

गणोजी शाहाडा मोकदम
मौजे बदुदर तर्फ मजकूर.
(निशाणी नांगर)

बि कलम महादाजी आपदेव
लांडे कुलकर्णी मौजे मजकूर.
संताजी बसवा चौगुले तलवडी
मौजे मजकूर.

तुळाजी पाटील जोरी निमे पाटील
मौजे खेडें तर्फ मजकूर.
(निशाणी नांगर)

बि कलम महादाजी आपदेव लांडे
कुलकर्णी मौजे मजकूर.

श्री

या हुजूर जाहला महजर ऐसाजे. मौजे नांदेड कर्यात मावळ येथील निमे मोकदमी नांव नांगराची तकसीम शंकराजी बिन बकाजी फर्जंद याची होती. त्यानें स्वसंतोषें खुषरजाबंदीने पिलाजी बिन चांगोजी जाधव मौजै दिवे कर्यात सासवड यासी विकत दिली. त्याचें खरीदीखत करून दिले शके १६२८ व्ययनाम संवत्सरे आश्वीन शुद्ध विजयादशमी मंदवार सुरसन सबा मय्या अलफ तेरीख १० माहे रजबु. तेथे मजकुरची मीकदमी नांव नांगराची तकसीम आपले वतन आहे. आपणास मौजे मजकुरची लावणी होत नाही. नातवाणीमुळे कर्जदार जाहलो. या करिता खुष रजाबंदीनें स्वसंतोषें तुम्हास विकत दिली. निमे मोकदमी देखील नांव नांगर किमत होन पातशाही २०० दोनशें तुम्हापासून घेऊन आपले वतन खुषरजाबंदीने दिले असे. यासी जो कोणीही हिलाहरकत करील व आपला भाऊबंद मुजाहीम होईल तो आपण वारुन. या वतनाचा महजर व खुर्दखत राजेश्री थोरले कैलास-वासी स्वामी यांचे आपणा जवळी होते ते बजिनस तुम्हास दिले असे. श्रावण मासी सीवझडे मोकदम व देशमुख देशपांडिये कर्यात मजकूर जमा करून तुमच्या नावाचा महजर करून देऊन आपली आई रुपाई व आपण येकदिल होऊन खुषरजाबंदीने आपली तक्षीम हकलाजीमा काळी पांढरी घरठाव इनाम निमे मोकदमी दिली असे. लेकराचे लेकरीं खाऊन सुखरुप असणे. हे खरीदीपत्र. यावरून पुरंधरचे मुक्कामी राजेश्री पंत सचीव या सन्निध खरीदीपत्र व शंकराजी फर्जंद नेऊन जाला करीना जाहीर केला. त्याचा मजकूर मनास आणून राजेश्री पंत सचीव यांणी दुमाला पत्र करून दिले. त्याचा मजकूर जे पिलाजी बिन चांगोजी जाधव निमे मोकदम मौजे नांदेड कर्यात मावळ सुहूर सन इहिदे आशर मय्या अलफ दिले अभयपत्र ऐसाजे. शंकराजी बिन बकाजी फर्जंद याणे हुजूर येऊन विदित केले कीं मौजे मजकुरची पाटिलकी पूर्वी कदीम रानवडी याची होती त्याने सदोजी पोळ यास निमे नांव

नांगराची तक्षीम विकिली. निमे पाटिलकी राहिली. त्यावरी सदोजी षोळाची निमे तकसीम नांव नांगराची राजेश्री थोरले कैलासवासी स्वामी याणी विकत घेतली होती. ते तक्षीम शंभरा होनास आपले बाप बकाजी फर्जंद यास विकत दिली व गोताचा महजर व हुजुरचे खुर्दखत शिक्यानिशी दिले की सदरहु मोकदमी वंशपरंपरेने अनुभवणे म्हणून वृत्तिपत्रें दिलो आहेत. ती पत्रे आपणा जवळी आहेत. येसीयासी आपला प्रसंग बहुतच नातवानीचा जाला आहे. मौजे खांबगांव तर्फ मजकूर येथील मोकदमी आपली वतनी आहे. यामुळे आपणास दुतर्फा दिवानात टका पडतो. तो द्यावयासी ताकत नाही. कर्जदारानी अडविले. टक्का द्यावयास कोठे इलाज नाहीसा झाला. या करिता आपण मौजे मजकुरची निमे पाटीलकी नांव नांगराची तक्षीम आहे ते आपल्या स्वसंतोषे पिलाजी जाधव यास रुपये ६०० सहाशे घेऊन विकत दिली आहे. आपणापाशी ये वृत्तीचा महजर व राजश्री थोरले कैलासवासी स्वामीचे खुर्दखत शिक्यानिशी आहे ते मनास आणून निमे पाटिलकीचे दुमालेपत्र पिलाजीस करून द्यावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणून विदित केले. त्यावरून शंकराजी फर्जंद याजवळ राजश्री थोरले कैलासवासी स्वामींचे खुर्दखत शिक्यानिशी होते. सन अर्बा सबैनचे व गोताचा महजर सन खमस सबैन छ. ११ जमादिलावलाचा होता व तुम्हास शंकराजी फर्जंद याने खरीदीपत्र सन सब्बा मय्या अलफ व्ययनाम संवत्सरे आश्वीन शुद्ध दशमी शनिवार ते दिवशीं दिले होते ते मनास आणिले आणि शंकराजीस आज्ञा केली की तुर्वा हे वतन आपल्या स्वसंतोषे विकत दिले आहे की काय हे शपथपूर्वक सांगणे. त्यावरून त्यांणी शपथपूर्वक सांगितले की आपल्यावरी कसाला पडिला याकरिता हे वेतन स्वसंतोषे दिले. त्यावरून खरीदीपत्राप्रमाणे निमे मोकदमीचे माथा शेरणी रुपये ६०० ठेविली असे. याची उगावणी करून निमे पाटिलकीचे वतन पानमान व नांव नांगर घरटाणा व इनाम पाळणूक हक लाजीमा पूर्वापार चालिला असेल त्या प्रमाणें पुत्रपौत्रादि

वंशपरंपरेने भोगवटा अनुभवून गावीची कीर्दमामुरी करून निमे पाटिलकीचा कारभार करून सुखरुप राहणे. ऐसे दुमालेपत्र येविषयीचे देशमुख देशपांडिये तर्फ मजकूर यांसी पत्र व राजश्री शामजी हरी नामजाद सुभा प्रांत मावळे व राजश्री गोविंद लिंगोजी सभासद नामजाद तर्फ मजकूर यास पत्रें करून दिल्ही की ये वृत्तीचा महजर करुन देणे. त्यावरुन देशमुख व देशपांडिये व शिवझडे मोकदम व समाकुळ पांढरी मौजे मजकुरी मेळवून पूर्वील बकाजी फर्जंद याचा महजर मनास आणिला. तेथे मजकूर मौजे नांदेड कर्यात मजकूर येथील मोकदमीचा महजर जाला ऐसाजे. हिरोजी बिन बाजी रानवडा कदीम मोकदम मौजे मजकूर याच्याने कीर्द नव्हे म्हणोन गिरजोजी घुला याजपासून बैल २ दोन व म्हैस १ एक व गल्ला कैली सात मण घेऊन निमे मोकदमी गिरजोजी मजकुरास विकत दिल्ही. निमे आपणास ठेविली होती. त्याजवरी मगती हिरोजी मजकुरास खावयास नाही म्हणोन सदोजी पोळ यापासून होन पादशाही २० वीस घेऊन हिरोजी मजकुराने सदोजी पोळ यास निमे पाटिलकी नांव नांगराची तकसीम ठेविली होतो ते विकत दिल्ही. त्यावरी सदोजी पोळ याने काही दिवस या पाटिलकीचा कारभार केला. मग राजश्री थोरले कैलासवासी राजेसाहेब यांसी विसां होनास विकत दिल्ही. घुली याजवळ महजर आहेत. परंतु दोन नांगर मोडून सदोजी पोळ याने एकच नांगर आपले तर्फेस केला आहे. तेणेप्रमाणे नांव नांगर राजेश्री राजेसाहेबाकडे चालत होता. त्यावरी राजेश्री राजे साहेबीं बकाजी फर्जंद यापासून होन पातशाही १०० येकशे घेऊन मौजे मजकुरची मोकदमी आपली तकसीम बकाजी फर्जंद यास विकत दिल्ही, नाव नांगर येकच बकाजी फर्जंद याणेच करावा. पान मान बकाजीने आधी घ्यावा. मागे मोराजी व सोनजी घुले याणी घ्यावा. शेत व इनाम निमे बकाजी फर्जंद याकडे निमे घुली याकडे. बि तपसील.

इनाम टक ३६

| | |
|---|---|
| ३० | माहुपाटी कासरके पैकी शेताकडे टके बाकी |
| ६ | पासोडी नजीक वडजाई टके |
| ३६ | |

तपसील

| बकाजी फर्जंद | | घुले | |
|---|---|---|---|
| १५ | माहुपाटी | १५ | माहुपाटी |
| ३ | पासोडी | ३ | पासोडी |
| १८ | | १८ | |

शेती रकमी टके

९३ बकाजी फर्जंद

३० हनमत पाट्या
३ पैकी पाणदीचे तर्फेस १॥ येकूण.

६० वडपाट्या ५ दर टके २० येकूण १२० पैकी निमे पश्चिमेकडील पाट्या

३ येकूण
३ मळ्यास टके ६ पैकी पश्चिमेकडील निमे

९३

झाडी झाडोरा दान

३९॥ तकसीम दो ठाई
१॥ वाटून कलम

माहारानी झाडीफेडी व मोळीया दो ठाई करावे आणि रातवेसी व बकाजी फर्जंद याची राखावी
कलम १

मोकदमीचा वाडा घुली याकडे दोन तकसीम बकाजी फर्जंद याकडे होता. त्यास घुली याकडे दोन तकसीम करार केला. येक तकसीम बकाजीस दिल्ही. पांढरीमध्ये जेथे मानेल तेथे लांब हात ८० व रुंद हात ३२ जागा नेमून द्यावा
कलम १

गाव निसबतीने जे उत्पन्न होईल ते दो ठाई घ्यावे
कलम १

९३ घुले

३० हनमत पाटचा ३
पैकी १॥ येकूण टके
६० वडे पाटचा ६ पैकी
३ येकूण
९३
१८६

सदहुं प्रमाणे जाहला. हर दोजणी लेकराचे लेकरी या प्रमाणे वर्तावे. यास कोणी हीलाहरकत करील त्याणे पाचशे होन दिवणात गुन्हेगारी द्यावे. हा महजर व शिक्यानिशी थोरले कैलासवासी स्वामीचे खुर्दखत त्याचा मजकूर जे आजरतखाने राजेश्री शिवाजी राजे राजेसाहेब दामदौलतहु ता। बकाजी फर्जंद सुहुर सन अर्बा सबैन अलफ मौजे नांदेड तर्फ खडकवासले गेथील कदीम पाटीलकी रानवडी याची होती. त्याणे सदोजी पोळास निमे तकसीम नांव नांगराची विकिली. निमे तक्षीम कोर्दीची घुलीयास विकिली. त्यावरी सदोजी पोळापासून निमे नांव नांगराची तकसीम साहेबी पैके देऊन विकत घेतली होती ते हल्ली तुम्हास मेहेरबान होऊन शंभर होनास विकत दिल्ही. सदहुं निमे तक्षीमेचा हकलाजिमा व इनामावर जे उत्पन्न असेल ते खाऊन नांवनांगराचे व निमे पाटिलकीचा कारभार करीत जाणे. सदहुं निमे तक्षीम तुज दिल्ही असे. लेकराचे लेकरी औलाद अफलाद तुवां खाणे. अर्थाअर्थी कोणास संबंध नाही. साहेबी निमे तक्षीम तुज दिल्ही असे. निमे काळी व पांढरी असे. निमे तक्षीम तुझी तुज असे. सदहुं खुर्दखत व महजर व होली राजेश्री पंत स्वामीचे वृत्तिपत्र व देशमुख देशपांडोयांची पत्रे गोताने व समाकुल पांढरीने मनास आणून पिलाजी बिन चांगोजी जाधव यासी निमे मोकदमीचा महजर बकाजी फर्जंद यास करून दिला असे. पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने भोगवटा अनुभवून निमे मोकदमीचा कारभार करणे. यास जो कोणी हिला हरकत

करील तो दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा खोटा. महजर. सही. बंद सुमार १५ पंधरा. मोर्तब सुद.

मोर्तब
सुद

मौजे मजकूर

सुभाजी बिन हाजी सुतार
(निशाणी किंकरे)

मालोजी बिन व्यंकोजी परीट
(निशाणी मोगरी)

तुकोजी बिन कानमाळी मेहेतर मौजे मजकूर
(निशाणी खुरपे)

सखाजी बिन विठोजी सोनार पोतदार मौजे मजकूर
(निशाणी सांडस)

नाम राऊत बिन तुक राऊत मांग मौजे मजकूर
(निशाणी भाली)

शिव भट बिन महाद भट ठकार जोशी
(निशाणी पातडे)

दसजी बिन नागोजी लगड. संभाजी लगड व महादजी लगड मौजे मजकूर

ब॥ साबाजी बिन गोमाजी कुलकर्णी क्षीरसागर मौजे मजकूर

मल्हारजी बिन बकाजी कुंभार— मौजे मजकूर
(निशाणी थापटी)

महार आबनाक बिन कान्हनाक
(निशाणी विळा दोरी)

---

दि. २-१२-१७१० रोजी छत्रपती शाहू ह्यानी पिलाजी जाधव ह्याना सदहुं मोकदमीबद्दल दिलेले वृत्तीपत्रहि उपलब्ध आहे.

क्रमांक : २२७ इ. स. १७१०

पिलाजी जाधवांच्या मोकदमीची शेरणी व सरदेशमुखीचा वसूल असे ७५० रुपये पाठविले आहेत म्हणून पंताजी शिवदेव ह्यांचे पंत सचीव ह्याना पत्र.

श्री भार्गवराम

राजश्री पंत सचीव स्वामीचे सेवेशी

सेवक पंताजी शिवदेव साष्टांग नमस्कार विनंति. उपरी पूर्वी पिलाजी जाधवाचा पाटिलकीचा विचार मानाजी पवाराबरोबरी सेवेसी लिहिला आहे. त्यावरून वर्तमान विदित झालेच असेल. पिलाजी जाधवाचे पाटिलकीचे राजपत्र पाठविले आहे ते घेतले पाहिजे. राजश्री स्वामीस रुपये ७०० सातशे शेरणी कबूल केली आहे. सरदेशमुखी रुपये ७० सत्तर. येकूण सातशे सत्तर रुपये मानाजी जाधव पाठविला असे. त्याजबरोबरी पाठविले पाहिजेत. मानाजी जाधव यास पिलाजी जाधव याजकडून यास खर्चास रुपये १० सबब देविले पाहिजेत. सेवेसी विदित जाले पाहिजे. हे विज्ञापना.[१]

---

क्रमांक : २२८ दि. ३१-१२-१७१०

मुरारजी शिंदे ह्यांच्याकडून कृष्णाप्पा तिमा नाईक देसाई यानी "खस्ता मेहनत जीवाम्य स्वामी कार्यचि ठायी केली" म्हणून इनाम दिले.

श्री

मो अनाम कृष्णपा तिमा नाईक देसाई क॥ बनूर मामले तोरगल यासी मुरारजी शिंदे सु॥ ईहिदे अशर मया आलफ

---

१. सदहुं ७५० रुपये पंताजी पंत ह्यांच्या स्वारीस जमा झाले म्हणून नारो शंकर सचीव ह्यांचे पिलाजी जाधव ह्याना दि. ८-११-१७१० चेंहि पत्र आहे.

तुम्ही येक निष्टेने वर्तोन खस्ता मेहनत जिवाभ्य स्वामी कार्याचे ठायी केली याकरिता तुम्हावर मेहेरवान होऊन इनाम को मार पैकी पटी ४ अरा मार १६ सोळा गांवगना बी तपसील

| मौजे बिजकूपपटी | मौजे गुडकटे पटी | मौजे दोडवानी पैकी |
|---|---|---|
| १ | ·॥· | वजा |
| अरा मार | अरा मार | सेत आरा मार |
| ४ | २ | ८८८९ २ |
| मौजे उदपुडी सेतवजा | मौजे विडकी पटी | मौजे पंचगाव शिले वजा |
| ८८।· | ·॥· | ८८८९ |
| अरा मार | अरा मार | अरा मार |
| ४ | २ | २ |

येणे प्रो सोळा मार खाल सात पैकी इनाम मराह्मत केले असे. येक निष्टेने वर्तोन जल तरू पाषाणपर्यंत अनभऊन राहणे. जाणिजे. रा छ २१ जिलकाद मोर्तब असे.

---

**क्रमांक : २२९** इ. स. १७००–१७१०

एलिएनेशन ऑफिसमधील दप्तरातील काही उतारे :—

इ. स. १७००–०१

यादी हीसेब आकार कीर्द राजश्री पंत आमात्य सु॥ इहिदे मया अलफ

तेरीज खर्च

| | |
|---|---|
| १२५३ | स्वामी |
| १९६ | धर्मादाय |
| १००४ | किलेहाय |
| ५२२६६ | स्वारी अमात्य |
| ६३६२ | सुभे लस्कर |
| ३०९३१ | महाल मजकूर |
| १३२३ | मुजाफती |
| ५८ | बयाज नाही |

---

इ. स. १७०५-०६

ताराबाईच्या वेळची महालांची वाटणी :

सू॥ सीत

| | |
|---|---|
| १४ | मातुसेरी |
| ८ | नेमाजो सिंदे |
| ३ | हैबतराव निंबाळकर |
| १२ | हंबीरराव मोहिते सरलष्कर |
| ३४ | परसोजी भोसले |
| २ | बळवंतराव देवकाते |
| १० | सभाजी (?) आणी राऊ (?) |
| ३ | अंताजी पांढरे |
| ३ | आटोळे |
| ८९ | |
| १३ | मोघम |
| १०२ | |

दि. १७-६-१७०८

जाबीतादा कर्ज ह॥ बाजी बाभाडा व संताजी बाभाडा व येसजी सकपाळ व अपाजी रामकृष्ण रा॥ कसबा कोट कोलापूर सु॥ तिसा मया अलफ. छ ९ रबिलाकर

| नक्त | खुर्दा टक्के |
|---|---|
| ७।– | ·॥· |

---

दि. १७-६-१७०८

$\frac{1}{4}$ऽ

जाबीता बाजी बाभाडा व सताजी बाभाडा व येसजी सकपाल व अपाजी रामकृष्ण मो॥ कसबे कोट कोलाहापूर सु॥ तिसा मया आलफ. छ ९ रा॥खर

ता॥

| | |
|---|---|
| ५ घोडी | २० मेंढरे |
| ७ बायका | २७ गुरे |
| १३ कुणबिणी | ............ |
| मुले | ............ |
| | १ मुली बाम्हणाची |
| ३ साणा | |
| २ विदेचे | |
| १ कुरद | |

---

या पैकी एकच बंद आहे. बाकीचे गहाळ दिसतात. त्या एका बंदातील हेहि क टिपण आहे.

इ. स. १७०९–१०

हिसेब निलकंठ बलाळ सु॥ सन अशर मया अलफ

रु॥

१०३२४। बाकी साल गु॥ ब॥ हिसेब
४०००० साल मजकूर दरमाहे ३३०० दरमाहे तह
६२२५ खासगी

३२२५ राजापूर सुभा देहे १२
३००० सुभा दाभोळ ता॥ वल्हे देह १५
६२२५

५६५४९।

ई॥ अवल साल ता॥ जिल्हेज
रु॥ २०४२९॥≡

ता॥ रसद जामदारखाना वराता...
३६५१ श्वारी जागवत व लाटेशर
व्याघ्रगड महिपतगड पै॥

२०४२९॥≡

..................................................................................

..................................................................................

......... तहापैकी
......... रायभानजी बावा
श्वारी याकूल

वराता रुपये

| | |
|---|---|
| २४५ | रायेभानजी बावाचा दरमाहे मजुरा परभरा स्वारीमुळे खर्च |
| २०५ | स्वारी भगवंत व कचेश |
| १४०० | व्याघ्रगड व महिपतगड मु॥ ३ माहे १९ रोज दरमाहे विद्यमान रा। खंडो बल्लाळ ३५० |
| २०० | सुंदरगड गुणवंतगड दरमाहे ५० |

बाकी खेरीज प्रतिनिधीकडील सरदारी खर्च व बलाडा हुजरात खर्च आलाहिदा येणे असे.

निकी बेरीज
३६११९॥-

---

**क्रमांक : २३०** **इ. स. १७१०(?)**

पिलाजी जाधव ह्याना सरदेशमुख, देशपांडे, महाजन इत्यादि प्रांत पुणे येथील लोकानी सुतार, महार, गुरव, परीट इत्यादि बलुत्यांच्या हक्कासंबंधी सादर केलेले निवेदन.

राजश्री पिलाजी जाधवराव यांसी

श्री श्रीमंत सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य निराधारी यांस आधार राजमान्यया विराजित

मोकदम मौजे नांदेड ता। कर्यात मावळ व मौजे वाघोली प्रांत पुणे सरकार जुन्नर श्नै॥ सरदेशमुख व देशपांडे व महाजन व चौधरी व मोकदम समस्त पैठण प्रांत मजकुर आशिर्वाद अनुक्रमे विनंती उपरी. स्वामीचे पत्र आले ते पावले. लिहिले वर्तमान विदित जाहले. लिहिले जे आपला प्रांत बहुत दिवस उध्वस्त होता. सख्यामुळे मुलखांची

वसाहत जाहली. गांव तमाम आबाद जाले. बाराही बलुते गावावर आले. त्यास हक्कामुळे मनमाने तैसे आपलाले सर्व जे हक्क मागतात. तर या निर्वाह करुन लिहिणे म्हणून लिहिले. त्यावरुन आपण समस्त मिळून चाली विचारुन जे परंपरागत चालत आले आहे ते लिहिले आहे. त्यास गोसावी सर्वजण बलुते वगैरे सर्वास वर्तवणे. विशेष काय लिहिणे. कृपा निरंतर असो दिजे. आपण आज्ञांकित असू. हे विनंती.

### लग्नासंबंधी हक्क

सुताराने लग्नात काय आणावे व त्यास काय द्यावे म्हणून लिहिले.

सुताराने नवऱ्यास चौरंग बसण्यास आणावा. त्या चौरंगावर शेला घालून नवऱ्याने पुजा करावी. पुजा झाल्यावर चौरंग नवऱ्याचा व शेला सुताराचा. या शिवाय गुगुळ.

माहारास हक्क काय द्यावा म्हणून लिहिले.

नवरा बाहेरुन येईल त्यास वेशीवर शेला माहारास द्यावा व सरपण फाटे वगैरे चाकरी झाडवणाची त्यास चार दिवस जेवणे व लुगडे चोळी झाडवणास द्यावी.

वऱ्हाडामध्ये परटाचा हक्क काय तो लिहिणे म्हणून लिहिले.

नवरा येईल त्यास परटिणीने कांकणी चढविणे व वऱ्हाडणीस पायघड्या घालाव्या न्याव्या. त्यास वाटेस पायघड्यावर ओवाळणी येईल ती परटिणीची. पाचवे दिवशी लुगडे चोळी चार दिवस जेवण व गुगुळदाम हक्क ८४

कोळी यास हक्क काय द्यावा म्हणून लिहिले.

कोळी याने चार दिवस दोन्ही मांडवात पाणी भरावे. चार दिवस जेवण व शेला.

कुंभारास हक्क काय द्यावा म्हणून लिहिले.

कुंभाराने बोहल्याची वही सिद्ध करावी त्यास हक्क द्यावा. वहीची

गुरवास हक्क काय द्यावा म्हणून लिहिले.

गुरवास हक्क

| | |
|---|---|
| १ | हणवंतावर शेला |
| ०४ | गुगुळदाम |
| १ | ओवाळणी गुरवाची त्यासी |
| १ | पहिली एक ओवाळणी माळणीची बाशिंगे आणील त्यास द्यावी. बाकी अवघी गुरवाची |
| ३०४ | |

याशिवाय दोही मांडवी पान–पत्रावळी आणाव्या. चार दिवस जेवण.

मांगाचा हक्क काय म्हणून लिहिले तर मांगाने केरसुण्या वऱ्हाडात पुरवाव्या. डफडे वाजवावे. त्यास जेवण शेला.

चांभारास हक्क काय द्यावा म्हणून लिहिले.

चांभारास लग्नात हक्क नाही. नवऱ्याची पिवळी पांघुरणे.

०४ गुगुळदाम

१ नवऱ्याचे हातचे नारळ वर्षाचे परंतु शकुनाचे म्हणून ठेवितात. वर्षास काही किमत देतात.

मडकी अर्धी नवऱ्याने घेणे. अर्धी नवरीने घेणे. पैकाही निमे नवऱ्याकडून निमे नवरीकडून घेणे व कळसवणी ०४ एक पैसा कुंभारास द्यावा व २०४ एकूण दोन टक्के शाही व एक पैसा.

तेली यास हक्क काय द्यावा म्हणून लिहिले.

तेली याने नवऱ्यास बाहेर गाडा सामोरा न्यावा. त्यावर शेला घालावा.

लोहारास लग्नात हक्क नाही.

लग्नात लाडू कोणास द्यावे म्हणून लिहिले.

१ मोकदम लाडू
१ जोशी लाडू ब्राम्हणाचे घरी उपाध्या नसता जोशी अगर उपाध्या आहे तर उपाध्य घेईल.
१ ब्राम्हणावेगळ त्याचे ग्रामउपाधीक जोशी याचे येथील लाडूतील जोशी याचा (?)

उपाध्ये व ग्रामजोशी भांडतात. जोशी म्हणतात जे अष्टाधिकार आपले तर ज्याचे घरी उपाध्ये आहेत त्याणी काय द्यावे आणि जोशो याणी काय घ्यावे. याचा निबंध करून लिहिणे म्हणून लिहिले.

तर ज्या गावी ब्राम्हणाची घरे आहेत त्याचा कुलगुरु व ज्योतिषीही आहेत तर उपाधिक ब्राम्हणाचे घरी...........

१ गणेश जोशी याचा   १ लग्नपत्रिका जोशी याची

१ घटका जोशी याची ब्राम्हणाचे घरी जोशी याने कुलगुरू असता येणेप्रमाणे जोशी याही घेणे. ज्या ब्राम्हणाचे उपाध्ये कुलगुरु हजर नाहीत त्याचे उपाधीक ज्योतिष्याने घेणे. परंतु अष्टाधिकारी असता ब्राम्हण विरहित दुजे आहेत त्यांचे उपाधिक ग्रामजोशी याचे असे.

बुरूड व चांभार भांडतात जें बुरडाचे पायतण चांभार सांधीत नाही. चांभाराची सुपे पाटी बुरूड सांधीत नाही म्हणून लिहिले.

बुरूडाचे पायतण चांभाराने सांधू नये. चांभाराची सुपे पाटी बुरूडाने सांधू नये. येणे प्रमाणे चालवावे.

हुताशनीची पूजा होते त्यास गावातील नैवेद्य येतात. ते नैवेद्य कोणी घ्यावे म्हणून लिहिले.

तर होळीचा नैवेद्य जो येईल तो माहाराने घेणे. आणिकांस अधिकार नाही.

माणूस मरते त्याचे अकरावे दिवशी जलकुंभ भरून ठेवितात त्याचा नैवेद्य विडा माहार म्हणतात आपला. त्याचा निर्वाह करू(न) लिहिणे म्हणून लिहिले.

तर अकरावे दिवशी जलकुंभ भरून ठेवितील त्यास विडा दक्षिणा नैवेद्य कुंभारानें घेणे. महाराचा संबंध नाही.

न्हावी मरतो त्यास वेशीवाटे नेऊ देत नाहीत. ऐसा देश दंडला आहे याचा धर्म काय म्हणून.

न्हावी वेशीवाटे न्यावा. इतरमार्गे न न्यावा.

महार मांग भांडतात जे गुरु मरते त्यास मांग म्हणतो अकरा डागिने आपले. माहार म्हणतो नाही म्हणोन लिहिले.

तर मांग माहाराची झाडीवण गुरू मरते त्यास माहार देतील ते घ्यावे आणि गुराचा सावा मांगाचा. येणे प्रमाणे वर्तावे.

सुतार पूर्वी कुणबी याचे घरी जेवीत होते. हल्ली जेवीत नाहीत. उलफे मागतात. तर त्याचे उत्तर.

सुतार जेवील तर जेऊ घालावा. सणवई घेईल तर द्यावी न जेवील सणवई न घेईल तर त्यास उलफ न द्यावा.

गुरव माळी भांडतात जे फुले पत्री कोणी वहावी हे लिहिणे म्हणून लिहिले.

तर माळी याने फुले आणावी गुरवाने देवास वहावी. अगर लग्नासंबंधी व्यवहार बाशिंगे व फुले लग्नास लागतील ती माळी याने द्यावी. त्याचा हक्क माळी यानेच घ्यावा. गुरवाचा संबंध नाही.

सोनार ब्राम्हणाचे घरी जेवीत नाहीत. ब्राम्हण सर्वात श्रेष्ठ. जेवीत नाहीत हे काय.

ब्राम्हणाचे घरी सोनार जेवीत नाहीत हा अन्याय करितात.

वाणी व कासार व पंचाल मिरवणूक वऱ्हाडाची या निमित्य भांडतात त्याचा निर्वाह लिहिले.

ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र या व्यतिरिक्त कासार वगैरे याहीं आपापले हद्दीत नवरा मिरवावा. बाजारात मिरवायासी गरज नाही.

सदरहु प्रमाणे लग्नाचे हक्क बलुत्याचे लिहिले आहेत. कोणा बलुत्याची काय जिन्नस आली याची लागलागवड पाहून त्यास द्यावे. अवघे सारखे नाहीत अथवा गृहस्थाचे घरी लग्न आहे अवघे बलुते

घेतील परंतु गृहस्थाने ही आपली शक्ति पाहून द्यावे व बलुत्यानी शक्ति पाहून घ्यावे. देणे घेणे अवघे वैभवानुसार आहे. विदित व्हावे. हे विनंति. बि कलम.

---

**क्रमांक : २३१** **दि. ३–१–१७११**

गोव्याच्या व्हाइसरॉयने दि. ३–१–१७११ रोजी आपल्या राजास जे पत्र पाठविले त्यात गोव्याच्या हद्दीवर मराठ्यांच्या राणीचे सैन्य मोठ्या प्रमाणात गोळा झाले आहे असे म्हटले आहे. त्या पत्रातील मराठ्यांच्या सैन्यासंबंधीचा उतारा खाली दिला आहे.

महाराज

गेल्या डिसेंबर महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात मला कोंगो येथील वखार प्रमुखांचे पत्र आले. त्याची प्रत त्यानी आपणाकडे पाठविली आहे. त्या पत्रात त्यानी कोंगोच्या बंदरात ज्या घटना घडल्या त्याचा तपशील दिला आहे.................................................
..........................................कोंगोला आरमार पाठविता आले नाही त्याचे कारण हे की, इकडे माणसांची व सामानाची टंचाई आहे. तसेच मराठ्यांच्या[1] राणीचे सैन्य आमच्या हद्दीवर फार मोठ्या प्रमाणात गोळा झाले असल्याने आमच्या हद्दीवर मला राज्याच्या रक्षणासाठी सैन्य ठेवणे भाग पडले. मराठ्यांच्या राणीच्या सैन्याबद्दल मी महाराजाना गेल्या वर्षीच्या बारा डिसेंबरला

---

१. मूळ पत्रात Rainha do Sivaji असा उल्लेख आहे.

लिहिलेच आहे. खेम सावंत व राणी ह्यांच्यामध्ये तह झाला की, मी कोंगोला आरमार पाठविण्याचा प्रयत्न करीन..............................................................................................

गोवा, ३ जानेवारी १७११

व्हाइसरॉय

---

**क्रमांक : २३२** **दि. २१-१-१७११**

छत्रपती शाहू ह्यानी निवाडा करून कसबा प्रभावळीचे कुलकर्ण शिवाजी मायदेव, संभाजी राम, गणाजी भास्कर व चिमणाजी बल्लाळ ह्यांना या वतन-पत्राद्वारे दिले.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिशेक षके ३७ विक्रुतीनाम संवत्छर माघ शुध त्रयोदसी भानुवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी---

शिवाजी मायदेऊ व संभाजी राम व गुणाजी भास्कर व चिमणाजी बलाळ सेणवी कुलकर्णी कसबा प्रभावळी सुभा प्रांत राजापूर यासी दिल्हे वतनपत्र यैसाजे. तुम्हा चौघापैकी संभाजी राम सेणवी किले सातारचे मुकामी हुजूर येऊन विनंती केली जे कसबे माारचे कुलकर्ण पुरातन आपले. कारकिर्दी आदिलशाईपासून व माहाराज राजश्री कैलासवासी स्वामीस तळ कोकण अर्जानी जाहालेवर राजश्री राऊजी सोमनाथ व त्रिबक टुकदेव व तुकोराम प्रांत मजकुरास सुभेदार होते. त्याचे कारकिर्दीस आपले वडिलापासून कसबा मजकुरचे कुलकर्ण चालवीत असता राजश्री तुकाराम सुभेदार रयतेच्या दारसुधी

घ्यावयास कसबे मजकुरी आले. तेव्हा आपले चुलते भान सेणवी कुलकर्ण करीत होते त्याकडे दारसुधीमुळे उच्यापत टका पैका निघाला त्याचा तगादा लागला. त्याचे तरतुदीबदेल भान सेणवी मजकूर पैके मळवावयास हरयेक जागा गेला. वरकड भाऊबंद रोजगार प्रसंगे जागा जागा होते. त्यावर रायाजी नरसिव्ह देशकुलकर्णी मामले मजकूर याणे राजश्री तुकोराम सुभेदार याकडे मालुमात करून आपला भाऊ केसो नरसिव्ह कसबे मजकुरच्या कुलकर्णी याच्या लिहिणेयास ठेविला. त्यावर भान सेणवी याणे पैकियाची फारी समई करून गाव कुलकर्ण चालवावयास आला. त्यास देशकुलकर्ण मजकूर याणे लागू दिल्हे नाही. याबद्दल आपण हुजूर रायगडास जाऊन हयाळ होऊन सरकारकुनाचे पत्रप्रा मजकुराचे सुभेदारास आणिले जे सेणवी याचे कुलकर्ण सेणवी यास देणे व मागे भान सेणवी व सिव सेणवी हे सुभेदार माारनिलेपासी फिर्याद जाहाले. त्यास विठल नारायेण पोतदार किले विशाळगड यास चुन्याचे भटीचा हवाला होतो. त्याकडे मनसुफी लाऊन दिल्ही. त्याणे हमशाई वतनदार व ग्रामस्त कसबेच मिळऊन गोई साक्ष पाहोऊन आमचे कुलकर्ण असे खरे करून म्हाजर करून दिल्हा. तो माजर व आपण सरकारकुनाचे पत्र आणिले होते ते मौजे कौसुंबे ताा देवरूख हा गाव भान सेणवी यास खोती होता तेथे त्याजवळी पत्रे असता मौजे माारी दारसुदीबदल वाजपुसीस राजश्री दताजी रंगनाथ मजमदार सुभे मजकूर व यादो कोनेर तफासनिविस आले तेही मौजे मजकुरचे कागद कैद केले. त्यासमागम रायाजी नरसिव्ह देशकुलकर्णी होता. त्याण तो माजर व सरकारकुनाचे पत्र होते ते गफलतीस घातले आणि हिमायेतीचे बळे देशकुलकर्णी मजकूर कसबे मजकुरचे कुलकर्ण करू लागले. त्याउपरी कसबा खराब जाहाला. भान सेणवीया वगळी रयत गावात न येत. याबदल राजश्री आणाजी पंती भान सेणवी यास बोलाऊन आणून कसबचे लावणीविसी आज्ञा केली. ते समई भान सेणवी याणी आपले कुलकर्णाविसी अर्ज केला. त्यास यादो आपाजी

सबनीस किले विशाळगड हे देशकुलकर्णी याचे साहिरे तेही राजश्री आणाजी पंतास सांगोन कुलकर्ण देऊ दिल्हे नाही. भान सेणवी यास कसबेचा हुदा देऊन आबादानी कर्णे म्हणोन आज्ञा केली. पुढे स्वारीहून येऊन तुजे कुलकर्ण तुज देऊ यैसे बोलोन स्वारीस निघोन गेले. त्यापासून हिमायतोचे बळे देशकुलकर्णी मजकूर कसबा मजकुरचे कुलकर्ण चालवितात. त्या आलीकडे आपला भाऊ गुणाजी भास्कर याणे राजश्रो परशराम पंडित प्रतिनिधो यासी विनंतो केली जे आपले कुलकर्ण हिमाइतीचे बळे देशकुलकर्णी खातात ते आपले आपणास दिल्हे पाहिजे म्हणोन सांगितले. वर पंत माारनिले येही राजश्री कृष्णाजी परशराम यास पत्र दिल्हे जे उभयेतास आणून मनसुबी मनास आणून जो खरा होईल त्यास कुलकर्ण देणे. ते पत्र घेऊन सारंगडचे मुकामी राजश्री कृष्णाजो परशराम याजकडे आलो. त्यास रायाजी नरसिव्ह मृत्या पावला म्हणोन ·· ··············त्याचा चुलतबंधू कासी साबाजो यास तल्ब करून सारंगडास आणिला. तेथे राजश्री नानाजी दताजी सुभे माारचा कारभार करीत होते. तही दोघाचा करीणा गोही साक्षानिसी मनास आणून हरदूजणाचा निवाडा करून म्हणऊन दोघास जंजीर रत्नागिरीस मनसुबीबदल आणिले. तेथे हमशाही वतनदार मिळून व सड्यापत्रे आणून मनसुबी करून आमच कुलकर्ण यैसे खर करून बोलिले जे सारंगडी जाऊन राजश्री कृष्णाजी परशराम यास करीणा विदित करून सनद करून देऊन म्हणऊन सांगोन आपणास वस्त्रे देऊन निरोप दिल्हा. त्याउपरी राजश्री नानाजी दताजी सारंगडास आले. आपणही तेथे हजर जाहलो. कासी साबाजी देशकुलकर्णी यास मशारनिलनी तल्ब करून आणिला. ते समई कोकणात मनसुबी जाहाली. त्याचा मोज्ञा देशात उभयेतास मनसुबीस पाठवावे तेथून निवाडा होऊन थेईल त्याप्रमाणे सनद देऊन याप्रसंगी तुम्ही आपआपले धंदेस जाणे म्हणोन आज्ञा दिल्ही. त्यावरून आपण आपले स्थानास आलो. मागा कासी साबाजी याणी आपले तालुकातीचे लोकाकरवी मालुमात करून रुपये अडीचशेहे दिवाणात देऊन कुलकर्णाचे पत्र पंडित माारनिलेपासून

करून घेतले. हे वर्तमान आपल्यास कळलेनंतर आपण व आपल बंधू त्रिमणाजी बलाळ यैसे पंडित मा।रनिलेजवळ येऊन विनंती केली जे आम्हास परस्थळ द्यावे. यैसे करून निरोप दिल्हा आणि मागे मालुमतीच्या गोष्टीवरून आम्हा आपरोक्ष देशकुलकर्णी यास आमच्या कुलकर्णाचे पत्रे करून दिल्हे. येणेकरून आम्हावर जुलुम जाहाला म्हणऊन हयाल जाहालो. त्यावरी पंडित मा।रनुलेस सविस्तर मनसुबी आदि आत वर्तमान व सडीचे पत्रे पाहून राजश्री गणोबा नाईक सरदेसाई मामले मजकूर व हजर मज्यालसीचे मते आमचे कुलकर्ण यैसे खरे करून देशकुलकर्णी यास मालुमातीवरून पत्र करून दिल्हे होते ते रद आसे म्हणोन लिहून वतनपत्र आम्हास करून दिल्हे. आणी आम्हापासी हरकी रुो ३५० साडेतीनसेहे ..........'यावर आपण कसबा मजकुरी कुलकर्ण चालवावयास गेलो ते समई कसबे मजकुरी मोंगलाची गडी होती तेथे देशकुलकर्णी याणी हरकत करून आपणास या राज्यातील चाकर म्हणऊन निसबत लाऊन गडीत घातले. कुलकर्णास लागू दिल्हे नाही. त्यावरी पादशा मृत्य पावले. त्याप्रसंगी युक्ति प्रयुक्तीने गडीतून निघोन आलो. त्यावरी माहाराज स्वदेशास आले. आणि राजश्री निळकंठ परभू यास तळ कोकणची मु(ख)त्यारी देऊन विशाळगडास पाठविले. त्याजवळ आपण उभे राहून सविस्तर वर्तमान विदित केले. त्याही कासी साबाजी याचा भाऊ आबाजी साबाजी व त्याचा पुत्र म्हादाजी आबाजी व मोरो त्रिमल व दताजी माहादेऊ देशकुलकर्णी यास बोलाऊन आणून उभयेताच्या तकरारा व मागील राजश्री कृष्णाजी परशराम पंडित याची पत्रे व सडया मनास आणऊन कसबा मजकुरचे ग्रामस्त व हमशाई म्हालूमालीचे देशमुख व देशकुलकर्णी किले मजकुरी बोलाऊन आणून राजश्री गणोबा नाईक सरदेसाई मामले मजकूर व सोमा नाईक सरदेसाई किले विशाळगडी हजीर मज्यालसीवर क्रिया शफत घालून मनसुबी करविली. तेप्रसंगी समस्तीचे मते

कुलकर्ण आमचे कारकीर्द आदलशाईपासून माहाराजांच्या राज्यात कालकीर्द राहूजी सोमनाथ व त्रिबक टुकदेऊ व तुकोराम सुभेदार पावेतो आमचे वडील व आम्ही पिडी दरपिडीस वतन आनभऊन कुलकर्णाचे हक व खुटदर खात आलो यैसे खरे जाहाले. देशकुलंकर्णी हे तुकोराम याचे कारकीर्दीपासून दखल जाहाले. त्यापूर्वी भोगवटा देशकुलर्णी याचा सडी साक्षीत आढळला नाही म्हणऊन त्यास आज्ञा केली जे पूर्व भोगवटा आसला तरी दिव्य करणे. दिव्य उतरलेवर कुलकर्णास खरे व्हाल म्हणऊन आज्ञा केली. त्यावर देशकुलकर्णी याणी गणोबा नाईक सरदेसाई व समस्ताचे विद्यामाने माारनिलेजवळ आर्ज केला जे आपणास पूर्व भोगवटा दखल नाही. दिव्य करावे तरी आपण देशकुलकर्णी थोर वतनदार. दिव्य लागलियाणे उजगार होऊन वतनापासून दूर होऊन. याकरिता दिव्य करात नाही. आपणापासून राजश्री कृष्णाजी परशराम याणी रुो अडीचशेहे घेतले आहेत ते सेणवी मजकुरापासून देवणे. आपण संतोष राजीपणे आपले पत्र लिहोन देतो. आपणास कसबा मजकुरच्या कुलकर्णास समंध नाही. कुलकर्णी सेणवी याणी भोगवठा करावा म्हणऊन आर्ज केला. त्यावरून आपणास आज्ञा करू (न ?) आडीचसेहे रुो देशकुलकर्णी यास आपणापासून देविवले आणि देशकुलकर्णी आपणास पत्र लिा दिल्हे जे तुमचे कुळकर्ण पुरातन तुम्ही सुखरूप आणभवणे. आपणास व आपले वौंशपरंपरेने समंध नाही. वेव्हार लागला तरी गोहतेचे पातक. राजश्री परशराम पंडित याचे पत्र राजश्री कृष्णाजी परशराम पंडित याणी दिल्हे होते तेव्हा आसे फाडून टाकून आणून पत्र व राजीनामा लिा दिल्हा. त्यावर रो निळकंठ बलाळ परभू व दिवाण लोक हुजीर मज्यालसी व समस्त हुमशाई वतनदार व गणोबा नाईक सरदेसाई याही आम्हास समस्ताचे सिके निशाणीसि महजर करून दिल्हा आणि दिवाणात हरकी रुो ५०० पाचशे आम्हापासून घेऊन वतनपत्र करून दिल्हे. कसबा मजकूरचे कुलकर्ण आमचे आम्ही चालऊ लागलो. त्यावरी

कासी साबाजी व आबाजी साबाजीचा पुत्र म्हादाजी आबाजी देशकुलकर्णी हुजूर येऊन कसबा निहा (?) प्रांत वई येथील मुकामी जोहारास उभे राहिले. ते समई राजश्री निळकंठ बलाळ स्वामीच्या दरशनास आले होते. त्या समागमे आपण आलो. त्यास आपल व देशकुलकर्णी याचे वर्तमान मनास आणून मनसुबी मनास आणावयास राजश्री सखो विठल न्यायाधिसी यासी आज्ञा केली. त्याही ढोमेचे मु।। निर्वाहा केला जे परस्थळ बुध येथे स्थळ नेमून दिल्हे आणि रामनवमीकारणे उभयेतास घरास जावयास निरोप दिल्हा. निर्वाहा कळोन उभयेता मिळोन बुधास जावे असा निर्वाहा करून घरास रामनवमीस गेलो. रामनवमी संपादून देशकुलकर्णी यासी पत्र पाठविले की तुम्ही बुधास जावयास येणे. त्याचे उत्तर देशकुलकर्णी याणे लिहिले की आपणास सुतक आले आहे ते वारलेवरी येतो. त्यावरून आम्ही वाट पहात राहिलो तो आपणास न कळता देशकुलकर्णी बुधास जाऊन बुधकरी याचे पत्र स्वामीस आणिले जे आपण स्थली हाजीर जाहालो. सेणवी हाजीर जाले नाहीत. त्यावरून रा। न्यायाधिश याणी हुजुर दखल करून आपणास तल्ब केली. त्यावरी सेवेसी हाजीर जाहला. याउपरी स्वामीनी कृपाळू होऊन सदरहू करीणा व कागदपत्र अद्यांत मनास आणून आपले कुलकर्ण आपणास आजरामरामत केले पाहिजे म्हणून विनंती केली. त्यावरून सदरहू मनसुबी याचे कागदपत्र सडचा निवाडपत्रे मनास आणून मागती राजश्री यादव गोपाळ मुतालीक दिा प्रतिनिधी यास विशाळगड प्रांते रवाना केले ते समई हरदूजणास समागमे पाठविले आणि आज्ञा केली जे सरदेशमूख व बाजे वतनदार हमशाही मिळऊन मनसुबी केली आहे ते तहकीक करून हुजूर लिहोन पाठविणे. त्यावरून त्याही विशाळगडी सरदेसाई व समस्त वतनदार मिळऊन मनास आणिता साक्षीचाही भोगवटियाने सेणवी याचे कुलकर्ण रा। निळकंठ बलाळ याणी मनसु(बी) केलो ते खरी यैसे मोझा पाहोन हुजुर लेहून पाठविले. त्यावरून कुलकर्ण सेणवी याचे पुरातन यैसे खरे जाहाले. दरम्यान देशकुलकर्णी

जोरावराने दखल जाहाले होते व आडीचसे रुो देऊन रा कृष्णाजी परशराम याचे पत्र घेतले होते ते मागती रद करून करारपत्र सेणवी यास दिल्हे व रुो निळकंठ बलाळ याही मनसुबी करून रुो आडीचसे देश कुलकर्णी यासी दिल्हे आणि त्याचा भाग वारला. कुलकर्ण कसबे मजकुरचे वतनास देशकुलकर्णीयासी समंध नाही. तुम्ही सेणवी याचे वतन असे जाणऊन कसबे प्रभावळी येथील गावकुलकर्णाचे वतन तुमचे तुम्हास करार करून दिल्हे असे. तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वौंशपरंपरेने कसबे माारचे कलकर्ण अनुंभवीत जाणे. सदरहू कुलकर्णास हक लवाजिमा पानमान सालाबाद पेशजी भोगवटेप्रमाणे घेत जाणे. हुजुरून तुमचे माथा हरकी रुो २५० आडीचसे ठेविले असत. याचा वसूल हुजूर देऊन पावलियाचा जाब घेणे. तेणेप्रमाणे मजुरा असे. लेखनालंकार.[1]

रुजु
रा छ २० मोहरम.

---

**क्रमांक : २३३** **दि. २–३–१७११**

जबर जकात व धामधुमीमुळे सुपे प्रांतातील व्यापार बंद पडला होता. छत्रपती, सेनापती व सरलष्कर ह्यांचे अधिकारी एकत्र येऊन त्यानी जकातीचा योग्य दर ठरवून तो जाहीर केला.

श्री

नकल

| छत्रपती | सेनापती | हैबतराऊ सरलस्कर |
|---|---|---|
| सिका | सिका | सिका |

---

१. याचं बाबतचे दि. २३–१–१७११ चे छत्रपती शाहू ह्यांचे प्रभावळीचे शेठे, चौगुले, महाजन व इतर वतनदार लोकाना दिलेले आज्ञापत्र उपलब्ध आहे.

तहनामा राजश्री सिवाजी तुकदेव हवालदार व कारकून दि॥ राजश्री हकीम व राजश्री रामजी कदम दि॥ राजश्री साहेब व राजश्री रंगो त्रिमल हवालदार दि॥ साहेब. सु॥ इहिदे आसर मया व आलफ. पो सुपे येथील जकात तहसील जवर व धामधुम या करिता मार्ग पडिला. येणेकरून सरकारचे नुकसान होते. यावर तह करून कौल बकालास वगैरे-----

उपरी कुळे

भूस व कीट दर बैलास

.॥. यैन रुके
.।. छत्रपती
.।. सेनापती
.।. सरलश्कर
.॥.

.।. बाबती
ऽ २ देशमुख देसपांडे
ऽ ३ सरदेशमुख
१ ऽ ५

पान दर बैलास टके
२॥ ६ यैन दर ॥ ६
० ६ सरदेशमुख
ऽ २ देशमुख व देशपांडे
ऽ ६ बाबती सर माहाल
पाने सुार
२॥= ३००

किराणा दर बैलास टके

३ यैन तिघाचे दर
ऽ ६ देशमुख व देसपांडे
ऽ ३ सरदेशमुख
९ बाबती
३॥६

तेल व तूप व तमाखू व रुइ
काबाडे वगैरे
६ यैन दर टके २
ऽ ६ वाणी
.॥६ बाबती
०३ देशमुख देशपांडे
७ ऽ ३

तिल तांदुल हली कणी + + +
विदल दर बैलास टके
१।६ यैन दर ।६
.॥. १०॥ बाबती
ऽ २ देशमुख देशपांडे
१॥ ६॥

कापड दर बैलास रुो
३ यैन दर रुो १
.॥. बाबती
३॥ देशमुख देशपांडे
ऽ ६

कापड बंधी दर बैलास रुो
१॥ यैन दर .॥.
.॥. बाबती
२
देशमुख देशपांडे
ऽ ३

कापड मूठ
.॥॥. यैन रुो ऽ .।.
ऽ= बाबती
॥॥=
देशमुख देशपांडे
ऽ २

गठडी सिर भारे भूस
व किरकोळ दर रुके
९ किराणा
·।· भूस
ऽ ४॥ कातडी
॥६ कापड पाहाणी

येणेप्राो हसील पैकी तूट व कौल दिल्हा निमे घ्यावे.

कसबे करी व पेटा

भूस दर बैल व कीट टके
।६ येन दर ऽ ६
ऽ ४ बाबती
ऽ २ सरदेशमुखी
॥॰

किराणा दर बैल टके
१॥ येन दर ॥.
ऽ ८ बाबती
ऽ ४ सरदेशमुखी
१॥।

तेल व तूप व माहाली व रुई
नकद दर टके

२॥६ यैन दर ।॥६
।१० बाबती सावोत्रा
व सर माहाल
।·८ सरदेशमुखी
३॥

तांदुळ व हुली व तीळ व करडी
दर बैल टके
॥ ३ यैन
ऽ ९ बाबती
॥।

कापड दर बैलास रुा
१॥ यैन
.॥. बाबती
२

पाने दर बैल टके
२॥६ यैन
.।.
२॥६ पाने सुार
३००

कापडाचीया बांध
कच्यान दर बंधीस ।०

.॥।. यैन
ढ=। बाबती
॥।=

कापड मुठ दर मुठी रुके

.॥. यैन
ढ=
॥=

मूठ बैलाचे ८ हिसे सिरभारे ४ बंधी[1]

येणेप्राो हसील पैकी वजा बकालास साडे हिसा येक बाकी दोन हिसे दिवाणे घ्यावे याप्राो कौल दिल्हा असे. याखेरीज मोरगाव व पाटस कुरकुंब बाजारास जिकडून गोणी गो + + टॆ जाईल त्यास तिजाई वजा करून हसी[2] सिरस्ते माफीक घ्यावे. येणे-प्रमाणे कौल दिल्ह असे. छ. २३ मोहरम.

---

१. गाठोडे.
२. हसी– सिरस्ते = हसी (ल) सिरस्ते : परंपरेप्रमाणे.

**क्रमांक : २३४** **दि. २४-३-१७११**

मौ पाटपनाळे येथील कुलकर्णाचा कारभार माहादाजी कासी ओरपे (वर्पे) ह्यांच्या मुतालिकाच्या हातून घेणे म्हणून हरी दत्ताजी ह्यांचे रायाजी आबाजी ह्यास पत्र.

राजश्री रायाजी आबाजी सरहवालदार व कारकून
पंचमहाल गोसावी यास

आखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य सेवक हरी दत्ताजी सुभेदार व कारकून मााहाय सुभा प्रांत पनाळा नमस्कार. सुहूर सन ईहिदे अशर मया अलफ. राजश्री माहादाजी कासी ओरपे मु॥ विशाळगड हेही विदित केले की मौजे पाटपनाळे ताा बोरगाव येथील गावकुलकर्ण पूर्वी भगवंत मल्हार याचे वतनी होते. त्याणी आपले आत्मसंतोषे राजश्री कासी रंगनाथ यास विकत वतनी करून दिल्हे आहे. येविसी सुभाचे पत्र करून दिल्हे पाहिजे म्हणून विशाळगडाचे मुाा विदीत केले. त्यावरून मनास आणून नूतन वतन करून घेतले. याकरिता मााारनुलेपासोन सेरणी रुपये २५ पंचवीस हुजूर रसदेचे ऐवजास घेऊन सनद सादर केली असे. तरी मौजे मजकुरचे कुलकर्णाचा कार्यभाग मााारनुले मुतालिक देवितील त्याचे हाते घेत जाणे. कुलकर्णाचा हक लवाजिमा पूर्वापार चालत असेल त्याप्रमाणे चालवीत जाणे पत्राचे तालिक लिहून घेऊन असल पत्र भोगवटियास मााानुलेजवळी देणे. जाणिजे. छ १५ सफर. मोर्तब.

---

**क्रमांक : २३५** **दि. २८-३-१७११**

बाळकृष्ण विश्वनाथ भट ह्या नावाच्या ब्राम्हणाला १० बिघे जमीन इनाम दिल्याचे छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे आज्ञापत्र.

स्वस्ति श्री राज्यभिषेक शक ३७ खरनाम संवत्सरे चैत्र बहुल षष्ठी सौम्यवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिवछत्रपति याणे राजश्री

देशाधिकारी व कारकुन वर्तमान व भावी सुभा प्रांत तारळे यास आज्ञा केली ऐसीजे. वेदमूर्ति राजश्री बाळकृष्ण जोतिसी बिन विश्वनाथ भट गोत्र गार्ग्य सूत्र अश्वलायन वास्तव्य करवीर क्षेत्र हे बहुत थोर विद्यासंपन्न जोतिशशास्त्र निपुण. प्रसिधगडचे मुकामी स्वामो संनीध येऊन राहिले. आभ्योदयाचे कितेक प्रश्न सांगितले. तदनुरुप घडोनही आले. याकरिता स्वामी यावर बहुत संतोषी जाले. याणी आपल्या योगक्षेमाविषई विनंती केली त्यावरून त्यास इनामभूमी चावर ·।।· नितांत द्यावयाचा निर्वाह करून...... .... (दहा बिघे पड जमीन दिलेल्याचा तपशील आहे )

तेरीख १९ सफर. सुर सन ईहिदे अशर मया व अलफ.

---

**क्रमांक : २३६** **दि. १-४-१७११**

प्रभावळीच्या कुलकर्णी वतनासंबंधी छत्रपती शाहूची सनद (क्र. २३२) मिळवून घेतल्यावरसुद्धा संबंधितानी परशराम पंडीत प्रतिनिधी ह्यांचे खाली दिलेले अभयपत्र घेतले.

श्री

अभयपत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री परशराम पंडीत प्रतिनिधि ता। सीवाजी मायदेव व संभाजी राम व गुणाजी भास्कर व चिमणाजी बलाळ सेणवी कुलकर्णी कसबा प्रभावळी सुभा राजापूर सु।। इहिदे अशर मया व अलफ दिल्हे अभयपत्र ऐसीजे. आबाजी साबाजी व दताजी माहादेव व बाबाजी रंगनाथ व मोरो त्रिमल देशकुलकर्णी प्रां। मजकूर यामधे व तुम्हामधे क।। मजकुरचे कुलकर्णी समंधे गर्गशा लागला होता. याबदल तुम्ही व देशकुलकर्णी मा।र पेशजी हुजुर आला. त्यावरी हुजुरून माहालोमाहालच्या सड्यापत्रे आणऊन वतनदार बसऊन मनसुबी मनास आणिता कुलकर्ण तुमचेसे खरे जाहले. त्यावरून

तुम्हास करारपत्र करून देऊन तुम्हापासून हरकी रुो साडेतीनसे दिवणात घेतले. त्याउपरी रा निळकंठ बलाळ परभू या प्रांती आले. त्याजपासी तुम्ही हरदूजण उभे राहिलेत. त्याणी पूर्व वृत्तांत मनास आणोन वतनदाराचे विद्यमान मनसुबी केली. तेथेही कुलकर्ण तुम्हा सेणवीयांस निवाडा होऊन आला. त्याणी निवाडपत्र समस्त वतनदाराचे सिके निशाणानिसी करून दिल्हे आणि रुो पाचसेंहे हरकी घेतली आणि पेशजी देशकुलकर्णी यापासून अडीचसेहे रुो दिवाणात घेऊन त्यास तुम्हा आपरोक्ष पत्र करून दिल्हे होते ते रद करून सदरहू रुो आडीचसेहे देशकुलकर्णी याजपासून घेतले होते ते तुम्हाकडुन देशकुलकर्णी यास देविले आणि आपले राजीपणे देशकुलकर्णी याणी राजीनामा व तुम्हास पत्र लिहून दिल्हे की सेणवी याचे कुलकर्ण पुरातन त्याचे त्याणी आनभवावे. आतःपर आपण वेव्हार करूं तरी दिवाणाचे गुन्हेगार व गोहत्येचे पातक. आपले वौंशीचा असिल त्याने तुम्हासी वेव्हार करू नये ऐस लिहून दिल्हे आसता पुनरिख्त माहाजन राजश्री छत्रपती स्वामी यासी कासी साबाजी व आबाजी साबाजी याचा पुत्र म्हादाजी आबाजी वेव्हारास उभे राहिले. त्याजवरून संभाजी राम सेणवी कुलकर्णी कसबे माार हुजुर जाऊन मांहाराज स्वामीचे सेवेसी कुलकर्णाचे आद्यंत वर्तमान सड्यापत्रे विदित केली. त्याउपरी रा यादो गोपाळ मुतालिक राजश्री पंत प्रतिनिधी यासी विशाळगड प्रांती रवाना केले. त्याजबरोबर हरदूजणास देऊन आज्ञा केली की उभयताची मनसुबी पेशजी जाहली आहे ते वतनदाराचे मुख्य तहकीक मनास आणोन हुजूर लिहून पाठवणे. त्यांवरून यादोपंत विशाळगडास येऊन राजश्री गणोबा नाईक सरदेसाई मामले माार व माा सोमाबा नाईक सरदेसाई किले विशाळगड याचे विद्यमान वतनदार व ग्रामस्त यासी मनास आणिता तुम्हा सेणवी याचे कुलकर्ण साक्षी गोही भोगवटियाने खरे अस मनास आणोन हुजूर हुजूरबाखेर लिहून पाठविली. त्याजवरून माहाराज राजश्री स्वामीनी मनास आणोन तुमचे कुलकर्ण तुम्हास करार करून वतनपत्र करून दिल्हे आणि हरकी तुम्हापासून

ह्यो आडीचसेहे हुजूर घेतले. तुमचे कुलकर्ण खरेखुरे जाहले. त्याजवरून हे आभयपत्र सादर केले असे. तरी तुम्ही आपले वंशपरंपरेने कसबा मजकुरचे कुलकर्ण आनभऊन सुखरूप आसणे. याउपरी देशकुलकर्णी यास कसबे माारचे कुलकर्णासमंधे आर्था अर्थी वौंशपरंपरेने समंध नाही. तुम्ही सुखरूप कुलकर्णाचा उपभोग करणे. हक लवाजिमा पानमान इनामत सालाबाद प्राो घेत जाणे. छ २३ सफर. पाा हुजूर.

---

**क्रमांक : २३७** **दि. १८-४-१७११**

बाजी साठम ह्याना भेटीस येण्याबद्दल छत्रपती शाहू ह्यांचे पत्र.

| पंतप्रधानाचा शिक्का | प्रतिनिधीचा शिक्का |
|---|---|

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३७ खरनाम संवत्सरे वैशाख शुद्ध एकादसी सौम्यवासरे क्षत्रोय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री बाजी साठम यास आज्ञा केली ऐसाजे. तुम्ही विनंती पत्र पाठविले तें प्रविष्ठ जाहलें. आपले चित्तीं स्वामीचे दर्शनास यावे सेवा करावी यैसा इरादा आहे म्हणून लिहिले ते विदित जालें. यैशास तुमचे हाते सेवा घेऊन तुमचे ऊर्जित कर्णे स्वामीसी अवश्यक आहे. तरी तुम्ही हुजुर दर्शनास येणे. स्वामी तुमचे सर्व प्रकारे गोमटे करतील. जाणिजे लेखनालंका (र).

---

**क्रमांक : २३८** **दि. २८-४-१७११**

चांदजीराव अरुळेकर ह्याना व इतराना शेते नेमून दिली आहेत. परंतु राजभागाच्या वसूलाबाबत त्याना तगादा लावू नये अशी छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांची कृष्णाजी भास्कर ह्यास आज्ञा.

श्री

नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ३७ खरनाम संवत्सरे वैशाख बहुल + + मी भृगुवासर[1] क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा सिव छत्रपति याणी राजश्री कृष्णाजी भास्कर

सिका यासी आज्ञा केली ऐसोजे. राजश्री चांदजीराव अरुळेकर यास व याकडील लो + +

पेस्तर सालाकारणे सेते नेमून दिल्ही आहेत. राजभाग दस्त खंडी-----

चांदजीराव राणे ताा
खारापाटण
मौजे येडगाव
मौजे सागुळवाडी

बापुजीराव ताा खारापाटण
.॥. मौजे वाणबसीपैकी
.॥. मौजे सांगुळवाडीपैकी
.।. मौजे येडेगावपैकी
१।

भानजी राणे मौजे येडगाव
पैकी खारेपाटण .॥.
सदोजी काळे मौजे वल
थरपैकी २

येसाजी चवाण मौजे वटुळ
खडी ताा मजकूर १

(याप्र)माणे पावणे सा खंडी दस्ताची सेते हे पेस्तर सालाकारणे दु गावा करतील. त्यास तुम्ही वसुलाचा तगादा यक न करणे. सदरहूप्रमाणे राजभागांची बेरीज याकडे चालवणे. लेखनालंकार.

मोर्तब.

---

१. जंत्रीत शनिवार येतो.

रुजु सुरूनिविस
तेरीख वीस रबिलावल.
सुहूरसन ईहिदे अशर मया अलफ.
सुरु सुद बार.

---

**क्रमांक : २३९**

दि. २८-५-१७११
दि. १६-५-१७१२(?)

मौजे नापणे हा गाव छत्रपतींनी चांदजीराव ह्यांना मोकासा म्हणून दिला आहे, तरी तो गाव त्याजकडे चालविणे म्हणून रामचंद्रपंत अमात्य ह्यांचे बाळाजी केशव ह्यांना पत्र.

राजमान्य राजश्री बाळाजी केशव गोसावी यांसी

सेवक रामचंद्र निलकंठ अमात्य नमस्कार. सुरु सन इसने अशर मया आलफ. मौजे नापणे हा गाऊ राजश्री स्वामीनी राजश्री चांदजी रायाकडे मुकासा दिलेला आहे. तरी तुम्ही त्याचे गाऊ याकडे मुकासा चालो देणे. येविशी अनमान न करणे गिमौस[1] देखील त्यांचे पदरी घालणे. त्यास मान्यता एकंदर खट खट न करणे छ २० रबिलाखर.

मोर्तब.

---

**क्रमांक : २४०**

दि. १०-६-१७११

चिमणाजी, आबाजी व प्रल्हाद बल्लाळ शेणवी प्रभावळीकर ह्यांना परगणा वारुणचे नाडगौडकीचे वतन दिल्याचे परशराम त्रिंबक प्रनिनिधी ह्यांचे रामजी विश्वनाथ ह्यास पत्र.

---

१ गिमवस : उन्हाळी पीक,

श्री

६) मा। अनाम रामाजी विश्वनाथ हवालदार कारकून वर्तमान व भावी प्रा। वारूण यासी परशराम त्रिंबक प्रतिनिधी सु॥ इसने अशर मया व अलफ चिमणाजी बलाळ व आबाजी बलाळ व प्रल्हाद बलाळ शेणवी प्रभावळीकर याणी या राज्यामधे बहुत दिवस एकनिष्टेने राजश्री----- कैलासवासी स्वामीचे कारकिर्दीपासून सेवा केली आहे. त्यास या त्रिवर्गानी विशाळगडचे मु॥ येऊन विनंती केली की या राज्यात येकनिष्टपणे शेवा केली आहे. तरी स्वामीनी आपणास नवीन वतन करून देऊन स्थापना केली पाहिजे म्हणोन. त्याजवरून पा। मजकूर येथील नाडगौडकीचे वतन पूर्वी अदलशाचे कारकिर्दीस येसाजी गाईकवाड यास होते. त्याणी आपला मुतालिक नागोजी पंत ठेविला होता. त्यास येसाजी गाईकवाड याचे नकल जाहाले. याकरिता राजश्री संभाजी राजे याचे कारकिर्दीस दिवाणात अमानत केले होते. नागोजी पंत मुतालिक होता तोही मृत्य पावला. वतनास कोणी खावंद नाही. म्हणोन पा। मजकुरचे देशमुख व देश-कुलकर्णी याणी बखर छ १ जमादिलावल साल मजकुरची लिहून दिल्ही ती पै॥ छ ४ मिनहूम ऐशास पा। मजकुरच्या नाडगौडकीचे वतनाचे वर्तमान मनास आणिता येसाजी गाईकवाड याचे नकल जाहाली. वतनास कोणी खावंद नाही आणि चिमणाजी बलाळ व बाबाजी बलाळ व प्रल्हाद बलाळ शेणवी प्रभावळीकर येंही या राज्यामधे बहुत दिवस येकनिष्टपणे सेवा केली. यास नवीन वतन देऊन स्थापना करावी हे आवशक जाणून या त्रिवर्गावर कृपाळू होऊन परगणे मजकुरचे नाडगौडकीचे वतन अजरामऱ्हामत करून दिल्हे आहे. याचे दुमाला करणे. या वतनास हक लाजिमा पानमान तश्रीफ पूर्वी येसाजी गाईकवाड असता त्यास चालले असेल त्याप्रो। यास व याचे पुत्रपौत्रादि वौंशपरंपरेने चालवणे. सदरहू वतनास

याचे माथा शेरणी रुा २०० दोनशे बाा कबूल कतबा ठेऊन हुजूर वसूल घेतला असे. वतन याचे दुमाला करणे. या पत्राची प्रत लिहून घेऊन मुखे पत्र मशारनिल्हे यास भोगवटियास देणे. जाणिजे. छ ४ जमादिलावल. पाो हुजूर.

---

**क्रमांक : २४१** **इ. स. १७–६–१७११**

अंताजी बल्लाळ व गोपाळ विठ्ठल खांडेकर ह्यांना इनाम असलेली तीस बिघे जमीन त्यांचेकडे चालवणे म्हणून परशराम त्रिंबक प्रतिनिधि ह्यांचे चिमणाजी बल्लाळ ह्यास पत्र.

श्री

तालिक

राजश्री चिमणाजी बलाळ सुभेदार व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांा मलकापूर गोसावी यास

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य

स्ने।। परशराम त्र्यंबक प्रतिनिधि आसीर्वाद. सुा इसने आशर मया व आलफ. आंताजी बलाळ व गोपाळ विठल खांडेकर याणी किले विशाळगडच्या मुकामी हुजुर येऊन विनंती केली की आपण या राज्यात येकनिष्टपणे आहे. आसीयासी बहुतास स्वामीनो पड जमीन इनाम देऊन स्थापना केली आहे. याकरिता आपणासही इनाम पड जमीन देऊन स्थापना करावी. त्याजवरून मौजे देखिणे ताा देवाळे सुभा राजापूर येथे पडजमीन विघ ·।· तीस देविली. याचे वृतिपत्र पेशजे अलाहिदा आहे. त्याउपरी राो नीलकंठ बलाळ पेशजी विशाळ-गडी होते ते समई जमीन मोजून चेतु:सीमा करून घेता मौजे माारी

तीस बिघे पड जमीनीस ठिकाण नाही. म्हणोन सदरहू पाो मुबदला मौजे आंब ताा मलकापूर सुभा प्रांत माार पैाा देविले पड जमीनी बिघे ॰१६ तपसील भात जमीनो बिघे ॰६ वर्कस जमीन बिघे ॰१० यकून सोळा बिघे पड जमीन मोजून चेतु:सीमा करून दिल्ही. त्याप्राो उपभोग करीत आहे. त्याप्राो करार करून पत्र दिल्हे पाहिजे म्हणोन. त्यावरून मनास आणिता पेशजी देखिणे येथे तीस बिघे पड जमीन इनाम दिल्ही. ते जमीन नेमून देता सारे जमीनीस ठिकाण नाही. त्याउपरी राा निळकंठ बलाळ यैही मुबादला मौज आंब ताा मलकापूर येथे जमीन बिघे ॰१६ सोळा दिल्ही. ते नेमून चेतु:मीमा करून दिल्ही. त्याचा जाबिता आलाहिदा आहे. तरी सदरहू प्राो याचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने चालवीत जाणे. या पत्राची तालिक घेऊन आसल पत्र माारनिलेजवळ परतोन भोगवटीयासी देणे. छ ११ जमादिलावल पाा हुजुर. मोर्तब.

सिका

---

क्रमांक : २४२ दि. ९-१२-१७११

गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालच्या राजास लिहितो की, आंग्र्याशी सुरू असलेल्या युद्धात काही बदल झालेला नाही.

महाराज

नोस्सा सिंज्योरा दा काँसेश्सांव ह्या नौकेवर दि. ४ डिसेंबरला मी महाराजाना जे पत्र पाठविले त्यात बंडखोर आंग्रे ह्यांच्याशी चालू असलेल्या युद्धाचा समग्र वृत्तांत दिलाच आहे. कान्होजी आंग्रे ह्याच्याकडून अद्याप तद्दासंबंधी कोणतीच हालचाल झाली नसल्याने महाराजाना मी त्या युद्धासंबंधी अधिक काही लिहू शकत नाही.

परिस्थितीत आणखी काही बदल घडलेला नाही. माझ्या सुदैवी स्वामीला देव त्याच्या प्रजेसह सुखात ठेवो.

गोवा, ९ डिसेंबर १७११

---

**क्रमांक : २४३** **दि. ११-१२-१७११**

जीवन हजारी ह्याच्या शिपायाना त्यानी 'कव्हावती' केली म्हणून आज्ञे-प्रमाणे कैदेत टाकले आहे असे बाळाजी भोसले, हवालदार व कारकून किल्ले सातारा, हा छत्रपतीना लिहितो.

श्री

माहाराज राजश्री छत्रपती स्वामीचे सेवसी विनंती सेवेसी बाळाजी भोसले हवालदार कारकून किले सातारा विज्ञाप्ती. सु॥ इसने आशर मया अलफ.

बा॥ ता॥ छ ११ जिलकाद स्वामीचे कृपादृष्टी करून किले मा॥रचे वर्तमान यथास्थित असे.

बा॥ सिपाई दि॥ जीवन हजारी यानी कव्हावती केली म्हणून बेडिया घालून आदबखाना ठेवावया आज्ञा दाऊद चोपदार पाठविले. आज्ञे प्रमाणे येणे प्रा॥ बेडिया घालून ठेविले. बंदोदास १ मोहनदास १ बलराम १ भागवत १ एकून चौघेजण आदबखाना ठेविले. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

शिक्का

---

**क्रमांक : २४४** **इ. स. १७११-१२ (?)**

बाबाजी गंगाजी घोरपडे ह्या मौजे भाडळेच्या पाटलाची ही कैफियत आहे. हींत सर्जाखानाच्या पाडावाचा आणि मोगल मराठे युद्धातील 'राजिकाचा' उल्लेख आहे.

श्री शंकर

तकरीर कर्दे बाबाजी बिन गांगजी घोरपडे पाटील मौजे भाडळे का कोरेगाऊ प्रांत वाई सुा———केली तकरीर यैसीजे. पुरातन वतन मौजे भाडळे येथील नवकस घोरपडियाचे पाटीलकी खरी. ते पाटीलकीपासून आलीकडे वतने नवकस घोरपडियानी मेळविली. जावजी पोगाडे हे गड सोडियाचीवाडी मौजे राजापुरीची आहे तेथे होता. तो आमच्या वडिलानी आपले जातीभाऊ म्हणौन आणून चिकवलीचे वाडीची निमे सहा चावराची खोतीक दिल्ही. खोतिकेस दहा बिघे इनाम करून दिल्हा. त्याचे लेक दोघे. बाजी व खंडोजी. मूल लहान होते. ते मूल देखणे सुभावणे होते. याजकरिता आपणापासी आमच्या वडिलानी चाकरीस ठेवले. जावजी खोतीक करीत होता. जावजी खोतिक करीत असता राजाई व तिचे सुनेत भांडण लागले. सुनेच्या रागे करून खंडोजी व बाजी यास आपले निमे तकसीमेपैकी दाहा चावराची पाटीलकी लेहून दिल्ही. बाजी खंडोजी भाग्यास आले म्हणौन त्यास वतन लेहून दिल्हे. ते बायकोच्या मते गावीच्या कारभारात शिरले. पुढे आमचे वडील अर्धलीचे वडिल होते. त्यास नागोजी पाटलाचा वडिल म्हालोजी बाजी लेक होता. तो नरसोजी व नारायणजी यानी किरोली वाठारी मारिला. बाजी व खंडोजी भाग्यास आलेवरी घोरपडे म्हणऊ लागले भाग्यास आले. त्यामुळे वतन रेटून कुली खाऊ लागले. पुढे सर्ज्याखान घेतला. त्या कारकीर्दीस आम्ही जाऊन त्यासी वेव्हाराचा प्रसंग केला. तेव्हा नारायणजी घोरपडे पळोन गेले. आम्हा गावीचा कारभार नांगर पंधरा सोळा वर्शे परयंत मोकदमी केली. रा रामचंद्रपंत व रा परशरामपंत होते त्यानी आमची पाटीलकी आमचे हावाला केली. आम्ही मोकदमी केली. त्यावरी गावपुढे राजिकामुळे वोस पडिला. आपण पोटाचे पाठी लागोन रोजगारास गेलो. गाव तो खराबच होता. पुढे माहाराज छत्रपति स्वामी आलेवरी नारायणजी घोरपडे गावात येऊन गावीचा कारभार करू लागले.

आमचे पदरी नातवानियामुळे[1] आम्हास गाटी घालवेना. आता च्यारी वर्शेपर्यंत माहाराजापासी उभे राहिलो आहो. + + + आम्ही भांडतच आहो. + + + (पुढे गहाळ)

---

**क्रमांक : २४५** **दि. ११-१-१७१२**

पोर्तुगालचा राजा गोव्याच्या व्हाइसरॉयला लिहितो की, आंग्र्याशी तह करायचा असेल तर तो पोर्तुगालला अनुकूल होईल असाच करावा.

हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयना मी माझी सदिच्छा पाठवीत आहे.

आपले दि. ४ डिसेंबर १७१० चे पत्र मिळाले. त्यात आपण बंडखोर कान्होजी आंग्रे ह्यांच्याशी सुरू असलेले युद्ध, आंग्र्यानी तहाची मागणी कोणत्या कारणास्तव वारंवार केली, कान्होजी आंग्रे ह्यांचा भाऊ तहाची मागणी करण्यासाठी आपणाकडे कसा आला व त्याला तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी संपूर्ण अधिकार देण्यात आले नव्हते म्हणून परत कसे पाठवून देण्यात आले, त्याचा साद्यंत वृत्तांत दिला आहे. हे युद्ध कान्होजी आंग्रे ह्यांच्याच हट्टामुळे चालू आहे व त्याना तोंड देण्याचा आमचा निर्धार कायम आहे हेहि कळले. आपण उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतीला मदत पाठविण्याची विनंती पत्रात केली होती. ती मदत त्याना पाठविण्याचा माझा निर्धार आहे. ही मदत गेली की, बंडखोर आंग्रे तहाला तयार होतील किंवा त्यानी तहाला नकार दिला तर आमच्या इतर शत्रूंप्रमाणे त्याना शासन करता येईल. मला आपणाला कळवायचे आहे की, त्या राज्याला जेंव्हा तहाची आवश्यकता भासेल तेव्हाच तो देशाला अनुकूल होईल अशा

---

१. नातवानिया = असमर्थता.

रीतीने करावा. मी ते आपल्या चातुर्यावर आणि धोरणावर सोपवीत आहे.

लिश्बोआ (लिस्बन), ११ जानेवारी १७१२.

राजा.

---

**क्रमांक : २४६** **दि. १७–१–१७१२**

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचा महिपतगड किल्ला छत्रपती शाहू ह्याना मिळाला होता. तो चिमणाजी बल्लाळ ह्यानी छत्रपती शिवाजी ह्याना परत मिळवून दिला म्हणून त्यांनी चिमणाजी बल्लाळ ह्याना मौजे करंगुल ताा मलकापूर हा गाव इनाम दिला.

श्री

तालिक

स्वस्ति श्री राज्यभिषेक शके ३८ खर नाम संवत्सरे पौष्य बहुल पंचमी गुरुवासर क्षत्रिये कुलावतंस श्री राजा सिवछत्रपति याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत मलकापूर यासी आज्ञा केली यैसीजे. राजश्री चिमणाजी बलाळ हे स्वामीचे राज्यातील पुरातन सेवक. बहुत दिवस सेवा केली. सांप्रत किले महिपतगड

सिका
श्री शिवनरपति हर्ष
निदान मोरेश्वरसुत
नीलकंठ प्रधान

शाहूस वस्य जाहाला होता. तेथे राजकारण करून लोकाचे दिलासे करून स्वामीचे स्थळ स्वामीस हस्तवस्य करून दिल्हे. यास्तव राजश्री कृष्णाजी पंडित प्रतिनिधि याणी मारनिलेस एक गाव लेकराचे लेकरी चाले ऐसा इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणोन विनंती केली. त्यावरून स्वामी यावरी कृपाळू होऊन यासी नूतन इनाम कुलबाब कुलकानु खेरीज हकदार व इनामदार करून मौजे करंगूल ताा मलकापूर देह १ येक यास इनाम आजरामऱ्हामत करून दिल्हा असे. तरी तुम्ही मौजे

मजकूर पूर्व मर्यादे प्रा चतुःसीमा याचे दुमाला कसून इनाम यासी व याचे पुत्रपौत्रादि वौशपरंपरेने चालवणे. सालदरसाल ताजा सनदेचा उजुर न करणे. या सनदेची तालिक लिहून घेऊन असल सनद भोगवटियास परतोन देणे. लेखनालंकार. रुजु सुरुनिविस.

तेरीख १७[1] जिल्हेज सुा इसने अशर मया अलफ

---

**क्रमांक : २४७** **दि. २९-१-१७१२**

**सत्यव्रतगिरी गोसावी ह्यांनी मौजे सोलांकूर येथे समाधी घेण्याची इच्छा दर्शविल्याने छत्रपती दुसरे ह्यांनी त्यांच्या समाधीच्या दिवाबत्तीसाठी तीन बिघे जमीन इनाम दिली.**

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ खरनाम संवत्सरे माघ शुद्ध त्रितिया भौमवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति यानी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान भावी सुभा प्रांत तारळे यासी आज्ञा केली यसीजे. सत्यव्रतगिरी गोसावी जटाधारी मुा सोलांकुर याणी स्वामी संनीध विनंती केली की आपण तिर्थे करुन या स्थळी

सिका

येऊन राहिलो. येशास या स्थळी समाधि घ्यावी येसी आपली वासना जाली आहे. हे निमित्याने मजकुरी श्रीचे देवालय होते ते नीट करून तेथे समाधेस स्थल केले आहे. समाधी घेतल्यावर दिवाबत्ती चालली पाहिजे. तरी महाराजे समाधीस्थळी दिवाबत्ती चालेल येसे केले पाहिजे म्हणून. त्यावरुन सत्यव्रत गोसावी बहुत भला तपस्वी निःस्पृह आहे. याणे समाधिस्थल पाहून समाधि घेत आहे. तेथे

---

१ खरे जंत्रीत १९ जिल्हेज पडते. हिंदु कालगणनेप्रमाणे तिथि वार यांचा मेळ बसतो म्हणून पौष बहुल पंचमीची तारीख येथे घेतली आहे.

दिवाबत्ती चालावयासी नूतन इनाम कुलबाब कुलकानू खाते हकदार करून पडीची जमीन विसापांडाच्या बिघेयाने बिघे ०३ तीन बिघे रास इनाम अजरामरहमत करून दिल्हे असे. तरी तुम्ही मौजे सोळांकूर तर्फ तारळे या गावापैकी सदरहू जमीन याचे दुमाला करून इनाम गोसावी याचे स्थळी उत्तरोत्तर चाल(व)णे. साल दरसाल ताजा सनदेचा उजूर न करणे. या सनदेची तालीक लिहून घेऊन असल सनद गोसावी याचे शिष्याना परतोन देणे. जाणिजे. लेखनालंकार. मोर्तब सिक्याचे.

तेरीख १ रुजु सुरु
मोहरम सुाा इसने असर मया निवीस

---

**क्रमांक : २४८** **दि. ५-२-१७१२**

**अंताजी गणोजी सिंदी ह्या दिवटयास चार बिघे जमीन इनाम दिल्याचे छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे आज्ञापत्र.**

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ खरनाम संवत्छरे माघ शुध दशमी भोमवासरे[1] क्षत्रीये कुलावतंस श्रीराजा शिव छत्रपति याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत कोल्हापूर यासी आज्ञा केली ऐसीजे. अंताजी बिन गणोजी

सिका

दिवटीया सींदी हा स्वामीची पुरातन सेवक. थोरले कैलासवासी स्वामीपासून अजिवरी वसनागाराकडे सेवा करीत आहे. याचा थोरला लेक भिकाजी सिंदी स्वामीची

---

१. खरे जंत्रीत बुधवार पडतो. 'भौमवार' ची तारीख येथे घेतली आहे.

सेवा करिता मृत्य पावला. हली धाकटा लेक भिकाजी फिरंगोजी (?) स्वामीची सेवा करीत आहे. सांप्रत याणे पनाळाचे मुकामी स्वामी संनीध विनंती केली की आपण बहुत दिवस सेवा करिता वृध्ध जालो. लेक चाकरीस लविले. याउपरी स्वामीने दया करून आपल्यास लेकराचे लेकरी चालेल येसा इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून. त्यावरून स्वामी यावरी कृपाळू होऊन यासी नूतन इनाम कुलबाब कुलकानु खेरीज हकदार करून जमिन बिघे ८८ आट द्यावयाचा निर्वाह केला आणि त्यापैा मौजे पडळ तर्फ हवेली कोल्हापूर या गावापैा अवल दुम सीम मिळोन जमिन विसा पांडाचे बिघियाने बिघे ०४ च्यारी रास इनाम अजरामऱ्हामत करून दिल्हे असे. तरी तुम्ही मौजे मार पैा सदरील प्रतीची जमीन मोजून चतु:सीमा करून याचे दुमाला करणे. आणि इनाम यास याचे पुत्र पौत्रादि वौषपरंपरेने चालवणे. साल दरसाल ताजा सनदेचा उजूर न करणे. या सनदेची तालीक लिहून घेऊन असल सनद भोगवटयास परतोन देणे. जाणिजे. लेखन अलंकार. मोर्तब असे.

तेरीख ९ मोहरम.

सुरू सन इसने असेर.

---

**क्रमांक : २४९** **दि. ११–४–१७१२**

नरहरीभट ढवळीकर ह्याना १० बिघे जमीन इनाम दिल्याचे छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे आज्ञापत्र. ह्यात छत्रपती राजाराम फाल्गुन शुद्ध पोर्णिमेच्या चंद्रग्रहणाच्यावेळी (दि. ५–३–१६९९) पन्हाळ्यावर होते असा उल्लेख आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ नंदननाम संवत्सरे चैत्र बहुल प्रतिपदा भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी प्रांत पनाळा यास आज्ञा केली यैसीजे. वेदमूर्ति नरहरीभट बिन नरसिंहभट ढवळीकर

वास्तव्य किले पनाळा याणी हुजूर विदित केले की तीर्थस्वरूप कैलासवासी स्वामी कर्नाटक प्रांती हुजूर स्वार होऊन किले मजकुरास सन तिसा तिसैन मध्ये येऊन मुकाम केला ते समयी फाल्गुन शुद्ध पुर्णिमेस[1] चंद्रग्रहण राहू पर्वयोग जाहाला होता. त्या प्रसंगी आपले पिते नरसिंहभट ढवळीकर यास कैलासवासी स्वामीने इनाम भूमी बिघे दहा धारादत्त करून दिली. त्याची सनद व्हावी तो स्वार होऊन किले विशाळगडास गेले. मग राजश्री परशराम पंडित प्रधान याणी मौजे बोरिवडे तालुका सातवे या गावी दहा बिघे जमीन नेमून देऊन आपली सनद दिल्ही. ते सनद एका गृहस्थाचे घरी ठेविली असता त्याचे घर दग्ध जाले. त्याबरोबर सनद दग्ध होऊन गेली. प्रांत मजकुरच्या सुभ्याची सनद आहे. ते चित्तास आणून आपणास दहा बिघे भूमी इनाम चाले हे करावे म्हणोन हे वर्तमान राजश्री रामचंद्र पंडीत अमात्य यास विदित केले. त्याण्ही हे पूर्वोत्तर वर्तमान आणून आपणास दहा बिघे गावगन्ना नेमोन दिल्हे आहेत. जमीन बिघे[2] दहा बिघे गावगना नेमून दिले आहेत. तेणेप्रमाणे उत्तरोतर आपणास इनाम चाले अशी आज्ञा केली पाहिजे म्हणोन विनंती केली व राजश्री रामचंद्र पंडित अमात्य याचे पत्र व सुभाचे पत्र होते ते आणून दाखविले. त्यावरून मनास आणिता तिर्थस्वरूप कैलासवासी स्वामीने राहू पर्वकाली दहा बिघे भूमी धारादत करून नरसिंभट बिन सिदभट यास दिल्ही ते चालवावी हे उचित. यैशास नरसिंभट ढवळीकर मृत्य पावले. त्याचे पुत्र नरहरीभट हे बहुत थोर विद्यासंपन्न कुटुंबवत्सल. याचे चालवणे स्वामीस आत्यावश्यक. याकरिता सदरहू दहा बिघे पंडित मशारनिल्हेनी गावगना नेमून दिल्हे आहे. ते बिलाकुसुर चालवावयाची आज्ञा करून हे आज्ञापत्र सादर केले असे............ ..................( इत्यादि इत्यादि )

---

१. दि. ५-३-१६९९.

२. जमिनीचा तपशील घेतलेला नाही.

**क्रमांक : २५०** **दि. २२-४-१७१२**

कृष्णाजी भास्कर पंडीत ह्याने औरंगजेबाचे स्वारीचे वेळी विशाळगड किल्ला राजाराम महाराजांच्या शासनाखाली आणण्याचा प्रयत्न केला म्हणून छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी त्याला मौजे कलबस्ते हा गाव इनाम दिला.

श्री

तालिक

सिका

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ नंदननाम सवत्सरे चैत्र बहुल त्रयोदसी भौमवासरे क्षेत्रिये कुलावतंस श्री राजा शिवछत्रपति स्वामी याणी राजश्री कृष्णाजी भास्कर उपनाम पंडित

सिका सिका गोत्र काशाप यास दिल्हे इनामपत्र यैसीजे. तुम्ही स्वामीचे पुरातन शेवक. स्वामीच्या पायांस निष्ठा धरून आंतकरणपूर्वक सेवा केली. किले विशाळगड अवरंगजेबाने हस्तगत करून उदितसिंग रजपूत किले मजकुरी ठेऊन मनसुबी केली. ते स्थळ स्वामीचे शासनावस्य व्हावे ये गोष्टीचा प्रेत्न तुम्ही विशष केला. उदितसिंगासी राजकारण करून त्याला खाले उतरिले ते समई आपला भाऊ केशव भास्कर यास उदितसिंगाच्या समागमे त्याचे देशास जावयास दिल्हे आणि स्थल स्वामीचे शासनावस्य केले. ते समई तुमचे विषई राजश्री परशराम पंडित प्रतिनिधि यानी येक गाव इनाम करून द्यावा म्हणून विनंती पूर्वी केली होती. ती सांप्रत तुम्ही स्वामीची सेवा प्रेमभावे करून स्वामीस संतोशी करून एक गांव आपणास लेकराचे लेकरी चाले यैसा इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून पनाळाचे मुकामी तुम्ही स्वामीसनीध विनंती केली. त्यावरून स्वामी तुमचे सेवेवरी संतोषी होऊन तुम्हास नूतन इनाम कुलबाब कुलकानू देखील हली पटी व पेस्तर पटी झाड झाडोरा जलतरु पाषाणसहित खेरीज हकदार व इनामदार करून मौजे कलबस्ते तर्फ

संगमेश्वर देह १ एक रास इनाम आजरामऱ्हामत करून दिल्हा असे, तरी तुम्ही मौजे मार पूर्वमर्यादेप्रमाणे चतुःसीमा याचे स्वाधीन करून हार्दु इनाम तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन स्वामीची सेवा करून सुखरूप राहाणे. स्वामी तुम्हास मौज मार इनाम सुरक्षितः चालवितील. जाणिजे. निशाण. निदेश समक्ष. मोर्तब[1].

---

**क्रमांक : २५१** दि. २३–४–१७१२

मौजे कलवारुडे ह्या गावच्या तिजाईचे उत्पन्न मातुश्री आईसाहेब ह्यांच्याकडे पोहोचते करावे म्हणून छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे आज्ञापत्र.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ नंदननाम संवत्सरे चैत्र बहुल चतुर्दसी सौम्यवासरे क्षेत्रीये कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी पारपत्यगार व लेखक ता संगमेश्वर यासी आज्ञा

सिका सिका

केली ऐसीजे. मौजे कलवारुडे ता मजकूर हा गाव राजश्री कृष्णाजी भास्कर यास इनाम आहे. तेथील तिजाईचा ऐवज मातुश्री आईसाहेबाकडे नेमून दिल्हा आहे त्याप्रा तिजाईचा ऐवज वसुल देतील. तरी तुम्ही हे जाणून मौजे मजकुरास काही उपसर्ग न देणे. रोखे सर्वथा न करणे. तिजाईचा ऐवज सुरळीत मातुश्रीसाहेबा पावो देणे. निदेश समक्ष. मोर्तब.

निशाण निशाण

---

१. करवीर दरबारच्या दप्तरखान्यात जी सनदापत्रे नोंद केली आहेत त्यांतील ही सनद आहे. पूर्वी ती 'काव्येतिहास संग्रहात' प्रसिद्ध झाली आहे.

**क्रमांक : २५२** **दि. २६–५–१७१२**

चेनजी चव्हाण ह्याने एकनिष्ठपणे सेवा चाकरी केली ह्यास्तव हिंदुराव घोरपडे ह्यानी त्याला अबदागिरीचा बहुमान अर्पण करून त्याच्या खर्चासाठी पांच बिघे जमीन दिली.

श्री

तालिक

पत्र इनाम समस्त राजकार्यं धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री हिंदूराव घोरपडे ममलकतमदार ताा चेनाजी चवाण पाटील मौजे बोरविडे पोा कागल सुाा सलास आसेर मया आलफ. लस्करसह वर्तमान काा मारी मुकाम जाहला आसता छ २९[1] रबिलाखरी तुम्ही हुजूर येऊन विनंती केली की आपणास हुजूर तल्ब केलीयास सेवसी आलो. आजीवर साहेबाचे पायापासी एकनिष्ट धरून सेवा केली. लस्करचा तळ पोा मजकुरी पडून धामधूम करिता आपला नास बहूत जाहला. जे मौजे मारीची लावणी संचणी करावी तरी आपणामध्ये ताकद राहिली नाही. साहेब कृपाळू होऊन मौजे माारपैाा काही जमीन इनाम करून दिलीया ते आनभऊन मौजे माारची लावणी संचणी कीर्द माहामोरी करून दिवाण कामे एकनिष्टपणे करीत जाईन म्हणून विनंती केली. त्याजवरून तुम्ही कामाच मर्दान. अजिवर यकनिष्ठेने वर्तणूक केली. फुडेही स्वामीकार्य एकनिष्ट धरून सेवा कराल यैस जाणून तुम्हावर मेहेरबान होऊन तुम्हास आबदागिरी चालवावया आज्ञा होऊन आबदागिरी मरामत करून दिल्ही असे. आबदागिरी चालवावया खर्चाबदल मौजे माा पैाा विसा पांडाचे बिघेने जमीन बिघे ०५ पांच रास चेतु:सीमा पूर्वमर्यादेप्रमाण इनाम शेत तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आजराहमरामत करून दिल्ह आसे. तुम्ही सदरहू इनाम

---

१. दि. २५–५–१७१२.

जमीन आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन अबदागिरी चालऊन स्वामी कार्यावर यकनिष्टपणे राहून वर्तणूक करून सुखरूप राहणं. जाणिजे. नंदन नाम संवत्छर जष्ठ शुध्ध ३ इंदुवासरे. छ १ माहे जमादिलावल. मोर्तब आसे.

---

**क्रमांक : २५३** **दि. ६–६–१७१२**

रामचंद्र पंत अमात्य ह्यांचे कमाविसदार मौजे सोनाळी व येडगाव तर्फ खारापाटण ह्याना आज्ञापत्र की, सदहूं गावचा वसूल चांदजीराव राणे ह्यांच्याकडे देत जाणे.

शिक्का

आज्ञापत्र समस्त राज कार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित अमात्य ताा कमाविसदार मौजे सोनाळी व येडगाव तर्फ खारापाटण सुरु सन सलास आशर मया व आलफ. चांदजी राऊ राणे यांस पेशजी हुजूरोन नापणे मुकासा दिला होता. यैसी यांस त्या गावी गडकरो चाकर लोकानी शेते केली आहेत. त्याच्या मोबदला गडकरी याणा दोनी गाव दिले आहेत. तरी तुम्ही दोनी गावीचा वसूल चांदजीराऊ यांजकडे वसूल देत जाणे. जाणिजे. छ १२ जमादिलावल.

रुजू हुजूर.

शिक्का

---

**क्रमांक : २५४** **दि. २९–६–१७१२**

मल्हारजी, हुणमाजी व संताजी मर्दाने ह्या तिघांनी स्वामी सेवा निष्ठेने केली म्हणून छत्रपती शिवाजी दुसरे .ह्यानी त्याना मौजे बावडे येथे पाऊण चावर जमीन इनाम दिली.

श्री

नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदननाम संवछरे आशाढ शु॥ सप्तमी[1] भानुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत कोलापूर

| शिका पेशवे श्री शिवनर पतिहर्ष नि दान मोरेश्वर सुत निळकंठ मुख्य प्रधान | शिका प्रति निधिचा पर शराम त्रिंबक प्रतिनिधि याचा |
|---|---|

यासी आज्ञा केली यसीजे. मल्हारजी व हणमाजी व संताजी मर्दाने बिन नरसोजी मर्दाने हे स्वामीचे कदीम शेवक. मल्हारजी मर्दाना याणे तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामीची सेवा निष्ठेने केली त्याउपरी हणमाजी व संताजी मर्दाना हे स्मामीची शेवा करीत आहेत. सांप्रत याणी पनालाचे मुकामी स्वामी संनीध विनंती केली की स्वामीची शेवा त्रिवर्गानी केली. बहुत दिवस केली आहे. तरी स्वामीनी आपल्यावरी मेहेरबान होऊन आपल्यास लेकराचे लेकरी चालेल असा इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून. त्यावरून स्वामी या त्रिवर्ग मर्दान्यावरी कृपाळू होऊन यासि नूतन इनाम कुलबाब कुलकानू खेरीज हकदार करून मौजे बावडे ता॥ हवेली कोलापूर या गावी पडीची जमीन असल दुम सीम या प्रतीची विसा पांडाचे विघियाने चावर ·।॥· पावणा चावर इनाम अजराम-हामत करून दिल्ह असे. तरी तुम्ही मौजे मा॥रपैकी सदरहू प्रतीची भूमी मोजून चतुःसीमा करून याचे दुमाला करून इनाम यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणे. साल दरसाल ताजा सनदेचा हुजूर न कर्णे. या सनदेची तालीक लेहोन घेऊन अस्सल सनद भोगवटीयासी याजवळी परतोन देणे. जाणिजे. निदेश समक्ष.

तेरीख ५
जमादिलाखर सु॥ सलास अशर.

---

१. खरे जंत्रीत रविवारी षष्ठी येते.

**क्रमांक : २५५** दि. १–७–१७१२

जगदेवराव निंबाळकर यानी घालतेल्या वेढयाचा उल्लेख या कागदात आहे.

श्री

तालीक

आज्ञापत्र श्रीमंत राजे बाहदर राजश्री हिंदुराव घोरपडे सरदेशमुख ता। मोकादमानी मौजे बोरिवड प्रां॥ कागल सु॥ सलास आशर मया आलफ. मौजे मारीस जगदेवराव निबाळकर याणी वेडा घातला असता आबाजी पाटील मौजे मारवर भांडणात पडला. त्याचे मुलाचे चालवणे आगत्य जाणऊन आबाजी पाटलाचा लेक केदारजी पाटील यासी इनाम पडी जमीन बिघे ८५ दिल्ही आहे. तरी तुम्ही सदरहु जमीनीचे मोजून विसापाडाचे बिघेने मारनिलेचे दुमाला कर्णे. ते आपले वंशपरंपरेने आनभवतील. साल दरसाल नवीन पत्राचा आक्षेप न करता या पत्राची प्रत लिहून घेऊन आसल पत्र मारनिले यास भोगवटेयास देणे. जाणिजे. छ ७ जमादिलाकर. मोर्तब आसे.

---

**क्रमांक : २५६** दि. २१–७–१७१२

हिंदुराव घोरपडे ह्यानी 'गंगाभागिरथी' सगुणाबाई हिला कोल्हापूर प्रांती सरदेशमुखीचे इनाम दिले होते. ते इनामपत्र कागल येथे आगीत जळाले म्हणून हिंदुराव घोरपडे ह्यानी तिला हे नवीन इनामपत्र दिले.

श्री

स्वस्ति श्री नृप शालिवान शके १६३४ नंदननाम संवछर अशाड वदी चतुर्दशी इंदुवार . श्रीमतु राजमान्य राजश्री हिंदूराव घोरपडे

सरदेशमुख यानी चिरंजीव गंगाभागिरथी सगुणा-
बाई यास लेहून दिल्हे इनामपत्र यैसेजे. सुा सन
सलास असर मया अलफ. तुम्ही करवीरचे मुकामी
येऊन विदित केले की प्राा कोल्हापूर येथोल

चौकोनी
शिक्का

सरदेशमुखी अपले खाजगी खर्चास पहिलेच अपण इनाम देऊन इनामपत्र करून दिल्हे. त्याप्रमाणे प्रतिवर्शी भोगवटा चालत आहे. यैसीयास इनामपत्र होते ते कसबे कागल येथे आपले घर अग्नदगध जाले ते समई पत्र गेले. नवी (न पत्र) असिले पाहिजे म्हणऊन विदित केले. त्यावरून लेहोन दिल्हे आहे. तरी प्राा कोल्हापुरची सर–देशमुखी देखील इनाम गाऊ दरोबस्त

मौजे म्हाळुंगे १ मौजे सांतरडे १

इनाम दिल्हा अहे. तरी प्राा मजकुरी मुकासा याची खंडणी व खंड कमाविसमुळे जे बेरीज अकारेल त्यास दरसदे १० दहा व दर चावरी इनाम बिघे ८२ दोन व विस्वा जकात व हक लाजिमा मोहतर्फा व जिरात व बागात व बाजे कानबाब वतनी खेरीज दाहिजा देवस्थान बिलाकुसुर तुम्ही अपले पुत्रपौत्रादि वौशपरंपरेने अनभवीत जाणे. हा इनाम शफतपूर्वक दिल्हा आहे. यास आमचे वौंशीचा कोण्ही इस्कील करील त्यास गोहत्या ब्रह्महत्तेचे पातके आहे. हे लेहोन दिल्हे इनामपत्र. सही. छ २७ जमादिलाखर.

मोर्तब

---

**क्रमांक : २५७** **दि. ३१–७–१७१२**

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी जोतिषपणाचा केलेला हा निवाडा. ह्यात मौजे आंबवडे व मौजे पिंपळे क।। सातवे ह्या ‘दोही गावचे सिमेस मार्कंडये म्हणून डोंगर होता तो थोरले कैलासवासी स्वामीने गड वसऊन पावनगड नाव ठेविले’ हा महत्वाचा उल्लेख आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदननाम संवत्सरे श्रावण शुद्ध नवमी गुरुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत पनाळा यास आज्ञा केली येसीजे. वेदमूर्ति शिवभट बिन नरसिंहभट ताशे वास्तव्य किले पनाळा याणी हुजूर येऊन विनंती केली की किले पावनगड व पेट संभापूर पावनगडचे माचीस आहे. तेथील जोतीसपण वृती पुरातन आपली. असे असता शामजी नरसिंह देशकुलकर्णी किले पनाळा याणी बळेच पावनगडचे जोतीषपण आटोपून संभापुरच्या जोतिषपणासी कथला मांडिला आहे. तरी स्वामीने चितास आणून पारपत्य करवया आज्ञा केली पाहिजे म्हणून विदित केले. त्यावरून शामजी नरसिंह यास आणून हरदूजणाच्या तकरीरा कागदपत्र भोगवटा गोही साक्ष मनास आणिता मौजे आंबवडे व मौजे पिंपळे का। सातवे या दोन्ही गावीचे जोतीषपण पुरातन शिवभट तासे याचे आहे. दोही गावचे सिमेस मार्कंडये म्हणून डोंगर होता तो थोरले कैलासवासी स्वामीने गड वसऊन पावनगड नाव ठेविले. गडास पाया घातला त्या दिवसापासून शामजी नरसिंह किले मजकुरचे जोतिषपण अनभवीत आहे. याला किलाचे जोतीषपण दिल्हे आहे येसा कागदपत्र कोणाचा नाही व दोही गावचे सीमेत डोंगर होता तो दिवाणात घेऊन किला वसविला तेव्हा गावाच्या बारा बलुत्यास व जोतोसपणास संमंध आहे येसे नाही. किलाचे जोतीसपण व वरकड वतने दिवाणाची आहेत. शामजी नरसिंह यास व शिवभट तासे यास संमंध नाही. संभापूरच्या जोतिसपणाची गोष्टी पाहता गडचे माचीस संभापूर पेट वसविली आहे परंतु गडाखाले आंबवडे गाव आहे तेथील जमीनीत पेट मजकूर वसविली आहे. गावीचे जोतीसपण शिवभट तासे याचे पूरातन करिता पेटेचेही जोतिसपण याचेच येसे गोही साक्ष पूर्वोतर भोगवटा मनास आणिता शास्त्र समते खरे जाहाले. शामजी नरसिंह यास संभापूरच्या जोतिसपणासी संबंध नाही. ते लाईनी

कथला करीत होते येसे जाहिले. यांकरिता संभापूर पेट नजिक किले पावणगड येथील जोतिसपणाची वृती शिवभट तासे याची आहे ते त्याचे स्वाधीन करून चालवावयाची आज्ञा करून तपसिले निवाडपत्र सादर आहे. त्याप्रमाणे संभापूर पेटेंचे जोतिसपणाची वृती शिवभट तासे यास व त्याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. या पत्राची प्रत लेहोन घेऊन मुख्य पत्र शिवभट तासे याजवळ देणे. निदेश समक्ष. मोर्तब आहे.

---

**क्रमांक : २५८** **दि. ३–८–१७१२**

छत्रपती राजाराम ह्यांनी हिंदुराव घोरपडे ह्याना संपूर्ण राज्याची सरदेशमुखी दिली होती. त्यापैकी हिंदुराव ह्यानी प्रांत कऱ्हाड व कर्यात औंधची सरदेशमुखी गिरजोजी यादव ह्याना दिली. छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी ह्या सनदेद्वारे गिरजोजी ह्याना ती सरदेशमुखी बहाल केली. ह्या सनदेत छत्रपती शिवाजी म्हणतात, "......राजश्री कैलासवासी स्वामीने सिंहगडचे मुकामी कैलासवास केला. स्वामीवरी व मातुश्री साहेबावरी (ताराबाई) संपूर्ण राज्याचा कसाला पडिला...."

श्री

श्री<br>प्रतिपच्चंद्र<br>लेखेव वर्धिष्णुर्वि<br>श्व वंदिता ॥ राम सु<br>नो: शिवस्यैषामुद्रा<br>भद्रा विराजते

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ३९ नंदन नाम संवत्सरे श्रावण शुध त्रयोदसी[1] भानुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति

---

१. खरे जंत्रीत त्रयोदशीचा लोप असून रविवारी द्वादशी पडते.

याणी राजश्री गिरजोजी बिन मुधोजी यादव देशमुख पा कऱ्हाड व

श्रीशि
व नरपति
हर्षंनिदान मो
रेश्वर सुत नी
ळकंठ प्रधान

श्री आई आ
दि पुरुष श्री राजा
शिवछत्रपती स्वामि
कृपानीधि तस्य
परशुराम त्र्यंबक
प्रतिनिधि

कर्यात आउंद व सरदेशमुख प्रांत मजकूर व माहालानिहाय यास दिल्हे वतनपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामी संनीध विनंती केली की पूर्वी तीर्थस्वरूप राजश्री ------ कैलासवासी स्वामी या प्रांताहून चंजी प्रांतास गेले ते प्रसंगी राजश्री हिंदूराव घोरपडे व आपण समागमे होतो. मार्गी उभयाताचे अमचे बोलणे जाले ते समई हिंदूराव घोरपडे स्नेहातिशेय-कडुन बोलिले की आपण राजश्री समागामे चंजीस जातो. तेथे गेलियावरी राजश्री स्वामी मेहरबान होऊन आपल्यास जे वैभव देतील त्याचा विभाग तुम्हास देऊन. येसे बोलोन क्रिया पुरस्कर निश्चय केला आणि राजश्री समागमे चंजीस गेले. तेथे पावलियाउपरी राव मार-नुलेवरी दया विशेषात्कारे करून भाग्य व वतन दिल्हे. आपल्याजवळी राजश्री स्वामीने कितेक वस्तभाव राजश्री संनीध ठेविली त्यावरून आपल्यावरीहो राजश्री स्वामीने विशेष दया करून संनीध ठेविले. त्याउपरी कितेका दिवसी राजश्री कैलासवासी स्वामी या प्रांतास आले. राव मारनुलेही आले. कैलासवासी स्वामीने कैलासवास केल्यानंतर स्वामीच्या दर्शनास हिंदुराव घोरपडे आले तेव्हा आपण त्यास पूर्व क्रियेस स्मरण दिल्हे. त्यावरून राव मारनुले श्री साक्ष करून बोलिले जे आपल्यास कैलासवासी स्वामीने भाग्य व राज्याचे सरदेशमुखीचे वतन दिल्हे आहे. यैसियास प्रांत कऱ्हाडचे सुभाचे सरदेशमुखीचे वतन तुम्हास देतो यैसे शफत पुरस्कर बोलोन आपले पत्र करून दिल्हे व स्वामीसही आपले विनंती पत्र दिल्हे. यैसियास आपण थोरले कैलासवासी स्वामी पासून स्वामीची सेवा बहुत दिवस केली आहे. तरी प्रांत कऱ्हाड व माहालानिहाये येथील सरदेशमुखीचे वतन आपल्यास वंशपरंपरेने चाले यैसी आज्ञा केली पाहिजे म्हणून विनंती केली की पूर्वी तीर्थरूप राजश्री कैलासवासी

स्वामी कर्नाटक प्रांतास गेले त्यासमागमे राजश्री गिरजोजी यादव व आपण होतो. मार्गी उभयताचे आमचे वोलणे जाले जे आपण कर्नाटकांत राजश्रीस घेऊन जातो तेथे गेलियावरी आपल्यास भाग्य प्राप्त होईल त्याचा विभाग तुम्हास देऊन. येसे शफत पूर्वक वचन दिल्हे आणि सिवमोग्येयाचे मुकामी आपण राजश्री समागमे चंजीस आलो. राजश्री कैलासवासी स्वामी आपल्यावरी मेहरबान होऊन सर्वापेक्षा उर्जित केले. राज्याचे सरदेशमुखीचे वतन मऱ्हामत करून चालविले. राजश्री गिरजोजी यादव याजवळी कितेक वस्तभाव व जड जवाहीर टाकिले होते ते माारनिलेंनी त्या संकट समयातून श्रम सोसून घेऊन चंजीस आले. वस्तभाव राजश्री संनोध प्रविष्ठ केली. यावरी राजश्री कैलासवासी स्वामी माारनिलेवरी संतोशी होऊन दया विशेषातकारे करून संनीध ठेविले. कैलासवासी स्वामीची सेवा त्याणी विशेषच केली. स्वामींची सेवा जिवाभ्य श्रम सोसून अति उत्कट केली अहे. स्वामीसही यांचे सर्व प्रकारे चालवणे परम अवश्यक अहे. अपलेंही वचन यास गुंतले अहे. तरी स्वामीनी मेहरबान होऊन कऱ्हाडचे सुभाचे सरदेशमुखीचे वतन मऱ्हामत केले पाहिजे म्हणून. यैसियासी तुम्ही स्वामीचे राज्यातील पुरातन सेवक. थोरले कैलासवासी स्वामी संनीध निकट वृतीने सेवा करून दया संपादून घेतली. त्यानंतर तीर्थरूप राजश्री संभाजी राजे काका यांची सेवा निकट सहवासे करून त्यांची कृपा विशेषात्कारे संपादन केली. त्याउपरी तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामीची सेवा बहुत निष्ठेने केली. कैलासवासी स्वामी या प्रांताहून चंजीप्रांते जात असता तुम्हीही समागमे होतेस. मार्गी सिवमोधेयाचे मुकामी कैलासवासी स्वामीने कितेक जडजवाहीर उंच उंच वस्तभाव तुम्हा जवळो (ठेवून) निघोन गेले. मागे तुम्ही मार्गी दुर्गट तैशा समयात हर प्रेत्न करून श्रमेकरून संपूर्ण वस्तभाव घेऊन चंजीस गेलेस. वस्तभाव अक्षतमरिष्ट राजश्री संनीध प्रविष्ट केल्या उपरी राजश्री कैलासवासी स्वामी अतिशयेसी तुम्हावरी संतोशी दया करून अंतपुरचा हवाला सांगोन विशेषात्कारे चालविले. त्यास कितेक

दिवसी जुलपुकारखान याणे चंजीहून निघोन यळुरास आले. मागे चंजी ताम्राने हस्तवस्य केली. त्या माहार्णवा समयामध्ये तुम्ही धाडस कर्म करून उभयता मातुश्री साहेबास व स्वामीस घेऊन येळुरास आलेस. तो श्रम व कसाला सामान्य केला ऐसे नाही. केवळ जिवाभ्य तवकल केले. येळुराहून कैलासवासी स्वामी या प्रांते आले ते समई मार्गी उभयेता मातुश्री साहेबाची व स्वामीची सेवा बहुतच केली. या प्रांते आलियावरी मुख्य ताम्राने राज्यावरी चालोन घेतले (?) गड किले आक्रमीत चालिला. तैशा प्रसंगात राजश्री कैलासवासी स्वामीने सिंहगडचे मुकामी कैलासवास केला. स्वामीवरी व मातुश्री साहेबावरी संपूर्ण राज्याचा कसाला पडिला. त्या समयात् तुम्ही स्वामीच्या राज्यावृधी विषई रात्री दिवस त्रिकर्ण शुधीन श्रमसाहास करून स्वामीस अपार संतोश पाविला. यास्तवे तुमचे दिवसेंदिवस ऊर्जित करून सर्वापेक्षा विशेष दया करून चालवणे हे स्वामीस परम अवश्यक आहे. याकरिता स्वामी तुम्हावरी मेहेरबान होऊन प्रांत कन्हाडचे सुभाची व कर्यात आऊंद येथील सरदेशमुखीचे वतन हक लवाजिंमा व इनामत व इसापत व पानमान तश्रीफ सिका नागरसहित अजरामऱ्हामत करून दिल्हे असे.[१] (इत्यादि)

---

**क्रमांक : २५९** **दि. ९–८–१७१२**

पुरंदर किल्यावर टांकसाळ सुरू करण्याबाबत छत्रपती शाहु ह्यानी माहाद शेट ह्या नावाच्या सोनारास पाठविलेले पत्र.

---

१ छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी ह्याच तारखेला देशमुख व देशकुलकर्णी अनुक्रमे ता॥ नाणेघोल पा॥ औंध व ता॥ तारळे प्रांत कऱ्हाड ह्याना आज्ञापत्रे दिली की, सदर्हु ता॥ नाणेघोल, प॥ औंध व ता॥ तारळे ह्यांची सरदेशमुखी गिरजोजी यादव ह्याना दिली आहे.

श्री

षट्कोनी शिक्का

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदन संवत्सरे श्रावण बहुल चतुर्थी मंदवासर क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शाहु छत्रपती स्वामी याणी माहाद सेटी सोनार चा व रा यासी आज्ञा केली यैसाजे. किले पुरंधरी टाकसाल घालावयाविसी राजश्री नारोपंत सचीव यासी आज्ञा केली आहे तरी........किले

शिक्का शिक्का

माजकुरी इमाने राहून टाकसाल घालणे. टाकसालेचा हासील हजार रुपयेस रु. ३१। व संभर मोहारास रु॥ ३४ येणे प्रा मोईन आहे. त्या प्रा हासील जमा होईल त्यापैकी टाकसालच्या प्रयोजनास पोतदार व जमादार व सोनार वगैरे लोक स्वामी नेमून देतील त्यास निमे हासील मोईन प्रा लोकास पावेल. निमे रयतेचा यैवज होऊन रसद पावणे. जाणीजे लेखनालंकार.

शिक्का

रुजु

पै॥ छ० १९ राजब[1]

---

**क्रमांक : २६०** **दि. १९-८-१७१२**

मौजे खेबवडे ह्या गावचा पिराजी घाटगे ह्याना मिळत आलेला जहागीर व फौजदारीचा ऐवज श्री स्वामीस द्यावा म्हणून हिंदुराव घोरपडे ह्यांचे मोकदमानी मौजे खेबवडे ह्यास आज्ञापत्र. सदर कागद शंकराचार्यांच्या मठासंबंधाने आहे.

---

१ दि. ११-८-१७१२

सुबराज

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री हिंदूराव घोरपडे ममलकतमदार ताा मोकदमानी मौजे खेबवडे पाा कागल. सुहुर सन सलास अशर मया आलफ. मौजे मजकूर श्री स्वामी यास पूर्वीपासून इनाम आहे. त्यास मध्ये राजश्री पिराजी घाटगे सर्जाराऊ याकडे मौजे मजकूरपैकी जागीर व फौजदारीचा यैवज पावत होता. तो यैवज देखील श्री स्वामीचा स्वामीकडे अनक्षेत्राचे खर्चास दिल्हा असे. तरी तुम्ही श्री स्वामीचे आज्ञेप्रमाणे वर्तोन यास व याचे शिश्य परंपरेने जागीर व फौजदारीचा यैवज देखील मौजे मजकुरचा यैवज बिलाकुसूर याकडे वसूल देत जाणे. ( इत्यादी )

छ. २७ रजब.

---

**क्रमांक : २६१** **दि. २९–८–१७१२**

मौजे केरेतपीच्या गावची देवदेवस्की व्यवस्थित झाली नाही तर गावाची वसती वाढत नाही. म्हणून देवस्कीच्या खर्चासाठी काही जमीन सरकारातून मिळावी अशी विनंती रामजीराव बाबाजीराव आरुळेकर ह्यानी केली असता ती मंजूर करून सदहूं गांवच्या देवदेवस्कीच्या खर्चास पांच बिघे जमीन धर्मादाय दिली आहे, असे रामचंद्र नीळकंठ अमात्य हे हवालदार व कारकून तर्फ खारापाटण ह्याना लिहितात.

श्री

ऽ मशहुरुल अनाम हवालदार व कारकून तर्फ खारापाटण वर्तमान व भावी यास रामचंद्र नीळकंठ अमात्य सुहुरसन सलास अशर मया व अलफ. रामजीराऊ व बाबाजीराऊ अरूळकर मिरासी मौजे

केरेतपीचा याणी हुजूर येऊन गगनगडचे मुकामी विनंती केली जे मौजे माा देवस्थाने ज्यागृत आहेत. श्री गांगोबा ईश्वर पाच श्रीभूतनाथ माऊल्या रामाई यांसी धर्मादाय पेशजी राजश्री अनाजी पंत यांही मोईन करून दिली होती. दाभोळी करी ९४ चे राण व त्याप्रमाणे चालत आले.

श्री राम
चेंद्र चेरण
नीलकंठ सो
नदेव शरण

मध्यें कुडाळकर सावंताचे धामधूम जाहाली. त्यामुळे गाव खराब पडिला होता. त्याउपरी सन इहिदेमध्यें किले गगनगडचे कारकुनानी किला आणून लावणीचे वाबे हुकुम केला. त्यास मौजे मजकुरची देवस्की नीट जाहालीया वेघळे लावणी होत नाही म्हणऊन मालुम केले. त्यावरून दिवाणातून तेला बाा गला देसरी ८३ तीन मण देविला आणि बेल भरवसा दिला कीं पेशजी धर्मादाय होता तो पेस्तर चालऊन. त्यावरून मौजे मजकुरी लावणी दुजबी केली. परंतु देवस्की बहुत कठीण आहे. खर्च वर्च केलियाविना गांवी माणसास पाळत नाहीं. तरी साहेबी मेहेरबान होऊन पेशजी धर्मादाव होता तो चालवावा म्हणून अर्ज केला. ऐसीयासी मनास आणिता मौजे मारची देवस्कीस खर्च विशेष लागतो तो दिल्हाविना गावी वस्ती होत नाही. हे जाणोन पेशजीचे ठराव करी धर्मादाय होता तो दूर करून सदरहू देवास धर्मादायाबदल जमीन रेड्याचे सेत पैाा ठिकाण धाणीकांड बिघे ८४ व उच हक नदी किनारा बिघा ८१ यकूण पडपैकी वरकस जमीन पांच बिघे देविले असे. त्याची चतु:सीमा करून देऊन साल दरसाल चालवणे. ताजे सनदेचा उजूर प्रतिवर्षी न कर्णे. पत्राचे प्रती लेहून घेऊन असल पत्र ग्रामस्ताजवळी भोगवटियास देणे. सदरहू जमीन देविली. ऐसीयास साल मजकुरी देवस्की जाहाली पाहिजे. याकरता इतलाख गला देसरी

८३ बा॥ साल गुदस्तां
·।१ ज्याजती माल माार देविला

---

·।४

येकूण नव मण ठेविला असे. मौजे मजकूरपैकी देणे. पेस्तर सन आरबापासून जमीन नेमून द्याल त्याप्रो चालवणे. जाणिजे छ. ७ साबान. निदेश समक्ष.

बार सुरु सुद बार

लेखन
सीमा स
मक्षवधी

---

**क्रमांक : २६२** **दि. ५-९-१७१२**

हिंदुराव घोरपडे ह्यानी कागलचे राणोजी घाटगे ह्याना खालील गावे इनाम दिली. सदर्हू गावे पिराजी घाटगे ह्यांच्या वतनाची होती. ते निधन पावल्यावर ती खालसा करण्यात आली होती. परंतु राणोजी घाटगे ह्यांच्या विनंतीवरून सदर्हू गावचे वतन त्याना चालू करण्यात आले.

श्री सुबराज
सिका तालिक

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री हिंदुराव घोरपडे ममलकतमदार ता। मोकदमानी कसबा व देहाय. बी तपसील---

| | | |
|---|---|---|
| क॥ दिगरज बा॥ | मौजे दिगरज खुर्द | मौजे तुंग |
| १ | १ | १ |
| मौजे बाउदलो | मौजे बारगाव | मौजे आलसंद |
| १ | १ | १ |
| मौजे कलणगाव | मौजे डोंगरसोनी | मौजे गोरगाव |
| १ | १ | १ |

यकुन देहाव नऊ क॥ दिगरज प्रा। कागल सुर सन सलास अशर मया व अलफ. राजश्री पिराजी घाटगे सर्जाराव देसाई हे प्रा। मजकूर हे मृत्य पावले येसे जाणोन त्याचे वतन अमानत केले. यास मारनिलेचे पुत्र राजश्री राणोजी घाटगे राउ देसाई हुजूर येऊन रुजु जाहले. त्याजवरून याचे देशमुखीचे वतन यास कुमाला करून दिल्हे आसे. तरी तुम्ही

सुधामत चालले प्रमाणे याची वतनी मामला बिलाकुसुर चालवित जाणे. हुजूर न करण. जाणिजे[१]. रा छ १४ साबान.

प्रा हुजूर मोर्तब.

---

**क्रमांक : २६३** **वि. २८-९-१७१२**

दशरथ जोशीराव ह्यांचे गोणीचे बैल कोकणातून जे जिन्नस आणतील त्यांवर जकात घेऊ नये असे आज्ञापत्र

स्वति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदननाम संवत्सरे आश्वीन शुध नवमी[२] रविवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी कमाविसदारानी व लोकानी जकात माहालानिहाये यास आज्ञा केली येसीजे. राजश्री दशरथ जोसी जोसीराव याचे खासगत बैल सुमार १० दाहा गाव वरघाटे व कोकणात हरयेक जागा जाऊन गलादाणा हरजिनस खरीदी करून आणतील. त्यास तुम्ही मार्गी जकातीचा व हरयेक विसीचा उपसर्ग काही न देणे. सुखरुप आमद्रफ्ति[३] करू देणे. निदेश समक्ष.

---

१. ह्याच तारखेची व ह्याच मजकुराची आणखी पाच वतनपत्रे आहेत. त्यात पुढील गावे इनाम दिल्याचा उल्लेख आहे. मौजे भगंदुर, मौजे येमेगरणी, मौजे भिवसी, मौजे ल्हाकवे, मौजे कौलगे, मौजे बसावडे, मौजे आजुर, मौजे सानगे, मौजे बालिंगे, मौजे गोरंबे, मौजे केनवडे, मौजे निगव, मौजे वालव खुर्द, मौजे बेरवाड, मौजे बिदरी, मौजे सानाली, मौजे दुदीखडी, मौजे बेलवाल बाऊण, मौजे होलवाळ खुर्द, मौजे केबाळी, मौजे चंद्र, मौजे सांके बाउणी, कसबा मांजरी, मौजे आंकली, मौजे माणगाव, मौजे रुई, मौज सीर्दवाड, मौजे चोकाक, मौजे सानणी, मौजे सिरगाव, निमे, कसबा मुरगुड, मौजे चिमगाव, मौजे येमेगे, मौजे सुरुदली, मौजे कुरुकली, मौजे निढोर, मौजे भडगाव, मौजे मलगे बाउ, मौजे मलगे खुर्द, मौजे चांडोल, मौजे सावर्डे खुर्द, मौजे कुरणी, मौजे पिपळगाव बाउ, मौजे सावर्डे बाउ, कसबा हवेली, मौजे करनुर, मौजे वंदुर, मौजे पिपळगाव, मौजे सिदुनेरली, मौजे येंकाडी, मौजे बामणी, मौजे खेबावडे, मौजे संकरवडी, मौजे सेंडुर, मौजे बाचणी, मौजे साके खुर्द.

२. खरे जंत्रीत रविवारी दशमी असून नवमीचा लोप आहे.

३. रहदारी, वळणवळण.

**क्रमांक : २६४** **दि. ७–१०–१७१२**

चांदजीराव राणे ह्यांच्या लोकाना उपद्रव देऊ नये म्हणून छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांची मालोजी भोसले मुद्राधारी किल्ले गगनगड ह्यास ताकीद.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदननाम संवत्छरे आस्वीन बहूल चतुर्थी भौमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपती याणी राजश्री मालोजी भोसले मुद्राधारी किले गगनगड यासी आज्ञा केली यैसीजे. रा चांदजीराव राणे याकडे

सिका सिका

गणोजी कोलते व याचे निसबतीचे लोक आहेत. त्यास तुम्ही सावंताकडेच होतेस म्हणून दबाविता. तरी त्या लोकास पहिलेच कौल देऊन आणिले आहे. याकरिता मारनिलेच्या लोकास यकंदर न दबाविता यासी कथला सर्वथा न करणे व फिरोन हुजुर बोभाट येऊ न देणे. निदेश समक्ष.

मोर्तब.

---

**क्रमांक : २६५** **दि. १९–१०–१७१२**

हिरोजी साठम ह्याना फोंड सावंत ह्यानी पकडून नेले होते. सावंतांच्या कैदेतून निसटून आल्यावर त्यानी छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांना विनंतीपत्र पाठवून त्यांची सेवा करण्याची इच्छा दर्शविली असतां छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी त्याना हंबीरराव मोहिते सरलष्कर ह्याना भेटण्याबद्दल पत्र पाठविले.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदन नाम संवत्सर कार्तीक सु॥ प्रतिपदा रविवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राज्या शिव छत्रपती याणी राजश्री हिरोजी साठम यांस आज्ञा केली असीजे. तुम्हावरी फोंड सावंत याणी स्वारी पाठवून

सिका

सिका

धरून नेले. परंतु तुम्ही तेथे न राहता उपाय करून स्थळास आलेस. पुढे स्वामी सेवा करून दाखवावी आपले सेवेचा हुजुरा करून द्यावा ऐसी उमेद धरिता. म्हणून राजश्री संताजी साठम हुजुर आलेपणी विदित जाहाले. त्यावरून स्वामी तुम्हावरी संतोषी जाले. तरी तुम्ही स्वामीचे कदीम एकनिष्ट शेवक आहा. सावंतापासून उपाय करून निघोन स्वस्थळी आलेस. बहुत उतम केले. अशास राजश्री हंबीरराव मोहिते सरलष्कर यांस त्या प्रांते रवाना केले आहेत. लौकरीच यतील. तरी तुम्ही व तुमचे पुत्र गणाजी साठम असे यऊन जमावानसी राव मशारनिल्हेच्या भेटी घेणे. हे तुमच्या पूर्वील सरंजामा प्रमाणे चालवितील हे जाणून स्वामी-कार्य करून आपले सेवेचा हुजुरा करून घेणे. निदेश समक्ष.

लेखन सीमा.

---

**क्रमांक : २६६** **दि. ५-११-१७१२**

आंग्रे व पोर्तुगीज ह्यांच्या मध्ये तहाच्या वाटाघाटी होत होत्या. हा तह झाला नाही, असे गोव्याचा व्हाइसरॉय आपल्या राजास लिहितो.

महाराज

कान्होजी आंग्रे ह्यानी चौलच्या किल्लेदाराकडे तहाचा जो मसुदा पाठविला होता, तो तह पार पडला नाही. कारण, त्या मसुद्यांतील कलमे आंग्र्यांनी बदलण्यास नकार दर्शविला. ह्या राज्याचा दर्जा आणि प्रतिष्ठा लक्षांत घेऊन करारातील कलमे दुरुस्त होणे आवश्यक आहे. जर आंग्र्यांनी आपला हट्ट सोडून कलमे बदलण्यास संमती दिली आणि तो करार जर आम्हाला अनुकूल असला, तर आपल्या आज्ञेनुसार आम्ही त्याच्यावर सह्या करू. न झाल्यास सांप्रतची परिस्थिती

चालूच राहील. तीत बदल होणे अशक्य आहे. माझी अशी भावना आहे की, दैवी इच्छा असल्यास फळ चांगले मिळते.

माझ्या बलाढ्य व श्रेष्ठ स्वामीचे देव रक्षण करो व त्याना जन्मभर सुखी ठेवो.

गोवा, ५ नवंबर १७१२
व्हाइसरॉय

---

**क्रमांक : २६७** **दि. २३-११-१७१२**

छत्रपतीं शिवाजी दुसरे ह्यानी सत्पुरुष आनंद मूर्ति ह्यांच्या वृंदावनाच्या उत्सवासाठी पंधरा बिघे जमीन इनाम दिली.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदन संवत्सरे मार्गसीर्ष शुध सप्तमी[1] भानुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी
राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी
सिका सिका सुभा प्रांत पनाळा यास आज्ञा दिली असीजे.
वेदमूर्ति श्रीमंत आनंदमूर्ति याचे पुत्र रा कृष्णाजी गोसावी पनाळच्याचे मुकामी स्वामी संनीध येऊन विनंती केली की आपल्या तीर्थरूपाचे वृंदावन बांधोन नित्य उत्सव चालवित आहो. येशास उत्सव प्रसंगास आनकूलता नाही. स्वामी धर्मपारायण आहेत जरी काही भूमी इनाम करून दिल्हे तरी उत्छव विशेष चालेल म्हणून. त्यावरून मनास आणिता आनंदमूर्ति थोर सत्पुरुष होते. त्याचे वृंदावनी नित्योत्सव चालिल्याने परम श्रेयस्कर आहे. यास्तव वृंदावनास इनाम कुलवाब कुलकानू खेरीज हकदार करून पडीची जमोन भात रोपाची विसापांडाचे बिघेयाने बिघे ( पुढे जमिनीचा तपशील आहे )

---

१. खरे जंत्रीत सप्तमीचा लोप आहे.

येकूण बिघे पंधरा रास इनाम अजरामरामत करून दिल्हा असे. तरी तुम्ही सदरहू गांव पैकी सदरहू जमोन भात रोपाची हादी मोजून चतु:सीमा प्रा। त्याचे स्वाधीन करून इनाम यास व याचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. साल दरसाल ताजा सनदेचा हुजुर न करणे. या सनदेची तालिक लेहोन घेऊन असल सनद भोगवटीयास परतोन देणे. जाणिजे. लेखनालंकार.

मोर्तब असे.

तेरीख ५

जिल्काद, सूहूर सन सलास अशर.

---

**क्रमांक : २६८** **दि. २४-११-१७१२**

कसबा हवेली कोल्हापूरमधील आपल्या सरदेशमुखीचे उत्पन्न महालाचे कमाविसदार राजश्री व्यंकाजी व हवालदार ह्यांच्या विद्यमाने भरावे म्हणून हिंदुराव घोरपडे ह्यांची क॥ हवेली कोल्हापूरमधील तमाम गावच्या मोकदमाना ताकीद.

चौकोनी शिक्का

अज्ञापत्र श्रीमंत राजमान्य राजश्री हिंदुराव घोरपडे सरदेसमुख ता। मोकदमानी देहाये गावगना क॥ हवेली कोल्हापूर. सुहुर सन सलास असर मया अलफ. देहे मजकुरी सरदेसमुखीचा इनाम कदीम चालत आहे व हली दर चावरी बिघे ८२ दोन प्रा। मोईन आहे. तेणेप्रमाणे महालचे कमाविसदार राजश्री वेंकाजी व हवालदार याचे विदमाने वसूल देणे. या गोष्ट + + हैगैकेलिया मुलाहिजा होणार नाही. खुद निसबत गावगना मसाले होतील. यैसे पस्ट समजोन लिहिलेप्रा। यैवज पावता करणे. जाणिजे.

रा। छ ६ जिलकाद. शिक्का मोर्तब.

---

**क्रमांक : २६९** **दि. २९-११-१७१२**

कोल्हापुरच्या महालक्ष्मीस मौजे उचगाव हा गाव मोकासा दिला आहे. तरी त्या गावास कोणत्याहि प्रकारचा उपसर्ग देऊ नये म्हणून छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे गोंदजी गायकवाड, नामजाद किल्ले पन्हाळा ह्यास आज्ञापत्र.

श्री

श्री महालक्ष्मी

स्वस्ति (श्री) राज्याभिषेक शके ३९ नंदननाम संवछरे मार्गसीर्ष शुद्ध त्रयोदशी मंदवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपंती यांणी राजमान्य राजश्री गोंदजी गायकवाड नामजाद किले पनाळा यासी आज्ञा केली ऐसीजे. श्री वास्तव्य स्थल करवीर हे जागृत स्थान. येथे नित्य पूजा उत्साह चालिला पाहिजे. यास्तव मौजे उचगाव ताा कोलापूर हा गाव देवीकडे मुकासा दिल्हा आहे. देवीचे पूजारी गावचीं लावणी संचणी करून तेथील ऐवज आणून नित्य पूजा उत्सव चालवितील. तरी तुम्ही हे जाणून मौजे मजकूर देवीकडे मुकासा चालोन तेथील ऐवज सुरळीत पावोन नित्य पूजा उत्साह चाले गावास उपसर्ग कांही न लागे ते गोष्टी करणे. बहुत काय लिहिणे.

सुरु सुद

मोर्तब असे.

---

**क्रमांक : २७०** **दि. ७-१२-१७१२**

मौजे उंचगाव महालक्ष्मीच्या पूजा अर्चेच्या खर्चासाठी मोकासा म्हणून दिला आहे. तरी त्याचा खंड देवस्थानचे पुजारी शामभट मुनेश्वर ह्यांच्याकडे पाठवावा म्हणून हिंदुराव घोरपडे ह्यांची मोकादम मौजे उंचगाव ह्यास आज्ञा.

श्री सुबराज

श्री महालक्ष्मी

चौकोनी शिक्का

आज्ञापत्र समस्त राजकार्ये धुरंधर विस्वासनीधी राजमान्य राजश्री हिंदुराऊ घोरपडे ममलकतमदार ताा मोकदमानी मौजे उचगाऊ हवेली कोल्हापूर सु।। सलास असर मया आलफ. मौजे मजकूर हली हुजूरुन राजश्री स्वामीनी श्री च्या पूजेस मुकासा दिल्हा आसे. तरी तुम्ही मौजे मजकुरच्या खंडणी आकार प्रा यैवज श्री च्या पुजस शामभट मुनिस्वर पुजारी याच्या विद्यमानें देत जाणे. जाणीजे. छ१९. जीलकाद.

चौकोनी शिक्का

---

**क्रमांक : २७१** दि. ८-१२-१७१२

चंद्रसेन जाधव ह्यांचे मौजे उचगावच्या मोकदमाना आज्ञापत्र कीं सदर्हु गावचा ऐवज महालक्ष्मीकडे देणे

श्री रामचंद्र[1]

महालक्ष्मी

श्री<br>राजा शिव<br>चरणी दृढ भा<br>व शेनापती चं<br>द्रशेन जाध<br>वराव

आज्ञापत्र समस्त सेना धुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री जयसिंग जाधवराऊ सेनापति जप्तनमुलुक ताा मोकदमानी मौज

---

१. 'श्री रामचंद्र' ही अक्षरे वेगळ्या वळणाची आहेत.

उचगाव ताा हवेली कोल्हापुर सु॥ सलास अशर (मया) अलफ. मौजे मजकूर श्री च्या पुजाअर्चेस राजश्री स्वामीने इनाम करुन दिल्हे आहे. तरी तुम्ही मौजे मजकुरची कुलबाब कुलकानु दिल्हे आहे. तरी मौजे मजकुरचा आकार प्र॥ जो ऐवज होईल तो श्रीकडे पावणे आणी सुखरुप मौजे मजकुरची कीर्दी आबादानी करून सुखरुप राहणे. कोणेविशीचा तुम्हास आजार लागणार नाही. सरकारचे लोकास ताकीद पत्र पाटविले आहे. तरी या उपर कोणाचा आजार लागणार नाही ये विशी आपला खातरजमा असो देणे. जाणीजे. राा छ २० जिलकाद[१]

विलसति
लेखनाव
धि मुद्रा

---

**क्रमांक : २७२** **दि. २३-१२-१७१२**

रायाजी मल्हार ह्याना दौलताबाद व खानदेश प्रांतात नामजाद म्हणून पाठविण्यात आले होते. त्याचा उल्लेख ह्या आज्ञापत्रात आहे.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिशेक शके ३९ नंदन नाम सवत्सरे पौष्य सुध सप्तमी भोमवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपती याणी राजमान्य राजश्री खंडेराव यादव यासि आज्ञा केली ऐसीजे. राजश्री रायाजी मल्हार यावरी स्वामी कृपाळु होऊन दौलताबाद खानदेश प्रांते नामजाद पाठविले आहेत. तरी तुम्ही सर्व प्रकारे यांची सत्यता करीत जाणे. तुम्हाकडे बाबतीचे माहाल मुकासे आहेती बी॥

वाटूलूज १ कनड १ गालणा १ बेटवाद १ आंबे १

---

१ 'राा छ २० जिलकाद' ही अक्षरे वेगळ्या वळणाची आहेत.

येणे प्रमाणेचे माहाल तुम्हाकडे मुकासे आहे. सदरहू माहालची हे खंडणी करून देतील त्याप्रमाणे वसूल घेणे. सदरहू माहालचे जकातीचा यैवज वसूल होऊन हुजुर रसद पावतील. तरी याचा अमल सुरळीत चालवणे.

---

**क्रमांक : २७३** **दि. २७–१२–१७१२**

गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालच्या राजास लिहितो की, आंग्रे हिंदुस्थानात बलाढ्य बनले असून सगळ्यांनाच त्यांचा वचक वाटतो.

महाराज

आंग्यानी सांप्रत उत्तरेच्या समुद्र किनाऱ्यावर लुटालुटीचे सत्र सुरू केले आहे. काही बंदरांचा त्याना आश्रय मिळत असल्याने त्याना ही मोहीम चालू ठेवणे शक्य झाले आहे. केवळ हिंदुस्थानातील सत्तांशीच नव्हे, तर युरोपियन सत्तांशीहि त्यांच्या झटापटी सुरू आहेत. त्यानी एवढे मोठे सामर्थ्य संपादन केले आहे, की सगळ्यानाच त्यांचा वचक वाटतो. आतां त्याच्याशी तह करणे हे केवळ अशक्य प्रायच झाले आहे असे नाही; तर तहाची गोष्ट काढणे देखील कठीण होऊन बसले आहे. आतां फक्त एकच उपाय उरला आहे आणि तो म्हणजे त्यांच्याशी युद्ध करून त्याना नष्ट करणे. न झाल्यास अल्पावधीतच ते सर्व राष्ट्रांना भारी होतील. त्याना कसें नष्ट करायचे हाच विचार माझ्या मनात सदैव चालू आहे. कारण, तह आतां अशक्य होऊन बसला आहे.

माझ्या श्रेष्ठ आणि बलाढ्य स्वामीचे देव रक्षण करो व त्याला सुखांत ठेवो.

गोवा २७ डिसेंबर १७१२

क्रमांक : २७४ इ. स. १७१०–१७१२

छत्रपती शाहू आणि रामचंद्र पंत अमात्य ह्यांच्यामधील करार.

श्री

यादीवरून तुम्ही लिहून पाठविल्या ३/१ प्रमाणे मान्य केली असे–

सबनिश्या किलाच्या

| | |
|---|---|
| १ पनाळा | १ मांच पद्ममावती |
| १ प्रसिधगड | १ प्रचंडगड |
| १ भुदरगड | १ वंदनगड |
| १ विजयदुर्ग | १ सजनगड |
| १ सिधेदुर्ग वतनी | १ व्याध्रगड |
| १ रत्नागिरी | १ वसंतगड |
| रामगड | १ प्रचीतगड |
| ६ | १ महिमतगड |
| | ८ |

कारखानिश्या किलाच्या

| | |
|---|---|
| १ कुलाबा | १ पावनगड |
| १ सिधेदुर्ग | १ वर्धनगड |

किलांच्या सरदाऱ्या घ्याव्या

वसं(त) गडी गड मोरो उधव १

प्रतापगडी ठेवणें ते आम्ही घेऊं. १

| | |
|---|---|
| वर्धनगड | भुदरगड |
| १ | १ |
| सारंगगड | पांडवगड |
| १ | १ |

लस्काराच्या मजमा आमचे निसबतीच्या करार कराव्या.

| | |
|---|---|
| शेनापती | सरलष्कर |
| १ | १ |
| कुसोमळकर(?) | संताजी पांडरा |
| १ | १ |
| हिंदुराऊ घोरपडे | बाळाजी विस्वनाथ |
| १ | १ |

विज्यापूरे प्रांतीची सरबरीचा सरंजाम रा मोरेस्वर राऊ याच्या नांवे चालत आहे तो व फुटगाव त्याच्या सरंजामाचे आहेत ते चालवावे. याखेरीज जबाबतीचे सुभे जमातीकडे दिल्हे आहेत तें चालवावे.

| | |
|---|---|
| सुभा खाटाव | सुभा माण |
| १ | १ |
| सुभा मिरज | फुटगांव कोंकण प्रांत |
| १ | |

मुलकी सुभेदार आम्ही आपले
निसबतीचे ज्यास देऊं ते चालवावे.

जाउली प्रा कऱ्हाड प्रा दाभोल
१ १

सुभा मिरज बालाघाट सुभा खटाव
१ १

सुभा वाई प्रां हुकेरी सुभा राजापूर
१ १ १

प्रां पनाळा संगमेश्वरचा हवाला
१

दौलताबाद सातारा
१ १

वतने चालत आहेत त्याची पत्रे
करून घ्यावी.

सरदेशमुखी ता आजिरे देशकुलकर्णी
१

ता साळसी ता खारेपाटण

सदरहू वतने चालत आहेत त्यांची
पत्रे करून घ्यावी व खेरीज सावोत्रा
राज्यातील वतन करून घ्यावे.

नरगुंद प्रांतीचे किले व कोट पेटा
कोथल आमचे नि॥ आहे ते
चालवावे. सरदारी आपाजी
सुरास द्यावी १

आरमार आमचे नि॥ आहे ते
चालवावे.

१ करबुडे ता हातखंबे
१ निवडे ता सैतवडे
२

इनाम गाव आहेत जे ते चालवावे.

राशिवडे गाव संताजी चव्हाण
घरात साडी- यासी बागइणी
चोळीस १ ता पांवस १

शेलोली चिरंजीव मौजे वेतोसी
बाजीरावास ता तपे
१ हातखांबे
रामराऊ बाबाजी
नरगुंदकर १

रामराऊ बाबाजी यासी संगमे-
श्वरची एक गाव. बेरजी हजार
लारी कमाल दस्ताचा घ्यावा १

चिरंजीव राजश्री बाजीरावांच्या
नावे मजमु देऊन बहुमाने
चालवावे. आम्ही मान्य पुरुष
हुकमतपन्हा आहो ते चालवावे.
सर्व राज्यकारभार आम्ही
वडीलपणे करून मजमूचा धंदा
व जिल्हा मजमूचे नि॥ चिरंजीव
बाजीराव चालवितील त्यास
मजमूच्या नावे ऐवज पंन्नास
हजार रुपयांचा व खासा आमचे
खाजगी खर्चास पनास हजार
रुपये येकून लाख रुपयांची बेगमी
करून घ्यावी. त्यास जे गाव
आम्हाकडे आहेत ते वजा करून
उरला ऐवज नेमून द्या. १

| | | |
|---|---|---|
| विजयदुर्ग आमचे | | रत्नागिरीस |
| वत ( ना ) स | | किलाचे आरमार |
| आरमार १ | | आहे ते खेरीज |
| गुराब | सिबाडा | करून धोंडो |
| १ | ५ | भास्कराकडील |
| | | होते ते देवावे १ |

जिल्हा आपणांकडे घ्यावा प्रांत
कोंकण सुभे

| | |
|---|---|
| १ जाऊली तळघाट व वरघाट | १ सुभा दाभोळ |
| | १ ताा संगमेस्वर |
| १ व्याघ्रगड | १ सुभा राजापूर |
| १ वाई | १ सुभा कुडाळ |
| १ सातारा | १ सुभा बांदे |
| १ कऱ्हाड | १ सुभा फोंडे |
| १ मलकापूर | १ सुभा लालबाडी |
| १ पनाळा | १ सिवेस्वर |
| १ तारले | आकोले |
| | दो॥ |

८

१ कोल्हापूर
१ मिरज
१ विज्यापूर
१ आजिरे
१ पलिकडे तहदुर्ग वाघ्र
१ खटाऊ
१ माण
१ प्राा दरांडे
१ प्राा बालाघाट
१ बेदर प्रांत
१८

वेंकटाचार्ये यांचे बाप कौन भट हे बहूत थोर ब्राह्मण होते. त्याज इनाम गाव मौजे येकसार प्रांा वाई आहे तो करार करावा १

व्यंकटराऊ कृष्ण याकडे आमचे जमेगीची घोडी आहेत त्याचा सरंजाम त्या प्रमाणे आहे तो करार करावा.

मुलकी मामल्यास मुतालिक पहिल्यापासून आहेत ते चालवावे· कोकणात येक ठेवावा लागतो व वरघाटे येक ठेवावा लागतो त्या प्रग करार करावा.

१ रामराव बावनजी
१ श्रीनिवास सिवदेऊ
२

गाव मुकासे चालत होते ते करार करून चालवावे.

| किता गाव खासा | किता गाव क॥ | क॥ कोंकणप्रांत | कि॥ कोकणप्रांत |
|---|---|---|---|
| १ वामोरी ता॥ | १ सावगाव क॥ | ६ सुभा दाभोळ | ४ ता॥ सैदल |
| राहुरी | हुकेरी | १ नादगाव | १ डोगर |
| १ का॥ नारायण- | २ धणगर | १ नीवली | १ कन्हेरी |
| गांव | १ पांचगणी | १ पालवण | १ आंगले |
| १ खांडाळे ता॥ | १ नादू | १ कलबुसी | १ मोरोसी |
| कडवलीत | २ | १ आडरे | ४ |
| १ तादळी ता॥ | ६ प्रांत पनाळा | १ गोवल | २ खारापाटण |
| राजा (?) | १ पेठ | ६ | १ तिथवली |
| गाडवत इनाम | १ ओतवडे लोकचे | ६ ता॥ संगमेस्वर | १ दिगस |
| आहे | १ हातकणगले | १ मुरबांड | २ |
| १ बेदेगाऊ ता॥ | १ आबप | १ तुरर | १ का॥ प्रभावळी |
| १ वड्या ता॥ | १ दरेली ता॥ | १ कडवई | ३ ता॥ नेवर |
| कहेदणर | बोरगाव | १ सारद | १ कीसबा |
| १ दाबुरडी ता॥ | १ कोताली ता॥ | १ कलबस्त | १ पुसाले |
| नगर | बोरगाव | १ कुरघोडे | १ कोतवडे |
| १ कुलादावी ता॥ | ६ | ६ | ३ |
| दहीगाव | ६ प्रांत मलकापूर | २ ता॥ देवरूख | ४ ता॥ लाजे |
| १ कुसुही ता॥ | १ आंबर्डे | १ का॥ देवरूख | १ हर्चे |
| मेसे | १ सिराळे | १ मुरादपूर | १ भडे |
| १ का॥ मेसे | १ का॥ मलकापूर | | १ खावडी |
| १ का॥ केडबे | | | १ गाव्हणे |
| १ का॥ वांई | | | ४ |
| १ पावसाल प्रां॥ | | | १४ |
| वाई | | | |

३ प्रा कऱ्हाड
१ तांबवे
१ वेहे
१ नाणेघोल
३
४ प्रा तारळे
१ हिरवडे
१ कुरकुली
१ धामणवाडी
१ संगरूल
४
१ दामीळ ता आजिरे
४ सुभा कोल्हापूर
१ कोगे
१ नंदवाड
१ नागाव
१ इसफुली
४
२५
२६ तेरीज २६
५१

२ ता बारूण
१ दुखावाडी
१ चादोली
२
१ बाबती करसे गावीच्या
६
१ त्रिपुडी ता पावचा
१ कोकिसरे ता मरळी
४ प्रा बालाघाट
१ मोंडू
१ खांबसवाडी
१ हेटकुर
१ तलवडे
४
१ सिरदवाड ता हुकेरी
१ हेरवाड प्रांत हुकेरी
१ पाली ता कासी
२ ता खानापूर
१ मेघोली
१ वेगरूल
२

२ ता हराचिरी
१ सोमेश्वर
१ का दौवरी ४ बंदर
२
२ ता पावस
१ गोलप
१ कोलब दो
२ इा सरदेसाई
४ ता हातखांबे
१ ऐसाडे
१ निवसा
१ केले
१ माजगाऊ
४
४ ता राजापूर
१ आडिवरे
१ नावसा नारो नीळकंठ
१ गोटणे हरनिवडे
१ कलसोळी
४
२६

की॥ गावकारकुनाचे व लोकाचे आहेत ते चालवावे

तेरीज

| | |
|---|---|
| ९१ खासा | ४२ कोंकण प्रांते |
| ६५ कारकून व लोक | २३ वरघाट प्रांते |
| १५६ | ६५ |

येणे प्रमाणे माप करून हे पत्र सादर केले आहे. याप्रमाणे विलाकसूर तुमचे चालऊ यास अंतर सर्वथी नाही.[1] लिहिल्या प्रमान वर्तनूक केली जाईल. यास आतराय न होय. तुमी आलीयार्व चालऊ यास आतर करू तर आम्हा सपत असे.

मर्यादेयं
राजते

---

**क्रमांक : २७५** **दि. ११-१-१७१३**

मौजे उचगाव हा गाव 'रावसाहेब' ह्यानीं महालक्ष्मीच्या पुजेस दिला होता त्या प्रमाणे आम्हीहि दिला आहे, असे सिदोजी हिंदुराव घोरपडे ह्यांचे उचगावच्या मोकदमाला आज्ञापत्र.

श्री

चौकोनी शिक्का

आज्ञापत्र राजमान्ये राजश्री सीदोजी हिंदुराव घोरपडे ता। मोकदमानी मौजे उचगाव हवेली कोलापुर सु।। सलास असर मया व आलफ. मौजे मजकूर राजश्री रावसाहेबी[2] श्री च्या पुजेस मुकासा दिल्हा आसे. तरी तेणे प्रा। आम्हीही करार केला आसे.

१ येथून पुढे शाहुचे हस्ताक्षर हे स्पष्टच आहे.
२ बहिर्जी हिंदुराव घोरपडे.

खंडणी आकारप्रमाणे यैवज श्री च्या पुजेस शामभट मुनेस्वर पुजारी याच्या वीद्यमाने देणे. उजूर न करणे.

छ २४ जील्हेज.

पाहुनु[1]

---

क्रमांक : २७६ दि. २७-१-१७१३

रामजी तुवार देसाई हा उदाजी काटकर ह्याच्याशी झालेल्या लढाईत स्वामी सेवा बजावित असता ठार झाला म्हणून छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी त्याच्या बायकोस भामटे गावी दोन बिघे जमीन इनाम दिली.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदननाम संवत्सरे माघ शु॥ द्वादशी भोमवासरे क्षेत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति स्वामी याणी राजश्री नरसो विरेश्वर देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी सुभा प्रांत पनाळा यास आज्ञा केली येसीजे. राणाई बायजा इणे पनाळाचे मु॥ स्वामी सनीध्ध येऊन विनंती केली की आपला दादला रामजी तोवार देसाई याने (?) भामटे येथे होता. त्यास उदाजी काटकर यास माचकर याणे कोल्हापुरी असता मौजे मजकुरावरी स्वारी केली. ते समई त्यासी युद्धप्रसंग जाला. ते समई मृत्यु पावला. आपण लेकुरवाली बायको. मुले लहान. प्रतिपालन करावयास कोणी नाही. तरी महाराज काही इनाम करऊन दिल्हा तरी तेथे शेत करून अन्न उत्पन्न होईल ते भक्षुन मुलांचे संरक्षण करून सुखरूप राहेन म्हणून विदित कैले. त्यावरून मनास आणिता रामजी तोवार देसाई याणी उदाजी माचकराचे स्वारी आली ते समई युद्ध प्रसंग बराच केला आणि

---

१ अक्षर वेगळे. सिदोजीचे अक्षर (?)

स्वामी कार्यावरी पडला. त्याचे वायकोचे व मुलाचे चालवणे स्वामीस अवश्यक. याजकरिता राणाई बाईको ईस नूतन इनाम कुलवाब कुलकानू हकदार करून पडीची जमीन अवल दुम सीम प्रतीची मिळोन विसा पांडाच्या बिघीयाने मौजे भामटे ता। कल्हे या गावापैकी बिघे ८२ दोनी बिघे रास इनाम करून दिल्हा असे. तरी सदरहु जमीन मोजून चतु:सीमा करून देऊनु इनाम पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. सालदरसाल ताजा सनदेचा हुजुर न करणे. जाणिजे. लेखनालंकार. मोर्तब असे.

ता ।। १०[1] मोहरम सु।। सलास अशर मया व अलफ.

---

**क्रमांक : २७७** **जानेवारी १७१३**

इ. स. १७१३ सालच्या जानेवारीत गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालच्या राजास जे प्रदीर्घ मोसमी पत्र लिहीले, त्यात पोर्तुगीज आणि आंग्रे ह्यांच्या मधील युद्ध संबंधीचा उल्लेख आहे. तो म्हणतो की आंग्रे हे बलाढ्य, वैभव संपन्न आणि धनवान असून आपल्या काळजीचा ते एक विषय होऊन राहिले आहेत. त्या पत्रातील आंग्र्यासंबंधीचे परिछेद खाली दिले आहेत.

महाराज

.......................................................................

.......................................................................

मी राज्याची सूत्रे हाती घेतली आहेत. परंतु खजिना रिकामा असून मनुष्यबळाचीहि कमतरता आहे. मावळते व्हाइसरॉय दों रुद्रिगु द कॉश्त हे आपणाला तत्संबंधीचा अहवाल सादर करतीलच.

---

१ खरे जंत्रीत छ ११ पडतो.

आरमाराची योग्य त्या वेळी रवानगी करण्यासाठीं काही गोष्टीची आवश्यकता आहे. हिंदुस्थानचे सुदैव किंवा दुर्दैव त्यावर अवलंबून आहे. गेल्या वर्षी उत्तरेकडील आरमाराचा सबंद काफिला नष्ट होण्याचे दुर्दैव आमच्यावर ओढवले. तें संकट यंदा उद्‌भवू नये म्हणून काळजी घेतली. यंदा तीन फ्रिगेटस्, चार पाली, एक पताश आणि दोन मचवे पाठविले. तरीहि गनीम आंग्रे गेल्या वर्षाप्रमाणे यंदाहि डल्ला मारता येईल का बघण्यासाठीं आपल्या सर्व सामर्थ्यानिशी काफिल्याच्या पाळतीवर होता. त्याने चार पाली आणि सहा गलबते आमच्या आरमाराच्या मागावर पाठविली. आमची दोन पाली एका व्यापारी जहाजासह बरीच मागे होती. शत्रूच्या चार पालानी आणि सहा गलबतानी त्यांच्यावर हल्ला चढविला. ही आरमारी लढाई सतत दोन दिवस आणि दोन रात्री चालली. शत्रूची बरीच माणसे ठार व जखमी होऊन त्याने माघार घेतली. आमची तीन माणसे कामास आली. तींत एक पाद्री आहे.

गेल्या वर्षी दों क्रुझ द कॉश्त ह्यानी जर आपल्या काफिल्याबरोबर काही हलक्या युद्धनौका घेतल्या असत्या, तर त्यांच्यावर सबंद काफिला गमावण्याचा व त्याबरोबर कप्तानपदास मुकण्याचा घोर प्रसंग ओढवला नसता. त्या वेळीं माणसेहि पुष्कळ ठार आणि जखमी झाली. यंदा दों क्रुश द कॉश्त ह्यांचे पुतणे दों लुइज द कॉश्त ह्यानी मोठाच पराक्रम गाजविला.

सांप्रत आंग्रे हा ह्या राज्याचा सर्वांत मोठा धोकेबाज शत्रू आहे. तो धनवान, बलाढ्य आणि संपन्न आहे. त्याने आतापर्यंत अनेक सावजांची शिकार केली आहे. माझ्या काळजीचा तो एक मोठा विषय होऊन राहिला आहे. कारण, आमच्या उत्तरेकडील ठाण्याच्या संरक्षणाची व्यवस्था कमकुवत आहे. तथापि हा काळा (आंग्रे) आणखी

बलाढ्य होऊ नये म्हणून त्याचा नाश करण्याची मोहीम मी यंदाच्या उन्हाळ्यात सुरु करणार आहे.

आमच्या उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती लुईज द मेलु द सांपायु ह्यांचा भाऊ लोपु द सांपायु ह्यानाहि आंग्र्याकडून एक पराभव पत्करावा लागला. सदरहु लोपु द सांपायु हे आंग्र्याच्या प्रदेशावर हल्ला करण्याच्या इराद्याने माणसे गोळा करीत असल्याची बातमी मला कळली, तेव्हां मी जनरल लुईज द मेलु द सांपायु ह्याना लिहिले की, आरमाराचे आगमन होण्यापूर्वी लोपु द सांपायु ह्यानी त्या धाडसास प्रवृत्त होऊ नये. लुईज द मेलु द सांपायु ह्यानी मला कळविले कीं, आपल्या हुकुमाप्रमाणे मोहीम स्थगीत करण्यात येत आहे. परंतु काही दिवसानी त्यानी आंग्र्याच्या प्रदेशावर स्वारी केली. प्रथम त्याना विशेष प्रतिकार झाला नाही. पण नंतर त्या धाडसाचा शोचनीय अंत झाला. शत्रूचे सैन्य आमच्या सैन्याहून कमी असून देखील आमच्या सैन्याचा पराभव होऊन त्याला पळ काढावा लागला. केवढी नामुष्किची गोष्ट! ह्या मोहिमेत आमचा एक अधिकारी आणि पुष्कळ सैनिक कामास आले. शस्त्रें आणि दारूगोळाहि मागे टाकावा लागला. ह्या अपयशामुळे मला लुईज द मेलु द सांपायु ह्याना त्यांच्या स्थानावरून दूर करून त्यांचे जागी ह्या राज्याचे एक सल्लागार मानुएल द सौझ मिनेझिश ह्यांची उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती म्हणून नेमणूक करावी लागली. ते जुने सैनिक असून अनुभवी आहेत. उत्तरेकडील प्रदेशाचे ते माजी गव्हर्नर असल्याने तिकडील मुलुखांत ते पुष्कळ हिंडले फिरलेले आहेत.[१] ..............................

..........................................................................

---

१. प्रस्तुत पत्रावर तारीख नाही. परंतु ते जानेवारी १७१३ मधले आहे, असे **Arquivo Portugues Oriental** चे संपादक **Dr. A. de Braganca Pereira** ह्यानी पत्राचे शेवटीं म्हटले आहे.

क्रमांक : २७८ दि. ६-२-१७१३

मौजे बोरिवडे गावावर जगदेवराव निंबाळकर व मानाजी पवार ह्या दोघांचा हल्ला झाला, तेव्हा त्यांचा प्रतिकार करीत असता आवाजी चव्हाण हा ठार झाला म्हणून सिदोजी हिंदुराव घोरपडे ह्यानी केदारजी ह्या त्याच्या मुलास मौजे बोरिवडे ह्या गावी जमीन इनाम दिली.

श्री

नकल

सिका

आज्ञापत्र राजमान्य राजश्री सिदोजी हिंदुराव घोरपडे ताा मोकदमानी मौजे बोरिवड प्रांा कागल सु॥ सलास अशर मया अलेफ. नंदन नाम संवछरे माघ बहुल सप्तमी भृगुवार. चेनजी चव्हाण पाटील मौजे मजकूर याणी येऊन विदित केले की मौजे मजकुरावरी राजश्री जगदेवराव निबाळकर व मानाजी पवार याणी स्वारी केली. युध्ध प्रसंग जाहाला. युधात आबाजी चव्हाण आपला धाकठा भाऊ ठार पडला. त्याची मुलमाणस कुळी उघडी पडली. त्याणी तो येकनिष्ठपण राजश्री साहेब यांच्या पायाजवळ राहात असता येकायेकी राजश्री जगदेवराव याणी गावावरी येऊन आबाजी पाटील मारिला. तुम्ही थोर सरदार. त्याचा पुत्र केदारजी चवाण याचे चालवणे हे विहित आहे म्हणोन विनंती केली. त्या वरुन मनास आणिता आबाजी पाटील येकनिष्ट. त्याचे (चालवणे) आम्हास अगत्य होय. यैसीयासी कांही गुना नसता गावावरी हाला करुन आबाजी पाटील ठार मारला. त्याचा पुत्र केदारजी चवाण याचे चालवणे आगत्य. याज निमित्य मौजे मजकूर पै॥ सेत उतम ·।· भरकीर्दीची जमीन देविली आसे. तरी उतम शेत केदारजी चवाण यास दुमाला करुन वंश परंपरेने चालवणे. उजुर न कर्णे. जाणिजे. छ २१ मोहरम. पा॥ हुजुर. खुनाबदल मौजे मजकुरी इनाम करुन दिल्हे आहे. तरी असल पत्र देऊन तालीक लेहून घेणे. जाणिजे. छ माार परवानगी हुजुर. मोर्तब.

**क्रमांक : २७९** **दि. १२-७-१७१३**

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी कागलचे पिराजी सर्जेराव घाटगे ह्याना कागलच्या नाडगौडकीचे इनाम त्यांच्या विनंतीवरून दिले.

श्री

नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४० विजयेनाम संवत्छरे श्रावण शुद्ध १ रविवासरे क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शिव छत्रपती स्वामी याणी राजश्री विठाजी बिन पिराजी सर्ज्याराव घाटगे देशमुख प्रांा। कागल यांस दिल्हे इनामपत्र येसाजे.

सिका पेशेवेंचा सिका प्रतिनिधीचा

तुम्ही स्वामीसंनिध विनंती केली की पूर्वापार स्वामी सेवा एकनिष्ठपणे केली व करीत आहे. अशास स्वामी कृपाळू होऊन कागल येथील नाडगोडकीचे वतन आम्हास इनाम करून दिल्हीया स्वामी सेवा येकनिष्ठपणे करु. त्याजवरून मनास आणिता तुम्ही पुरातन घरंदाज. स्वामीच्या पदरचे येकनिष्ठपणे शेवा करीत आले. पुढेंही स्वामीच्या पायापासी निष्ठा धरून शेवा कराल. यास्तव कृपाळू होऊन प्रांत कागल येथील नाडगौडीचे वतन प्रांत मारचे गावगना दर चावरी काठीमुळे जमोन बिघे ८२ दोन व हक दर शेकडा रुपये २ दोन व कानू काइदे व इनाम गाव मौजे वाडीर प्रांत मार येणेप्रमाणे अजरामऱ्हामत करून दिल्हे असे. तरी प्रांत मारचे नाडगौडीचे वतन तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन वतनाची शेवा करुन सुखरूप राहाणे. जाणिजे. निदेश समक्ष.

रुजु समत सुद

तेरीख ५[1] मंत्री

जिल्हेज सु॥.............. बार सुरु सुद बार

---

१. मुसलमानी तारीख चुकीची आहे.

क्रमांक : २८० दि. २३-९-१७१३

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी ह्या इनामपत्राद्वारे चांदजी बाजीराव राणे व संभाजी बाळाजीराव राणे ह्याना मौजे नावळे तर्फ खारापाटण हा गाव इनाम दिला.

श्री

नकल

अष्टपैलू शिक्का

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४० विजयनाम सवत्छरे आश्विन पुर्णीमा सौम्यवासरे क्षत्रोय कुलावतंश श्री राजा सिव छत्रपति याणी राजश्री चांदजी बिन बाजीराव व संभाजी बिन बाळाजीराव राणे यास

श्री शा<br>वु नरपती ह<br>र्षं नीदान मोरे<br>श्वर सुत नीळक<br>ठ प्रधान

श्री आई आदिपुरुष<br>श्री राजा सीव छत्रपती<br>स्वामी कृपानीधी परष<br>राम त्र्यंबक प्रतीनी<br>धी

दिल्हे इनामपत्र ऐसाजे. तुम्ही स्वामीचे राज्यातील पुरातन सेवक. आजिवरी स्वामीच्या पायासी यकरूप निष्टेने (सेवा) करीत आहा. याकरिता तुमचे सर्व प्रकारे चालवणे परम अवश्यक आहे. सांप्रत तुम्हो स्वामोसंनीध विनंती केली को आपल्यास लेकराच्या लेकरी चाले असा इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून. त्यावरून स्वामो तुम्हा उभयता बंधूवरी कृपाळू होऊन तुम्हास नूतन इनाम कुलबाब कुलकानू खेरीज हकदार व इनामदार करून मौजे नावळे तर्फ खारापाटण प्रांत राजापूर देह १ यक रास इनाम अजरामऱ्हामत करून दिल्हा असे. तरी मौजे मजकूर पूर्व मर्यादेप्रमाणे चतुःसीमा आपल्या स्वाधीन करून घेऊन इनाम तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन सुखरूप स्वामीची + + करून

रहात जाणे. स्वामी तुम्हास इनाम सुरक्षीत चालवितील. लेखनालंकार.

मर्यादेयं
विराजते

रुजु सुरुनिवीस

तेरीख १३ रमजान. सुरु सन अर्बा अशर मया.

---

**क्रमांक : २८१** **दि. २३-९-१७१३**

गणोजी कोलत्या, गणाजी रोग्या, कृष्णाजी कानडा व कानोजी मांडकर हे चौघे चांदजी अराळेकर ह्यांच्याकडे नोकरीला होते. ते नोकरी सोडून निघून गेले असल्याचे छत्रपती शिवाजी दुसरे ह्याना कळले असता त्यानी त्या चौघाना सदर्हू अराळेकर याजकडे येऊन त्यांच्या आज्ञेत राहाण्याचा हुकूम केला.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४० विजयेनाम संवत्सरे अश्विन बहुल प्रतिपदा[1] सौम्यवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी गणोजी कोलत्या व गणाजी रोग्या व कृष्णाजी कानडा व कानोजी माडकर यासी आज्ञा केली ऐसीजे.

सिका सिका राजश्री चांदजीराव अराळेकर याजवळ तुम्ही पहिले राहून सेवा करीत होतेस. त्याप्रमाणे हली या जवळ येऊन राहत नाही म्हणून हुजुर विदित जाले. तरी ऐसे करावयास तुम्हास गरज काय. चांदजीराव याजकडे मौजे सोनाळी तर्फ खारापाटण हा गाव जमावाचे बेगमीस आहे व हली मौजे नावले त॥ खारापाटण हा गाव इनाम दिल्हा आहे. तरी तुम्ही या दोही गावीत येऊन राहाणे आणि सेतभात करून पहिल्या सारखे चांदजीराव

---

१ तारीख वाराप्रमाणे काढली आहे. खरे जंत्रीत प्रतिपदेचा लोप आहे.

याजवळ राहून याचे आज्ञेप्रमाणे वर्तत जाणे. लेखनालंकार. मोर्तब.

रुजु सुरुनिविस

सुरु सुद बार

---

**क्रमांक : २८२** **दि. २३-९-१७१३**

अर्जोजी कुसुरकर हा गावातील उपद्रवामुळे परागंदा झाला होता. छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांचे त्याला दिलेले हे अभयपत्र.

श्री

० श्री ˘
प्रतिपच्चंद्र लेखेव
वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
राम सुनो: शिवस्यैषा
मुद्रा भद्राय राजते ॥

स्वति श्री राज्याभिषेक शके ४० विजयनाम संवत्सरे आश्विन बहूल प्रतिपदा[1] सौम्यवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी अर्जोजी कुसूरकर यासि दिल्हे अभयपत्र येसेजे. तूं कुसूरात असता तुजला कितेक उपद्रव लागला. या करिता तू परागंदा जालास. या उपरी कौल दिल्ह्याने गांवात येऊन कीर्द करणार म्हणून चांदजीराव राणे

श्री
शिवनरपति
हर्ष निदान ।
मोरेश्वर सुत
निळकंठ प्रधान

श्री
श्री आई आदि पुरुष
श्री राजा शिव छत्रपति
स्वामि कृपानिधि । तस्य
परशराम त्र्यंबक
प्रतिनिधि

---

१. खरे जंत्रीत प्रतिपदेचा लोप आहे. वाराप्रमाणे तारीख काढलेली आहे.

याणी विदित केले त्यावरून तुजला हे अभयपत्र सादर केले आहे. तरी तू कोणेविशी शंका न धरिता गांवावरी येऊन राहून कीर्द करणे. तुजला कोणेविशीचा तगादा लागणार नाही. अभय असे. जाणिजे. लेखनालंकार.

मर्यादेयं
विराजते

---

**क्रमांक : २८३** **दि. ५-१०-१७१३**

हंबीरराव मोहिते सरलष्कर ह्यांचे मौजे उचगावच्या मोकदमाना शामभट मुनेश्वर ह्याच्या आज्ञेत राहून त्यास वसूल देत जाणे म्हणून अभयपत्र.

श्री
शिव चरणी
दृढभाव । सर
लश्कर मोहिते
हंबीरराव

अभयपत्र समस्त सेना धुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री हंबीरराऊ मोहिते सरलस्कर ताा मोकदमानी मौजे उचगांव प्रांा कोल्हापूर सु॥ आर्बा अशर मया अलफ. मौजे मजकूर श्री करवीर निवासिनीस इनाम आहे. म्हणून वेदमुहुर्ती राजश्री शामभट मुनेश्वर याणी विदीत केले. त्यावरुन अभय पत्र सादर केले असे. तरी तुम्ही कोणेविसी शक न धरिता कीर्द आबादानी करुन सुखरुप आसोन वेदमुहुर्ती माारनुलेचे आज्ञेत वर्तोन वसुल देत जाणे. जाणिजे. अभय आसे. राा छ २५ रमजान. मोर्तब सुद[1]

लेख
नावधि
मुद्रा

---

१ 'मोर्तब सुद' ही अक्षरे वेगळी आहेत.

क्रमांक : २८४ दि. २०-११-१७१३

शाहू छत्रपती हयानी पिलाजी जाधव हयाना मौजे दिवे कर्यात सासवड हा गाव पूर्वीच्या मोकाशाकडून दूर करून इनाम दिला.

श्री

स्वति श्री राज्याभिषेक शके ४० विजयानाम संवत्सरे मार्गशीर्ष शु॥ १५ भृगुवासरे[1] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी मोकदम

श्री
राजा शाहू नरपती हर्ष निधान बाळाजी विश्वनाथ मुख्य प्रधान

श्री
श्री आईआदिपुरुष श्रीराजा शाहू छत्रपति स्वामीकृपानिधी तस्य परशराम त्रिंबक प्रतिनिधी

मौजे दिवे[2] कर्यात सासवड सुभा प्रांत पुणे यास आज्ञा केली ऐसीजे. राजश्री पिलाजी जाधव स्वामीच्या पायाशी येकनिष्ट म्हणून याजवरी स्वामी कृपाळू होऊन मौजे मजकुर पेशजीचे मुकाशी याजकडून दूर करुन हल्ली मशारनिल्हेस इनाम कुलबाब कुलकाळी खेरीज हक्कदार व इनामदार यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने दिला असे. तरी तुम्ही यांचे रजातलब वर्तोन मौजे मजकुरचा ऐवज मशारनिल्हेकडे वसूल देत जाणे. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र भोगवटीयास मशारनिल्हेकडे परतोन देणें. लेखनालंकार.

मर्यादेयं
राजते

---

१. वाराप्रमाणे तारीख काढलेली आहे.

२. छत्रपती शाहू ह्यानी मौजे नांदेड हा गाव पूर्वीच्या मोकाशाकडून दूर करून पिलाजी जाधव हयाना इनाम दिल्याचे वरील दिनांकाचे (२०-११-१३) पत्र उपलब्ध आहे.

क्रमांक : २८५ दि. १-१-१७१४

चांदजीराव व संभाजीराव अरुलेकर ह्यांची वस्तभाव लुटली गेली. ती त्याना परत करण्याबद्दल रामचंद्रपंत 'हुकुमत पन्हा' ह्याना आज्ञा केलेल्याचा उल्लेख ह्या पत्रात आहे.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४० विजयनाम संवत्सरे पौष बहुल येकादसी भृगुवासर क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी चांदजीराऊ व संभाजीराऊ अरुलेकर यांसी आज्ञा केली

शिक्का शिक्का

ऐसिजे विनंतीपत्र पाठविले ते प्रविष्ट जाहले. गगनगडकरी यानी आपल्यावरी अतिशये करून धरून आणिले. वस्तभाव नेली. त्याउपरी स्वामीने त्यांस आज्ञा केली त्यावरून सेवकास निरोप दिल्हा. परंतु वस्तभाव कांही दिल्ही नाही. मनास माने सारिखे दवावितात याकरिता आपण स्थल टाकून वरघाटे आलो आहो. स्वामीच्या पायाविना दुसरा अर्थ काही जाणत नाही. आपले चालवणार स्वामी धनी समर्थ आहेत म्हणून हे वृत्त कितेक तपसिले लिहिले ते विदित जाहले. यैशास तुम्ही स्वामीचे येकनिस्ट सेवक. तुमचे चालवणे स्वामीस अवश्यक. याकरिता राजश्री रामचंद्र पंडीत हुकुमतपन्हा यांस आज्ञापत्र सादर केले असे हे त्यास पाववणे. म्हणजे ते गगनगडकरी यांस ताकीद करून वस्तभाव देववितील व पुढेही तुम्हांसी कथला न करीत यैसे करितील. तुम्ही आपले समाधान असो देणे. लेखनालंकार.

शिक्का

क्रमांक : २८६ दि. १७–१–१७१४

गोव्याच्या व्हाइसरॉयने दि. १७–१–१७१४ रोजी पोर्तुगालच्या राजास जे मोसमी पत्र पाठविले, त्यात आंग्र्यासंबंधीचा उल्लेख आहे. तो परिच्छेद खाली दिला आहे. त्यात आंग्र्याशी झालेल्या एका आरमारी लढाईचा वृत्तांत आहे.

महाराज

.............. .............. ..... ... ......... . ....... ..

............ . ....... ....... ........... ....... ... .. ...

गेल्यावर्षी मार्च महिन्यात मी चौलला माणसे, दारुगोळा आणि हत्यारे भरून चोवीस तोफांचे एक फ्रिगेट पाठविले. ही सर्व मदत जमिनीवर उतरविल्यावर आंग्रे आपल्या सर्व आरमारासह आमच्या फ्रिगेटच्या शोधार्थ आले. आंग्र्याच्या आरमारात पाच पाली आणि बारा गलबते होती. आमच्या फ्रिगेटच्या शोधा करिता आंग्र्याचा आणखी वेळ जाऊ नये, अथवा ज्या विजयाची आशा मनात बाळगून ते आले होते त्याचाही सोक्षमोक्ष व्हावा म्हणून आमच्या फ्रिगेटच्या कप्तानाने आंग्र्याना तोंड देण्याचे ठरविले. लढाईस बुधवारी सकाळी सुरुवात झाली व ती शुक्रवारी रात्र पडेपर्यंत चालली. आंग्र्याची विजयाची आशा फोल ठरून त्याना मोठी नुकसानी सोसून त्यांच्या एका बंदराचा आश्रय घ्यावा लागला. त्यांच्या सर्व पालांची मोडतोड होऊन एकाने पाण्याचा तळ गाठला. त्यांचीं १८० माणसे ठार व १७६ जखमी झाली; आमची १८ माणसे ठार व २२ जखमी झाली. आमच्या फ्रिगेटची थोडी नुकसानी झाली. ही लढाई चालू होती तेंव्हा इंग्रजांची दोन फ्रिगेट्स कुलाबा येथे आंग्र्यांशी एक अपमानास्पद तह करण्यात गुंतली होती. मुंबईच्या सेनापतीने हा तह आमच्या शत्रूशी केला. लढाईत भाग घेतलेल्या सर्व अधिकाऱ्यांचा मी

ज्यांच्या त्यांच्या दर्जाप्रमाणे मानसन्मान केला. ते ह्या मानास पात्र आहेत म्हणून नव्हे, तर इतरानी त्यांचे अनुकरण करावे म्हणून.

आंग्र्यांचे गर्वहरण करण्यासाठी व त्यांचा बेमुर्वतपणा नाहीसा करण्यासाठी त्याना शासन करणे आवश्यक आहे. परंतु कुमकेच्या अभावी मी त्यांच्याशी युद्ध करू शकत नाही. तरीही कुलाब्याची नाकेबंदी करण्यासाठी मी उत्तरेकडील आरमारातील पाच पाली, दोन मचवे आणि आठ गलबते पाठवून दिली आहेत. ह्या आरमारी तुकडीचे नेतृत्व कॅप्टन मोर आंतॉनियु कार्दिम ह्यांच्याकडे दिले आहे. तीन महिने झाले, आंग्र्याचे आरमार त्यांच्या तळाबाहेर पडलेले नाही.

..................................................................

..................................................................

गोवा, १७ जानेवारी १७१४

---

**क्रमांक : २८७** दि. १६–३–१७१४

रामचंद्र नीलकंठ हयानी चांदजीराव व कान्होजीराव राणे अरुलेकर ह्या दोघाना लिहिलेल्या प्रस्तुत पत्रात त्यांच्या कृत्याची कानउघाडणी केली आहे.

श्री

मा। अनाम चांदजीराऊ व कानोजीराऊ राणे अरुलेकर यांसी

रामचंद्र निलकंठ हुकुमतपन्हा सुरु आर्बा अशर मया अलफ. तुम्ही विनंतीपत्र पाठविले त्यावरून व सालिंके बापूजी व दादजी कदम व हिरोजी दलवी याणी तुमचा अर्थ निवेदन केल्यावरून विदीत जाला. सारांश तुम्ही लिहिला जे आपल्या जिवावर आले तकवा न निघे ऐसे

देखोन स्थलत्याग केला. याउपरी स्वामीने कृपावलोकन केले तरी आज्ञे प्रो वर्तणुक करू म्हणवून भावभक्तिचा प्रसंग लिहिला तो कलला. अशासी आजिवर कोणाचे अनिष्ट जाले असे काही नाही. तथापि तुम्ही पदरचे म्हणवीत असता नसतीच शंका मनात आणून गत व्यसनातून पुढेमागे बदनामी लागे ऐसी वर्तणुक कराविसी नव्हती. आमची स्वारी बावड्यास जाली तेव्हा तुम्ही येतेस तरी सर्व प्रकारे तुमचा निगम जाला असता. बरे ते गोष्टीचे काय आहे अद्याप तुम्ही विवेकावर येऊन निष्टेस अंतर पडो न देता स्व स्थलास आलेस तरी तुमचे अकल्याण आहे असे नाही. सर्व प्रकारे तुमचे चालऊन सेवा घ्यावी हेच अवश्यक असता तुम्हीहून स्व आचरणे अंतर पाडावे यामध्ये स्वहित की अनहित हे बरे दुरवर विचार करून पाहा. नसती शंका चित्तात आणिली असेल ते टाकून दुसरा अर्थ चित्तात आणिता. हूजूर दर्शनास येणे दलासुद्धाची (?) यादी लेहून पाठविली तरी तुमचे चालवणे जरूर असता येथे येऊन विनंतो केल्याने न चाले असे नाही. तथापि चित्तास आणून आलाहिदा लिहिले आहे त्याप्रमाणे किबहुना तुमचे निष्ठेनरूप अधिकोत्तर चालवया अंतर नव्हे. तिथवली मारून नेऊन कुणब्यास दंड करून चिंधी चोला केला ही गोष्ट तुम्ही उत्तम न केली. खासगत गाव होता कललाच होता. याउपरी ते कुणबी वजराबजरा (?) त्याची सूट फिरोन देऊन हुजूर पाठवणी याचवरून तुमचे निष्टेचा प्रसंग विदीत होईल. सारांश गोष्ट दुष्कर्मास प्रवर्तली याने कल्याण आहे असे नाही. निष्ठा धरून निःसंदेह वृत्तीने येऊन हुजूर जालेस तरी तुमचे गोत एक करावया अंतर नव्हे. येविस आपले तुम्ही समाधान असो देणे. छ १० रबिलावल. निदेश समक्ष.

शिक्का

क्रमांक : २८८ दि. २७-३-१७१४

सिदोजी हिंदुराव घोरपडे ह्यांनी हिरोजी, प्रतापजी व संताजी नाईक साठम ह्या तिघाना लिहिलेले हे पत्र असून त्यांत ते म्हणतात की, 'तीर्थरूप राजश्री कैलासवासी राऊसाहेब (बहिर्जी घोरपडे) व तुमचा स्नेह होता त्या पेक्षा विशेष स्नेहाची अभिवृद्धि होय ते करणे'.

श्री

राजश्री हिरोजी साठम व प्रतापजी साठम व संताजी नाईक साठम गोसावि यासि–

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने।। सिदोजी हिंदुराव घोरपडे ममलकतमदार सु।। अर्बा अशर मया अलफ. राजश्री बाजी साठम याणी कित्येक वर्तमान सांगितले त्यावरून करणे त्या गोष्टीचा विचार सांगावयाचा सांगून तुम्हांकडे पाठवून दिले आहेत. त्याचे तुमचे भेटीनंतर कळेल. आम्हीही लवकरच राजदर्शनाकारणे त्या प्रांतास येत आहो. तिकडे आल्यावर राजश्री बाजी साठम यांस पाठवून देणे. कर्तव्यार्थ प्रसंगाचा विचार करणे तो केला जाईल. तुमचे विषयीचा प्रसंगास आम्हाकडून अंतर पडणार नाही. आपले समाधान असो देऊन तीर्थरूप राजश्री कैलासवासी राऊसाहेब व तुमचा स्नेह होता त्यापेक्षां विशेष स्नेहाची अभिवृद्धि होय ते करणे. वरकड मजकूर तुम्हास सांगतां कळो येईल. रवाना चंद्र २१ रविलावल. मोर्तब सूद.

शिक्का

क्रमांक : २८९ दि. १४–६–१७१४ (?)

रामचंद्र नीळकंठ ह्यांचे हिरोजी साठम ह्याना पत्र की, रत्नागिरीस माणसे लवकर पाठवावी. पावसाळा आला आहे म्हणून थांबू नये.

राजश्री हिरोजी साठम व प्रतापजी साठम गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य ——————

स्ने।। रामचंद्र निळकंठ आशिर्वाद. सु।। खमस अशर मया अलफ. रत्नागिरीस लोक रवाना कर्णेविषयी हुकूम आहे. ऐशीयास तुम्ही पहिले बाजी साठम यास पाठविले आहे तेवढीयाने गनिम हाकरितो असे नाही. करिता हे पत्र लिहिले आहे. तरी पत्र पावताच आणखी निवडक हल्लीपेक्षा माणसे सत्वर रवाना करणे. ए विषयी तुम्हास पूर्वी लिहिले आहे वरून तुम्ही लोक सिद्ध केले असतीलच. परंतु रवानगीस पर्जन्य काळ आला म्हणून दिवसगत लावाल तरी एकंदर जमाव ज्या क्षणी पत्र पावेल त्या क्षणी रवाना करणे. बाकी मजकूर हुजरत धाकु पाठविला आहे. तो सत्वर रवाना करणे. चंद्र १२ जमादि + + +

---

क्रमांक : २९० दि. २६–६–१७१४

छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांनी रघुनाथ नारायण (हणमंते ?) ह्यांची पत्नी नागराबाई हिला मौजे कोथली हा गाव इनाम दिला.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४१ जयेनाम संवत्सरे आधिक आषाढ बहूल येकादसी मंदवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी पुण्यसील नागराबाई यास दिल्हे इनामपत्र ऐसिजे. तुमचे भ्रतार राजश्री रघुनाथ नारायण हे स्वामीचे पुरातन सेवक. थोरले

कैलासवासी स्वामीचे वेळेस स्वामीच्या राज्याभिवृद्धीविषई श्रमसाहास आसाधारण करून आपली नाम्ना करून घेतली. तुम्हासही स्वामीचा आभ्योदय व्हावा हाच निजध्यास आहे. सांप्रत तुम्ही स्वामीसनोध विनंती केली की आपले वृधाप्य जाले आहे. येका क्षेत्रीवास करून उरवरीत काल सार्थक करावा ऐसी वासना आहे. तरी येविषईंची अनकूलता करून दिधली पाहिजे म्हणून. त्यावरून स्वामी तुम्हावरी सदये होऊन तुम्हास नूतन इनाम कुलबाब कुलकानू जलतरु पाशाण निधिनिक्षेपसहीत खेरीज हाकदार व इनामदार करून मौजे कोथली ता।। हावेली प्रांत कोल्हापूर देह येक रास इनाम सर्वमान्य करून दिल्हा असे. तरी तुम्ही मौजे मजकूर पूर्व मर्यादेप्रमाणे चतु:सीमा आपल्या स्वाधीन करून घेऊन इनाम तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने सुखरूप राहाणे. लेखनालंकार.

तेरीख २४ जमादिलाकर सु।। खमस अशर

---

**क्रमांक : २९१** **दि. २–८–१७१४**

आॅगष्ट १७१४ च्या सुमारास कोल्हापुरात राज्यक्रांति होऊन महाराणी ताराबाई आणि त्यांचे पुत्र शिवाजी ह्यांना पदच्युत करून राजसबाई ह्यांचे पुत्र संभाजी ह्यांना गादीवर बसविण्यात आले. या घटनेच्या आधीच थोडे दिवस रामचंद्रपंत अमात्य ह्यांना दिलेली ही सनद आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४१ जयनामसंवत्सरे श्रावण शुद्ध द्वितीया इंदुवासरे[1] क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति स्वामी यानी समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित हुकुमतपन्हा यासी आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही किल्ले प्रसिद्धगडचे मुकामी एकनिष्टपणे स्वामीचे आज्ञेप्रमाणे सेवा करून

---

१. वारा प्रमाणे तारीख काढलेली आहे.

राज्याभिवृद्धी केली. ते समई साहेबाजवळ तुम्ही अर्ज केला त्याप्रमाणे तुमचे चालवणे हे स्वामीस अवश्यक जाणून शफतपूर्वक वचन देऊन तुमचा हुद्दा व जिल्हा मामला वतने गांव व मुकासे वरघाट व तळघाट कोकण करार केले असे. बि तपशील --

जिल्हा बाबती सुभेहाय

बाबतीचे सुभे कर्याती

१ सुभा पन्हाळा
१ सुभा कन्हाड
१ सुभा मिरज
१ सुभा कोल्हापूर
१ सुभा तारळे
१ सुभा आजरे
१ सुभा हुकेरी
१ सुभा बेळगांव
१ सुभा कुडाळ
९

सदरहूपैकी कदीम खासगीची खेडी आहेत ती वजा करून बाबतीचा ऐवज घेत जाणे.

जिल्हे निसबत जकातीचे बाबतीत व सर जकातीचा ऐवज घेत जाणे. कलम १

विजापुरचा सरंजाम राजश्री माधवराव त्रिंबक याजकडे होता तो दूर करून तुम्ही अर्ज केला त्यावरून तुमच्या पुत्राचे नांवे करार केला असे. देखील मुकाशे गांव. कलम १

किल्ले नवलगुंद व किल्ले रामदुर्ग येथील सरंजाम व गांव मुकासे ····पधके पेसजीपासून तुम्हाकडे आहेत. त्याप्रमाणे देखील किल्ले तुम्हांकडे करार केले असत. कलम १

साळसी माहालाचा दाहिजा पेसजीपासून तुम्हांकडे चालत. त्याप्रमाणे करार. कलम १

## वतनें व वतनास गांव इनाम

सरदेशमुखी ता॥ खारापाटण यासी इनाम गांव.

१ मौजे पोंबुर्ले
१ मौजे कोकीसरे
—
२

देशकुलकर्णी ता॥ आजरे यासी इनाम गांव.

१ मौजे वझरे
१ मौजे मुरुडे
—
२

तर्फ सोनवळे प्रांत कल्याण भिवंडी येथील देशमुखीचे वतन पुरातन तुमचे आहे. हक्क लवाजिमा व शेते व बागाइत असतील ती करार आहेत. यासी वतनास गांव इनाम.

१ मौजे सोनवळे
१ मौजे मादाणे
—
२

कसबा कऱ्हाड येथील कुळकर्ण हरी दामाजी बदल तुमचे आहे. ते तुम्ही आपले अनभवीत जाणे. हक्क व शेते पुरातन तुमची असतील ती घेणे. करार असे.

सरदेशमुखी ता॥ साळसी यासी इनाम गांव.

१ मौजे चिंदर
१ मौजे त्रिंबक
—
२

नाडगोंडी तर्फ सारळे व कोल्हापूर यासी इनाम गांव.

१ मौजे धामणवाडी तर्फ तारळे
१ मौजे गोकूळ शिरगांव तर्फ कोल्हापूर
—
२

मौजे तांदळी प्रांत करडे रांजणगाव येथील कुलकर्ण व जोतीष पुरातन तुमचे. त्यास साहेबी कृपाळू होऊन मौजे मजकूर तुम्हांस इनाम करून दिला असे. पुत्रपौत्री अनभऊन असणे.

## इनाम गांव व मुकासे

### इनाम गाव

१ मौजे राशिवडे आरळे
१ मौजे सावगांव कर्यात सावगांव
१ मौजे हातकलंगडे ता आळते
१ मौजे पाल ता।। कापशी
१ मौजे दिगवले तर्फ साळसी
१ मौजे मुरादपूर ता।। देवरुख
१ मौजे शेळोली ता।। खानापूर
२ ता।। संगमेश्वर
  १ मौजे कडवे
  १ मौजे बुरंबाड
१ कसबा नेवरे
१ मौजे कोतवडे
१ मौजे जरगी ताा असंडोली नाडगोंडीस इनाम
१ मौजे तिथवली ताा खारेपाटण
१ मोजे बागवडे
१ मौजे उपळे रामनाथाचे ता।। रातांजन प्रांत परंडे साौ द्वारकाबाई यांस.

१५

निसबत बारगांव
२ राा संताजी चव्हाण
  १ मांढरे तर्फ आरळे
  १ मौजे वाईगणी इनाम

### मुकासे गांव

१ मौजे दाभोल ता।। आजरे
१ मौजे भडगाव प्रांत कागल
१ मौजे सिरदवाड प्रांत कागल
१ मौजे वडेगांव प्रांत शिरोळ
१ मौजे कुंभोज
१ मौजे अक्कलखोप
१ मौजे नंदगांव ता।। हवेली
४ तर्फ साळसी
  १ मौजे फोंडे
  १ मौजे हरकूळ खुर्द
  १ मौजे अतसये
  १ मौजे मठ
  ४
३ ता।। संगमेश्वर
  १ मौजे तुरट
  १ मौजे सरंद
  १ मौजे तुरधोंडे
  ३
२ ता।। हरचिरो
  १ कसबा
  १ सोमेश्वर
  २
१ मोजे तेरणी

११

१ मौजे साकरी तर्फ असंडोली
धनाजी नाईक घाटगे मुकासा
१ मौजे पाल ता॥
नि॥ कानोपाध्ये इनाम
२ राजश्री हरी सावंत यास इनाम
१ मौजे उपळे
१ मौजे तारल
२ राजश्री यादवराव काटे यास
इनाम
१ मौजे बसरंगे
१ हदवडे
१ मेघोली तर्फ खानापूर
राजश्री यशवंतराव गणेश
१ मौजे पडसाळ ता॥ तारळे
१ हशमाकडे करार

खानवलकर यांचा सरंजाम व इनाम गांव व मुकासे बदल सनद प्र॥ करार कलम १

तुमचे निसवत कारकून व भट ब्राह्मण यास गांव व इनाम वृत्ती दिल्या आहेत बद्दल सनद त्याप्रमाणे करार कलम १

तुमचे निसबतीचे हुद्दे व मामले व सबनिशा व कारखानिशा गडोगडच्या दिल्या आहेत बद्दल सनद. त्याप्रमाणे करार कलम १

११

सदरहू खेरीज साळसी तर्फेस व बाजे हशमाचे मुकासे व गांव इनाम तुमचे निसबतदार साटम व भिरवडेकर व तरदळेकर राणे व बाजे हशम यांस चालत आहेत. त्याबद्दल सनदप्रमाणे करार कलम १

तुम्ही राज्यात श्रमसाहस करून गड किल्ले मुलुख सोडवला तो तुमचे निसबतीने करार करून स्वामी चालवितील. अंतर होणार नाही.

येणेप्रमाणे जिल्हा मामला वतनें गांव इनाम गांव मुकासे व जकाती सरजकाती तुम्हांकडे करार केले असत. तर तुम्ही याप्रमाणे

अनभऊन स्वामीची सेवा एकनिष्टेने करून आपला मजुरा करून घेणे. स्वामी तुमचे दिवसेदिवस उर्जीत करून चालवितील. जाणिजे. बहुत लिहिणे तरी तुम्ही सुज्ञ असा.

शिक्का

---

**क्रमांक : २९२** **दि. २५–९–१७१४**

ऑगष्ट १७१४ च्या सुमारास कोल्हापुरात राज्यक्रांति झाल्यावर राजसबाईचे पुत्र संभाजी हे गादीवर आले. त्यानी दिलेल्या सनदापैकी ही सगळ्यात पहिली उपलब्ध सनद आहे. रामचंद्रपंत अमात्य ह्यांच्या आप्ताना दिलेल्या सनदापैकी ती एक आहे.

माधवराव शिवदेव काटे ह्याना छत्रपती राजाराम यांजकडून सहा महालांच्या नाडगौडकीचे वतन मिळाले होते. त्यातील कोल्हापूर महालाची नाडगौडकी त्यानी आपले जावई रामचंद्र पंडित हुकुमतपन्हा ह्याना दिली. काही दिवसानी काटे ह्यांचे घर जळाले. त्यात सनदाहि जळून गेल्या. पुढे छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी काटे ह्यांच्या तीन महालांच्या नाडगौडकीची सनद चंदोजी मोहिते ह्यास दिली. त्यावर काटे ह्यानी छत्रपती संभाजी दुसरे ह्याना आपले वतन आपणास परत मिळावे म्हणून विनंती केली. ती मान्य होऊन सदरची सनद त्याना देण्यात आली.

श्री

श्री<br>प्रतिपच्चंद्र लेखं<br>व वर्धिष्णुर्विश्ववं<br>दिता शंभु छत्रपते<br>र्मुद्रा रामसूनो<br>र्विराजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४१ जयनाम संवछरे भाद्रपद बहुल त्रयोदसी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति

स्वामी याणी राजश्री माधवराऊ सिवदेऊ उपनाम काटे यासी दिल्हे वतनपत्र ऐसीजे. तुम्ही हुजुर विदित केले की कोल्हापूर खानापूर कापसी या साहा माहालचे नाडगौंडकीचे वतन पुरातन आपले. तीर्थस्वरूप राजश्री कैलासवासी स्वामीनी चंजीचे मुकामीहून वतन चालवायाविसी पत्रे

निलकठ मोरेश्वर ह्यांचा शिक्का

कृष्णाजी परशुराम प्रतिनिधि ह्यांचा शिक्का

करून दिल्या. त्या उपरी आपली कन्या चिरंजीव सौभाग्यवती कृष्णाबाई राजश्री रामचंद्र पंडित हुकमतपन्हा यास देऊन लग्न केले. त्या विवाह प्रसंगी कोल्हापुरचे नाडगोंडकीचे वतन आपण पंडित माारनिल्हेस आपण धारादत करून दिल्हे. त्याचा उपभोग ते करीत आहेत. याच मामलचे नाडगोंडकीचे वतन आपण अनभवीत असता ऐनीमध्ये आपले घर दग्ध जाले. तेव्हा कैलासवासी स्वामीची पत्रे नाडगोंडकीच्या वतनाची होती ती दग्ध होऊन गेली. आपण वतनाचा उपभोग करीत असता राजश्री सिवाजी राजे दाजी याणी सदरहू पाच म्हालचे नाडगौंडकीचे वतन अमानत करून तारले असडोली खानापूर या तीन माहालीचे नाडगोंडकीचे वतन राजश्री चंदोजी मोहिते यास दिल्हे होते. ऐश्यास आपण वतनदार आहो. ही वतने आपली पुरातन याकरिता स्वामीने कृपाळु होऊन आपले नाडगोंडकीचे वतन आपणास उतरोतर चालवायाची आज्ञा केली पाहिजे म्हणून विनंती केली. त्यावरून स्वामीने कृपाळू होऊन सदरहू पाच म्हालीचे नाडगोंडकीचे वतन आमचे स्वाधीन करून चालवायाची अज्ञा केली. अशियास राजश्री मोरेश्वरराऊ रामचंद्र हे आपले नातु. याकरिता तारळे असडोली या दोनी माहालीचे नाडगोंडकीची वतन आपण त्यास दिल्ही आहेत. ती उतरोतर सुरलित चालेत अशी आज्ञा केली पाहिजे म्हणोन विनंती केली. त्याजवरून मनास आणिता सदरहू साहा महालीचे नाडगोंडकीचे वतने तुमची. त्यात तुम्ही पहिले राजश्री रामचंद्र पंडित हुकमतपन्हा यास पो कोल्हापूर या महालीचे नाडगोंडकीचे

वतन आपण धारादत करून दिल्हे आहे. त्याचा उपभोग ते करिते आहेत. हली तारळे असडोली या दोन्ही म्हालचे नाडगोंडकीचे वतनें तुमचे नातु राजश्री मोरेश्वरराऊ रामचंद्र यास तुम्ही दिल्ही अहा. ती त्यास उतरोतर चालवयाविसी अज्ञापत्रे सादर केली आहेत. त्याप्रोा ते उपभोग करतील. कापसी खानापूर तारळे या तिनी म्हालचे नाडगोंडकीची वतनें तुमची तुम्हास अजरामऱ्हारत करून देऊन चालवायाविसी निराळे अज्ञापत्रे सादर केली आहेत. या वतनास हक दिवाण दस्ताचे हरजेस रयत निसबतीने दरसंदे २ दुहोत्रा गाव इनाम

| | |
|---|---|
| ताा खानापूरचे नाडगोंडकीच्या वतनास मौजे हेदवडे तर्फ माार इनाम देहे १ | ताा कापसीचे नाडगोंडकीच्या वतनास मौजे बेलेवाडी ताा माार इनाम देहे १ |

येकूण देहे दोन व जमीन इनाम गावगना चालत असेल ते व खानापूर माहाली हक पेशजी चालत आहे तो लाजिमा जकातीस विश्वा व पानमान तसरीफ चालवायाची अज्ञा केली असे. तरी तुम्ही सदरहू–प्रमाणे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन दरकप्राो वतनाची शेवा करीत जाणे. लेखनालंकार.

तेरीख २६ रमजान सुा।
खमस अशर मया अलफ.

**क्रमांक : २९३** **दि. ८–११–१७१४**

नवीन पेठ वसविली म्हणून चार वर्षांचा महसूल माफ केल्याचा उल्लेख ह्या कागदात आहे.

श्री
भार्गवचरणी तत्पर
पंताजी शिवदेव
निरंतर

अभयपत्र राजमान्य राजश्री पंताजी शिवदेव ताा संभाजी बिन चांगोजी जाधव शेठे पेठ मौजे नांदेड ताा कर्यात मावळ सुरू सन खमस अशर मय्या अलफ दिल्हे अभयपत्र ऐसीजे. तुम्ही विनंती केली की मौजे मजकुरची पेठ नूतन-वसविली आहे. त्यास चौसालां महसूल माफ करून अभयपत्र सादर केले पाहिजे म्हणजे पेठ आवादान होईल म्हणून विनंती केली. त्यावरून आबादानीवरी नजर देऊन चौसालां महसुल माफ करून हे अभयपत्र सादर केले असे. तरी वाणी बकाल बाजे उदमी यांचा दिलासा करून पेठ आबादान करून सुखरूप राहणे. चार सालां महसुल तुम्हांस माफ केला असे. कोणेविशी आजार लागणार नाही अभय असे. छ ११ जिलकाद.

मोर्तब सुद.

---

**क्रमांक : २९४** **दि. १२–११–१७१४**

रामणा लक्ष्मण ह्यानें ताराबाई व छत्रपती शिवाजी दुसरे ह्यांच्याकडून कर्यात सावर्धन मधील सव्वीस गावचे देशकुलकर्ण खोटे बोलून मिळविले होते. छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी तत्संबंधी चौकशी करून ते त्याचे खरे मालक शामजी नरसिंह व गंगाजी महादेव देशकुलकर्णी ह्याना परत केले.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४१ जयनाम संवत्सरे कार्तिक बहुल द्वितीया भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शंभू छत्रपति स्वामी याणी राजश्री शामजी नरसिंह् व गंगाजी महादेव देशकुलकर्णी प्रांत पनाळा यास दिले वतनपत्र ऐसीजे. तुम्ही पनाळाचे मुकामी स्वामी संनीध येऊन विनंती केली की कर्यात सावर्धन देह् सवीस येथील देशकुलकर्ण पूर्वापार आपले आहे. ऐसे असता रामाणा लक्ष्मण तारळेकर याणे किले प्रसिधगडचे मुकामी आम्ही प्रसंग हाजर नसता राजश्री शिवाजी राजे व मातुश्री ताराबाई साहेबास आमचा गैरवाका दाखल करून आपले वतन म्हणून वतनपत्रे व ताकीदपत्रे करून घेतली होती. त्यावरी आम्ही सन सलासामध्ये पनाळाचे मुकामी राजश्री शिवाजी राजे व मातुश्री साहेबापासी विनंती केली की कर्यात मजकूर देह् सवीस येथील देशकुलकर्ण आमचे असता साहेबी रामाणा लक्ष्मण यास पत्रे करुन दिल्ही आहेत. त्याची व आपली मनसुबी करून आमचे असे खरे जाले तरी आमचे दुमाला करा व त्यावरून सर्वास गावीचे देशकुलकर्ण आमानत करून किले प्रसीधगडचे हावालदारास व माहालचे कारकुनास व गावगना मोकदमास आज्ञापत्रें सादर केली की देहाये मजकुरचे देशकुलकर्ण शामजी नरसिंह् प्रांत पनाळा याचे किवा रामाणा लक्ष्मण तारळेकर याचे ऐसे तहकिकी[1] करून लेहोन पाठवणे म्हणोन हुजुर पाठविले व रामाणास तलब केली. त्यास रामाणा ते समई आला नाही. प्रसीधगडचे हावालदारानी व माहालचे कारकुनानी व गावगना मोकदम याणी हुजुर लिहिले की कर्यात सावर्धन देह् सवीस येथील देशकुलकर्ण शामजी नरसिंह् प्रांत पनाळा याचे पूर्वापार वंशपरंपरेने चालत आले आहे. रामाणा तारळेकर याचे वतन नव्हे ऐसें आपणास दखल आहे म्हणून सड पाठविली. ते समयी रामाणा हुजूर न आला. याकरिता मनसुभी राहिली. हाली रामाणाही हाजीर आहे. साहेबी आमची व त्याची मनसुबी केली पाहिजे म्हणून विनंती.

---

१. निश्चिती; निर्णायक सत्य.

त्यावरून रामाणा लक्ष्मण यास हुजुर आणून आज्ञा केली की कर्यात सावर्धन देह सवीस येथील देशकुलकर्ण आपले म्हणून किले प्रसिधगडचे मुकामी राजश्री शिवाजी राजे दाजी याची पत्रे तुवा करून घेतली आहेत व रामजी नरसिंह वतन आपले म्हणतात यास तुम्ही उभयता काय करीना तो लेहोन देणे म्हणून. त्यावरून रामाणा बोलिला की प्रसिधगडचे मुकामी शामजी नरसिंह व त्याचे भाऊबंद व मुतालिक कोणी नाही ऐसी संधी पाहोन पत्रे करून घेतली. परंतु वतन आपले नव्हे. पत्रे मात्र करून घेतली. परंतु गांवकरानी चालो दिल्हे नाही व हक लाजिमा काही दिल्हा नाही. वतन शामजी नरसिंह याचे खरे ऐसे बोलिला. त्यावरून वतनाची पत्रें तुवा घेतली आहेत ती फिराऊन देणे म्हणून आज्ञा केली. त्यास बोलिला जे मौजे पणोरी तर्फ तारळे येथे राजश्री घोरपडे याणी स्वारी करून आपला घरवाडा जाळिला ते समई पत्रे जळाली. पत्रे आपणापासी नाहीत येसे बोलिला व नरसोजी देसाई व संभाजी आकोजी ता। तारळे याचे साक्षनसी तुम्हास येजीदखत लेहोन दिल्हे आहे त्यावरून मनास आणिता रामाणा लटिका जाला. त्याचे माथा गुन्हेगारी करार करून रुपये २२५ सवादोनसे व तुमचे माथा हारकी रुपये ७५ पाऊणसे रास करार करून तुमचे वतन तुम्हास पूर्वापार चालत आले आहे त्याप्रमाणे तुमचे दुमाला केले असे. सदरहू सवीस गावचे वतन देशकुलकर्ण वंशपरंपरे आनभऊन वतनी शेवा करणे. तुम्हास हक व लवाजिमा इनाम मान पान तारळे माहाली चालत आसेल त्याप्रमाणे घेत जाणे.

जाणिजे. लेखनालंकार.[१] तेरीख १५

जिलकाद. सुहूर सन खमस अशर मया अलफ.

---

**क्रमांक : २९५** **दि. ११-१२-१७१४**

गोव्याच्या व्हाइसरॉयने रामचंद्र पंताना लिहिलेल्या खालील पत्रात मराठयांशी सलोख्याने राहाण्याची इच्छा दर्शविली आहे. करवीर राज्यांत ऑगष्ट १७१४ च्या सुमारास जे सत्ता संक्रमण झाले त्याबाबत रामचंद्र पंताचे व्हाइसरॉयकडून अभिनंदन झाले ही घटना उद्बोधक आहे.

संभाजी राजे ह्यांचे विश्वासू रामचंद्रपंत आमात्य ह्यांस:

आपले उत्तर मिळाले, फार आनंद झाला. आपणाविषयी आणि आपल्या पत्रांविषयी मला नेहमी मोठी आस्था वाटत आली आहे. आणि मला आपणास कळवायचे आहे की, ज्या वेळी मी आपणाला अभिनंदनपर पत्र पाठविले, त्याच वेळी मी आपणाला नजराणाहि पाठविणार होतो. परंतु जे काय घडले आणि आज जे खरें झाले आहे त्या विषयी मी तेव्हां साशंक होतो. आणि आपणाला माहीत आहेच

---

१. छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी शामजी नरसिंह व गंगाजी महादेव कुलकर्णी ह्याना कर्यात सावर्धन देह २६ दिल्याचे रामचंद्र पंत अमात्य ह्यानी देशाधिकारी व लेखक प्रां तारळे ह्याना दि. ६-१२-१७१४ रोजी लिहिलेले पत्र उपलब्ध असून ते वरील प्रमाणेच आहे. खाली उध्दृत केलेला भाग थोडा अधिक आहे :—
" ......रामाणा लक्ष्मण देशकुलकर्णी ता तारळे देह शाहातर याणे राजश्री शिवाजी राजे व मातुश्री ताराबाईसाहेब रांगणा मुकामी होते तेथे जाऊन हयाल जाला की सावर्धन कर्यातीचे देशकुलकर्ण आपले आहे. ते साहेबी आपल्या दुमाला करावे. त्यावरून तेथे मनसुफी मनास आणून निर्व्हाह व्हावा त्यास आपण हाजीर नव्हतो. दुईचा प्रसंग जाला होता. या करिता पूर्ती हाकीकत मनास न आणिता यास पत्रे करून दिल्ही. ......"

को, ह्या यशाबद्दल मला आनंद झाल्या वाचून राहिला नसता. कारण राजकारण आणि मैत्री ह्या दोन्हीच्याहि दृष्टीने आपले परस्परांशीं चांगले संबंध आहेत. मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे कीं, आतांपर्यंत तुमच्या प्रदेशावर जो राणी राज्य करीत होती, तिच्याशी आमचे मैत्रीचे संबंध असून देखील मेलुंडीच्या कप्तानाने तिच्या आज्ञेप्रमाणे वर्तन ठेवले नाही. ह्या राज्याच्या प्रजाजनांची लूटमार त्याने कधी थांबविली नाही. चालू राजवटीत त्या प्रकाराना आळा बसेल अशी मला आशा वाटते. मेलुंडीच्या कप्तानाच्या जहाजांशी आम्ही कसे वागावे ते आपण मला कळवावे अशी माझी इच्छा आहे. त्याच्याकडे आमचे जे काय आहे ते त्याने परत केले पाहिजे. नंतर उभय पक्षांमध्यें वैमनस्य असू नये व परस्पराची परस्परांकडून लुटमार होऊ नये म्हणून एक करार होणेहि आवश्यक आहे. ह्याचा आपण विचार कराल अशी आशा आहे.

देव आपले रक्षण करो.

गोवा ११ डिसेंबर १७१४

व्हाइसरॉय.

---

क्रमांक : २९६ दि. १३-१-१७१५

छत्रपती संभाजी दुसरे ह्यांचे सिदोजी घोरपडे ह्याना पत्र की, संताजी घोरपडे ह्यांची पत्नी सोयराबाई हिला मौजे मंगावती हा गाव इनाम म्हणून व कसबे सदलगे मोकासा म्हणून दिला आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४१ जयनाम संवत्सरे पौष बहुल पंचमी गुरुवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री सिदोजी हिंदुराऊ घोरपडे ममलकतमदार यास आज्ञा केली ऐसीजे.

रा संताजो घोरपडे याची स्त्री सोइराबाई यास

| | |
|---|---|
| मौजे मंगावती का जुगुल हा गाव कुलबाब कुलकानु इनाम दिल्हा आहे. देहे १ | का सदलगे प्रांत कोल्हापूर हा गाव मुकासा दिल्हा आहे. देह १ |

येणेप्रमाणे येक गांव इनाम व येक गाव मुकासा दिल्हा आहे. तरी तुम्ही सदरहुप्रमाणे दोन गाव याकडे चालवणे. तुम्ही कोण्ही उपद्रव करील त्यास ताकीद करणे. बहुत काय लिहिणे.[१]

मर्यादेयं
विराजते

---

**क्रमांक : २९७** **दि. १७-३-१७१५**

कृष्णाजी पंडित प्रतिनिधी ह्यानी चिमणाजी बल्लाळ, दादाजी बल्लाळ व प्रल्हाद बल्लाळ ह्यांच्या पतकीपणाच्या वतनासंबंधी दिलेले अभयपत्र.

श्री

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधी राजमान्ये राजश्री कृष्णाजी पंडित प्रतिनिधि ता चिमणाजो बलाळ व दादाजी बलाळ व प्रल्हाद बलाळ पतकी घाट तिवरा व चादेल व उदगिरी व बाजार व जकात नाटवाडे व आडमार्ग पा वारूण सु॥ खमस असेर

---

१. सोयराबाई हिला दिलेल्या या इनामाबाबत छत्रपती संभाजी दुसरे ह्यांची मोकदमानी मौजे मंगावती व मोकदमानी कसबा सदलगे ह्यांच्या नावची दि. ९-१-१७१५ ची आज्ञापत्रे तसेच दि. १३-१-१७१५ ची नारो पंडीत सचीव व देशाधिकारी प्रांत कोल्हापूर ह्यांच्या नावची आज्ञापत्रेहि उपलब्ध आहेत.

मया व आलफ दिल्हे आभयपत्र ऐसाजे. राजश्री शाहू राजे यांचे कारकीर्दीस तुम्हापासून दिवाणात शेभर रुो शेरणी घेउन पतकपणाचे वतन सदरहूप्रो तुम्हास करून दिल्हे अहे. ऐसियास ये तर्फेची सेरणी यावी याकरिता तुम्हास हुजुर बोलाऊन आणून सेरणी देणे म्हणोन आज्ञा केली तेव्हा ये तर्फेची सेरणी रु॥ १०० शेभर कबूल करून तुम्ही दिवाणात वसूल दिल्हा. तो बाा जमा वर्कंपोता जमा जाहाले असत. ये तर्फेची सेरणी घेऊन हे अभयपत्र तुम्हास सादर केले आसे. तरी तुम्हो सदरहू पतकपणाचे वतन पुत्रपौत्रादि वौंश-परंपरेनी अनभऊन सुखरूप राहाणे. अभये असे. छ २२ रावल निदेश समक्ष.[1]

बार सुद

---

**क्रमांक : २९८** **दि. २९-४-१७१५**

गोव्याच्या व्हाइसरॉयने सुरत येथील पोर्तुगीज प्रतिनिधीला लिहिलेल्या खालील पत्रात आंग्यानी सुरतेची दोन जहाजे घेतली असे म्हटले आहे. त्या पत्रातील आंग्यांसंबंधीचा परिच्छेद खाली दिला आहे.

ज्युआंव गोमिश फेबुश ह्यांस

...... ............. ........................................

..................................................................

मला बातमी कळली आहे की, आंग्यानी सुरतेची दोन जहाजे

---

१. याप्रमाणेच या तारखेचे कृष्णाजी परशुराम प्रतिनिधि ह्यांचे परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि ह्यांचा शिक्का असलेले सुभेदार व कारकून प्रांत मलकापूर ह्यांच्या नावे एक आज्ञापत्रहि आहे.

दमणनजीक पकडली. मला वाटते की, ह्या दरोडेखोरीला व उद्धटपणाला आळा घालण्याची जोरदार मागणी सुरतेच्या नागरिकानी बादशहाकडे जर केली नाही, तर सुरतेचे बंदर नष्ट झाल्यावांचून राहाणार नाही. दुर्दैवाची गोष्ट ही की, बादशहाच्या काही प्रजाजनांची ही हानि काही जणाच्या महत्वाकांक्षेमुळे होत आहे. उदाहरणार्थ सिद्दीने आंग्र्यांशी मैत्री केली असल्याचे उघडच दिसत आहे. बादशहाचे त्याच्या नबाबांच्या, सेनापतींच्या व सेनाधिकाऱ्यांच्या हालचालींकडे लक्ष आहे की काय कळत नाही. त्याना शासन झाल्याखेरीज ह्या गोष्टी बंद पडणार नाहीत.

........................................................................

........................................................................

गोवा, २९ एप्रिल १७१५

व्हाश्कु फेर्नांदिश सेझर द मिनेझिश.

---

**क्रमांक : २९९** **दि. १५–५–१७१५**

गोव्याचा व्हाइसरॉय सुरत येथील पोर्तुगीज प्रतिनिधीला लिहितो की, आंग्र्यामुळे सुरतेचा व्यापार बंद पडत चालला आहे. बादशहाचे सरदार त्याचे हुकुमाप्रमाणे वागत नाहीत अशीहि त्याची तक्रार आहे. पत्रातील आंग्र्यासंबंधीचे परिच्छेद खाली दिले आहेत.

सुरत येथील ज्युआव गोमिश फेबुश ह्यांस

आपली तिन्ही पत्रे मिळाली. त्यातील दोन जुनी असून तिसरे गेल्या महिन्या अखेरचे आहे. बऱ्याच दिवसापासून आपला समाचार नव्हता. म्हणून आपलीं पत्रे वाचून आनंद झाला. आपणाला

नेहमी चांगले आरोग्य लाभावे अशी देवापाशी प्रार्थना आहे.

.................................. . ..........................

....................................................................

बादशहाचे नबाब त्याच्या हुकुमाप्रमाणे वागत नाहीत; इतकेच नव्हे, तर त्याच्या प्रजेलाहि त्यांच्याकडून चांगली वागणूक मिळत नाही. आम्ही कुलाब्याची नाकेबंदी केली, तेव्हां सिद्दीने जर आंग्र्याशी तह न करता खुष्कीच्या मार्गे त्यांच्याविरुद्ध काही कारवाई केली असती, तर आमची नाकेबंदी यशस्वी झाली असती. कारण हा शत्रु तेवढासा काही मोठा नाही.

....................................................................

माझा असा तर्क आहे की, विशेषेकरून सुरतेचा व्यापार बंद पडत चालला आहे. चालू हंगामात तेथून स्ट्रेट[1]कडे व बंगालकडे जहाजे गेली नाहीत. आंग्र्याविरुद्ध जर लवकर इलाज करण्यांत आला नाही, तर परिस्थिती फार कठीण आहे. आपण ह्यात लक्ष घालावे.

गोवा, १५ मे १७१५

व्हास्कु फेर्नांदिश सेझर मिनेझिश

---

**क्रमांक : ३००** **दि. १५–५–१७१५**

मोगल बादशहाकडे नोकरीस असलेला एक पोर्तुगीज गृहस्थ दों दियोगु मेंदिश ह्याला गोव्याचा व्हाइसरॉय लिहितो की, कल्याणचा नबाब बादशहाचे मन कलुषित करण्याचा प्रयत्न करीत आहे असे आपणास कळले आहे.

---

१. Estreitos म्हणजे स्ट्रेट सेटलमेंटस् (मलाया, जावा, वगैरे).

दों दियोगु मेंदिश, मुक्काम बादशहाची छावणी ह्यांस.

रेव्ह. पाद्री झुजे द सिल्व्हा ह्यानी मला लिहिले आहे की, दों दियोगु द मेंदिश व दोना ज्युलियाना दिआश ह्या दोघांच्या प्रयत्नामुळे आपली कामे पूर्ण होत आली आहेत ..................

.................................................... . ...........

आम्ही मुसलमानावर ख्रिश्चन होण्याची बळजबरी करतो म्हणून कल्याणच्या नवाबाने बादशहाच्या दरबारात लिहिले आहे, असे मला कळले आहे. ही गोष्ट खोटी आहे हे आमचे उत्तरेकडील सेनापती पाद्री मानुएल दुरांव ह्यांच्याकडे जे निवेदन पाठविणार आहेत त्यावरून सिद्ध होईल. मी उत्तरेकडील सेनापतीला हे निवेदन पाद्री मानुएल दुरांव ह्यांच्याकडे पाठविण्याबद्दल लिहिले आहे. त्या निवेदनात कल्याणचे नवाब बादशहाशी कसे बेइमानपणे वागत आहेत आणि सिद्दीने आंग्र्यांशी कसा तह केला आहे, त्याचा उल्लेख असेल. आंग्र्यांच्या चांचेगिरीचा बादशहाच्या प्रजाजनाना भयंकर उपद्रव होत असून त्यामुळे सुरतेचे बंदर ओस पडत चालले आहे. गेल्या वर्षी मी कुलाब्याला पाण्यातून वेढा घातला, तेव्हां सिद्दीने जमिनीच्या बाजूने आंग्र्यांविरुद्ध हालचाल केली असती, तर त्या बंडखोराचा नाश होण्यास वेळ लागला नसता. ....................................

..........................................................................

गोवा, १५ मे १७१५

व्हास्कु फेर्नांदिश सेझर मिनेझिश

**क्रमांक : ३०१** **दि. १०-७-१७१५**

जोती गोंडा पाटील ह्याने हरामखोरी केली म्हणून त्याचा शिरच्छेद करून त्याची पाटीलकी त्याच्या मुलाना देण्यात आली होती. त्याच्या मुलानी सरकारात दयेचा अर्ज केल्यावरून त्याना मौजे हातकणगले येथे दहा बिघे जमीन इनाम दिल्याचे रामचंद्र पंत हुकमतपन्हा ह्यांचे अभयपत्र.

श्री

अभयपत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री रामचंद्र पंडीत हुकुमतपन्हा ताा मलगोंडा व नरसगोंडा बिन जोती गोंडा पाटील मौजे हातकणगले ताा अलते प्रांत पनाला सुरु सन सीत अशर मया आलफ दिल्हे अभयपत्र यैसीजे. तुमचा बाप जोती गोंडा पाटीलकी + + + याकरिता त्याची गर्दन मारिली अणी तुम्हास पाटीलकीचा कार्यभाग करावयाची आज्ञा केली. त्यावरून तुंवा अर्ज केले की अपल्या बापाने हरामखोरी केली. त्याची नतीजा त्यास पावीला. याउपरी साहेबी आपणावरी मेहरबानी केली तरी आपले अन्नवस्त्र चालते करावया साहेब धणी आहेत जाणून अर्ज केला. त्यावरून तुमचे चालवणेही अगत्य याकरितां तूहा मौजे मजकुर पैकी अर्जी इनाम करून दिल्ह जमीन वीसा पांडाच्या बिघेयाने जमीन बिघे ॳ१०

बागाईत जमीन ॳ२ जिराईत बिघे ॳ८

येकून दाहा बिघे जमीन नवीन इनाम खेरीज हकदार इनामदार करून दिल्हे असे. कीर्द करून आनभऊन सुखरूप राहणे. सदरहू इनाम वंशपरंपरेनें दिल्ह आसे. तूं इमाने इतबारे राहून गावची + + + + + + + + सुखरूप असणे.

छ १९ रजब निद्रेश समक्ष. मोर्तब असे.

क्रमांक : ३०२ दि. १३–७–१७१५

महालक्ष्मीचे उत्पन्न पूर्वापार चालविण्याबद्दल सिदोजी हिंदुराव घोरपडे ह्यांचे पत्र.

श्री सुबराज

राजश्री सुभेदार व कारकून वर्तमान व भावी
प्रांत कोल्हापूर गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य----- श्नेः॥ सिदोजी हिंदूराऊ घोरपडे ममलकतमदार दंडवत. सुहुर सन सित असर मया अलफ मन्मथ नाव सवत्छरे आशाड बहुल नवमी सौम्यवासर वेदमूर्ती रा। शामभट उपनाम मुनस्वर पूजारी श्री-----याणी येऊन विनंती केली कीं हुजरुन राजश्री-----स्वामीनी श्री च्या पूजेस पूर्वापार मौज कुरडू इनाम गाऊ चालतो त्याखेरीज नूतन मौज उचगाऊ पा। हवेली मजकुर हा गाऊ कुलबाब कुलकानू मुकासा करून दिल्हा. त्याप्रा। राजश्री थोरल राऊ याणी पत्र करून दिल्हे. ती पत्रे आग्नोबाधा होऊन गेली. राजश्री स्वामीची पत्रे आहेती. भोगवटाही चालतो. माहाराजाचे पत्र असिले पाहिजे. धर्मप्रभु आहां. भोगवाटीयासि पत्रे करून दिल्हीया श्री-----ची पूजा करून कल्याणा अभिवृधी चितून राहू म्हणून विनंती केली. त्यावरून मनास आणिता श्री-----आनादिस्थल यैशा स्थलीची पूजा चालविलिया बहुतच पुण्ये आहे. अण राजश्री स्वामीचे व स्वामीच्या राज्याचे कल्याणा आभिवृधि आहे. यैसे जाणून राजश्री स्वामीच्या पत्राप्रमाणे पूर्वापार मौज कुरडू इनाम गाऊ चालतो व हली मौज उचगाऊ पा। मजकूर हा गाऊ कुलबाब कुलकानू सरदेशमुखी साहोत्रा इनामपटी व वरकड बाबती देखील मुकासा नेमून दिल्हा असे. तरी तुम्ही मौज कुरडू इनाम व उचगाऊ मुकासा सदरहू प्रा। दुमाला करून

श्री———चे पूजेस चालवणे. गावीचा उत्पन्नता होईल ते उछाव पूजा नैवेद्य सांग्य चालवतील. प्रति वरुसी नवीन पत्राची अपेक्षा न करिता दुमाला करणे आणि या पत्राची प्रति लेहून घेऊन मुख्ये पत्र वेदमूर्ती जवळी परतोन देणे. जाणिजे. छ २२ रजबु.

चौकोनी लहान शिक्का

चौकोनी शिक्का

---

**क्रमांक : ३०३** **दि. १३-७-१७१५**

कोल्हापुरच्या महालक्ष्मीच्या पूजाअर्चेसाठी दिलेल्या इनामाला कोणीहि उपसर्ग देऊ नये म्हणून सिदोजी हिंदुराव घोरपडे ह्यानी संबंधित अधिकाऱ्यांना लिहिलेले पत्र.

श्री सुबराज

राजश्री सरदार व स्वार व आमदार
प्रा। लस्कर पागा व सिलेदार गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आळंकृत राजमान्य श्ने।। सिदोजी हिंदुराव घोरपडे ममलकतमदार रामराम. सु।। सन सीत आसर मया अलफ. मौजे कुरडू गांव ईनाम व मौजे उंचगाव मुकासा श्री[1] ———कडे आहे. त्यास कोण्ही येक जरा तोसीस द्यावयास गरज नाही. श्री कडील प्रसंगास उपद्रव करील त्याचा मुलाहीजा होणार नाही. जाणीजे. छ २२ रजबु.

पाठीवर चौकोनी शिक्का

---

१. महालक्ष्मी कोल्हापूर.

**क्रमांक : ३०४** **दि. १५-११-१७१५**

लखमगौडा बसव प्रभु देसाई ह्याने नारो महादेव ह्यांना आपला 'उरवीत गाव' दिल्याचा उल्लेख ह्या कागदात आहे.

श्री

तालीक

माहाराज राजश्री नारोपंत स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारीक लखमगोंडा वलद बसव प्रभू देसाई नाडगोडा प्रांत हुकेरो सरदेसाई महालानिहाये दंडवत विनंती. सु॥ सीत आशर मया आलफ. स्वामीने सेवकावर कितीयेक आभिमान धरून बहुतच साइता करून वृीतीवरी स्थापिले आहे. हे किर्ती लौकिक विश्वात जाहाले. आम्ही आपलेकडून स्वामीस उरवीत आमचे इनामगाऊ मौजे हटदकेश का। सोलापूर दिल्हे आसे. स्वामी यानी आम्हासी गांवापैकी हक देसगत व नाडगौंडको व इनामती कुल एकंदर सालासी रु ७५ पवणासेहे देवण्याचे केले आहे. सदरहू आम्हासी देत जाणे. त्या खेरीज आम्हाकडून काही गावासी तगादा लागू देणार नाही. स्वामीने गावीचे लावणी करून कुलबाब कुलकानू आकार जे होईल ते गावीचे इनामदार बाराबलुते खेरीज कमावीस पुत्र पौत्रा वंशपरमपरा भोगवटा करून सुखे असणे. मौजे मजकुरसी आमचे निसबतीने कोण इस्कील करील त्यासी आपले कुलस्वामीचे कुलदेवाचे आण आसे. छ २९ जिल्काद हे विनंती. मोर्तब आसे.

**क्रमांक : ३०५** **दि. २३–११–१७१५**

विरोजी माने ह्यांचे वतन पूर्ववत चालू करावे म्हणून छत्रपती शाहू ह्यांचे सिदोजी हिंदुराव घोरपडे ह्याना पत्र.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४२ मन्मथ सवछरे मार्गसीर्ष सुध आष्टमी सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्ये धुरंधर विस्वासनिधि राजमान्ये (राजश्री) सिदोजी हिंदूराव घोरपडे (ममलकतम)दार यासी आज्ञा केली ऐसीजे. विरोजी माने माहाजन कसवा कोल्हापूर हे स्वामीसनीध होते. प्रस्तुत आज्ञा घेऊन आपल्या वतनावरी आले आहेत. ऐशास पुरातन वतनदार आहेत. तरी तुम्ही यांचे वतन यास चालवणे. स्वामीस यांचे अगत्य आहे. याकरितां तुम्ही ही अगत्य धरून स्वामीनी यास तुमचे हाती दिल्हे ऐसे चितांत आणून यांचे सर्व प्रकारे चालवणे. बहूत काय लिहिणे तर तुम्ही सुज्ञ असा.[1]

---

**क्रमांक : ३०६** **दि. ३०–११–१७१५**

गोव्याचा व्हाइसरॉय सुरत येथील पोर्तुगीज प्रतिनिधीला लिहितो की, आंग्र्यांच्या पारिपत्यासाठी बादशहाने ज्या सरदाराची नेमणूक केली आहे, त्याला आंग्रे लाच चारून बादशहाचे हुकूम तहकूब ठेवण्यास प्रवृत्त करतील अशी आपणास भीति वाटते. त्या पत्राचा आंग्र्यांसंबंधीचा परिच्छेद खाली दिला आहे.

ज्युआंव गोमिश फेबुश, सुरत ह्यांस

---

१ ह्याच तारखेचे व ह्याच आशयाचे छत्रपती शाहू ह्यांचे रामचंद्र पंडीत ह्यांस दिलेले आज्ञापत्र उपलब्ध आहे.

आपले दि. २५ अक्टोबरचे पत्र मिळाले,...............

..............................................................

सरदार अजरअलीखान ह्यानी दख्खनच्या नबाबाला ज्याप्रमाणे शासन केले, त्या प्रमाणे त्यानी आंग्र्यानाहि शासन करण्याची योजना आखली तर बरें होईल. सुरतेच्या व्यापाऱ्याला मारक ठरलेल्या ह्या चांच्याचा नाश झालाच पाहिजे. परंतु आशियायी लोक जन्मत:च लांचलुचपतीला बळी पडणारे आहेत. आणि आंग्र्यांपाशी सोने विपुल आहे. सोन्याच्या बळावर अजर अलीखान ह्याना ते मऊ बनवून बादशहाचे हुकूम तहकूब ठेवावयास लावतील अशी भीति वाटते. ..........................................

गोवा, ३० नवंबर १७१५

व्हाश्कु फेर्नांदिश सेझर मिनेझिश

---

क्रमांक : ३०७ दि. १६–१२–१७१५

गोव्याचा व्हाइसरॉय कोकणच्या मोगल फौजदारास लिहितो की, आंग्र्यांच्या निर्दालनाचे कामी बादशहाची आपणाला मदत मिळावी म्हणून त्यानी प्रयत्न करावा. त्या पत्राचा आंग्र्यासंबंधीचा परिच्छेद खाली दिला आहे.

वरच्या चौलच्या कक्षेतील पालीच्या किल्ल्याचे व कोकण प्रदेशाचे फौजदार आणि दिवाण, मोतिमिन खान, ह्यांस.

..............................................................

आपले पत्र मिळाले. + + + माझे स्वामी हे हिंदुस्थानातील समुद्रांचे अधिपती आहेत ही गोष्ट निर्विवाद आहे.

त्यांचे व्हाइसरॉय हे यांच्याचे उच्चाटन करण्याचा शक्य तो प्रयत्न करतात. ते कार्य मी चालू ठेवावे म्हणून बादशहाने आरमारावर खर्च करण्याची आवश्यकता नाही. पण बंडखोर आंग्रे ह्यानी बादशहाच्या बंदरातील व्यापार मारून टाकला असल्याने त्याचा नि:पात करण्याचे कामी बादशहाच्या सरदारानी आमच्याशी सहकार्य केले पाहिजे. सिद्दीला + + + अशक्य व्हावे इतके काही आंग्रे बलाढ्य नाहीत. आपण ही गोष्ट महान मोगल बादशहाच्या निदर्शनास आणली पाहिजे व सिद्दी आणि त्यांचे इतर नबाब ह्यानी आंग्र्यांच्या निर्दालनाचे कामी आम्हाला मदत करावी म्हणून त्याना प्रवृत्त करण्यास बादशहाला भाग पाडले पाहिजे.

देव आपले भले करो.

गोवा, १६ डिसेंबर १७१५
व्हाइसरॉय

---

**क्रमांक : ३०८** **इ. स. १७१५ (?)**

सुभानराव हिंदुराव घोरपडे ह्याना सुभानराव जाधव लिहितो की अंबाजी शितोळे ह्याना लिहिले आहे 'त्यावरून विदित होईल.' ह्यावरून पत्राचा उद्देश अंतस्थ असावा असे वाटते.

श्री

राजश्री सुभानराव हिंदुराव घोरपडे
ममलकतमदार गोसावी यास—

॥ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये स्नेही॥ सुभानराव जाधव रामराम विनंती. येथील क्षेम. ता सेवण वदे त्रयोदसी पावेतो वर्तमान

येथास्त अस. विशेष रा आंबाजी सितोळे या लिहिले आहे त्यावरून विदित होईल. बहुत काय लिहिणे. कृपा लोभ असो देणे. हे विनंती.

---

**क्रमांक : ३०९** **दि. १२–१–१७१६**

आंग्र्यांचा नाश करण्याची मोहीम हाती घेण्याची विनंती गोव्याचा व्हाइसरॉय मोगल बादशहाचा कोकणातील फौजांचा सरसेनापती असिदन अली खान ह्यास करतो.

शक्तिशाली मोगल बादशहाच्या सैन्याचे सरसेनापती
असिदन अली खान ह्यांस

आपल्या स्वामीची आज्ञा बेछूटपणे धाब्यावर बसविणाऱ्या बंडखोरावर आपण जो विजय मिळविला त्याबद्दल मी आपले अभिनंदन करतो. संसारात आपले नाव व्हावे म्हणून आपणाला असेच विजय मिळावेत अशी इच्छा करतो.

............................................................

............................................................

आणि हा प्रश्न महान मोगल बादशहाच्या प्रजाजनासंबंधीचा व त्याच्या बंदरांसंबंधीचा असल्याने बंडखोर चांचे आंग्रे ह्यांचा नाश हा झालाच पाहिजे. ही कामगिरी आपण हाती घेतल्यावाचून राहाणार नाही अशी मला आशा वाटते. मीहि माझे आरमार आपल्या मदतीला पाठवून देईन. आपणाला मदत करण्यास मला आनंदच वाटेल.

आपणावर देवाचा अनुग्रह होवो.

गोवा, १२ जानेवारी १७१६
व्हाइसरॉय

---

**क्रमांक : ३१०** **दि. १५–२–१७१६**

दत्ताजी आंग्रे ह्याने खारेपाटणची गढी घेऊन गगनगडच्या आसपास उपद्रव सुरु केला आहे तरी त्याचा बंदोवस्त करावा म्हणून छत्रपती संभाजी दुसरे ह्यांचे चांदजी राणे ह्यांस आज्ञापत्र.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४२ मन्मथनाम संवत्सरे फाल्गुन शुध च्यतुर्थी[1] सौमवासर क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी राजश्री चांदजी राणे यासी आज्ञा केली ऐसीजे. दताजी आंग्रे यानी खारापाटणची गडी घेऊनु किले गगनगडचे तनखियाचे गावी उपद्रव मांडिला आहे. त्यास हळखुद ठेवावे लागते. यैशास तुम्ही स्वामीच्या राज्यातील यकनिष्ठ सेवक अहा. याकरता तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले असे. तर तुम्ही आपले कबिले वरघाटी ठेऊनु किले मजकुरचे लोक व तुम्ही जमावानिसी यका विचारे स्वारी सिकारी करून ते हळखुद राहेत किलाचे तनख्याचे गावास त्याचा उपद्रव न लागे असे करणे. स्वामी तुमचे ऊर्जित करून चालवितील. जाणिजे. लेखनालंकार. मोर्तब.

---

**क्रमांक : ३११** **दि. १७–२–१७१६**

गोव्याचा व्हाइसरॉय रामचंद्र पंत ह्याना लिहितो की बोलणी करण्यासाठी छत्रपतीनी आपणाकडे आवश्यक ते अधिकार देऊन वकील पाठवावा असे तो पत्रात म्हणतो.

---

१. खरे जंत्रीत चतुर्थीचा लोप आहे. तारीख वाराप्रमाणे काढली आहे.

शिवाजी[1] राजे ह्यांचे विश्वासू रामचंद्र पंडीत
अमात्य ह्यास

आपल्या स्वामीला आम्ही जे पत्र लिहिले त्यावरून आपणाला कळून आलेच असेल की, आमच्यामध्ये आणि त्यांच्यामध्ये गैरसमज असू नये हा त्या पत्रामागील हेतु आहे. मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे की, मेलुंदीचा किल्ला हा आपल्या स्वामीचा असून आणखी बऱ्याच प्रदेशाचे ते धनि आहेत. परंतु असे असता मेलुंदीची जहाजे ह्या राज्यातील व्यापाऱ्यांच्या जहाजांची लुटालूट करतात ही गोष्ट त्याना लज्जास्पद आहे. म्हणून सर्व दृष्टीनी मला + + + करणे भाग पडले. श्रीनिवास पंत ह्यानी + + + मला भेटण्यासाठी येणार म्हणून लिहिले होते. मी परवानगी दिली होती. शिवाजी राजे ह्यानी त्याना आवश्यक ते अधिकार देऊन इकडे पाठवावे. जर आपणाकडे त्यानी ह्या संबंधाने मदत मागितली तर आपण त्याना तो द्याल अशी आशा आहे. त्याचप्रमाणे आंग्र्यांच्या नाशाचाहि आपण विचार करावा. पत्राचे उत्तर शक्य तितक्या लवकर पाठवावे.

गोवा, १७ फेब्रुवारी १७१६
व्हास्कु फेर्नांदिश सेझर मिनेझिश.

---

**क्रमांक : ३१२** **दि. १७–२–१७१६**

गोव्याचा व्हाइसरॉय छत्रपती संभाजी दुसरे ह्याना लिहितो की, त्यानी जर विजयदुर्गचा किल्ला घेण्यासाठी आंग्र्यांवर जमिनीच्या मार्गे सैन्य पाठविले, तर आपण त्याना आरमारी मदत देऊ.

---

१. गोव्याचा व्हाइसरॉय अद्यापी "शिवाजी राजे" असे लिहितो. पण पुढील कागदपत्रावरून ते "संभाजी राजे" असे पाहिजे हे स्पष्ट आहे.

शिवाजी[1] राजे ह्यांस

मेलुंडीचे किल्लेदार व श्रीनिवास पंत ह्या दोघांनी इकडे येण्यासाठी माझी परवानगी मागितली होती. श्रीनिवास पंत हे मेलुंडीचा किल्ला व हे राज्य ह्या दोघामध्ये मैत्रीची बोलणी करण्यासाठी येणार होते. त्याना मी इकडे येण्यासाठी परवानगी दिली होती. पण आपण लिहिता की सदहुं किल्ला आपल्या मालकीचा असल्याने श्रीनिवास पंताशी त्या संबंधाने बोलणी करू नयेत. मला वाटते ती बोलणी करण्याचा अधिकार फक्त आपणालाच आहे. तसे असल्यास ह्या वाटाघाटी करण्यासाठी आवश्यक ते अधिकार देऊन आपला मनुष्य आमच्याकडे पाठवावा. मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे की, ज्यावेळी मेलुंडीचा किल्ला आपणाकडे आला नव्हता व आपण राज्याचे धनी नव्हता, तेव्हा त्या किल्ल्याचा अधिकारी दुसरा होता. त्याने ह्या राज्याची व ह्या राज्याच्या प्रजाजनांची जी नुकसानी केली ती भरून देण्याची जबाबदारी आपणावर पडते. अर्थात त्या लुटीचा आपणाला काही फायदा झाला तरच ते बंधन आपणावर आहे. ज्या गलबताच्या कप्तानाने आमच्या राज्याच्या हद्दीत ज्या एका व्यापाऱ्याला पकडले, त्या कप्तानाच्या गुन्ह्याचा जो न्यायनिवाडा आपण केलात त्याबद्दल मी आपला आभारी आहे. आपल्या वाडवडिलांशी आमची मैत्री होतीच. तिची आता वृद्धि झाली पाहिजे. ती वृद्धि कशी कशी व्हावी ते आपण सुचवावे. आंग्रे आपणाला जुमानीत नाहीत. आपण जर त्यांची खोड मोडण्याचे ठरविलेत आणि खुष्कीच्या मार्गे ग्रियेचा[2] किल्ला घेण्यासाठी त्यांच्यावर सैन्य पाठविलेत, तर मी येत्या महिन्याच्या पंधरा तारखेपर्यंत त्यांच्यावर आरमार पाठवीन. असे जर झाले तर आपणाला तो किल्ला घेणे कठीण जाणार नाही.

---

१. मागील पत्रावरील टीप पहा.

२. विजयदुर्ग.

आपली सूचना मिळताच आरमार पाठविण्याची व्यवस्था करीन. मात्र मी ते उपरिनिर्दिष्ट अवधीतच पाठवू शकेन हे आपण लक्षात घ्यावे.

मेलुंडीच्या किल्ल्यासंबंधी वाटाघाटी करण्यासाठी आपणाला आमच्याकडे आपला वकील पाठविता येईल. कारण तो किल्ला आपलाच आहे. दुसऱ्या गोष्टीसंबंधाने आपल्या सूचनेची वाट पाहात आहे.

देवाचा आपणावर अनुग्रह होवो.

गोवा, १७ फेब्रुवारी १७१६

व्हास्कु फेर्नांदिश सेझर मिनेझिश.

---

**क्रमांक : ३१३** **दि. ६-३-१७१६**

कान्होजी आंग्रे ह्यांचे साठमांचे वतन चालविण्याबद्दलचे पत्र.

श्री

राजश्री नारो काशीनाथ तर्फ साळशी
गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—— स्नो॥ कानोजी आंगरे सरखेल राम राम सु॥ सीत अशर मया व अलफ. माणकोजी नाईक व हिरोजी नाईक व बापूजी नाईक व प्रतापजी नाईक साठम नाईकवाडी तर्फ साळशी यांणी पूर्वी पन्हाळियाचे मुक्कामी सेवा एकनिष्ठपणे करून आपले वतन सरपाटिलकीचे महाली होते ते चालवावे म्हणून राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांजपाशी विनंती केली. त्याजवरून राजश्री रामाजी अनंत नामजाद सुभा राजापूर

यास वतनाचे भोगवटियाबद्दल पत्र सादर केले आहे. त्यास काही चालते. काही चालत नाही. म्हणून हल्ली हिरोजी नाईक साठम याणी हुजूर जंजिरे विजयदुर्गाचे मुक्कामी अर्ज केला की आपले भाऊबंद जमावानिशी सेवा करित आहेत. कृपाळू होऊन मौजे कोईल १५ कुडव येणे प्रमाणे सरपाटिलकीचे वतन व नाईकीचे वतन इनाम जमीन गावे ८ सदरहु प्रमाणे १॥ खंडी शेत कोंडे मौजे गोठणे व बाग नारळ मौजे आडवल व गादो श्रावण व नाईकीचे वतनास पतके दोन जागा विश्वाभर एक प्रमाणे विश्वे २ पुरातन प्रमाणे याचे वतन करार करून सनद सादर केली आहे. तरी पूर्वील पत्राप्रमाणे व भोगवटा मनास आणून चालवित जाणे. या पत्राची तालीक लिहून घेऊन अस्सल पत्र भोगवटियास परतोन देणे. जाणिजे. चंद्र २२ माहे रविलावल. मोर्तब सुद.

---

**क्रमांक : ३१४** दि. १८–३–१७१६

गोव्याचा व्हाइसरॉय मुंबईच्या नवीन इंग्रज गव्हर्नरला लिहिलेल्या पत्रांत आंग्र्याविरुद्ध चिथावणी देतो. आंग्रे पोर्तुगीजांची मैत्री संपादून चांचेगिरी करून श्रीमंत झाले असे तो पत्रांत म्हणतो.

मुंबईचे सेनापती ह्यांस

आपली दि. ११ व १६ जानेवारीची पत्रे १७ मार्चला मिळाली. आपण मुंबईला सुरक्षितपणे येऊन पोहोचल्याचे वाचून आनंद झाला. आपल्या कारकीर्दीत आपणाला उत्तम आरोग्य लाभावे अशी इच्छा करतो.

..........................................................................

..........................................................................

आपल्या पूर्वीच्या मावळत्या व्हाइसरॉयनी आंग्र्यांशी जो तह केला तो योग्य की अयोग्य ते मी सांगू शकत नाही मात्र मी आपणाला येवढे सांगू शकतो की त्याचा उद्देश सफल झालेला नाही. कारण, ह्या कराराच्या कलमाप्रमाणे आंग्रे वागत नाहीत. ते मुंबईचा परवाना बाळगणारी गलबते बेधडकपणे पकडीत आहे. परवाच त्यानी मुंबईच्या रहिवाशांची काही जहाजे पकडली. ह्या राज्याशी त्यांचा मैत्रीचा करार असताना ते समुद्रावर लूटमार करून श्रीमंत झाले. ह्या राज्याचे भूतपूर्व व्हाइसरॉय कायतानु द मेलु द काश्त्रु ह्यांच्या कारकीर्दीत आंग्र्यांची आणि ह्या राज्याची मैत्री मोडली. तेव्हा आपणास मला कळवायचे आहे की, आपणाला ह्या संबंधात जी माहिती मिळाली ती चुकीची आहे. तब्बल अकरा वर्षेपर्यंत आंग्र्यांची आणि ह्या राज्याची मैत्री होती. ह्या प्रदीर्घ काळात ते सतत चांचेगिरी करून मोठे झाले. ज्यावेळी त्यांची आणि आमची दोस्ती होती, तेव्हा त्यांच्यापाशी अवघी दोन पाली आणि काही गलबते होती. आता त्यांच्यापाशी किती युद्धनौका आहेत त्याची गणती आपणच करावी आणि हे सर्व त्यानी आमच्या मैत्रीने साधले.

आपणाला कदाचित कळलेच असेल की, ह्या राज्याची सूत्रे हाती घेतल्यापासून व्यापारी जहाजे लुटणाऱ्या ह्या चांच्याची मी कधीच गय केलेली नाही. हिंदी महासागरांत संचार करणाऱ्या सगळ्याच देशांच्या नौकाना आंग्र्याचा उपद्रव होत आहे. असो. मागे आपल्या बाजूने आंग्र्यांचा बंदोबस्त करण्याच्या बाबतीत जरी चालढकल किंवा दुर्लक्ष झाले असले तरी आपल्या कारकीर्दीत आपण ह्या शत्रूचा नाश करण्यासाठी आमच्याशी सहकार्य कराल अशी आशा आहे. आपण शूर आहांत हें सगळ्यानाच माहीत आहे.

जनरल दों ज्युआव फेर्नांडिस द आल्मैदा ह्याना मी आपणाशी आंग्र्यांचा बंदोबस्त करण्याच्या योजने संबंधी बोलणी करण्याबाबत

हुकूम केला आहे. तो योजना जर यशस्वी झाली तर आमच्या दोन्हीहि देशांचा सर्वत्र बोलवाला होईल + + +

..........................................................................

गोवा, १८ मार्च १७१६
आपला आज्ञाधारक
व्हास्कु फेर्नांदिश सेझर द मिनेझिश

---

**क्रमांक : ३१५** **दि. २१-३-१७१६**

छत्रपती संभाजी दुसरे व गोव्याचा व्हाइसरॉय ह्यांच्यामध्ये तह व्हावा असे घाटत होते. तत्संबंधाने गोव्याच्या व्हाइसरॉयने श्रीनिवासपंत ह्याना पाठविलेले पत्र.

श्रीनिवासपंत ह्यांस

हरिपंत ह्यांच्याबरोबर पाठविलेले श्रीनिवासपंत ह्यांचे पत्र मिळाले. हरिपंताची व माझी भेट झाल्यावर राज्य सचिवांशीहि त्यांची मुलाखत झाली. दोन्ही बाजूनी विचारविनिमय झाल्यावर तपशील निश्चित करण्यात आला. तत्संबंधीचा जो कागद पत्रासमवेत पाठविला आहे त्याच्यावर हरिपंताची सही आहे. परंतु ज्या अर्थी हरिपंताचे म्हणणे आहे की, ह्या कामकाजाला मंजुरी देण्याचा त्यांना अधिकार नाही, त्या अर्थी श्रीनिवासपंत ह्यानी ती कलमे मंजुरीसाठी संभाजीराजे ह्यांच्याकडे पाठवावी. जो जासूद हीं कलमे आमच्याकडे घेऊन येईल त्यांच्याकडे मी त्यांच्यावर सही करून ती पाठवून देईन. त्या दरम्यान हरिपंतांची ज्या कागदावर सही आहे त्या कागदावरील कलमे उभय पक्षानी अमलात आणावी.

संभाजी राजे ह्याना मी उत्तर पाठविणार आहे. तसेच रामचंद्रपंत व त्या किल्ल्याचा[1] किल्लेदार ह्यानाहि मी लिहिणार आहे. हरिपंताना तिकडे लवकर जायचे आहे. संभाजी राजे ह्यांच्याकडून तहाच्या कलमावर सही होऊन ती इकडे येईपर्यंत हरिपंताना मी ह्या दरबारात थांबावयास सांगितले होते.

गोवा, २१ मार्च १७१६

व्हाश्कु फेर्नांदिश सेझर मिनेझिश

---

क्रमांक : ३१६ दि. २३-३-१७१६

मागील पत्रात (दि. २१-३-१७१६) हरिपंताची सही असलेला कागद म्हणून ज्याचा उल्लेख केला गेला आहे, तो खालील प्रमाणे आहे. Arquivo Portugues Oriental च्या संपादकानी याचे वर्णन संभाजी राजे यांच्याशी झालेला तह असे केले आहे.

१. आंग्र्यानी उत्तरेकडील प्रदेशाच्या समुद्र किनाऱ्यावरील जे किल्ले बळकावले आहेत–विशेषे करून ग्रियेंचा किल्ला, की जो संभाजी राजे ह्यांचा होता–ते घेण्याकरिता संभाजी राजे ह्यानी आंग्र्यावर समुद्रावरून आणि जमिनीवरून हल्ला करावा. ह्या युद्धात त्याना गोव्याचे सरकार युध्द नौकांची मदत करील.

२. असे कळते की, मेलुंडीच्या वृध्द किल्लेदाराने ह्या राज्याच्या प्रजाजनाचा जो माल लुटला तो आणि त्याने घेतलेली काही जहाजे संभाजी राजे गादीवर आल्यावर त्यांच्या ताब्यात आली नाहीत.

---

१. मूळ पत्रात किल्ल्याचे नाव नाही. फक्त Desta Fortaleza असे म्हटले आहे.

उपरिनिर्दिष्ट माल आणि जहाजे (गोवे सरकारला) परत मिळाली पाहिजेत. मेलुंडीच्या बंदरात काही जहाजे आहेत असे समजते. ती जरी दुसऱ्या देशांची असली तरी ती ह्या राजाला देण्यात यावीत. विशेषतः अहमद सारंग ह्याचे जे गलबत घेण्यात आले, ते त्याच्या मुलास त्वरीत परत करण्यात यावे. तसेंच दोन वर्षामागे घेण्यात आलेलें आंजेदिवचे गलबत आणि न्यायमूर्ति दोमिंगुश दोइरादु द ओलिव्हैरा ह्यांच्या गलबतावरील घेण्यात आलेल्या दहा तोफाहि परत करण्यात याव्या. सदहू जहाजावरील माल आणि मौल्यवान वस्तु मेलुंडीच्या बंदरात राहिल्या होत्या.

३. ह्या राज्याच्या प्रजाजनाना व मेलुंडीच्या रहिवाश्यांना यापुढे समुद्रमार्गे तसाच खुष्कीच्या मार्गे परस्परांशी व्यापार करता येईल.

४. ह्या राज्याच्या नौकाना आणि प्रजाजनाना समुद्रावर अनिर्बंधपणे संचार करता येईल. मेलुंडीच्या जहाजांनी त्याना उपद्रव देऊ नये. कटकटी टाळण्यासाठी आमच्या उत्तरेकडील प्रदेशाची जहाजे तिकडच्या गव्हर्नरचा अथवा किल्ल्याच्या व लष्करी ठाण्यांच्या सेनापतींचा परवाना बाळगतील. गोव्याची जहाजे गोवा सरकारचा परवाना बाळगतील, तर दक्षिणेकडील जहाजे दक्षिणेकडील वखार प्रमुखांचा आणि कप्तानांचा परवाना बाळगतील. संभाजी राजे ह्यांच्या अमलाखाली असलेल्या बंदरांच्या जहाजाना जेव्हा व्यापारासाठी ह्या राज्याच्या बंदरांत यायचे असेल, तेव्हा त्याना प्रचलित पद्धतीनुसार बरोबर परवाने आणावे लागतील. दोन्ही बाजूंच्या नौकाना नांगरपट्टी भरावी लागणार नाही.

५. आमच्या नौकाना अथवा प्रजाजनाना कारणपरत्वे मेलुंडीच्या अथवा संभाजी राजे ह्यांच्या अमलाखालच्या अन्य कोणत्याहि

बंदरात जावे लागल्यास तेथे त्याना सुरक्षितता लाभावी. अशी सुरक्षितता मेलुंडीच्या जहाजाना किंवा प्रजाजनाना ह्या राज्याच्या अमलाखालच्या बंदरात मिळेल.

६. संभाजी राजे ह्यानी आंग्र्याशी युद्ध सुरू केले आणि त्याना जर दारूगोळ्याची कमतरता भासली, तर त्यानी त्याची मागणी ह्या राज्यापाशी केल्यास, ह्या राज्याचे सरकार त्याला पाठविणे शक्य होईल तो दारूगोळा संभाजी राजे ह्याना योग्य त्या किमतीस पुरविल.

७. कुडाळचे सरदेसाई नारबा सावंत हे ह्या राज्याचे मित्र आहेत. ते ह्या राज्याचे मांडलिक असून दर वर्षी खंडणी भरतात. तशाच प्रबल कारणावाचून त्यांच्याशी ह्या राज्याला युद्ध करता येत नाही. ह्या राज्याशी त्यांची मैत्री असल्याने तिचा जाणून बुजून भंग करता येत नाही. तरीहि संभाजो राजे व नारबा सावंत ह्यांचे युद्ध जुंपल्यास संभाजी राजे ह्यांच्या विरुद्ध हे राज्य नारबा सावंत ह्याना मदत करणार नाही. कारण, संभाजी राजे ह्या राज्याशी असलेल्या मैत्रीला नव्याने मान्यता देत आहेत.

८. मेलुंडीच्या प्रजाजनांना जर आपली जहाजे ह्या राज्याच्या आरमाराबरोबर उत्तरेकडे पाठवायची असतील, तर त्याना तसे करता येईल. त्या जहाजाना परतीचा प्रवासहि त्या आरमारासमागमे करता येईल.

९. संभाजी राजे ह्यांच्या एका जहाजाला बसरा किंवा कोंगोहून घोडे आणण्याकरिता हे राज्य परवाना देईल. मात्र त्या बंदरात ह्या राज्याची जी वखार असेल त्या वखारीच्या प्रमुखाचा दाखला त्या जहाजाला आणावा लागेल. कारण, मस्कतच्या इमामाशी ह्या राज्याचे युद्ध चालू असल्याने वखार प्रमुखाचा दाखला त्या जहाजापाशी नसेल तर त्या जहाजावरील घोडे मस्कतच्या इमामाच्या अमलाखालच्या एकाद्या बंदरात घेतल्याचा समज निर्माण होईल.

सचिवालय, २३ मार्च १७१६

ह्याची मराठी मान्यता पुढीलप्रमाणे आहे :–

तोफांची बाब सोडून वर लिहिलेलें इतर सर्व मला मान्य आहे. तोफांची बाब राजेश्री संभाजी राजे ह्यानी मंजुर केली पाहिजे. मी हें स्वतः लिहिले– हरिपंत. रुजु.

---

**क्रमांक : ३१७** दि. १७–६–१७१६

छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी ह्या वतनपत्राद्वारे सिदोजी हिंदुराव घोरपडे ह्याना चिकोडीचे नाडगोंडकीचे वतन दिले.

श्री

तालिकेची नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ त्रेचाळिस दुर्मुख नाम संवत्सर आशाड शु।। नवमी भानुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छेत्रपति स्वामी याणी समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री सिदोजी हिंदुराव घोरपडे ममलकतमदार यासी दिल्हे वतनपत्र यैसाज्या. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन सेवक. तुमचे पिते राजश्री हिंदुराव याणी तिर्थस्वरूप राजश्री——कैलासवासी स्वामीची सेवा राज्याभिवृध्धीविसी असाधारण श्रम साहास करून त्याची कृपा संपादून घेतली. तसेच तुम्हीही स्वामीची सेवा यकनिष्टेने करीत अहा. तुमचे चालवणे स्वामीस आवश्यक आहे. प्रस्तुत तुम्ही राजश्री गंगाधर राव केशव याजसमागमे विनंती सांगून पाठविले की चिकोडीची नाडगोंडकीचे वतन आपणास आजन्हामरामत करून दिल्हे (पाहिजे) म्हणोन मशारनिल्हेने विनंती केली. यावरून मनास आणता

तुम्ही स्वामीचे कार्यकरते यकनिष्ट शवा करीत आहा. तुमचे चालवणे स्वामीस परम अवश्यक. याकरिता स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन इनाम चिकोडीचे नाडगौंडकीचे वतन नूतन अजन्हामरामत करून दिल्हे असे. तरी तुम्ही सदरहू नाडगौंडकीचे वतन आनभवणे. या वतनास हक लवाजिमा मोईनीप्रमाणे घेत जाणे. आणि नाडगौंडकीचे वतन तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन सुखरुप राहणे. जाणिजे. छ + `बहुत लिहिणे तरी तुम्ही सूज्ञ असा.

---

**क्रमांक : ३१८** दि. २–७–१७१६

**महालिंग कोन्यास पिराजी कोन्याने ठार मारले होते. त्याच्या मागे त्याच्या मुलामाणसाना छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी मौजे आबद येथे दोन बिघे जमीन इनाम दिली होती. ते इनाम छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी पूर्ववत चालू ठेवले.**

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे आषाढ बहुल नवमी इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत पनाळा यास आज्ञा केली येसीजे. जगदेव

शिक्का शिक्का

कोन्या याणे हुजुर पनालयाचे मुकामी येऊन विनंती केली कीं आपला बाप माहालिंग कोन्या तकसीमवार पाटील मौजे आबद ता॥ वडगाव ह्या गावावरी असतां गावीची लावणी संचणी करीत होता. तो पिराजी कोन्या तकसीमदार याणे दुर्बुधी धरून गावातील पाटील व लोक कामाकाजास गेले एसी संधी पाहून आपल्या बापास जवळ बोलाऊन तरवारेचे दाहावीस वार करून बाहीर पडोन पळोन गेला. आपला

बाप जखमानी चूर होऊन मृत्य पावला. आपण व आपले धाकटे तिघे भाऊ व माय येसी आहो. केवळ सत्यानास जाला आहे. पारपत्य करावे म्हणून राजश्री शिवाजी राजे दाजी यांस सनीध विनंती केल्यावरी त्याणी मौजे मजकुरचे पाटील कुलकर्णी हुजुर आणून आपला योगक्षेम चालावा म्हणून मौजे मजकूर पैकी बिघे ०२ दोन इनाम दिल्हो आहे. त्या प्रमाणे स्वामीनी आपणास जमीन सुरक्षित चालवायची आज्ञा करून आनाची संस्था करावी म्हणून विनंती केली. त्यावरून मनास आणिता माहालिंग कोन्या याचा अन्याये नसता त्यास पिराजी कोन्या याणे मारिले. त्यामागे त्याच पुत्राचे व बाईकोचे योगक्षमास राजश्री शिवाजी राजे दाजी याणी मौजे मजकूरपैकी दोन बिघे जमीन इनाम दिल्ही हे खरे. त्या प्रमाणे दोन बिघे जमीन जगदेव कोन्या यास चालवणे हे स्वामीस अगत्य. या करिता स्वामी जगदेव कोन्या यावरी मेहरबान होऊन यास सदरहू दोन बिघे जमीन इनाम चालवावयाची आज्ञा करून तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले आहे. तरी हे जाणून मौजे आबद ताा मजकूर या गावी ठिकाण जापलाईचा मळा यापैकी बिघे ०२ दोन पेशजी दिल्याप्रमाणे जगदेव कोन्या यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवणे. या पत्राची प्रत लेहून घेऊन मुख्यपत्र जगदेव कोन्याजवळ परतोन देणे. जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब असे.

---

**क्रमांक : ३१९** **दि. २४-७-१७१६**

आपल्या वडिलाप्रमाणे आपणहि मिरज मामले मधील बावीस कर्यातीची देशमुखी व सरदेशमुखी तुमच्या स्वाधीन केली आहे, म्हणून पिराजी घोरपडे ह्यांचे व्यंकटराव नारायण (इचलकरंजीकर घोरपडे) ह्याना पत्र. त्यांत ते लिहितात, '........जैसे दाजीवर (नारो महादेव) वडिलांची व आमची यक्षीयारी आहे त्या अन्वये तुम्हावरी यक्षीयारी आहे....'

श्री

राजेश्री वेंकटराऊ नारायण वजारतमाब गोसावी यांस

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित पिराजी घोरपडे दंडवत. सुर सन सबा आसर मया आलफ. तिर्थरुप राजेश्री संताजी घोरपडे सेनापती यांही राजश्री नारोपंत दाजी यास पुर्वी नवजून कितेक महत्कार्य घेऊन प्रां मिरज दौलतेचा सरंजाम कर्यात २२ बावीस त्यास दिल्हे आहे. त्यावरी दाजीनी सेनापती वडील यांमागे आजी पावेतो आमचा जंग नामोश[1] रक्षून भहूत सेवा करून महत्कार्ये संपादून आमची किर्ती केली. त्यावरी आलीकडे आमचे त्यांचे दर्शन जालीया उपरांतीक त्यांचे आमचे अनुमते तुम्ही प्रबुध जाला. तुमचे हातुन आम्ही सेवा घेऊन तुमचे बहुत प्रकारे चालवावे आणि जैसे दाजीवर वडिलांची व आमची यक्षीयारी आहे त्या अन्वये तुम्हापरी यक्षीयारी आहे. सर्व प्रसंग मामला आहे. तुम्हास फोजस सारंजाम पुर्वी दाजीस होता त्या प्रमाणें प्रा॥ मिरज कर्यात बावीस वगैरे महाल तुम्हास करार केला आहे. तो अनुभऊन मामला करणे. दाजी म्हणीजे आमचे भाऊ तुम्ही पुतण्ये. सर्व प्रकारे तुमचे चालवावे. तुम्हीं दाजी वडील प्रा॥ आमचा कुल यक्षीयारी मामला करित जाणे. मामले मिरज कर्याती बावीस येथील वतन देशमुखी व सरदेशमुखी ते वडीली दाजीचे स्वाधीन करून आजी पावेतो करित आले. त्याप्रमाणे तुम्ही आनभवणे. तुमचे व सौवती लक्ष्मीबाई वहिनीचे समाधानास्तव मौजे बहिरवाडी क॥ सोलापुर छ १५ यावेळी सुमुहुर्ते पत्र दिल्हे असे. राजश्री दाजी वेथा निर्शनास कोंकणात गेले

---

१. दोष.

आहेत. ते आलीयाउपर त्याचप्रमाणे करार आसे. बहुत लिहिणे न लगे. छ १५ शाबान. हे विनंती.

लेखन सिमा

श्री
राजा शिव छत्रपती
तत्पर संताजी सुत
पिराजी घोरपडे
निरंतर.

---

**क्रमांक : ३२०** **दि. २६–८–१७१६**

मौजे वडणगे येथील आंब्याना वीस बिघे जमीन इनाम दिल्याचे छत्रपती संभाजी दुसरे ह्यांचे देशाधिकारी व कारकून सुभा पन्हाळा ह्याना पत्र.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे भाद्रपद बहुल पंचमी भानुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सु॥ पनाळा यासि आज्ञा केली एसीजे. गोविंद लिंगोजी व पिरा बिन नरसा आंबे वस्तो मौजे वडणगे याणी कोल्हापुरचे मुकामी स्वामी संनीध विनंती केली की आपण मौजे मजकुरचे वाडीस दाहा जण आंबे इदलशाई कारकीर्दीस आपणास इनाम चालत होता तो प्रस्तात चालत नाही. मार्गाचे अमद्रप्तीमुळे कसाला बहु. (त) री महाराजानी कृपाळु होऊन आपणा (इनाम) दिल्हे पाहिजे व घर टका माफ के (ला पाहिजे). त्याजवरुन मनास आणिता हे आंबे याजवरी कसालाही बहुत पडतो आणि पूर्वी इदलशाही कारकीर्दीस इनाम होता. सांप्रत स्वामीची स्वारी या मुकामास जाली त्यामुळे लस्करचा कसाला विशेष पडिला. यास्तव याजवरी कृपाळु होऊन यास नूतन इनाम कुलबाब कुलकानु खेरीज

हकदार व इनामदार करून मौजे वडणगे तर्फ ठाणे येथील वाडीपैकी पड जमीन वीसापांडाचे विघियाने बिघे भात जमीन ८२०.

पिरा बिन कारसा ८२ गोविंद बिन निंगा ८२
त्र्यंबक बिन पेमा ८२ जावा बिन संता ८२
शिवाजी बिन सिपा ८२ विसरोजी बिन लिंगा ८२
नरसा विन अर्जोजी ८२

तमा बिन भावपा ८२
माहादेव बिन बाळकृष्ण ८२
हणमंत बिन पेमा ८२

येकूण (आ) सामी दाह यास जमीन बिघे वीस अजरामरमत करून दिल्ह असे. तर तूं जमीन मोजून चतु:सीमा करून याचे + + + णे आणि इनाम यासि व याचे पुत्रपौत्र (वंशपरं) परेने चालवणे. प्रतिवर्षी नूतन (पत्राचा) (अ) क्षेप न करणे. या पत्राची तालीक लेहो (न घेऊन) असल पत्र भोगवटीयास परतोन देणे. सदरहू दाहा जणाचे घराचा घरटका + + + ला असे. जाणिजे. लेखनालंकार. मोर्तब असे.

तेरीख[1] १८
रमजान सुरु सबा असर

---

**क्रमांक : ३२१** **दि. २८-९-१७१६**

छत्रपती शाहू ह्यानी विरोजी माने ह्यास हुजूर पागे पैकी दोन धोडे इनाम **दिल्याचे पत्र.**

---

१. खरे जंत्रीप्रमाणे तारीख १९.

श्री

तालिक

स्वस्ती श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवछरे आस्वीन बहुल नवमी भृगुवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी राजेश्री विरोजी माने यासी

सिका सिका आज्ञा केली यैसीजे. स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन हुजूर पागपैकी घोडी बकसीस दिल्ही. बी ता। मुळजात हारवल रास करडा पागा जरास येकूण

१ १

रास दोनी दिल्ही आसत. घेऊन सुखरूप राहाणे. लेखनालंकार. मोर्तब. रुजू

तेरीख २२ र॥वल

सु॥ सबा

वार सुद सुरु सुद बार

---

**क्रमांक : ३२२** **दि. ५–१०–१७१६**

महाराणी ताराबाई कालीन कांही ऐतिहासिक घटनांची माहिती देणारे हे निवाडपत्र अत्यंत महत्वाचे आहे. यादव घराण्यातील इतर कागदपत्रात ही माहिती थोडीबहूत येऊन गेली असली तरी ती येथे साकल्याने आणि कांहीशी विस्तृत अशी आढळेल.

खालील कागद अस्सल आहे. तो चिकटबंद असून वळकटी करून ठेवलेला आहे. त्याची लांबी साडे सदुसष्ट फूट असून रुंदी सवा सहा इंच आहे. समास उजव्या व डाव्या बाजूस प्रत्येकी इंचभर ठेवलेला आहे.



स्वरुपजी यादव व गिरजोजी यादव यांच्यामध्ये झालेल्या विभाजन पत्राचा सुरवातीचा भाग. बाजूस लिहिलेला ५४ हा आकडा बंद संख्येचा आहे. क्रमांक: ३२२; पृ. ४५९

प्रत्येक चिकट बंदावर मागील वाजूस दोन लहान शिक्के आहेत.

| एक षट्कोनी | दुसरा साधारण वर्तुळाकार |
|---|---|
| राज<br>ते लेखना<br>वधी | मोरतो<br>ब सुद |

बद संख्या ५४ असून एकंदर ओळी १६५६ आहेत. प्रत्येक ओळीत शब्द अजमासे ६

श्री

स्वस्ति श्री नृप शालवान शके १६३८ दुर्मुखनाम सांछरे कार्तीक सुध प्रतिपदा भृगुवासर सु।। सन साबा असर मया व अलफ छ २९ माहे शौवाल तददिनी दरजागा मो।। किले पनाला बी हुजुर हाजीरानी मजालसी

राजकी लोक

हाजीर मजालसी

| | | | |
|---|---|---|---|
| सेखोजी काले | बहिरजी देईकर<br>देसाई ता। वारुण<br>देहे ६ | भागोजी जगथाप<br>हरगिसे तुरजण<br>तागडे | बकाजी मोरे |
| खंडोजी करजकर<br>रहीमतपूर | संभाजी कदम<br>बिन कृष्णाजी<br>खोत नेवरवाड<br>क।। रहिमंतपूर | अंताजी<br>त्रिमल | बहीरजी मोरे<br>पाटील कपिलेस्वार |

सानाजी पाटील
पा। मौजे जीती
ता। कोले

तुकोजी तावडे पाटील
मौजे कासारपुतळे
ता।। तारळे

जाणोजी वावर पाटील
साकरले

किले पनाला

रा।। तुलाजी सीतोले वीस्वासराऊ
नामाजाद किले मजकूर

रा।। खंडाजी वागचवरे
मुतालीक सदर
सर्नोबत का।। मजकुर

श्री
राजाराम चर
णी तत्पर रामशि
गसुत तुळाजीसि
तोळे निरंतर

श्री
राजा शंभु चर
णी तत्पर हींदुराव
सुत संक्राजी घो
रपडे नीरंतर

देवजी रघुनाथ
सबनीवीस

अंताजी गिरजाजी
मु।। खारखानीस
किले मजकूर

त्र्यंबक सदो
मुतालिक
सुभा
कोल्हापूर
किले पनाला

गोपाळ विठल
फडनीस दि।।
जबानीसी कीले
मजकूर

बावाजी नीलकंठ प्रभु
चेऊलकर

भास्कर शंकर दीनकरराव व रामचंद्र कृष्ण
दीनकरराव सरनाईक व नाईक मामल
दाभोळ

कोनेर बलाळ कुलकर्णी मौजे
कुरोणी का।। मजती प।। हुकेरी

बाळाजी महादेव महाजन
मौजे आंजरले ता।। केळण
प्रां दाभोल

नरसो देवजी विज्यापूरकर

बाळाजी महादेव जोसी कुलकर्णी
मौजे ठळसुरे प्रा। दाभोळ १

पांडुरं दादाजी प्रभुदुर्गकर
जीवाजी रायाजी कुलकर्णी
मौजे जाखजई व सारोले
पाा आऊसे व साबगाव
पाा ढोकी प्रांं बाळाघाट १

लोकानी कीले पनाला तट सर्नोबत व नाईकवाडी

| | | | |
|---|---|---|---|
| साबाजी चवाण | कृष्णाजी सावत | मानाजी मामुणकर | भिवाजी मामुणकर |
| १ | १ | १ | १ |
| सुर्याजी सुर्वे | लखमाजी पवार | बाजी सीतोळे | कावजी पवार |
| १ | १ | १ | १ |
| याकाजी ना।। गायकवाड | जानोजी नाईक वरेकर | बहीरजी ना।। कणसा | पिलाजी मोर्ये |
| १ | १ | १ | १ |
| माहादजी सेलार | बहीरजी जगथाप | कानोजी सीदे | संताजी सीदे |
| १ | १ | १ | १ |

प्रांत पनाला

| | | |
|---|---|---|
| आनंदराव बिन फिरगोजी देसाई प्रांत पनाला | मीरा रपीमान गोरी देसाई क।। ठाणे देहे २७ सतावीस | दी।। शामजी नरसीह ठाकरे देसपांडे प्रांा मजकूर व महालानीहाये |

श्री
राम
कीला
पनाळा
(शिक्का
कटयार)

आनंदराव बिन
देसाई
फिरंगोजी

(शिक्का
कटयार)

पाा सीराळे

तुळाजी बिन शंकराजी
निकम देशमुख

---- - . . . . . . . . . [1]

अष्टकोनी
फारशी
शिक्का

तुळजोजी वीन ब्रम्हाजी
पाटील मौजे अपटी
( निशाण नांगर )

मामले प्रभानवली

---------------- [2] धोंडो भास्कर देशकुलकर्णी

पाा कराह्याडी ----------------

[3]

काा कऱ्हाडी

सेटे माहाजन

लिंगोजी लोंढे
पटेल
(निशाणी नांगर)

मौजे कालीये
आवाजी खनजी पा।।
(निशाणी नांगर)

रामाजी देवराऊ
कुलकर्णी मौजे
मजकुर

बो।। गणेश नारायण
कुलकर्णी मौजे मजकूर

मौजे नेरले तिमाजी पा।।
बिन सिदोजी पा।।
(निशाणी नांगर)

मौजे वोंड
तुकोजी बिन चांगोजी पाटील
येसोजी पाटील
(नांगराच्या दोन निशाणी)

---

१. मुळात रेघ कोरी.
२. ,, ,,
३. जागा कोरी.

मौजे भुरभुसी
श्री काळमा
साक्ष लखमोजी पा॥
(निशाणी नांगर)
अंताजी नरसीह कुलकर्णी
तुळाजी चौगुला

मौजे खोडीसी
सटूजी बिन बाजी भोसले पटेल
मौजे मा।।
(निशाणी नांगर)

मौजे वीरे खुर्द
खळोजी पटेल मौजे मा।।
(निशाणी नांगर)
मौजे तुळसणी

मौजे येवती
लखमोजी सेवाले पा॥
(निशाणी नांगर)
मौजे घौगाऊ

मौजे परले

मौजे जखीणवाडी

मौजे वींग
आऊजी बिन रायाजी
पाटील (निशाणी नांगर)
मौजे म्हासोली
दी॥ अंताजी नरसीह
कुलकर्णी मौजे मा।।
(निशाणी नांगर)

संताजी बिन सोनजी
पाटील
(निशाणी नांगर)

मौजे कासार सीरबे
नागोजो बिन
तानाजी पा॥
(निशाणी नांगर)

सेखोजी बिन बाळोजी
पाटील मौजे मुदरुल
(निशाणी नांगर)

येसाजी बिन
आबाजी पा।।।
(निशाणी नांगर)

रखमाजी गोपी
नाथ कुलकर्णी

मौजे येलगाऊ
अंताजी बिन कृष्णाजी
पाटील माने मौजे मजकूर
(निशाणी नांगर)

विठोजी पटेल मौजे पाडली
ता।।। सातारा
(निशाणी नांगर)

| | |
|---|---|
| खेत्रोजी पटेल मौजे पाली<br>प्रां मजकूर<br>(निशाणी नांगर) | सिवराम विनायक देश—<br>कुलकर्णी व कुलकर्णी व<br>जोतिषी ताा पेरली<br>सुभा सातारा |

———————————— १

या समक्ष स्वरुपजी बिन पिराजी यादव देशमुख पाा कऱ्हाड व गिरजोजी बिन मुधोजी यादव देशमुख पाा कऱ्हाड या उभयतांचे सदरहू वतनाचे जाहाले विभाग पत्र यैसेजे. उभयता समस्त गोता पुढे येऊन विदित केले कीं पाा कऱ्हाड येथील देशमुखी अम्हा उभयेताचे वतन पूर्वी पिढी दरपिढी चालत आले. त्यास अदलशाहा पादशाहाचे वेळेस मुधोजीं बिन वणगोजी निंबाळकर याणे पुंडावे केले. त्यास आमचे वडील भेटले. याकरिता पादशाहानी वतन अमानत केले. तें वजीरास वरचेवरी तनखीयांत देत होते. त्याउपरी रणदुलाखान यांस तनखीयात दिल्हे. तदनंतर त्यांकडून दूर करून राजेश्री माहाराज शाहाजी राजे यास दिल्हे. तें त्यांकडे व त्याउपरी राजेश्री शीवाजी राजे छत्रपती साहेब यांकडे त्या उपरी राजेश्री संभाजी राजे छत्रपती साहेब यांकडे तदनंतर राजश्री राजाराम छत्रपती साहेब याकडे चालिले. त्यास आम्ही दिवाणांत श्रम साहास करून मोबलगा द्रव्य वेचून दिवाणातून वतन सोडऊन घेतले. ते उभयता अनभवीत अहो. त्यास वतनाचे खावंद आम्ही उभयता. पुढे वतन संबंधे उभयतांचे मुला लेकरांचा गर्गशा न व्हावा या विचारे सदरहु वतन अम्ही उभयेतानी आपले आत्मसंतोशे दो ठाई निमे निम विभागून घेतले असे. ऐसीयासी आम्ही उभयेता तुम्हा गोतापासी आलो आहो. तरी तुम्ही समस्त गोत अहा. आपले विद्यमाने विभागपत्र करून देणें म्हणऊन. त्यावरून समस्त गोत याणी उभयेतास पुसिले कीं पाा कऱ्हाड

१. मुळात रेघ कोरी.

येथील देशमुखीचे वतन तुमचे खरेच परंतु तुटोन बहुत दिवस जाहाले. त्यास तुम्ही उभयेतानो कोणे रीतीने वतन सोडविले ते आपलाले करीने सांगणे म्हणऊन. त्यावरून उभयेतानी आपलाले करीने सांगितले. बी तपशील (पुढील अक्षरे चिकट बंदाच्या जोडांत गेली आहेत).

तकरीर कर्दे गिरजोजी बिन मुधोजी यादव देशमुख पाा कऱ्हाड यानी तकरीर केली ऐसीजे. स्वरोपजी यादव व आपण उभयता भाऊबंद पाा मजकुरीचे देशमुखीचे वतन पूर्वीपासून आम्हा उभयताचे वडीलवडिलापासोन अनुभवीत असता अदलशाहा पादशाहाचे वेळेस संभाजी यादव व आबाजी यादव वतन चालवीत असता मुधोजी बिन वणगोजी निंबाळकर याणे पुंडावे केले कसबा कोट घेतला. ते समई देशमुख व देशकुलकर्णी त्यास जाऊन भेटले. हे वर्तमान पादशाहास कळलियावरी पादशाहानी नामजाद पाठवून गनीम मारून काढिला. देशमुख व देशकुलकर्णी यावरी बदनामी ठेवून देशमुखीचे व देशकुलकर्णाचे वतन अमानत केले. देशमुखीचे वतन वजीरास दौलतेत तनखा दिल्हा. देशकुलकर्णाचे वतन विश्वासराऊ दबीर यास तनखियात दिल्हे. याउपरी देशकुलकर्णी याचे वंशज राजश्री कासी तिमाजी दियानतराऊ पादशाहा जवळी होते त्यानी पादशाहास अर्ज करून देशकुलकर्णाचे वतन आपले दुबाले करून घेतले. देशमुखीचे वतन दिवाणात तैसेच राहिले. त्या दिवसापासून आम्हा यादवाचा भोगवटा तुटला. देशमुखीचे वतन पादशाहा वरचेवरी वजीराचे दौलतेचे पुरवणीस देत आले. त्या उपरी रणदुलाखानाचे दौलतेचे पुरवणीस दिल्हे. त्या उपरो त्याकडून दूर करून माहाराज राजश्री शाहाजी राजे यांस दिल्हे. ते त्यानी अनुभविले. त्याउपरी राजश्री शिवाजी राजे छत्रपती साहेब याणी व त्या उपरी राजश्री संभाजी राजे छत्रपतीसाहेब याणी तदनंतर राजश्री राजाराम छत्रपती साहेब याणी अनुभविले. त्यास वतन अमानत जाहालेवरी पाा कऱ्हाड हा देश अदलशाहा पादशाहा याचे स्वाधीन असतां कितेका दिवसी आपले

बाप मुधोजी यादव व भाऊ रवळोजी यादव व अर्जोजी यादव व संकराजी यादव व जोन्याजी यादव व आपण व आमची माये सहवर्तमान अवघे कुटुंब घेऊन मौजे व्याहापूर का अउद पा मजकूर या गावी असता जैतोजी यादव देशमुख का अउद हे रात्रीचे कोतवडे व्याहाले का। म।। या गावावरून सूर्योदई वीस पंचवीस स्वारानिसी जरोर मौजे मजकुरी येऊन आपले बाप मुधोजी यादव यास सांगोन पाठविले की आम्ही कालीचा दिवस रात्री उपवासी आहो. आम्हास जेवावयास पाठऊन देणें त्यास आमच्या बापानी सांगोन पाठविले की तुम्ही गावांत येऊन आमचे घरी जेऊन जावे. त्यास त्यानी सांगोन पाठविले कीं तुमचे गावास वेसी कुसू आहे याकरिता गावांत येता नये. आम्हास जेवण येथे पाठवून देणें म्हणवून सांगोन पाठविले. त्याउपरी आपले बाप मुधोजी यादव व आम्ही चवघे भाऊ जेवण घेऊन त्या जवळी गेलो. ते जेविल्यावरी आपले बाप याणी जेतोजी यादव देशमुख का मा यांस बोलिले कीं का मा चे देशमुखीचे वतन तुमचे आमचे. त्यास वतन तुम्ही खाता. आमचा विभाग आम्हास देणे. त्यासी ते बोलिले की तुम्ही व तुमच्या लेकांतून कोण्ही यकजण आम्हाबरोबर येणे आणि वतन खाणे. आपले बाप बोलिले कीं आलबता तुम्हा बरावरी येकास देऊ म्हणऊन बोलिल्यावरी ते निरोप घेऊन गेले. त्यास राजश्री शिवाजी राजे छत्रपतीसाहेब याजवळी अर्जोजी यादव सेवेसी राहिले. त्याउपरी राजश्री छत्रपतीसाहेब यांचे लस्कर या देशांत येऊं लागले. याकरिता आदलशाहा पादशाहाकडील नागोबा सो सुभेदार खटावी होता तो राजश्री स्वामीकडील लोक व त्याचे कबीले धुंडोन धरू लागला. त्यास आपले भाऊ अर्जोजी यादव यास राजश्री स्वामीनी प्रतापगडीचे इमारतीचा सुभा सांगितला आहे हे वर्तमान नागोबा सोस कळलियावरी कबिल्यास अपाये होईल हे जाणोन आपले बाप सारे कुटुंब घेऊन प्रतापगडास आले. संवेच हा प्रांत राजश्री छत्रपती स्वामीने काबीज केला. त्यावरी आपण



छत्रपती शिवाजी महाराज यानी पावनगड बांधल्याचा उल्लेख क्रमांक : ३२२: पृ. ४६७

व वरकड आपले भाऊ यास राजश्री स्वामीनी सेवेसी आपणापासी ठेऊन विशष लोभ करू लागले. त्यास दुसरे वरसी आपले बाप मुधोजी यादव हे अर्जोजी यादव यास व आम्हास म्हणो लागले कीं पाा कन्हाडीचे देशमुखीचे वतन आमचे. त्यास वतनाचा भोगवटा तुटला आहे. त्यास तुम्ही राजश्री—— छत्रपती स्वामीची सेवा करिता. वतन राजश्री स्वामी अनुभवीत आहेत. तरी तुम्ही आपले वतन राजश्री छत्रपती स्वामी जवळो मागोन घेणें म्हणून बोलिले. त्यास अर्जोजी यादव यानो उत्तर दिल्हे कीं हे वतन राजश्री स्वामोपासून हरप्रयत्ने मागून घेऊ म्हणऊन बोलिले आणि समये पाहून वतनाचा अर्ज करावया विचारावरी होते तो जेतोजी यादव देशमुख काा अउद याणी पदाजी यादव या बराबरी अर्जोजी यादव यास प्रतापगडी सांगोन पाठविले कीं राजश्री जनार्दन हणमंत नारायेण श्री यमाई स्थल अउद इच्या दर्शनास आले ते समई आमच्या मुतालिकाने त्याचे तारतम्य करावे ते केले नाहीं. याकरिता विशाद मानून काा आउद येथील देशमुखीचे वतन अमानत केले. राजश्री छत्रपती स्वामीचेही अमानतपत्र चालविले आहे. यैसीयास तुम्ही राजश्री छत्रपतो स्वामी जवळी सेवा करीत आहां तरी हे आपले वतन सोडवणे म्हणऊन सांगोन पाठविले. त्यावरून अर्जोजी यादव बोलिले कीं तुम्ही आपल्या गावास जाणे. आम्ही वतनाचा येत्न करितो. त्याउपरी राजश्री शिवाजी राजे छत्रपतीसाहेब याणी पावनगड नवा वसविला त्याची इमारती बांधावया अर्जोजी यादव यास व हिरोजी फर्जंद यांस सांगितली. त्यावरून उभेंयेतानो आपलाले कारखाने घेऊन पावनगडास जाऊन उभयेतानी पावनगडीची इमारती बांधत असतां राजश्री स्वामी पनालियास आले. ते समई जेतोजी यादव देशमुख काा अउद याणी पदाजी यादव व तुको सुरो यास वतनाच्या कार्यानिमित्य अर्जोजी यादव याजवळी पाठविले. त्यास राजश्री स्वामी पावनगडीची इमारती पाहून पनालियास येत असतां

मार्गी दोही किलियाच्या मध्यें आले ते समई अर्जोजी यादव याणी पदाजी यादव व तुको सुरो यांस समागमे घेऊन राजश्री स्वामीच्या मजुऱ्यास गेले. मजुरा केला ते समई राजश्री स्वामीनी पुसिले कीं हे कोण. त्यास अर्जोजी यादव बोलिले की प॥ कऱ्हाडीचे देशमुखीचे वतन व का॥ अउदीचे देशमुखीचे वतन आमचें. त्यास जैतोजी यादव देशमुख का॥ अउद आपले भाउवंद. त्यानी वतनाच्या कार्यानिमित्य यास पाठविले आहे. त्यावरी राजश्री स्वामी बोलिले की प॥ कऱ्हाड व का॥ अउद येथील देशमुखीचे वतन तुमचे कैसे हे पनालियास गेलियावरीं तुम्ही आम्ही बोलो. यास बराबरी घेणे म्हणून आज्ञा केली. त्यावरून अर्जोजी यादव हे व पदाजी यादव तुको सुरो यास बराबरी घेऊन पनालियास आले. राजश्री स्वामी सदरेस येताच अर्जोजी यादव व पदाजी यादव व तुकोजी सुरो यास बोलाविले. ते समई आपणही राजश्री स्वामी संनीध सेवा करीत होतो. ते प्रसंगी राजश्री स्वामी अर्जोजी यादव यास बोलिले कीं प॥ कऱ्हाड व का॥ अउद येथील देशमुखीचे वतन तो आमचे. तुम्ही आपले कशावरून म्हणता. येथें साव सेटी माहाजन आहे. त्यास बोलाऊन आणून पुसो म्हणोन बोलोन त्यास बोलाऊन आणून पुसिले की कऱ्हाडीचे देशमुखीचे वतन कोणाचे. त्यास तो बोलिला की हे वतन साहेबांचे. राजेश्री महाराज साहेबास पादशाहानी दिल्हे आहे. त्यास राजेश्री स्वामीनी मागती पुसिले की हे वतन पहिले कोणाचे. त्यावरून त्याणे अभये मागून सांगितले की हे पहिले वतन यादवांचे. यादव निंबाळकराच्या फितव्यास मिळाले याकरितां पादशाहानी वतन अमानत करून वरचेवर वजिरास तनखियात देत होते. त्याउपरी महाराज साहेबांस वतन दिल्हे. त्याउपरी राजेश्री स्वामी बोलिले की पादशाहानी याचे वतन दूर करून आम्हास दिल्हे. ते माहाराज साहेबापासून आम्ही अनुभवीत असता यास वतनासी संमंध काय. याउपरी यादवानी कऱ्हाडीचे देशमुखीचे वतन आपले यैसे म्हटले

म्हणीजे साहेबावर जोर साक्षा करतील यैसे बोलोन पदाजी यादव व तुको सुरो यास बाहेर घातले. अर्जोजी यादव पावनगडास आपले घरी येऊन दिलगीर होऊन बैसले. त्याउपरी राजेश्री स्वामी मागती पावनगडीची इमारती पाहावयास आले ते समई हिरोजी फर्जंद याणी अर्ज केला की अर्जोजी यादव याणी आपले वतनाचा अर्ज केला असतां साहेब त्यास रागास आले. तरी या सारिखीया चाकरास दिलगीर करावे यैसे नाही. पाा कऱ्हाड व काा अउद तेथील देशमुखीची दोन्ही वतने यांची यास देऊन याचे समाधान करावे. त्यावरी राजश्री स्वामी बोलिले की पादशाहानी आम्हास वतन दिल्हे असता यास वतन आपले म्हणावयास समंध काये. आता यास देणे तरी याचे चाकरीवरी नजर देऊन आम्हो आपले वतन त्यास देतो. यादवांचे वतन म्हणून देणार नाही. त्यास तुम्ही व अर्जोजी यादव याणी पावनगड बांधला. रुद्राजी म्हसका व मालजी यादव याणी पनालियाची इमारत बांधली. याकरिता तुम्हा चतुर्वर्गास दर आसामीस बक्षीस पांच पांच हजार होन नेमिले आहेत. त्याप्रमाणे तुम्हा त्रिवर्गास देऊं. अर्जोजी यादव बक्षिसाचे मुवदला काा अउद येथील देशमुखीचे वतन देऊन यैसे बोलिले. त्यावरून अर्जोजी यादव याणी पायावरी डोई ठेविली. त्यावरी राजश्री स्वामीनी काा अउद येथील देशमुखीचे वतन तुम्हास दिल्हे आसे यैसे बोलोन डोईवरी हात ठेवून वतनाची पाने दिल्ही. वतन पत्रास परवानगी दिल्ही. त्याउपरी राजश्री राजाराम साहेब याचे लग्न समीप उरले यास्तव राजश्री स्वामी स्वार होऊन रायगडास गेले. राजश्री राजाराम साहेब याचे लग्न केले. सवेच राजश्री स्वामीनी कैलासवास केला. वतनाची पत्रे होती ती न जाली. त्याउपरी राजश्री संभाजी राजेसाहेब सिंहासनारूढ जाहले. त्याणी आर्जोजी यादव यास रायगडीचे इमारतीचा सुभा सांगितला. पाचवडात राजमंदीर बांधावयाची आज्ञा केली. त्यावरून त्याणी राजमंदीर उत्तम

बांधले. याकरिता राजेश्री स्वामी व सौभाग्यवती मातुश्री येसूबाई-साहेब यैसीं संतोसी होऊन इमारतीच्या लोकास तीन हजार होन व आर्जोजी यादव यास पांच हाजार होन वक्षीस नेमिले. त्यामध्ये तीन हजार होन इमारतीच्या लोकास दिल्हे. खासा जातीचे पाच हजार होन दिल्हे ते प्रसंगी आर्जोजी यादव याणी आर्ज केला की पा कऱ्हाडीची देशमुखी का अउदीची देशमुखी ही दोन्ही वतनें आपली आहेत.त्यास पावन-गडीची इमारत बांधली ते समई थोरले कैलासवासी स्वामीनी का अउद येथील देशमुखीचे वतन आमचे आम्हास दिल्हे आहे. परंतु कागदपत्र जाहाले नाहीत. तरी स्वामीनी मेहरवान होऊन पांच हजार होन वक्षीस दिल्हे हे पोतां सेरणीस घेऊन का अउद येथील देशमुखीची पत्रे करून दिल्ही पाहिजेत म्हणऊन. त्यावरी राजश्री स्वामी बोलिले की कैलासवासी स्वामीनी वतन दिल्हे ते आम्हीही दिल्हे आसे. त्यास राजश्री कबाजी बावा पनालेस आहेत. त्याची व साहेबांची भेटी जाहालियावरी पत्रे करून देऊं म्हणोन बोलोन बक्षिसाचे होन पाच हजार पोता घेतले. त्याउपरी राजश्री स्वामी पनालियास गेले. राजश्री कबाजी बावांची भेटी जाहालियावरी आपण वतनाच्या पत्राचा अर्ज केला. त्यावरून राजश्री स्वामीनी कबजी वावास वतनाची पत्रे करून-द्यावयाविसी आज्ञा केली. पत्रे व्हावी तो तुलाजी कडु कऱ्हाडीचे देशमुखी वरी होता. तो पनालियास आला. त्याने कबजीबावास सांगितले की अउदीची देशमुखी यादवास दिल्ही म्हणजे कऱ्हाडीची देशमुखी गेली म्हणऊन. त्यावरून कबजी बावानी वतनाची पत्रे द्यावयास अनमान केला. त्याउपरी आपण राजश्री येसाजी फर्जंद याचे गुजारतीने खुर्दा टके येक हजार १००० व नाणे होन येकसे १०० व आरबी घोडा उत्तम येक राजेश्री स्वामीचे स्वारी योग्य दिल्हा आणि मागती पत्रास कबजीबावाची परवानगी घेतली. सवेच राजेश्री स्वामी व कबजीबावा अकबराचे रवानगीस गजापुरास गेले. अक़बराची रवानगी करून रायेगडास चालिले. कबजीबावास पनालियास रवाना केले. ते समई आपण वतनाच्या पत्राविसी विनती

केली. त्यावरून राजेश्री स्वामीने कबजीबावास आज्ञा केली की तुम्हांजवळी डबले आहेत. त्यात यांच्या वतनाच्या वतनाच्या[1] सनदा भरून देणे. ते कबजीबावाने मान्य करून आम्हास सांगितले की तुमचा आत्प कोणही आम्हाबराबरी देणे. त्याजवळी वतनाची पत्रे करून देतो. ते समई पदाजी यादव आम्हाजवळी होते. त्यास आम्ही वतनाच्या पत्राबदल कबजीबावाजवळी ठेविले. आम्ही राजेश्री स्वामी समागमे रायेगडास गेलो. मागे पदाजी यादव वतनाचे कागद मागत असता तुलाजी कडु मागतो पनालियास आला. त्याणे आकस करून नसतेच कबजीबावासी सांगितले की नरसींगराऊ यादव देशमुख का अउद हे व पदाजी यादव अनंदरायाजवळी जमातदारी करीत असता ते वेळेचे याजकडे सोळा हजार होन फाजील आहे ते घेऊन मग वतनाचे कागद करून द्यावे म्हणोन. हे वर्तमान पदाजी यादव याणी यैकिल्यावरी वतनाचे कागद मागतो याकरिता हे बालट करिताती तेव्हा पुढे कैसे होईल ते न कळे. यैसे जाणोन ते निघोन गेले. हे वर्तमान कबजीबावानी राजश्री स्वामीस लेहून पाठविले की अर्जोजी यादव व गिरजोजी यादव यासी याणी आपल्या भाऊ वतनाचे पत्रानिमित्य आम्हाजवळी ठेविला होता तो पळोन गेला म्हणऊन. त्यावरून राजेश्री स्वामीनो आम्हा उभयेतास पुसिले की तुम्ही कितीजण भाऊ. त्यावरून आम्ही भाऊ जे होतो ते सांगितले. त्यावरून राजेश्रो स्वामो बोलिले की कबजी बावाजवळी वतनाच्या पत्रानिमित्य ठेविला होता तो कोण म्हणून. त्यावरी आम्ही उभयतानो सांगितले की वतनाच्या पत्रा निमित्य कबजी बावाजवळी पदाजो यादव यास ठेविले होते. तो आमचा काही नव्हे. यैसे सांगितले. त्यावरी राजेश्री स्वामीस समजोन बरे म्हणोन बोलिले पदाजी यादव कबजीबावा पासून पलोन गेले याकरिता ते प्रसंगी पत्रे न जाली. त्याउपरी सिरकियाचे धामधुमे

१ मुळांत दुबार.

करिता कबजीबावा खिलणीयास गेले. सवेच राजेश्री स्वामी तेथे आले. तेथून राजेश्री स्वामी व कबजीबावा रायेगडास जावया संगमेस्वरास आले. तेथे आम्ही वतनाच्या पत्राविसी विनंती केली. होन २००० दोन हजार सेरणी दिल्ही. त्यावरून राजेश्री स्वामोनी वतनाच्या पत्रास परवानगी दिल्ही. पत्रे सिध जाहाली. राजमुद्रा जाहाल्या. सरकारकुनाचे सिके निशानास पत्रे गेली तों तेच दिवसी सेख निजाम गनीम तेथे आला. त्या वाढचात सनदा गेल्या. त्याउपरी आम्ही राजश्री राजाराम साहेब छत्रपती राज्य करू लागले त्यापासी गेलो. ते समई झुलपुकारखान गनीम रायेगडास वेढा घालावयास आला. याकरिता राजेश्री स्वामी प्रतापगडास गेले. अर्जोजी यादव यास रायगडी ठेविले. प्रतापगडींहून राजेश्री स्वामी गनिमाचे दाटी करिता परळीस गेले. तेथून पनालियास गेले. आम्हास प्रतापगडीहून मातुश्री जानकीबाई व राजेश्री शाहू राजे यास आणावया कारणे रायेगडास रवाना केले होते. आम्ही वेढियातून गडावरी जाऊन चागोजी काटकर आदिकरून सकलास राजेश्री स्वामीची आज्ञा सांगितली. ते ना यैकत. तेव्हा राजेश्री स्वामीच्या खर्चाकारणे सोने वस्तभाव मागोन घेतली आणि तैसेच वेढियातून निघोन कांगोरीस आलो. तेथे मुलुकातील लोक बदलोन येऊन गडाखाली बैसले. तेथून आपण युक्तीने निघोन रोहिडा पांडवगड वैराटगड सातारा परळी या किल्ल्यावरून गनीमाच्या सीलसिल्यामधून रातवे खपून परम संकटे तितके सोने वस्तभाव सांभाळून पनालेस राजेश्री स्वामी जवळी गेलो. त्यावरून राजेश्री स्वामी बहुत संतोसी जाहाले. ते समई आपण वतनाचा अर्ज केला. त्यावरून राजेश्री स्वामी तुमचे वतन तुम्हास देऊ म्हणोन बोलिले. त्याउपरी पनालियास गनिमाचा वेढा आला. याकरिता राजेश्री स्वामी कर्नाटकात जावयाच्या उदेशे तेथून स्वार जाहाले. ते समई उच उच जवाहिराच्या गाठोडचा बांधोन आम्हाजवळी व वरकड हुजुरिया जवळी दिल्ह्या आणि राजेश्री स्वामी समागमे जात असता

राजेश्री हंबीरराऊ व राजेश्री मानसिंग मोरे माघारे निघोन आले पुढे राजेश्री बहीरजी घोरपडे येऊन भेटले. त्यास समागमे घेऊन. राजेश्री स्वामी मार्गीचे बहुत श्रमेकडून सिवमोघ्यास गेले. तेथे राजेश्री रुपाजी भोसले व सकल लस्कर टाकून जरोर येकाकी राजेश्री स्वामीस करनाटकांत जावे लागले. तेव्हा आम्हा जवळील जवाहिराच्या गाठोड्या होत्या त्या राजेश्री खंड प्रभु चिटनिवीस यापासी देऊन आम्हास समागमे घेतले. गोठा बाहेरी गेलियावरी समुदाये बहुत देखोन आम्हासही माघे राहावयाची आज्ञा केली. याकरिता आम्ही फिरोन गोठात येऊन ज्याजवळी ज्या गाठोडिया होत्या त्या त्या आपलाल्या आपणाजवळी घेतल्या. रुपाजी भोसले व वरकड सारे लस्कर गनीमाच्या हातास लागले. त्यासंकटामध्ये नाना प्रकारीचे श्रमसाहास करून युक्तीने तितके जवाहीर जतन करून परम प्रयासे नरगुंदास आलो. तेथे आपणास वेथा जाहाली. त्यामुळे येक महिना तेथे राहावे लागले. तेव्हा ज्या पासी ज्या गाठोड्या होत्या त्या त्याणी आम्हाजवळी टाकून देऊन सारे निघोन गेले. ते सारे जवाहीर दमाजी सरखवास याणी व आम्ही जतन करून मार्गीचे परम संकटे चंदोस घेऊन गेलो. राजश्री स्वामीचे दर्शन जाहाले. जवाहिराच्या गाठोड्या पुढे ठेविल्या. गाठोडियावरी सिके किले पनाळियावरी केले होते ते रुजु केले. राजश्री स्वामी संपूर्ण जवाहीर पाहून परम संतोसी जाहाले आणि आम्हा उभयतास पांच पांच हजार चक्रे बक्षीस पाच पाच सेर रुप्याची ताटे व दोन दोन रुप्याच्या वाट्या व पाणी प्यावयाची येक येक रुप्याची घडी येक येक तरवार येक येक कटार येक येक ढाल व पांच पांच नगवस्त्रे द्यावया आणिली. ते समई दमाजी सरखवास यास सदरहूप्रमाणे दिल्हे ते त्यानी घेतले. आम्हास देते समई आम्ही वतनाचा अर्ज केला. त्यावरून राजेश्री स्वामी बोलिले की तुमची वतने काय काय आहेत. त्याउपरी आम्ही अर्ज केला की पा। कऱ्हाड येथील देशमुखी व का। अउदीची देशमुखी हे आपली वतने

यामध्ये थोरले कैलासवासी स्वामीस अर्ज केला. त्यावरून त्याणी का अउद येथील देशमुखीचे वतन दिल्हे. परंतु ते समई वतन पत्रे जाहाली नाहीत. तदनंतर राजेश्री संभाजी राजे छत्रपती याचे वेळेस संगमेश्वरीचे मुकामी वतन पत्रे सीध जाहाली तो शेख निजामाचा वाखा येऊन पडिला. याकरिता पत्रे आपल्या हातास आली नाहीत. याउपरी साहेबी आपली दोन्ही वतने आपणास देविली पाहिजेत म्हणून अर्ज केला. त्यावरून राजेश्री स्वामीनी आज्ञा केली की का अउद येथील देशमुखीचे वतन पहिले दिल्हेप्रमाणे साहेब देतात हे घेणे. पुढे राहिले वतन तेही देऊ म्हणऊन बोलिले. त्यावरून मागती अर्ज केला की ये समई साहेब कसबा अउदचे देशमुखीचे वतन देतात ते हुकुमाप्रमाणे घेतो. वस्त्रे पात्रेही घेतो. पाच हजार चक्रे बक्षिसाचे हे साहेबी वतनाचे सेरणीस घेऊन वतनाची पत्रे करून देविली पाहिजेत म्हणऊन. त्यावरून राजेश्री स्वामीनी पाच हजार चक्रे सेरणीस घेऊन का अउदचे देशमुखीपत्रे करून देविली. त्यास का मजकुरीचे देशमुखीचे वतन राजेश्री जेतोजी यादव याचे व आमचे उभयताचाच विभाग चालत आला आहे. याकरिता नरसिगराऊ बिन जैतोजी यादव व गिरजोजी यादव येणेप्रमाणे नावे घालून वतनपत्र करून घेतले. ते संताजी मुळीक याजवळी देऊन नरसिंगराऊ यादव जेतोजी यादव याचे पुत्र याजवळी पाठविले. त्यापासून अउदीचे देशमुखीचे वतन तेवढे आम्ही अनुभवीत आहो. त्याउपरी आपणास राजश्री स्वामीनी अंतःपुरीचा सरहवाला सांगितला. ते सेवा करीत असता मातुश्री राजसबाई साहेबाचे उदरी सोयेराबाईचा जन्म जाहाला. हे संतोश वर्तमान आपण राजेश्री स्वामीस श्रृत केले. त्यावरून राजेश्री स्वामी संतोसी होऊन आपणास विशष बक्षीस द्यावे म्हणऊन बोलिले. ते समई बाजी कदम खंडोजी दाभाडे याणी अर्ज केला की यास साहेब बक्षीस देता ते न द्यावे. पा कऱ्हाडीचे देशमुखीचे वतन याचे यास द्यावे म्हणऊन बोलिले.

या वरून राजेश्री स्वामी बोलिले की पा। मा।चे देशमुखीपैकी ता। उबरज व ता॥ तारगाऊ या दोनी माहालीचे देशमुखीचे वतन दिल्हे असे म्हणऊन बोलोन वतनपत्रास आज्ञा दिल्ही. ते प्रसंगी वतनाचे सेरणीस होन प्रलेघाटी २००० दोन हजार व दरबार खर्चास होन ४५०० चाडे चार हजार यैसे होन साडे साहा हजार मकाजी यादव पाटील मौजे कविठे याचे गुजारतीने वेचून उबरज तारगाऊ या दो माहालीचे वतनाची पत्रे करून घेतली ती संताजी मुळीक याबराबरी पीराजी यादव याकडे पाठविली. त्याउपरी राजेश्री स्वामीनी चौघी मातुश्री साहेबास पालेकोटास पाठविले. त्या समागमे आपणास पाठविले. मागे माहादजी जगदाळा हुजुर चंदीस येऊन गैरवाका विदित करून ता। मसूर येथील देशमुखीचे वतनपत्र करून घेतले. हे वर्तमान आपण चंदीस आलियावरी कळले. त्यावरी आपण राजेश्री स्वामीस विनंती केली आणि त्यास वेव्हार सांगोन त्यास खोटा करून त्याणे पत्रे करून घेतली होती ती रद म्हणऊन नूतन राजपत्रे करून घेतली. या कार्यास खर्च पडिला होन प्रा। ५००० पाच हजार. त्याउपरी राजेश्री सिवाजीराजे छत्रपती याचा जन्म जाहाला. हे संतोश वर्तमान आम्ही राजेश्री स्वामीस स्रुत केले. ते समई राजेश्री स्वामी परम संतोसी होऊन आम्हास विशष बक्षीस द्यावी म्हणऊन बोलिले. ते समई आपण पा। कऱ्हाड येथील देशमुखीचे वतन आपले. मधे उबरज तारगाऊ या दोही माहालीचे देशमुखीचे वतन साहेबी आपणांस दिल्हे आहे. वरकड राहिले वतन आपले आपणास देविले पाहिजे म्हणऊन अर्ज केला. त्यावरून राजश्री स्वामी कृपाळु होऊन पा। कऱ्हाड येथील देशमुखीचे सारे वतन आम्हास दिल्हे. पत्रे व्हावी तो येका येकी झुल्पकारखान गनीम आला. याकरिता पत्रे झाली नाहीत. त्याउपरी झुलपुकारखान गनीम चंदीस परीघ घालावयास आला. तेव्हा राजेश्री राजा कर्ण भोसले यांस झुल्पकारखानाकडे पाठवून सख्य करावे लागले. त्या

समागमे आम्हास व राजेश्री शंकराजी पंडित सुमंत व राजश्री बावाजी प्रभु यास देऊन झुलपुकाराचे भेटीस पाठविले. आपण राजेश्री राजा कर्ण भोसले यास घेऊन जाऊन झुलपुकारखानाची भेटी करून तेथील नानाप्रकारोचे विशम संधी होत्या त्या तितक्या सांभाळून राजाकारणास अंतर पडो न देता पुन्हा राजेश्री राजाकर्ण यास सांभाळून घेऊन आलो. ते प्रसंगी राजेश्री स्वामी बहुत संतोसी जाहाले आणि शंकराजीपंतास वक्षीस चक्रे यक १००००० यक लाख व आम्हास बक्षीस चक्रे ५०००० पनास हजार व बावाजी प्रभु यास २५००० पंचवीस हजार बक्षीस दिल्हे. ते समई आपण विनंती केली कीं पनास हजार चक्रे साहेब देतात ते सेरणीस घेऊन पा। कन्हाड येथील देशमुखीचे वतनाच्या सनदा करऊन देविल्या पाहिजेत. त्यावरून राजेश्री स्वामीनी वतनाची पत्रे करून देविली. पत्रे व्हावी तो येकायेकी झुलपुकारखानाने येऊन चंदीस वेढा घातला. संकट बहुत जाहाले. तेव्हा राजेश्री स्वामी येलुरास जरोर गेले. मागे झुलपुकारखान याणे सुलतान-ढवा करून चंदी घेतली. संपूर्ण लोकाचे कबिले धरिले. गनीमाने मार्गाचा अवरोध केला असता त्या संकट प्रसंगामध्ये आम्ही आपल्या जीवाची व कबिल्याची आशा सोडून केवळ साहास कर्म करून मातोश्री तारावाईसाहेब व राजेश्री शिवाजीराजे व मातोश्री राजसबाईसाहेब यांचे उदरी राजेश्री संभाजी राजे यांचा संभव होऊन साहा महिने जाहाले होते ती व त्यांची कन्या सोयराबाई व उभयता मातुश्रीचे सेवेसी बाइको असिली पाहिजे याकरिता लखमु कारभारीण समागमे घेऊन मार्गीचा स्वता पायें उतारा करून परमश्रमेकडून येलुरास राजेश्री स्वामी समीक्ष घेऊन आलो. उभयेता मातुश्री आईसाहेब व राजेश्री शिवाजी राजे व सोयराबाई यांच्या व राजेश्री स्वामीच्या भेटीसमई राजेश्री स्वामी व संपूर्ण सरकारकून व हुजरे परमसंतोसी होऊन बोलिले की या संकटातून राजकुमारास घेऊन आले हे काही सामान्य कर्म केले नाही. राजकुमार म्हणजे राज्याचे जीवन. ते

याणी आपल्या जीवाची होली करून सौंरक्षुन आणिले. येणेगुणे राज्यास दुणी आयुश चढले इत्यादि गौरव गोष्टी बोलोन राजेश्री स्वामी बोलिले की या संतोश समई गिरजोजी यादव यास काये द्यावे म्हणऊन. ते प्रसंगी दाजी कदम व खंडोजी दाभाडे व खंडे प्रभु चिटनिवीस व रवळोजी इगवले व संपूर्ण हुजरे व सरकारकून याणीं अर्ज केला की पाा कऱ्हाडी येथील देशमुखीचे वतन साहेबी यास दिल्हे आहे. पत्रें जाहाली नाहीत. तीं पत्र करून देववावी म्हणऊन. त्यावरून राजेश्री स्वामीनी पत्रास आज्ञा दिल्ही. तों सवेच जुलपुकारखान येलूरास येतो म्हणऊन वर्तमान आले. याउपरी येलूरी राहाता नये यैसे जाणोन आपण हर उपाये करून देशास जावे यैसा विचार राजेश्री स्वामीने करून उभयता मातोश्री आईसाहेब व राजकुमार व सोयराबाई यास कळले त्या रीतीन देशास घेऊन येणे म्हणऊन आम्हास आज्ञा केली. ते गोष्टोचीहो आम्ही सिधता केली. तो देसीहून राजश्री जाधवराऊ लस्करसहवर्तमान आले. त्यासमागमे घेऊन सर्व सामुदायासहित राजेश्री स्वामी देशास आले मार्गी आम्हास विशष श्रम जाहाले तेथून राजेश्री स्वामी कोपल भुदरगडावरून पनालेस आले. आम्ही समागमे आलो. तेथे आमचा कबिला मागे राहिला होता तोही आला. तेथून राजेश्री स्वामी विशाळगडास आले. तेथे मातोश्री राजसबाईसाहेब गरोदर होती म्हणऊन त्यास तेथे ठेऊन मातोश्री ताराबाईसाहेब व शिवाजी राजे यास समागमे घेऊन कोकणोची स्वारी करून प्रतापगडास जाऊन श्रीचे दर्शन घेऊन परतोन हेळवाकास आले. तेथे विशाळगडाहून राजेश्री संभाजी राजे यांचा जन्म जाहाला म्हणऊन वर्तमान आले. ते आम्ही राजेश्री स्वामीस विदित केले. त्यावरून राजेश्री स्वामी बहुतच संतोसी जाहाले. चंदीहून गिरजोजी यादव याणी तांब्राच्या संकटातून राणीया काढून आणिल्या त्यामुळे आम्ही हे संतोशाचे दिवस पाहिले इत्यादि गौरवगोष्टी बहुत बोलिले आणि बक्षिस विशष

द्यावी म्हणऊन प्रसंग केला. वक्षिस देते समयी आपण बक्षिस कबूल न करितां वतनाच्या पत्रांचाच अर्ज केला. त्यावरून राजेश्री स्वामींनी राजेश्री खंडप्रभू चिटनिविस यास वतनपत्रे करून द्यावयाची आज्ञा केली. तेच दिवसी मातुश्री तारावाईसाहेव व राजेश्री शिवाजी राजे यास परळोस रवाना केले. त्या वरावरी आम्हास दिल्हे. याकरिता वतनाची पत्रे करून घ्यावयास अनकूल पडिले नाही. त्याउपरी राजश्री स्वामी विशाळगडास राजेश्री संभाजी राजे याचे बारसे करावयास गेले. वारशाचे प्रसंगी मातुश्री राजसवाईसाहेब यानी आमच्या वतनाच्या पत्राकरिता वारसे तटवून विनंती केली. त्यावरून राजेश्री स्वामीनी त्या तातडीमधे पत्रे करून मातोश्री साहेबाजवळी दिल्ही. त्याउपरी बारसे केले. ते पत्रे मातुश्री मातुश्री[१] साहेबी आम्हाजवळी पाठविली. पत्रें पाहाता तातडी करितां व आम्ही जवळी नव्हतो याकरिता संप्रदायें शुध जाहाली नाहीत. त्याउपरी राजेश्री स्वामी विशाळगडाहून परळीस आले. तेथून मातोश्री ताराबाई साहेबांस व आम्हास समागमे घेऊन सातान्यास आले. आम्ही परळीत असतां राजश्री पिराजी यादव मल्हारजी कालभार पाटील मौजे पाली हे व आणखी दोघ चौघ वतनदार यैसे आमच्या भेटीस आले होते. तेही आम्हासमागमे सातारियास आले. मागून स्वरूपजी यादवही आले. ते प्रसंगी पिराजी यादव आम्हास बोलिले की तूं आमचे कुली जेन्मलास आमचा वतनाचा उधार केला. उबरज तारगाऊ येथील देशमुखीची पत्रे संताजी मुलिक या बराबरी आम्हापासी पाठविली ते आम्ही राजेश्री रामचंद्र पंडित याजवळी घेऊन जाऊन त्यास ५००० पाच हजार रुपये सेरणी देऊन त्याची दुबाले पत्रे करून घेतली ते तुमचा पुत्र मुधोजी यादव व संताजी मुळीक या बराबरी देऊन महालास लाविली. ते व आम्ही वतनाची खटपट करीत असता

१. मूळात दुबार.

मुलकात आम्हास कोणी वतनाचा चौका बैसऊ देत नाहीत. या उपरी राजेश्री स्वामी व तुम्ही या प्रांते आले आहा. हे देशमुखी सोडवावयास श्रमसाहास तुम्ही केले आहा. या उपरी वतनाचा चौकाही तुम्हीच बैसवणे. वतनही तुम्ही चालवणे यैसे म्हणऊन पिराजी यादव याणी वतनाचे सिके आमच्या नावे घडऊन त्याची पूजा करून आमच्या गळा घातले. तेव्हा आम्ही पिराजी यादव यास सांगितले की ता। उबरज ता। तारगाऊ येथील देशमुखीची पत्रे वतनही राजेश्री स्वामीनी पहिलेच करून दिल्ही आहेत. अलेकडे पा। कऱ्हाड येथील देशमुखीचे वतनही आम्हास दिल्हे आहे. वतनाची पत्रे राजेश्री स्वामीचा मुकाम येकास्थळी जाहाला म्हणजे सावकासीने करून घेतो म्हणऊन सांगितले. त्यावरून पिराजी यादव बहुत संतोसी जाहालें. त्या उपरी त्यास निरोप दिल्हा. ते घरात गेलें. आम्ही यादो गिरमाजी यास मुतालकी देऊन ते व संताजी मुलीक यैसे उबरज तारगावास पाठविलें. त्यानी वतनाचा चौका बैसविला. त्याउपरी राजेश्री स्वामी सातारा‌हून कर्नाटकाचे स्वारीस गेले. मातोश्री ताराबाईसाहेब व राजेश्री शिवाजी राजे यास परळीस जावयाची आज्ञा केली. त्या समागमे आम्हाला जावयाची आज्ञा केली. त्यास सातारा असता पुष्यमासी पालीच्या खंडेरायाची यात्रा आली. यात्रेमधे पालखो निघालियाचे दुसरी दिवसीचा हासील देशमुख व देशकुलकर्णी याचा. त्यास मातोश्री ताराबाईसाहेब व राजेश्री रामचंद्र पंडित यास सांगोन भागोजी जगथाप वाडीयातील मूल व हुजरातीचा जमाव पालीस पाठऊन ते दिवसीचा देशमुखीचा हासील डबीचा पैका व वस्त्रे व भंडार व खारीक खोबरे घेऊन सातारियास मातुश्री आईसाहेब व राजेश्री रामचंद्रपंत होते याजवळी आणून ठेविले. त्याणी आमचे स्वाधीन केले. त्याउपरी राजेश्री स्वामी करनाटकची स्वारी करून पनाळेस आले. तेथून विशाळगडास आले. त्याउपरी राजेश्री स्वामी जाहालनापुरीचे स्वारीस जाते समई साताराहून मातुश्री

ताराबाईसाहेब व मातुश्री राजसबाईसाहेब व राजश्री सिवाजी राजे राजेश्री संभाजी राजे यासी व आम्हास विशाळगडास रवाना केले. राजेश्री स्वामी जाहालनापुरीची स्वारी करून सिंहेगडास आले. तेथे आलियावरी कैलासवास केला. या स्वारी सिकारीच्या प्रसंगाकरिता व मातुश्री ताराबाईसाहेब यास परळीस ठेविले होते. आम्ही त्यासमीप होतो. या करिता वतनाची पत्रे करून घ्यावयास अवकाश पडिला नाही. राजेश्री राजाराम छत्रपति याणी कैलासवास केलियाउपरी राजेश्री शिवाजी राजे छत्रपतिसाहेब विशाळगडी वर्षप्रतीपदेचे दिवसी राज्यासनारूढ जाले. ते समई राजेश्री परशरामपंत पेशवाई करीत असता त्याचे विद्यमाने पाा मजकुरीचे देशमुखीच्या पत्राविशई विनंती केली. ५००० पाच हजार रुपये सेरणी दिल्हे तों राजेश्री रामचंद्रपंत व परशरामपंत याचा गगंशा लागला. पनाळे खाले खंडोपंत खटावकर याणे राजेश्री संभाजी राजे याचा पुत्र अपण शाहू राजे तांब्राच्या निबंधातून निघोन आलो म्हणऊन तोतया करून मुलकातील गडा–किलियावरी कागदपत्र चालविले. या विज्वर प्रसंगाकरिता पत्रे जाहाली नाहीत. त्याउपरी तोतया मोडिला. अवरंगजेबाने पनालेस येऊन पनाला घेऊन दुसरे वर्षी विशाळगडास अला. या करिता राजेश्री छत्रपतिसाहेब व उभयता मातुश्रीसाहेब व राजेश्री संभाजी राजे यैसे प्रतापगडास गेले. राजेश्री परशरामपंत यास प्रतिनिधी सांगोन विशाळगडास ठेविले होते. विशाळगड अवरंगजेबाने घेतल्यावरी राजेश्री परशरापपंत प्रतापगडास आले. त्याउपरी त्याचे विद्यमाने राजेश्री स्वामीस व मातुश्री आईसाहेबांस अर्ज केला की आपण विशाळगडीचे मुकामी वतनाचे पत्राविषई विनंती केली त्यावरून पत्रास परवानगी दिल्ही होती. परंतु तोतयाच्या व वरकड कितेक विज्वर प्रसंगाकरिता पत्रे जाहाली नाहीत. तरी स्वामीने पाा कऱ्हाडीचे देशमुखीचे पत्रे करून देविली पाहिजेत म्हणऊन विनंती केली. त्यावरून राजेश्री स्वामीनी वतनाची पत्रे करून दिल्ही ती

आम्ही घेतली. यैसे या वतनासाठी जे जे श्रमसाहास करावयाचे ते केले व रोख द्रव्य दिल्हे. बक्षिसें दिल्हीं तीं वतनानिमित्य दिवाणांत सेरणीस दिल्हीं. हे श्रम संपूर्ण सरकारकून व हुजरीयांस ठाऊक आहेत. यैसीयास हे वतन परम साहास करून संपादिले. त्या उपरी यासीनखान कन्हाडी फौजदार होता. त्याचे भाऊ न्यामतखान राजेश्री स्वामीस हस्तगत जाहाले. त्यासी पंधरा हजार रुपये खंड केला. ते समई न्यामतखानाची माये मोगलाणिमा व यासीनखान याणी आम्हांस सांगोन पाठविले की तुम्ही कन्हाडीचे देशमुख आहा. राज्याजवळी सेवा करिता. न्यामतखान त्यास हस्तगत जाहाले. त्याला खंड केला आहे. तो खंड माफ करून न्यामतखानास सोडिवणे म्हणऊन. त्यावरून आम्ही न्यामतखानास सोडिविलीयाने आपले वतनास साधक आहे यैसे जाणून राजेश्री स्वामीस अर्ज करून पंधरा हजार रुपये माफ करून मुत्कता केली. त्या उपरी अवरंगजेब राजगडास आला. याकरिता राजेश्री स्वामी रांगणीयास गेले. ते समई आपणाकडे स्वरूपजी यादव व रुद्राजी चंदो देशकुलकर्णी व बाळोजी डुबल माहाजन व पाटील कुलकर्णी का। कन्हाड व गांवगनाचे पाटील कुलकर्णी व दयाराम यासीनखान याचे कारभारी यासह वर्तमान रांगणीयास आले. ते समई यासीनखान याणी मागितल्याप्रमाणे आपण यासीनखान यास रुपये ३०००० तीस हजार व घोडा व वस्त्रे तरवार कटार ढाल व दयारामास घोडा वस्त्रे तरवार कटार ढाल देऊन आपला मुतालिक बहिरो राम समागमे देऊन कन्हाडास पाठविला. तो जाऊन वतनाचा धंदा करीत असता राजेश्री शाहू राजे सातारियास आले. सातारा घेतला. ते प्रसंगी स्वरूपजी यादव यानी राजेश्री शाहू राजे याचे दर्शन घेऊन कन्हाडास आलियावरी स्वरूपजी यादव वतनाचा कारभार करू लागले. ते समई आमचा मुतालिक बहिरोराम निघोन आम्हा जवळी आला. राजेश्री शाहू राजे आले त्या आगोदर च्यारी वर्षे आम्ही पादशाहा अवरंगजेब याचा फर्मान देशमुखीचा करून

घेतला व दिवाणी परवाने व मिसला करून घेतल्या. त्यास खर्च रुा ३२००० बत्तीस हजार दिल्हे. यासीनखान याची तगैरी होऊन पुर्दुलाखान कऱ्हाडास आले. राजेश्री शाहू राजे यापासून राजेश्री स्वामीनी पनाळा घेतला. ते समई स्वरूपजी यादव याणी तुलाजी नाईक सिंदे व संताजी मुळीक या समागमे सांगोन पाठविले की आपणावरी वतनाचा कसाला पडिला आहे. दिवाणात पैका मागताती. तो द्यावा लागतो तरी तुम्ही टका पैका पाठऊन देणे. त्यावरून उभयता बराबरी रुपये १००० येक हजार पाठऊन दिल्हे. ते त्यास पावले. या उपरी सुहुर सन सित अशर मया अलफ या साली स्वरूपजी यादव याला पुरदुलखानाने धरिले. रुपये ३२००० बत्तीस हजार खंड केला. ते न मिळे. तयाकरिता कोटातून पळोन मौजे तडसर का आऊद येथे गेले. त्याउपरी सुभानजी माने म्हसवडकर याणी आपणाकडील कारकून पाठऊन रुपये २२००० बावीस हजार खंड करार केला. त्यावरी ठाणा येऊन पुर्दुलाखान याची भेटी घेऊन कुल वस्तभाव घोडीगलाही सात देऊन अकरा हजार रुपये फारीक केले. बाकी उरले अकरा हजार रुपये. त्यानिमित्य राजेश्री काकाजीपंत यास घेऊन आमचे भेटीस पनाळियास आले. त्याची आमची भेटी जाहाली. परस्पर कितेक अप्तचे बोलणे जाहाले. ते प्रसंगी स्वरूपजी यादव बोलिले की तुम्ही आम्ही वतनाचे खावंद. आम्हास खंड पडिला. त्यामधे आम्ही निमे खंड भरिला. उरले निमेचे अकरा हजार रुपये तुम्ही देणे म्हणून आम्हास मागितले. त्यास आम्ही उभयता वतनाचे खावंद. येकावरी वतनमुळे कसाला पडिलियावरी येकाने अनकूल पडेल ते साई करावे हे विदित आहे. या विचारें आम्ही अकरा हजार रुपये स्वरूपजी यादव यास दिल्हे परस्परे येकात्मतेने वर्तावे यैसा परस्परेनी निश्चये जाहाला त्याउपरी स्वरूपजी यादवही आम्हास बोलिले की इतके दिवस तुम्ही आही वतन अनभविले. पुढे तुमच्या आमच्या मुलालेंकराचा गर्गशा न व्हावा ये गोष्टीस देशमुखीचे वतन दों ठायी विभागून घेऊन तुम्ही आम्ही वौषपरंपरेने

आपलाले विभाग अनुभऊन सुखरूप राहावे म्हणऊन बोलिले. यैसियास आम्ही या वतनासाठी जे कस्ट मशागत केली व द्रव्य वेचिले ते तुम्हा गोतास कळावे म्हणऊन अद्यंत करिना सांगितला. याउपरी स्वरूपजी यादव वतनाचा विभाग करावा म्हणऊन बोलिले तरी हेही गोष्टीस आपण मान्य जाहाले आणि वतनाचे दोनी विभाग करून उभयेतानी घेतले असेत. तरी तुम्ही गोत आहा. आपले साक्षीनसी विभागपत्र करून दिल्हे पाहिजे. त्याप्रमाणे आपलाले विभाग अनभऊन सुखरूप राहू म्हणऊन केली तकरीर. सही. वळी आठसे येक्यासी.

तकरीर कर्दे स्वरूपजी बिन पिराजी यादव देशमूख पाा कऱ्हाड याणी सांगितला करीना यैसाजे. आपण व गिरजोजी यादव भाऊबंद. पाा मजकुरीचे देशमुखीचे वतन आम्हा उभयताचे. वडिलवडिलापासून अनुभवित असता अदलशाहा पादशाहाचे वेळेस संभाजी यादव व अंबाजी यादव देशमुखी चालवित होते. ते समई मुधोजी बिन वणगोजी निंबाळकर याणे पुंडावे केले. कऱ्हाडास येऊन कसबा कोट घेतला. तमाम मुलुक स्वार घालून लुटिला. ते समई यादव त्यास भेटले. हे वर्तमान पादशाहास कळल्यावरी नामजाद पाठऊन गनीम मारून काहाडीला. कसबा व कोट काबिज केला. नाईकवाडी यावरी तकसिराती ठेऊन गर्दना मारिल्या. कितेकाचे हातपाय कापिले. देशमुख व देशकुलकर्णी यावरी बदनामी ठेऊन दोन्ही वतने अमानत केली. देशमुखीचे वतन वजीरांचे दौलतीचे पुरवणींस तनखा दिल्हा. देशकुलकर्णाचे वतन विश्वासराऊ दबीर यास तनखियात दिल्हे. त्यास देशकुलकर्णी याचे वौशज कासी तिमाजी द्यानतराउ विज्यापुरी होते. त्याणी पादशाहास अर्ज करून देशकुलकर्णाचे वतन आपले दुबाले करून घेतले. देशमुखीचे वतन दिवाणात राहिले. ते रणदुलाखानास तनखियात दिल्हे त्याउपरी त्याकडून काहाडून माहाराज राजेश्री शाहाजी राजे यास दिल्हे. तें त्याणी व त्याउपरी राजेश्री शिवाजी

राजे छत्रपति स्वामी याणी व त्याउपरी राजश्री संभाजी राजे छत्रपति याणी त्याउपरी राजेश्री राजाराम छत्रपती याणी अनभविले. त्यास देशमुखीचे वतन पादशाहानी अमानत केल्या दिवसापासून आमचे व याचे वडिलांचा भोगवटा तुटला. आमचे व याचे वडिलास वतनाचा येत्न करावया आनकुल पडिले नाही. त्यास आमचे व याचे वडिल सुखवस्तिने मुलकात राहात असता गिरजोजी यादव यांचे बाप मुधोजी यादव मौजे व्याहापूर येथे कुटुंबासहित जाऊन राहिले तो राजेश्री शिवाजी राजे छत्रपति यांची काबिजाती मुलकात होत आली गिरजोजी यादव याचे जेष्ट बंधु अर्जोजी यादव यास राजश्री छत्रपति स्वामीने प्रतापगडीचे इमारतीचा सुभा सांगितला. याकरिता मुधोजी यादव सारे कुटुंब घेऊन प्रतापगडास गेले. त्याउपरी गिरजोजी यादव चाकरीस राहिले. उभयेताही राजेश्री शिवाजी राजे छत्रपति व संभाजी राजे छत्रपति व राजेश्री राजाराम छत्रपति यांची सेवा करीत असता याणी या वतनासाठी बहुतच कष्ट मशागती केली. अर्जोजी यादव याणी प्रतापगड पावनगडीची इमारती बांधली. पांचवडी राजवाडे मुस्तेद केले. गिरजोजी यादव हे मातुश्री दुर्गाबाईसाहेब राजेश्री संभाजी राजे छत्रपति यांची राणी दौलताबादेस तांब्राचे निबंधी होती. तेथे धणयाचे आज्ञेप्रमाणे जाऊन परमसंकटे त्याची भेटी घेऊन त्यास काढून आणावयाचा येत्न योजून येऊन वर्तमान धणयास सांगितले. त्याउपरी राजेश्री राजाराम छत्रपतिसाहेब राज्य करू लागले. संवेच झुलपुकारखान गनीम रायगडीचे वेढियास आला. याकरिता राजेश्री स्वामी रायगडीहून उतरोन प्रतापगडास गेले. तेथून पनाळियास गेले. ते प्रसंगी राजश्री गिरजोजी यादव याणी रायगडीहून सोने नाणे वस्तभाव काढून मार्गीची सुरक्षित पनालियास राजेश्री जवळी पावविली. तेथून राजेश्री स्वामी कर्नाटकास जाता समागमे गेले. सिवमोघीयाच्या वाखियामधे राजेश्री स्वामीचे जवाहीर उचउच वडिलार्जित वस्ता मागे राहिल्या ते संपूर्ण जवाहीर गिरजोजी यादव याणी चंदीस राजेश्री स्वामीपासी पावविले.

याविरहित सेवा करीत असता कितेक. श्रमसाहास करावयाचे ते केले. यैसी जे जे सेवा करीत आले ते ते सेवेवरी धणी परमसंतोषी होऊन वरचेवरी बक्षिस देत होते ते बक्षिस दिवाणात सेरणीस देऊन आपले सदरहु वतनाचा अर्ज करीत आले. ते ते समई धणी यांचा अर्ज मान्य करीतच आले. त्या उपरी गिरजोजी यादव यास राजेश्री नी दरुनी माहालीचा सरहवाला सांगितला. त्या उपरी राजेश्री स्वामीस सोईराबाई कन्या जाहाली. हे वर्तमान गिरजोजी यादव याणी राजेश्री स्वामीस विदित केले. ते समई राजेश्री स्वामी संतोसी होऊन यास बक्षिस देत होते ते याणी न घेता परगणे कऱ्हाड येथील देशमुखीच्या वतनाचा अर्ज केला. त्यावरून राजेश्री स्वामीनी त॥ उबरज व त॥ तारगाव येथील देशमुखी देऊन वतनपत्रें करून दिल्ही. उरले वतन तेही पुढे देऊ म्हणून बोलिले. ते प्रसंगी वतनाचे सेरणीस होन प्रळेघटी २००० दोन हजार व अव्हांतर दरबार खर्च होन ४५०० साडे चार हजार येणे प्रमाणे देऊन त॥ उबरज व त॥ तारगाव या दोन्हीं माहालीच्या सनदा घेऊन चंदीहून संताजी मुळिक या बराबरी आम्हाजवळी पाठविल्या त्यास आम्ही राजेश्री रामचंद्रपंतापासी जाऊन सनदा दाखविल्या. त्यावरून त्याणी सेरणी मागितली. ते समई आपले बाप पिराजी यादव याणी रुपये पांच हजार सेरणी देऊन दुमाले सनद करून घेऊन गिरजोजी यादव याचे पुत्र मुधोजी यादव व संताजी मुळीक या बराबरी माहालास पाठविल्या. त्या उपरी राजेश्री शिवाजी राजे छत्रपति याचा जन्म जाहाला. ते संतोष वर्तमान गिरजोजी यादव याणी राजेश्री स्वामीस श्रुत केले. त्यावरून राजेश्री स्वामी विशष संतोषी होऊन यांस विशेषच बक्षिस देत होते ते याणी न घेता उरले आपले वतन मागितले. त्यावरून राजेश्री स्वामी मेहरबान होऊन प॥ कऱ्हाड येथील देशमुखीचे वतन अगदी दिल्हे पत्रे व्हावी तों झुलपुकारखान गनीम चंदीस वेढा घालावयास आला. तेव्हा राजेश्री राजा कर्ण भोसले यांस झुलपुकारखानाकडे पाठवावे लागले. त्या बराबरी गिरजोजी यादव

यांस दिल्हे. याणी जाऊन तेथील विशम संधी सौरक्षून राजा कर्णास सांभाळून फिरोन राजेश्रीजवळी घेऊन आले. ते समई राजेश्री स्वामी बहुत संतोसी होऊन यास बक्षिस चक्रे ५०००० पनास हजार येकून रुपये एक लक्ष देत होते. ते याणी कबूल न करिता पाा कऱ्हाड येथील देशमुखीचे वतन साहेबी आपणास दिल्हे आहे त्याच्या सनदा जाहाल्या नाहीत त्या सनदा देविल्या पाहिजेत म्हणऊन अर्ज केला. त्यावरून राजेश्री स्वामीनी सनदाची परवानगी दिल्ही. सनदा व्हाव्या तो झुलपुकारखानाने चंदीस वेढा घातला. या करिता स्वामी जरोर निघोन येलूरास गेले. त्याउपरी झुलपुकारखानाने सुलतानढवा करून चंदी घेतली. तमाम लोक धरिले. त्या संकटातून गिरजोजी यादव याणी मातुश्री ताराबाईसाहेब व राजेश्री शिवाजी राजे छत्रपतीसाहेब व मातोश्री राजसबाईसाहेव साहा महिनीयाची गरोदर होती व त्याची कन्या सोयराबाई यैसी आपले जिवाची व कबिलीयाची तमा न धरिता केवळ साहास कर्म करून काहाढून घेऊन येलूरास राजेश्री स्वामीपासी पावविली. त्यावरून राजेश्री स्वामी यावरी फारच संतोसी जाहाले आणि विशष बक्षिस देऊ लागले. तेही याणी घेतले नाही. वतनाच्याच सनदाचा अर्ज केला. त्यावरून वनपत्राची परवानगी दिल्ही. तो संवेच राजेश्री स्वामीस निघोन देशास यावे लागले. हेही समागमे आले. त्याउपरी मातुश्री राजसवाईसाहेव सगर्भ होती. ती प्रसूत जाहाली. राजेश्री संभाजी राजे याचा जन्म जाहाला. बारसे करते वेळेस हे समीप नव्हते. मातुश्री ताराबाईसाहेब व राजेश्री शिवाजी राजे परळीस होते त्यासमीप होते. तथापि मातुश्री राजसबाईसाहेव याणी राजेश्री स्वामीस अर्ज केला की गिरजोजी यादव याणी आम्हांस चंदीच्या संकटातून काढून आणिले. तेणेकरून हे संतोषाचे दिवस पाहिले. यैसे असतां त्यास साहेबी कऱ्हाडीची देशमूखी दिल्ही आहे. त्याच्या सनदा होऊन त्याच्या हातास गेल्या नाहीत. त्या देववाव्या त्यावरून राजेश्री स्वामीनी सनदा करुन दिल्ह्या. मग बारसे केले तातडीच्या प्रसंगाकरिता व गिरजोजी यादव हे समीप नव्हते याकरिता

सदरहू वतनाच्या सनदा संप्रदायेशुध जाहाल्या नाहीत. याकरिता गिरजोजी यादव याणी सनदा माहालास पाठविल्या नाहीत. त्याउपरी गिरजोजी यादव परळीस असतां आपले बाप पिराजी यादव व मल्हारजी कारभार पाटील मौजे पाली व आणखी दोघ चौघे वतनदार यैसे गिरजोजी यादव याचे भेटीस गेले. तेथून गिरजोजी यादव व हे यैसे सातारियास गेले. मागून आपणही तेथे गेलो. ते प्रसंगी आपले बाप पिराजी यादव हे गिरजोजी यादव यास बोलिले की तुम्ही आमचे कुली जन्मलेस वतनाचा उधार केला. हे गोष्टी सामान्य केली यैसी नाही इत्यादि समाधानाच्या गोष्टी बोलिले. त्याउपरी गिरजोजी यादव बोलिले की राजेश्री स्वामीने ता।। उबरज व ता।। तारगाव येथील देशमुखीचे पत्रे दिल्हीच आहेत. अलिकडे हवेली कऱ्हाडचे देशमुखीचे वतन दिल्हे आहे. वतनाची पत्रे राजेश्री स्वामीचा मुक्काम येका ठाई जाहाला म्हणिजे सावकाशेकरून घेतो परंतु उबरज तारगाऊ या दोन्ही माहालाचे देशमुखीची पत्रे संताजी मुळीक या समागमे पाठविल्याच चौका तुम्ही कैसा बसविला नाहीं म्हणऊन बोलिले. यैसियास जे समई संताजी मुळीक या समागमे गिरजोजी यादव याणी उबरज व तारगाऊ येथील देशमुखीच्या सनदा आम्हाकडे पाठविल्या त्या सनदा व संताजी मुळीक यास आम्ही समागमे घेऊन राजेश्री रामचंद्र पंडित याकडे जाऊन सेरणी रुपये ५००० पांच हजार देऊन दुमाले पत्रे करून घेतली आणि ती पत्रे यांचे पुत्र मुधोजी यादव व संताजी मुळीक या बराबरी माहालास पाठविली. तेंपासून ते व आम्ही मिळोन वतनाची खटपट करू लागलो. परंतु आम्हास कोणही वठेनासे जाहाले. यां करिता ते समई वतनाचा चौका बैसला नाही म्हणऊन हे जाहाले वर्तमान पिराजी यादव याणी गिरजोजी यादव यास सांगितले आणि बोलिले की या वतनानिमित्य तुम्ही श्रमसाहास विशषच केले. ते वतन सोडविले. वतनाचा चौका आम्हास बैसवत नाही. याउपरी तुम्ही आले आहा. कळेल तैसा चौका बैसवणे. वतनही तुम्हीच चालवणे. यैसे बोलिले आणि

वतनाचे सिके गिरजोजी यादव याच्या नावाचे करून त्याच्या गळा घातले. त्याउपरी यादो गिरमाजी यास मुतालिकी देऊन संताजी मुळीक यास व त्यांस वतनावरी पाठविली आम्हासही निरोप दिल्हा. संताजी मुळीक व यादोपंत याणी जाऊन वतनाचा चौका बैसविला. पुष्यमासी पालीच्या खंडेरायाची यात्रा होते. तेथील पालखी निघाले दुसरे दिवसीचा हसील देशमुखीचा तोही याणी घेतला. त्याउपरी स्वामी कर्नाटकीची स्वारी करून देशास आले. संवेच जाहालनापुरीचे स्वारीस गेले. तेथून सिंहगडास आले. तेथे त्याणी कैलासवास केला. अवरंगजेव पादशाहा याणे सातारा व परळी घेतली. ते समई पा। कऱ्हाड येथे मोगलाचे ठाणे यासीनखान मयाणा फौजदार आले त्यास आम्ही भेटून वतन चालवू लागलो राजेश्री राजाराम छत्रपति याणी कैलासवास केलियावरी राजेश्री शिवाजी राजे छत्रपतिसाहेब व मातुश्री ताराबाईसाहेब विशाळगडी होती. ते राज्य करू लागले. ते समई गिरजोजी यादव याणी रुपये ५००० पांच हजार सेरणी देऊन वतनाच्या सनदाची परवानगी घेतली. सवेंच पनाळ्याखालें खंडोपंत खटाऊकर याणें आपण संभाजी राजे याचा पुत्र शाहू राजे म्हणऊन तोतया निर्माण्य केला. त्या विज्वर प्रसंगाकरिता सनदा वतनाच्या जाहाल्या नाहीत. त्याउपरी राजेश्री स्वामी प्रतापगडास गेल्यावरी गिरजोजी यादव याणी राजेश्री स्वामीस विनंती करून पा। कऱ्हाडचे देशमुखीची पत्रे करून घेतली. त्याउपरी यासीनखान याचे भाऊ न्यामतखान राजेश्री स्वामीस सांपडोन त्याला पंधरा हजार रुपये खंड केला. तेविशी गिरजोजी यादव याणी राजेश्री स्वामीस अर्ज करून खंड माफ करून न्यामतखान याची मुतगता केली. त्याउपरी राजेश्री स्वामी रांगणियास गेले. ते समई यासीनखानाची तगैरी होऊन सिलेमानखान पणी ठाणेस आले. आम्ही जमीदार जाऊन भेटलो. त्यावरी आमचे माथा नजर म्हणऊन रुपये बारा हजार १२००० ठेविले ते दिल्हे. त्यावरी सिलेमानखान यांची तगैरी होऊन यासीनखान मयाणा कऱ्हाडास आले. त्याउपरी यासीनखान याणी आम्हास व

देशकुलकर्णी व माहाजन व पाटील कुलकर्णी देखील दयाराम यासीनखान याचे कारभारी यासह वर्तमान गिरजोजी यादव याकडे रांगण्यास पाठविले ते प्रसंगी यासीनखान याणे मागितल्या प्रमाणे गिरजोजी यादव याणी यासीनखान यास रुपये ३०००० तीस हजार व घोडा व वस्त्रे व दयारामास घोडा वस्त्रे दिल्ही. ते प्रसंगी गिरजोजी यादव याणी आपला मुतालिक वहिरो राम यास समागमे देऊन ठाणेस पाठविला. तो वतन चालऊ लागला. तिसरे वरषी राजेश्री शाहू राजे याणी सातारा घेतला. ते प्रसंगी आम्ही जाऊन त्याची भेटी घेतली. त्याणी आपले माथा रुपये १०००० दाहा हजार ठेविले ते दिल्हे व अंतस्त रुपये १०००० दाहा हजार द्यावे लागले. ते देऊन आम्ही कऱ्हाडास आलो. ते समई यासीनखान याणी म्हटले की तुम्ही राजेश्री शाहू राजे यास दाहा हजार रुपये दिल्हे त्याप्रमाणे आम्हास देणे म्हणऊन म्हटल्यावरी यासीनखान यास रुपये १०००० दहा हजार दिल्हे. त्या उपरी यासीनखान याची तगैरी होऊन पुर्दुलाखान आले. यांची व त्यांची लढाई जाहाली. त्यांत यासीनखान पडिले. पुर्दुलाखान ठाणेत आले. आम्ही जमीदार जाऊन भेटलो. ते समई आमचे माथा नजर म्हणऊन रुपये २७००० सताविस हजार ठेविले ते दिल्हे. ते समई आम्ही तुलाजी सिंदे व संताजी मुळीक या समागमे गिरजोजी यादव यास सांगोन पाठविले की ये समई आम्हावरी वतनमुळे कसाला आहे. ये समई आमची साहेता करणे म्हणून. त्यावरून गिरजोजी यादव याणी तुलाजी सिंदे व संताजी मुळीक या बराबर रुपये १००० एक हजार पाठविले. ते आम्हास पावले. त्या उपरी सुहुर सन सित अशर मया अलफ या साली पुरदुलाखान याणी आम्हास निग्रह करून रुपये ३२००० बतीस हजार खंड केला. त्याचे मागणे लाविले. आपणास पैकेस ऐवज नाही. या करिता तेथून निघोन तडसरास गेलो. तेथून आपले मुतालिक रामाजी गणेश यास सुभानजी माने देशमुख म्हसवड याकडे पाठऊन आपली हकीकत त्यास कळविली. त्यावरून त्याणी राजेश्री काकाजीपंत यास पुरदुलाखानाकडे पाठऊन

त्यासी रदबदल करून रुपये दाहा हजार सोडऊन बाविस हजार रुपये करार करून आम्हास कौल पाठविला. त्यावरून आम्ही कऱ्हाडास येऊन पुरदुलखानाची भेटी घेतली. खंडामधे आम्ही सर्वहि साती घोडी गला वस्तभाव भरीस घालून अकरा हजार रुपये वारिले. उरले अकरा हजार रुपये द्यावया यैवज नाही. यैसियास गिरजोजी यादव आपले भाऊबंद. उभयेता वतनाचे खावंद. याणी आपली साहेता करावी हे उचित आहे. यैसे जाणून राजेश्री काकाजीपंत यास घेऊन किले पनालियास गिरजोजी यादव यांचे भेटीस आलो. भेटी जाहाली. ते प्रसंगी आम्ही अकरा हजार रुपयाचे तगादियाचे वर्तमान सांगितले. त्यावरून याणी आपल्या चित्तात आणिले की हे आपण भाऊबंद. यैसे असता यास हा संकट प्रसंग प्राप्त जाहाला. ये समई अंतराये न करावाया विचारे अकरा हजार रुपये दिल्हे. त्या उपरी आम्ही दिर्घ दृष्टीचे वाटेने विचार चितांत आणिला की हे वतन म्हणिजे पहिले आमचे व यांचे वडिलांचे. त्यास वतन तुटोन बहुत दिवस जाहाले असता गिरजोजी यादव याणी असाधारण श्रमसाहास करून पुन्हा वतनाचा जीर्णोधार केला. तें पासून उभयताही वतन अनुभवित आहों. पुढे यांचे व आमचे मुला लेकराचा वतनमुळे गर्गशा न व्हावा या विचारे आम्ही वतनाचे दोन्ही विभाग करून दोघानी घ्यावे ते आपलाले वौषपरंपरेने अनुभऊन सुखरूप असावे. येणेकडून यांचे आमचे मुलालेकराचा पुढे वतनमुळे गर्गशा होणार नाही. यैसे चितात आणून विभागाचा प्रसंग गिरजोजी यादव यासी केला. तेही हे गोष्टी मान्य केली आणि आम्ही उभयेतानी आपले आत्मसंताशे पाा कऱ्हाड येथील देशमुखीचे वतन रास्ती दोनी ठाई विभागून उभयेतानी घेतले असे. तरी तुम्ही गोत आहा. आपले साक्षनिसी केल्या विभागाचे विभागपत्र करून दिल्हे पाहिजे. त्याप्रमाणे आपला विभाग आपले वंशपरंपरेने अनुभऊन सुखरूप राहू म्हणऊन केली तकरीर. सही. वली तिनसे ऱ्यासी.

येणेप्रमाणे उभयेतानी आपलाले करीने सांगितले. त्यास उभयेतानी वतनाचे दोनी विभाग करून घेतले. ते कैसे यास्तव समस्त गोतानी उभयेतास पुसिले की तुम्ही वतनाचे विभाग कैसे करून घेतले आहेत ते सांगणे म्हणऊन. त्यावरून उभयेतानी दोन्ही विभाग करून घेतल्याप्रमाणे सांगितले. बी तपसील वळी आठ.

विभाग सरूपजी बिन पिराजी यादव देशमूख पा कऱ्हाड याचा विभाग बी तपसील वळी तीन[1]

येकून देह सतरी हकबोली आठसे सवा होन बयालविस पाउणे आठावन चावर दाहा बिघे रास वळी दोनी रास

इनाम देह वल येक

मौजे कुभारगाऊ मौजे येलगाऊ

·।।· .।।.

येकूण निम निम देह रास वल येक

सदरहू गावी लाजिमा कानुबाब ज्याची त्यानी घ्यावो कसबा देखील जे गाव समाईक आहेत तेथील कानुबाब लाजिमा उभयेतानी निम निम घेत जावा. या खेरीज परगणाचे उभे मार्गीचा जकातीचा विस्वा निमे निम व लाजिमा उभयेतानी निमे निम घ्यावा. वळी नव.

विभाग गिरजोजी बिन मुधोजी यादव देशमुख पा कऱ्हाड यांचा विभाग बि तपसील वळी तीन.[2]

---

१. गांवांचा तपशील घेतलेला नाही.
२. तपशील घेतलेला नाही.

येकून साडे यकोणहतरी देह होन आठसे सवा होन ब्यालविस पाउणे आठावन चावर दाहा विघे रास वळी दोनी रास.

इनाम देह वळ येक

मौजे कुभारगाऊ मौजे येळगाऊ

·।।· ·।।·

एकून देह निम रास वल येक

सदरहु गावी लाजिमा कानुबाब ज्याची त्याणे घ्यावी. कसबा देखील जे गाव समाईक आहेत तेथील कानूबाव लाजिमा उभयेतानी निमे निम घेत जावा. या खेरीज परगणाचे उभे मार्गीचा जकातीचा विस्वा निमे निम व लाजिमा उभयेतानी घ्यावा निमे निम. वळी आठ.

येणे प्रमाणे उभयेतानी विभाग करून घेतले ते सांगितले व उभयेतानी आपलाल्या तकरीरा सांगितल्या. याचा विचार समस्त गोतानी करून पाहाता प।। कऱ्हाड येथील देशमुखी पहिलेपासून स्वरूपजी बिन पिराजी यादव व गिरजोजी बिन मुधोजी यादव ये उभयेताचे वडिलांचे वतन हे खरे परंतु पादशाहानी अमानत केले. बहुत दिवस जाहाले यांचा भोगवटा तुटला. त्यासी मधे या उभयेताच्याही वडिलास यत्न करावया अनकूल पडिले नाही. या उपरी राजेश्री शिवाजी राजे छत्रपति वतन अनुभवित असता त्याच्या मुदतीपासून राजेश्री संभाजी राजे छत्रपति व राजेश्री राजाराम छेत्रपति व राजेश्री शिवाजी राजे छत्रपति यांचे वेळेस गिरजोजी यादव याणी या वतनानिमित्य असाधारण श्रमसाहास केले. द्रव्यही बहुत वेचिले. कार्याकार्यावरी धणीयानी बक्षिसे उदंडच दिल्ही. तितकीही वतनानिमित्यच धणी यास सेरणीस नजर केली आणि परमयत्ने वतन सोडविले. त्याउपरी मोगलाई दिवाणातही द्रव्य उदंडच दिल्हे. स्वरूपजी यादव यावरी वतनाचा कसाला पड़िला असता

वतनानिमित्य त्यांसही शरीक जाहाले इत्यादि गिरजोजी यादव याणी श्रमसाहास करून वतनाचा जीर्णोधार केला. स्वरूपजी यादव याणीही गिरजोजी यादव याणी उवरज व तारगाऊ या दो माहालीच्या सनदा पाठविल्या. मुदतीपासून वतनावरी राहून मोगलाई दरबार राखिला. वतनमुळे टकापैकां त्यासही उदंडच पडिला. या प्रकारे वतनाचा जीर्णोधार करून उभयता वतन अनुभवित असता दीर्घ दृष्टीचे वाटेने पुढे वतनमुळे उभयेताच्या मुलालेकराचा गर्गशा न व्हावा या विचारे उभयेतानी आत्मसंतोशे समस्त गोताचे साक्षीनसी वतनाचे दोनी विभाग करून दोघानी घेतले हें गोष्टी उत्तम केली आणि केल्या विभागाचे विभागपत्र समक्ष गोताचे साक्षीनसी मागतात. तरी याउपरी स्वरूपजी बिन पिराजी यादव देशमुख पाा कऱ्हाड व गिरजोजी बिन मुधोजी यादव देशमूख पाा कऱ्हाड या उभयेतानी या वतनाचे रास्ती विभाग करून घेतल्याप्रमाणे आपलाला विभाग आपलाले वंशपरंपरेने अनुभऊन सुखरूप राहावे. कोणी कोण्हासी कथला करू नये. यैसी आम्ही समस्त गोतानी आज्ञा करून हे विभागपत्र करून दिल्हे असे. तरी उभयेतानी सदरहू दोन्ही विभागामधे आपलाले विभाग आपलाले वंशपरंपरेने अनुभऊन सुखरूप राहावे. कोणही कोण्हासी कथला करू नये. समाईक विभागाचे गावदेखील कसबा देह ५ पांच या गावी चिठी रोखा करणे. त्यावरी उभयेतांचे शिके व्हावे. तैसेच सदरहू समाईक पांच गावीचे जमाबंदीवरी उभयेतानी सिके करीत जावे. आपलाले विभागाचे गावी चिठी रोखा करणे. त्यावरी सिका ज्याचा त्याणी करावा. परगणाचे सरजमाबंदीवर व सरपटी व तुमारावरी उभयेतानी सिके करावे. या केल्या विभागामध्ये व निर्णय केल्यामध्यें उभयेता अगर उभयेतांचे वौशपरंपरेमधे जो कोणही कथला कुसुर करील तो दिवाणाचा गुन्हागार व गोताचा अन्याई. हे लिहिले विभागपत्र, सही वळी त्रेसस्ट एकून वळी चवदासे नव,

वि कलम रुद्राजी चंदो देशकुलकर्णी पा। कऱ्हाडी

लिहिलेप्रमाणे मान्य स्वरूपजी बिन पिराजी यादव देशमुख पा। कऱ्हाड

लिहिलेप्रमाणे मान्य गिरजोजी बिन मुधोजी यादव देशमूख पा। कऱ्हाड

स्वरूपजी
यादव देश
मुख पा। कऱ्हाड
(निशाणी
नांगर)

श्री
मुधाजि सु
त गिरजोजि या
दव देशमूख
पा। कऱ्हाड

दसकत कृष्णाजी शंकर देसपांडे पा। कऱ्हाड

---

**क्रमांक : ३२३** **दि. २६-१०-१७१६**

सेनापती दाभाडे ह्याना पोर्तुगिजानी दमणमध्ये प्रतिकार केला होता त्याचा वृत्तांत गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालच्या राजास कळविला असता त्याने त्याला खालील उत्तर धाडले.

............... .................. . ................................

आपले चालू सालच्या बारा जानेवारीचे पत्र माझ्या अवलोकनात आले. त्यात आपण तिकडील घडामोडीचा आढावा घेतला आहे.

आपण लिहिता की, "मराठ्यांचा सेनापती दाभाडे ह्याने गेल्या वर्षीच्या उन्हाळ्यात मोगल बादशहाच्या प्रदेशात शिरून काही खेडी जाळली व काहीकडून कर वसूल केला. सुरतेच्या नबाबाने दाभाड्याचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. परंतु दाभाड्याचे सैन्य मोठे असल्याने त्याच्यासमोर नबाबाच्या सैन्याचा निभाव लागला

नाही. दाभाड्याने त्याला पिटाळून लाववले. तो सुरतेच्या किल्ल्यात जाऊन दारे लावून बसला. दाभाडे नंतर आपल्या बारा हजार घोडदळासह बलसाडला तळ देऊन राहिला. हे खेडे मोगल बादशहाच्या अमलाखाली असून ते दमणपासून चार कोसावर आहे. दाभाडेला जेव्हा बातमी कळली की, बादशहाच्या खेड्यातील काही देसाई व इतर रहिवाशी, सुमारे चौदा हजार लोक, दमण शहराच्या आश्रयास जाऊन राहिले आहेत तेव्हां त्यांचा त्याने शोध करण्याचे ठरविले. त्याने दमणच्या सेनापतीस पत्र पाठविलें की, दमणच्या आश्रयास जे लोक जाऊन राहिले आहेत, त्याना आपल्या हवाली करावे, न झाल्यास तुमचे परगणे जाळून बेचिराख करण्यात येतील. दमणच्या सेनापतीने दाभाड्यास साजेसेच उत्तर पाठविले. त्यावेळी उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती वसई येथे होते. दमणच्या सेनापतीनी त्याना घडलेली हकीकत कळविली व कुमक धाडण्याची विनंति केली. त्यानी त्वरीत कुमक रवाना केली. परंतु ती वेळेवर येऊन पोहोचली नाही. त्यामुळे पकडल्या गेलेल्या गुरांची मुक्तता होऊ शकली नाही. शत्रूने वरच्या दमणमधून हल्ला करण्याचे ठरविले. कारण त्या बाजूने संरक्षणाची काही व्यवस्था नव्हती. दुसरी गोष्ट अशी की, दमण आणि त्या जिल्ह्यांचे धान्य साठे तेथे होते. ह्या बाजूने शत्रूने हल्ला करताच तेथे असलेल्या बोरलेतच्या कप्तानाने त्याचा प्रतिकार केला. शत्रूला तेथे नेटाने तोंड देण्यात आले. रस्त्यांच्या तोंडावर खंदक खणण्यात आले होते. शत्रूने कैक हल्ले चढविले. पण ते परतून लावण्यात आले. शत्रूने जबर हानि पत्करून माघार घेतली. त्याने पकडलेली काही गुरेहि सोडविण्यात आली. ''

उत्तरेकडील परगण्यांना स्वाऱ्यांचा धोका असतो, यासाठी मी शत्रूला आमच्या प्रदेशात सहजरीतीने प्रवेश करता येऊ नये म्हणून शक्य ती काळजी घेण्याचा हुकूम धाडला होता. आपण त्याची चांगली अमलबजावणी केली हे मला सांगावेसे वाटते. उत्तरेकडील

परगण्यांच्या संरक्षणाची आपण उत्तम व्यवस्था केली आहे. आपण उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतीस आज्ञा करावी की, शत्रूच्या आक्रमणामुळे होणारी हानि टाळण्यासाठी त्यानी त्या परगण्याच्या संरक्षणाची योग्य ती काळजी घ्यावी. कारण, त्या बाजूने शत्रूकडून स्वारी होण्याचा धोका असतो. तसेच बोर्लेतच्या कप्तानाला बोलवून घेऊन त्याने दाभाड्याचा प्रतिकार करताना जो पराक्रम गाजविला, त्याबद्दल माझ्या वतीने त्याचे अभिनंदन करावे. आपल्या पत्रात आपण लिहिलेच आहे की, दाभाड्याकडून उत्तरेकडील परगण्याची मोठी नुकसानी होण्यापूर्वीच त्याचा प्रतिकार करण्यात आला.

.............................................................................

.............................................................................

---

**क्रमांक : ३२४** **दि. ११-१-१७१७**

संक्राजी खंडुजी देसाई ह्याला मौजे आरदाळ उतुर हा गाव मोकासा दिला आहे म्हणून छत्रपती संभाजी दुसरे ह्यांचे आज्ञापत्र.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिसेक शके ४३ दुर्मुखनाम सवछर माग सुध दसमी भृगुवासरे क्षेत्रिये कुलावतांस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी--------

मोकदमानी मौज आरदाळ उतुर

सुभा आजरे

यासी आज्ञा केली येसीजे. मौजे मार पेशजीचा मोकासी याजकडून दूर करून हाली संक्राजी बिन खंडुजी देसाई ता मजकूर

याजकडे मोकासा दिल्हा आहे. तर तुम्ही यासी रुजुवात राहोन मोकासबाबेंचा ऐवज याजकडे बिलाकुसुर पावणे. निदेश समक्ष.

बार सुरु सुद बार

तेरीख ८

सु।। सबा अशर मया अलफ

---

**क्रमांक :** ३२५ दि. २४–३–१७१७

कुडाळचे नारबा सावंत ह्यांच्याशी युद्ध करण्यासाठी छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी गोव्याच्या गव्हर्नरकडे मदत मागितली होती. गव्हर्नरने संभाजी राजे ह्याना पुढील उत्तर धाडले.

संभाजी राजे ह्यांस

आपले पत्र मिळाले. आनंद झाला. ह्या राज्याशी आपली चांगली मैत्री आहे. मी ती चालू ठेवीन. बंडखोर नारबा सावंत ह्यांचा पराभव करण्याचा आपला निर्धार असून हा हेतु साध्य करण्यासाठी सर्व सामर्थ्य एकवटण्याचा आपला विचार आहे. त्यासाठी आपण माझी मदत मागितली आहे. मित्र ह्या नात्याने मी त्या कामी मागे राहणार नाही + परंतु आपले पत्र घेऊन आलेला मनुष्य तितकासा हुषार नसल्याने तो माझ्या समक्ष ही बोलणी करू शकेल असे मला वाटले नाही. म्हणून आपणाला हिंदुराव घोरपडे ह्याना गोव्यास + + + + पाठविण्याची + + + करता येईल. त्याने बरोबर आपले पत्र आणले पाहिजे व तो बोलणी करण्याइतका हुषार असला पाहिजे. + + + + चांगल्या मित्राचे सौजन्य + + + आपणाला आढळेल.

आपणावर देवाचा अनुग्रह होवो.

गोवा, २४ मार्च १७१७

दों सेबास्तिआंव आर्चबिशप गव्हर्नर

---

**क्रमांक : ३२६**

दि. २४–४–१७१७

कोल्हापूरचे राजे छत्रपती संभाजी दुसरे ह्यांचे दोन सरदार वाडीकर सावंताच्या प्रदेशात आक्रमण करीत गोव्याच्या हद्दीवर संचार करीत होते. पोर्तुगिजांच्या प्रदेशावर स्वारी करण्याचा त्यांचा बेत असल्याचे कळतांच गोव्याचे गव्हर्नरने ही बातमी राज्य सल्लागार मंडळाला विदीत केली.

दि. २० एप्रिल रोजी पानेली येथील उद्यानातील वाड्यात राज्य सल्लागार मंडळाची बैठक भरली. गव्हर्नर आर्चबिशप डॉ. प्रिमाझ ह्यानी सांगितले की, पिलाजी घोरपडे व रामराव हे जे शिवाजीचे[1] दोन सरदार नारबा सावंत ह्याचा मुलुख आणि किल्ले घेत बार्देश हद्दीवर संचार करीत होते, त्यानी काल उसगावचा किल्ला घेतला व आतां ते सांगेला रवाना झाले असल्याची वार्ता फोंड्याहून आली आहे. सांगे हा सोंधेच्या राजाचा प्रदेश असून तो आमच्या साष्टी प्रांताला लागून आहे. अशी कुणकुण आहे की, कुकळ्ळीवर हल्ला करण्याचा त्या दोघां सरदारांचा विचार आहे.

डॉ. प्रिमाझ पुढे म्हणाले की, सदहू सैन्य मोठे असल्याकारणे कुकळ्ळीला व विशेषेकरून साष्टीला त्या सैन्याच्या स्वारीचा धोका असल्याचा इशारा देण्यात येत असून, साष्टीहून कुकळ्ळीला सैन्य पाठविण्याची व्यवस्था करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे मुरगाव

---

१ कोल्हापूरचे संभाजी दुसरे.

बंदरांतील नौसैनिकाना कुकळ्ळीच्या मदतीला जाण्याचा हुकूम पाठविण्यात येत आहे.

डॉ. प्रिमाझ ह्यानी सल्लागार मंडळाच्या सदस्याना विनंती केली की, ही व्यवस्था पुरेशी आहे की, साष्टीला आणखी सैन्य पाठविले पाहिजे ते त्यानी सांगावे.

सर्व सदस्यांचे म्हणणे पडले की, साष्टीला सैन्याची कुमक पाठविण्यात यावी. परंतु त्याचबरोबर बार्देशच्या संरक्षणाकडेहि दुर्लक्ष होता कामा नये. तिथले सैन्य काढून घेऊ नये. सर्व काही दों लुईज द कॉश्त ह्यांच्या हुकूमाप्रमाणे झाले पाहिजे. कारण, ते त्या प्रांताचे सेनापती आहेत.

---

**क्रमांक** : ३२७ दि. २८–४–१७१७

ममघाण ह्या नावाचा एक मोगल सरदार फोंड्याचा व त्याच्या लगतच्या प्रदेशाचा ताबा घेण्यासाठी आला असतां मराठ्यांनी त्याला वेढले. त्या वेढ्यातून आपली सुटका व्हावी म्हणून गोव्याच्या गव्हर्नरकडे त्याने गोव्याच्या राज्य सचिवा मार्फत मदतीची विनंती केली असता त्या पत्रास राज्य सचिवाने खालील उत्तर धाडले.

मोगल बादशहाचे दिवाण ममघाण[1] ह्यांस

आपण फोंड्याचा किल्ला व त्याच्या लगतच्या प्रदेशाचा ताबा घेण्यासाठी आला असता आपले घोडदळ व पायदळ ह्यांच्यासह आपण वेढ्यांत सापडलात. ही बातमी आपण मला कळविलीत व मदत

---

१ मूळ पत्रांत Mamghan असे म्हटले आहे. बहुधा महमदखान ह्या नावाचा तो अपभ्रंश असावा.

पाठविण्याची विनंती केलीत. आपल्या वतीने मी गव्हर्नरना ही परिस्थिती विदीत केली, तेव्हां त्यानी मला सूचना केली की, शिवाजीच्या[1] सैन्याच्या हल्ल्यापासून आपला बचाव व्हावा ह्यासाठी आपणाला आपली सर्व माणसे व घोडदळ ह्यांच्यासह कुंभार जुवे बेटावर नेऊन सोडण्याची हुकूम गोवा नदीच्या सेनापतीस करावा. ह्या राज्याची मोगल बादशहाशीं महान मैत्री आहे. म्हणून आपणाला ह्या प्रसंगी मदत करणे आम्हास क्रमप्राप्त आहे. पोर्तुगीज राष्ट्राच्या सच्च्या मैत्रीचा अनुभव आपणास प्राप्त व्हावा अशी गव्हर्नर साहेबांची इच्छा आहे. आपल्या मित्रांचे कसे रक्षण करायचे ते पोर्तुगीज राष्ट्राला चांगले माहीत आहे. त्या निष्ठेचे प्रसंग आपल्या निदर्शनास वारंवार यावेत अशी माझी इच्छा आहे.

पानेली २८ एप्रिल १७१७

ज्युआव आब्रेव माशादु

---

**क्रमांक : ३२८** दि. ५-५-१७१७

कोल्हापूरचे छत्रपति संभाजी दुसरे ह्यानी वाडीचे नारबा सावंत ह्यांच्याशी लढण्याकरतां पोर्तुगिजांकडे मदत मागितली होती. संभाजी राजे ह्यांचे पत्र पोर्तुगीज गव्हर्नरने राज्यसल्लागार मंडळासमोर ठेवले असतां बहुतेक सर्व सदस्यानी संभाजी राजे ह्याना मदत पाठवू नये असा सल्ला दिला.

दि. ५ मे १७१७ रोजी पानेली येथील उद्यानांतील वाड्यांत भरलेल्या राज्य सल्लागार मंडळाच्या बैठकीत गव्हर्नर आर्चबिशप डॉ. प्रिमाझ ह्यानी सांगितले की, शिवाजी[2] राजे ह्यांचे मला एक

---

१. मराठ्यांच्या.
२. संभाजी दुसरे.

पत्र आले असून त्यांत त्यानी बंडखोर नारबा सावंत ह्याचे पारिपत्य करण्याचे कामो आपणाला आम्ही मदत करावी अशी विनंती केली आहे. ते म्हणतात की, ह्या मोहिमेत त्यांचे सेनाप्रमुख आणि सेनाधिकारी तर भाग घेणार आहेतच; परंतु त्यानी कान्होजी आंग्रे ह्याना आपल्या मदतीला आरमार पाठविण्याची व सोंधेच्या राजाला त्याचे घोडदळ पाठविण्याची विनंति केली आहे. त्यानी पत्रांत आठवण करून दिली आहे की, ह्या राज्याशी त्यांची मैत्री असल्याकारणे, त्यानी नारबा सावंत ह्यांच्याविरुद्ध लष्करी मोहीम सुरु केली असल्यास भूतपूर्व व्हाइसरॉयनी त्यांना दारूगोळा व आरमार ह्यांची मदत करण्याचे आश्वासन दिले होते. गव्हर्नर पुढे म्हणाले की, मी संभाजी राजे ह्यांना त्यांचे पत्राचे उत्तर पाठविले आहे. त्याना मी कळविले आहे की, त्यांना आमच्याकडून जी मदत हवीं आहे तिच्या संबंधी वाटाघाटी करण्यासाठी त्यानी आमच्याकडे त्यांच्या एका विश्वासू व वजनदार दूताला पाठवावे. त्यांच्या मागणीला मी नकार न देतां असे मोघम उत्तर पाठविले, त्याचे कारण हे की, त्यांना जर नकार दिला असता, तर त्यानी आमच्यावर वचनभंगाचा आरोप केला असता व त्याची परिणती परस्परांकडील राजनैतिक संबंध तुटण्यात झाली असती. संभाजी राजे ह्यांच्या मागण्या आम्हाला मान्य करतां येत नाहीत त्याचे कारण हे की, त्या मदतीचा कदाचित आमच्या विरुद्धच उपयोग होण्याचा संभव आहे. त्यांना, ऐंशी खंडी दारू, भारी तोफा आणि आरमारी मदत हवी आहे. आरमारी मदत पाठविता आली असती. परंतु कान्होजी आंग्रे हा आमचा हाडवैरी असल्याकारणे त्याच्या आरमाराबरोबर आमचें आरमार संयुक्त हालचाली करू शकत नाही. संभाजी राजे ह्यांना मोघम उत्तर पाठविण्याचे तिसरे कारण हे की, ते पत्र त्यानी एका सामान्य मनुष्या-बरोबर पाठविले हे होय. हा अज्ञात हिंदु दर्जाने सामान्य असून तो कुंभार्जुवे येथें होता. प्रस्तुत पत्रानंतर पिलाजी घोरपडे व रामराव ह्या दोघानी साष्टीमध्ये आक्रमण केल्यावर सरसेनापती हिंदुराव

ह्यांचे पत्र आले. त्यांत त्यानी आपले कामकाज राम शेणवी हे बघतील असे म्हटले आहे. राम शेणवी ह्याना बोलवून घेतले असतां त्यांनीहि त्यांना आलेले हिंदुराव घोरपडे ह्यांचे पत्र दाखविले. दोन्ही पत्रांतील विषय एकच आहे. प्रश्न पैशाचा आहे. ह्या पत्राला उत्तर काय पाठवावे ते कळेनासे झाल्याने ते बैठकीसमोर ठेवित आहे.

गव्हर्नर आणखी पुढे म्हणाले की, साष्टीमधील आक्रमणाचा विचार करण्यासाठी मी सल्लागार मंडळासमोर तो विषय ठेवण्याचा विचार केला होता. तोंच गेल्या सोमवारी संभाजी राजे व हिंदुराव ह्या दोघांची आणखी पत्रे आली. त्यांत ते म्हणतात की, रामराव ह्यांने जे आमच्या प्रदेशांत आक्रमण केले त्याला त्या दोघांनी परवानगी दिली नव्हती. त्यांची परवानगी न घेताच त्याने ते आक्रमण केले. त्याबद्दल त्याला शासन करण्याचा त्यांचा निश्चय असून त्याला त्यानी आक्रमण मागे घेण्याचा हुकूम केला आहे. सदहू पत्रात त्या दोघानी एका सरकारी अधिकाऱ्यासह आरमार पाठविण्याची विनंती केली आहे. अशा परिस्थितीत प्रस्तुत पत्राना उत्तर काय पाठवावे व आणखी काय कारवाई करावी तत्संबंधीचा सल्ला सदस्यानी द्यावा.

गव्हर्नरानी सल्लागार मंडळासमोर आणखीहि एक ठराव मांडला. त्यानी सांगितले की, बार्देशच्या सेनापतीने कळविले आहे की, शिवाजीच्या सैन्याने थिवीच्या तटाबाहेरील खेड्यांवर हल्ला करण्याच्या इराद्याने हालचाली सुरू केल्याची बातमी आहे. तरी तटाबाहेर पडून ह्या खेड्यांचे रक्षण करावे की काय तत्संबंधीचा निर्णय सदस्यांनी व्यक्त करावा.

सल्लागार मंडळाच्या सदस्यांपैकी आंतॉनियु आरहेज द ताव्होरा हे म्हणाले की, संभाजी राजे ह्याना कळवावे की, आतां पावसाळा

जवळ आल्या कारणे आरमार त्यांच्या मदतीला पाठवितां येत नाही. ते पुढे म्हणाले की, जरी आरमार पाठवितां येणे शक्य असले, तरी ते पाठवू नये, किंवा संभाजी राजे ह्यांच्या मागणीप्रमाणे त्यांच्याकडे मोठ्या अधिकाराचा दूतहि पाठवूं नये. कारण त्यांच्या सरदाराने साष्टीमध्ये शिरून लुटालूट केली आहे. बार्देशच्या सेनापतीच्या मागणीविषयी सदहू सदस्याने मत व्यक्त केले की थिवीच्या किल्ल्यांतून बाहेर पडून खेड्यांचे रक्षण करणे न करणे हे त्यांच्याच निर्णयावर सोपविण्यात यावे. ज्युआंब बॉजिज कोर्त रेआल हा सदस्य म्हणाला की, बार्देशमधील ज्या खेड्यांना शत्रूपासून धोका आहे, त्या खेड्यांतील लोकांना थिवीच्या किल्ल्यांत आणून ठेवावे व तिथल्या सेनापतीने तटाच्या आंत राहूनच शत्रूचा प्रतिकार करावा.

दों क्रिस्तोव्हांव द मेलु हे म्हणाले की, संभाजी राजे ह्यांना कोणत्याच प्रकारची मदत करूं नये. कारण त्यांच्या सरदारांनी आमच्या राज्यांत शिरून आक्रमण केले आहे. बार्देशमधील मराठ्यांच्या संभाव्य धोक्याविषयी त्यानी मत प्रकट केले की, ज्या खेड्यांना हा धोका निर्माण होण्याची शक्यता आहे, त्या खेड्यांतील लोकांना थिवीच्या किल्ल्यांत आणवून त्यांच्या करवीं किल्ल्याचें शत्रूपासून रक्षण करावे.

दों लोपु जोसेफ द आलमेंदा म्हणाले की, संभाजी राजे ह्यांना कळविण्यात यावे की, त्यांच्या एका सेनापतीने कुकळ्ळी व मडगांवमध्ये शिरून नावेली येथील इगर्ज (चर्च) लुटून सुमारे पांच लक्ष अश्रफांची जी लूट नेली ती त्यानी परत करावी व ह्या प्रमादाबद्दल त्या सेनाधिकाऱ्याला कडक शासन करावे, तरच मदतीचा विचार करता येईल.

दुसऱ्या ठरावाबाबत सदहू सदस्याने इतरांच्या सल्ल्याप्रमाणे वागण्याचा सल्ला दिला.

सर्व सदस्यांचे म्हणणे ऐकून घेतल्यावर गव्हर्नर उत्तरादाखल म्हणाले की, संभाजी राजे ह्यांना परिस्थितीनुरुप उत्तर पाठविले जाईल.

---

**क्रमांक : ३२९** **दि. ६–५–१७१७**

कुडाळच्या नारबा सावंता विरुद्ध छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी पार्तुगिजांची मदत मागितली होती. परंतु संभाजी राजे ह्यांचे एक सरदार रामराव ह्यानी गोव्यात शिरून लुटालूट केल्याने गोव्याच्या हंगामी गव्हर्नरने संभाजी राजे ह्याना खालील पत्र पाठविले.

संभाजी राजे ह्यांस

नारबा सावंत ह्यांचे पारिपत्य करण्याच्या कामी आमची मदत मिळावी म्हणून आपण आम्हाला जे पहिले पत्र पाठविले त्या पत्रास लिहिलेल्या उत्तरात मी आपणाला कळविले होते की, आपणाला जी काय मदत हवी असेल तिच्याबाबत वाटाघाटी करण्यासाठी आपले सेनापती हिंदुराव घोरपडे ह्याना आमच्याकडे एकादा मनुष्य पाठविण्याची आपण आज्ञा करावी. मित्र ह्या नात्याने मी आपणास मदत करण्यास कसूर करणार नाही. हिंदुराव घोरपडे ह्यानीहि आम्हाला ह्या बाबत लिहिले होते. परंतु ह्या घडामोडी चालू असता आपले एक सरदार रामराव ह्यानी ह्या राज्यात सैन्यासह आक्रमण केले. त्या आक्रमणा मागील त्यांचे उद्दिष्ट दिशाभूल करणारे असून आमच्यावरील त्यांचे आरोपहि खोटे आहेत. ह्या घटनेचा काही उलगडा होत नाही. कारण आपल्या शत्रूशी आपले युद्ध चालू असता आपला हा सरदार घोडदळ व पायदळ ह्यांच्यासह आपण मित्र म्हणत असलेल्या ह्या राज्यात लुटालूट करण्याच्या इराद्याने शिरतो हा प्रकार मी कुठल्याच देशात बघितलेला नाही. हे कृत्य सार्वजनिक विश्वास व नैसर्गिक हक्क ह्याना धक्का देणारे असून उघड उघड शत्रुत्वाचे

व दगलबाजीचे आहे. ह्या घटनेमुळे आम्ही हिंदुराव घोरपडे ह्याना उत्तर पाठविण्याचे लांबणीवर टाकले. आणि आता आपण उपरिनिर्दिष्ट घटनेकडे दुर्लक्ष करून जुन्याच प्रश्नाबाबत लिहिता. मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे की, रामराव ह्यानी सोन्या चांदीची व दागिन्याची + + + लूट + + + मी वाट पाहात आहे. ही लूट आपण परत करण्याचा हुकूम करावा व रामराव ह्याना व त्यांच्या बरोबरच्या इतर सेनाधिकाऱ्याना शासन करावे. असे जर झाले तर ह्या राज्याशी मैत्री टिकविण्याची आपली इच्छा आहे असे मी समजेन व आपले सरदार कुडाळच्या सरदेसाया-विरुद्ध कारवाई करतील तेव्हा त्याना मी मदत करीन.

देव आपणावर कृपा करो.

गोवा ६ मे १७१७

दों सेबास्तियाव आर्चबिशप

गव्हर्नर

---

**क्रमांक : ३३०** **दि. ६-५-१७१७**

गोव्याचा गव्हर्नर हिंदुराव घोरपडे ह्याना लिहितो कीं, त्यांच्या रामराव ह्या नावाच्या सरदाराने गोव्याच्या साष्टी जिल्ह्यात जी लूटालूट केली, ती परत मिळाली, तरच संभाजी राजे ह्याना नारबा सावंत ह्याच्याविरुद्ध आपण मदत करू.

### संभाजी राजे ह्यांचे सेनापती हिंदुराव घोरपडे ह्यांस

आपले पहिले पत्र मला रामराव ह्यानी साष्टीमध्ये शिरून तिकडील काही खेडी लुटल्यावर दोन दिवसानी मिळाले. अशी

दगलबाजी मी जगात कुठेच बघितलेली नाही. कारण, एका बाजूने आपण आपल्या राजाच्या आज्ञेवरून मैत्रीची पत्रे पाठवून नारबा सावंत ह्यांचे पारिपत्य करण्यासाठी आमची मदत मागता, तर त्याच वेळी आपण ज्या सैन्याचे सेनापती आहांत त्या सैन्यातील एक सेनाधिकारी सार्वजनिक विश्वासाचा भंग करून दगलबाजी करतो. आता आपल्या राजाने व आपण जी पत्रे लिहिलीत त्यात ही गोष्ट मान्य केली आहे. आपण म्हणता की रामराव ह्यांच्या हातून ह्रा जो अतिरेक घडला त्याबद्दल त्याना शासन करण्याचा आपला विचार आहे. मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे की, ह्या आश्वासनाने माझे समाधान होणार नाही. आपण आपल्या राजास बजावले पाहिजे की, रामराव ह्यानी त्यांच्या सैन्यासह साष्टीमध्ये शिरून तिथल्या रहिवाशांची व तिथल्या ऐश्वर्यसंपन्न इगर्जी (चर्च) ची जी लूट केली, ती ह्या राज्यास परत केली पाहिजे. कपडे व इतर वस्तु सोडून निव्वळ पैसा आणि सोन्याचांदीच्या दागिन्याची लूट दहा लक्ष 'पार्दाव'[1] ची आहे. ती लूट ह्या राज्यास परत मिळाली तर ह्या राज्याच्या मैत्रीविषयी आपणाला आस्था वाटते व ती आपणाला टिकवावयाची आहे असे मी समजेन. आपला लौकिक चांगला आहे. म्हणून ती लूट परत करणे आपणास आवश्यक आहे असे वाटेल असे मी ग्रहीत धरून चालतो. आणि तसे जर झाले, तर मागे जशी आपल्या राजास आम्ही मदत केली, तशीच मदत त्याना यावेळीहि कुडाळचे सरदेसाई ह्यांच्याविरुद्ध करण्यास मी तयार होईन.

गोवा, ६ मे १७१७

दों सेबास्तियाव आर्चबिशप गव्हर्नर

---

१. पार्दाव = आठ आणे इतकी किंमत.

क्रमांक : ३३१ दि. १४–६–१७१७

मौजे किणी तर्फ वाटंगी ह्या गावाला बेरडांचा उपद्रव होत असे. आपणाला हे गाव मोकासा म्हणून मिळाले तर आपण त्यांचा बंदोबस्त करू, अशी हमी त्रिंबकजी कानोजी सरदेसाई ह्याने दिल्याने अरणोजी घोरपडे ह्यानी ते गाव त्याला मोकासा म्हणून दिले.

राजेश्री त्रींबकजी कानोजी सरदेसाई ता।। आजरे गो।। यासी

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने।। आरणोजी घोरपडे दि।। राजेश्री घोरपडे अमीरुलउमराव रामराम. सु।। सम्मान अशर मया अलफ. मौजे किणी तर्फ वाटंगी हा गांव बेरडाचा उपद्रव लागतो. मेटवाडा बांधून मजबुती करावी तरी खर्चास नाही. यास्तव सदहू गांव पेशजी रा। खंडोजी निकम यांनी मोकासा दिल्हा होता तैसे करार करून दिलिया ह्या गांवची मजबुती करू म्हणून विनंती केलीयावरी हल्ली तुम्हास हे पत्र करार केले असे की मौजे मजकूर तुम्हास मोकास दिला असे. भोग्य करून खुशाल राहणें.

ता।। छ १५ रजब. मोर्तब.

शिक्का

---

क्रमांक : ३३२ दि. १७–६–१७१७

छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी शिवभट तासे ह्याच्या इनामात वाढ केल्याची ही सनद आहे. " राजश्री रामचंद्र पंडीत होते " असा उल्लेख ह्या सनदेत आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबीनाम संवत्सरे जेष्ट बहुल पंचमी इंदुवासरे[1] क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती

---

१. जेष्ठ बहुल पंचमी ही तारीख १८–६–१७१७ येते. परंतु वार मंगळवार पडतो. येथे सोमवार आहे. सोमवारची तारीख १७–६–१७१७ येते. मात्र ४ रजब ही ह्या तारखेशी जुळत नाही.

स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांा पनाला यांस आज्ञा केली यैसीजे. वेदमूर्ती सीवभट बिन नरसीभट तासे गोत्र काश्यप सूत्र अस्वलायेन यानी पनालीयाचे मुक्कामी स्वामी संनीध विनंती केली की पूर्वी आपणास राजश्री शिवाजी राजे दाजी याणी मौजे आंबवड का। सातवे या गावी जमीन बिघे ०२ दो व का। सातवे या गावी जमीन बिघे ०३ तीन येकून पाच बिघे जमीन राजश्री रामचंद्र पंडीत होते त्यानी दिल्ही. ही करार करून इतके जमीनीनें आपला योगक्षेम न चाले. यास्तव या पांचा बिघ्याखेरीज मौजे नणंदुरे ता। बोरगाव येथे बिघा ०१ यक व मौजे घोटेवड ताा मजकूर येथे बिघा ०१ यक येकून दोन बिघे नूतन इनाम करून देऊन सात बिघियांचे पत्र करून दिल्हे. ते स्वामीनी मनास आणून पुढे उत्तरोत्तर सदरहू सात बिघे जमीन आपणास सुरक्षित चालवायाची आज्ञा केली पाहिजे म्हणून विदीत केले आणि राजश्री शिवाजी राजे दाजी याणी सनद दिल्ही आहे ते आणून दाखविली. त्यावरून मनास आणिता सिवभट हे बहुत भले सिष्ट कुटुंबवत्सल यांस सदरहू गावगन्ना सात बिघे जमीन चालवणे हे स्वामीस आगत्य. याकरीता हे जमीन वेदमूर्तीस इनाम चालवायाची आज्ञा करून तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले आहे. (इत्यादि)

तेरीख ४

रजब, सु॥ समान अशर

---

**क्रमांक : ३३३** दि. २१-६-१७१७

मौजे सातर्डे बाऊ हा गाव विठोजी पिराजी सर्ज्याराव घाटगे ह्याना दिल्याच्या ह्या आज्ञापत्रात छत्रपती संभाजी दुसरे विठोजीचा उल्लेख 'हे प्रामाणिक वतनदार' असा करतात.

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी नाम संवत्सरे जेष्ठ बहुल आष्ठमी भृगुवासरे क्षेत्रिये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत कोल्हापूर यांसी आज्ञा केली येसीजे. राजश्री विठोजी बिन पिराजी सर्ज्याराव घाटगे देशमुख प्रांत कागल हे प्रमाणिक वतनदार. याचे बाप पिराजी सर्ज्याराव स्वामीच्या पायासी निष्ठा धरून वतनाची सेवा करीत होते. हाली हेही स्वामीच्या पायासी येकरूप निष्ठेने वर्तत आहेत. आपणासहि कृपाळू होऊन मौजे सावर्डे बा। हा गाऊ इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणोन विदीत केले. त्याजवरून मनास आणिता विठोजी घाटगे सर्ज्याराव हे प्रमाणिक वतनदार स्वामीच्या पायासी निष्ठा धरून वतनाची सेवा करीत आहेत. यास्तव स्वामी याजवरी कृपाळू होऊन यासी नूतन इनाम कुलबाब कुलकानु खेरीज हकदार व इनामदार करून मौजे सावर्डे बाऊ॥ प्रां॥ कागल प्रां॥ मार हा गाव देहे १ यासी इनाम अजरामरामत करून दिल्हा आसे

...................................................................

(इत्यादि) यांचे माथा शेरणी रुपये १००० येक हजार करार केले आसेत. सदरहू वसूल हुजूर होईल. जाणिजे. लेखनालंकार. रुजू.

---

**क्रमांक** : ३३४ **दि. १०-७-१७१७**

नारोजी मुजाजी सुतार ह्याने प्रसिद्धगडावर राजमंदीराचे व पन्हाळगडावर राजमंदीराचे व बंगल्याचे काम उत्तम केले. त्याने आपणाला इनाम मिळावे म्हणून विनंती केलेवरून छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी त्याला मौजे अवली ताा सातवे ह्या गावी तीन बीघे जमीन इनाम दिली.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबीनाम संवत्सरे आषाढ शुद्ध त्रयोदसी सौम्यवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती

स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांा पनाळा यासि आज्ञा केली

शिका पेशव्याचा | शिका प्रतिनिधी याचा

यसीजे नारोजी बिन मुजाजी सुतार याणे किले प्रसिद्धगडचे मुकामी राजमंदिराचे काम केले व किले पनालियाचे मुकामी राजमंदीर व बंगला मुस्तेद केला. आणखीही कामे उत्तम केली. असियासी सांप्रत याणे स्वामीसंनीध्ध विनंति केली की माहाराजानी कृपाळु होऊन आपल्यास लेकराचे लेकरी चाले असा इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून. त्याजवरून मनास आणिता सूत्रबंद प्रमाणिक यास्तव स्वामी याजवरी कृपालु होऊन नूतन इनाम कुलबाब कुलकानू खेरीज हकदार व इनामदार करून मौजे अवली ता।। सातवे प्रा।। मार या गावी बीसा पांडाचे बिघियाने बिघे ८३ तीन रास इनाम अजरामऱ्हमत करून दिल्ही असे. (इत्यादि)

तेरीख ११

शाबान सु।। समान अशर

---

**क्रमांक : ३३५** **दि. २२–७–१७१७**

भागो महादेव ह्याच्या मुलीचे विवाह-प्रसंगी वर कृष्णाजी देवाजी जन्माष्टके ह्याला मौजे माजगाव व मौजे पिंपळे ह्या गावचे कुलकर्ण व ज्योतिषपण वरदक्षणा म्हणून मिळाले होते. छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी त्याला मान्यता देऊन सनद करून दिली.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी नाम संवत्सरे आषाढ बहुल दशमी इंदुवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी

याणी कृष्णाजी देवाजी उपनाम जन्माष्टके यासि दिल्हे वतनपत्र ऐसेजे. गोविंद माहादेव व सावाका कोम भागो माहादेव गावकुलकर्णी देहाय ताा ठाणे व माहालुंगे ताा बोरगाव प्रांत पनाला याहि

शिका पानघाटी आहे — शिका वर्तुळाकार आहे

हुजुर स्वामी संनीध येऊन विनंती केली की भागो माहादेव याची कन्या वधू होती. तिच्या लग्नाचा प्रसंग करावा एसे चितात आणून वर विचारणा पाहाता राजश्री देवाजी रघुनाथ उपनाम जन्माष्टके याचा कनिष्ट पुत्र कृष्णाजो देवाजी वर उत्तम पाहिला. घराणे ग्रहस्त प्रमाणीक. उभयपक्षी श्लाघ्य समंध यास्तव आपण उभयता रा देवाजी रघुनाथ याकडे जाऊन शरीर समंधाची बोली केली. त्यावरून माारनिलेनी मान्य केले. लग्न निश्चये करून मन्मथ संवत्सर जेष्ट शुध शष्टी भृगुवासरची[1] लग्ने नेमस्त करून रा देवाजी रघुनाथ यासि सहकुटुंब मौजे माजगाव का। ठाणे येथे आणिले. सुमुहुर्ते लग्नसिधी केली. कन्यादान समईवर दक्षणा द्यावी त्यास आपण सांप्रत काले द्रव्यहीन जालो. वतनाची पांच खेडो कुलकर्णाची आहेत. यामध्ये दोन गावीचे कुलकर्ण व जोतीष आपण द्यावे असा विचार करून कन्यादान समई मौजे माजगाव व मौजे पिंपळे या दोही गावीचे कुलकर्ण व व जोतीषपण हे वृती हक इनाम सहीत धारापूर्वक आपण देऊन लग्नसिधी केली आणि सदरहू दोन गावीचे पाठील व चौगुला बारा बलुते व सिव सेजारी वतनदार मेळून गोताची महजर करून दिल्हा आहे. एसीयास स्वामी धर्मपरायण आहेत. कुलकर्णाचा भोगवटा चालिला पाहिजे. तरी दिवाणची सनद द्यावयासी आज्ञा केली पाहिजे म्हणून. त्यावरून मनास आणिता रा देवाजी रघुनाथ स्वामीचे कदीम सेवक. येक निष्टपणे शेवा करीत आहेत. याणीही स्वामो संनीध विनंतो केली की आपल्या पुत्रास लग्न समई गोविंद माहादेव व भागो माहादेव

---

१. वि. २७ मे १७१५.

याची स्त्री सावाका याणी आपल्या वतना पैकी दोनी गावीचे कुलकर्ण व जोतीषपण आपण दिल्हे आहे. उभयतानी महजर व आर्पणपत्र दिल्हे आहे ते आपल्या जवळी आहे. ते चित्तारूढ करून सनद द्यावयासी आज्ञा केली पाहिजे म्हणून. त्यावरून गोविंद माहादेव व भागो माहादेव याची स्त्री सावाका याणी आपल्या आत्मसंतोषे वतन दिल्हे हे खरे. गोताचाही महजर दाखविला. यास्तव स्वामी तुम्हावरी मेहरबान होऊन देहाये ता। ठाणे प्रांत पनाळा येथील वतन-----

मौजे माजगाव १ मौजे पिंपळे १

येणेप्रा। दोन गाव रास येथील कुलकर्ण व जोतीषपणाचे वतन तुम्हास अजरामऱ्हामत करून दिल्हे आसे. तुमचे माथां शेरणी रुपये ५० पनास रुपये रास करार केले आसेत. त्याची उगवणी करणे आणि तुम्ही सदरहू दोही गांवीचे कुलकर्णाची व जोतीषपणाची शेवा करीत जाणे. या वतनास हक व इनाम पुरातन चालिला आसेल त्याप्रमाणे आनुभवणे अणी सदरहू वतन तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन कुलकर्ण व जोतीषपणाची शेवा करून सुखरूप राहाणे. जाणिजे. लेखनालंकार. मोर्तब आसे.

रुजु

तेरीख २४
साबान सु॥ सन समान आशर

---

**क्रमांक : ३३६** दि. १४-१०-१७१७

बाजी प्रतापजी साठम हे सावंताच्या 'पदरी पडले होते'. त्यांचेकडून ते आपल्या परिवारासह व जमावानिशी छत्रपती शाहू ह्यांचेकडे आले. त्यानी त्यांना मौजे मिठबाव तर्फ साळशी हा गाव इनाम दिला. त्या गावच्या गांवकऱ्याना त्यांनी बाजी साठम ह्यांच्या आज्ञेत रहावे म्हणून कान्होजी आंग्रे ह्यांचे आज्ञापत्र.

श्री

शाहू कार्य
धुरंधर तुकोजी
तनु जन्मना कान्होजी
सरखेलस्य मुद्रिकेयं
विराजते

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर राजमान्य राजश्री कान्होजी आंगरे सरखेल ताा मिराशी गावकरीयान मौजे मिठबाव तर्फ साळशी सु।। समान अशर मया व अलफ. राजश्री बाजी बिन प्रतापजी साठम हे राज्यातील पुरातन सेवक प्रसंगे करून निघोन जाऊन सावंताचे पदरी पडले होते. त्याचा परित्याग करुन कबिल्यानिशी व जमावानिशी निघोन येऊन महाराज राजश्री स्वामीचे शेवेसी तत्पर जाहले आणि विनंती केली की आपण स्वामी सेवा निष्ठेने करितो. आपणास इनाम गाव देऊन उर्जित करावे म्हणून. त्याजवरुन मौजे मजकूर खेरीज मिठागर कुलबाब कुलकानू हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी खेरीज हक्कदार व इनामदार इनाम दिला असे. त्याप्रमाणे बाजी साठम मौजे मजकूर पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम अनुभवतील. तुम्ही याचे तलबेत वर्तून संदर्हु प्रमाणे मिठागर व इनामदार व हक्कदार खेरीज करुन आकारा प्रमाणे गावचा वसूल यांजकडे देत जाणे. तालिक लिहून घेऊन हे पत्र मशारनिल्हेकडे परतोन देणे. तारीख चंद्र १९ माहे जिलकाद. मोर्तब सुद.

---

**क्रमांक : ३३७** दि. २७–१०–१७१७

मौजे माले ताा कोडोली येथील जनार्दनवाडी छत्रपती शिवाजी महाराज ह्यानी जनार्दन नारायण ह्याना दिल्याचा उल्लेख या पत्रात आहे.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी नाम संवत्छरे कार्तिक शुद्ध चतुर्थी रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत पनाला यासी आज्ञा केली ऐसिजे. राजश्री जनार्दन

सीका सीका

नारायण हे स्वामीच्या राज्यातील म ख ति या र (?) पुरातन सेवक. याणी तीर्थ स्वरूप राजश्री थोरले कैलासवासी स्वामीची सेवा बहुत निष्ठेनें केली. याकरिता थोरले कैलासवासी स्वामीनी यासी मौजे माले ता। कोडोली येथील जनार्दन-वाडी कुलबाब कुलकानू इनाम करून दिल्ही. त्यास तांब्राचे धामधुमे-करिता भोगवटा तुटला होता. त्यास राजश्री तिमाजी पंत जनार्दन पंताचे पुतणे यानी पनालियाचे मुकामी राजश्री सिवाजी राजे दाजी यासनिध विनंती करून वाडी मजकूर ईनाम चालवावयाची पत्रे करून घेतली. त्याप्रा। वाडी मजकूर इनाम चालत आहे. स्वामी राज्यासनारूढ जाहलियावरी स्वामीची पत्रे ईनाम चालवण्याविषयी पाहिजेत म्हणोन राजश्री तिमाजी पंडीत प्रधान याणी विनंती केली. त्यावरून स्वामी कृपाळू होऊन जनार्दनवाडी कुलबाब कुलकानु देखील हालीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार व इनामदार करून दिल्ही असे. त्याप्रमाणे तुम्ही पंडीत मा।रनिल्हेस वाडी मजकूर बिला कुसुर चालवणे. प्रतीवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे. पत्राची प्रत लिहून घेऊन असल पत्र भोगवटियास पंडीत मा।रनिल्हे जवळ देणे. निदेश समक्ष. मोर्तब.

**क्रमांक : ३३८** **दि. १२–११–१७१७**

नागण प्रभु देसाई हा कोट कुडाळच्या वेढ्यात खेम सावंत भोसले ह्यांच्याशी झालेल्या लढाईत ठार झाला होता. त्याची स्वामीसेवा लक्षात घेऊन छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी त्याच्या बायकाना मौजे आडेली हा गाव इनाम दिला.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी नाम संवत्सरे कार्तिक बहुल पंचमी भोमवासरे क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी––

राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान भावी
सुभा परगणे कुडाळ

यासी आज्ञा केली यैसीजे. नागण प्रभु देसाई पाा माार हे पूर्वी कोट कुडाळ येथे होते. त्यास खेम सावंताने परीघ कोटास घालून कोट हस्तगत केला ते समई बरी शर्त करून नागण प्रभु स्वामी कार्यावरी खर्च जाहाला. त्याच्या बायका कासीबाई व येसूबाई उभयेता आहेत. याचा योगक्षेम चालावा हे स्वामीस आवशेक. यास्तव स्वामी उभयेता बायका याजवर कृपाळू होऊन शंभर होन निशाणी होनाचा गाव इनाम द्यावा यैसा सिध्धांत करून यास नूतन इनाम कुलबाब कुलकानू खेरीज हकदार व इनामदार करून मौजे आडेली ताा तलवाड हा गाव आजरामरामत करून दिल्हा असे. तरी तुम्ही मौजे मजकूर सदरहूप्रमाणे इनाम यास नेमून देऊन बायकोचा योगक्षेम चालोन सुखरूप राहेत ते गोष्ट कर्णे. सालदरसाल ताजा सनदेचा उजूर न कर्णे. तालिक लेहून घेऊन असल सनद परतोन देणे. जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब असे.

**क्रमांक : ३३९** **दि. १३-१२-१७१७**

छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी अंताजी त्रिमल ह्याना ता॥ हवेली प्रांत कोल्हापुरचे सरदेशकुलकर्णाचे वतन ह्या वतनपत्राद्वारे दिले. ह्यात छत्रपती राजाराम कर्नाटकांत होते त्या वेळेपासून अंताजी त्रिमल छत्रपती घराण्याची निष्ठेने सेवा करीत आहेत असा उल्लेख आहे.

स्वस्ति श्री राज्याभिशेक शके ४४ हेमलंबीनाम संवत्सरे मार्गशीर्श बहुल सप्तमी भृगूवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी यानी राजश्री अंताजी त्रीमल गोत्र वशिष्ट यास दिल्हे वतनपत्र असेजे. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन एकनिष्ट सेवक. तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामी चंजी प्रांते असता त्यांची शेवा मनोभावे करून त्यांची कृपा संपादून घेतली. त्या अलीकडे राजश्री शिवाजो राजे दाजी याचीहि शेवा मनोभावे करून निष्ठेने केली. त्यावरी स्वामी राज्यासनारूढ जाले. त्या दिवसापासून रात्रो दिवस श्रम साहास करून एकरूप निष्ठेनें सेवा करीत अहा. स्वामोच्या पायाविणा दुसरे दैवत जाणत नाही. तुमचा सर्वप्रकारे दिवसेदिवस ऊरजीत करून चालवणे स्वामीस पर आवश्यक. सांप्रत तुम्ही स्वामीसंनीध विनंती केली की ता॥ हवेली प्रांत कोल्हापूर येथील सरदेशकुलकर्णाचे वतन कितेक दिवस नकल होते. त्यावरो पातशहानी रा॥ काशी जानंतराव याशी दिल्हे होते. त्यास रा॥ थोरले कैलासवाशी स्वामोनी हा प्रांत कबज केला त्यापासून जानंतरायाचे कोणी वतनावरी आले नाहो. वतन दिव्राणाचे आहे. स्वामोनी कृपाळू होऊन आपणास मन्हामत करून दिल्हे पाहिजे म्हणून तुम्ही विदीत केले. त्यावरून मनास आणिता तुम्ही स्वामीची सेवा त्रीकर्ण शुधीने रात्री दिवस जीवाभ्य श्रम करून स्वामीस बहूत संतोशी केले. तुमचे ऊर्जित करून चालवणे स्वामीस परम आवशक. ऐशियास हे वतन बहूत दिवस नकल होते. त्यावरी जानंतरायास पादशहानी दिल्हे होते. त्यास जानंतरायाचा या वतनास भोगवटा

या राज्यात बहूत दिवस नाही. वतन दिवाणाचे. यास्तव स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन ताा हवेली प्रांत कोल्हापूर येथील सरदेशकुलकर्णाचे वतन तुम्हास आजरामऱ्हामत करून दिल्हे असे. तरी तुम्ही सदरहू वतनाची सेवा करणे. ..... (इत्यादि)

तेरीख २०

मोहरम सु॥ सन समान अशर मया अलफ.

---

**क्रमांक** : ३८०  दि. २४–१२–१७१७

मराठे साष्टीवर चालून येत असल्याची बातमी गोव्याच्या व्हाइसरॉयला कळताच त्याने फोंडयाच्या देसायांना साष्टीच्या मदतीस जाण्याचा हुकूम केला.

फोंडयाच्या देसायांस-----

मराठयांचे सैन्य साष्टीवर[1] चालून येत असल्याची बातमी मला मिळाली आहे. शत्रूने आमच्या प्रदेशांत शिरू नये म्हणून मी फोंडयाचे सरदेसाई कुष्टाजी नाईक ह्याना आज्ञा करतो की, त्यानी त्यांच्या हाताशी असलेल्या हत्यारी माणसांसह + + + + तावडतोब रवाना होऊन साष्टीचे सेनापतीसमोर हजर व्हावे व त्यांचा जो हुकूम होईल त्या प्रमाणे वागावे. सरदेसाई कुष्टाजी नाईक हे प्रस्तुत आज्ञेप्रमाणे आमचे स्वामी पोर्तुगालचे राजे ह्यांची सेवा कळकळीने बजावतील अशी आशा आहे.

पानेली, २४ डिसेंबर १७१७

नामदार कौंट व्हाइसरॉय ह्यांची सही

---

१. गोव्याचा एक तालुका.

**क्रमांक : ३४१** **दि. ३०-१२-१७१७**

मराठ्यांच्या स्वारीचा धोका कमी होताच गोव्याच्या व्हाइसरॉयने साष्टीच्या सेनापतीस कळविले की, फोंड्याचे जे देसाई आणि इतर लोक साष्टीच्या मदतीला आले होते त्याना रजा देण्यास हरकत नाही.

दों आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस–

आपली दि. २८ व दि. २९ ची दोन्ही पत्रे मिळाली. ती शत्रूच्या प्रवेशाचे वेळी लिहिली गेली. ······· शत्रूचे सामर्थ्य कमी होते म्हणून त्याने आक्रमण केले नाही. आणि ज्या अर्थी आपण म्हणता की, तूर्त भिण्याचे काही कारण नाही, त्या अर्थी देसायाना व इतर लोकाना रजा देण्यास हरकत नाही. कारण ह्या लोकांची कुकळ्ळीत पुष्कळच गैरसोय झाली. गुप्तहेरांकडून बातम्या येईपर्यंत बार्देशच्या सैन्याची शिबंदी तिकडे ठेवली तरी चालेल. + + + + आवश्यक ती टेहेळणी ठेवावी.

देव आपले रक्षण करो.

पानेली, ३० डिसेंबर १७१७
कौंट दों लुईज द मिनेझिश

---

**क्रमांक : ३४२** इ. स. १७१७ (?)[१]

हिंदुराव घोरपडे ह्यांचे गिरजोजी यादव ह्याना पत्र. "दुईच्या प्रसंगामुळे आम्हावरी कसाला पडिला" असे ते पत्रात म्हणतात.

---

१. पत्रामध्ये दुहीच्या प्रसंगाचा उल्लेख आहे. तो शाहू-ताराबाई संघर्षासंबंधी असावा. त्यानंतर दहा वर्षे 'परामर्ष न जाहाला' असे म्हटले आहे. त्यावरून इ. स. १७१७ च्या सुमाराचे हे पत्र असावे असे वाटते.

श्री सुबराज

राजश्री गिरजोजी यादव
गोसावी यास------

\+ \+ \+ \+ \+ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य-स्ने।। हिदुराव घोरपडे ममलकतमदार रामराम विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित असिले पाहिजे. वि।। सांप्रत कृष्णाजी हरी व सुलतानजी दोडका या समागमे पत्र पाठविले ते सुसमई पावोन दर्शनातुल्य संतोष जाहाला. अजि दाहा वर्षेपर्यंत काही परामृष जाहाला नाही. म्हणून लिहिले. अशास दुईच्या प्रसंगामुळे आम्हावरी कसाला पडिला तन्मुळे परामृष न जाहाला हे यथार्थच आहे. तुम्हा लोकांचा आम्ही परामृष न करावा तरी कोण करणार आहे. आपण वडील आहेत. आम्हावरी रुसावे हेही युक्तच आहे. हली आपण लिहिल्यावरून येथे विचार पाहिला. परंतु आजि पावेतो मुलकात पाऊस नाही. गैर हंगाम. यास्तव गाठी पडोन आली नाही.

**क्रमांक : ३४३** **दि. २१-१-१७१८**

**गोव्याच्या व्हाइसरॉयने दि. २१-१-१७१८ रोजी पोर्तुगालच्या राजास जे पत्र लिहिले, त्यांत छत्रपती संभाजी दुसरे ह्यांच्या सैन्याने गोव्याच्या साष्टी जिल्ह्यांत केलेली स्वारी व आंग्र्याच्या एका आरमारी तुकडीशी पोर्तुगीज युद्धनौकांची झालेली चकमक ह्यांचा उल्लेख आहे.**

महाराज

गत सालच्या २५ एप्रिलला मराठ्यानी साष्टी प्रांतावर स्वारी केल्याने ह्या बेटात[1] आणि त्याच्या लगतच्या टापूत मोठी घबराट

---

१. गोवा बेट.

माजली. ह्या स्वारीत विशेष हानि झाली नाही. कुकळ्ळी, वेरडे आणि मडगाव ह्या फक्त तीन गावात त्यानी मोठी नासधूस केली सुमारे पाच लक्ष अश्रफी किमतीचा माल लुटला गेला. ही लूट चर्चमधील चांदीच्या व इतर वस्तूंची झाली. नाव्हेली येथील चर्च तर त्यानी पार लुटून नेंले. हे चर्च श्रीमंत म्हणून प्रसिद्ध असून त्याचा भक्तगणहि मोठा आहे.

शत्रूचे आक्रमण आकस्मिकपणे झाल्याने, त्याला आमच्याकडून चांगला प्रतिकार होऊ शकला नाही. शत्रूची मुसंडी जोरदार असल्याने ती नदी ओलांडून गोवा बेटात शिरतो की काय अशी भीति इकडे निर्माण झाली होती. माझे इकडे आगमन झाले तेव्हां दुसऱ्या स्वारीच्य, अफवा इकडे उठल्या होत्या. परंतु त्या निराधार ठरल्या. हा शत्रु स्वारीचे धाडस पुनः करणार नाही, अथवा त्याची ही संभाव्य स्वारा मागच्या स्वारीप्रमाणे यशस्वी होणार नाही असे मला वाटते. कारणी आशिया खंडातील एका कनिष्ठ आणि दरिद्री लोकांपैकी तो एक लहान शत्रु आहे. साष्टी प्रांताचे गव्हर्नर दों आंतॉनियु काश्कु इ मेलु हे तिथला कारभार कुशलतेने चालवित आहेत. दों लुईज द कॉश्त ह्यानी त्या प्रांताचे गव्हर्नरपद सोडल्यावर आर्चबिशप गव्हर्नर ह्यानी दों आंतॉनियु ह्यांची साष्टीचे गव्हर्नर म्हणून नेमणूक केली होती.

काही दिवसामागे चांचा आंग्रे ह्याच्या चार युद्धनौकांची व आठ गलबतांची आमच्या पंधरा व्यापारी जहाजांशी आंजेदिव बेटानजीक गाठ पडली. ही जहाजे धान्य घेऊन येत होती व त्याना दोन युद्धनौकाचे संरक्षण होते. दों तोमाझ द ताव्होरा हे त्या तांड्याचे कप्तान होते. आंग्र्यांच्या व आमच्या युद्धनौकांची लढाई अटीतटीची होऊन ती दिवसभर चालली. शत्रूचे सामर्थ्य मोठे असून देखील त्याला आमचे एकहि व्यापारी जहाज घेता आले नाही. शेवटी रात्रीच्या अंधाराची संधी साधून त्याने जबर हानि पत्करून

लढाईतून माघार घेतली. आमच्याहि युद्धनौकांची हानि बरीच झाली. तरीहि त्यानी शत्रूचा पाठलाग केला.

हा शत्रू मोठा नसूनहि त्याने आमच्या व्यापाराची फार हानि चालविली आहे. विशेषेकरून आमच्या उत्तरेकडील प्रदेशाची हानि फारच होत आहे. मी त्याचा पराभव करण्याचा निश्चय केला आहे. परंतु त्याच्या नौका हलक्या असल्याने त्या लढाई मोठ्या चपळतेने टाळतात. आमच्या उत्तरेकडील प्रदेशाची हानि आम्हाला टाळता येत नाही त्याचे कारण हे आहे.

माझ्या बलाढ्य स्वामीचे देव रक्षण करो.

गोवा, २१ जानेवारी १७१८

---

**क्रमांक : ३४४** **दि. २८-१-१७१८**

कोल्हापूरचे छत्रपती संभाजी दुसरे हे सोंधे संस्थानांतील आपला वकील भानजी बल्लाळ ह्याला लिहितात की, सोंधे संस्थानकडून एक लक्ष पाच हजार रुपयांचा जो वसूल येणे होता तो पावला.

श्री

तालिक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी नामसंवत्सरे माघ शुध अष्टमी भोमवासरे क्षेत्रिय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी राजश्री भानजी बलाळ हेजीब मुा सोंधे यास आज्ञा केली यैसीजे संस्थानचा प्रति वार्षिक तह रुपये ३५००० बी ताा संस्थान संबंधे + + + सुपे पंचमाहाला संबंधे रुपये १०००० येकून रुपये शकसाला + + +

अशर मया व अलफ ताा सन समान अशर मया अलफ यकून सिसाला रुो १०५००० यक लक्ष पाच हजार याचा वसूल राजश्री घंटचा व गौतपा नाईक यांचे विद्यमाने तुमचे गुजारतीने जाला रुो बी ताा हुजूर पावले रुपये ————————————

५०५०० यैन सासाला

४८००० रुजू हिसेब
२५०० हिसेबमुळे जाजती हिंदूरायाचे यैवजपैकी रुजु हिसेब सन समान
———
५०५००

राजश्री हिंदूराऊ घोरपडे याजकडे परभारा वसूल जाला रुपये
१२५०० सन सित
१०००० सन समान
——— –
२२५००

६००० सोडी चौसाला इ॥ सनसित ताा सन तिसा रुपये १२००० पैं॥
८००० यैन संस्थानचे तहपैकी
४००० अंत्रजेबाबत
———
१२०००

पैकी सिसाला यासी वजा अंत्रज बाकी संस्थानाकडे सिसाला बेरीज

———
५६५००

| | | | |
|---|---|---|---|
| १४५०० | राजश्री हिंदूरा(व) यांचे यैवजपैकी नरगुंदकरास व वरकड लष्करास देविले रुपये-- | | तेरीज |
| | | ८२५०० | हुजूर पावले |
| | | २२५०० | हिंदुरायाकडे पावले |
| ------ | | ------ | |
| ७१००० | | १०५००० | |
| ११५०० | किता यैवज रुजु हिसेब सनसमान यैवज बाबत हिंदूराऊ | | |
| ------ | | | |
| ८२५०० | | | |

यकून यक लक्ष पाच हजार रुपये तुमचे गुजारतीने हुजूर पावले इ।। जेष्टमास मन्मथ संत्सर ता।। जेष्टमास विलंबी संवत्सर मजुरा असे जाणिजे बहुत काय लिहिणे.[1]

मर्यादेयं
विराजते

तेरीख ६ माहे रबिलावल
सु।। समान अशर मया अलफ

---

**क्रमांक : ३४५** **दि. १५-२-१७१८**

फोंडू सावंत भोसले ह्यानी गोव्याच्या नवीन व्हाइसरॉयला त्याच्या आगमनाबद्दल अभिनंदनपर पत्र पाठविले होते व त्याच्याकडे वीस पिपे दारू मागितली होती. त्या पत्रास व्हाइसरॉयने पुढील उत्तर धाडले.

---

१. 'जाणिजे बहुत काय लिहिणे' ही अक्षरे निराळ्या वळणाची आहेत.

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांस

सरदेसाई फोंडू ( Fondu ) सावंत ह्यांची दोन्ही पत्रे मला भैरव शेणवी ह्यांच्याकडून मिळाली. मी कामात असल्यामुळे सरदेसाई फोंडू सावंत ह्यानी माझ्या आगमनाबद्दल माझे जे अभिनंदन केले, त्याबद्दल त्यांचे आभार मानण्यास मला सवड मिळाली नाही. त्यांची पोर्तुगालच्या राजाविषयींची निष्ठा आणि सेवा मला मान्य असून, त्यांच्याबद्दलहि मला प्रेम वाटते.

फोंडू सावंत भोसले ह्यानी माझ्याकडे दारूची जी वीस पिपे मागितली होती, ती मी त्यांच्याकडे लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु ह्यांच्या मार्फत पाठविली आहेत. ती त्याना मिळालीच असतील व आम्हा दोघांच्या समायिक शत्रूविरुद्ध त्यांचा त्यानी उपयोग केलाच असेल. फोंडू सावंत भोसले ह्यानी आम्हाला आंग्रे व मराठे[1] ह्यांच्या हालचालींची बातमी पुरविली पाहिजे. त्यांचा इरादा काय आहे ते जाणून घेऊन तयारी करण्याच्या दृष्टीने त्या बातम्याची आवश्यकता आहे.

गोवा, १५ फेब्रुवारी १७१८
काउंट दों लुईज द मिनेझिस

---

**क्रमांक : ३४६** **दि. १३-७-१७१८**

राज्याभिषेक समयी युवराज व अष्ट प्रधान ह्यांच्या सन्मानाचा तपशील.

---

१ मूळ पत्रात Sivaji असे म्हटले आहे.

श्री

तालीक

यादी युवराजा व आष्ट प्रधानपद द्यावयाचे
समई वस्त्र वगैरे. शके राज्याभिषेक ४५
विलंबी नाम सवछरे सु॥ तिसा अशर
मया अलफ

१ युवराजा

१ वस्त्रे पाच भरगची

| | | | |
|---|---|---|---|
| १ | मंदील | १ | किनखाप थान[1] १ |
| १ | चादर | १ | महमुदी थान १ |
| १ | पटका | | |
| ३ | | २ | |

सणगे ५

१ दागिने

| | | | |
|---|---|---|---|
| १ | सिरपेंच | १ | मोंत्याचा तुरा |
| १ | कंठी मोत्याची | १ | जेगा[2] |
| १ | चौकडा | | |
| ३ | | २ | |

दागिने ५

---

१. रेशमी तागा

२. डोईवरील पागोटयाला बांधण्याचा एक मर्दानी अलंकार.

१ किता————————————————

| | | | |
|---|---|---|---|
| १ | सिकेकठार—— | १ | ढाल तरवार |
| १ | चौघडा——— | १ | जरीपटका |
| १ | हती——— | १ | घोडा |
| १ | चवरी सोन्याच्या–दांडीची | १ | चोपदार |
| ४ | | ४ | |

३

————————————————— कलम

१ पंत प्रधान यास युवराज्या आन्वय——

१ सेनापती यास सदरहू आन्वय———

१ पंत आमात्ये———

१ वस्त्रे————————————————

| | | | |
|---|---|---|---|
| १ | मंदील | १ | किनखाप थान १ |
| १ | चादर | १ | महमुदी थान |
| २ | | २ | |

—————————————————

सणगे ४

१ दागिने ——————————

१ चौकडा——— १ कंठी मोत्याची

१ तुरा मोत्याचा १ सिरपेच

२ २

ー ——————————

दागिने ४

१ किता ——————————

१ सिके कठार———— १ रुप्याच कलमदान दांडीच

१ चवरी सोन्याच्या १ हती———

२ १ घोडा———

१ ढाल तलवार

४

ー —————————— कलम

३

ー —————————— कलम

१ पंत सचीव यास पंत आमात्ये प्रो

१ पंत सुमंत सदरहू आन्वये

१ पंतमंत्री यास सदरहूप्रो

१ पंडितराव यास सदरहू आन्वय ढाल तरवार खेरीज करून

१ पंत न्यायाधीष यास पंत सुमंत मंत्री आन्वय

१ पंत राजाज्ञा यास सदरहू आन्वय
———
१०

१ उपप्रधान यास वस्त्रे ३॥

| | | | |
|---|---|---|---|
| १ | तिवट—— | ॥ | किनखाप ॥ |
| १ | दुपठा | १ | महमुदी थान १ |
| — २ | | — १॥ | |

———————————

सदरहू प्रो आष्ट उपप्रधान यास वस्त्रे द्यावयाची

——————————— कलम

१ चिटणिवीस यास ———————

१ वस्त्रे ———————

| | | | |
|---|---|---|---|
| १ | मंदील—— | १ | झगा |
| १ | दुपठा दुमजल | १ | विजार |
| — २ | | — २ | |

———————————

१ दागिने ———————

| | | | |
|---|---|---|---|
| १ | कंठी मोत्याची | १ | सिरपेच |
| १ | चौकडा | ० | लग |
| — २ | | — १ | |

———————————

१ कित्ता ——————————

१ कलमदान रुप्याची पेटी　　१ चवरी रुप्याच्या दांडी

० लग　　१ घोडा

२　　२

८ —————————— कलम

३

१ फडणीस ——————————

१ वस्त्रे ३॥ साडेतीन

१ कलमदान रुप्याच्या दांडीच

२

८ —————————— कलम

१ पोदार यास ——————————

१ वस्त्रे साडेतीन

१ कलमदान रुप्याच्या दांडीच

८ —————————— कलम

१४

येणेप्रो राज्याभिषेक समई शककर्ते माहराज याणी वस्त्रे वगैरे सन्मान दिल्हा असे. छ २५ साबान.

**क्रमांक : ३४७** **दि. २१–७–१७१८**

शाहू छत्रपती ह्यानी पिलाजी जाधव ह्याना मौजे उरुळी कांचन येथे एक चावर जमीन दिली.

श्री

शिक्का

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४५ विलंबीनाम संवत्सरे श्रावण शुद्ध पंचमी इंदुवासर क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति याणी

श्री
राजा शाहू नरपति हर्ष
निधान बाळाजी विश्व
नाथ प्रधान

\+ \+ \+
\+ \+ राजा

श्री
शाहू छत्रपति

राजेश्री पिलाजी बिन चांगोजी यास (दिले) इनामपत्र ऐसीजे. स्वामी तुम्हावर कृपाळू होऊन मौजे उरुळी कांचनाची ता सांडस प्रो पुणे येथील खालसा पड जमीन पैकी दुम सीम प्रतीची चाहूर १ एक कुलबाब कुलकाळी खेरीज हकदार तुम्हास व तुमच्या पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम दिली असे. तर तुम्ही सदहुं जमीन मौजे मजकूर पैकी आपल्या दुमाला करून घेऊन इनाम वंशपरंपरेने अनुभवून सुखरूप राहणे.

लेखनालंकार.[1] मोर्तब.
तेरीख
सु।। तिसा

रुजु सा।।
मंत्री

---

१. पिलाजी जाधव ह्याना मौजे उरुळी कांचन येथे एक चावर जमीन इनाम दिली असून ती त्यांचेकडे चालवावी म्हणून आणखी काही पत्रे उपलब्ध आहेत ती येणेप्रमाणे :— (पृष्ठ ५३१ वर चालू)

क्रमांक : ३४८ दि. ८-१२-१७१८

पोर्तुगीज आणि इंग्रज ह्या दोघानीहि अलिबागच्या किल्ल्यावर संयुक्तपणे हल्ला करावा अशी सूचना गोव्याचा व्हाइसरॉय प्रस्तुत पत्रात मुंबईच्या इंग्रज गव्हर्नरला करतो.

---

(पृष्ठ ५३० वरून पुढे चालू)

१) शाहू छत्रपतींचे मोकदम मौजे उरुळी कांचन ह्याना आज्ञापत्र. (दि. २१-७-१७१८)

२) शाहू छत्रपती ह्यांचे देशाधिकारी व लेखक प्रांत पुणे ह्याना आज्ञापत्र. (दि. ५-१०-१७१८)

३) शाहू छत्रपती ह्यांचे देशमुख व देशपांडे प्रांत पुणे ह्याना आज्ञापत्र. (दि. ५-१०-१७१८)

४) शाहू छत्रपती ह्यांचे बाळाजी पंडीत प्रधान ह्याना आज्ञापत्र. (दि. ५-१०-१७१८)

५) बाळाजी पंडीत प्रधान ह्यांचे मोकदम मौजे उरुळी कांचन ह्याना पत्र. (दि. २४-१२-१७१९)

६) बाळाजी पंडीत प्रधान ह्यांचे देशमुख व देशपांडे प्रांत पुणे ह्याना पत्र. (दि. २४-१२-१७१९)

७) बाळाजी पंडीत प्रधान ह्यांचे त्र्यंबक हरी सुभेदार (व) कारकून प्रांत पुणे ह्यांस पत्र. (दि. २४-१२-१७१९)

८) त्र्यंबक हरी सुभेदार व कारकून प्रांत पुणे ह्यांचे मोकदम मौजे उरुळी कांचन ह्याना पत्र. (दि. २५-१२-१७१९)

९) देशमुख व देशपांडे ह्यांचे मोकदम मौजे उरुळी कांचन ह्याना पत्र. (दि. २९-२-१७२०)

मुंबईचे सेनापती ह्यांस---

कप्तान मोर बर्नार्द तैशैरा हे आपणाला हे पत्र नेऊन देतील व माझ्या हुकुमान्वये ग्रियेच्या किल्ल्यावर त्यानी हल्ला केल्याचे आपणाला विदीत करतील. प्रस्तुत मोहिमेसाठी मी त्याना निवडिले आहे. ते त्यात यशस्वी होतील अशी मला आशा वाटते. माझ्या अपेक्षेप्रमाणे कुलाब्याचा पाडाव करण्याचा आपला हेतु फलद्रुप होईल.

कप्तान मोर बेर्नार्द तैशैरा ह्यांच्यावरोबर अलिबागच्या किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी बरेच मोठे पोर्तुगीज सैन्य दिले आहे. अलिबागचे महत्व आपण जाणताच. अलिबाग घेण्याची सूचना आपलीच आहे. ते काम सुलभ व्हावे म्हणून हे सैन्य पाठविले आहे. पण आपण एक गोष्ट केली पाहिजे. आपण कमीत कमी पांचशे सैनिक तरी कप्तान मोर बेर्नार्द तैशैरा ह्यांच्या मदतीला पाठविले पाहिजेत. ह्या सैन्याला चौल येथे आणखी सैन्य येऊन मिळणार आहे. असे जर झाले, तर इंग्लंडच्या मान्यवर कंपनीची वारंवार हानि करणाऱ्या व उत्तर किनाऱ्यावरील व्यापार मारून टाकणाऱ्या ह्या आमच्या सर्वांच्या शत्रूचा नाश करणे शक्य होईल. मला आशा आहे की, केवळ तुमच्या देशाच्या हितासाठीच नव्हे तर, आंग्र्यांचा ज्याना उपसर्ग होत आहे, त्यांच्या मुक्ततेसाठीहि आपण ह्या मोहिमेत भाग घेतल्यावाचून राहाणार नाही.

जंगली आंग्रे ह्यांचा नाश का झाला पाहिजे त्याची कारणे मी दिलीच आहेत. दुसरी गोष्ट अशी की, लिस्बन आणि लंडन ह्या दोन्ही राजधान्यामध्ये आज जो सलोखा नांदत आहे, तसाच सलोखा इकडे आपणामध्येहि नांदला पाहिजे हे मी आपल्या निदर्शनास आणू इच्छितो. मी सहकार्याची जी मागणी करीत आहे ती आपण मान्य कराल अशी आशा आहे.

देव आपणास उदंड आयुष्य देवो.

गोवा, ८ डिसेंबर १७१८
कौंट दों लुईज द मिनेझिश

---

**क्रमांक : ३४९** **दि. १९-१-१७१९**

गोव्याचा व्हाइसरॉय इंग्रज व आंग्रे ह्यांच्यामधील युद्धाचा वृत्तांत पोर्तुगालच्या राजास खालील पत्राचे द्वारा सादर करतो.

महाराज,

आंग्र्यानी इंग्रजाकडून दारू गोळ्याची मदत मिळवून तिचा आमच्याविरुद्ध उपयोग केल्यावर आता इंग्रजांची जहाजे घेण्याचा सपाटा सुरू केला आहे. त्यानी त्यांची काही जहाजे यत्किंचितहि विरोध न होता घेतली. त्यात मद्रासहून येणारी दोन जहाजे होती. त्यात दहा लक्ष रुपये होते. अशा रीतीने वारंवार हानि सहन करावी लागल्याने इंग्रजानी आंग्र्याविरुद्ध लढाई करण्याचे ठरविले. हा निर्णय त्यानी घेतला, त्याचे कारण हे की, आंग्र्यासारख्या आशिया खंडातील एका कनिष्ठ आणि विशेष बलाढ्य नसलेल्या शत्रूकडून मानखंडना झाल्याने युरोपियन राष्ट्रामध्ये त्यांची प्रतिष्ठा कमी झाली होती.

मुंबईचा सेनापती काही युद्धनौका, देशी शिपायी व काही युरोपियन सैनिक घेऊन खांदेरी उंदेरी बेटावर जातीने हल्ला करण्यासाठी गेला. सैन्य उतरताना त्याला प्रतिकार झाला नाही. इतकेच नव्हे, तर किल्ल्याचा दरवाजाहि त्याने जाळून टाकला. किल्ल्याचे रक्षण अवघी साठ माणसे करीत होती. परंतु इंग्रजानी त्यांची एवढी दहशत घेतली की, त्यामुळे किल्ल्यात घुसण्याचे धाडस न झाल्याने त्यानी माघार घेतली. केवढ्या शरमेची गोष्ट !

नंतर ह्याच इंग्रज सेनापती कुलाब्याची नाकेबंदी करण्यासाठी व त्याच्यावर तोफा डागण्यासाठी गेला. तेथें आंग्र्याचे वास्तव्य असते. परंतु तेथें सैन्य न उतरविता तो कित्येक दिवसानी मुंबईस माघारा परतला.

मुंबईच्या सेनापतीनें आंग्र्याचा पाडाव करण्याच्या मोहिमेत भाग घेण्यासाठी मला पाचारण केले. मी त्याला कळविले की, राजधानीत जे पायदळ आहे त्याच्यासह आणि उत्तरेकडील प्रांतातील पायदळासह मी ह्या मोहिमेत युद्धनौका आणि दारूगोळा ह्यांच्यासहीत भाग घेईन. परंतु गोष्ट अशी आहे की, इंग्रज लोक कुठलीहि योजना चिकाटीनें पुढे नेत नाहीत. दुसरी गोष्ट अशी की, माझ्या पूर्वीच्या व्हाइसरॉयच्या अमदानीत मुंबईच्या सेनापतीनें कारंजा येथील ठाणे गहाण मागितले होते. ह्या सर्व गोष्टी लक्षात घेऊन मी मुंबईच्या सेनापतीला कळविले की, तो जर माहीम–मुंबई येथील किल्ल्यात पोर्तुगीज शिबंदी ठेवण्यास तयार असेल तर मी आंग्र्याविरुद्धच्या मोहिमेत भाग घेण्याच्या करारावर सही करीन व इंग्रजांच्या संमती-विना शांततेचा अथवा युद्धबंदीचा करार करणार नाही. परंतु माझी सूचना मुंबईच्या सेनापतीस मान्य झाली नाही. आमच्या उत्तरेकडील सेनापतीनेंहि त्याला एक सूचना केली होती. आमच्या राज्यातील उभय पक्षाना मान्य असलेल्या एकाद्या प्रतिष्ठित गृहस्थाकडे त्यानें एक लक्ष रुपये ठेवावे ही ती सूचना होती. मीच ती त्याला करावयास लावली होती. पण तीहि इंग्रज सेनापतीस मान्य झाली नाही. त्यावरून इंग्रजांच्या दुसऱ्या विषयीच्या गैरविश्वासाची कल्पना येते.

आंग्र्याना आज जर कुणाची भीति वाटत असेल तर ती पोर्तुगीज राष्ट्राची. गेले वर्षभर त्यानी ह्या राज्याशी शत्रुत्वाचे कोणतेच कृत्य केलेले नाही. आमची जहाजे त्याच्या प्रदेशातून वसईहून चौलला मुक्तपणे जातात येतात. तरीहि इंग्रजानी जेव्हा चौलहून कुलाब्यावर

तोफांचा हल्ला सुरू केला, तेव्हा मी गुप्तपणे आठ छोट्या युद्धनौका आणि एक फ्रिगेट सज्ज करण्याचा हुकूम केला. ह्या युद्ध नौकावर आठशे सैनिक आणि अधिकारी गिरें येथे उतरविण्याकरिता पाठविण्यात येणार होते. गिरें ह्या शहरापासून तीस कोसावर आहे. ह्या ठिकाणी आंग्र्यांच्या युद्धनौकांचा तळ आहे. ज्यावेळी ह्या युद्धनौकाना युद्धावर जायचे नसते, तेव्हा त्यांच्यावरील माणसे कुलाब्याला असतात. मी आमच्या उत्तरेकडील सेनापतीस त्याचे घोडदळ आणि पायदळ ह्याच्यासह चौलला निघण्यासाठी जय्यत तयार राहाण्याचा अगोदर संदेश धाडला होता. + + + + + + + यशाची बातमी मिळताच त्याने अलिबागचा किल्ला घेण्याचा प्रयत्न करावयाचा होता.

उत्तरेकडील सेनापतीस मी असेहि कळविले होते की, मुंबईच्या सेनापतीने जी मोहीम हाती घेतली आहे ती पार पडल्याखेरीज त्याने माघारा फिरू नये म्हणून त्याला विनंती करावी. परंतु मुंबईच्या सेनापतीने मला किंवा उत्तरेकडील सेनापतीला काहीच न कळविता माघार घेतली. कदाचित माघार घेतल्याने आपली गेलेली प्रतिष्ठा आपणास परत मिळेल असे त्याला वाटले असावे, अथवा त्याने सुरु केलेल्या मोहिमेत आम्ही भाग घेतला, तर विजयाचे श्रेय आम्हाला मिळेल अशी त्याची समजूत झाली असावी. त्याच्या युद्धनौकांची व आमच्या आरमाराची गिरेच्या किल्ल्यानजिक गाठ पडली. त्याने माघार घेतल्याचे आमच्या आरमाराचे कप्तान बेर्नार्द तैशैरा ह्याना कळले. त्यानी ती बातमी लगेच मला कळविली. त्या दरम्यान आंग्र्यांच्या युद्धनौका आपल्या तळाबाहेर पडून इंग्रज युद्धनौकांच्या शोधार्थ दक्षिणेकडे निघाल्या होत्या. आमच्या आरमाराच्या कप्तान मोरने इंग्रज युद्धनौकाना आमच्या बंदराचा आश्रय घेण्यास सांगितले.

आंग्र्यांच्या युद्धनौकानी इंग्रज युद्धनौकांचा अठ्ठेचाळीस तास शोध केला. पण त्या चपळ असूनदेखील इंग्रज युद्धनौकाना गाठू

शकल्या नाहीत. तथापि एका मागे राहिलेल्या जहाजास त्यानी भोक पाडले व काही पठाण युद्धकैद्यांची मुक्तता केली.

इंग्रजांची मोहिम अयशस्वी झालेली पाहून मला फार वाईट वाटले. कारण इंग्रजांची आणि पोर्तुगीजांची पुष्कळ वेळा दोस्ती झालेली आहे. आंग्रे वरून तरी ह्या राज्याशी शांतता असल्याचे दाखवीत आहेत. माझी अशी समजूत आहे की, जोपर्यंत इंग्रजाशी त्यांचा तह होणार नाही तोपर्यंत ते ह्या राज्याच्या वाटेस जाणार नाहीत. महाराजांचे सैन्य इंग्रजाना जाऊन मिळेल अशी त्याना भीति वाटते.

माझ्या बलाढ्य स्वामीस देव सुखी करो.

गोवा, १९ जानेवारी १७१९

---

**क्रमांक : ३५०** **दि. १४-४-१७१९**

श्री जोतिर्लिंगाला दिलेल्या उत्पन्नाचा उल्लेख ह्या कागदात आहे.

श्री जोतीश्वर प्र॥

शिक्का

आज दिवाण कोट कोल्हापूर ता। रहदारी बकालानी महानाडा निहाय मार्ग मौजे कणेरी का। हवेली सु॥ सन तिसा आशेरमया मार्गाने बैल हरजिनस भरून येतात त्यास श्री स्वामीचा कर्जाया पेसजी सनद आहे. त्याप्रमाणे श्री चा ऐवज देत जाणे. हुजुर न करणे. साल दरसाल ताजे सनदेचा हुजुर न करणे. जाणिजे. छ ४ जाखर.

मोर्तब सुद

---

**क्रमांक : ३५१** **दि. १९–४–१७१९**

इनाम जमिनीच्या वसुलाबाबत प्रतापजी घोरपडे ह्यांचा मोकदम मौजे कणेगाव ह्याना कौलनामा.

श्री

कौलनामा मोकदमान मौजे कणेगाव ता। वाळवे यास तो परतापजी घोरपडे सु।। तिसा अशेर मया अलफ दिल्हा कौलनामा यैसाजे. तुम्हास मौजे मजकुरी जमीन ३।। इनामगरी व नौवकीर्दीस पहिले वरसी दर बिघा रुपये १ येक दुसरे वरसी दर बिघा रुपये २ दोनी तिसरे वरसी दर बिघा रुपये ३ तीन चवथे वरसी दर बिघा ४ पाचवे वरसी दर बिघा रुपये ५ पाच येणेप्रमाणें पाच साले पुरउना (?) वसूल देऊन कुंदा कापून कीर्दी महामुरी करून सुखरूप राहाणे. कौलाखेरीज जाजती उपद्रव लागणार नाही. हा लेहून दिल्हा कौल सही तारीख छ ९ माहे जा।दिलाखर

---

**क्रमांक : ३५२** दि. ५–१०–१७१९

**पारासुरी मठाचे जिवाजी गोसावी ह्याना पाच बिघे जमीन दिल्याचे दिवाण किल्ले पावनगड ह्यांचे पत्र.**

मारतंड वरद

अचल चिघ्न

अज दिवाण किले पावनगड ताहा मोकदमानी देहाय गावगना का। ठाणे तनखा किले मजकूर सु।। अशरीन मया आलफ. श्री बाबा हे बहूत थोर विद्यापात्र ईश्वर भत्गपरायण अनुष्ठानादीक

स्नानसंध्या करून अतीत अभ्यागत करून धर्मन्याये रात होते. ते देवाज्ञा जाहाले. त्याचे मठे पारासुरी आहे. त्याचे शिश राजश्री जिवाजी बाबा वहुत भले. वडीलाचे पुण्यती—करून त्याचे मठे स्वाधीन अतीत अभ्यागत ... ... शांत करून स्नानसंध्या करून यथा विचारे राहातात. याचा योगक्षेम चालीला पाहिजे या निमित्य राजश्री जिवाजी बावा यानीं किले मजकुरी येऊन वर्तमान विदीत केले. मनास आणीता हे वहुत थोर सत्पात्र. यास काही धर्मकृत्य भूमी करून दिलीया याचा योगक्षेम चालेल. तेणेकरून राजश्री छत्रपती स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण जाणून यास पड जमीन इनाम करून दिली आहे.

| मौजे असुरले | मौजे केरली |
| --- | --- |
| ०२॥ | ०२॥ |

येणेप्रमाणे पाच बिघे जमीन इनाम करून दिल्ही आहे. तरी तुम्ही यास चतु:सीमा करून भूमी मोजून जिवाजी गोसावी याचे स्वाधीन करणे. या पत्राचे तालीक लिहून घेऊन मुख्य पत्र गोसावी यापासी भोगवटीयास परतोन देणे. राजश्री छत्रपती स्वामीचेही आज्ञापत्र पेस्तर सादर होईल.

जाणिजे. छ २ माहे जिल्हेज

---

**क्रमांक : ३५३** **दि. ३–११–१७१९**

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत ह्यानी छत्रपती संभाजी दुसरे व आंग्रे ह्यांच्याशी लढण्यासाठी गोवा राज्याची मदत मागितली होती. ती द्यावी असे मत गोव्याच्या राज्य सल्लागार मंडळाच्या सदस्यानी दिले.

दि ३ नवंबर १७१९ रोजी राज्य सल्लागार मंडळाची बैठक शस्त्रागाराच्या इमारतीच्या सभागृहात भरली. व्हाइसरॉय दों लुईज द मिनेझिश ह्यानी सल्लागार मंडळासमोर खालील प्रस्ताव मांडला :–

फोंडू सावंत भोसले ह्यांचेकडून मला एक पत्र आले असून तें त्यांचे वकील गोविंद शेणवी ह्यांचे मार्फत आले. फोंडू सावंत ह्यांचे म्हणणे आहे की, ह्या राज्याशी त्यांची मैत्री असून ह्या राज्याचे शत्रू हे त्यांचेहि शत्रू आहेत. त्यांच्याशी त्यानी एकटयाने युद्ध केले आहे. त्यामुळे ह्या राज्याचा बचाव होऊन त्यांच्या राज्याची हानि झाली आहे. काही दिवसामागे संभाजी राजे ह्यानी कुडाळचा किल्ला घेतला. त्यांचे सैन्य अद्याप तिकडेच आहे. आता कान्होजी आंग्रे फोंडू सावंत ह्यांच्यावर चालून येत आहेत. ते त्यांच्या राज्याच्या हद्दीला येऊन भिडले आहेत. त्यानी तिकडे दोन किल्ले बांधिले आहेत. त्या किल्ल्यांच्या सहाय्याने पुढे आक्रमण करण्याचा त्यांचा इरादा आहे. संभाजी राजे ह्याना तीस हजार रुपये देऊन त्याना कुडाळचा किल्ला सोडावयास लावायचा व अशा रीतीने आपले उद्दीष्ट साध्य करायचा आंग्रे ह्यांचा बेत आहे. ते पुढे आक्रमण करण्यासाठी घाटावरूना यावयाच्या घोडदळाची वाट पाहात आहेत. अशा परिस्थितीत ह्य राज्याने आपणाला मदत केली नाही, तर उपरिनिर्दिष्ट बलाढ्य शत्रूशी आपणाला दोन हात करता येणार नाहीत, असे सरदेसाई ह्यांचे म्हणणे आहे. ते पुढे म्हणतात की, त्यांच्याकडे एक प्रस्ताव आलेला आहे. त्यानी जर संभाजी व आंग्रे ह्यांचे सैन्य डिचोलीला बिनविरोध जाऊ दिले तर एका बाजूला सरदेसाई व दुसऱ्या बाजूला त्यांचे शत्रू ह्यांच्यामध्ये जो प्रदेश आहे त्याचा हिस्सा ते त्याना देण्यास तयार आहेत. शिवाय ते दोघे घेणार असलेल्या आणखी मुलुखाचाहि काही भाग त्याना देण्याची त्यांची तयारी आहे.

उपरिनिर्दिष्ट प्रस्तावाबाबत ह्या राज्याची सल्लामसलत केल्या-वांचून सरदेसाई हे निर्णय घेऊं इच्छित नाहीत. उलट, शत्रूचा

प्रतिकार करण्यास ते तयार आहेत. पण त्याना ह्या राज्याने मदत केली पाहिजे. त्याना दारूची पन्नास पिपे, गोळ्यांच्या तितक्याच पेट्या, तीस खंडी लोखंड, पांच खंडी शिशे, अर्धे देणगी म्हणून व अर्धे किंमत देऊन हवे आहे. शिवाय दहा तोफा आणि पांचशे तोफांचे गोळे दोन किल्ल्यांच्या रक्षणासाठी त्याना हवे आहेत. हे दोन किल्ले त्यानी आंग्र्यांच्या किल्ल्यासमोर बांधिले आहेत. पुन: त्याना पन्नास घोड्यांची व काही युद्धनौकांचीहि मदत हवी आहे. त्यांचे आरमार लहान असल्याने आंग्र्याच्या आरमाराला तें तोंड देऊ शकणार नाही. युद्धनौकांवर ते आपली माणसे ठेवण्यास तयार आहेत. तसेच दमण किंवा वसई येथे एक युद्धनौका विकत घेण्यास व हळदोणे आणि पिळगाव येथून शिशे नेण्यास आणि रेडीला लाकूड नेण्यास त्याना परवाना हवा आहे.

ह्या जो प्रस्ताव सादर करण्यात आलेला आहे, त्याच्यावर सर्व बाजूने विचार करून सल्लागार मंडळाने आपले मत व्यक्त करावे, अशी विनंती व्हाइसरॉय ह्यानी केली. सर्व सदस्यानी फोंडू सावंत भोसले ह्याना मदत करावी असे मत व्यक्त केले.

व्हाइसरॉय म्हणाले की, फोंडू सावंत ह्यानी विनंति केली आहे म्हणून नव्हे, तर ह्या राज्याच्या हितासाठीहि त्याना मदत केली पाहिजे. त्यानी मागितलेली मदत कशी पाठवायची तत्संबंधीचा विचार करून नंतर ती पाठविण्याचा निर्णय घेण्यात येईल.

---

**क्रमांक : ३५४** दि. १०-१२-१७१९

राजश्री हिंदुराव घोरपडे ममलकतमदार ह्यानी करवीरच्या महालक्ष्मीची स्थापना करून श्रीच्या पूजेचे प्रधानपद तुम्हास बहाल केले आहे व पूजाअर्चेच्या खर्चासाठी कसबा सावगावची चौथाई तुम्हास नेमून दिली आहे, असे सुभेदार प्रांत कोल्हापूर ह्यांचे नरहरीभट सावगावकर ह्याना पत्र.

स्वस्ति श्री नृप शालिवान शके १६४१ विकारीनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुध दशमी गुरुवासरे. वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री सीवराम भट याचे पुत्र नरहरीभट काश्यप गोत्र आश्वलायन सूत्र रुक शाखा ध्याई उपनाम सावगाऊकर वास्तव्य श्री—— करवीर क्षेत्र यास रामा मोंजी भाबकर सरसुभेदार प्रा कोल्हापूर सु॥ असरीन मया अलफ. श्री—— देवीचे प्रेरणेकरून रा हिंदूराव घोरपडे ममलकत-मदार याणी देवालयात स्वसिंहासनी श्री—— ची स्थापना करुन तेथील प्रधानत्वपणाचा अधिकार वतनी वंसपरंपरेने तुम्हास सांगितले. त्यास ऐवज करुन देणे म्हणोन रा राऊ मशारनिले यांची आज्ञा. त्यावरून उर्जा विशाशात्कारे चालोन स्वामीचे व स्वामीच्या राज्याचे कल्याण होये या करिता यास ऐवज पाहिजे. त्यास कसबा सावगाव प्रांा हुकेरी येथील चौथाई देखील पेट व जकात मुजेरी मोहतर्फा व पानसाल व नदी ठोकरा व कुलबाब कुलकानु पडले पान आकाराची चौथाई धारादत्त करुन दिल्हे आसे. सदरहू ऐवज घेऊन श्री——ची उर्जा विशेशात्कारे चालवीत जाणे. यास माहाराज राजश्री—— स्वामीही चालवितील. वरकड ब्राह्मण आथवा मरहाष्ट व हिंदु व मुसलमान आदीकरून समस्त जातीच्यानी चालवावे. न चालवितील विक्षप करतील त्यास आपआपल्या स्वधर्माचे पातक असे. जाणिजे. छ ९ माहे सफर जे विक्षेप करतील त्यास धर्मशास्त्रीचे वचन प्रमाण.

स्वदत्तां परदत्तां वा यो हरेच्च वसुंधरां ॥
स विष्टायां कृमी भूत्वा पितृभिरसह मज्जति ॥ १ ॥

षष्टी वर्षा सहस्त्राणि स्वर्गे वसति भूमिदा ॥
आछेता चानुमंताच तावान्ति नरक वसेत् ॥ २ ॥

यैसो वचने स्मरोन तुमच्या प्रधानत्वपणाचा अधिकार व श्रीच्या पूजेचा ऐवज चालवितील. तुम्ही येकनिष्टपणे राहून श्री ची पूजा विधियुक्त करणे. आण तुम्ही व आपले पुत्र पौत्र परंपरेने कसबे

सावगाव देखील पेस्ट जकायत येथील चौथाईच्या ऐवज घेऊन आनभऊन राहणे. जाणिजे छ मजकूर.

---

**क्रमांक : ३५५** दि. २६–२–१७२०

मराठ्यांच्या स्वारीपासून सावध राहण्याबद्दल गोव्याच्या व्हाइसरॉयचे कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांना पत्र

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांस

आम्हाला बातमी कळली आहे की, मागी वेगने काही मराठा सरदाराना हाताशी धरून सोंदेच्या राजाच्या मुलुखावर स्वारी करून सामराणीचा किल्ला घेतला आहे. फोंड्यावरहि हल्ला करण्याचा त्यांचा विचार असल्याची बातमी आहे. ते लोक आपले उद्दीष्ट साध्य करतील असे मला वाटते. फोंडू सावंत ह्यांच्या राज्याच्या अस्तित्वाविषयी मला केवढी कळकळ वाटते हे त्याना माहीत आहेच. म्हणून त्या लोकानी त्यांच्या राज्यात शिरू नये ह्यासाठी त्यानी काळजी घ्यावी. जरी त्यांच्या राज्यात शिरण्याचा त्यांचा हेतु नसला, तरी देखील त्यानी सरहद्दीवर सैन्याचा बंदोबस्त ठेवलेला बरा. त्यामुळे दोघाचे शत्रु जे मराठे त्याना त्यांचा वचक वाटेल. मी सरदेसाई फोंडू सावंत ह्याना सुयश इच्छितो.

दि. २६ फेब्रुवारी १७२०

कौंट दों लुईज द मिनेझिश

---

**क्रमांक : ३५६** **दि. २-३-१७२०**

मराठे व फोंडू सावंत भोसले ह्यांच्यामध्ये तह झाल्याचे सावंतांचे गोव्यातील प्रतिनिधि बाबू भट ब्राके ह्यानी गोव्याच्या व्हाइसरॉयला कळविले होते. व्हाइसरॉयने त्याना पुढील पत्र पाठविले.

कुडाळचे सरदेसाई ह्यांचे 'एजंट' बाबू भट बाक्रे ह्यांस

सरदेसाई आणि मराठे ह्यांच्यामध्यें तह झाल्याची बातमी बाबू भट बाक्रे ह्यानी मला पुरविल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. सरदेसायांना हा तह फायदेशीर झाला आहे असे त्यांचे म्हणणे आहे. मला आशा आहे की, आंग्र्यांच्या आश्वासनावर विसंबून राहून सरदेसाई हे त्या बाजूला आणखी मुलुख जिंकण्यास तयार होणार नाहीत. कारण हा शत्रू शब्दाला जागणारा नाही. तो एके बाजूने शांततेची भाषा बोलेल आणि दुसऱ्या बाजूने + + + + बाबू भट बाक्रे ह्यानी शाहू राजे ह्यांच्या सैन्याच्या हालचालीबाबतची मला मिळालेली बातमी सरदेसाई ह्याना कळवावी. ह्या लोकांवर माझा बिलकूल विश्वास नाही. म्हणून मी सरहद्दीवर कडक बंदोबस्त ठेवला आहे.

गोवा, २ मार्च १७२०
कौंट दों लुईज द मिनेझिश

---

**क्रमांक : ३५७** **दि. ५-३-१७२०**

**मराठे व सोंदेचा राजा ह्यांच्या संदर्भात गोव्याच्या व्हाइसरॉयचे फोंडू सावंत भोसले ह्याना पत्र.**

सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांस

मागी बेग आणि मराठे हे चालू उन्हाळ्यात फोंड्यावर हल्ला

करणार नाहीत असे मी धरून चालतो. कारण मला खात्रीलायक कळले आहे की, सोंदेच्या राजाने एक लक्ष रुपये भरून सामराणीच्या किल्ल्याची मुक्तता केली आहे. त्याच्या प्रदेशात ते आता शिरणार नाहीत असे कळते. परंतु सोंदेचे सैन्य सामराणीच्या रस्त्याचे अजून रक्षण करीत आहे. कारण, पैसे घेऊन देखील शत्रू पुन: हल्ला करील अशी त्याना भीति वाटते.

सोंदेच्या राजाचा व आपला तह घडवून आणावा अशी विनंती सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यानी मला केली आहे. त्यांच्या ह्या सूचनेचे मी स्वागत करतो. परंतु सोंदेच्या राजाकडून त्यांच्या काय अपेक्षा आहेत ते त्यानी कळविले तर बरे. राजा–राजामध्ये सलोखा असावा हे चांगले. परंतु फोंड्यावर हल्ला करण्याची जी एक सूचना मी मागे फोंडू सावंत ह्याना केली होती, ती त्याना आठवत असेलच. कारण फोंड्यावर हल्ला करण्यासाठी आलेले मराठे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांच्या मुलुखात शिरण्याची शक्यता आहे.

सरदेसाई फोंडू सावंत ह्याना मी त्यांच्या शत्रुविरुद्ध विशेषता आंग्र्याविरुद्ध सुयश इच्छितो. आंग्र्यांवर त्यानी विश्वास ठेवू नये.

गोवा ५ मार्च १७२०

कौंट दों लुईज द मिनेझिश

---

**क्रमांक : ३५८** दि. ३–५–१७२०

मौजे संदुति परगणा रायबाग ह्या गावची लूट बाजीराव पेशवे ह्यांच्या फौजेने केली, तेथील मठ लुटला व सर्व वस्तभाव नेली ही हकीकत तारागिरी गोसावी ह्यानी छत्रपती शाहू ह्याना लिहिल्यावरून त्यानी त्याना लिहिलेले पत्र.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४६ शार्वरी संवत्सरे वैशाख शुध्द सप्तमी भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री तारागिरी गोसावी महंत वास्तव्य मौजे संदुत्ति परगणा रायबाग यास आज्ञा केली ऐसिजे. तुम्ही विनंतीपत्र पाठविले ते पाहोन लिहले वर्तमान कळोन आले. राजश्री बाजीराऊ प्रधान फौजेनिसी त्या प्रांती गेले होते ते समयी मौजे मजकुरावरी स्वारी जाहली. ते समयी मौजे मजकूर लुटून सत्यानास जाहला. आपला मठ लुटिला. कुल वस्तभाव मालमता लुटून नेली म्हणोन कितेक विस्तारे लिहिले. येश्यास राउ मशारनिल्ले फौजेनिसी आले होते. त्याची भेटी घेवून गावीचा तह रद करुन गावची रखवाली करावी ते तुम्ही न केली. लस्कर अनिवार. लस्काराने गाव लुटिला. होणार ते गोष्टी जाली. या उपरी गावकरास आभयपत्र सादर केले ते गावास देऊन गावची लावणी संचणी करून गाव आबादान करणे आणि तुम्हीहो मौजे मजकुरी सुखरूप राहाणे. या उपरी कोणाचा उपसर्ग लागणार नाही. जाणिजे. लेखणालंकार.

---

**क्रमांक : ३५९** **दि. ३–५–१७२०**

गावची लावणी-संचणी करावी, तुम्हाला कोणाचा उपसर्ग लागणार नाही म्हणून शाहू छत्रपती ह्यांचे मौजे संदुतीच्या मोकदमाना अभयपत्र.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४६ शार्वरीनाम संवत्सरे वैशाख शुद्ध सप्तमी भौमवासरे क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी (यानी) मोकादमानी मौजे संदुति परगणे रायबाग यासि दिले अभयपत्र ऐसिजे. राजश्री बाजीराऊ प्रधान याची फौज या प्रांती गेली होती ते समयी फौजेने गावास उपसर्ग दिल्हा. गाव लुटून फना केला. येणेकडून गाव बेचिराख जाला. त्यास हुजरून अभयेपत्र सादर जालीयाने गावची लावणी संचणी होऊन आबादान होईल म्हणोन

राजश्री तारागिरी गोसावी यानो विनंतीपत्र पाठविले. त्यावरून मनास आणोन मौजे मजकुरास अभयपत्र सादर केले आहे. तर तुम्ही कोणे बाबे शक न धरिता बेशक होऊन गावचो लावणी संचणी करून आबादानी करून सुखरुप राहाणे. तुम्हास कोणाचा उपसर्ग लागणार नाही. आभये आसे. जाणिजे.

लेखनालंकार.

---

**क्रमांक : ३६०** **दि. ५–८–१७२०**

रेखोजी जाधव ह्याला दिलेली सनद. सनदेत रेखोजीने छत्रपती राजाराम ह्यांची कर्नाटकात एकनिष्ठेने सेवा केली असा उल्लेख आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषक ४७ शार्वरीनाम सवत्सरे श्रावण शुध त्रयोदसी भृगुवासरे क्षेत्रीय कुलावंतस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी रेखोजी बिन नरसोजी[1] जाधव नाईक कसबे कोल्हापूर यास आज्ञा केली ऐसाजे. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन सेवक. तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामी चंजी प्रांते आसता तुम्ही संनीध राहून यकनिष्टपणे सेवा केली. त्याउपरी कैलासवासी स्वामी या प्रांतास आले ते समई तुम्ही समागमे येऊन श्रम सोसून त्याची कृपा संपादून घेतली. त्याउपरी राजश्री शिवाजी राजे दाजी याची सेवा येथायुक्तपणे करीत आसता त्याणी तुम्हास जये संवत्सरी जेष्ट शुध्द त्रयोदसी भानुवासरी[2] इनाम कुलबाब कुलकानु जलतरू पाषाण निधी-निक्षेप पडिले पान सहीत खेरीज हकदार व इनामदार करून मौजे दरखंदले तपे कल्हे प्रांत पनाला हा गाव इनाम अजरामऱ्हामत करून

---

१. पुढील एका सनदेत ह्याना " जप्तन्न मुलूख " असे संबोधले आहे.

२. दि. १६–५–१७१४.

देवून पत्रे करून दिल्ही. त्यानंतर तुम्ही स्वामीची सेवा येकरूप निष्टेने मनाभावे करून करीत असता मौजे मजकूर स्वामीनी तुम्हास उत्तरोतर इनाम चालवावयाची आज्ञा करून हेमलंबी संवत्सरी मार्गशीर्ष शुध्द सप्तमी भृगुवासरी[1] पत्रे करून दिल्ही. यैशास हाली तुम्ही पनालियाचे मुकामी स्वामीसंनीध विनंती केली की धामधुमे-करिता पत्रे कोल्हापुरी विकारी संवत्सरी[2] भूमिगत करून ठेविली होती ती काढून पाहाता अगदी जाया जाहाली. यास्तव स्वामीनी नूतन पत्रे भोगवटियास द्यावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणून विदीत करून मौजे मजकूर इनाम दिल्ह्याची पत्रे राजश्री शिवाजी राजे दाजी यांची व स्वामीची जाया जाहलेली आणून दाखविली. ती पत्रे पाहाता केवल जीर्ण बहू विगलीत जाहली. यैशास तुम्ही स्वामी सेवा पहिलेपासून निष्टेने केली व हालीही करीत आहा. तुम्हास मौजे दरखदले ताा कल्हे प्रा।। मजकूर हा गाव इनाम चालवावयाची आज्ञा स्वामीनी करून प्रांत मजकूरच्या देशाधिकारी याचे नावे भोगवटियास पत्र देऊन तुम्हासहि हे पत्र दिल्हे असे. तरी तुम्ही मौजे मजकूर पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम आनभवून सुखरूप असणे. लेखनालंकार. मोर्तब असे.

---

**क्रमांक : ३६१** **दि. २०–८–१७२०**

प्रस्तुत सनदेतील बहुतांशी मजकूर दि. २८–११–१७०३ च्या सनदेत व दि. ५–१०–१७१६ च्या विभाजनपत्रात येऊन गेलेला आहे. जेथे थोडा फरक वाटला तोच तेवढा घेतला आहे.

---

१. दि. २९ नवंबर १७१७.

२. दि. १० मार्च १७१९ ते २८ मार्च १७२०,

श्री

श्री
प्रतिपच्चंद्र रेखेव
वर्धिष्णुर्विश्व वंदिता
शंभु छत्रप
ते र्मुद्रा रामसूनो
विराजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४७ शार्वरीनाम संवत्सरे श्रावण बहुल त्रयोदसी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री गिरजोजी बिन मुधोजी यादव देशमूख पाा कऱ्हाड यास अज्ञा केली यैसीजे--

| | | |
|---|---|---|
| श्री शि<br>व नृपति<br>हर्षनिधान मो<br>रेश्वर सुत नीळ<br>कंठ प्रधान | श्री आई आ<br>दि पुरुष श्री राजा<br>शिव छत्रपती स्वामी<br>कृपानिधि तस्य<br>परशराम त्र्यंबक<br>प्रतिनिधी | ...............<br>...............<br>...............<br>............... |

........... त्या उपरी मातुश्री दुर्गाबाई साहेब ताम्राचे निर्बंधी दौलताबादेस होती. त्यांचे वर्तमान न कळे. त्यांचा परामर्ष करावयास राजश्री संभाजी राजे याणी आपणास पाठविले. तेथे संकट प्रसंगात जाऊन त्यांची भेटी घेऊन आलो. ते समई राजश्री संभाजी राजे व कवि कलश समागमे असता आपण येऊनु दुर्गाबाई यांचे वर्तमान सांगितले. ...................... . ................ .. त्यावरी चिरंजीव सौभाग्यवती अंबिकाबाई यांचा जन्म जाहाला. त्या संतोष समई आपणास वतनाची पत्रे द्यावयाची आज्ञा केली. पत्रे व्हावी तों कैलसवासी स्वामी कोकणातून किले प्रतापगडास गेले. श्री चे दर्शन घेऊन स्वामीचे जायेवळ तेथे केले. तेथून सातारियास आले,

सातार्‍याहून निघोन किले सजनगडास येऊनु तेथून वसंतगडास आले. त्याउपरी मातुश्री ताराबाईसाहेब व राजश्री शिवाजी राजे दाजी विशाळगडी होते. त्यास कैलासवासी स्वामी संनीध आणविले. कैलासवासी स्वामी सातारियास आले. मातुश्री ताराबाईसाहेब व राजश्री शिवाजी राजे हे ही आले. ......... ....... ..... ......
....... ......... कैलासवासी स्वामी चंजीचे मुकामी असता माहादजी जगदाळा मसूरकर याणे गैरवाका विदित करून तर्फ मसूर येथील देशमुखीचे पत्र करून घेतले आहे. यैशास माहादजी जगदाळा यास देशमुखीसी समंध काय व मसूर कांहीं संचतर माहाल नव्हे... ..
........... .... ........................ परंतु कवि कलश कारबाराचे अध्यक्ष. ते समीप नव्हते. तन्मुळे पत्रे जाहाली नाहीत. ............... ..................................
... ........ हे वतन पुढेंही भोसल्यांचे वंशपरंपरेने तुम्हास व तुमचे वंशपरंपरेस चालवावे यैसे शफत पूर्वक पत्र दिले आहे. तदनरुप राजश्री शाहू राजे दाजी याणीही तुम्हास वतन सुरक्षित चालवावे. या वतनाची पत्रे त्याणी कोण्हास देऊ नयेत. दिल्ही असतील अगर देतील तरी ती ही रद असेत..........................................
.............................जाणिजे. लेखनालंकार.

मर्यादेयं विराजते मोर्तब

---

**क्रमांक : ३६२** **दि. २३–९–१७२०**

धोंडो भास्कर देशकुलकर्णी मामले प्रभानवळी व तर्फ मलकापूर हे राज्यातील इमानी सेवक असून मोगलांचे धामधुमीत ह्यानी रत्नागिरीच्या डोंगरावर गड बांधून मोगलांची अनेक ठाणी घेतली होती. ती सेवा लक्षात घेऊन त्याना काही नूतन इनाम व हक्क देण्यात आले,

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४७ शार्वरीनाम संवत्सरे आश्विन शुध श्रीतीया भृगुवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी पारपत्यगार व कारकून वर्तमान व भावी ता। राजापूर

| श्री सीताप<br>ति चरणी दृढ<br>भाव रामचंद्र<br>सुत भगवंत<br>+ राव + | श्री आई आ<br>दि पुरुष श्री राजा<br>शिव छत्रपती स्वामी<br>कृपानिधि तस्य प<br>रशुराम त्र्यंबक<br>प्रतिनिधि |
|---|---|

यासी आज्ञा केली ऐसीजे. राजश्री धोंडो भास्कर देशकुलकर्णी मामले प्रभानवली व ता। मलकापूर याणी स्वामी संनिध विनंती केली की आपल्या वतनास कदीम इदलशाहि कारकिर्दीस इनाम हक लवाजिमे वहुत चालत होते. आलिकडे महाराज राजश्री कैलासवासी स्वामीस हे राज्य अर्जानी जाले ते समई इनामे खालसा करुन हकाची मोईन रयत निसबतीने करुन दिल्ही. तेणेकरुन योगक्षेम चालत नाही. हाली दर सदे पावणा करी आसे. त्यामध्ये दोन तकसीमा निमे शंकराजी महादेव व केसो नरसिह (व) मोरो त्रिमल निमे आपण संभाजी तुकदेव ऐशा दोनी तकसीमा चालत आहेत. तरी महाराज कृपाळू होऊन या वतनास हक व ईनाम करुन दिल्हे पाहिजे म्हणून विदीत केले. त्यावरुन मनास आणिता धोंडो भास्कर याणी या राज्यात बहुतच श्रमसाहस केले. विशाळगड तांम्राने घेऊन ठाणी बैसविली ते समई याणी रत्नागिरी समिप डोंगर होता तो वसवून गड वांधोन कुल तांम्राची ठाणी मारून देश हस्तगत केला. मानिले स्वामीच्या राज्यातील पुरातन येकनिष्ट सेवक. यांचे चालविणे हे स्वामीस परम अवश्यक. यास्तव स्वामी याजवरी मेहरबान होऊन नुतन इनाम जमिन व हक व विस्वा जकातीस मोईन करून दिल्ही असे———————

| | |
|---|---|
| हक गावगना रयत निसवती | इनाम जमीन कुलबाब कुलकानु |
| हाली निर्ख जिराईत व बागाईत | खेरीज हकदार व इनामदार करून |
| आकार होईल त्यास दर सदे | नवात जमीन बिघे |
| करी येक | ॳ१० मौजे आडिवरे |
| १ | ॳ१० मौजे ठाणे |
| जकातीस बिस्वा दर बैली | --- |
| रुके | ॳ२० |

| | |
|---|---|
| कापड व गहू | केणे[1] भूस |
| व केणे दर बैली | दर बैली |
| रुके | रुके |
| ६ | २ |

येणेप्रमाणे हक दर सदे करी येक व जकाती विस्वा कापड व गहू जकेणे सा रुके व केणे भूस दोन रुके दर बैली व जमीन गावगना वीस बिघे मोईन करून दिल्ही आहे. याप्रमाणे देशकुलकर्णी यास दोन्ही तकसीमास चालवित जाणे आणि सदरहु प्रमाणे यास व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. साल दर साल ताजा सनदेचा उजूर न करणे. या सनदेची तालीक लेहून घेऊन सनद भोगवटीयास परतोन देणे. लेखनालंकार.[2]

मर्यादेयं
विराजते

रुजु

---

**क्रमांक : ३६३** **दि. २७–९–१७२०**

हिर सावंत ह्यास सहा हजार रुपये द्यावेत म्हणून छत्रपती संभाजी दुसरे ह्यांचे फोंड सावंत भोसले ह्यांस पत्र.

---

१. विक्रीस जाणाऱ्या जिन्नसावर घेतलेली जकात.

२. हस्ताक्षर वेगळे.

श्री

तालिक

राजश्री फोंड सावंत भोसले देसाई प्रांत कुडाळ गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य प्रति राजश्री राजा शंभु छत्रपती उपरी. वदल देणे वगमी जमा रद कर्ज राजश्री हिर सावंत यासी रुपये ६००० साहा हजार रुो देविले आहेत. सदरहू यैवज आधि मशारनिलेच्या जमावाकडे बिला कुसुर आदा कर्णे. सदरहू यैवज दर साली दोन हाजारप्रमाणे तीन साला पावणे. छ ५ जिल्हेज सु॥ इहिदे आश्रेन मया आलफ. बहुत काय लिहिणे. मोर्तब आसे.

---

**क्रमांक :** ३६४ **दि.** १–११–१७२०

छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी हुसेन खान पनी ह्याला मौजे यमगर्णी हा गाव इनाम दिला. सदहुं हुसेन खान पनी ह्याचे दोन भाऊ स्वामी सेवा करीत असता ठार झाले होते.

तालीक नकलेची

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४७ शार्वरीनाम संवत्सर कार्तिक शु॥ १३ त्रयोदसी भोमवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी इजतमाब हुसेन खान पनी यासी आज्ञा केली ऐसिजे. तुम्ही स्वामी कार्यावरी

सिका सिका

यकनिष्टा शवा केली. तुमचा बंधु दिलावरखान याणी बहुत दिवस

शवा यक दिलीने केली. त्यावरून यास तीर्थस्वरूप राजश्री कैलासवासी स्वामींनी मौजे यमगर्णी प्रांत कागल हा गाव इनाम दिल्हा. दिलावरखान तुमचा भाऊ व इमुखान ऐस स्वामी कार्यावरी खर्च आले. यास्तव मौजे मजकूर स्वामीनी तुम्हास इनाम चालवणेयासि आज्ञा केली असे. तरी तुम्ही मौज मजकूर वंशपरंपरेने अनभऊन सुखरूप असणे. जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब असे.

---

**क्रमांक :** ३६५ **दि.** २६–११–१७२०

तारागिरी गोसावी ह्याना छत्रपती शिवाजी दुसरे ह्यानी मौजे संदुती हा गाव इनाम दिला होता. बाळाजी विश्वनाथ ह्यांच्या फौजा रायबाग प्रांतातून गेल्या तेव्हां त्यानी तो गाव लुटला. गावची सनदही गेली. म्हणून छत्रपती संभाजी दुसरे ह्यानी गांवची नवीन सनद करून दिली.

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ४७ शार्वरीनाम संवछरे मार्गसीर्ष शुध आष्टमी मंदवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी हरीभक्त परायण राजश्री तारागिरी गोसावी यांस दिल्हे इनामपत्र येसजे. तुम्ही स्वामी संनीध विनंती केली की आपण उत्तर दक्षण मानसतीर्थ करून या प्रांतास आलो. त्यास कृष्णातिरी वास करून मट बाधोन अतीत आभ्यागतास आन्न देऊन स्वधर्मे कालक्षेप करावा ऐसी इच्छा धरून रांगणीयास गेलो. तेथे राजश्री शिवाजी राजे यासी आपले वर्तमान सांगितले. त्यावरून आपणास मौजे संदुती ता।। रायेबाग हा गाव इनाम करून दिल्हा. त्याप्रमाणे आपण गाव अनभवीत असता विकारी संवछरी रा।। बालाजी विस्वनाथ याची फौज मौजे मजकुराजवली येऊन मुकाम केला ते समई आपला गाव लुटीला. वस्तभाव गला दाणा व मटाचा पदार्थ भागवत भारतादि पुस्तके आदीकरून गेली. त्यामध्ये इनामतीची पत्रे होती ती गेली. येसीयास माहाराज धर्मपरायण आहेत. भोगवटीयास नवीन सनद आसावी. तरी

स्वामीनी सनद सादर केली पाहिजे म्हणून विदीत केले. त्यावरून मनास आणिता तुम्ही गोसावी महंत बहूत थोर तपस्वी धर्माचे ठाई निष्ठा धरीता. तुमची स्वास्था करून दिधलियाने बहुतच पुण्य आणि राज्याची कल्याणाभिवृधी आहे. यास्तव मौजे संदुती त।। रायेबाग प्रां।। कोल्हापूर हा गाव पूर्ववत इनाम होता त्याप्रमाणे स्वामीनी मौजे म।। कुलबाब कुलकानु हालीपटी पेस्तरपटी जलतरुपाषाण निधी निक्षेपसहीत खेरीज हकदार व इनामदार करून करार केले असे. मौजे मजकुरी मट बांधोन अतीत अभ्यागतास आन्न उदक देऊन स्वधर्मे आचरण करून स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण चिंतून राहाणे आणि इनाम गाव तुम्ही व तुमचे शिष्य परंपरा अनुभऊन सुखरूप राहाणे. जाणिजे.

तेरीख ६

सफर सुहूरसन इहिदे आश्रैन मया आलफ.

---

**क्रमांक : ३६६** **दि. २९-१२-१७२०**

दिलेरखान ह्या मिरजेच्या फौजदाराकडून घेतलेल्या घारी कर्यातीच्या देशमुखीच्या वतनावर आपला काही हक्क नाही म्हणून रायगोंडा अलगोंडा पटेल ह्याने पिराजी घोरपडे ह्याना लिहून दिलेला राजिनामा.

श्री शंकर

माहाराज राजश्री पिराजी बिन संताजी घोरपडे नवकस देसाई मामले मिरज साहेबाचे सेवेसी-----

विनंती सेवक रायगोंडा वलद अलगोंडा पटेल मौजे पटणकोडोली कर्यात इचलकंर्जी मामले मजकूर रामराम विनंती. सुहुर सन ईहिदे

अशरीन मया अलफ लिहून दिल्हे येंजीदखत[1] यैसेजे. आपण दिलेरखान फौजदार मिरज याजपासून नूतन देशमुखी च्यारी कर्यातीचे घेतले होते. वी ता——

क।। सांगली १ क।। उदगाऊ १ क।। इचलकर्जी १
क।। रुकडी १

येकूण च्यारी कर्यातीचे देशमुखी वतनाचे कागद दिलेरखान याचे करुन घेतले होते व त्या प्रमाणे राजश्री सिदोजी घोरपडे याचे कागद करुन घेतले होते. त्यास माहाराज राजश्री रॉऊ प्रतिनिधी यानी आपणास हुजुर तलबा[2] करून रजा[3] फर्माविले की तुमचे वडिलानी अगर तुम्ही आजि ता कोणास देसमुखीचे वतन नसता दरम्यान नवकीर कागद करून घेऊन च्यारी कर्यातीचे वतन देशमुखीस फितूर केला हे गोष्टी करावयास तुम्हास काय निसवती म्हणौन अज्ञा केली. त्यावरून आम्ही विनंती केली की हे गैरवर्तणूक आम्हापासून जाहली. अम्हास देशमुखीस समंध नाही. यैसे चौघाचे विद्यमाने करार जाहले. त्यावरून आपण रजावंद[4] होऊन येजीदखत लेहून दिल्हे आसे. आम्हास सदरहू चौकर्यातीचे देसमुखीचे वतनास अर्थअर्थ समंध नाही. या उपरी चौकर्यातीचे देसमुखी वतनास आम्ही व आमचे वौशपरंपरेने कोणी मुजाहिम[5] होतील तरी आपणास व वौशपरंपरेस मौजे मजकुरचे पटेलगीस समंध नाही. पटेलगी साहेबाची आसे. आम्हापासी सदरहू चौकर्यातीचे देसमुखोचे पत्रे आसतील ती बातील[6] आसेती व मौजे मजकुरचे देशमुखीचे हक व इनाम व बाजेबाब सालाबाद प्रमाणे सुरळीत वर्तणूक करायास अंतर पडणार नाही. यास

१. राजीनामा. २. तलब-बोलावणे. ३. आज्ञा. ४. राजी. ५. हरकत करणारा. ६. खोटी.

अंतर पडलिया दिवाणाचे गुन्हेगार व गोताचे अन्याई हे लेहून दिल्हे येजीदखत. सही. छ १० रविलावल----

गोई

श्रीनिवास माधवराऊ
देसकुलकरणी पाा मिरज
१

शामजी नरसिव्ह देस
कुलकरणी प्रांा
पनाळा
१

आपाजी रामकृष्ण देसकु
लकर्णी पाा कोलापूर
१

---

# पुरवणी

**क्रमांक :** ३६७ इ. स. १६९१–९२

हिरोजी नाईक व बापूजी नाईक साठम ह्यांच्या इनामाची ही यादी आहे. 'हे कामाचे मर्दाने साहेब कामावरील एकसां गनिमास टचका देऊन गनीम कापून काढला' असा महत्वाचा उल्लेख या कागदात आहे.

श्री

नक्कल

जाबिते इनामत हिरोजी नाईक व बापूजी नाईक साठम सरपटेल देहाय मौजे आठ तर्फ साळशी सुरु सन इसन्ने तिस्सैन अलफ. राजश्री पंतप्रतिनिधी विद्यमान राजश्री शकोजी नाईक जगताप यांचे सनद सादर तर्फ मजकूर येथे आज्ञा की हिरोजी नाईक साठम यांचे सरपाटिलकीचे फरमान कारकीर्दी अदिलशाही होते. ते फोंडेचे मुक्कामी विदीत केलें आणि अर्ज केला तें मनास आणून हे कामाचे मर्दाने साहेब कामावरील एकसां गनिमांस टचका देऊन गनीम कापून काढला. पाच चार साहेब कामे बरीच केली याकरिता मेहेरबान होऊन पाटिलकीची सनद दिली. जे इनाम गांवगन्ना होती ती सोडून दिली म्हणून सनद सादर. त्यावरून गांवगन्ना मिसला देऊन इनामतीची शेते होती ती मोजून दिली. अज जमिन भरे १॥६ सहा रोवळे दर कुडवास सात हाताची काठीप्रमाणे ३६० काठ्या याप्रमाणे सदरहु जमीन पाऊण चावर १८ अठरा बिघे

तपशील

कमाविशी साल मजकूर जमीन बिघे.

एकूण.

राजभाग गल्लापसेरी खंडी १२।४॥।२॥

पुढील सालाकारणे कमाविशी होईल तो पुढे बांध पडेल.

यंदा गावगन्ना

मौजे वांदिवडे वुजर्ग जमीन कुडव महाल माप १ रोवळा. एकूण जमीन सात हाताचे काठीप्रमाणे दर कुडवास ३६० काठ्याप्रमाणे विघे १८ एकूण पसेरी महाराज भाग खंडी ६। २।।। १।।।

वायगण शेत फुरडी कुडव ०७०१ एकूण सात हाताचे काठी प्रमाणे जमीन विघे ०६। २०२।।।।। एकूण नजरमान राजभाग खंडी २।।। ३।।।

शेत खोतकी कुडव ०९०३।। एकूण सात हाताचे काठीने जमिन विघे ०८।।।।।०३।। एकूण राजभाग बरहुकूम पहाणी खंडी ३०४०१

शेत शेर पालिये—कुडव ०३।। ३।। एकूण सात हाताचे काठीने जमीन ०३। १।।। ३।।। एकूण राजभाग खंडी ।।.

(पुढे गहाळ)

---

**क्रमांक : ३६८** दि. २५-१२-१६९३

माणकोजी, हिरोजी, बापूजी व प्रतापजी साठम यांचे सर पाटिलकीचे वतन पूर्ववत चालू ठेवल्याचे तपे साळशीच्या ठाणेदाराचे पत्र. सदहुं बंधूना मुइजुद्दीनने पन्हाळयास वेढा दिला त्यावेळी जमावानिशी पाठविण्यात आले होते असे सनदेत म्हटले आहे.

नक्कल

श्री
रघुनाथ रा
मचंद्र पंत

अज दिवाण ठाणा तपे सालसी तहां मिरासी व गांवकरानी मौज मालडी ता।। मजकूर सुरु सन आर्बा तिसैन अलफ. राजश्री

रामाजीपंत सर सुभेदार सुभा प्रांत राजापूर यांचे आज्ञापत्र महाली सादर जाहाले. तेथे आज्ञा की राजश्री पंत आमात्य स्वामीचे आज्ञापत्र सादर जाहाले तेथे आज्ञा की माणकोजी साठम व हिरोजी व बापूजी व प्रतापजी साठम नाईकवडी ता। मजकूर याही हुजूर येऊन विनंती केली की आपण पुरातन स्वामीचे शेवक. बहुत दिवस कष्ट मशाखत केली आहे. सांप्रत पनाळयास मोवाझिम गनीम वेढा घालून राहिला होता तें प्रसंगी आपणास जमावानिसी पनाळयास पाठविले होते. तेथेहि वेढयात यकनिष्ठपणे सेवा केली. असेयास आपले वतन सरपाटेलकी गाऊ आठ ता। मजकुरी चालत होते त्या वतनास इनाम सेते महतकदम चालत होते. त्यासह राजश्री-----कैलासवासी छत्रपती स्वामीस देश कबज जाहला. त्यावरी तमाम इनामदारांचे इनामती अनामत केल्या होत्या. असयास स्वामी कृपाळू होऊन अदलशाही कारकीर्दीस जेणेप्रमाणें चालवित होते तेणेप्रमाणे चालवित जाणे म्हणून आज्ञा. तरी मौज मजकुरी इनाम सर पाटीलकी जमीन कुडो पंधरा ०१५ चालत होते तेणेप्रमाणे भोगवटा सालाबाद चालत आला आहे तेणेप्रमाणे देवविला आहे. तरी आदिलशाही कारकीर्दीचा भोगवटा मनास आणून जेणेप्रमाणे चालत आला असेल तेणेप्रमाणे यास व याचे पुत्रपुत्रपौत्री चालवित जाणे. साल दरसाल ताजे सनदेचा उजूर करीत नव जाणे. छ ७ जमादिलावल. मोर्तब सुद. मोर्तब.

---

**क्रमांक : ३६९** इ. स. १७००, मार्च नंतर

हिरोजी व प्रतापजी साठम ह्याना रामचंद्रपंत ह्यांचे वतनासंबंधी पत्र. संताजी व सुर्याजी साठम ह्याना आईसाहेबाना (ताराबाई) भेटविल्याचा निर्देश ह्यांत आहे.

श्री

नक्कल

राजमान्य राजेश्री हिरोजी व प्रतापजी साठम यांसी–

रामचंद्र निळकंठ आशिर्वाद. सुरु सन मया अलफ. संताजी साठम व सूर्याजी साठम यांस आम्ही घेऊन आलो. मातोश्री आई-साहेबांचे दर्शन केले. त्या समयीं आम्हापाशी होते. सांप्रत आईसाहेबांनी आम्हास विशाळगड यासी जाण्यास आज्ञा केली त्या वेळी स्वार होते समयी ह्या उभयतांस घेऊन मातोश्रीच्या भेटी करवून यांच्या गोष्टी कर्णे त्या मातोश्रीस सांगितले. तुमचे चालविणेसाठी बहुत रदबदल केली. त्यावरुन जे गाव चालतात ते गाव करार केल्याविरीहित उपरांत १४००० हजार लहारी दिल्या आहेत. त्या पैकी ७००० लहारी तुम्हास तेथे पोचती कराव्यात. उद्यां सात हजार लहारी शे दोनशे लोक मसलतीस आणती ( ल ) त्यास पावत्या कराव्या. एकूण १४००० लहारी तुम्हास पावत्या कराव्यात असा निश्चय केला आहे.

शिक्का

---

**क्रमांक : ३७०** दि. २५–१–१७०१

*शिवाजी दुसरे ह्यांचेकडून एसोजी साठम व सूर्याजी साठम ह्याना मौजे आयनल ह्या गाव इनाम दिल्याचे आज्ञापत्र. या साठमानी औरंगजेबाच्या वेढयाच्या वेळी 'किल्ले राखोन मरदमगीची शर्त केली' असे या आज्ञापत्रात म्हटले आहे.*

श्री

नक्कल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २७ विक्रमनाम संवत्सरे पोष्य वद्य त्रयोदशी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस राजा शिव छत्रपती यानी

राजश्री रामजी बळवंत मुख्य देशाधिकारी कारकून प्रांत राजापूर यास आज्ञा केली ऐसीजे. राजश्री एसोजी बिन बावजी साठम व सूर्याजी बिन रामजी साठम पदात पंचचारी (?) यास अवरंगजेब वेढा घालून बसला ते प्रसंगी जमावानिशी उभयतानी किल्ले राखोन मरदमगीची शर्त केली. ते समयी राजश्री परशराम त्र्यंबक यानी मौजे आयनल तर्फ साळसी या गावापैकी पड जमीन लहारी चारशे इनाम करून दिल्या होत्या. त्यास दोन वर्षे चालल्या नाहीत. सांप्रत मशार-निल्हेस किल्हे पनालियास जमावानिशी नामजाद पाठविले आहेत. स्वामीचे शेवशी तिळमात्र अंतर करीत नाहीत. याकरिता यांचे चालविणे स्वामीस अवश्य आहे. यानिमित्य उभयतावरी स्वामीनी कृपाळू होऊन पेशजी इनाम दिला होता तो दुमाला करून ...(वगैरे)

---

**क्रमांक : ३७१** **दि. २६–१–१७०१**

यशवंतराव (एसोजी?) व सूर्याजी साठम हे दोघे पन्हाळ्याच्या वेढ्यांत औरंगजेबाशी लढत होते. त्यांचे इनाम चालत नव्हते. ते चालवावे म्हणून रामचंद्र नीळकंठ अमात्य ह्यानी गणेश महादेव हवालदार तर्फ साळसी ह्यास आज्ञापत्र पाठविले.

श्री

नक्कल

राजमान्य राजश्री गणेश महादेव हवालदार
तर्फ साळसी यास–

रामचंद्र नीळकंठ अमात्य नमस्कार. सुरु सन इहिदे मया व अलफ. यशवंतराव बीन बावजी व सूर्याजी रामजी साठम यानी हुजूर विदीत केले जे आपली इनामतीची ठिकाणे :–

मौजे बांदिवडे या गावात आहेत ठिकाणे दोन मौजे आडवली येथे एक

२ १

येणेप्रमाणे तीन ठिकाणे आहेत. ती हल्ली आपणास चालत नाहीत. तिन्ही ठिकाणे मिळून हल्ली दस्त लाहारी १००)

ठि॥ बांदिवडे दोन ठिकाणे. ठिकाण आडवली लाहरी मिळोन लाहरी

१५ ८५

येणेप्रमाणे शंभर लाहरी चालत आहे. ती तिन्ही ठिकाणे आपणास इनामत देविलीं पाहिजे म्हणोन विदीत केले. त्याजवरून राऊ उभयता हल्ली जमावानिशी किल्ले पनाळीयास अवरंगजेब वेढा घातला आहे त्या जागी नामजाद पाठविले आहे. याजकरिता यास तिन्ही ठिकाणे इनाम देविली आहेत. यास्तव याचे पुत्र पौत्रादि वंश परंपरेने चालवित जाणे. पत्राची तालीक लिहून घेऊन असल भोगवटीयास माारनिल्हे-जवळी परतोन देणे. छ २७ साबान. आज्ञाप्रमाण मोर्तब सुद.

---

**क्रमांक : ३७२** दि. २६-१-१७०१

हे एक टिपण असून ह्यात औरंगजेबाने सातारा, परळी व पन्हाळा ह्या किल्ल्याना घातलेल्या वेढ्यांच्या वेळी यशवंतराव साठम व सूर्याजी साठम ह्यानी जमावानिशी केलेल्या कामगिरीचा निर्देश आहे.

नक्कल

सन इहिदे मया व अलफ छ २७ साबान यशवंतराव बिन बावजीराव व सूर्याजी बिन रामजीराव साठम यास किले सातारा अवरंगजेब वेढा घालून बसला होता ते समयी किल्ले मजकूर यास जमावानिशी नामजाद पाठविले होते. तेथे त्यानी कष्ट मशागत केली.

त्याउपरी परळीस गलिमाने वेढा घातला होता. तेथे मशारनिल्हे आपले जमावानिशी कष्ट मशागत बहुत केली. याजकरिता राजश्री परशरम्म त्र्यंबक यानी नूतन वृत जकाती घाट नारळ येथे गोणीस विश्वा १ हक्क करुन दिल्हा असे. एसेयास सांप्रत किल्ले पनाळा यास अवरंगजेब याच्या फौजा येऊन वेढा घातिला ते समयी जमावानिशी नामजाद पाठविले. ते समयी विनंती केली. साल गुदस्त आपण सदरहू हक्काविसो रदबदल केली तेव्हा गोणीस दिड रुक्का प्रमाणे द्यावा म्हणोन रदबदल केली होती. परशराम प्रतिनिधीनी मान्य करुन सनद दिली होती. परंतु सनद जाहली ते दर गोणीस विश्वा एक १ प्रमाणे जाहली. फिरोन रदबदल करता आपण + + + + + राहिलो. हल्ली स्वामी कृपाळू होऊन करार करावे त्यावरुन दर गोणी रुक्का दीड प्रमाणे नूतन वृत करुन दिल्हा असे. ( वगैरे )

---

**क्रमांक : ३७३** दि. ८-९-१७०१

माणकोजी, हिरोजी, बापूजी व प्रतापजी साठम ह्यानी पन्हाळ्याचे वेढ्यात तलवार गाजविली म्हणून मौजे हरकुळ खुर्द हा गाव त्याना इनाम दिल्याची रामचंद्र पंत ह्यांची आज्ञा आहे म्हणून तर्फ साळशीच्या ठाणेदाराचे मौजे हरकुळ खुर्दच्या मिरासदाराना व गावकऱ्याना पत्र.

नक्कल

अज दिवाण तर्फ साळसी ताहा मिरासी व गांवकरान मौजे हरकुळ खुर्द सुरु सन इसन्ने मय्या व अलफ. हुजुरून राजश्री---- पंत अमात्य याचे आज्ञापत्र सादर जाहले. तेथे आज्ञा की माणकोजी साठम व हिरोजी साटम व बापूजी साटम व प्रतापजी साटम यानी पनाळेयासी मोंगल वेढा घालून बसला होता ते समयी पनाळेयासी जाऊन

तरवारेची शर्त केली. हे देखोन मेहरबान होऊन मौजे हरकुळ खुर्द सलासा मध्ये इनाम करून दिल्हा असे. त्याप्रमाणे पुत्रपौत्रादि चालवीत जाणे. पत्राची तालीक घेऊन असल पत्र भोगवटीयासी परतोन देणे म्हणवून आज्ञा. आज्ञाप्रमाणे मौजे मजकुरी साठम मारनिल्हे याम इनाम करून दिल्हे आहे. तेणेप्रमाणे चालवीत जाणे. ताजे सनदेचा उजर न कर्णे. छ १५ (रबिलाखर)

---

**क्रमांक : ३७४** दि. ११–२–१७०२

गणेश महादेव हवालदार व कारकून तर्फ साळशी ह्यास परशराम त्र्यंबक प्रतिनिधी ह्यांचे पत्र की, माणकोजी, हिरोजी, बापूजी व प्रतापजी साठम ह्यानी विशाळगडच्या वेढयाचे वेळी विशेष कामगिरी बजावली म्हणून त्याना तर्फ मजकुरी गावगना पट्टी पासोडीचा हक्क देण्यात आला असून वाडी सांडवेचे त्यांचे बंद पडलेले इनाम पुनः चालू करण्यात आले आहे.

श्री

नक्कल

श्री आई आ
दि पुरुष प्रसन्न
श्री राजाराम स्वामि
कृपानिधी परशराम
त्र्यंबक प्रतिनिधि

राजमान्य राजश्री गणेश महादेव हवालदार व कारकून तर्फ साळशी वर्तमान (व) भावी + + + + यांसी–

परशराम त्र्यंबक प्रतिनिधी सुरु सन इसन्ने मया अलफ. माणकोजी साठम व हिरोजी साठम व बापूजी साठम व प्रतापजी साठम नाईकवाडी तर्फ मजकूर यानी ह्या राज्यात कष्ट मशागत

बहुतच केली व विशाळगडीचे वेढियाचे प्रसंगी जमावानिशी सामिल जाहले व पुढेही या राज्याशी एकनिष्टपणे वर्तण्याची उमेद करितात. यांचे वतन नाईकीचे तर्फ मजकूरी आहे. त्यास पट्टी पासोडी गावगन्ना चालत नाही व वाडो सांडवे अदिलशाही कारकोर्दीपासून इनाम आहे. ते चालवावयाविसी विनंती हुजुर केलीवरुन हे या राज्याशी बहुत एकनिष्ठ. यांचे वतन बाव चालविणे लागते. याजकरिता पट्टी पासोडी राजश्री तान सावंत भोसले नाईकवाडी तर्फ मजकूर यांस पहिलेपासून चालते त्याप्रमाणे यांसही चालवावयाचे करार केले आहेत. तरी तर्फ मजकुरी यांस पट्टी पासोडी देणे. येणेप्रमाणे यांस इनाम सांडवेवाडी पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने चालवित जाणे. प्रतिवर्षी नूतन पत्राची प्रति घेऊन मुख्य पत्र भोगवटीयासी परतोन देणे. जाणिजे. चंद्र २४ रमजान. निदेश समक्ष. शिक्का रुजु लेखन सीमा[1]

---

**क्रमांक : ३७५** **दि. १३–३–१७०८**

छत्रपती शाहू ह्यांचे खेम सावंत भोसले ह्याना 'स्वामी तुमचे चालावयास अंतर करणार नाहीत' म्हणून पत्र.

श्री

नक्कल

राजश्री खेम सावंत भोसले सरदेसाई प्रांत कुडाळ महालानिहाय गोसावी यासी -

---

१. विशाळगडाला मोगलांनी वेढा घातला त्यावेळी कृष्णाजीराव साठम ह्याने 'कष्ट मेहनत' केल्याबद्दल त्यास मौजे बावसी गाव इनाम दिल्याचे टिपण उपलब्ध आहे.

श्री अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य---- राजश्री राजा शाहू छत्रपती उपरी सांप्रत स्वामी प्रसिद्धगड प्रांती आलियावरी पाठगावचे मुक्कामी तुम्ही आपणाकडील राजश्री विश्राम शेणवी व राजश्री जिवाजी शेणवी स्वामी समीप पाठविले. त्यानी तुम्हाकडील भावभक्ति एकनिष्टतेचे प्रसंग कित्येक विदित केले. आपण या राज्यातील पुरातन वतनदार. या राज्याशी पहिलेपासून एकनिष्टेतेने वर्तणूक करीत आला. प्रस्तुत स्वामी या प्रांतो आले. स्वामीचे पायापासी सर्व प्रकारे एकनिष्ट होऊन वागणूक करावी हा निश्चय केला आहे. तरी स्वामी कृपाळू आपले उर्जित करुन चालविले पाहिजे म्हणोन तुमची विनंती मध्ये स्वामीचे गड किल्ले आहेत त्यास तनखा इस्ताद आहे. तो सालगुदस्ता प्रमाणे किलियाच्या किल्ल्यास ऐवज यावा . ... . .......... करुन दिल्हा आहे. त्यास तुम्ही स्वामीचे पायासी एकनिष्ठेने वर्तणूक करावयास अंतर न करणे. स्वामी तुमचे चालावयास अंतर करणार नाहीत. जाणिजे. छ १ मोहरम. बहुत काय लिहिणे. मोर्तब सुद.

---

**क्रमांक : ३७६**

**दि. ७-१-१७०८**

साठम दप्तरातील हे एक टिपण असून ह्यात हिरोजी, बापूजी व प्रतापजी साठम ह्यांच्या मुलानी गिरजोजी पिसाळ ह्यांच्या बरोबर राहून प्रसिद्धगडाच्या लढाईत मर्दुमकी गाजविल्याचा उल्लेख आहे.

नक्कल

शाहू छत्रपती राज्याभिषेक शेके ३४ सर्वधारी संवत्सरे वैशाख बहुल त्रयोदशीचें पत्र-

हिरोजी साठम बापुजी साठम प्रतापजी यास. तुम्ही आपले पुत्र जमावानिसी गिरजोजी पिसाळाबरोबरी पाठविले. त्यास किले प्रसिद्धगडो चिकेवाडीस मोर्चा लाविला आणि नारूरचा मोर्चा गिरजोजी पिसाळ व तुमचे पुत्राचे स्वाधीन केला. किल्लेकरानीं सरबत्ती करून मोर्चावरी छापा घातला. तेव्हां तुमचे लोकी व पुत्रांनीं शर्त केली. कित्येक जखमी जाहले व सावसान निघाले. किल्लेकरांस धडे करून उधळून लाविलें.

---

**क्रमांक : ३७७** दि. १४–५–१७०८

हिरोजी साठम, बापूजी साठम व प्रतापजी साठम ह्याना रामचंद्र नीळकंठ ह्यांचे पत्र की, रामराव ह्याना खारेपाटण येथे सैन्य देऊन पाठविले आहे. तरी त्याना जमावानिसी मिळून ठाणे मजबूत करण्यास मदत करावी.

श्री

नक्कल

राजश्री हिरोजी साठम व बापूजी साठम व प्रतापजी साठम
गोसावी यांसी–

ॐ अखंडीत लक्ष्मी आळंकृत राजमान्य राजेश्री––––– स्ने।।

रामचंद्र निळकंठ आशिर्वाद. सुरु सन समान मया व अलफ. चिरंजीव राजश्री रामराव विजयदुर्गास रवाना केले. त्याची तुमची भेट जाहली असेल. अशास प्रस्तुत राजश्री खेम सावंत यानी विचार केला आहे कीं स्वारी पाठवून ताम्हाणेयातून तुम्हास धुडावून काढावे. घरे तुमची असतील ती मोडावी. गल्ला दाणा नेवून खारेपाटणी ठाणे घालावे असे वर्तमान आले. सिद सावंत व चांदजीराव अरुळेकर हे जमावानिसी रवानाही केले वर्तमान आले. अशास अशी गोष्ट

जाहलीयाने केवळ तुमचा उच्छेद होतो. याजकरिता चिरंजीव राजश्री बावाजी यास खारेपाटणी ठाणेयाची मजबुती कर्णे म्हणून लिहून पाठविले आहे. तरी तुम्ही जमावानिशी चिरंजीव राजश्री रामराव यास अनुकूल होऊन खारेपाटणचे ठाणे मजबूत करवणे. जाणिजे. छ ४ रविलावल.

---

**क्रमांक : ३७८**

जुलै–ऑगष्ट १७०८

दि. १४–५–१७०८, क्रमांक ३७७ च्या पत्राच्या संदर्भातच प्रस्तुतचे पत्र आहे. गिरजोजी यादव ह्याना लिहिलेल्या ह्या पत्रांत हिरोजी, बापूजी व प्रतापजी साठम ह्यानी खेम सावंताच्या स्वारीचा वृत्तांत दिला असून आणखी सैन्य पाठविण्याची विनंती केली आहे.

नक्कल

श्री

राजश्री गिरजोजी बोवा यादवजी गोसावी यासी अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य----- स्ने।। हिरोजी साठम व बापूजी साठम व प्रतापजी साठम रामराम विनंति. येथील कुशल जाणून स्वकीय कुशळ लिहिण्यास आज्ञा केली पाहिजे. विशेष सावंतांची स्वारी खारेपाटण तर्फेस येऊन कोकिसरे मध्ये कोट बांधितात. त्यासी मुकाबला करावयाकरितां राजश्री रामभाऊ यांसी पत्र पाठविले की जमावानिशी स्वार होऊन पुढां जावयासी आले पाहिजे. परंतु त्यांसी अनुकूळ होऊन आले नाहीत. ताम्हणेवरुन स्वारी येईल म्हणून आवाई चोहोकडून आली होती. याकरितां आम्ही आपले जमावानिशी ताम्हणेमध्ये माणसांविशी जागा धरून त्यासी बर मुकाबला एक वेळ करावा म्हणून राहिलो होतो. परंतु त्याणी ताम्हणेचा मार्ग टाकून विल्हे मार्गे गेले. कोकिसरेस सावंताचा जमाव राहील. त्याकरितां ताम्हणे त्यांच्या आवाराखाली पडेल. यास्तव आमचे कडील सहवर्तमान ताम्हणेस

टिकाव धरून बसवत नाही. या करिता कबिले घेऊन विजयदुर्गेच्या नावेस आलो. आम्हास आणखी जमावाची उपराक मदत असती तरी आम्ही त्यासी मारून काढिला असता. परंतु आम्हाशी कोणीही-कडून उपराक नाही. या उपरी तरी गोसावी यानी राजश्री स्वामीस विनंती करून चारशे स्वार खाली उतरावे. इसमांचा जमाव खाली पाहिजे. तो मिळेल इतकी गोष्ट जाहली तरी आम्ही त्यासी मारून काढितो. त्यांचा हिशेब धरित नाही. आम्हांबरोबरचे इसम साळशीमध्ये होते ते सावंतास सामिल झाले. सावंतांचे बरोबर आम्ही मात्र एक राहिलो ते स्वामीच्या पायाशी एकनिष्टता धरून राहिलो आहो. दुसरा विचार आम्हापाशी नाही. आमचे खासा कबिले व जमावाचे कबिले दोन हजार जीव ऐन प्रजन्यकाळी जागा टाकून दर्यापाशी राहिलो. परंतु यासी दाणा नाही. तेव्हा जमाव कसा टिकतो. याकरिता गोसावी यानी राजश्री स्वामीचे शेवेसी विनंती करून खाण्या खर्चाची बेगमी करून घेतली पाहिजे. सर्व वर्तमान राजश्री स्वामीस विनंती पत्र लिहिलेवरून विदित होईल. सर्व प्रकारे आमचे पालन वडिलपणे गोसावी यानी केले पाहिजे. आपण विरहित कोणाचा भरवंसा नाही. बहुत काय लिहिणे. कृपा + + + +

---

**क्रमांक : ३७९** दि. १८–९–१७०८

तुम्हास मौजे बांदिवडे बुजुर्ग व बिडवाडी हे गाव इनाम दिले असून आणखी सरंजाम देण्याचा निश्चय केला आहे. तरी आपल्या मुलांस जमावानिशी पाठवून द्यावे म्हणून छत्रपती शाहू ह्यांचे हिरोजी, बापूजी व प्रतापजी साठम ह्याना आज्ञापत्र.

श्री

नक्कल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारी संवत्सरे आश्विन शुद्ध पौर्णिमा मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यानी राजेश्री हिरोजी नाईक व बापूजी नाईक व प्रतापजी नाईक साठम यांसी आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही राजश्री नारो विठ्ठल याबराबरी आपला आशय कित्येक सांगोन पाठविला तो त्यानी विदीत केला व तुलाजी साठम यास पाठवून दिले तेही स्वामी समीप आले. दर्शन घेतले. निष्टेचें वृत्त सांगितले. अशास तुम्ही वतनदार सेवक एकनिष्ट अहा. तुम्हांपासून स्वामीचे पायापासी निष्टेने वर्तायासी अंतर पडेल असे नाही. व स्वामीसही तुमचे उर्जीत करून चालविणे हें अगत्य आहे. तुमचा सरंजाम पेशजी स्वामीनी करून दिला आहे तो करार केला आहे. हल्ली तुम्हावरी कृपाळु होऊन मौजे बांदिवडे बुजुर्ग व बिडवाडी हे गांव इनाम दिल्हे आहेत. तुम्ही आपला जमाव व पुत्र स्वामी समीप पाठवून देणे. वर घाटी तारळे कोल्हापूर प्रांती दोनशे इसमाचा सरंजाम करून द्यावयाचा निश्चय केला आहे. जमाव व पुत्र स्वामीचे दर्शनास आलियावरी सरंजाम देतील. सर्व प्रकारे चालवितील एविसी समाधान असो देणे. जाणिजे. लेखनालंकार.

श्री
शाहू छत्रपती

मोर्तब
सुद.

---

**क्रमांक : ३८०**

**इ. स. १७०८**

हिरोजी व बापूजी साठम ह्याना खंडो बल्लाळ ह्यांचे पत्र की तुम्हास छत्रपती सरंजाम करून देतील. त्यांत ते पुढें लिहीतात, ' यजमानांचे (शाहू) चित्तात आहे की तुम्हा लोकांचे संग्रह करून सेवा घ्यावी '.

श्री

नक्कल

राजश्री हिरोजी साठम व बापूजी साठम गोसावी यासी--

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य----- स्ने॥ खंडो बल्लाळ

राम राम. उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे. विशेष तुम्ही पत्र पाठविले पाहून सविस्तर वर्तमान कळों आले. राजश्री स्वामीस विनंती पत्र पावले. तेथे कित्येक आपले वर्तमान लिहिले. एकनिष्ट पहिलेपासून आहो. सांप्रत स्वामींचे पायापाशी राहून निष्ठेने सेवा करावी म्हणून हेत धरिला आहे. यापेक्षा अधिकोत्तर काय. तुमचे विनंति पत्रही राजश्रीस निवेदन केले. आम्ही सांगणे ते सांगून विनंती केली. त्यावरुन यजमानांचे चित्तात आहे की तुम्हा लोकांचे संग्रह करून सेवा ध्यावी असे आहे. एविषयी स्वामीनी लिहिले आहे. तरी तुम्ही कोणेविशी अनुमान न करिता त्रिवर्गास सरंजाम करून देवविला जाईल. आही येथे असता तुहास कोणे गोष्टीची फिकीर आहे असे नाही. त्रिवर्गास शिक्का पोत्या जमावानिशी लवकर पाठविणे. बहुत काय लिहिणे. कृपा असू दीजे. हे विनंती.

मोर्तब
सूद

# सूची

## ( आकडे पृष्ठांचे आहेत )

### अ

### ख

### फ

## व

ह

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| 10 | 4 | Girgoji | Girjoji |
| 13 | 9 | occassion | occasion |
| 19 | 18 | hehalf | behalf |
| 23 | 4 | of of | of |
| 34 | 14 | Pratindhi | Pratinidhi |
| 38 | 5 | gtant | grant |
| 43 | 13 | vegitable | vegetable |
| 54 | 14 | uuder | under |
| 55 | 13 | complaints | complains |
| 58 | 21 | Vicroy | Viceroy |
| 72 | 9 | prestiege | prestige |
| १५ | २३ | बिप्र | विप्र |
| १५ | २४ | दिश्वनाथ | विश्वनाथ |
| २० | २० | आज्ञे | आज्ञे |
| ४२ | १ | धारोजी | दिपाजी |
| ४८ | ९ | तलडीड | तलवीड |
| ५५ | ७ | अमती | असती |
| ६२ | २ | हिहून | लिहून |
| ६८ | ११ | तासगाव | तारगाव |
| ७६ | ६ | पाठबिले | पाठविले |
| ८३ | ११ | सुभा | सु॥ |
| ८३ | १३ | कळकिले | कळविले |
| ९३ | १३ | खेड्याबर | खेड्यावर |
| ११५ | २ | भरुन | करून |
| १२९ | ५ | वाहे | आहे |
| १३३ | ४ | हर्लबिली | हलविली |
| १३८ | ७ | लिहिल्या | लिहिलेल्या |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १६५ | २२ | शिवाजो | शिवाजी |
| १६६ | २८ | देशील | [illegible]खील |
| २१२ | १७ | व्हाइसरॉयने | [illegible]इसरॉयला |
| २१३ | ८ | जापण | आप[illegible] |
| २१५ | ७ | बादशहाला | व्हाइसरॉयला |
| २२४ | १८ | कुदुबुद्दीन | कुतुबुद्दीन |
| २२८ | ११ | ह्याना | ह्यानी |
| २६३ | १ | गावास | गावास |
| २६३ | २१ | आपपक | आवपक |
| २८१ | १२ | शिवाजी दुसरे | शाहू |
| ३११ | १ | सियापूर | सिवापूर |
| ३२४ | ८ | मीकदमी | मोकदमी |
| ३२५ | २ | षोळाची | पोळाची |
| ३६८ | २ | राजाराम महाराजांच्या | शिवाजी दुसरेंच्या |
| ४०२ | ३ | जत्तरेकडील | उत्तरेकडील |
| ४०४ | १ | पिराजी | विठाजी |
| ४५० | ३ | राजाला | राज्याला |
| ४५५ | १३ | तुम्हापरी | तुम्हावरी |
| ४७५ | २ | ८ ता | ता |
| ५०० | ५ | सोडण्याची | सोडण्याचा |
| ५०८ | २१ | सातर्डे | सावर्डे |
| ५२० | १० | स्वारीच्य, | स्वारीच्या |

शिवाजी विद्यापीठ ऐतिहासिक ग्रंथमाला : पुष्प दुसरे

# ताराबाईकालीन कागदपत्रे
## खंड दुसरा

संपादक
डॉ. आप्पासाहेब पवार

- **ताराबाईकालीन कागदपत्रे : खंड दुसरा**
- **प्रथमावृत्ती : १९७०**
- **पुनर्मुद्रण : २०१२**





- **प्रकाशक :**
  कुलसचिव,
  शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
  फोन : ०२३१-२६०९०६३

- मूल्य : रु.२३५/-

- **मुद्रक :**
  अधीक्षक,
  शिवाजी विद्यापीठ मुद्रणालय, कोल्हापूर
  फोन : ०२३१-२६०९२८६

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

शिवाजी विद्यापीठाच्या ऐतिहासिक ग्रंथमालेतून प्रकाशित होणाऱ्या ताराबाई कालीन कागदपत्रे या साधनग्रंथाचा हा द्वितीय खंड आहे. या मालेतून प्रसिद्ध केले जात असलेले कागद कोणत्या प्रकारचे आहेत आणि ते कुठेकुठे उपलब्ध झाले त्याची हकीकत प्रथम खंडाच्या प्रस्तावनेत दिलेली आहे. तिची द्विरुक्ती करण्याची आवश्यकता नाही. आता प्रसिद्ध होत असलेल्या काही महत्वाच्या कागदाबाबत येथे थोडे लिहिले तर चुकणार नाही.

या खंडातील सर्वात महत्वाचा कागद म्हणजे रामचंद्रपंत अमात्य याच्या मिळकतीचे विभागणी पत्र हा होय (क्र. १९). रामचंद्रपंताच्या मृत्युनंतर त्याच्या एकंदर मिळकतीची विभागणी त्याचे पुत्र भगवंतराव, आप्पाजीराव आणि शिवराम या तिघामध्ये झाली. आतापर्यन्त उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक कागदपत्रांतून ही माहिती मिळालेली नव्हती. हे विभागणीपत्र प्रथमच प्रसिद्ध होत आहे. आणि त्याने एका महत्वाच्या प्रश्नाची सोडवणूक करण्याला मदत होत आहे. तो म्हणजे रामचंद्रपंत अमात्याची मृत्युतिथि हा होय. सरदेसाई म्हणतात की, सन १७३० व १७३३ च्या दरम्यान रामचंद्रपंत मृत्यु पावला (मराठी रियासत, ४ स्थिरबुद्धि राजाराम पृ. १५७, तळटीप). हे विधान त्यानी राजवाडे खंड ८ ले. १५२ मधील भगवंतराव अमात्य याने संभाजी आंगरे याना कळविलेल्या हकीकतीवरून केले आहे. भगवंतराव म्हणतो, 'तीर्थरुप (म्ह. रामचंद्रपंत) श्री कुणकेश्वरी बहुत काल राहिले होते. त्यांचा प्रतिपाल राजश्री कैलासवासी सरखेल (म्ह. कान्होजी आंगरे) यानी करून नियत करून दिल्हा होता. त्याप्रमाणे किंबहुना तदाधिक्य तुम्ही अंतर केले नाही. प्रस्तुत तीर्थरुपास वैकुंठवास जाहला.' या हकीकतीचा अर्थ कान्होजी नंतरहि रामचंद्रपंत हयात होते आणि त्यांचा 'प्रतिपाल' आंगरे घराण्यानी केला हे गृहित धरून सरदेसाई लिहितात, 'कान्होजी आंगरे ता. २०–६–१७२९ रोजी वारला. पश्चात् सेखोजीस सरखेली मिळाली. सेखोजी ता. २८–८–१७३३ रोजी मरण पावला आणि संभाजी सरखेल झाला. तो ता. १२–१–१७४२ रोजी मरण पावला.' यावरून म्हणता येते की, कान्होजीच्या पश्चात् व सेखोजीच्या मृत्युपूर्वी संभाजी आरमाराच्या सरसुभेदारीवर असता म्हणजे सन १७३० व १७३३ च्या दरम्यान रामचंद्रपंत मृत्यु पावला. सदर पत्रांत संभाजीचा जो शिक्का दिला आहे त्यावरून संभाजी त्यावेळी पूर्णाधिकारीच होता असे दिसते. म्हणूनच 'सेखोजीच्या मृत्युपूर्वी' चे हे पत्र का मानले गेले कळत नाही. आणि ते काहाही असले तरी आता प्रसिद्ध होत असलेल्या विभाजन पत्रावरून रामचंद्रपंत इतकी वर्षे जगला नाही हे स्पष्टच होते. पंताच्या मृत्युनंतर झालेल्या या वाटणीपत्रांची

ता. २५ मे १७२३ ही आहे. रामचंद्रपंताच्या मृत्युतिथिचा हा मुद्दा महत्वाचा असल्यामुळे त्याची आणखी थोडी चर्चा केली तर चुकणार नाही. करवीर दरबारच्या दप्तरखान्यात कृष्णाजीराऊ भगवंत याचे ता. १५ मार्च १७५२ चे आज्ञापत्र आहे. त्यात रामचंद्रपंताच्या मृत्युनंतर लक्ष्मण भट ठकार या ब्राह्मणाला सन सवा अशरीन (मया अलफ) म्हणजे इ. स. १७२६–२७ त भूमिदान केल्याचा उल्लेख आहे. यावरून पंताच्या मृत्युनंतर काही वर्षांनी भूमिदान झालेले दिसते. पंत 'श्री कुणकेश्वरी' राहिलेल्याचा जो उल्लेख आहे तोहि मानण्यास हरकत नाही. वृद्धापकाळी पंत कुणकेश्वरी राहिले असावेत. राजवाडे खंड ३ ले. २४० चे पत्र ता. ९ ऑक्टोबर १७१५ चे आहे. त्यात 'रामचंद्रपंत नीळकंठ हुकमतपन्हा' असे म्हटले आहे. अमात्याची राजनीति म्हणून मानलेल्या कागदाची तारीख १९ डिसेंबर १७१५ ही आहे. मावळंकर सरदेसाई घराण्याचा इतिहास भाग १ मधील ले.१२५ वरून दिसते की ता. १ मार्च १७१६ रोजी भगवंतराव 'अमात्य हुकमतपन्हा' होता. विभागणीपत्राची ता. २५ मे १७२३ ही आहे. पंताच्या मृत्युनंतर काही वर्षांनी विभागणी झाली असावी. आज उपलब्ध असलेल्या कागदवरून पंताची मृत्युतिथि निश्चित सांगता येत नाही. इंडियन हिस्ट्री काँग्रेसच्या चवथ्या अधिवेशनासाठी A Note on the date of Ramachandra Pant Amatya's death हा लेख मी लिहिला होता. त्यात मी म्हटले होते की, पंताचा मृत्यु इ. स. १७१५ च्या अखेर अथवा १७१६ च्या प्रारंभी झाला असावा. याबाबत निश्चित स्वरुपाचे विधान करता येईल असा पुरावा अद्यापि उपलब्ध नाही. हा मृत्यु कोठे झाला हेही कळत नाही. पण श्री कुणकेश्वरी झाला असल्यास पंताचे वृंदावन पराशर पर्वतावर ( पन्हाळ्यावर ) आहे असे गिरिधरानी समर्थ प्रतापात म्हटले आहे. गिरिधर म्हणतो :

> रामचंद्र नीलकंठ शिवराज अमात्य,
> अतिशय उत्सव करी नित्यनैमित्य,
> ज्याची वृंदावने लोक नित्य
> पराशर पर्वती पूजिताती. –११·५–

गिरिधर ता. २५ एप्रिल १७२९ रोजी मृत्यु पावला. म्हणजे १७२९ च्या आधी काही वर्षे पंताचे वृंदावन बांधले गेले होते असे वरील वर्णनावरून वाटते.

विभागणी पत्रात रामचंद्र पंताच्या मिळकतीचे जे वर्णन आलेले आहे ते अतिशय महत्वाचे आहे. रामचंद्रपंतासारख्या उच्च पदस्थ अधिकाऱ्यांची त्याकाळी मिळकत काय असे याचा अंदाज या वर्णनावरून चांगला करता येतो. या मिळकतीचे वर्णन 'श्रीदेवा' पासून सुरू होते. त्यात 'रघुनाथपंचायतन मुर्ती

सोन्याच्या अलंकारसहीत मुर्ती सुमार अकरा' अशी सुरुवात आहे. देवांच्या अलंकारांचे वर्णन आहे. नवग्रहांचे यंत्र, हणमंताचे यंत्र, शनेश्वराचे यंत्र, 'गोप सुवर्ण' इत्यादि नमूद आहेत. देवांच्या या वर्णनात 'मालवणी पंच्यायतन ताईचे व वडिली ठेविले होते ते घेऊन आले' असे म्हटले आहे. तदनंतर 'पुस्तके वडिलांचे वेळेची' सांगितली आहेत. आणि ती सांगत असताना 'खासा वडिलांची व मातुश्रीची पुस्तके' असा उल्लेख आहे. थोर घराण्यातील स्त्रिया वाचू शकणाऱ्या होत्या असे दिसते. सोने, रुपे, जवाहीर, मोती इत्यादि वेगवेगळ्या अलंकारांची नोंद 'याखेरीज वस्तभाव जवाहीर नगद कापड जडित वस्तभाव हत्यारे गला वाटणीस रुजु न करिता परभारे ठेविले. त्याची तक्षिम येणे' असेहि म्हटले आहे. '२६ बैल व ४५ म्हैसी व गाई अशी ७१ खिलारी गुरे होती.' 'कैलासवासी पंत मृत्यु पावले त्यावेळेस जामदारखानियात शिलक' म्हणून वर्णन दिले आहे त्यात 'नक्द होन नाणे' या सदराखाली नाण्यांची नावे दिली आहेत. 'सितारामी, निशाणी, मूर्तीचे, शिवराई, सणगरी' याशिवाय 'चिटी नाणे' या सदराखाली 'मोहर, पुतळ्या, गबार, सतळ्या, इभराळ्या, फलक' अशी नोंद आहे. 'खासा पोषाख राजश्री पंतांचा व मातुश्रीकडील वासने' जी वर्णिली आहेत, त्यात 'मंदले तिवटे, चादरा, आष्ट गोली, सेले, भिरमे उंच, ताडपत्री, पैठणी पासोडी, इजारा, झगे, धोत्र जोडे, चिलखते, टोप' ही पंताची आणि 'पाटाऊ, पातळे जरी, सांड्या, लुगडी, चोळ्या जरी, कळस पाक, शालु व ताडपत्री' ही मातोश्रींची सनगे दिली आहेत. त्यानंतर वेगवेगळ्या तरवारी, पटे, गुदे, कठयार, जमदाडे वगैरे हत्यारांची नोंद आहे. त्यात ३ खंजीर, २ विचवे, 'वाघनकी' आणि 'बंदुख' हि आहे. १८ सुऱ्या पैकी ५ रुप्याच्या मुठीच्या व ३ काचेच्या मुठीच्या आणि ७ सिंगाच्या मुठीच्या होत्या. ६ 'नाहावियाचे दागिने' होते–४ नाचकर्णा, १ कात्रो, १ चिमटा. तीन ढाली होत्या. त्यांकी एक गेंड्याच्या कातड्याची. फरासखान्यात 'जरी छाभिना मखमाली' होता. पडदे, जाजखाने होते. इनामगाव व वतनांचे उल्लेख आहे त्यात 'अजरेचे देश कुलकर्ण' नमूद आहे. भुदरगड आणि गगनगड येथील कोठारात शिल्लक असलेल्या धान्याची नोंद आहे त्यात भात, नागली, सावे, वरी, उडीद, हरभरे, वाटाणे, तीळ, चवाळ्या, तुर, मसूरा, मोहरी, पात्टे, सातु, इत्यादि धान्यांची नावे आहेत. ऐवजाचे वर्णन करून झाल्यावर 'रायगडचा रायगडी, माहाडचे माहाडी, चिपळूणचे चिपळुणी ऐवज आहे' असेहि म्हटले आहे. पुढे खालील प्रमाणे नोंद आहे 'वाटणी समई माहाराज राजश्री छत्रपति स्वामीस नजर केली मोत्याची जोडी थोर जवाहिर सोने रूपे.' ले. ३१ त दिलेला कागद या वाटणी पत्राचाच एक भाग दिसतो. दुर्दैवाने तो अपुऱ्या स्थितीतच सापडला. म्हणून त्यापासून फारसा बोध

होत नाही. अशा रीतीने तात्कालिन, सामाजिक व आर्थिक परिस्थितीवर प्रकाश झोत टाकणारा बहुमोल असा हा ऐतिहासिक कागद आहे. संशोधक याचा अधिक अभ्यास करतीलच.

क्र. ३ च्या कागदात मालवण येथील सिंधुदुर्गाच्या स्थापनेचा इतिहास दिला आहे. '१४ जमादिलावल सन खमस सितैन (व अलफ) मार्गसीर्ष बहुल २ ते दिवसी किला बांधावयास मुहूर्त करून चिरा भूमीमध्ये बैसविला आणि सिंधुदुर्ग यैस नाव ठेविले' असे म्हटले आहे. जंत्रीप्रमाणे १४ जमादिलावलला २३ नोव्हेंबर' १६६४ ही तारीख पडते आणि मार्गशीर्ष बहुल २ ला २५ नोव्हेंबर १६६४ ही तारीख येते. सरदेसाई यानी २५ नोव्हेंबर ही तारीख स्वीकारलेली आहे (शककर्ता शिवाजी पा. ९९) बिदनुरावर स्वारी करण्यासाठी शिवाजी मालवणास आला तेव्हा त्या जागेची निश्चिती त्याने केली. हे सांगताना करीन्यात म्हटले आहे, 'राजश्री स्वामी (शिवाजी) बिदरूप्रांति मोहीम करावया निमित्य आरमारच्या जमावानसी मौजे मजकूर (म्ह. मालवण) येथे आले. या उपर दर्यामध्ये बेट नजिक दृष्टीस पडिले. तेव्हा या बेटीचे नाव काय म्हणून पुसिले. त्यावरी कृष्णा सावंत देसाई व भानजी प्रभू देसाई प्रांत मजकूर याणे सांगितले की या बेटाचे नाव कुरटे यैसे सांगितले. त्यावरी राजश्री स्वामी बेटावरी येऊन जागा पाहिला ते स्थळ उत्तम विस्तीर्ण आटोपसारखे देखिला. त्या उपर राजश्री स्वामीनी आज्ञा केली की या जागा बिलंद किला बांधोन वसवावा म्हणऊन आज्ञा करून किला बांधावयास हुकूम केला आणि आरमारचे जमावानिसि राजश्री स्वामीनी बसनुरावरी मोहीम केली.' या मोहिमेची तारीख श्री. शं. ना. जोशी यानी तयार केलेल्या शिवकालीन शकावलीत दिली आहे ती अशी : 'इ. १६६५ फेब्रु. ८ बसनूरच्या स्वारीसाठी शिवाजी राजे मालवण बंदरातून जहाजातून निघाले' (शिवकालीन पत्र सारसंग्रह खं. ३ पृ. १८६) संभाजीच्या काळात परिस्थिति किती कठीण झाली याचे वर्णन करताना करीन्यात म्हटले आहे. 'शामल तांब्र भारी फौजेनिसी प्रांत मजकूरी आला. त्यामुळे संपूर्ण प्रांत उध्वस जाहला. कुडाळ प्रांती संपूर्ण धामधुमी जाहली. त्या उपरांतिक खेम सावंत सरदेसाई प्रांत मजकूर याणी महाराज राजश्री स्वामीच्या राज्याची निष्ठा सोडून तांब्राचा अवलंब धरिला... मौजे मजकूरचे देव श्री नारायण व रामेश्वर येथे गोवध करून देवस्थान भ्रष्ट केली.' पुढे राजारामाच्या कारकीर्दीची माहिती सांगताना म्हटले आहे की, 'उपरांतिक सुभिक्ष प्रसंग होत चालला. महाराज राजश्री राजाराम चंदी प्रांती असता राजश्री रामचंद्र पंडित अमात्य विशाळगडी राहून संपूर्ण तांब्र कोकणप्रति प्रवेश केला होता त्यास दहशत लाऊन निशेष घालविला.'

या खंडातहि श्री महालक्ष्मीच्या देवस्थानासंबंधी काही कागद छापले आहेत. धामधुमीच्या काळात देवीची मूर्ती पूजाऱ्याच्या घरी ठेविली होती तिची ता. २७ सप्टेंबर १७१५ रोजी पुनर्स्थापना करण्यात आली (ले. २१). ही हकीकत संभाजीने नरहरिभटास दिलेल्या ता. ८ नोव्हेंबर १७२३ च्या सनदेत दिली आहे ती अशी ' तुम्ही स्वामी संनीध किले पनाळाचे मुकामी विदित केले की श्री– वास्तव्य करवीर हे अनादि क्षेत्र. त्यास आवांतराचे योगास्तव बहुत दिवस पूर्वील देवालय सोडून पूजारी याचे घरी होती. त्यास पूर्वी राज्य विजापूर आदील करून स्वस्त होते. थोर थोर नामांकित ग्रहस्त होते. परंतु पूर्वस्थली श्री ची स्थापना कोणी केली नाही. सांप्रतकाली देश उध्वस राज्य स्वस्त नसता श्री ने आपणास साक्षात्कारे प्रेरणा करून आपले स्थली बैसावे हे इच्छा जाली. हे वृत स्वामीस पूर्वी आपण विदित केले. त्यावरून स्वामींनी राजश्री सिदोजी हिंदुराव घोरपडे ममलकतमदार यास श्री चे स्थापने विषयी आज्ञा केली. त्यावरून राव मानिले करविरास येऊन मन्मथ नाम संवछरी आश्वीन शुध विजया दशमी इंदुवासरी (२७ सप्टेंबर १७१५) श्री ची स्थापना पूर्वस्थली देवालयात सुमुहुर्त केली.' देवी संबंधाने सनदेत संभाजीने म्हटले आहे की, 'श्री म्हणजे अनादि स्थल पुराण प्रसिद्ध जागृत. येक काशी क्षेत्र की करवीर. यापेक्षा दुसरे स्थल विशेष आहे यैसे नाही.'

ले. ९५ मध्ये महालक्ष्मीच्या पूजाअर्चेबद्दल पुजाऱ्यात झालेल्या तंट्याचा निवाडा पैठणच्या ब्रम्हसभेने जो केला तो दिला आहे. त्या काळात सुद्धा गोष्टी कशा घडून येत याचा मासला या निर्णयपत्रात पहावयास मिळतो. त्यात म्हटले आहे की, ' शामभटी हवालदारास पैका देऊन खोटा कागद करून घेतला. माणसे लाऊन बळेच ब्राम्हणाच्या साक्षी घेतल्या ' (पृ. १२०). निवाडपत्रावरील साक्षी पाहिल्या असता त्या वेळच्या तेथील सर्व प्रतिष्ठित ब्राम्हणांच्या साक्षी या कागदावर आहेत असे वाटते. या साक्षीदारांच्या नावात ' कुमारी अनंत ' असेहि एक नाव आहे.

क्र. ११८ त ' पैठणच्या निवाड्याप्रमाणे राजाज्ञा होऊन बाबा भट आणि गोपाळ भट यानी दोन आठवडे व शामभट याने एक आठवडा पूजा करावी असे ठरवून दिल्हे. तदनुरूप तुम्ही श्रीची पूजा करीत असता मध्ये पूजा सांग चालत नव्हती म्हणून विदित जाले. त्यावरून तुमचे दोन आठवडे अमानत केले होते. प्रस्तुत श्री ची पूजा सांग करून उंच वस्त्र भूषण येईल ते श्रीस योग्य करू म्हणून तुम्ही विनंती केली त्यावरून स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन तुमचे दोन आठवडे पूजा वृती तुमचे दुमाला केली असे ' असे संभाजीने बाबाभट आणि गोपाळ भट याना दिलेल्या ता. २२ आक्टोबर १७३३ च्या सनदेत म्हटले आहे.

क्र. ११३ त एक लक्षणीय माहिती मिळते, ती अशी : 'शास्त्र संपन्न राजश्री सदाशिव भट उपाध्ये उपनाम मिराहुसेन मिरजुमले क. म. ( कसबा मजकूर म्हणजे कोल्हापूर ) याची जागा घेऊन त्यास दिल्हा. या वरून त्यावेळी तरी हिंदुमुसलमानांची वसती अगदी अलग अलग नसावी असे दिसते.

' या खंडात काही महजर (निवाडपत्रे) दिली आहेत. ( क्र. १०७, १५८, १५९ आणि ७८ ) यातील पहिले तीन कोल्हापूरातील व चौथा कागल येथील आहे. महजरातून उपलब्ध होणारी माहिती एका वेगळया प्रकारची असते. बहुदा वतनाबाबतची हकीकत यात येते आणि वतन संपादताना घडलेल्या ऐतिहासीक गोष्टी अनुषंगाने म्हणून सांगण्यात येतात. म्हणून प्रत्यक्ष वतनाची गोष्ट खरी खोटी असली तरी, ऐतिहासिक वर्णनाचा उपयोग होऊ शकतोच. याशिवाय अन्य एक फार मोठा उपयोग या महजरांचा होतो. महजरासाठी जमविलेल्या राज लोकांच्या व गोतगंगेच्या साक्षी या महजरावर असतात त्या साक्षीदारांच्या नावांचा अभ्यास इतिहासाला उपयोगी पडणारा असतो. आपणासमोर असलेल्या कागदांचीच गोष्ट घ्या ना. ताराबाई कालीन कागदपत्र खंड १ आणि आता दुसऱ्या खंडात प्रसिद्ध होत असलेल्या महजरांवर ज्यांच्या साक्षी आहेत त्यातील काही नावे किती महत्वाची आहेत हे स्पष्ट करून सांगितल्याशिवाय लक्षात येणार नाही. 'दिल्ली झाली दीनवाणी, दिल्लीशाचे गेले पाणी, ताराबाई रामराणी, भद्रकाली कोपली' असे जिचे वर्णन खंड १ ( क्र. २ ) मध्ये आले आहे त्या महाशूर महाप्रतापी ताराबाईवर पुढे संकट ओढवले आणि तिला पदच्युत करण्यात आले. यासाठी एक मोठा कट रचला गेला असे दिसते. याबाबत ताराबाईच म्हणते : 'कालपरत्वे आमचा प्रसंग विस्कळित होऊन चिरंजीव राजश्री संभाजी राजे व राजसबाई याणी गिरजोजी यादव व अंताजी त्रिमल व लोक खासकेल गडकरी व तुळाजी सितोळे यासी पुढे करून किले पनाळा येथे चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांसि राज्यपदास बैसविले, आम्हास संकटी घातले.' ( राजवाडे ख. ८ पृ. १६९). या हकीकतीवरून असे दिसते की, ताराबाई आणि धाकटा शिवाजी याना दूर करून राजसबाई आणि संभाजी याना अधिकारारूढ करण्यात गिरजोजी यादव, अंताजी त्रिमल आणि तुळाजी सितोळे हे मानकरी होते. मराठेशाहीच्या इतिहासात रक्तहीन राजकीय क्रांति घडली ती एकच, आणि ती म्हणजे वर वर्णन केलेली, इ. स. १७१४ त घडलेली राजक्रांति होय. तिची अधिक माहिती उपलब्ध झाल्याशिवाय पुरी कल्पना येणार नाही. या क्रांतीचे सूत्रधार गिरजोजी यादव, अंताजी त्रिमल आणि तुळाजी शितोळे यांच्याबद्दलचीहि माहितो मिळवावी लागेल. सुदैवेकरून खंड १ मध्ये आणि आता खंड २ मध्ये गिरजोजी यादवाबद्दल

पुष्कळच कागदपत्र लाभले आहेत. त्यांचा अभ्यास करता येईल. उरलेल्या दोघांचाहि उल्लेख या खंडातील महजरातून येतो तेवढाच येथे स्पष्ट करावयाचा आहे.

खंड १ मधील क्र. ३२२ ( ता. ५ आक्टोबर १७१६ ) चा एक अत्यंत महत्वाचा महजर आहे. तो पन्हाळा मुक्कामी झाला. मजलसीस कोणकोण होते त्यांची नावे दिली आहेत. अनेक ठिकाणचे लोक हजर होते असे दिसते. राजकीय लोकांची म्हणून जी नावे दिली आहेत त्यात तुळाजी सितोळेचे नाव आहे तुळाजीचे वर्णन करताना म्हटले आहे– 'तुळाजी सितोळे, विश्वासराऊ नामजाद किले मजकूर (म्हणजे पनाला)' त्याचा शिक्का खालील प्रमाणे आहे :–

राजाराम च र<br>
णी तत्पर रामशिं<br>
गसुत तुळाजीसि<br>
तोळे निरंतर

म्हणजे हा तुळाजी राजारामाच्या काळापासून वरच्या हुद्यावर चढलेला होता आणि त्याला 'विश्वास राऊ' हा किताबहि दिला गेला होता' हे स्पष्ट आहे. तुळाजीचा बाप रामशिंग आणि खुद्द तुळाजी यांच्या कार्याची माहिती मिळाल्याशिवाय तुळाजी येवढया पदास कसा पोचला हे सांगता येणार नाही. १७१४ त ताराबाईला 'संकटी' घालणारा तुळाजी सितोळे १७२६ त पन्हाळयाचा प्रमुख अधिकारी होता. राजक्रांतीनंतर ताराबाई आणि धाकटा शिवाजी याना पन्हाळयावर ठेवण्यात आले. यास्तव तेथील देखरेखीसाठी तुळाजीला पन्हाळयालाच 'नामजाद' केले असे दिसते.

कटातील तिसरी प्रमुख व्यक्ति अंताजी त्रिमल. याच्या नावाचा उल्लेख आता प्रसिद्ध होत असलेल्या क्र. १०७, १५८ व १५९ मध्ये आढळतो. क्र. १०७ चा कागद इ. स. १७३२ चा आहे. त्यात अंताजीचे वर्णन 'अंताजी त्रिमल सरदेशपांडे क. हवेली प्रा. कोल्हापूर दि. देसकानी क. हवेली प. मजकूर' असे आहे. क्र. १५८ व १५९ हे कागद १७३६ चे आहेत. त्या कागदात त्याचे वर्णन 'सरदेस-कुलकर्णी क. हवेली ( म्ह. कोल्हापूर )' असे आहे. म्हणजे सरदेशपांडेपण आणि सरदेसकुलकर्णी हे दोन्ही अधिकार अंताजी त्रिमलकडे होते असे दिसते. स. १७१४ त तो एक बडा अधिकारी असणार यात शंका नाही.

क्र. १०७ च्या महजरमध्ये आलेली इतर नावेहि महत्वाची आहेत. कोट कोल्हापूर येथे १७३२ त जे 'राजकी लोक' होते त्यात कोंडाजी भोसले सुभेदार,

मुरारजी मोहिते सरनोवत. गुंडो वेंकाजी सबनिस, तिमाजी सखो कारखानिस, कृष्णाजी नरसिंह फडणीस नि. सबनिसी, कृष्णाजी अनंत फडणीस नि. कारखानिसी, माणकोजी जाधव सरनाईक, गोपाल माणकेश्वर हवालदार, इत्यादि लोक होते. शहराचा सरहवालदार म्हणून खान अजम बहादुरखान होता. त्याच शिक्का खालील प्रमाणे होता :—

श्री शंभुछत्र
पति चरणी सादर
बहादुर खान को
तवाल निरंतर

क्र. १५८ व १५९ या स. १७३६ च्या कागदात काही अन्यहि नावे आली आहेत. त्यात 'येसवंतराऊ वलद खंडेराऊ दाभाडे देसाई हवेली प.मजकूर' (म्ह. कोल्हापूर) असे नाव आहे. याशिवाय वेंकोजी येलगिरी सराफ, खंडो भिकाजी सभासद, कोंडाजीचा मुलगा मल्हारराव भोसले हवालदार, केदारजी यादव सरनोवत, इत्यादि नावे आहेत. या अशा नावांचा अधिक अभ्यास केल्यावर पुष्कळच नवीन माहिती मिळू शकेल.

क्र. ७८ हा ता. २० डिसेंबर १७३० चा कागल येथे भरलेल्या मजालसीचा अपूर्ण असा कागद आहे. त्या मजालसीला हजर असलेल्या तेथील प्रमुख व्यक्तिंची नावे त्यात आली आहेत. त्या नावात 'राजश्री आबाजी सर्जाराऊ घाटगे जाहागिरदार व फौजदार', मल्हार कळसो पेसवे, कोनेरी संगम मुजुमदार, गोपाळ मल्हार कोटीनविस, राजश्री पिराजी सर्ज्याराऊ घाटगे, अनंत भिकाजी देसकुलकर्णी, नरहरी यादव हवले नाडगोंडा, इत्यादि नावे आहेत.

काही वरिष्ठ अधिकाऱ्यांची माहिती या खंडात प्रसिद्ध होत असलेल्या कागदपत्रातून नव्याने मिळते. चितो माहादेव न्यायाधिश यांची मजेशीर हकीकत त्याला दिलेल्या संभाजीच्या ता. ९ नोव्हेंबर १७३२ च्या सनदेत आहे. ती अशी (क्र. १२८)— 'तुम्ही स्वामीचे नवाजीस (आश्रित) स्वामीच्या पायाविना आन्य दैवत माहित नाही. तुम्ही स्वामीचा राणीवास चौथा वाडा (म्ह. जिजाबाई) याचे पुत्र म्हणविल. याकरिता हाली स्वामी तुम्हावर कृपाळु होऊन तुमची अष्टप्रधानामध्ये गणना करून तुम्हास न्यायाधिसीचा हुदा सांगितला आस... तुम्हास वेतन सालिना देखील चाकर हान प.. ५००० पाच हजार केले असत... तुमच्या हुद्यास जिल्हा पाहिजे याज करता सुभा प्र. पन्हाळा पे. ता. आळते व रूकडी दोनी माहाल दरोबस्त व कोल्हापूर सुभाचे माहाल वरकड माहालाची चौथाई दिल्ही आहे. तरी जिल्हा कबज करून फौज बाळगुन स्वामीची सेवा करीत जाण... तुम्हास जमान राणीवास चौथावाडा घेतल असत—'

श्रीकराचार्य पंडितराऊ याच्या बद्दलचे गौरवोद्गार हारीहराचार्य पंडीतराव याला संभाजीने दिलेल्या सनदेत ( क्र. १३८ ) पहावयास मिळतात ते असे : "तुमचे पिते राजश्री श्रीकराचार्य पंडितराऊ याणी तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामी संनिध राहोन बहुत श्रम केले. वेदशास्त्रसंपन्न कोणेक प्रसंग दरबारी शास्त्राचा पडिला तो याणि विद्यायोगे संपादिला. जे जे पंडित आले त्याची समशा पुरविली... सांप्रत निधन पावले. त्याचे पुत्र तुम्ही विद्यावंत..."

जोशीराव घराण्याची तर नाम्ना मोठीच होती. बाळ जोशी बिन दशरथ जोशी याला दिलेल्या सनदेत (क्र.१८१) प्रत्यक्ष छत्रपति म्हणतात : "तुमचे वडील-वडीलापासून तीर्थरूप राजश्री कैलासवासी माहाराजाजवळी सेवा निष्टेने करीत आले व तुम्हीही स्वामीची सेवा येकरूप निष्टेने करीत आहा.. स्वामीनी तुम्हास जो प्रश्न केला तो तुम्ही सांगितल्याप्रमाणे स्वामीच्या प्रेत्ययास आला व ठाणे सिराले ता. आलते येथील ठाणेसी स्वामीनी परीव घालून मुकाम केला होता ते समई स्वामीनी तुम्हास कुरूंदवाडचे मुकामी ठाणे कितेक दिवसात हस्तगत होईल म्हणून प्रश्न केला. त्यावरून तुम्ही सीधांत करून ज्या दिवसी ठाणे हास्तगत होईल म्हणून सांगीतले व लिहून दिल्हे होते त्याप्रमाणे ते दिवसी ठाणे हस्तगत जाहले"

कांही राजकीय घटनांचा उल्लेख ओझरता येतो तो असा :–

क्र. ९ त रायगोंडा बिन सातगौडा देसाई याला संभाजीने दिलेल्या सनदेत म्हटले आहे : "पूर्वी सामानगडाखाले उतरेकडील फौज असमंतात मागे आल्या होत्या ते समई तुम्ही आपल्या जमावानसी किले मजकूरी येऊन बहुतच केली. या फौजास नतीजा लाविला"

क्र. ३२ त 'पनालियास पादशहाचा परीघ पडिला होता ते समई तुम्ही बरी शर्त करून किलियावरी सामा जवादा चढवून स्वामी सेवा बहुतच केली' असे रामजी रूद्र पानसे याना संभाजीने दिलेल्या सनदेत म्हटले आहे.

क्र. ३६ त मौजे नांदणी प्रा. रायबाग बाबतच्या ता. १४–३–१७२५ च्या उल्लेखात म्हटले आहे : "मौजे मार हे पेशजी रा.चंद्रसेन जाधवराऊ याची फौज गाव मारावयास आली."

क्र. ४७ ता. ४–१२–१७२६ च्या गोव्याच्या पत्रात म्हटले आहे की– "बाजीरावाच्या सैन्यात दहा हजार घोडेस्वार असून त्याला नबाबाचे चार हजार घोडदळ येऊन मिळण्याची शक्यता आहे."

क्र. ५१ त 'उदाजी चव्हाण इगलीवर उतरला आहे. पलीकडील काटक जमा केले आणि मिरजेच्या मुलकास व प्रतिनिधीच्या मुलकास खंडणिया घेत आहे' असे म्हटले आहे.

क्र. ५४ : "१७२७ त नूल भागात पाऊस न पडल्यामुळे पीक वाळून गेले. याखेरिज गनिमाने तफरका बहूत पडून इलाखी जाहाली. रयतेस हरयेक बावे वामवुमी आजार लागोन बहूत नातुवानी येऊन मुलखावरी उठोन गेले" असा उल्लेख आहे.

क्र. १३२ : "१७३५ – मातुश्री गुणाबाई व सुबराऊ शिंदे याना सनद – 'नबाव निज्यामन मुलुख' या प्रांतास येऊन बारवला नजिक मोकाम केला असता तुम्ही हुजुर येऊन साहेब कामावर रूजू जाला." असे म्हटले आहे.

क्र. १८९ त उल्लेख आहे की, 'साबाजी क्षीरसागर नामजाद किले सामानगडात असता निदारबक्ष याणी वेढा किल्यास दिल्हा त्या वेळेस याचे (म्हणजे वेंकटाद्री चोंडो, नाडगोंडा याचे) वडील चवंडो वेंकटाद्री जमावनिसी येऊन कस्त मेहनत करून किल्याचे साहित्य केले. चाकरी करून दाखविली.'

क्र.२०४ वरून इचलकरंजी आणि कापशी या दोहोत त्याकाळी (स.१७४६) किती वितुष्ट आले होते ते कळून येते. इचलकरंजीकर त्या पत्रात म्हणतात : 'श्रीमंत राजश्री सेनापतीचा व आमचा दावा जबरदस्त' (पृ. २७७).

क्र. १७८ (ता. १७ जून १७४६) चा कागद अतिशय महत्वाचा आहे. त्यात कागलकर घराण्याची हकीकत येते. ती मुळातच वाचली पाहिजे. तुकोजी घाटगे सर्ज्याराव एका हल्यात मारला गेला. त्याला माती देण्याच्या गोष्टीवरून भाऊबंदकी कलह वाढला. त्या तंटयाचा निवाडा ताराबाईने केला. त्याचा उल्लेख असा आहे, 'याबद्दल पनाळेवर मातुश्री तारा आऊसाहेब याजपर्यन्त खटला पडला. तेव्हा तेथ इनसाव जाहली. ते समई राजश्री रामचंद्रपंत व हिंदुराव व चंद्रसेन जाधवराव व कुसो मल्हार व शाहाजी नाईक व सावाजी नाईक निंबाळकर व गिरजोजी यादव पेसाजी मोहिते तळबिडकर व लष्करात इत्यादिक म्हराट होत' (पृ. २३३–३४)

'जे सेवक असावेत ते याच रीतीने' अशी शाबासकी द्वारकोजी यादवाने मिळविली. ती कशी मिळविली याचे दिग्दर्शन त्याला संभाजीने दिलेल्या ता. २८ सप्टेंबर १७४२ च्या सनदेत (क्र. १८०) होते. या सनदेत द्वारकोजीच्या सेवेची प्रशंसा करताना म्हटले आहे. 'सांप्रत नवरात्र प्रसंगाची तली स्वामीकडील

चौथावाडा ( महाराणी जिजाबाई ) याकडे होत आहे. त्याचे साहित्य मनास आणिता जे जे वस्तु पाहिजे ते धणियाचे आज्ञेप्रमाणे मेळऊन आणून स्वामीस आदा करून आश्रित व सोइरे व सरकारकून व सरदार व कारकून अठरा कारखाने यासि मेवे फळफळा आदिवरून वरचे साहित्य करून विध ययासांग संपादिला. कोण्हेविसी न्हुन पडली नाही. स्वामीच्या चित्तात आले जे सेवक असावेत ते याच रीतीने. धणीयाचे मनोदये जाणोन वर्तणूक करून सेवेचा मजूरा करून घेईल ऐसा असावा.' द्वारकोजी भलताच चतुर असणार यात शंकाच नाही!

ता. २४ जून १७३१ रोजी छत्रपति संभाजीने पिराजी घोरपडे याला दिलेल्या सनदेत म्हटले आहे की, 'मामले मिरज येथील सरदेशमुखीचे वतन पूर्वी जैन व ब्राम्हणाचे होते. त्यास थोरले माहाराज कैलासवासी ( म्ह. शिवाजी ) याच्या पायापासी अनराहट केली यास्तव त्याचे वतन दूर केले होते'.

जिवाजी खंडेराव चिटणीस यास 'संपूर्ण राज्यातील सरकारातून व सरदार व किलेकोट व जंजिरे येथील चिटणीस व कारखानिसी व जमिनिसी हे तीन धंदे वंशपरंपरेने करून दिल्हे' असे क्र. ९९ त म्हटले आहे.

पिराजी बागुल यास ता. ३-८-१७३२ रोजी दिलेल्या सनदेत म्हटले आहे की. 'तुमचे पिते मानाजी बागुल यानी स्वामीच्या राज्यात श्रमसाहास करून सेवा निष्ठेने केली. ते स्वामी कार्यावरी खर्च जाहाले.'

परागंदा होऊन जाणाऱ्या लोकाना दिलासा देणारी पत्रे ( क्र. ३७, ३८ ) आहेत. त्यात असा उल्लेख आढळतो: 'तुम्ही पुरातन पद्दरीचे सर्व प्रकारे तुमचे ऊर्जित करून चालवावे हे अवश्यक तर तुम्ही कोणेविसी चितात शंका न धरिता दर्शनास येणे आणि इमाने इतबारे राहोन सेवा करणे. कबिलासह येणे. तुमचे चालवावया अंतर होणार नाही. अभय असे.' 'कोणेविसी चितात शंका न धरिता कबिलासह वर्तमान आपल्या स्थलावर वसाहत करणे. तुमचे सर्वप्रकारे चालविले जाईल.'

'इकडील स्वारी सिकारीचे धास्तीमुळे रयेत डावाडोल जाहली आहे ... यावरून तुम्हास अभयेपत्र सादर केले आहे. कोणे गोष्टीचा वसवसा न धरिता बेसक होऊन गावी सुखरूप राहाणे.' (क्र. ६७).

कोल्हापूर नजीकचे उचगावास १७३० च्या सुमारास भलताच उपसर्ग पोचला असे दिसते. 'साल मजकुरी गावास उपसर्ग लागोन खराब जाहले. सिवार लुटून गेला. घरे कोपरे लुटून गेली.' असे (क्र. ७०)त म्हटले आहे.

सन १७३५ त 'सोनार व पंचाल्याचे धर्माधिकारीपणाचे' वतनाचा तंटा निर्माण झाला त्यावेळी गोत बसवून निवाडा झाला की सोनार व पंचाल हे भाऊबंद. दोन घराण्याना एक एक वर्षाची पूजा, मुंजी, लग्न, गोंधळ, श्राद्ध, पक्ष, नवरात्र... सणवार जे काय पूर्वापार आसेल ते ज्याचे वर्षातील येईल ते त्याणी घ्यावे... प्रायश्चित काय करणे ते करवीर क्षेत्री करावे. आनयत्र स्थली न करावे. क्षेत्रावरी हरदोजणांनी केले तर दिवाणाचे गुन्हेगार व गोताचे अन्याई' असा निवाडा यात आहे. (क्र. १३०).

द्वारकोजी यादव, अंतःपूरचा चौकीदार, याला ता. १४–६–१७३५ रोजी दिलेले पत्र (क्र. १३४) विलक्षणच आहे. ते असे– 'बाजारा गोंदी बाईको कोकणातून बदअमल करून तारळे प्रांते राहिली होती. तिला हुजूर आणून बाजपूस करिता तिजकडे कर्म लाजीम (सिद्ध) जाले. याकरिता तिला हुजूर कोटीस जमा करून तुम्हास बदल मुशाहिरा दिली असे. तरी तुम्ही बटीक आपले घरो मागऊन तिचे हातून सेवा घेत जाणे. इची किमत सिरस्ताप्र... तुमचे वतनात खर्च पडेल'

क्र. २७ मध्ये शंकराचार्याचा मठ 'मौजे केसापूर संनिध करवीर येथे आहे' असे म्हटले आहे. यावरून केसापूर आणि कोल्हापूर या दोन गावात बरेच अंतर होते असे दिसते. केसापूरची जकात तर वेगळीच होती (क्र. २८, २९).

क्र. ५८ त मुक्तेश्वराचा उल्लेख येतो तो असा : 'मुक्तेश्वर गोसावी हे श्री येकनाथ स्वामीची कन्या गंगाबाईचे पुत्र. याचे वृंदावन मौज तेरवाड प. रायेबाग येथे आहे.'

ता. ३१ मे १७३६ च्या क्र.१५२ च्या कागदात 'मौजे इचलकरंजी तालुका रूकडी' असे वर्णन आले आहे.

व्याजाचे दर पंचोत्राप्रमाणे होते असे दिसते. क्र. ६० (ता. ८ आगष्ट १७२७) चा कागद म्हणजे परतापजी घोरपडे यानी केजबान बाबा गोसावी याला लिहून दिलेला कर्जरोखा होय. त्यात परतापजी म्हणतो :– आम्ही आपले आत्मकार्यालागी तुजपासी घेतले रुपये ६ साहा मुदल घेतले. यासी व्याज दरमाहे दरसदे पंचोत्रा प्रमाणे घेतले. यासी मुदत जोरीच (ज्वारीचा) हंगामी."

क्र.७२ (ता.२१ मे १७३०), क्र.११९ (ता.४ डिसेंबर १७३३), क्र.१४२ (ता.५ डिसेंबर १७३५) हे कर्जरोखेच आहेत. त्यातही व्याजाचा दर पंचोत्रा आहे. क्र. १४७ (ता. २० डिसेंबर १७३५) च्या कागदात मात्र 'तिवोत्रा' व्याज म्हटले आहे.

अन्यहि महत्वाचे कागद या खंडातून प्रसिद्ध होत आहेत. इतिहासाभ्यासात त्या सर्वांचा उपयोग होईल अशी आशा करतो.

**आप्पासाहेब पवार**

# PREFACE

This is the second volume of Tarabai Papers. In these volumes historical material relating to Tarabai's period is being published. The sources from which these papers have been collected are indicated in the Preface to Vol. I. That volume contained papers up to the year 1720. In the present volume the period covered is from 1721 to 1749.

The most important paper published here for the first time is the partition deed of the family of Ramachandrapant Amatya After his death his property came to be divided among his three sons, Bhagawantrao, Appajirao and Shivaram. Ramachandrapant Amatya played a vital role in the war of independence carried on by the Marathas against Aurangzib. The document referred to (No. 19), conclusively proves that Ramachandrapant died before May 1723 and not, as Sardesai surmised, between 1730 and 173[illegible] (Marathi Riyasat New Series, Vol. 4, p. 157 f.n.). The partition deed is even more important as material of social history of that period. It is practically an inventory of the entire property owned by Ramachandrapant Amatya and as such, it indicates what the estate of a dignitary like him was at that time. It is worth adding that in the list, books belonging to Ramachandrapant and his wife are separately mentioned.

Document No. 3 refers to the foundation of Sindhudurg at Malwan by Shivaji on the 25th Nov, 1664 and gives graphic description of the tragic events that followed the Mughal invasion of the place An interesting document (No. 21) describes how the image of the famous deity of Mahalaxmi at Kolhapur came to be reinstalled in Sept, 1715. During the disturbances consequent upon the Muslim invasions, the idol was concealed in the priest's house. The document mentions that the goddess "inspired" the priest to approach the King (Sambhaji of Kolhapur) for the purpose of reinstallation. The King describes the Mahalaxmi temple of Kolhapur as ancient and holy and adds : "There

is Kasi, and there is Karvir (i. e. Kolhapur). There is no other place as great as either of them." Serial No. 113 shows that a residential quarter belonging to a Muslim was taken from him and given to a Brahmin. This would indicate that there were no exclusive areas reserved for residential purposes for the two communities, in the holy city of Karvir.

Incidental but useful information is available about Girjoji Yadav, Antaji Trimal and Tulaji Shitole the trio who is identified by Tarabai as the ringleaders of the conspiracy which ended in her dethronement (Rajwade 8·169). No doubt the information is scanty; but it is helpful (Nos. 107, 158, 159 see also Tarabai Papers Vol. 1; No. 322).

References to some of the high officials and other dignitaries at the Court of King Sambhaji of Kolhapur are interesting. Thus No. 128 dated 9 Nov., 1734 is the order of appointment of Chinto Mahadev as Nyayadhish. In this order the King describes Chinto Mahadev as a protege of the King's family brought up by his queen Jijabai. The Nyayadhish was given a *watan* for maintaining an army. It appears that as he had to give a surety the queen Jijabai stood surety for him. Shrikaracharya Panditrao was another high official who is eulogized for his profound learning and intellectual ability in dealing with Court problems (No 138). The royal astrologer, Joshirao received high encomium for fortelling the exact date of the fall of a place which was besieged by the king's troops (No. 181).

No outstanding political events figure in these papers. But references to political events are there. The seize of Panhala (No. 32), the siege of Samangad (Nos. 9,189), the march of the Nizam's army (No. 132), the incursions of Chandrasen Jadhav (No. 36) and Udaji Chavan (No. 51) are some of these incidents. No. 47 which is a Marathi translation of the letter dated 4 Dec., 1726 of the Portuguese Viceroy of Goa says that Bajirao who was on his Southern march had with him an army of 10,000 and it was believed that 4000 men of the Nabab would join him.

An interesting account of the historic family of the Ghatages of Kagal is given in Serial No. 178. It also describes how a family feud came to be settled by Tarabai.

We have in this volume an extraordinary document throwing flood light on a matter of customary law ( No. 134 ). It is an order issued in favour of Dwarakoji Yadav, the chief officer in charge of the queens' appartment. The order reads as follows :

" A whore named Godi came from the Konkan and settled in Tarale district. She was brought to the royal court and, on enquiries, she was found to be a loose woman. She was therefore appropriated as royal property and is now given to you. You should take her to your home and get her services. The price fixed for her would be debited to your account. "

The rate of interest current at that time was five per cent per month. ( Nos. 60; 72; 119; 142 ).

There are quite a few papers relating to the different types of *watans* and other economic and social matters. It is, therefore, hoped that the papers published in the volume would be found useful as source material for the history of the period

**A. G. Pawar**

## SUMMARY

25-1-1721

A grant of two bighas of land to the children of Rudraji Naikwadi. who died in action at Ingali.

2 : 27-1-1721

Shriniwas Parashram Pratinidhi grants village Haroli as mokasa to Sidoji Thorat.

3 : 2-5-1721

This is a copy of a document recognizing the right of Dadambhat Pilambhat at Janjira ( Sindhu-durg ), Malwan, as the priest of the place. The paper describes how Shivaji, on his way to Bednoor, saw the island of Turate ( near Malwan ) and ordered the construction of the sea-fort of Sindhu-durg. The foundation was laid on 25-12-1664. The paper further refers to the atrocities committed at that place by the Mughals during Sambhaji's reign and also to the spread of the epidemic of cholera at Sindhu-durg during the reign of Rajaram. The paper gives graphic description of some of these events.

4 : 3-5-1721

An order from Shriniwas Parashram Pratinidhi to the officers of village Alas, asking them to hand over the Sardeshmukhi collection of the place to Trimbak Hari, the agent of Piraji Ghorpade.

5 : 15-6-1721

This is a list of 37 papers in which the names of Dwarakabai, Soyarabai, Subhanrao Shinde Sena Khaskel, and Lakham-gauda Desai of Hukeri are mentioned.

6 : 15-6-1721

An order from Chhatrapati Shahu to the officers o village Sirdhon, informing them of the Mokasa grant of the place to Piraji Ghorpade, the son of Santaji Ghorpade.

7 : 9-7-1721

The officers and mirashis of village Kumbhar-wan ( in Sangameshwar area ) are informed by Sambhaji II, of a grant to Tulajirao Surve who is described as an old loyal servant.

8 : 23-7-1721

While resisting an attack on the village Madilage by Pirajl Ghorpade, Rayaji Ghatage had lost his life. In recognition of his service Sambhji II gave ten bighas of land in inam to the son of the deceased.

9 : 30-8-1721

A grant from Sambhji II to Raygauda Satgauda Desai of Nool ( near Gadinglaj, Kolhapur district ) for routing the Mughal armies near Samangad.

10 : 24-9-1721

A grant of inam, abolished by Shivaji the great, is reinstated by Sambhaji II on a Brahmin.

The paper clearly states that when Shivaji conquered the territory, he abolished the land grants and made provision for distribution of charity.

11 : 25-10-1721

A grant of thirty bighas of land at Pargaon from Sambhaji II to Shankaraji Gosavi for the maintenance and repairs of a temple, built by Ramdas Swami. It was damaged during recent disturbances.

12 : 28-1-1722

During an encampment of Shiviji Ghorpade's army at Shivapur, payment of dues from Sambhaji Khando Desai of Ajara was received. Shivaji Ghorpade, Amir-ul-umrao assures him of the protection of the place.

13 5-2-1722

Sambhaji II informs the Deshmukhs and Deshpandes of Miraj that the Deshmukhi vatan of the said district, bestowed upon Santaji Ghorpade Senapati by Rajaram is continued to Piraji Ghorpade, the son of Santaji Ghorpade.

14 : 11-2-1722

A receipt for rupees twentyfour is issued by Sawant and Hanagoji Yadav to Pratapji Ghorpade.

15 : 22-3-1722

Krishnaji Parashram Pratinidhi, in response to a request made by Krishnaji Bhaskar Pandit, renews the grant of an inam at village Ile, as the original papers were lost during the disturbances of the Sawants of Kudal.

16 : 5-6-1722

Jaysing Jadhavrao maintains the inam of village Hanur to Ranoji, the son of Piraji Ghatage, who had died some time ago.

17 : 28-11-1722

Timaji Raghunath is made Sabnis of the fort of Kolhapur by Sambhaji II, after removing Rango Yahav, the previous incumbent of the office.

18 : 21-1-1723

A grant of three bighas of land at village Nanganur, from Sambhaji II to Raghunathbhat Balambhat Nulkar.

19 : 25-5-1723

A partition-deed between Bhagwantrao, Appajirao and Shivram, the sons of Ramchandrapant Amatya. The list of partitioned articles includes cash, precious stones, ornaments, weapons, cows, bullocks, etc. Even religious books and inam, as well as the grains and cereals stored at Bhudargad and Gagangad are divided.

This is a very important document, as it throws light on the estate of a nobleman like that of Ramachandra Panta Amatya.

20 : 28-9-1723

The Saradesh Kulkarni watan at Arale is conferred upon Antaji Trimal by Sambhaji II in recognition of services rendered by him to Rajaram, at Jinji and to Sambhaji II himself.

21 : 8-11-1723

Sambhaji II bestows the right of chief priesthood of the goddess Shri Mahalaxmi at Kolhapur, upon Narharibhat Savgaonkar and grants him Kasaba Savagaon and other rights of chouth for the proper worship of the deity. The document mentions that the idol of the deity kept in the house of a priest during the period of political disturbances, was reinstated by Sidhoji Hindurao Ghorpade on 27-9-1715.

22 : 14-11-1723

At the request of Bhanji Ballal, the representative of Shahu in the Court of the ruler of Sondhe, Sambhaji II exempts Rs. 15000/- out of the tribute due to him by the Chief of Sondhe.

23 : 10-12-1723

An order from Sambhaji II to Rayaji Mane, giving him assurance and summoning him to the court.

24 : 10-12-1723

A similar order, as above, to Viroji Mane from Sambhaji II.

25 : After 10-12-1723

A similar order, from Rajasbai, the queen mother, to Hiroji Mane.

26 : 26-12-1723

A grant of Sarnaiki watan from Sambhaji II to Raygauda Desai, at Karyat Nuli for his services during the siege of Samangad ( see No. 9 ). The paper mentions that " armies of the north " had created disturbances in the past, and were creating disturbances again.

27 : 7-1-1724

A grant from Sambhaji II to the math of Shankaracharya at Mouje Kesapur. adjoining Kolhapur.

28 : 7-1-1724

Sambhaji II grants the rights of one fourth of custom collections at village Kesapur to the temple of Mahalaxmi and three fourth of it to the math of Shankaracharya.

29 : 18-1-1724

At the request of Udaji Chavan, Sambhaji II grants

village Pohale for the maintenance of the temple at (Wadi) Ratnagiri, that is. Jotiba Temple, about nine miles from Kolhapur.

30 : 2-3-1724

A grant of the Mahajanki WATAN of Kasaba Kolhapur from Sambhaji II to Virshet Mane. The paper gives details of some rights and perquisites of the WATAN.

31 : 14-5-1724

A partition deed of the places of watan, between Bhagwantrao, Moreshwarrao and Shivarampant, the sons of Ramchandrapant Amatya. The paper is a copy of a copy and incomplete. But it is important.

32 : 26-7-1724

During the siege of Panhala, by Aurangzib, Shamji Panse had carried large quantity of supplies into the fort. In recognition of these services Sambhaji II granted twenty bighas of land to him.

33 : 20-11-1724

In a letter to the acting governor of Goa, the commander of Berdes informs the latter that Udaji Chavan, a Sardar of Sambhaji II had arrived in the vicinity of Shapur with an army composed of cavalry and infantry. He requests him to send ammunition.

34 : 9-12-1724

A letter by the commander of Salsete to the acting Governor of Goa. He informs that according to his spies the forces of Sambhaji II have beseiged the fort of Sambrani, belonging to Sondhe and intend to attack Salsete. He complains that the forces at his disposal are not enough to resist the aggressor.

35 : 29-12-1724

A letter from the acting Governor of Goa to the commander of Salsete, in which he gives some instructions regarding the defence of the area in case the Maratha armies marched that way.

36 : 14-3-1725

A grant of five bighas of land to Nemana, the son of Korana Magdum, who was killed in action, when Chandrasen Jadhav had attacked the village, Nandni.

37 : 19-11-1725

A letter from Bhagwantrao Ramchandra Amatya to Pratapji Rane asking him to call upon him, and serve him faithfully.

38 : -11-1725

Bhagwantrao Amatya gives assurances to the exiles-Devaji Rane, Bapuji Rane, Jetoji Rane and Jivaji Rane and asks them to come and settle in their village without any fear.

39 : 6-12-1725

In response to a letter written by Maloji Ghorpade about a watan, Shriniwas Parashram Pratinidhi writes that he would consider the matter upon his visit to his place and also asks him to meet him.

40 : 1725 ( ? )

Kanhoji Angre, remits an amount of two thousand rupees to Chhatrapati Shahu and adds that if the King fails to look after the place, it may be lost.

41 : 1725

A warning from Shriniwas Parashram Pratinidhi to Ramrao Patankar not to trouble Abaji Mohite of Talabid. He asks him to get back the confiscated sword of Naikwadi from Mohamad Khan, the mutalik of Abaji Mohite.

42 : 1725-1726

In this truncated letter the addressee is warned of the movements of Udaji Chavan.

43 : February 1726

Sidoji Hindurao Ghorpade says that "Rao" is near Kopal, and that he would call upon him and would come along with him to Karvir.

44 : 29-4-1726

The inhabitants of Bahadurwadi had deserted the place. Jagjivan Govind, in a letter to Joti Shelar and

Shetyaji Shinde at Koregaon, asks them to come and settle there along with such other cultivators as may come.

45 : 15-10-1726

A letter from Sambhaji II to Bhanji Ballal, representative at Sondhe, asking him to pay Umapati Bhat Puranic, an attendant of Queen mother, an amount of rupees sixty out of the tribute due from Sondhe.

46 : 2-12-1726

A letter from the Viceroy of Goa to the Commander of Salsete to be on the alert, as there was a probability of the invasion of Sambhaji II's army on Goa.

47 : 4-12-1726

A letter from the Viceroy of Goa to the Commander of Salsete informing him that Bajirao most probably was marching towards Karnatic with ten thousand of cavalry and a band of Pindaris. The Viceroy asks the Commander to take care of the property of the Church of Salsete. He promises him to send three hundred European soldiers to his help.

48 : 6-12-1726

A letter from the Viceroy of Goa to the Commander of Salsete approving of the safety measures adopted by the Commander and ordering him to defend Madgaon, Cuncolim and Rasai from the impending attacks of the Marathas

49 : 9-12-1726

A letter from the Viceroy of Goa to the Commander of Bardes giving him the latest news of the arrival of the Maratha army near Salsete, and telling him how so protect the area.

50 : 12-12-1726

A letter from the Viceroy of Goa to the Commander of Salsete informing him that 200 White soldiers were despatched. The Viceroy also indicates how the place should be protected.

51 : 1726 ( ? )

A letter from Sidoji Thorat to the Peshwa informing him that Udaji Chavan had descended on Ingali and was collecting tribute from the territories belonging to Miraj and Pratinidhi.

52 : 30-1-1727

Bhagawantrao Amatya informs the Kamavisdar of village Mat that at the request of Krishnaji Rane, four bighas of land is granted to the wife and children of Sambaji Rane, who was killed in active service.

53 : 1-2-1727

Agricultural lands in village Arule were not cultivated for a long period. At the request of Pratapji Rane, Bapuji Rane, Krishnaji Rane and Devaji Rane, Bhagawantrao Amatya gave certain concessions and asked the above mentioned persons to cultivate the lands.

54 : 12-4-1727

The Subedar of Bijapur informs Sakhagauda Khanagauda Desai of *Paragana* Nul, of the exemption of revenue of five villages, which suffered from drought, and enemy inroads.

55 : 25-5-1727

Krishnaji Vithal writes to Mahamad Khan, the gumasta to the Deshmukh of Talbid, to send certai papers.

56 : 30-5-1727

An order from Ranoji Ghorpade Senapati, to the mokadams of twelve mahals to work under Naro Khanderao who was entrusted with full control of the place.

57 : 18-6-1727

Sankarbhat Burde had performed the last rites of the late Shivaji Chhatrapati II. Rajasbai, the queen mother, grants him four bighas of land for the above services.

58 : 19-7-1727

Sambhaji II grants village Terwad to Mukteswar the great grand son of the famous saint who himself wa the son of Gangabai the daughter of Eknath. The grant was for the upkeep of the saint's *Vrandawan*.

59 : 30-7-1727

The Viceroy of Goa sends some instructions to the Commander of Salsete, regarding the activities of the Inquisition and the prisoners. He enjoins the Commandar not to commit himself in the matter of the release of prisoners and destruction of Hindu temples.

60 : 8-8-1727

This is a promissory note for rupees six at the nterest of five per cent per month.

61 : 22-9-1727

Ranoji Ghorpade grants village Arjunwad to Gopal Vyankaji Deshkulkarni, who had served Santaji Ghorpade faithfully by organizing a military post.

62 : 18-1-1728

At the request of Gulabagiri Gosavi, Sambhaji II granted him lands at village Save to build a math ( monastery ).

63 : 10-7-1728

A six-point appointment order from Sambhaji II toi Krishnaji Pandit Pratinidhi, in which Sambhaji asks the Pratinidhi to carry on the administration on the line of his father, Parashram Trimbak, Pratinidhi. The other points refer to some specific matters such as the accounts of Panhala and Pavangad etc. The King promises to hand-

over the administration of Bhudargad and Samangad at the end of the year.

64 : 9-1-1729

Sambhaji II informs the officers of the village Parale, that this village was granted to Harji Agalave, *Subakhaskel*, for the expenses of his troops.

65 : 4-4-1729

At the reqest of Udaji Chavan Himatbahaddar Sambhaji II gave half *Chavar* of land to Barmoji Mane Patil from village Bhadole. Bharmoji's brother was killed in action and he had to shoulder the responsibility of the family.

66 : 9-8-1729

Sambhaji II granted village Vaghapur to Sonaji Ghorpade. Hindurao Ghorpade had granted this village to the latter and after Hindurao's death Sidoji had continued the grant. Shivaji II had also issued grant deeds. But all the papers were lost.

67 : 16-11-1729

Yesaji Bhonsale assures the village officers of Uchagaon, that in future the village would not be molested. He proclaims that there would be no disturbances and people should return back to their places.

दूर करावे म्हणोन लोकास व सुभानजी नलवडे मुद्राधिकारी यास सांगितले आणि कितेक शांती केल्या व मौजे मजकूरचे देव तांज्ञाने भ्रष्ट केले आहेत त्याचीही आर्च्या सुध करावी म्हणोन सांगितले. आण दोन देवस्थाने आर्च्या सुधे शास्त्र संमते बोलिले आहे त्याप्रमाणे करून देवस्थापना केली. त्यावरून मौजे मजकूरचे ग्रामस्त याणी देव संनीध्ध उभे राहून संकल्प केला की देवा तुझी स्थापना या ब्राम्हणाने केली हा मौजे मजकूरचा उपाध्या. परंतु या समई अधीक काही द्यावे. समस्त ग्रामस्त मिळोन दोनी देवालईचा आभिशेक आपणास देऊन वृत्ति भूमिपत्र करून दिल्हे. उपाध्येपण गावचे व किलाचे इस्तकबिल[१] पासून आजपर्यंत करीत असो. यैसे आसता कृष्णभट माहाजन जानभटाचे गोत्र पुरुष मौजे मजकुरी येऊन राहून आपणा समागमे उपाध्येपणाचा खटला करू लागला. त्यास पहिलेपासून सदरहू वर्तमान विदित केले आहे. मनास आणून मनसुबी करावी म्हणोन तुम्ही हाजीर मजालस करीना सांगितला व जंजिराचे मोतदिमत तट सरनोबत नाईकवडी लोक याजवळही हाजीर मजालस मनास आणिता त्याणी सांगितले की माहाराज राजश्री----थोरले कैलासवासी स्वामीनी जंजिरा वसविला त्या दिवसादारभ्य आजीपर्यंत दादंभट उपाध्ये आम्ही जाणत आहो. आमचे घरीचा मुहूर्त सोहाळा हव्यकव्य याणी केले. कोणाची प्रथम पिढी कोणाची दुसरी व कोणाची तिसरी यैशा तीन पिढियापर्यंत हा उपाध्या. आम्ही याचे सिष्य दुसरा पदार्थ नाही. हाली कृष्णभट्ट माहाजन जानभटाचा गोत्रज म्हणून उपाध्येपणास भांडतो. तर ग्राम समंधिक उपाध्येपण बहूत काल दादंभट चालविले आहे. त्यास मौजे मजकूरचा उपाध्या जानभट त्याचा गोत्रज कृष्णभट त्यास ग्राम समंधिक उपाध्येपण जे असेल ते दादंभटानी व कृष्णंभटानी समजोन राहावे. जंजिराचे उपाध्येपण दिवाण समंधिक व जितका चाकर व ठाणी उदमी सावकार व सावकारी तांडेल व बाजेदुम इतके याचे उपाध्येपण दादंभट याचे आणि याणीच आजपर्यंत उपाध्येपण चालविले. कितेक माहार्णवाचे प्रसंग सोसिले. आम्हा लोकाबरोबर कितेक कालदु:काल काढिले. भाजीपाला

१. इस्तकबिल = सुरुवातीची मिती.

खाऊन सोबत दिल्ही. आमचा काल तुटका जे समई जाहाला ते समई आम्ही जितके दिल्हे तितके लक्षशा मानून आमचे घरची कार्य प्रस्ते केली. माहामारीचा प्रसंग जाहाला ते समई हा ब्राह्मण जंजिराहून मरीचे भय न धरिता कितेक प्रकारे शांति कर्मे केली. आरिष्ट निर्शन होऊन त्यामुळें आमचे कांहीं जीव वाचिले. मौजे मजकुरची देवस्थाने भ्रष्ट जाहाली होती ती या ब्राह्मणाने आर्च्या शुध्ध करून स्थापना केली. इतकी खस्त खाऊन आजपर्यंत उपाध्येपण केले. जंजिराचे उपाध्येपण म्हणजे आम्हा लोकाचे ते आम्ही तीन पिढियापर्यंत वडिलापासून या ब्राह्मणास दिल्हे आहे व दिवाण समध्धे कार्य प्रस्त प्रसंगोचित होईल तेही या ब्राह्मणाचे म्हणून लोकानी तुमचे वर्तमान सांगितले व तुम्ही सदरहू वर्तमान सांगितले त्यावरून तुमचा भोगवठा मनास आणिला. जंजिरे यास मुहूर्त केल्यापासून साठी वर्षे ताहाक त्या दिवसारभ्य उपाध्येपण करून जंजिराहून कितेक काल दुःकाल काढून भाजीपाला काढून गडकरी यास सोबत दिल्ही. त्यांचे घरीची कार्य प्रस्ते संपादिली. ज्याणे जे आत्मसंतोषे दिल्हे तितके दातृत्व घेतले. न्यूनपूर्ण काही न म्हणितले व माहामारीचा प्रसंग जाहाला ते समई जंजिराराहून भय न धरिता कितेक शांती आरिष्ट दूर केले. मौजे मजकूरचे देव भ्रष्ट जाहाले ते स्थापना केली. यैसी कितेक श्रम साहास या जागा केले. या करिता जंजिराचे लोकानी विनंती केली की दादंभट उपाध्या याचे उपाध्येपणास दुसरे यास समंध नाही व आम्ही लोक काही दुसरे ब्राह्मणास उपाध्या यैसें म्हणणार नाही. आमचे वचन उपाध्येपणाचे या ब्राह्मणास पहिलेच गुंतोन गेले. आता कांही होय नव्हे म्हणावे यैसे नाही. परंतु मागापुढा उपाध्येपणाचे पत्र असावे ते पत्र करून द्यावे. आम्ही त्यास साक्ष आसो. पुढे आमचे वंशी जो कोणी होईल त्याणी दादंभटास व याचे पुत्रपौत्रादि संततीस भजोन आपले घरचे कार्य प्रस्त होईल ते याजपासून करवावे. यविसी अंतर करील तो त्यास कासो विश्वेश्वराची शफत असे असोन चुकेल तो आमचे वंसीचा नव्हे म्हणून शफतपूर्वक बोलिले. आम्ही सर्वांनी विनंती केली त्यावरून व तुमचे श्रम साहास इस्तकबिल पहिले पासून लोक व तुम्ही उपाध्येपण जंजिराचे बहुत काल केले आहां. परंतु पत्र आसावे

हे गोष्टी आम्हास समजोन व लोकानीही तुमचेविसी विनंती केली त्यावरून जंजिराचे उपाध्येपणाचे पत्र करून दिल्हे आसे. तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने जंजिराचे उपाध्येपण दिवाण समंधिक व लोकाचे घरचे करीत जाणे. जंजिराचे उपाध्येपणास दुसरे यास समंध नाही. आपले समाधान आसो देणे. मौजे मालवण येथील ग्राम समंधिक उपाध्येपण आहे त्याचा अनुभव तुम्ही व कृष्णंभट माहाजन घेत जाणे. जाणिजे छ १६ रजबु हे विनंती. मोर्तब आसे.

---

**क्रमांक : ४** **दि. ३-५-१७२१**

श्रीनिवास परशराम प्रतिनिधि यांचे मोकदम मौजे अलास यास पत्र की सदहू गावच्या देशमुखीचा ऐवज व साहोत्रा जो येणे आहे, त्यापैकी देशमुखीचा ऐवज रा. त्रिंबक हरि दि॥ रा॥ पिराजी घोरपडे याकडे द्यावा.

श्री

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री श्रीनिवास परशराम प्रतिनिधि ताहा मोकादम मौजे अलास त॥ सु॥ ईहिदे अशरीन मया अलफ. मौजे मजकुरचे सरदेशमुखी व साहोत्राचा[1] ऐवज वसूल येणे. त्या सरदेशमुखीचा ऐवज रा॥ त्रिंबक हरि दि॥ रा॥ पिराजी घोरपडे याकडे वसूल देणे. उजूर करावया प्रयोजन नाही. जाणिजे छ १७ रजब पा॥ हुजुर.

लेखना
वधी

---

**क्रमांक : ५** **दि. १५-६-१७२१**

संभाजी दुसरे यानी पाठविलेल्या ताकीद पत्रांची ही यादी आहे. यात लखमगौडा देसाई, मातुश्री द्वारकाबाई, सोयराबाई व सुभानराव शिंदे यांचा उल्लेख आहे.

---

१ साहोत्रा = उत्पन्नाचा सहावा हिस्सा. हा पंत प्रतिनिधीला मिळत असे.

टीप—अशाप्रकारचे आज्ञापत्र सिरहट्टी बद्दलहि आहे.

श्री

फेरिस्त मुकासबाब समंध पत्र येणे प्रमाणे. श्रीमन्माहाराज राजश्री–शाहू माहाराज छत्रपतीची सनद कुरंदवाड यासी पत्र सन ईसनें अश्रीन छ ३० माहे शाबान सके ४८ प्लव नाम संवछर.

श्री राजा शंभु छत्रपति याचो ........

ताकीद देहाय

१ लखमगौडा देसाई परगणे हुकेरी यासी ताकीद शके ६१
१ का।। सोलापूर शके ६१
१ हुलगुद सरकार मुदगल शके ६१
१ ता।। चंदगड शके ६१
१ पा।। तेरदाळ सेके ६१
१ का।। कबुर सेके ६१
१ का।। सावगाव सके ६१
१ का।। सदलगे सके ६१
१ प्रा।। मुधोळे सेके ६१
१ प्र।। जमंगी सेके ६१
१ प्रा।। आडगाळ सके ३१
१ प्र।। करूर सलाबत सेके ६१
१ प्र।। गोकाक सेके ६१
१ का।। कापसी सेके ६१
१ का।। माचनुर सके ६१
१ प्रा।। आनवाळ सरकार तोरगल सेके ६१
१ प्र।। जमखंडी सेके ६१
१ प्रा।। हवेली मुदगल सके ६१
१ क।। मजती सेके ६१
१ का।। ढवळेश्वर सेके ६१
१ क।। मनोळी सेके ६१
१ ता।। लाट सेके ६१
१ प्र।। पाछापूर सके ६१
१ प्रा। हुकेरी सेके ६१
१ पा।। यलबरग सरकार मुदगल सेके ६१
१ मौजे कुडची ता।। रायबाग पिरजादे यास सेके ६१
१ पा।। रायबाग सके ६१
१ पा।। गलगल सेके ६१
१ ता।। एससंबे सके ६१ आनंदनाम संवत्सर
४ फुटगाव इनाम पत्र
१ मौजे होनग ता।। काकती खासगी खर्चास दिल्हे सेके ६५
१ मौजे कोडोली ता।। कागती पुण्यसील मातुश्री द्वारकाबाई-कडे सके ६५
१ मौजे मंजावती का।। जुगुल प्र।। कोलापूर सोयराबाईकडे सके ४१

१ प्र॥ रायबाग सके ६१
२ ताकीदपत्र
१ तमाजी परवगौंडा देसाई प्र॥ हुकेरी सेके ६१
१ सुभानराव सिंदे सेना खासीकील यास मौजे होनगे व कोडोली सके ६५
२
२१

१ का॥ सदलगे प्र॥ कोलापूर सोयराबाई साडीचोळी ब॥ सके ४१
४
१५
२१ तेरीज डावे कडील
३६
१ तेरीज शाहु माहाराज पत्र
३७

येकूण पत्र सदतीस आहेत.

---

**क्रमांक : ६** **दि. १५-६-१७२१**

पिराजी घोरपडे यांस मौजे सिरढोण हा गाव इनाम दिल्याचें छत्रपती शाहू यांचे मोकदम मौजे सिरढोण यास पत्र.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४८ प्लवनाम सवछरे आषाढ शुध द्वितीया गुरुवासरे क्षेत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी---

सिका सिका

मोकदमानी मौजे सिरढोण ता॥ रुकडी प्रांत पनाळा यास---

आज्ञा केली यैसीजे. राजश्री पिराजी बिन संताजी घोरपडे हे स्वामीचे पुरातन सेवक. याचे चालवणे स्वामीस आवशक जाणोन स्वामी याजवर कृपाळु होऊन मौजे मजकूर पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून हाली वतन करून दिले. (तपशील.)

तेरीख ३०

साबान सुमा इसने आशरीन मया.

---

टीप-अशीच सनद मौजे कुरदेवडे ता॥ आळते प्रा॥ पन्हाळा या गावची आहे.

क्रमांक : ७ दि. ९–७–१७२१

तुळाजीराव सुर्वे यास छत्रपती संभाजी दुसरे यांजकडून वाडी इनाम.

श्री

तालीक

स्वस्तिश्री राज्याभिषक शके ४८ प्लव नाम संवत्छरे आषाढ बहुल येकादसी रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपती

या शिक्यातील अक्षरे लागत नाहीत

श्रीआई
आदि पुरुषश्री
राजा शंभु छत्रपती
स्वामी कृपानिधी
तस्य कृष्णाजी पर
शराम प्रतिनिधी

स्वामी (यानी) मिरासी व गावकर मौज कुंभार वाणी तर्फ संगमेश्वर यासी आज्ञा केली यैसीजे––– राजश्री तुळाजीराव सुर्वे हे स्वामीचे पुरातन यकनिष्ट सेवक. या करिता यावरी कृपाळू होऊन यास पेशजी मौज मारचा टाक्याचा कोड[1] इनाम आजरामऱ्हामत करून दिल्हा आहे. त्याप्रमाणे सुरक्षित चालवावयाची आज्ञा करून तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले आसे. तरी तुम्ही कोड मार तुळाजीराव सुर्वे यास व याचे पुत्र पौत्रादि वंश परंपरेने इनाम चालवीत जाणे. लेखनालंकार.

मर्यादेयं
विराजते

रुजु सुरु सुद्र बार

---

क्रमांक : ८ दि. २८–७–१७२१

मौजे मडिलगे या गावावर पिराजी घोरपडे यांनी हल्ला केला तेव्हा त्या हल्ल्यात रायाजी घाटगे ठार झाला होता. संभाजी दुसरे यानी त्याचा मुलगा बाजी घाटगे सरदेसाई यास दहा बिघे जमीन इनाम दिली.

स्वतिश्री राज्याभिषेक शके ४८ प्लव नाम संवछरे श्रावण बहुल

---

१ वाडी

शिका शिका

प्रतिपदा भृगुवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी बाजी बिन रायाजी घाटगे सरदेसाई ता। खानापूर यासि दिल्हे इनामपत्र ऐसीजे. तुम्ही स्वामी सनीध विनंती केली कीं आपले बाप रायाजी घाटगे मौजे मडिलगेयास असता पिराजी घोरपडे याची स्वारी येऊन गाव मारिला. ते समई झुंझी पडिले. आपण जनाबे हुजर आहों. साहेबी मेहरबान होऊन कांही जमीन इनाम करून दिल्ही पाहिजे म्हणून विदित केले. त्यावरुन तुम्ही वतनदार प्रमाणिक यास्तव वतन करून दिल्हे–

(वतनाचा तपशील आहे.)

मोर्तब असे.

---

**क्रमांक : ९** **दि. ३०–८–१७२१**

रायगौडा बिन सातगौडा देसाई याने समानगडाखाली मोगल फौजा आल्या तेव्हा आपल्या सैन्यानिशी लढून त्याचे पारिपत्य केले होते. या मर्दुमकीबद्दल छत्रपती संभाजी दुसरे यानी त्याला कर्यात नुली येथे पावणेदोन चावर जमीन इनाम दिली.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४८ प्लवनाम संवछरे भाद्रपद बहुल पंचमी सौम्यवासर क्षेत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी रायगौडा बिन सातगौडा देसाई कर्यात नूली यास दिल्हे वतनपत्र येसाजे. तुम्ही स्वामी संनीध विनंती केली कीं आपण स्वामीच्या राज्यामध्ये येकनिष्टपणे वर्तणूक करून शेवा केली आहे. पुढेंहो निष्टेने वर्तोन स्वामी सेवा करावयाची उमेद धरीत आहो. स्वामीनो मेहेरबान होऊन कर्यात मजकूरचे सरनाईकीचे नूतन वतन मन्हामत करून दिल्हे पाहिजे म्हणून विदित केले. त्यावरून मनास आणिता तुम्ही या राज्यांत येकरूप निष्टेने सेवा केली आहे. पूर्वी समानगडाखाले उत्तरेकडील फौजा असमंतात मागे आल्या होत्या ते समई तुम्ही आपल्या जमावानसी किलेमजकुरी येऊन बहुतच केली. या फौजास नतीजा[1] लाविला. पुढेंही शेवा करून दाखवावी येसी

---

१ नतिजा = शिक्षा; पारिपत्य.

उमेद धरीत आहा. तुमचे चालवणे स्वामीस परम आवश्यक. यास्तव स्वामी तुम्हावर कृपाळु होऊन कर्यात माचे सरनाईकोचे वतन तुम्हास आजरामऱ्हमत करून दिल्हे असे. या वतनास हाक होन पन्नास व जमीन तीन प्रतीची पावणे दोन चावर. इ. इ.

(तपसोल)
तेरीख १७
जिल्काद सु।। इसने

---

**क्रमांक : १०** **दि. २४-९-१७२१**

रामभट बिन नरहरी भट आराध्ये या नावाच्या ब्राह्मणास आदिलशाहीत काही जमीन इनाम होती. शिवाजी महाराजानी वतने खालसा केली तेव्हा ही जमीन सरकार जमा झाली. आपला योगक्षेम चालत नाहीं, तरी आपणास काही जमीन इनाम द्यावी अशी विनंती सदर्हू ब्राह्मणाने छत्रपती संभाजी दुसरे याना केली असता त्यानी त्यास सहा गावी पंधरा बिघे जमीन इनाम दिली.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४८ प्लवनाम संवत्सरे आश्विन शुद्ध पूर्णिमा भानुवासरे क्षत्रीये कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत कोल्हापूर यास आज्ञा केली ऐसीजे. वेदशास्त्र संपन्न राजश्री रामभट बिन नरहरी भट उपनाम आराधे गोत्र वसिष्ट वास्तव्य क्षेत्र करवीर याणी किले पन्हाळाचे मुक्कामी स्वामी सन्निद्ध विनंती केली कीं आपणास पूर्वी इदलशाही कारकीर्दीस गांवगन्ना इनाम बहुत होता. त्या उपरी राजश्री---थोरले कैलासवासी स्वामीस हा देश हस्तगत जाला ते काली इनाम तकूब ठेऊन धर्मादाय दिल्हे होते. त्या अलीकडे धामधुमेमुळे धर्मादायेही पावतनासे जाहाले. आपला योगक्षेम चालिला पाहिजे. कुटुंब वत्सल आहो. माहाराज धर्मपरायेण आहेत. पूव आपणांस इनाम होता त्यापैकी कांहीं भूमी इनाम करून दिल्हे पाहिजे म्हणून विदित केले. (म्हणून इनाम दिले. इत्यादि)
तेरीख १३ जिल्हेज सु।। इसन्ने आश्वीन मया.

---

**क्रमांक : ११** **दि. २५-१०-१७२१**

छत्रपती संभाजी दुसरे यानी रामदास संप्रदायी शंकराजी गोसावी यांस मौजे पारगांव येथे मठ बांधून राहण्यास तीस बिघे जमीन इनाम दिली. पारगावीं रामदास स्वामीनी देवाच्या मूर्तीची स्थापना करून देवालय बांधले होते. नंतर धामधुमीत देवालय उध्वस्त झाले परंतु मूर्ति सुरक्षित राहिली.

स्वस्तिश्री राज्यभिषेक शके ४८ प्लवनाम संवत्सरे कार्तीक बहुल प्रतिपदा[1] भोमवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान भावी सुभा प्रांत पनाळा यास आज्ञा केली ऐसीजे. श्रीमंत रामदास स्वामीचे संप्रदाई राजश्री शंकराजी गोसावी याणी किल्ले पनालेचे मुकामी स्वामी संन्नीध येऊन विदित केले की मौजे **पारगाव** येथें स्वामीनी पुरवी श्री देवाची मूर्ती करून स्थापना केली **होती**. देवाचे देवालय बांधिले होते. आलीकडे धामधुम विशेष जाहली. देवालय मोडले. परंतु श्रीची मूर्ति अद्यापी आहे. ऐसीयास आपण तेथें मठ बांधोन राहू. श्री देवाचेही पूजा पुरस्कार यथानुकूल चालवून. माहाराज धर्मपरायण आहेत. कांही भूमि स्वास्थ करून दिल्ही पाहिजे म्हणून याणी विदित केले. त्यावरून शंकराजी गोसावी श्रीमंत स्वामीचे संप्रदाई बहुत भले भगवत भजेन करून काल सार्थक करीत आहेत. याचे मठ बांधण्याची आनकूलता होऊन हे तेथें राहिले म्हणजे श्री देवाचीही पूजा चालेल व हेही तेथे भगवत भजेन करून असतील. येणेकरून श्रेयस्कर आहे. यास्तव शंकराजी गोसावी यासि नूतन इनाम कुलबाब कुलकानू खेरीज हकदार व इनामदार करून गावगन्ने जमीन तीन प्रतीची व भात जमीन ( तपशील आहे ). एकूण तीस बिघे रास इनाम आजरामऱ्हामत करून दिल्ही असे. तरी तुम्ही सदरहू प्रमाणे जमीन मोजून चतु:सीमा करून याचे स्वाधीन कर्णे आणि इनाम यासि व याचे सिष्य परंपरेने उत्तरोत्तर चालवणे. सालदरसाल ताजा सनदेचा उजुर न करणे. या सनदेची तालीक लेहोन

---

१ जंत्री प्रो वार " बुधवार " पडतो

घेऊन असल सनद भोगवटीयास शंकराजी गोसावो या जवळी परतोन देणे. जाणिजे निदेश समक्ष.

तेरीख १४

मोहोरम सुहुर सन इसनं आर्बैन.

---

**क्रमांक : १२** **दि. २८-१-१७२२**

ता॥ आजरे येथील संभाजी देसाई यास शिवाजी घोरपडे "अमीरुल उमराव" यांचे पत्र. यात सिवापुरावर लष्कराचा मुक्काम झाल्याचा उल्लेख आहे.

श्री

मा॥ अनाम राजश्री संभाजी खंडो देसाई ता॥ अजरे यासि सिवाजी घोरपडे अमीरुल उमराव सु॥ इसने अशरीन मया अलफ. तुम्हाकडेस गाव दोन मौजे मुनोवाडी इनाम व अरदाल चालत असे. त्यास लस्कर सिवापुरावर मुकाम जाहला. खर्चाचे वाडी ब॥ तुम्हापासून घेतले रु॥ १०० घेतले. त्यास मौजे माार ऐवजी घेतला. सन सलास दुसाला लस्करचा व माहलचा ऐवजी जमा असे. तुम्हास माहालाकडून व लस्करचा उपद्रव लागणार नाही. लावणी संचणी गावची अबादानी करणें कोण अंदेशा न धरणें. जाणिजे. रा. छ २१ माहे रबिलाकर मोर्तब आहे.

| राजशके | शालिवानशके | प्लवनाम संवत्सर |
|---|---|---|
| ४८ | १६४३ | |

---

**क्रमांक : १३** **दि. ५-२-१७२२**

प्रांत मिरजेचे देशमुखीचे वतन पिराजी घोरपडे सेनापती याना पूर्वापार प्रमाणे देण्यात आले आहे म्हणून संभाजी दुसरे यांचे देशमुख व देशपांडे प्रांत मिरज याना आज्ञापत्र.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४८ प्लवनाम संवत्सरे फाल्गुन शुध प्रतिपदा इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति

| श्री शंभु छत्र प ति हर्ष निदान रघुनाथ सुत तिमाजी पंडीत मुख्य प्रधान | श्री आई आ दि पुरुष श्री राजा शंभु छत्रपती स्वा मी कृपानीधी तस्य कृष्णाजी परशरा म प्रतीनीधी |
|---|---|

स्वामी याणी देशमुख देशपांडे प्रांत मिरज यास आज्ञा केली ऐसीजे. राजश्री पिराजी घोरपडे सेनापति हुजुर स्वामीच्या दर्शनास आले. स्वामीनी दर्शन देऊन समाधान केले. यैशास प्रां मारचे देशमुखीचे वतन कैलासवासी राजश्री स्वामीनी रा संताजी घोरपडे यांस पेशजो दिल्हे आहे त्यांचा भोगवाटा चालत आला आहे. त्या प्रा रा सेनापतिकडे देशमुखीचे वतन चालवावयाची आज्ञा करून आज्ञापत्र सादर केलें असे. तरी पूर्ववत भोगवटा प्रा देशमुखींचा अमल मारनिलेकडे चालवणे निदेश समक्ष.

मर्यादेयं
विराजते

रुजु सुरु निवीस
सुमा सुद्र बार

---

**क्रमांक : १४** **दि. ११-२-१७२२**

आपणास चोवीस रुपये मिळाल्याचे सावंत आणि हणगोजी यादव दि।। सुभेदार हे प्रतापजी घोरपडे याना लिहून देतात.

श्री शंकर

राजश्री परतापजी घोरपडे गोसावी यासी कबूल यैसाजे. सावंत व हणगोजी यादव दि।। रा।। सुभेदार सु।। इसने अशरीन अलफ. उपरी तुम्हाकडे गावकरानी रु।। २४ चवीस देविले. त्या पैकी रसद रु।। २२ व मसाला रु।। २ येकून रुो चवीस आम्हास पावले. तुम्हाकडे कांही

राहिले नाहीत. झाडेनिसी चवीस रुो पावले. जाणिजे छ ५ माहे जमादिलावल.

---

**क्रमांक : १५** दि. २२-३-१७२२

कृष्णाजी भास्कर पंडीत याना कृष्णाजी परशराम प्रतिनिधि यानी दिलेल्या ह्या इनाम पत्रांत कोकणांत झालेल्या कुडाळकर सावंताच्या धामधुमीचा उल्लेख आहे.

मा। अजद हवालदार व कारकून वर्तमान भावी सिका ता। साळसी यासी कृष्णाजी परशराम प्रतिनिधि सु॥ इसने आशरीन मया व आलफ. राजश्री कृष्णाजी भास्कर पंडित याणी किले विशाळगडचे मुकामी हुजुर विदित केले की मौजे इळे ता। मजकूर येथे आपले ठिकाण बागाईत इनाम पूर्वापर चालत आहे. त्यास आम्हाकडे कोकण प्रांती कुडाळकर सावंतची धामधुमी जाली ते प्रसंगी इनामपत्रे होती ती गेली. त्यास स्वामीनी कृपाळू होऊन नूतन पत्रे करून दिली पाहिजे म्हणोन. (वतन दिले तपशील).

छ १५ जमादिलाखर निदेश समक्ष.

---

**क्रमांक : १६** दि. ५-६-१७२२

मौजे हानुर हा गाव राणोजी घाटगे सर्जेराव याना दिला आहे, तरी त्यांच्या आज्ञेप्रमाणे वागावे म्हणून जयसिंग जाधवराव (चंद्रसेन) सेनापती यांचे मोकदम मौजे हानुर यांस पत्र.

श्री रामचंद्र

सिका तालीक

आज्ञापत्र समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री जयसिंग जाधवराऊ सेनापति अमलनमुलुक तश मोकदमामी मौजे हानुर

प्रांत कागल सु॥ सलास आसरेन आलफ. मौजे मजकुरी पेसजी राजश्री पिराजी घाटगे सर्जाराऊ देसाई प्रांत मजकूर यासी मौजे मजकुर पेसजी इनाम होते. तो मशारनिले मृत्यु पावले. त्यावरी त्याच पुत्र राजश्री राणोजी घाटगे सर्ज्याराव देसाई हुजूर येऊन रुजू जाहाले. त्यावरुन मानुले यास मौजे मजकूर इनाम पेशजी प्रणाम करार करून याच दुमाला करून दिल्हा आस. तरी तुम्ही सुदामत चालली प्रमाण वर्तणुक करणे. जाणिजे. रा छ १ माहे रमजान. मोर्तब.[1]

---

क्रमांक : १७ दि. २८-११-१७२२

छत्रपती संभाजी दुसरे यानी तिमाजी रघुनाथ याना कोट कोल्हापूर येथील सबनिशी दिल्याचे रखमाजी सालोखे, हवालदार व सेनाधर कोट कोल्हापूर यास आज्ञापत्र.

स्वस्तिश्री राज्याभीषेक शक ४९ शुभकृत नाम संवत्सरे मार्गशीर्ष शुध प्रतीपदा सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री रखमाजी सालोखे हवालदार व सेनाधर कोट कोल्हापूर यास आज्ञा केली येसीजे. कोट मजकुरी पेशजी रंगो यादव सबनीस होते. त्यास दूर करून राजश्री तीमाजी रघुनाथ हे राज्यातील पुरातन परंपरागत सेवक महत्कार्यकर्ते याणी पनालीयाचे मुकामी वीनंती केली आपणास उतम क्षेत्री घरठाव करून राहवया योग्य येकस्थली वतनी कार्यभाग सांगीतला पाहिजे म्हणून. त्यावरुन मशारनिले पुरातन. यात्रे स्वामीस परम आवश्यक. यास्तव यावरी स्वामी कृपाळू होऊन कोट मजकूरची सबनीसी वतनी वंशपरंपरेने दिली असे. सबनीसीचा धंदा चालवायाबद्दल मशारनिले आपला मुतालिक ठेवीतील. ते व तुम्ही येकमते राहोन स्वामीकार्य निष्टेने करीत जाणे. यास वेतन देखील चाकर व भोई सालीना होन पादशाही ७०० सातसे

---

१ याच तारखेची व आशयाची, मौजे दिगरज, मौजे मांजरी व मौजे सावर्डे बुद्रुक राणोजीच्या स्वाधीन केल्याची चंद्रसेन जाधव यांची पत्रे उपलब्ध आहेत

होन रास केले आहेत. इस्तकबील पैवस्तगी पासून वजा व वाड दंडक प्रमाणें करुन उरलें वेतन सिरस्ताप्रमाणे माहे दर माहे पावीत जाणें. चाकर व भोई तैनातीचे मोईन प्रमाणें ठेऊन हाजीर होतील त्यां दिवसापासून चाकर व भोई यांचा हक दंडीक प्रमाणे पावीत जाणें. कागद व हा शाही शोरे साक बज मोईन प्रमाणे चालवीत जाणें. जाणीजे. निदेश संमक्ष ( इत्यादि ).

तेरीज २९ सफर सन सलास आर्बैन[1] मया अलफ.

---

**क्रमांक : १८**　　　　**दि. २१-१-१७२३**

रघुनाथभट नूलकर या पुराणिकास छत्रपती संभाजी दुसरे यानी मौजे नांगनूर येथे तीन बिघे जमीन इनाम दिली. रघुनाथ बुवा छत्रपतीना पुराण सांगत असत.

श्री

सिका आसे

स्वस्ति श्री राज्यभिषेक शक ४९ शुभकृत नाम संवछरे पौष बहुल येकादसी इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपती स्वामी याणी वेदशास्त्र संपन्न राजश्री रघुनाथभट विन बाळंभट उपनाम नूलकर गोत्र वसिष्ट सूत्र आश्वलायन वास्तव्य संखेश्वर यास दिल्हे इनाम पत्र ऐसेजे. तुम्ही करवीरचे मुकामी स्वामी संनीध विनंती केली कीं आपण

सिका पेशवेचा लंब घाटो

सिका प्रतिनिधीचा घाट वर्तुळाकार

कुटुंब वत्सल आहों. कांहीं योगक्षेमाची अनकूलता करून दिधलियाने तेथे उत्पन्न होईल ते अंन भक्षून स्नान संध्या करून स्वामीस व स्वामीच्रे राज्यास कल्याण चिंतून राहोन म्हणून विदित केले. त्यावरून मनास आणिता तुम्ही बहुत थोर विद्यापात्र श्री स्वामी यासि पुराण सांगत

---

१ 'अशरीन' पाहिजे.

आह्मां. तुमचे योगक्षेमाची अनकूलता करून दिधलियाने स्वामीस बहुत श्रेयस्कर. (म्हणून वतन दिले बिघे ३).

तेरीख २४

रबिलाकर सुमा सलास आश्रैन.

---

क्रमांक : १९ दि. २५-५-१७२३

रामचंद्रपंत अमात्य यांच्या मृत्युनंतर त्यांचे तीन पुत्र भगवंतराव, आप्पाजीराव व शिवराम या तिघांमध्ये झालेले पंतांच्या मिळकतीचें विभाजन पत्र.

तालकची तालीक असे

श्री

हिशब वाटणी राजश्री भगवंतराऊ रामचंद्र व राजश्री आपाजीराव रामचंद्र व राजश्री सिवराम रामचंद्र सुमा आर्बा आशरीन मया अलफ. छ १ रमजान जेष्ट शुद्ध प्रतिपदा[1] शोभकृतनाम संवत्सरे

श्रीदेव मोघम उभे रासीस

श्री रघुनाथ पंचायतन मुर्ती सोन्याच्या अलंकारसहीत मूर्ति सुमार अकरा ११. यासी अलंकार

दागिने-

१ कुडक्याची जोडी थोर

१ प्रभावलीस बांधिली पोची जडित

किता देव यैंत्र

यैंत्र श्री रघुवीराचे गीतेची पेटी

| यैंत्र बु॥------ | सान्याची |
|---|---|
| १ | १ |
| हणमंताचे यैंत्र----- | नवग्रहाचे यैंत्रे----- |
| १ | २ |

---

१ रमजान जेष्ठ शुद्ध द्वितीया पाहिजे.

१ पाचेचे पदक
२ मोत्याच्या माळा
१ प्रभावळी रुप्याची
७

१ छत्र्या आपदागिरे व निशाणे सोनेची
७

१ धुगधुगी
८

उपकर्णे उछहा साहित्याची व किरकोळ तकदमा रुपे
वजन ८८१॥
मूर्ती तांबे पितळी व रुपेच्या व शालग्राम पंचायतने कास्मिरी लिंगे बाण गणेश सूर्यकांत बरहुकुम जाबता वडिलाकडे आहे. मूर्ती शाळ ग्रामच्या १
मालवणी पंच्यायतन ताईचे वडिली ठेविले होते ते घेऊन अले. श्री रघुवीर
मूर्ती तांबे शाळग्राम
५
किरकोळ देव.
१

अलंकार
१ पदक
१ छत्री निशाणे

शनेश्वराचे येंत्र गोप सुवर्ण
श्रीदेव रेणुका टांक सोनेचे छत्री निशाण आपदागिरसहित प्रभावळी सारखा संपुष्ट रुपे
१

तीर्थरुप पंताचे देव शालग्राम ५ पंचाइतन बांधीव साकळी----
१

वस्ता देवाच्या
३ संपुष्ट सोन्याचे
संपुष्ट थोर लाहान
२ १
१ शंख बांधीव दक्षणावर्त
२ रुपे दागिने
१ कमल
१ देव्हारपाट
२
१ जडित फुल मिनेगारी
१ छत्रो निशाणे आपदागिरी सोन्याची
८

तोर्थस्वरुप राजश्री भाऊ बाबा देव----
श्री रघुनाथ पंचायतन शालग्राम पितळी गणेश सूर्यकांत बाण
१ व दोन देव
१

अलंकार
१ पदक हिरकण्याचे----
१ प्रभावळीस दागिने रुपे

आप्तागिरे सोन्याची—— २ निशाणे
१ प्रभावळ थोर पितळी छत्री १ छत्री
निशाणे सहित रुपे—— २ आपदागिरे

३ ५ ७

मूर्ति नि॥ वस्ता नि॥ २
रा॥ आपाजी राऊ राजश्री
भगवंतराऊ

पुस्तके वडिलांचें वेळेची

किता पुस्तके सुमार
२ भारत प्रती
२ भागवत प्रती
२ रामायण सप्तकांडें प्रती
१ कर्म विपाक
१ नारायण भटी

८

आष्टादश पुराणे याची पुस्तके व मास माहात्म वृतकाच्या पोथ्या
१
किरकोळ प्राकृत ग्रंथ व संस्कृत ग्रंथाची पुस्तके
१
राजश्री भाऊ कडील पुस्तके
मोघम आहेत
१

खासा वडिलांची व मातुश्रीची पुस्तके

खासा मातुश्री

ऐन तक्षिम तिसेरी ब॥ हिशेब जाबता

सोने वजन तोळेवार
८॥। ८॥। ३॥। १

मोत्ये ऐन बेरीज वजन तोळेवार
८८ १॥ १॥। १ ८=

रुपे ऐन बेरीज
११८९॥।३॥। १॥।

जवाहीर वस्ता किंमत तकदमा बा॥ जाबिता ऐन बेरीज होन
३०९४॥।

तांबे पितळी कासे वजन शे र (?) कापड किमत होन
४।।। ।।। ४।।। ४६५

हात्यारे उंच
६
पै।। वजा ता २ या
४
बाकी सिवराम पंडित

१ माहाराजानी दिल्हा पटा
पटा उंच सर्ज्याखानी
१ निमचा परज सोन्याचा
२
घोडी लहान थोर
२९
ऊंट वासरे
६ १

खिलारे गुरे
२६ बैल
४५ म्हसी. गाई लाहान-थोर
७१
कुणबिणी ३९
चुका वजन
१।।
या खेरीज वस्तभाव जवाहीर नगद कापड जडित वस्तभाव हात्यरे गला वाटणीस रुजु न करिता परभारे ठेविले त्याची तक्षिम येणे

## फरासखाना

### जडित दागिने

पदक निळाचे थोर
किमत तकदमा रुपये
नीळ थोर उंच मोती लडकेत थोर
१ १
साखळी दुहेरी सोनेची
१
ט

कडदोरा सोनेचा बा। देवची चवड किमत अजमासे शो १६००
पै।। खुरुस येक वाटणीस आला किंमत शो ९० बाकी शो १५१०

किता वस्ता साध्या व मोत्याच्या
व खडे सहीत

कडदोरे सोनेचे ऐन सिलकेस येक
बा। निळकंठ भट्ट लेले यकूण वजन
वजन ८८३ ८८१८५।।।≡

कुडक्या जोड बा। देव
चिंचवड बा।। किंमत
रुा ८०

दागिने सोनेचे नि।।
आमा
१ साकळ्या जोड
१ रुल जोड
१ ताईत साकळी
१ ताईत बु।।
२ ताईत खुर्द
१ साकळी
४

---

१ साकळी गोवई फुलाची
सौ।। गोदूबाई
१ काप जोड नकसी
२ मदनाईक माणीक
४४ मोत्ये घेर यास २९
२ साखळ्या
४८

---

१ बिजवरा चंद्राकार
१ माणिक चंद्राकार
१ पाच लाहान
५ लडकती मोत्येची
१ साखळी दुहेरी सोने
८

---

दागिने बा। काडिव
१ आंबरसा
२ गोट
१ बोर टिकाची
४

सौ।। वेंकूबाईकडील
१ पेंडे मोती लगटियाचे
१ मदनाईक माणिक
६ चुफा
४ मणी लाखभरु
१२९ मोत्य खुर्द
२३ पोवळी

---

दागिना
१ बाळ्या जोड
१ दुलडीसर
९२ मणी लाखभरू
२ सोमासे
१ ताईत रुपेचा
९५

---

१ कंडा घोडीचा

| | राजश्री आपाजीराऊ |
|---|---|
| १ टाकण बाळ्या | १ कंडे सोनेची |
| २ ऐन घाट | १ वेला जोड |
| ४८ घोस सर ६ | --- |
| १२ मोत्ये | २ |
| २ आकडे | |
| ६४ | |

## ७

कैलासवासी पंत मृत्यु पावले त्यावेळेस जामदारखानियात शिलक

| नकद होन नाणे | किता चिटी नाणे |
|---|---|
| ८० सितारामी | ॥ मोहर ॥६ |
| ३८ निशाणी | २५॥ पुतळ्या १०२ |
| १७ मूर्तीचे | १ गवार ४ |
| ११ शिवराई | ३ सतळ्या ७॥ |
| २ सणगरी | ४ इभराळ्या १६ |
| १४८ | १८॥ फलक २८ |
| ५९॥ किता चिटी | ५२॥ |
| ५ सिवराई | १६३॥ |
| २८ प्रत | पै॥ लग्न राजश्री आपाजी |
| २४॥ प्रतापा ४९ | राऊ पुतळ्या २५ |
| २ निशाणी | |
| ५९॥ | बाकी १३८॥ |
| ७५ किता चिठी होन १७६ वजा लग्न राजश्री आपाजी राऊ १०० बाकी | कापड खासा व बाजे. भरजरी पासोड्या चादर |

५६३।। किता चिटी १०८८।।
वजा उतर कार्य ५२५
बाकी
‾‾‾‾
८४६

हत्यारे
११ तरवरा

दुपेटे
आष्टगोली सेले
किनखापे उंच
पटके जरी
ताडपत्री पासोड्या
जरी पातळे
कळसपाक सेले जरी
१ २
हतोचा गाशा जरी डगले
बुटेदार
पैठणी पासोड्या
भिरंमेच्या जोड्या
पाटाऊ
खासा पोशाख राजश्री पंतांचा व मातुश्रीकडील बासने मोघम.

१ तुल जातमल आबानाल (?)
१ नव टाकीत जानबा
नाल सोने (?)
१ राजश्री सिवराम पंताची
खुर्द
८ किता
‾‾
११

३ पटे
१ प्राा खोदला मुला(म)गीर
१ प्राा पटा खुर्द मुलामगीर
१ प्राा तनाल रुपे मेण
मखमली
‾‾
३

६ गुर्दे
१ हा। श्रीपतराऊ परज
मुलामात नाल रुपेचे
१ प्राा तनाल रुपेचे
१ प्राा नव्हेली परज
३ प्राा गुर्दे
‾‾
६

किता
मंदले तिवटे
चादरा
आष्ट गोली
सेले
भिरमे उंच
ताडपत्री
पैठणी पासोडी
इजारा
झगे
धोत्र जोडे
चिलखते
टोप

किता
पाटाऊ
पातळे जरी
साड्या
लुगडी
चोळ्या जरी
कळसपाक
शालु
ताडपत्री

२ दुकु —
२ गुपत्या —
६ निमचे --
१ प्रा मुलामा रुपे
१ प्रा परज सोन्याचा
तनाल मिनेगारी
४ किता प्रत
—
६

१ सैतीपान
१ गुर्गुज
१ वाघनकी
१ कतारा
१ बाऊ
९ कठारा व जमदाडा
१ प्रा गुलामगिरी
परजा सकट
१ खणवा मुलामा
सोनेरी तनाल
रुपेचे —————
१ जमदाडा मुलामा
रुपेचा
१ प्रा मुलामा सोनेरी
१ जमदाड रुपेचा
परज
१ जमदाड बराणपुरी
१ जमदाड सिकेची
१ कटार राजश्री
सिवराम पंडित

किता दागिने पितळे व
तांबे
कर्ग पितळी
देवरपाट.

हांडा पागे कडील
दिवटचा बुदल्या
कळस आपदागिरी
कुंड वैस्वदेव
पंचपात्र तपेली
थालिया खुर्द
तपेले बा। कातळी
तामण बा। कातळी
नगारे पंचरसी
पाटफुल्यांचे थोर
किता हात्यारे —————
बंदुख
गारभाडा
इटे
सैत्या
भाले
जेंजाळा
————
फरासखाना बाटणी
खेरीज रहिला —————

परजामास मुलामा
रुपेचा
१ कि॥ प्रा॥
—
९

३ खंजीर
२ बिचव्या

१८ सुऱ्या
७ सिंगाच्या मुठी
२ लाकडी मुठी
१ रुपेचे मुठीस
कापूर
३ काचेच्या मुठी
५ रुपेच्या मुठी
—
१८

३ कातऱ्या
३ खुरबान
३ ढाला
१ गेंडेची
१ सलेट
१ बा॥ राजश्री
सिवराम पंडित
—
३

३ करवत
३ परज
६ नाहावियाचे दागिने
४ नाचकणी
१ कात्री

जरी छामिना मखमली
किता सामिने
जरी आसमानागिऱ्या
किता गजनी व छटे
पडदे
जमखाने

तिवशा
बाजूच्या थोर लाहान्या
हाल्या पराच्या
उशा
तिवडी जरी

कापड बा॥ परड्या किमत
रुो ३००
कैलासवासी पंत गमावले तेव्हां
राजश्री भगवंतरायास
समजाविले नि॥ मादो
कबजी

| नगद रुपये | वस्ता |
|---|---|
| ४२५ मोहरा | १४ सोने |
| ३४ | ७ गोट |
| दर १२॥ | २ साकळ्या |
| ८६४ पुतळ्या | पाईच्या |
| २१६ | १ थाली |
| दर ४ प्रा | देवाची |

१ चिमटा
६
१४
पं॥ तक्षिमेस

४२० होन सिवराई
१४०
१७०९

१ तबकडी
२ संपुष्ट
१ साकळी
१४

२ नि॥ राजश्री भगवंत राऊ
१ तुळजा
१ किता
२

२ नि॥ राजश्री आपाजी राऊ
१ नवटाको
१ किता
२

२ नि॥ राजश्री सिताराम पंडित
१ पटा बु॥
१ निमचा परज सोने
२

६

किता दागिने
१ काठ्या रुप्याच्या भालदार
४ चवऱ्या मुठी रुप्याच्या
२ मोरचले रुप्याच्या मुठी
७

१ मोत्याची माळ मोत्ये १३०
६ तांबे दागिने
४ हांडे
१ गंगाळ
१ तपेले
६
२१

बाक वाटे ह.णे ८४

ठेवणी परभारे होती

श्री देवीची चवड
५००० मोहरा
४०० दर १२॥
३६३५ होन १२११॥
दर ३ पा॥

मोरभट माभळेश्वर पै॥ ठेविले होते.
रुा
६४७८।
नि॥ नार परभू रुा

३१९ किता होन
निशाणी
१५९।।
दर २ प्रो
६२० रुपे ८।। ४।।। ५।।। २।
७———

३१२।। मोहरा २५
३०० होन १००
४ पुतळी १
———
६१६।।

———
९५७४
पौ।। राजश्री भगवंतराव याजकडे आले.
१६०० कडदोरा
११३५ घोडे
९०० किता
२३५ किता
———
११३५
६८१ कापड
३०३ किता
३७८ किता
———
६८१
२८ बा।। मु।।
२००० नकद
———
५४४४
बाकी येणे देवाकडे
४१३०

नि।। खानवलीकर भांडे
तांबेचे सुमार २७———
रायगडचा रायगडी व
माहाडचे माहाडी
चिपळुणचे चिपळुणी
ऐवज आहे———
१
राघो नारायण याजकडील
रुो
१
याखेरीज लोकाकडील कर्जे
उगवलिया विभाग होणे
१००

तीर्थस्वरुप राजश्री भाऊकडील वस्तभाव सोने रुपे फरासखाना हात्यरे तांबे व पितळी आदमासे, किमत रुो
३०००

मातुश्री दाई मृत्यु पावली भाद्रपद वध प्रतिपदा राक्षसनाम संवछरे ———— रुो

३०० नारो हृणमंत
५०० गु॥ रघुराव नि॥ खंडोबा नाईक

८००

इनाम गाव व मुकासे वतन ————

नि॥ राजश्री भगवंतराऊ

| | नगद | गला कैली |
|---|---|---|
| रासिवडे | २१५ | ५९॥ |
| त्रिबक | २१६॥ | २० |
| जर्गी | १७॥ | १२ |
| आरळे | | |
| असडोली | १३० | ० |
| नाडगोंडी | | |
| बागवडे निमे | १०० | ० |
| मुर्गुड ताा आजरे | ० | ० |
| खराब | | |
| | ६७९ | ९१॥ |

नि॥ राजश्री आपाजीराऊ

| | नगद | गला कैली |
|---|---|---|
| पोंभुरले | २२८।· | ६२॥ |
| सेळोली | २९ | २१॥। |
| हातकलंगडे | १२५ | ९ |
| नाडगोडी ताा | १३० | ० |
| तारळे | | |
| वोझरे ताा आजरे | ० | ० |
| खराब | | |
| बागवडे निमे | १२० | ० |
| बाग मालवण | ३० | ० |
| | ६५१।· | ९३।· |

नि॥ राजश्री पंडित——

| | नगद | गला |
|---|---|---|
| चांदर | ४३४ | ५९॥ |
| कोकिसरे | १२८॥ | ३८॥ |
| धामणवाडी | २२॥ | ६॥ |
| नाडगोंडी हवेली | १०० | ० |

या खेरीज साळसीची सरदेशमुखी व खारा पाटणची सरदेशमुखी व अजरेचे देश कुलकर्ण व गाव कुलकर्ण

| | | | |
|---|---|---|---|
| कोलापूर गोकुळ सिरगाव खराब | ० | ० | यथा विभागे ऐवज होईल तो त्रिवर्गा नी वाटून घ्यावा |
| | ६८५ | १०४॥ | १ |

ब॥ यादी रवाना राजश्री अपाजीराऊ

सदरहू यादीची नकल असल यादी तीर्थरुपाजवळ आहे. त्याची तालिक गावचे वाटणीची---

मुकासे गाव वाटणी होणे गाव कारकीर्द

तीर्थरुप कैलासवासी

तर्फ असडोली
१ सांगरुळ
१ तिसंगी
१ माणबेट
१ बोरबेट
१ सावरवाडी
५

तर्फ साळसी
१ दिगवले
१ फोंडे
१ असिर्ये
१ कलमट
१ हरकूळ
५

सावगांव खुर्द तर्फ हुकेरी
१

पाल तर्फ कापसी
१

तिथवली तर्फ खारेपाटण
१

दाभिळ तर्फ अजरे
१

मुरादपूर तर्फ देवरुख
१

तर्फ हरचरी
१ कसबा
१ सोमेश्वर
२

तर्फ संगमेश्वर
१ तुरधवडे
१ सरप
१ कडबई
१ बुरवाड
१ उतर
५

नि॥ अपाजीराऊ
नंदगाव तर्फ हवेली
१

तर्फ वाटेगांव
१

बागाईत ता साळसी बागनजिक — ( कोरी )

१ तेरीज गांव

| | | |
|---|---|---|
| बाग मिटबाव | वाडा कसवा | ५ ता असडोली |
| बाग दाभोळ | आचरे | १ पा हुकेरी |
| १ | १ | १ ता कापसी |
| | सेत ठिंकाण | १ ता खारेपाटण |
| | खजिना मौ ॥ | १ ता आजरे |
| | तोडवली | २ ता हरचीरी |
| | १ | १ देवरुख |
| | | ५ संगमेश्वर |
| | | ५ साळसी |
| | | २२ |

या खेरीज वतने त्या राज्यातील

कल्याण भिंवडीचे वतन

काष्टी तांदळीचे कुलकर्ण व जोतीष

अवांतर वतने याची यादी पत्रे तीर्थरुप राजश्री रायाकडे आहेत ती यथा विभाग प्रा चालवावी.

परभारे संस्थाने——
जंजीरे रत्नागिरी त्या जागा राजश्री रामराव होते नि॥ राजश्री भगवंतराऊ.

किले बावडा संस्थान नि॥ खासा राजश्री —— राऊ

संस्थान नरगुंद व रामदुर्ग पागा व किले नि॥ राजश्री आपाजी सुरो व राजश्री रामराऊ याचे स्वाधीन गाव व खेडी मुलुकगिरी पागा.

किले बावडा संस्थान नि॥ खास राजश्री———राऊ सवसारिक पनाळा नि॥ राजश्री नारो हणमंत. पागा नि॥ वेंकटराऊ

किता

वाटणीसमई माहाराज राजश्री

वतनोपत्रे व पादशाई फरमान व

छत्रपति स्वामीस नजर केली.
मोत्याची जोडी थोर
जवाहीर
सोनं
रुपे
याची यादी तीर्थरुपाजवळ आहेत.

माहाराजाच्या सनदा वडिलाचे वेळेच्या वडिला जवळ आहेत—

कलम
१

तक्षिमा जालियाचे जाबिते धण्याचे सिके सहित त्रिवर्गाची पत्रे तीर्थरुपा जवळ आहेत.

गला सिलक कोटीस खंडी

| सिलिक बुधरगड | | सिलिक किले गगनगड | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | किता | | किता | |
| ३३॥।४।:= | भात | ३८३८३ | भात | ८२८॥ | वाटाणे |
| ५।१। | नागली | ४॥३८३ | नागली | ·॥·४।१ | दाळ तुरी |
| ६·॥· ॥= | सावे | ·॥।१॥१ | वरी | ·॥।·३॥२ | चवाळचा |
| ४५॥।१॥ | | ·॥।·४॥।·२ | उडीद | ·।१८१ | गहू |
| ७ | | ·।१॥२ | दाली | ·॥१८१ | मसूरा |
| ४५॥।·१॥ | | ८२।३॥ | हरभरे डाळ | ८१॥ | दाळ चवाळी |
| २११।३॥· | | ८१॥·॥ | वाटाणे डाळ | ८८२॥ | तुरी |
| ६६॥।२॥।३॥ | | | | ८॥· | तुरी |
| | | ८३८३ | हरभरे | ८।१। | मोहरी |
| | | ७॥।·२॥ | वरी | ८॥१। | पावटे |
| | | ८२८१ | तीळ | ८१।·॥· | सातु |
| | | १८।१८३ | | २॥।·॥ | |
| | | | | ७ | |
| | | | | २१८१।३॥· | |

**क्रमांक : २०** दि. २८–९–१७२३

संभाजी दुसरे यांचेकडून अंताजी त्रिमल यास ताा आरळे या महालाच्या सरदेश कुलकर्णी वतनाची सनद. यात अंताजीने राजाराम जिजीत असताना त्यांची सेवा केल्याचा उल्लेख आहे.

स्वस्तिश्री राज्याभिशेक शके ५० शोभकृत नाम[1] संवत्सरे आश्विन शुद्ध विजया दशमी मंदवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी यानी राजश्री अंताजी त्रिमल गोत्र वशिष्ट यासि दिल्हे वतनपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन कार्यकरते सेवक. तीर्थस्वरुप राजश्री कैलासवासी स्वामी चंजी प्रांते असता त्यांची शेवा मनोभावे करून त्यांची कृपा संपादून घेतली होती व राजश्री शिवाजी राजे दाजी यांचीही शेवा बहुत केली व स्वामी राज्यासनारूढ जालिया पासून रात्रीदिवस एकरूप निष्टेने शेवा केली. जे काळी महत कार्ये राज्याभिवृधी विषई तुम्ही केली ते समई तुम्हास स्वामी बकसीस देत असता तुम्ही सरदेश कुलकर्णाचे वतनविषी विनंती केली कीं सरदेश-कुलकर्ण म्हणजे पुरातन खालिसा[2]. त्यास इदलशहा पातशहा याणी राजश्री काशी जानंतरायास मऱ्हामत केले होते. ते भोगवटा करीत होते. आलीकडे हे राज्य थोरले माहाराज राजश्री----कैलासवासी स्वामीस हस्तगत जाले त्यादारभ्य वतनावरो त्याचे कोणी आले नाहीं. असोयास ताा अरले प्रांत तारले येथील सरदेश कुलकर्णाचे वतन स्वामीनी मऱ्हामत करून दिल्हे पाहिजे म्हणून तुम्ही विदित केले. त्यावरून तुम्ही स्वामीचे एकनिष्ट सेवक स्वामीच्या पायाविना आन्य जाणत नाहीं. निष्टापूर्वक त्रिकर्ण शुधीने शेवा करीत अहा. तुमचे वशपरंपरेनें चालवणे हे स्वामीस परम आवशक यास्तव स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन ताा आरळे सुभा प्रांत तारळे या महालीचे सरदेश कुलकर्णाचे वतन तुम्हास आजरामऱ्हामत करून दिल्हे असे. या वतनास हक लवाजिमा इनाम जमीन.

---

१ शोभन संवत्सर पाहिजे; २ हक्क.

हक्क लवा जिमा

| | |
|---|---|
| हक दिवाण दस्त गावगना | जकातोस विस्वा दर बैली रुके |
| देखील पेटा आकार होईल | भुसास साधीका ८१॥ |
| ते बेरिजेस दिवाण दस्ता | केण्यास तीन ८३ रुके |
| खरीज दरसदे रुपये २ | कापड ८४॥ रुके |
| दोन | पानाच्या नगास दर |
| तेल्याचे घाण्यास तेल दंडक | नगी पाने विडियाची |
| प्रमाणे घेत जावे कलम | सुमार पनास ५० |

इनाम गाव देह २१ येकूण इनाम जमोन (तपशील दिला आहे)

यंणेप्रमाणे हक दरसदे २ रुपये व जकायेत विस्वा भुसास सापीका व केण्यास ३ रुके व कापड ४॥ साडे चार रुके व पानाच्या नगास पाने सुमार ५० पनास व तेल्याचे घाण्यास तेल पुरातन दंडक प्रमाणे व इनाम देह २१ एकवीस एकूण जमीन चावर एक याप्रमाणे हे वतन तुम्हास मऱ्हामत करून दिल्हे असे. या वतनास हक लवाजिमा पान मान सालाबाद पूर्वापार चालत आले असेल त्या प्रमाणे आन-भवने वतनाची सेवा करणे आणि हे वतन तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन सुखरूप राहाणे. निदेश समक्ष.

तरीख ९ मोहरम सु॥ आरबा

आशरेन मया

---

**क्रमांक : २१** **दि. ८-११-१७२३**

**श्री करवीर क्षेत्र हे महालक्ष्मीचे अनादि वास्तव्य स्थान. परंतु धामधुमीच्या काळात पूर्वीचे देवालय सोडून देवीची मूर्ति एका पुजाऱ्याच्या घरी ठेवली होती. सांप्रत देवीने स्वस्थली बसण्याचा साक्षात्कार दिला, तेंव्हा मूर्तीची स्थापना देवालयांत करण्याविषयी छत्रपती संभाजी दुसरे यानी सिदोजी हिंदुराव घोरपडे याना आज्ञा केली. आज्ञेप्रमाणे त्यानी दि. २७-३-१७१५ या दिवशी स्थापना केली. देवीच्या 'पारंपत्याचे प्रधानत्वा' चा अधिकार छत्रपती यानी नरहरभट सावगावकर यास दिला. याच दिनांकाचे याच मजकुराचे आज्ञापत्र देशाधिकारी आणि कारकून सुभा प्रांत कोल्हापूर यास दिले आहे.**

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५० शोभकृत नाम[1] संवछरे कार्तीक बहुल सप्तमी भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी वेदशास्त्र संपन्न राजश्री शिवराम भट यांचे पुत्र राजश्री नरहरिभट गोत्र काश्यप सूत्र आश्वालायन ऋक् शाखाध्याई उपनाम सांवगावकर वास्तव्य श्री करवीर यास आज्ञा केली येसीजे. तुम्ही स्वामी संनीध किले पनाळाचे मुकामी विदित केले कीं श्री–वास्तव्य करवीर हे आनादि क्षेत्र. त्यास आवांतराचे योगास्तव बहुत दिवस पुर्वील देवालय सोडून पूजारी याचे घरी होती. त्यास पूर्वी राज्य विजापूर आदील करून स्वस्त होते. थोर थोर नामांकित ग्रहस्त होते. परंतु पूर्वस्थली श्री–ची स्थापना कोणी केली नाही. सांप्रतकाली देश उद्वस राज्य स्वस्त नसता श्री–ने आपणास साक्षात्कारे प्रेरणा करून आपले स्थली बैसावे हे इछ जाली. हे वृत स्वामीस पूर्वी आपण विदित केले. त्यावरुन स्वामीनी राजश्री सिदोजी हिंदुराव घोरपडे ममलकतमदार यास श्री––चे स्थापने-विषई आज्ञा केली. त्यावरून राव मारनिले करविरास येऊन मन्मथ नाम संवछरी आश्वीन शुध विजया दशमी इंदूवासरी[2]. श्री––ची स्थापना पूर्वस्थली देवालयात सुमुहूर्ते केली. येसीयास श्री––म्हणजे आनादि स्थल. येथे विषेषात्कारे यथाविध पूजा जालिया राज्याभिवृधि होऊन स्वामीच्या कीर्तीचा विस्तार वाढतो. तरी पूजा उत्साहास पोक्त ऐवज करून देऊन श्री––च्या पारपत्यावरी आधिकारी करून ठेवलिया उत्तम पक्ष आहे म्हणून तुम्ही विदित केले. त्यावरून मनास आणिता यथार्थ. श्री––म्हणजे आनादिस्थल पुराण प्रसिध जागृत. येक काशी क्षेत्र की करवीर या पेक्षा दुसरे स्थल विशेष आहे यैसे नाही. या स्थली विधपुरस्कर पूजा उत्साह जालियाने स्वामीस व स्वामीच्या राज्यास बहुत कल्याणावह. असे जाणून तुम्ही बहुत थोर वेदशास्त्र संपन्न कर्मनिष्ट श्रीच्या पूजेचे विधान शास्त्र मर्यादा जाणत आहां. तुम्हासारख्या सत्पात्राच्या स्वाधीन श्रीचा आधिकार केलिया योग्यते-नसार विधिपुरस्कर श्री––ची पूजा चालवाल. यथाकाले उत्सव करून

---

१ शोभन संवत्सर पाहिजे.

२ दि. २७–९–१७१५.

राज्याचे कल्याणाभिवृधी चिंताल. हेच स्वामीनी चितात आणून श्री--चे आज्ञेवरून श्री--चे पारपत्याचे प्रधानत्वपणाचा आधिकार तुम्हास वतनी पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालावा येसा निर्वाह करून हे सनद सादर केली असे व श्री--चे पूजा सामग्रीस व काळकाळाचे ठाई उत्साह समयोचित येथाकाली ब्राम्हणास अनउदक पावावे. श्री--ची पूजा उत्साह संम्यक प्रकारे चालावा यास्तव स्वामीनी नूतन इनाम गाव कसबा सावगाव व ता। हवेली येथील कसबा व पेट केसापूर चौथाईचा ऐवज इनाम सर्वमान्य बी तपसील--

इनाम कसबा सावगाव बु।। ता। हुकेरी प्रांत कोल्हापूर येथील पेठ व दुर्गाधिष्टान समणो कुलबाब कुलकानु हाली पटी व पेस्तरपटी जलतरु पाषाण निधिक्षेपसहीत खेरीज हकदार व इनामदार करुन पूर्वमर्यादेप्रा। इनाम सर्वमान्य कसबा देखील कसबे याची जकात देह १.

ता। हवेली पैकी चौथाई
कसबा कोल्हापूरचे आकारास
जुनेरी[1] मोहतर्फा जकायत
टाकसाल पानसाल[2] ठोकरा
व कर आधि करुन खंड
पैदास्त गुन्हेगारी पडिले
पान खेरीज हकदार व इनाम
-दार वतन खेरोज करुन
आकाराची चौथाई बेरीज
कलम
१

पेट केसापूर येथील चौथाई
ऐवज बाग कसबे म।।
मोहतर्फा व जुनेरी
जकायत खंड पैदास्त
गुन्हेगारी पान-साळ[3]
पडिले पान खेरीज
हकदार व इनामदार
आकाराची चौथाई
बेरीज कलम
१

---

१ जुनेरी = जुने हुकेरी, होनाचा एक प्रकार.
२ पानसाल = सम पातळीत असलेली जमीन.
३ पाण-साळ = पाटलाचाच एक हक्क.

येणे प्रमाणे कसबा सावगाव व इनाम व कसबे कोल्हापूर येथील चौथाई ऐवज सर्वमान्य करुन दिल्हा आहे. या खेरीज पूर्वी मौजे कुरड व मौजे उंचगाव ताा हवेली हे दोन गाव इनाम पेशजी श्री----कडे दिल्हे आहेत. तरी तुम्ही सारा ऐवज आणऊन श्री---ची पूजा उत्सव सांग चालऊन स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण चिंतून श्री--- संनीध प्रधानत्वाचा अधिकार चालऊन सुखरुप राहाणे. यथार्थी धर्मशास्त्र वचन श्लोक.

दानपालनयोर्मध्ये दानाछ्रेयोनुपालनं ।।
दानात्स्वर्गमवाप्नोति पालनादच्युतंपदं ।।१।।
सामान्योयं धर्मसेतुर्नराणां काले काले पालनीयो महद्भिः ।।
एकं सर्वान भाविनः पार्थिवेंद्रान् भूयो भूयो याचते रामचंद्रः ।।श्री।।

याप्रमाणे हे जाणोन श्रीचा इनाम सर्वमान्य स्वामी उत्तरोतर सुरक्षित चालवितिल. जाणिजे निदेश समक्ष[१]

तेरीख २०

सफर सु।। सन अर्बा अशरैन मया व अलफ

---

**क्रमांक : २२** **दि. १४-११-१७२३**

सोंधे संस्थानाकडून खंडणी सुरळीत मिळत नव्हती. थककेल्या खंडणीपैकी काही खंडणीची सूट मिळावी अशी विनंती सोंधे संस्थानात गेलेला साताराचा हेजीब मानजी बल्लाळ याने छत्रपती संभाजी दुसरे याना केली असता त्यानी त्यास लिहिले की पांच वर्षाच्या थकलेल्या खंडणीत पंधरा हजार रुपयाची सूट दिली आहे.

---

१ ताराबाईकालीन कागदपत्रे खंड १-क्र. ३५४ चे ता. १०-१२-१७१९ चे पत्र पहा. त्यांत सिदोजीने देवीची स्थापना केल्याचा उल्लेख आहे.

श्री

ता

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५० शोभकृत नाम संवत्सरे कार्तिक बहुल त्रयोदसी गुरुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी रा। भानजी बलाळ हेजीब मुा। सोंधे यांसी आज्ञा केली यैसीजे. तुम्ही विनंती पत्र पाठविले ते प्रविष्ट जाले. स्थलिकसी यैवजविषई रदबदल करिता म्हणतात की आपले संस्थानावरी अनेक कसाले पडिले. पर्ज्यन्यामुळे देशाची खराबी जाली. नियत प्रो देण्याचा निर्वाह आपल्याच्याने होत नाही. सोडमोकळे केलियानी चालत आले. हिसेबास साल दरसाल यैवज पाववावयासी अंतर न पडे म्हणोन. त्याचा भावार्थ विषद लिहिला व त्याकडील रामाजी सिवराम याणी विनंती केली ते सविस्तर अर्थ विदित जाला. यैसियासी स्वामीकडील उपसर्ग संस्थानास घडी घडी लागो नये ते संस्थान स्वराज्यांतर्गत यैसे चितात अणून प्रतिवार्षीक द्रव्याचा नियत केला. समयपरत्वे उपसर्ग लागलियाजे निवारणही कारणे ते यैसे असोन क्षणक्षणा सोडीचे मुद्दे बोलावे म्हणजे काय. येणे कडून उभयपक्षी सौरस्य कैसे राहू पाहते. प्रस्तुत राजश्री गंगाधर पंडित सुमंत यांचे विनंतीवरून स्थलिकाचे निष्ठेचा अर्थ चित्तात अणून संस्थानचे प्रतिवार्षिक द्रव्याचा नियत आहे त्यामधे सोडी केली आहे. इ॥ सन आर्बा शोभकृत संवत्सर ता। सन समान प्लवंग संवत्सर यकूण साले पाच ५ बी॥ रुपये

| | |
|---|---|
| ३००० सन आर्बा (इ. स. १७२३) | ३००० सन सब्रा (इ. स. १७२७) |
| ३००० सन खमस (इ. स. १७२५) | ३००० सन समान (इ. स. १७२८) |
| ३००० सन सित (इ. स. १७२६) | |
| ९००० | ६००० |

यकूण पंधरा हजार रुपये पाच सालामधे सोड केली आहे. सदर लिहिले प्रो संस्थान मा॥रा॥सही पत्र सादर केले आहे. ते त्यास प्रविष्ट करणे आणि लिहिले प्रो सन सलासापासून यैवज राहिला आहे त्याचा अशेष निर्गम करून घेऊन हुजूर पाठवणे. सन तिसा कीलक संवत्सरापासून भाषापत्रा प्रमाणे संस्थान मजकुराकडून यैवजाचा निर्वाह अशेष

करून घेत जाणे. जाणिजे. (बहुत काय लिहिणे)[१]

मर्यादेयं
विराजते सिका

तेरीख २६ माहे सफर.
सुा आर्बा अशरीन मया व अलफ.
बार.

---

क्रमांक : २३ दि. १०–१२–१७२३

भेटीस यावे. वतन पत्राचा विचार केला जाईल, म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे रायाजी माने यास पत्र.

श्री

तालीक

स्वस्तिश्री राज्याभिषक शके ५० शोभाकृत[२] नाम सवत्छरे मार्गसीर्ष बहुल दशमी भोमवासरे[३] क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजमान्य राजश्री रायाजी माने यासी आज्ञा केली यैसीजे. तुम्ही विनंती पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले. आभय-पूर्वक आज्ञापत्र सादर जाहालीया शवेसी येतो व वतन प्रसंगे आपला आभिमान स्वामीस आसावा म्हणोन कितेक लिहिला तो विदित जाहाले. यैशास येविसी तो पहिलेच तुम्हास आज्ञापत्र सादर केले आहे. तरी तुम्ही कोणेविसी दुसरा अर्थ चितात न आणता हुजुर येणे. वतन प्रसंगाचा अर्थ तरी येविसो आभयंतर न होईल. येविसी अभय जाणून येणे. जाणिजे. बहुत काय लिहिणे. मोर्तब असे.

सुरु सुद्र बार.

---

१ अक्षर वळण वेगळे.

२ शोभन संवत्सर पाहिजे. ३ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

क्रमांक : २४ दि. १०-१२-१७२३

छत्रपती संभाजी दुसरे यानी विरोजी माने यास, भेटीस यावे म्हणून पाठविलेले अभयपत्र.

श्री

तालिक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५० ( शोभन ) नाम सवस्तर मार्गसीर्ष बहुल दशेमी भौमवासरे[1] क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभ छत्रपति स्वामी याणी राजमान्य राजेश्री विरोजो माने यासी अज्ञा केली यैसीजे. तुम्ही विनंती पत्र पा ते प्रविष्ट जाहाल. आभयपूर्वक आज्ञापत्र सादर जालिया सेवेसी येतो वतन प्रसंग आपला अभिमान स्वामीस आसावा म्हणोन कितेक लिहिल ते विदित जाहाल. यैशास येविसी तो पहीलेच तुम्हास आज्ञापत्र सादर केल आहे. तरी तुम्ही कोण्हीविसी दुसरा अर्थ चितात न आणिता हुजुर येणे. वतन प्रसंगाचा अर्थ तरी ये विसी अभयांतर न होईल ये विसी आभये जाणून येणे. जाणिजे. बहुत काये लिहिण मोर्तब.[2]

सुरु सुद्र बार

---

क्रमांक : २५ दि. १०-१२-१७२३ नंतरचे

भेटीस यावे म्हणून राजसबाई साहेब यानी विरोजी माने यास पाठविलेले अभयपत्र

साधारणत: अशाच मजकुराचे अभयपत्र छत्रपती संभाजी दुसरे यांचे दिनांक १०-१२-१७२३ चे विरोजी माने यांना आहे. त्यावरून हे पत्र त्या सुमारचे असावे.

---

१ वारा प्रमाणे तारीख काढली आहे.

२ याच आशयाचे दि. १९-१-१७२४ चे छत्रपती संभाजी दुसरे यांचे अभयपत्र उपलब्ध आहे.

श्री

नकल

श्रीमन्मातुश्री राजसबाई साहेब याणी राजश्री हिरोजी माने यासी आज्ञा केली असीजे. तुम्ही विनंती पत्र पाठविले ते प्रप्त होऊन वर्तमान विदित जाहाले. वतनाच्या प्रसंगाकरिता हुजुर येणे याजकरिता आभयेपत्र पाहिजे म्हणोन तुम्ही लिहिले. वतनदार आमचे दर्शनास येण्यास आगाध नाही. याविसी चिरंजिव राजश्रीचे आभयपत्र तुम्हास सादर आहे. तुम्ही सुखरुप दर्शनास येऊन आपले वतन प्रसंगाची विनंती करणे सर्वाप्रो तुमचे चालवणे चिरंजीव राजश्रीस आगत्य आहे. ते चालवितील. या विसी समाधान आसो देणे. जाणीजे. छ — बहुत काय लिहिणे. मार्तंब.

---

क्रमांक : २६ दि. २६–१२–१७२३

रायगोंडा देसाई याने समानगड लढविण्याचे कामी जमावानिसी मदत केली म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यानी त्याला कर्यात नुलीची सरनाइकी इनाम दिली.

ॐ म।। आनाम रायगोंडा बिन खा (?) न गोडा देसाई कर्यात नूली सुभा प्रांत आजीरे यासी कृष्णाजी परशराम प्रतिनिधी सुहुरसन आर्बा अशरीन मया आलफ. तुम्ही हुजूर राजश्री स्वामी संनीध विनंती केली की आपण स्वामीच्या राज्यात येकनिष्टपणे वर्तणूक करून सेवा केलो आहे. पुढेही येकनिष्टेने वर्तोन स्वामीचे सेवेची उमेद धरीत आसो. तरी स्वामीनी मेहेरबान होऊन क।। मजकूरचे सरनाईकीचे वतन मन्हामत करून दिल्हे पाहिजे. त्यावरून मनास आणिता तुम्ही या राज्यात येकनिष्टपणे वर्तोन स्वामी सेवा केली आहे. प्रस्तुत उत्तरेकडील फौजाचा शह्‌ आहे व पूर्वी उत्तरेकडील फौजा किल्ले समानगडाखाले आसमंतात मागे आल्या होत्या त्या ते समई आपल्या जमावानिसी किल्ले मजकुरी येऊन बहुतच कस्त केली व पुढेही सेवा करावयाची उमेद धरीत आहा. या करिता तुम्हावरी राजश्री स्वामी

कृपाळू होऊन का॥ नुली प्रांत मजकूर येथील सरनाइकीचे नूतन वतन मऱ्हामत करून दिल्हे असे.

छ. ९ रबिलाखर

---

क्रमांक : २७ दि. ७-१-१७२४

केसापूर येथील श्री शंकराचार्यांच्या मठास छत्रपती संभाजी दुसरे यांचे इनामपत्र. यात श्री शंकराचार्य विद्या नरसिह भारती यानी महालक्ष्मीच्या देवालयाचा जीर्णोद्धार केल्याचा व त्यांचे वृंदावन पंचगंगातीरी असल्याचा उल्लेख आहे.

श्री महालक्ष्मी

श्री शंकराचार्यन्वय विद्या
नरसिह भारती

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५० शोभकृत नाम[1] सवत्सरे पौष बहुल आष्टमी भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती याणी श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्री स्वामीस दिल्हे दानपत्र ऐसेजे. श्री स्वामीचा मठ मौजे केसापूर संनध करवीर येथें आहे. तेथें पंचगंगातीरी वृंदावन आहे. तेथें पुण्यतिथीचा उत्साह ब्राम्हण संतर्पण बहुत होते व श्री देवीचे देवालयाचा जीर्णोधार थोरले स्वामीनी केला व सांप्रतही देवालयाचे इमारतीचे काम चालत आहे. ऐसीयास या स्थलीची आनकूलता करून दिधलियाने राज्यास बहुत कल्याणावह. (म्हणून वतन करून दिले ब तपशील)

तेरीज २१

रबिलाखर सु॥ आर्बा आश्रैन मया अलफ.

---

१ शोभन संवत्सर पाहिजे.

**क्रमांक : २८** **दि. ७-१-१७२४**

छत्रपति संभाजी दुसरे यानी मौजे केसापूर येथील जकातीच्या तीन तक्षिमा श्रीशंकराचार्यांच्या मठास इनाम दिल्या व एक तक्षिम देवीच्या खर्चाकरिता नेमून दिली.

शंकराचार्य

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५० शोभकृतनाम संवत्सरे पौष्य बहुल आष्टमी भोमवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी कमाविसदारानी जकात मौजे केसापूर ता। हवेली कोल्हापूर यास आज्ञा केली यैसीजे. मौजे मजकूर देखील जकात चौथी तक्षीम श्री--देवीकडे व तीन तक्षिमा हाली श्री--स्वामीचे मटाकडे इनाम सर्वमान्य दिल्हे आहे. तरी मौजे मजकुरी जकाती व बसक याचा हासील होईल त्याची चौथी तकसीम श्री देवीकडे देऊन तोन तक्षिमा श्री--स्वामीचे मटाकडे देत जाणे...... .

---

**क्रमांक : २९** **दि. १८-१-१७२४**

हिंमत बहादर उदाजी चव्हाण यांच्या विनंतीवरून रत्नागिरी येथील देवस्थानला मौजे पोहळें तर्फ ठाणे हा गाव इनाम दिला आहे, म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे देशाधिकारी व कारकून सुभा प्रांत पन्हाळा यास आज्ञापत्र.

उपरिनिर्दिष्ट देवस्थान जागृत असल्याचा उल्लेख पत्रात आहे.

केदारलिंग

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५० शोभकृत नाम संवत्सरे[1] माघ शुध चतुर्थी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत पनाला यास आज्ञा केली ऐसीज. श्रीदेव वास्तव्य रत्नागिरी हे बहुत जागृतस्थान पुराण प्रसिध. तेथील पूजा उत्साह जालिल्याने स्वामीस व

---

१ शोभन संवत्सर पाहिजे.

स्वामीच्या राज्यास कल्याणावह. यास्तव मौजे पोहळे ता ठाणे प्रांत मजकूर हा गाव श्री--स नूतन इनाम कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी जलतरुपाषाण निधिनिक्षेप सहीत खेरीज हकदार व इनामदार करून इनाम सर्वमान्य राजश्री उदाजी चव्हाण हिमतबहादर याणी विनंती केली त्यावरून श्री--च्या पूजा उत्साहास मौजे मजकूर दिला असे. इ. इ.

तेरीख २

जमादिलावल सु॥ आर्बा आश्रैन.

---

क्रमांक : ३० दि. २-३-१७२४

वीर शेट माने माहाजन पेठ कोल्हापूर यास छत्रपती संभाजी राजे यांच्याकडून त्याच्या वतनास मिळालेले इनाम व इतर हक्क.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५० शोभदत[१] नाम संवत्सरे फाल्गुन बहुल त्रितीया रविवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी मोकदमानी व शेटे माहाजन व समस्त माहानाड पेट कसबे कोल्हापूर यासि आज्ञा केली ऐसीजे. वीरशेट माने माहाजन पेट मजकूर याणी हुजुर येऊन विनंती केली कीं पेट मजकूरची माहाजनकी आपलें पुरातन वतंन. या वतनास इनाम व हक लवाजिमा पत्क (?) दिला पेट मजकुरी चालिला आहे बी ता

इनाम जमीन कसबे मजकुरी चावर

शिक्का शिक्का ॥

हक लवाजिमा व बाजेबाब

---

१ 'शोभन' पाहिजे.

मुशाहिंरा सादिलंवारपैको होन
पा। सालिना
९
माळवे दर नगास वजन
ऽऽ५
माळवे दर दुकानास आठवडेस
रुके दर दुकानास
ऽ१॥
तांबोळी दर नगास पाने
२५
श्रीगणेशाच्या महोत्सवास
भाद्रपद सुध चतुर्थीस समस्त
अठरा खुद माहानाड मिळोन
माहाजनाचे घरी करावा
त्याच्या खर्चास दर घरास
द्यावे रुके ॥
भूस गोणीस कैली
एक मापटे
ऽऽऽ=
फसकी दुकानास आठवड्यास
भूस पसा
१
हक दर साल आठरा खुद
पेटेस दर असामोस च्यार
रूण्या
॥
माली उकाला आठवडा
दर माळ्यास पेंढ्या दोन
२

विश्वा जकात रुके
ऽ१ केणे गोणोस व भुसास गोणीस
ऽ२ नगास रुके
ऽ३
तेली यानी दर घाण्यास तेल वजन
ऽऽऽ९
एक बंदी
कोष्टी व चाटी व मोमीन व समस्तानो एकेक सणग दिपवाळीस सालास सनगे द्यावी सूत
१ समस्त कोष्टे पेट दर ल्याख
१ समस्त चाटे मुंडासे दर ल्याख
१ समस्त मोमोन मिळोन मुंडासे मोहनी
३
केणे जिनस दर गोणीस वजन
बंदी ऽऽ॥
सोड जकात बैल सार
५
अठरा खुमाच्या म्हेतऱ्यानो माहाजनाच्या घरी मिळोन आपण आठरा खुमाचे मेहतरीनी मिळोन पाटेलाचे घरी जाऊन पेटेचा कारभार करावा
१
कल.

येणेप्रो चालिले आहे. मध्ये आपण जागा सोडून बाहेर पडिलो होतो. त्यापासून सदरहू हक व इनाम सुरक्षित चालत नाहीं. या उपर स्वामीनी सुरक्षित चालवावयाची आज्ञा करावी म्हणून विदित केले. त्यावरून मनास आणिता महाजन मजकूर स्वामीच्या पायासी एकनिष्टपणे वर्तत आहे. यास्तव स्वामी यांवरी कृपाळु होऊन सदरहू प्रो हक व इनाम व बाजेबाब पेसजी चालत होती] त्या प्रो चालवावयाची आज्ञा केली असे. तर या प्रो वीरशेट माहाजन यास पुत्र पौत्रादि वंश परंपरेने चालवणे. या पत्राची नालीक घेऊन असल देणे. लेखनालंकार.

शिका

---

क्रमांक : ३१ दि. १४-५-१७२४

भगवंतराव, मोरेश्वरराव व शिवरामपंत या रामचंद्रपंत अमात्य यांच्या तीन मुलात झालेले वतनाचे विभाजनपत्र. [१]

श्री

नकलेची नकल

यादी वाटणी त्रिवर्ग वतने सुमा आरबा अशरीन मया व अलफ. अवल साल छ १ माहे रमजान जेष्ट मास शाभकृत नाम सवत्सरे.

राजश्री पंत अमात्य भगवंतराव

रुपये ७०० गला बारुळे ९३

| | | |
|---|---|---|
| २१५ | ५९॥ | रासिवडे ६०॥ १॥= |
| २१६॥ | २० | त्रिबक |
| १७॥ | १२ | जरगी १२। १॥। |
| १३० | ० | अरळे असंडोली |
| ० | ० | मौजे मुरगुड तर्फ अजरे |
| १०० | ० | बागवाड |
| ६७९ | ९१॥ | |

---

१ हे अपुऱ्या स्थितीत मिळाले. तसेच नकलून घेतले आहे -संपादक.

राजश्री पंतसचीव व मोरेश्वरराव

| रुपये ७०० | | गला बारुळे ९३ |
|---|---|---|
| २२८।· | ६२॥· | मौजे पोंभुर्ले |
| २९ | २१॥।· | मौजे सेळोली |
| १२५ | ९ | मौजे हातकलंगडे |
| १३० | ० | तेरळे नाडगौंडी |
| ० | ० | वोझरे तर्फ अजरे |
| ३० | ० | बाग मालवण |
| १०९ | ० | बाग वाडे |
| ६५१।· | ९३। | |

राजश्री पंत प्रधान व सिवरामपंत

| रुपये ७०० | | गला बारुळे ९३ |
|---|---|---|
| ४३४ | ५९॥· | मौजे चिदर |
| १२८॥· | ३८॥· | मौजे कोंकिसरे |
| २२॥· | ६॥· | मौजे धामणवाडी ६॥· ३।१ |
| १०० | ० | कौलापूर नाडगौंडी |
| ० | ० | गोकुळ सिरगाव. |
| ६८५ | १०४॥· | |

साळसीचे सरदेशमुखी खारेपाटण सरदेश-
मुखी व अजरचे देशकुलकर्ण व गावकुलकर्ण
त्रिवर्गाची मोघम आहेत.

| | |
|---|---|
| साळसीचे हक किले भगवंत-गडचे बेगमीस गेले. | खारेपाटणचे हक यथाविभागे त्रिवर्ग याणी घ्यावे. |
| अर्ज येथील देशकुलकर्ण गैर-कबजी त्रिवर्गाचे. | लग ० |

क्रमांक : ३२ दि. २६–७–१७२४

पन्हाळ्यास औरंगजेबाचा वेढा पडला असता शामजी पानसे याने किल्ल्यावर सामान पोहचविले, या कामगिरीबद्दल संभाजी दुसरे यानी त्यास वीस बिघे जमीन इनाम दिली.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ——क्रोधीनाम संवत्सरे श्रावण बहुल द्वितीया भानुवासरे[1] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री शामजी रुद्र गोत्र जामदग्न उपनाम पानसे यास दिल्हे इनामपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन एकनिष्ट सेवक. पूर्वी पनालियास पादशहाचा परीघ पडिला होता ते समई तुम्ही बरी शर्त करुन किलियावरी सामा[2] जवादा[3] चढवून स्वामी सेवा बहुतच केली. सांप्रतही तुम्ही स्वामीच्या पायासी येकरुप निष्टा धरून स्वामी शेवा करीत आहा. तुमचे सर्व प्रकारे चालवणे हे स्वामीस परम आवश्यक. गावरुन स्वामी तुम्हावरी कृपाळु होऊन तुम्हास नूतन इनाम कुलबाब कुलकानुखेरीज हाकदार व इनामदार करुन वीस पांडाच्या बिघ्याने ता तारळे सुभा तारळे येथे भात जमीन––(तपशील आहे).

तेरीख १५ जिलकाद सु॥ खमस आशरीन.

---

क्रमांक : ३३ बार्देस, दि. २०–११–१७२४

गोव्याच्या हंगामी गव्हर्नरना बार्देसचा सेनापती लिहितो की, करवीरचे छत्रपती संभाजी दुसरे यांचे सरदार उदाजी चव्हाण हे सैन्य घेऊन शापूरच्या नजीक आल्याची बातमी आपणास कळली आहे.

---

१ श्रावण बहुल द्वितीया भानुवासरे = २६–७–१७२४. १५ जिलकाद खमस आशरीन = २५–७–१७२४. पैकी हिंदू तारीख अधिक ग्राह्य वाटते, कारण तिथी व वार जुळतो.

२ सामा = सामान.

३ जवाद = जास्त; मोठे.

गव्हर्नर महाशय यांस,

मी नदीपलिकडे जो मनुष्य पाठविला होता, त्याने बातमी आणली आहे की, या शहराच्या तटाच्या पलीकडे बऱ्याच अंतरावर चार दिवस झाले संभाजी राजे यांचा सेवक उदाजी चव्हाण हा दोन हजार घोडदळ व चार हजार पायदळासह शापूर येथे आला आहे. हे सैन्य मोठे नाही हे जरी खरे असले, तरी ह्या सरदाराला सैन्याची आणखी कुमक येणार आहे. पण हा सरदार कुणावर चालून आला आहे ते मात्र प्रकट झालेले नाही. परंतु हे सैन्य फोंडू सावंत भोसले यांच्या राज्यात शिरेल या भीतीने त्याना इशारा देण्यात आला आहे. आपले पत्र मी फोंडू सावंत ह्याना त्वरित पोहोचते केले. ज्या गुप्त–हेराने शत्रू सैन्याच्या आगमनाची बातमी आणली, त्याच्या कानावर वाडी येथे बातमी आली, की ते पत्र फोंडू सावंत यांच्या हाती पडले असून ते होडी तिच्यावरील मालासह परत करणार म्हणून सांगत होते. पत्राचे उत्तर आले, की मी ते आपणाकडे सत्वर रवाना करीन.

किल्ल्याच्या रक्षणार्थ मी साडेचारशे माणसे ठेवली आहेत. हे सैन्य टेहेळणीसाठी बस् आहे. परंतु गोऱ्या सैन्यावांचून हे सैन्य शत्रूशी कितपत लढेल हा प्रश्न आहे. मी आपणाला मागे लिहिलेच आहे की, आवश्यक तेव्हा या किल्ल्याच्या रक्षणासाठी पन्नास किंवा साठ माणसे या प्रांतात ठेवावी.

माझी आपणाला विनंती आहे, की इकडे दहा अथवा बारा दारूची पिपे पाठविण्याची आज्ञा कोठार प्रमुखास करावी. या पिपांची जरुरी लागली नाही, तर ती कोठाराकडे परत पाठविता येतील. ज्या वेळी ह्या दारुगोळ्याची विभागणी करण्यात येईल तेव्हा संबंधित सेनाधिकाऱ्याना मी त्या दारुगोळ्याची पावती देण्याची सूचना करीन.

उद्या चालू माहीच्या २१ तारखेस सकाळी थिवीच्या चर्चजवळ नगरपालिकेची सभा होणार असून काम सुरु करण्याबाबत निर्णय घेतला जाणार आहे. या संबंधीची बातमी मी आपणास मागे

कळविलीच आहे. यापुढेही वरचेवर कळवित जाईन. आपण मला आवश्यक ते करण्याबाबतच्या सूचना आणि आज्ञा करीत जाणे.

देव आपणास दिर्घायुष देवो.

कामुल्ये, दि. २० नवंबर १७२४.

दों ज्युआंव द मेलु

---

**क्रमांक : ३४** **दि. ९–१२–१७२४**

साष्टीचा सेनापती दों आंतॉनियु कास्कु इ मेलु हा गोव्याच्या हंगामी गव्हर्नरना लिहितो की, करवीरचे छत्रपती संभाजी दुसरे यानी साष्टी प्रांतावर स्वारी करण्याची तयारी केल्याची बातमी गुप्तहेरानी आणली आहे.

महाशय,

काल घाटावरून एक गुप्तहेर आला. त्याने मला बातमी दिली की, संभाजी राजे ह्यानी आपल्या अनेक सरदारांच्या सल्ल्यानुसार चालू महिन्याच्या १२ तारखेस साष्टी प्रांतावर हल्ला करण्याचा निर्णय घेतला होता. परंतु रामराव, पिलाजी आणि आणखी एका सरदाराने ह्या योजनेला विरोध केला. त्यानी संभाजी राजे याना सांगितले की, त्यानी जर ही मोहीम सुरु केली, तर तींत यश येण्याची फारच थोडी आशा आहे. ह्या कारणावरून उपरिनिर्दिष्ट सरदार राजाच्या छावणीपासून एक दिवस मागे राहिला. तसेच या प्रश्नावर सरदारांमध्ये मतभेद निर्माण झाला. परंतु असे जरी असले, तरी हे सगळे एक दिवसाच्या आत एकत्र येऊ शकतील. ही बातमी ऐकून मला काळजी वाटल्या वाचून राहिली नाही. कारण, सरदारामधील मतभेद हा एक डाव आहे व त्यानुसार शत्रू कुठे तरी हल्ला केल्यावाचून राहाणार नाही असे मला वाटले. आणि माझा अंदाज खरा ठरला. कारण, आज पहाटेस गुप्त–हेरानी जी बातमी आणली ती माझ्या अंदाजाशी जुळती होती. शत्रूने सोंदेच्या राज्याच्या सांब्राणी ह्या नावाच्या किल्ल्यास वेढा घातला असून

ते त्या राज्याच्या इतर खेडयांतहि शिरले असल्याची ती बातमी आहे. सोंदेच्या राजाकडे करवीरच्या छत्रपतींनी थकलेली खंडणी मागितली असता ती त्याने देण्यास नकार दिला म्हणून त्याच्यावर हा हल्ला करण्यात आला. तत्पूर्वी सोंदेच्या राजाने व्यापाऱ्यांना मराठ्यांना कोणताच माल देऊ नका अशी ताकीद दिली होती.

ह्या ज्या वार्ता आल्या आहेत त्या खऱ्या आहेत. शत्रूची छावणी आमच्यापासून उण्या पुऱ्या तीन दिवसाच्या अंतरावर आहे. त्याच्या पाशी मोठे घोडदळ आणि पायदळ आहे. अशा परिस्थितीत मी शत्रूशी कितपत मुकाबला करू शकेन हा प्रश्न आहे. कारण, माझ्यापाशी सैन्य फारच थोडे आहे. त्याचा निर्देश या पत्रासमवेत पाठवित असलेल्या नकाशात केला आहे. लष्करी अधिकारी व नौ सैनिक यांचीहि संख्या मागे पाठविलेल्या यादीहून अधिक नाही. सक्तीच्या लष्कर भरतीची माणसेहि मागे कळविल्या इतकीच आहेत. उलट त्यांची संख्या कमी होत चालली आहे. त्यामुळे या प्रदेशाचे रक्षण कसे करायचे या काळजीत मी आहे. माझे असे मत आहे की कुकळ्ळी व मडगाव येथील ठाणी मजबूत करून मी काही निवडक अशा फिरत्या सैन्यासह असावे ....................अलीकडेच मी सदहू शत्रूच्या उद्दोष्टांचे निरीक्षण करण्यासाठी असे सैन्य पाठविले होते. शत्रूची कुरापत काढून त्याला जेरीस आणायचे हे त्या हालचालीचे उद्दिष्ट आहे. तरी या दोन्ही पर्यायांपैकी कुठल्यातरी एका पर्यायाची निवड करून आपण मला सूचना द्याव्या. आपली कुठलीहि सूचना मी तत्परतेने अमलात आणीन.

ज्या अर्थी शत्रूच्या हालचालीच्या बातम्या येत आहेत त्याअर्थी मी नागरिकांना त्यांच्या मौल्यवान वस्तूंसह किल्ल्याच्या आश्रयास येऊन राहाण्याची आज्ञा करावी की शत्रू जवळ येईपर्यंत आपण थांबणार ते ठरवून मला आपण हुकूम द्यावे. त्याच प्रमाणे आपले हुकुम कडकपणे आमलात आणावे व घोडेस्वार पाठवून लश्कर भरती सक्तीने करावी तेहि आपण मला कळवावे.

या राज्याच्या कल्याणार्थ देव आपणास उदंड आयुष्य देवो.

नावेली येथील छावणी, ९ डिसेंबर १७२४

हे पत्र लिहून झाल्यावर + + हवालदार व अंकोल्याच्या मिशनऱ्याचे पत्र आले.

दों आंतॉनियु काश्कु इ मेलु

---

क्रमांक : ३५ गोवा, दि. २९-१२-१७२४

गोव्याच्या हंगामी गव्हर्नरनी साष्टीच्या सेनापतीस करवीरच्या सैन्याच्या संभाव्य स्वारीबाबत या पत्रात काही सूचना केल्या आहेत.

साष्टीचे सेनापती दों आंतॉनियु काश्कु इ मेलु यांस—

आपले दि. २८ मे चे पत्र आमच्या पाहाण्यात आले. त्यात आपण बातमी दिली आहे, की मराठ्यांनी आपल्या सैन्याचे दोन भाग केले असून त्यातील एक भाग बिनीला राहाणार आहे. त्याच्याकडे आमच्या प्रदेशावर—फोंड्यावर हल्ला करण्याची कामगिरी सोपविण्यात आली आहे. आपण म्हणता की सक्तीच्या लष्कर भरतीची माणसे दिवसे दिवस अधिकाधिक फरारी होत आहेत. आपण त्या रिक्रुटाना फिरून गोळा करून आणावे व त्यांच्याकडे कुकळ्ळीच्या रक्षणाचे काम सोपवावे. म्हणजे आपल्या हाताखालच्या सैन्यापैकी आपणाला मोठ्या सैन्यासह मडगावला जाऊन शत्रूने त्या प्रदेशावर हल्ला केला तर तेथून लष्करी हालचाली करता येतील.

पानेली, २९ डिसेंबर १७२४.

आर्चबिशप प्रिमाज, दों क्रिस्तोव्हांव द मेलु,

क्रिस्तोव्हांव लुईज द आंद्राद.

---

क्रमांक : ३६ दि. १४–३–१७२५

मौजे नांदणी हा गाव मारण्यासाठीं चंद्रसेन जाधव आले असता त्यावेळी झालेल्या चकमकीत कोराणा मगदुम ठार झाला होता. त्याच्या नेमाणा या मुलास नारो पंडित सचीव यानी पाच विघे जमीन इनाम दिली.

श्री

शिका

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री नारो पंडित सचीव मदारुलमाव[1] ताा मोकदमानी मौजे नांदणी प्राा रायबाग सुा। खमस असरोन मया आलफ. कोराणा मखदुम मौजे मार हे पेशजी राो चंद्रसेन जाधवराउ याची फौज गाव मारावयास आली ते समई बरी शर्त करुन ठार जाहला. याकरितां त्याच्या पुत्राचे व माणसाचे चालवावें हे अगत्य जाणोन (दिले इनाम वि तपशील).

राा छ १० रजेब माो असे.

---

क्रमांक : ३७ दि. १९–११–१७२५

प्रतापजी राणे यांस भगवंतराव रामचंद्र अमात्य यांचे अभयपत्र की, दर्शनास येणे आणि इमाने इतबारे राहून सेवा करणे.

श्री

राजश्री प्रतापजीराव राणे गाो

स्नाो भगवंतराव रामचंद्र आमात्य हुकुमतपन्हा सुरुसन सित असेरेन मया व अलफ. तुमचा अर्थ राजश्री हिर सावंत याणी लेहून व सांगोन पाठविला त्यावरून हे पत्र सादर केले असे. तुम्ही पुरातन पदरीचे. सर्वप्रकारे तुमचे उर्जीत करून चालवावे हे अवश्यक आहे. तर

---

१ मदारुलमहा पाहिजे : मदार–उल–महाम = कामांचा मुख्य; मुख्य प्रधान.

तुम्ही कोणेविसी चित्तांत शंका न धरितां दर्शनास येणें आणि इमानें इतबारें राहोन शेवा करणे. कबिलासह येणें. तुमचे चालवया अंतर होणार नाहीं. अभय असे. छ २४ रबिलावल निदेश समक्ष.

शिक्का

---

क्रमांक : ३८ दि. १९-११-१७२५

देवजी राणे, बापूजी राणे, जैतोजी राणे व जिवाजी राणे हे परागंदा झाले होते. त्यानी आपल्या गावी येऊन रहावे म्हणून भगवंतराव रामचंद्र अमात्य यांचे त्याना अभयपत्र.

श्री

मा। अनाम देवजी राणे व बापुजी राणे व जेतोजी राणे व जिवाजी राणे यांसी

भगवंतराव रामचंद्र आमात्य हुकमतपन्हा सुरु सित असरेन मया व अलफ. तुम्ही परागंदा होऊन गेलेत. त्यास आलिकडे आपल्या स्थलावर येऊन वसावे म्हणोन तुमचेविसीं राजश्री हिर सावंत याणीं लेहून पाठविले. त्यावरून हें पत्र सादर केलें असे. तर कोणेविसी चित्तांत शंका न धरितां कबिलासह वर्तमान आपल्या स्थलावर वसाहत करणें. तुमचें सर्व प्रकारें चालविले जाईल. तुमचे मध्यस्त बोलीस राजश्री हिर सावंत आहेत. त्याप्रमाणें चालऊ. आपले समाधान असो देणे. छ २४ रबिलावल निदेश समक्ष.

शिक्का

---

क्रमांक : ३९ दि. ६-१२-१७२५

मालोजी घोरपडे यानी श्रीनिवास परशराम प्रतिनिधी याना वतनाबाबत लिहिले होते. त्या पत्रास त्यानी प्रत्युत्तर केले की आपण त्या प्रांती येत आहो. तरी भेटीस यावे म्हणजे वतनाचा विचार करू.

श्री नकल

राजश्री मालोजी घोरपडे गोसावी यासी अखंडित लक्षुमी आलंकृत राजमान्य स्ने॥ श्रीनिवास परसेराम प्रतिनिधि आसीरवाद सु॥ सीत आसरीन मया आलफ. तुम्ही पत्र पा॥ ते प्रविष्ट जाहाले. लेखनार्थ आवगत जाहाल. तुम्ही वतना (संबंधी) लि॥. तरी आम्ही त्या प्रांती आवष्य येत आहो. तुम्ही दर्शणास यणे. तदनंतर जो आज्ञा करणे ती केली जाईल. छ ११ रबिलाखर. बहुत काय लिहिण. मोर्तब आस.

---

क्रमांक : ४० इ. स. १७२५ (?)

छत्रपती शाहू यानी लिहिल्यावरून कान्होजी आंग्रे यानी त्याना दोन हजार रुपये पाठविले.

श्री पै छ २२ मोहरम

पुरवणी श्रीमत् माहाराज श्री छत्रपती
स्वामीचे सेवेसी

विनंती. उपरी स्वामीनी ऐवजाविशी आज्ञा केली त्यास येथील प्रस्तु (त) वोढी बहुत जाहली आहे. त्याचा तपसील काय ल्याहावा. सारांश स्वामी आपले जागेयावरी दृष्टी देतील तरीच या जागेयाची स्थीत राहावे. नाहीतरी होणे ते होत आहे. हाली स्वामीनी आज्ञा केलीयास्तव बहीरजी नरसिह याजबराबरी रु॥ २००० दोन हजार पाठविले आहेत. प्रवीष्ठ होतील. सेवेसी श्रु (त) व्हावे याकरिता लिहिले असे. हे विज्ञापना.

श्री
श्री शाहू नृपती प्री
त्या तुकोजी तनु जन्म
ना ॥ कोन्होजी सरखे
लस्य मुद्रा जय
ति सर्वदा

---

क्रमांक : ४१ इ. स. १७२५

आबाजी मोहिते यांच्या मौजे वेलफळे येथील मोकाशाच्या वाटेस जाऊ नये व सरकारी हुजऱ्याने काढून घेतलेली नाईकवाडी याची तलवार महमद खान मुतालिक आबाजी मोहिते यांच्याकडून मागून घ्यावी, म्हणून श्रीनिवास परशराम प्रतिनिधी यांचे रामराव पाटणकर यांस पत्र.

श्री

राजश्री रामराव पाटणकर गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥

श्रीनिवास परशराम प्रतिनिधी आसीर्वाद. सुहुरसन खमस आसरोन मया व अलफ. मौजे वेलफले हा गाव राजश्री आबाजी मोहिते यासी मोकासा आहे. त्यास मौजे मजकूरचे सिवेचा कथला तुम्ही करिता. या करिता राजश्री---स्वामीने सिवेच्या कजियाबदल हुजरे पाटविले होते. त्याणी सिवेचे जमिनीतील गला[1] मालिस्त[2] केला. तो तुमचे लोकाहो गला लुटून नेला.या करिता माहुली-कर पाटील व नायकवडो यासी धरून हुजूर राजश्री--कडे आणिले. नाईकवडी याची तरवार हुजऱ्याही घेतली. त्यावरून आबाजी मोहिते याणी रदबदली करून तरवार मागून घेतली. ते महमद खान मुतालिक देशमुख यासी आदा केली आहे. तरी हे तुम्हाकडे घेऊन येतील ती घेणे. फिरोन गावच्या वाटेस नच जाणे. गाव दिवाणाचा. तुमच्या कजियानिमित्य पडितो. तर तुम्ही तरवार आपली घेऊन कथला वारणे. दुसरेयाणी चिरगुवे च्यार नेली म्हणून दाहा रुपयांचे चिरगुवाचे संभर रुपये गावचे गुरे नेऊन तुम्ही घेतले. बरे जे गोष्ट आजीवर जाली ते जाली. या उपरी तुम्ही कथला एकंदर न

श्री
श्री आई आदि पुरुष
श्री राजा शाहू छत्रप
ती स्वामी कृपा निधी त
स्य श्रीनिवास परश
राम प्रतिनिधि

१ गला (गल्ला) = उत्पन्न, शेतसारा.

२ मालिस्त = कुरणे.

करणे. गावचे मागला हुजुर + + + + + + रुपये देणे ते तुमचे कथलियानिमित्य बुडतात. या करिता तुम्हास लिहिले आहे. तुम्ही कथला यकंदर न करणे. जाणिजे. छ १० साबान.

राजते
लेखना
वधी

सुरु सुद्र.

---

क्रमांक : ४२ इ. स. १७२५–२६

'राजश्री रायाचे' (?) फौजेवर उदाजी चव्हाण याचा शह पडू नये, प्रसंगी त्यास नतिजा पोहचवावा, असे पत्रलेखक लिहितो.

( कागदाचा सुरवातीचा भाग फाटला आहे )

(आ) सिर्वाद विनंती. येथील कुषल जाणून स्वकीये कुषल लेखन केले पाहिजे. विशेष राजश्री नारोपंतास राजश्री स्वामोनो आज्ञा देऊन तुम्हाकडे पाठविले आहेत व कितेक अर्थ सांगणे तो सांगितला आहे. मुख्य गोष्ट जे राजश्री + + + राव स्वारीस गेले आहेत. त्याचा आपला स्नेह कांही नवीन आहे ऐसा नाही. पुरातन आहे. ऐसीयासी उदाजो चवाण याचा शह राजश्री रायाचे फौजेवर न पडे ऐसे करावे. कदाचित त्याणे दुर्बुधी चितामध्ये धरिली असिली तर नखतीजा द्याव. येणेकरुन राजश्री स्वामीसही संताष होईल. वरकड कितेक अर्थ राजश्री नारोपंत मुखजबानी सांगता कळो येईल. आम्ही आपल्या कार्यास अंतर करणार नाही. लोभ असो दीजे. हे आसीर्वाद.

---

( हे पत्र यादव वतनपत्रे झाडा राणोजी घोरपडे यांचे पाठीमागचे बाजूस आहे –संपादक ).

क्रमांक : ४३ फेब्रुवारी १७२६

शामभट पुजारी यास सिधोजी हिंदुराव यांचे पत्र. " राजश्री राव कोपळा जवळ आहेत " असा उल्लेख यात आहे.

श्री

असल

वेदमुर्ती रामजी शामभट
गोसावी यांसी

स्ने।। सीदोजी हिंदुराव घोरपडे दंडवत विनंती उपरी. तुम्ही पत्र पाठविले पावले. वर्तमान कलले. श्री[1] ——— देवाचा गाव ईनाम आहे त्याविसी लिहिले. तरी इनाम पहिले पासून आहे. तेणेंप्र ।। करार आसे. वरकड कितेक मजकूर लिहिलात. तरी आम्ही राजश्री रावसाहेबाचे भेटीस स्वार होऊन गेलो. राजश्री राव कोपळाजवळ आहेत. भेटी होऊन राजश्री रावसह वर्तमान करवीरास येतो. भेटी-नंतर तुमचे मनोगतानुरुप होऊन यावयास दुसरा विचार नाही. तुमचे सर्व वीसी अगत्ये आहे. हर घडी पत्र पाठवून सविस्तर लिहीत जाणे. जाणीजे. रा।। छ १२ रमजान. हे वीनंती.

लेखन
सीमा स
उल्लसति.

---

क्रमांक : ४४ वि. २९–४–१७२६

बाहादूरवाडीकर येथील रयत परागंदा झाली होती. तिकडे जाऊन रयतावा करावा म्हणून जगजीवन गोविंद यांचे जोती शेलार व शेटयाजी शिंदे यास अभयपत्र.

---

१ महालक्ष्मी.

श्री

श्री राजा शा

हू च्चरणी तत्पर

जगजीवन गोवी

द नीरंतर

अभयपत्र राजश्री जगजीवन गोविंद ता। रया बाहादुरवाडीकर

जोती सेलार — १

सेटयाजी सिंदा — १

हाली वस्ती मौजे कोरेगाऊ सु॥ सित आसरीन मया आलफ. तुया सो मोकदम मौजे कोरेगांव व भोमाणा सूर्यवसी याणी विनंती केली कीं बाहादुरवाडी देसकाचे तु—— ——— करितां परागंदा जाली यास रयत (?) मौ. मजकुरास येऊन रयत——————राहले यास अभय——— अभयपत्र सादर केले असे. तुम्हो व तुमचे मारफतीनें अणीक कोणी रयेता येतील त्या घेऊन कोरेगावास येऊन रयेतावा करून सुखरूप असणें कोणे बाबे शंक न धरणें ये बाब अभय असे. शंक न धरितां कोरेगांवी येऊन कीर्दी माहामुरो करून सुखरूप असणें. छ ७ रमजान जाणिजे. हर कोणाचा उपद्रव लागणार नाहीं.

मोर्तब

सुद्र

---

**क्रमांक : ४५** **दि. १५–१०–१७२६**

"वेदमूर्ति उमापति भट पुराणिक दि॥ मातुश्री" यास साठ रुपये वेतन (?) दिल्याचे सोंधे येथील हेजीब भानजी बल्लाळ यास छत्रपती संभाजी दुसरे यांचे आज्ञापत्र. सोंधे संस्थानच्या खंडणीतून हे पैसे द्यावेत असे पत्रात म्हटले आहे.

श्री ताा

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५३ पराभवनाम संवत्सरे कार्तिक

शुध प्रतिपदा मंदवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री भानजी बलाळ हेजीब मु ।। सोंधे यास आज्ञा केली येसीजे. वधल देणेवेत वेदमूर्ती उमापती भट पुराणिक दि।। मातुश्री साहेब याकडे देविली रुपये ६० साठी रास देविली असेत. तोफी[1] याचे यैवजी अदा करणे. पावलियाचा जाब घेणे. तेणे प्रा़ो गुजरा असे. जाणिजे. उजूर न करणे. बहुत काय लिहिणे.

मर्यादेयं विराजते सिका

तेरीख २९ माहे सफर.

सु।। सबा अशरीन मया व अलफ.

बार.

---

**क्रमांक : ४६** **दि. २-१२-१७२६**

करवीरचे छत्रपती संभाजी दुसरे यांच्या सैन्याच्या गोव्यावरील संभाव्य स्वारीबाबत गोव्याचा व्हाइसरॉय दों ज्युआव साल्दान्य द गामा हा साष्टीच्या सेनापतीस या पत्रातून काही सूचना करतो.

साष्टीचे सेनापती दों आंतॉनियु काश्कु इ मेलु यांस.

आपणाकडून जो निरोप आला, त्याने माझी काळजी थोडी कमी झाली. इतरांकडून पसरविण्यात आलेल्या बातम्यावरून कळते की, शत्रु आपल्या हद्दीपासून दोन दिवसाच्या अंतरावर आहे. मला आशा आहे की, शत्रूच्या अचानक हल्ल्यास तोंड देण्यास आपणास तयारी करण्यास अवधी मिळाला आहे.

शाबास खान व जांबावलीचा सुभेदार यानी मला ज्या दुसऱ्या एका प्रश्नाबाबत लिहिले होते त्याना मी इशारा दिला आहे की,

---

१. तोफी = नजर (नजराणा).

त्यांच्या प्रदेशातून जर शत्रूने आमच्या प्रदेशावर हल्ला केला तर आम्ही हे कृत्य शत्रूत्वाचे समजून त्यांच्या प्रदेशांत घुसू. मात्र त्यानी जर खिंडीचे रक्षण करण्यासाठी आमच्याशी सहकार्य केले, तर आम्ही त्याना मदत करू. तरी आपण त्याना वेळीच इशारा द्यावा.

क्रिस्तॉव्हांव द कुन्य यांच्या तुकडीला त्याच्या तळावर माघारा बोलविण्यास हरकत नाही. कैद्यांवर पहारा ठेवण्यासाठी, टेहेळणीसाठी, व किल्ल्या भोवती गस्त घालण्यासाठी लष्करातील काही सैनिकाना पाठविण्यास हरकत नाही. त्या किल्ल्यातील लष्करी तुकडीला मी कुमक धाडण्याचा प्रयत्न करीत आहे.......... ......... आपण शिफारस करावी.

देव आपले रक्षण करो.

पानेली, २ डिसेंबर १७२६.

ज्युआंव द साल्दान्य गामा.

---

क्रमांक : ४७ दि. ४–१२–१७२६

गोव्याच्या व्हाइसरॉयने साष्टीच्या सेनापतीस लिहिलेल्या या पत्रात बाजीरावाच्या सैन्याच्या हालचालीची माहिती असून करवीरच्या सैन्याच्या संभाव्य स्वारीबाबत काळजी घेण्यासाठी काही सूचना करण्यात आल्या आहेत.

साष्टीचे सेनापती दों आंतॉनियु काश्कु इ मेलु यांस—

शाबासखानाच्या पत्रासमवेत पाठविलेले पत्र मिळाले. काल लिहिलेल्या पत्रातील बातम्या नजरेखालून घातल्या असतीलच. असे कळते की, बाजीरावाच्या सैन्यात दहा हजार घोडेस्वार असून त्याला नबाबाचे चार हजार घोडदळ येऊन मिळण्याची शक्यता आहे. बाजीरावाबरोबर दाभाडे आला होता. परंतु त्याने बाजीरावाच्या हुकुमाप्रमाणे वागण्यास नकार देऊन तो सुरतेच्या बाजूने निघून गेला.

पायदळांत पेंढाऱ्यांचाच भरणा अधिक आहे. आम्ही जर काळजी घेतली नाही, तर ह्या डाकू दरोडेखोरांकडून आम्हाला मोठाच उपसर्ग पोहोचण्याची शक्यता आहे. परंतु हे सैन्य कर्नाटकाच्या रोखाने जात असावे असे वाटते. ...

चर्चमधील चांदीच्या बहुमोल वस्तु सुरक्षित ठेवाव्या व सैन्यास जय्यत तयार राहाण्यास सांगावे. आणि जर ·······तर आपण माझ्या दुसऱ्या हुकुमाची वाट बघू नये. माझ्यापाशी तीनशे गोरे सैनिक जय्यत तयार आहेत. पहिला इशारा मिळताच मी त्याना रवाना करीन. त्यांना केव्हा पाठवायचे ते आपण कळवावे. असतील नसतील त्या होड्याहि पाठविण्याची ······· सांव लौरेंसु येथे··· ···

त्या प्रांतात तटबंदीसाठी लोखंडी अडसर नसल्यास मला कळवावे. म्हणजे ते मी पाठवून देईन.

पहिला इशारा मिळताच मी तिकडे निघण्याचा प्रयत्न करीन. कारण, मी तुमच्या जवळ असलेला बरा····· परंतु बार्देसवर हल्ला झाला, तर मात्र मला साष्टीकडे जाता येणार नाही. तसे झाल्यास मी दोन्ही प्रांतांच्या मध्ये राहाणे पसंत करीन.

देव आपले रक्षण करो.

पानेली गोवा, ४ डिसेंबर १७२६.

ज्युआंव साल्दान्य द गामा.

---

**क्रमांक : ४८** **दि. ६–१२–१७२६**

गोव्याचा व्हाइसरॉय मराठ्यांच्या संभाव्य स्वारीबाबत साष्टीच्या सेनापतीस आणखी काही सूचना करतो :

**साष्टीचे सेनापती दों आंतॉनियु कारकु इ मेलु यांस.**

**चर्चमधील चांदी, मौल्यवान वस्तु आणि गुरे सुरक्षित ठिकाणी**

ठेवण्याचा जो निर्णय तुम्ही घेतला आहे तो मला मंजूर आहे. बारा तंबू, गोलंदाज व खेचरे, तसेच तुम्ही पाठविलेल्या यादीतील इतर वस्तूहि रवाना केल्या आहेत. त्याचप्रमाणे मजुराना द्यावयाच्या मजुरी-बाबत तिकडच्या महसूल अधिकाऱ्याना खजिनदाराच्रा हुकूम पाठविला आहे. गोऱ्या लोकाना मोहिमेचा मोठाच वांटा उचलावा लागेल हे ग्रहीत धरून दोनशे माणसे व अठरा घोडे आपणाकडे पाठवित आहे. मला आशा आहे की, आपण मडगावचे व त्याच प्रमाणे कुकळ्ळीचे रक्षण करू शकाल. तसेच अन्य कोणत्याहि खिडीतून शत्रु सैन्य उतरण्याची शक्यता असल्यास तिकडेहि बंदोबस्त करावा. मडगाव-नजीक तटबंदीसाठी लोखंडी अडसर उभारण्याच्या हुकूम द्यावा. म्हणजे मला तिकडे सैन्य पाठविता येईल. रासईच्या किल्ल्याचे रक्षण करण्याच्या बाबतीत हयगय करू नये. छावणीच्या रक्षणासाठी लोखंडी अडसर तयार ठेवावे··········· ··· हे काम पोर्तुगीज माणसे करू शकतील······ ····· आपणाला जेव्हा ते काम करायचे असेल तेव्हा रंगरुटाना एकत्र होण्यासाठी आवश्यक त्या सूचना केल्या म्हणजे झाले. हल्ला झाला की, आपण रासई येथून आज्ञा घ्याव्या. आपण ज्यावेळी गैरहजर असाल, तेव्हा रोआझ सोआरिश याना आपल्या जागी नेमावे व सर्व अधिकाऱ्याना त्यांचे हुकूम पाळण्याची आज्ञा करावी. कारण रोआझ सोआरिश यांचा हुद्दा घोडदळाच्या कॅप्टनच्या हुद्याहून मोठा आहे. शेवटी सर्व जबाबदारी आपणावर सोपवित आहे. पण माझा आपणाला सल्ला आहे, की निष्कारण धावपळ करून थकू नये. मी रासईला गेलो असतो, परंतु बार्देशच्या बाजूनेहि शत्रूच्या हल्ल्याचा धोका असल्याने मला आवश्यक असेल तेव्हा दोन्ही ठिकाणी जावे लागेल म्हणून गोवा बेटांतच राहाणे भाग पडत आहे. शत्रूच्या हाल-चालीची बातमी कळताच खलाशाना पाचारण करावे व माझ्या हुकुमाची वाट न बघता स्थानिक सैन्याला विश्रांति द्यावी.

देव आपले रक्षण करो.

पानेली, ६ डिसेंबर १७२६.

ज्युआंव साल्दान्य द गामा.

क्रमांक : ४९ दि. ९-१२-१७२६

गोव्याचा व्हाइसरॉय बार्देशच्या सेनापतीस मराठ्यांच्या संभाव्य स्वारी-बाबत या पत्रात काही सूचना करतो.

बार्देशचे सेनापती ज्युआंव द मेलु द आताईद यांस.

मराठ्यांच्या सैन्याच्या हालचालीबाबतची माहिती देऊन पाठविलेले आपले चालू माहीच्या दि. ८ चे पत्र मिळाले. त्या पत्रातील बातम्या मला मिळालेल्या बातम्याहून वेगळ्या आहेत. या परिस्थितीत मला आपणास कळवायचे आहे की, गणवेशधारी सैन्याच्या बाबतीत आपण गडबडून जाऊ नये.

तिकडून काढून घण्यात आलेल्या तुकड्यांच्या जागी नवीन तुकड्या तिकडे जाऊन हजर झाल्याच असतील.

देव आपले रक्षण करो.

पानेली, ९ डिसेंबर १७२६.

ता. क.

आतांच बातमी आली की, शत्रू साष्टीनजीक येऊन पोहोचला आहे. तुमच्या प्रांतालाहि त्याचा धोका पोंहचण्याचा संभव आहे. मी इकडून शंभर सैनिक पाठवित आहे. त्यांचा किल्ल्याच्या रक्षणा-साठी उपयोग करावा. तिकडे जी नौका आहे तिचा उपयोग राजवाड्याच्या रक्षणासाठी करता येईल. त्याचप्रमाणे लष्कराला आज्ञा द्यावी की, त्यानी हुकूम होताच रणमैदानावर जाण्यासाठी तयार रहावे.

शत्रूने त्या प्रांतात प्रवेश केला तर तोफांचे दोन आवाज काढावे, म्हणजे मला शत्रू आल्याचे कळेल. त्याने माघार घेतली तर तीन आवाज काढावे.

नौकेकडून राजवाड्याचे रक्षण होईलच. तेव्हां तिकडील सैनिकांना किल्ल्याच्या रक्षणार्थ पाठवावे. त्यांच्या मदतीला मी कुमक

पाठवित आहे. शिवाय लष्करभरतीचे सैन्यहि आहेच. त्याचाहि उपयोग करावा.

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

---

क्रमांक : ५० दि. १२-१२-१७२६

साष्टीच्या सेनापतीस गोव्याचा व्हाइसरॉय लिहितो, की जांबावलीच्या सुभेदाराकडून त्याला जे पत्र आले आहे, त्यात मराठ्यांच्या हालचालींची वातमी आहे. साष्टीस गोऱ्या लष्कराची कुमक पाठविण्याचे आश्वासन या पत्रात आहे.

साष्टीचे सेनापती आंतॉनियु काश्कु इ मेलु यांस—

जांबावलीच्या सुभेदाराच्या पत्राच्या भाषांतरावरून शत्रू सैन्याच्या हालचालीची बातमी कळली. हे सैन्य साष्टीवर येत आहे यात शंका नाही. त्या प्रांताचे संरक्षण चांगले व्हावे म्हणून गोऱ्या सैनिकापैकी २०० सैनिक तिकडे पाठविण्याची आज्ञा करीत आहे. शिवाय सहाय्यक लेफ्टनंट आंतॉनियु दुश सांतुश यालाही तिकडे पाठविण्यात येत आहे. रासईच्या किल्ल्याच्या रक्षणार्थ........... शत्रूने त्या प्रांतात आक्रमण केले, तर त्या कुशल अधिकाऱ्याची आवश्यकता आहे. शत्रूने त्या प्रांतात आक्रमण केले की आपण रासईच्या किल्ल्यातून तोफांचे दोन आवाज काढावे. मी 'सां लौरेंसु' व 'सां सांतियागु' येथे माणसे ठेवीत आहे. तोफांचे आवाज त्याना ऐकू आले, की ते मला येऊन कळवितील. शत्रूने माघार घेतली...........मला ते कळेल. गोलंदाज तिकडे गेले आहेत हे जोसेफ क्रिझॉस्तोमु याच्याकडून कळले. या शिवाय मला तुम्हास आणखी काही सूचना करायची नाही. मी तिकडच्या प्रांतात दोनशे सैनिक पाठविण्याची सूचना जोसेफ क्रिझॉस्तोमु याला केली आहे. मी त्याला त्याच्या नौकांबरोबर पाठवीत आहे. कारण, त्यांच्यामुळे उत्तरेकडील आरमार अडकून पडले आहे. हा गैरसोय फार मोठी आहे. काम हलके व्हावे म्हणून आपण जे जे काय कराल ते मला मान्य आहे. तटबंदीचे लोखंडी अडसर,

तोफखाना व इतर सामान वाहून नेण्यासाठी जे मजूर कामाला लावण्यात येतील त्यांची मजुरी बादशहाच्या[१] नावावर मांडण्यात यावी. कारण सैन्य त्यांचे आहे................. होड्या लोखंडी अडसरांबरोबर घेऊन गेल्या आहेत. आपण त्या पैदा करण्याचा हुकूम केला पाहिजे ................ अशा रीतीने आपण प्रतिबंध केला पाहिजे. आताच मला खजिनदाराची पावती दाखविण्यात आली. लोखंडी सांखळ्या...... .......... कसे सादर करण्यात आले ते कळले.

देव आपले रक्षण करो, वगैरे.

पानेली, ९ डिसेंबर १७२६.

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

---

क्रमांक : ५१ १७२६ (?)

उदाजी चव्हाण इंगलीवर असून मिरजेच्या व प्रतिनिधीच्या मुलुखास उपद्रव देत आहे, म्हणून सिदोजी थोरात याचे पेशव्याना पत्र.

श्री

राजश्री पंत प्रधान गोसावी यासी--

श्री सकल गुणअलंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये स्ने।। सिदोजी थोरात कृतानेक दंडवत विनंती. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन करावया आज्ञा करीत गेले पाहिजे. या प्रांतीचे वर्तमान तरी उदाजी चव्हाण इगलीवर उतरला आहे. पलीकडील काटक जमा केले आणि मिरजेच्या मुलकास व प्रतिनिधीच्या मुलकास खंडणिया घेत आहे. त्याची नजर येक प्रकार आहे. आपणाकडेहि त्याकडील बातमी वरचेवर येतच असेल. मिरजेची बंदोबस्ती कैसी आहे हे कलत नाहीं. आम्ही तिकडे जावे तरी इकडील शाहवर

---

१ पोर्तुगालचा राजा.

स्वामीनी ठेविले आहे. यास्तव येथे राहिलो असो. तरी गोष्टीची पैरवी करणार आपण समर्थ आहेत. वहुत काये लिहिणे. हे विनंती—

---

**क्रमांक : ५२** **दि. ३०–१–१७२७**

संभाजी राणे मोडकर हा 'स्वामीकार्यावर' खर्च झाला होता. त्याच्या पत्नीस व बंधूस चार बिघे जमीन इनाम दिल्याचे भगवंतराव अमात्य यांचे कमाविसदार मौजे मट यास आज्ञापत्र.

श्री रामचंद्र

सिका

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री भगवंतराव आमात्य ता। कमाविसदार मौजे मट बु॥ ता। खारेपाटण सु॥ सबा असरेन मया व अलफ. संभाजी राणे मोडकर स्वामी कार्यावर खर्च जाला. त्याची बायको व भाऊ कृष्णाजी राणा व बाबाजी राणा आहेत त्यास कांही इनाम जमीन करून देऊन चालवावे म्हणून. येविसी रा। कृष्णाजीराव राणे याणी विनंती केली त्याजवरून संभाजी राणा मोडकर याचे बाइकोचे व भावाचे चालवणे आगत्य. (म्हणून दिले वतन. तपशील). छ १८ जमादिलाखर निदेश समक्ष.

मोर्तब

बार सुद्र

---

**क्रमांक : ५३** **दि. १–२–१७२७**

मौजे अरुळे हा गाव बरीच वर्षे ओसाड होता. त्याची लावणी–संचणी व्हावी म्हणून भगवंतराव अमात्य यानी प्रतापजी राणे, बापूजी राणे, कृष्णाजी राणे व देवजी राणे याना जमीनसाऱ्यात सूट दिली.

श्रीरामचंद्र

सिका

अभयपत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री भगवंत राऊ रामचंद्र आमात्य हुकुमतपन्हा ताा प्रतापजी राणे बापूजी राणे कृष्णाजी राणे देवजी राणे खोत मौजे अरुळे ताा खारेपाटण सु।। सबा असरीन मया अलफ. दिल्हे अभयपत्र यैसेजे. तुम्ही किले गगनगडचे मुकामी हुजुर येऊन विनंती केली की मौजे माार बहुत साले खराब पडले आहे. साहेबी कृपाळु होऊन इस्तावा[1] करून दिलियाने लावणी संचणी करून म्हणून विनंती केली. त्यावरून कीर्दीवर नजर देऊन ती साला इस्तावा करून दिल्हा असे. बी तपसील निमे गाऊ----

सन समान गला दशरी बारुले

१८२।। नागली
८२।। वरी
१।

सन सलास सलासीन गला

२ रुजु गु।।
·।।· ज्याजती
२।।·

तपसील

१।।। नागलो
।।।· वरी
२।।·

सन तिसा असरेन

१। रुजु गु।।
·।।।· जाजती
२

तपसील

१।। नागली
·।।· वरी

येणेप्राो सन समान सवा खंडी सन तिसा दोन खंडी सन सलास अडीच खंडी रास इस्तावा करून दिल्हा असे विलायेत शर्त उगवणी

१ इस्तावा : नवीन जमीन लागवडीस देतेवेळी काही वर्षेपर्यंत भर साऱ्यापेक्षा कमी, परंतु दरसाल वाढत्या साऱ्याने देणे.

करून सुखंरूप राहणे. नखतबाब पाहाणीमुळे घेहून. जाणिजे. छ २० जमादिलाकर निदेश समक्ष----

शिका
वार सुरु सुद्र बार

---

**क्रमांक : ५४** दि. १२-४-१७२७

अवर्षणामुळे पाच गावचा कर माफ केल्याचे सखगौडा खानगौडा देसाई परगणा नूल यास विजापूरच्या सुभेदाराकडून पत्र.

(मूळ सनदेत पारशी सिका व पाच पारसी ओळी आहेत असे म्हटले आहे)

जुबदे अमासाल सखगौडा खानगौडा देसाई प।। नूल सरकार आजमनगर सुभे बारूल जफर बिजापूर सू।। सबा अशरीन मया अलफ. दरीविला प।। म।। रावरी पाऊस न होता नापीक होऊन पीक वाळून गेले. याखेरिज गनिमाचे तफरका[1] बहूत पडून इलाखी जाहला. रयतेस हरयेक बाबे धामधुमी आजार लागोन बहूत नातुवानी येऊन मुलखावरी उठोन गेले. प।। मजकूरचे लावणी न होता बिलकूल मजिरा मडिला-येसियास तुम्हास बलत खाहे की रयत सरकार वाकवरी फयतऱ्यातर खुद आबादानी मुलूख जाणन मद नजर बरकियत सरकार वाकवरी देऊन इनाम गाऊ देहाये बी ता।.

मौजे हलकर्णी १ मौजे इद्रगुची १ मौजे चंदनकाड १
मौजे नंदनवाड १ मौजे हेबाल १.

येणेप्रमाणे पाच गावीचे नजर सरकार माफ केले असे. तरी प।। म।। च आबादानी मामुरी करून सरकार कामावरी सरगरम राहात जाणे. साल ब साल नजेरचे तकरार होणार नाही. पिडी दर पिडी अवलाद

---

१ तफरका = दाणादाण; हैराण.

अफलाद नजरे इनाम गाऊचे व इनामाचा माफ केले आहे. वसवस न करिता देहाये परगणा मजकूरचे आबादानी व मामुरी करीत जाणे. देणार कोणी हिंदु व मुसलमान इस्कील करणार नाही. इजकील केले तरी वुरी औगद व आपले म न ठा चे आण असे.
जाणिजे. छ १ माहे रमजान.

---

क्रमांक : ५५ दि. २५-५-१७२७

महमदखान, गुमास्ते देशमुख तळबीड यास जामीनकीचे कागद पाठवून देण्याबद्दल कृष्णाजी विठ्ठल याचे पत्र.

श्री

म।। आनाम महमद खान गुमास्ते देसमुख क।। तलबीड यास कृष्णाजी विटल सु।। सीत असरीन मया आलफ. तुम्हापासी जमान कतबेस[1] कागद आहेत ते पाटवणे म्हणून काली राणोजी मोहिते या ब।। लिहिले होते. ते कागद अद्याप पाटविले नाहीत. तरी हाली देखत पत्र मुदाम माणसा ब।। पाटवून देणे. उजुर न करणे. छ ४ सवाल.

लेख
नावधी

---

क्रमांक : ५६ दि. ३०-५-१७२७

नारो खंडेराव याना कुलमुखत्यारी देऊन नामजाद म्हणून पाठविले आहे, तरी त्यांच्या आज्ञेत रहावे म्हणून राणोजी घोरपडे सेनापती याचे बारा महालांच्या मोकदमांना पत्र.

श्री
सिका

अज्ञापत्र समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री राणोजी घोरपडे सेनापती

---

१ अमान कतबा = एकाद्यास आपण जामीन आहोत असे लिहून दिलेले पत्र.

ता॥ मोकदमानी महाला निहाय.

| | |
|---|---|
| क॥ हवेली १ | क॥ लागली १ |
| क॥ देसिंग १ | क॥ विसापूर १ |
| क॥ कविटे माहाकाल १ | क॥ मनेराजुरी १ |
| क॥ बेडग १ | क॥ तासगाव १ |
| क॥ अंजिनी १ | क॥ ढालगाव १ |
| क॥ कवठ यकंद १ | क॥ भिलवडी १ |

यकूण माहाल बारा प्रांत मा॥र सु॥ समान अशरीन मया व अलफ. क॥ म॥ पेषजी पासून मोकासा सरकार मजकुराखाली आहे. ये बाबे हुजुरुन सनदाहो आहेत. अशास हाली राजश्री नारो खंडेराऊ यासी कुल-मुखत्यारी देऊन नामजाद पाठविले आहेत. याचे जमावाचे बेगमीस क॥ म॥रच्या मोकासबाबेस दिल्हचा. तरी तुम्ही त्याचे आज्ञेत वर्तोन अकाराप्रो वसूल मोकासबावेचा सुरलीत देत जाणे. जाणिजे. रवाना छ १९ शौवाल मोर्तब सुद्र.

---

**क्रमांक : ५७**

**दि. १८–६–१७२७**

शंकर भट बुरडे यानी छत्रपती शिवाजी दुसरे यांचे उत्तरकार्य विधिप्रयुक्त भूमिदान संकल्पपूर्वक पार पाडले, यास्तव त्याना राणी राजसबाई यानी चार बिघे जमीन इनाम दिली.

श्रीमत् मातोश्री राजसबाई साहेब याणी वेदमूर्ति राजश्री शंकरभट बिन शामभट उपनाम बुरडे गोत्र आणि सूत्र आश्वलायन वास्तव पेठ नेबापूर यासी आज्ञा केली यैसिजे. सू॥ समान आश्रीन मया अलफ. तुम्ही विद्वान कुटुंबवत्सल अनुत्पन[1] पाहोन तुम्हास चिरंजीव राजश्री शिवाजी राजे यांचे उत्तरकार्य विधिप्रयुक्त भूमिदान संकल्पपूर्वक करून दिल्हे. (इनाम तपशील).

छ ९ माहे जिल्काद.

---

१ अनुत्पन्न = गरीब, अकिंचन.

क्रमांक : ५८ दि. १९-७-१७२७

मौजे तेरवाड पा रायबाग येथील मुक्तेश्वराच्या समाधीस छत्रपती संभाजी दुसरे यांजकडून सदरहू गाव इनाम.. मुक्तेश्वराचा विद्यमान पणतू मुक्तेश्वर याचा निर्देश या पत्रात " बहूत भले भगवतभवत गायन विद्येमध्ये आती निपूण. " असा केलेला आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंगनाम संवत्सरे श्रावण शुध त्रयोदसी सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी राजश्री मुक्तेश्वर गोसावी बिन आकणा गोसावी गोत्र आत्री वास्तव्य मौजे कुरुंदवाड यांस दिल्हे इनामपत्र येसेजे. तुम्ही धारूरचे मुकामी स्वामो संनोध येऊन विदित केले की आपण कुटुंब वत्सल आहा. योगक्षेमास कांहीं उपजिविका नाही व आपले पणजे राजश्री थोरले मुक्तेश्वर गोसावी हे श्री येकनाथ स्वामीची कन्या गंगाबाईचे पुत्र. यांचे वृंदावन मौजे तेरवाड प।। रायेबाग येथे आहे. तेथील पूजा उत्साह व ब्राह्मण संतर्पणादिकाची अनकूल होये सारीखे करावयासी माहाराज धर्मपरायण आहेत म्हणून तुम्ही विदीत केले. त्यावरून मनास आणिता तुम्हीं बहूत भले भगवत भक्त. गायन विद्येमध्ये आती निपूण. तुमचे कुटुंबाचा योगक्षेम चाले व थोरले मुक्तेश्वर गोसावी याचे वृंदावनी महोत्सव होये येसे केल्याने स्वामीस परम श्रेयस्कर पाहोन स्वामीनी यांस मौजे तेरवाड प।। रायेबाग सुभा प्रांत कोल्हापूर हा गांव पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून (इनाम दिला आहे, इत्यादी)

तेरीख ११

जिल्हेज सुहूरसन समान अश्रैन मया अलफ.

---

क्रमांक : ५९ दि. ३०-७-१७२७

कोल्हापूरचे सैन्य गोव्याच्या साष्टी प्रांताच्या हद्दीवर होते. ते वेरळे नावाच्या खेड्यांत शिरण्याची शक्यता होती म्हणून साष्टीच्या सेनापतीने तिकडे सैन्य धाडण्याचा जो निर्णय घेतला, त्याला व्हाइसरॉय या पत्रानुसार मान्यता देतो.

साष्टीचे सेनापती मानुएल द मेलु द गामा यांस

कॅ. मानुएल रोआझ ह्याना वेरडेच्या प्रवेशद्वाराकडे सैन्य घेऊन जाण्याचा जो हुकम आपण केलात ते चांगले केलेत. आपल्या हुकुमाप्रमाणे त्यानी जांबावलीच्या सुभेदाराच्या भेटीस जाण्यास काही हरकत नाही. ह्या बाबतीत आपण जांबावलीच्या सुभेदारास लिहिलेच आहे. कुकळ्ळीच्या कॅप्टनला त्याने जे पत्र लिहिले त्याचा उपयोग आपण करणार असे आपण जांबावलीच्या सुभेदारास लिहिलेल्या पत्रात म्हटले आहे. कारामुज याच्यामागून जे काय घडले ते आपण मला कळविल्याने मी त्याला कैद करण्याचा हुकूम केला. त्याचप्रमाणे मी काल केलेल्या आज्ञेनुसार त्यानी तुकू नाईक याला कैद केले आहे. मी कुकळ्ळीच्या कॅप्टनला लिहिले आहे की, त्याने साष्टीच्या पश्चिमेकडील प्रश्नाबाबत तुमच्याशी सल्लामसलत करावी.

तुम्ही कॅ. मानुएल रोआझ ह्याना कळवा की, धर्मं समीक्षण[१] संस्थेच्या जर सूचना नसतील तर ज्या ब्राह्मणाला कैदेत टाकण्यात आले आहे त्याला बेड्या घालू नयेत. मात्र जो पर्यंत धर्मसमीक्षण संस्थेकडून आवश्यक त्या सूचना येणार नाहीत, तोपर्यंत ब्राह्मणाला पहाऱ्यांत ठेवावे.

कॅ. दों फ्रान्सिस्कु द नोरोन्या हे वेरडेच्या प्रवेशद्वाराकडे पोहोचले की, कॅ. मानुएल रोआझ याना माघारा परतण्याचा हुकूम पाठवावा. कॅ. दों फ्रान्सिस्कु शाव्हिएर याना मुक्त करून त्याना त्यांच्या ठाण्यावर पाठवून द्यावे.

कैद्यांची मुक्तता व हिंदु मंदिरांची मोडतोड याबाबत सुभेदारास कोणत्याच प्रकारचे आश्वासन देण्याच्या भानगडीत पडू नये. कारण आपण सुभेदाराला जे काय सांगाल त्याहून धर्मसमीक्षणाचा वेगळा हुकूम निघू शकेल. तुम्ही त्याना एवढेच सांगा की सर्व काही सांगितले आहे व मी ते न्यायालयाकडे सोपविणार आहे.

---

१ इंक्विझिशन.

देव आपले रक्षण करो, वगैरे.

पानेली, ३० जुलै १७२७.

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

---

क्रमांक : ६० दि. ८-८-१७२७

हा एक कर्जरोखा आहे. प्रतापजी घोरपडे याने केजबानबावा याजकडून सहा रुपयाचे कर्ज दरमहा शेकडा पांच रुपये व्याजाने ज्वारीच्या हंगामात फेडण्याचे बोलीने घेतले.

राजश्री केजबान बावा गो।।
यांचे सेवेसी

दा बे।। परतापजी घोरपडे ता वाळवे सु।। समान आशरीन मया आलफ. कारणे लेहून दिला कर्ज कतबा यैसाजे. आम्ही आपले अत्मकार्यालागी तुजपासी घेतले रुपये ६ साहा मुदल घेतले. यासी व्याज दरमाहे दरसदे पंचोत्रा प्रमाणे घेतले. यासी मुदत जोरीच[१] हंगामी मु।। व व्याज समेत वारुन देऊ. यासी अंतर पडणार नाहीं.

दा। छ १ माहे मोहरम. भाद्रपद सुध पाडवा.

---

क्रमांक : ६१ दि. २२-९-१७२७

गोपाळ व्यंकाजी देसकुलकर्णी यानी संताजी घोरपडे यांचे काळात निष्ठेने सेवा चाकरी केली म्हणून त्याना राणोजी घोरपडे यानी मौजे अर्जुनवाडा हा गाव इनाम दिला.

मशरुल आनाम गोपाळ वेकाजी देसकुलकर्णी कर्यात कापसी यासी राणोजी घोरपडे सेनापती. सुहूरसन सम्मान अशरैन

---

१ जोरीच = ज्वारीचे.

मय्या अलफ. तुम्ही निपाणीचे मुक्कामी येऊन विनंती केली जे आपण पूर्वी वडील राजश्री सेनापती त्याचे कारकीर्दीस ठाणे मजकुरी हुडा वाडा बांधोन प्यादे ठेवून एकनिष्ठेने सेवा केली. त्यामुले कर्ज वाम जाहले. आपण कुटुंबवत्सल योगक्षम चालत नाही. पूर्वील ग्राम इनाम आहे त्यास भाउबंद येथा विभोग वाटून घेतो. आपला काल चालत नाही. वडील पूर्वी अभिमान धरून गाव इनाम करून देऊन उर्जित करून चालवावयाचे मान्य केले होते. परंतु सनद पत्र जाहली नाही. ते कैलासवसी जाहले. हल्ली आपले उर्जित करून चालविलिया पूर्वीही एक निष्ठेने सेवा केली आहे. पुढेही करीत आहे म्हणून विदीत केले. त्यावरून मनास आणिता तुम्ही श्रम साहास बहूत केला आहे. वडिलांनी तुमचे अभिमान धरिला होता. तुम्हास इनाम गाव करून द्यावयाचे वचन दिल्हे होते. या करिता तुमचे चालवणे आवश्यक (म्हणून दिले इनाम).

जाणिजे. रवाना छ १७ माहे सफर.

मोर्तब सुद.

---

**क्रमांक : ६२** **दि. १८-१-१७२८**

छत्रपती संभाजी दुसरे यानी गुलाब गिरी गोसावी यास मौजे सावे येथे मठ बांधण्यास जमीन इनाम दिली.

श्री

शिका

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंगनाम संवत्सरे माघ बहुल त्रितिया गुरुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी

गुरुभक्तपरायण गुलाबगिरी गोसावी यासी

सिका सिका दिल्हे इनामपत्र येसीजे. तुम्ही स्वामी संनीध

विदित केले की आपला बेत अहे जे मठ बांधोन अतीत आभ्यागतास आन्न उदक देऊन माहाराजास कल्याण

चितून राहावे. यसीयास माहाराज धर्मपरायण आहेत. काही जमीन इनाम करून द्यावी म्हणून. त्यावरून तुम्ही बहूत भलें तपस्वी. तुम्हांस इनाम दिधलीयाने कल्याणावह. यास्तव (इनाम दिले बि तपशील).

तेरीख १५ जमादिलाखर सु॥ समान.

रुजु सु॥नविस

---

**क्रमांक : ६३** **दि. १०–७–१७२८**

छत्रपती संभाजी दुसरे यानी कृष्णाजी पंडीत प्रतिनिधी याना दिलेली नेमणूक. यात सहा कलमे आहेत. परशुराम त्र्यंबक प्रतिनिधी ज्या पद्धतीने राज्यकारभार करीत होते, त्याच पद्धतीने कृष्णाजी पंडीत यांनीहि कारभार करावा असे यात म्हटले असून 'स्वामीचे मुख्यच तुम्ही आहा' असा निर्देश केला आहे.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५५ कीलकनाम संवछर आशाढ बहुल प्रतिपदा सौम्यवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती याणी समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री कृष्णाजी पंडित प्रतिनिधि यास आज्ञा केली असीजे. स्वामीनी स्वामी कार्याविसी तुम्हास आज्ञा केली आहे—

हुजुरचा कारभार पूर्वी
जे पधतोने राजश्री
परशराम पंडित करीत
होते त्या प्रा करावा.
आल्या गल्यास जाबसाल
देणे. त्यास स्वामीचे
मुख्यच तुम्ही आहा-
———कलम १

रा यशवंतराव गापाळ
व सिवाजी शंकर व
चितो माहादेव व
जिवाजी रायाजी याकडील
हिशब कितब तुम्ही
मनास आणावे. हे
स्वामीनी तुमचे
स्वाधीन केले आहेत

खासगी पागा व पील-
खाना अटरा कारखानें
व लोकाचा राजमरा
याचा हिशब मनास
आणून मोईन[1] जाब-
तेक[2] करुन द्यावे.
स्वामी त्याप्रमाणे चाल-
वितील———कलम १
सरकारकून व सरदार
जिल्हेचे हिशब व हुजरि-
याची बालीचाली तुम्ही
मनास आणून स्वामीस
विदित करीत नाही———
———कलम १

———कलम १
सोधे बिदनूर यथील
हिशब कितब मनास
आणावे. तथील खर्चा-
ची बंदोबस्ती करुन
यैवज मनास आणावा
———कलम १
पनाळा पावनगड यथील
हिशब मनास आणून
बंदोबस्ती करावी व
सिदुदुर्ग + + +
———कलम १

येणे प्रा स्वामीनी साहा कलमे धंदा तुम्हास सांगितला असे. तुम्ही बरा चवकसीनें मनास आणून कारभार करावा. स्वामीनी दिन प्रतिदिनि तुमचे उर्जित करुन चालवावे यास आन्यथा नाहीं. तुमची जिल्हे भुदरगड सामानगडची राजकार्या निमित्य स्वामीनी घेतली आसे. हे येका वर्षानें तुमची तुम्हास करार करुन द्यावी. बहुत लिहिणे तरी तुम्ही सूज्ञ आसा.

---

**क्रमांक : ६४** **दि. ९-१-१७२९**

मौजे परळे हा गाव हुरजी आगलावे सुभाखासकेल यांच्या जमावाच्या बेगमीस मोकासा म्हणून दिला असल्याचे संभाजी दुसरे यांचे सदहूं गावच्या मोकदमास आज्ञापत्र.

---

१ मोईन = नेमणूक.
२ जाबत = ठराव, कायदा.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५५ कीलकनाम संवत्सरे पौष बहुल सप्तमी गुरुवासरे[1] क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी मोकदमानी मौजे परळे निनाईचे तालुका मलकापूर यासी आज्ञा केली ऐसीजे. मौजे मजकूर पेशजीच्या मुकासी याजकडून दूर करून हाली रा॥ हरजी आगलावे सुभाखासकेल याचे जमावाचे बेगमीस मुकासा दिल्हा असे. तर तुम्ही यासी रुजु राखोन आकाराप्रमाणे मुकासबाबेचा ऐवज पेटेकडे बिलाकुसुर पाववीत जाणे. निदेश समक्ष.

तारीख २० सिका

जमादिलाखर सु॥ तिसा. रुजु

---

क्रमांक : ६५ दि. ४-४-१७२९

उदाजी चव्हाण हिम्मतबहाद्दर यांच्या विनंतीवरून छत्रपती संभाजी दुसरे यांनी बरमाजी माने पाटील यास, मौजे भादोळे येथे अर्धा चावर जमीन इनाम दिली. बरमाजीचा भाऊ स्वामी कार्यावर पडला होता. त्याच्या मुलामाणसांच्या योगक्षेमाकरितां सदरहू इनाम होते.

श्री

सिका आसे

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५५ सौम्यनाम संवछरे चैत्र बहुल द्वितीया भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी राजश्री बरमाजी बिन भोजजी माने पाटील मौजे भादोळे तां वडगाव यास दिल्हे इनामपत्र येसीजे. तुम्ही स्वामीच्या

सिका पेशव्याचा पान पाटी | सिका प्रतिनिधीचा घाट वर्तुळाकार

राज्यातील पुरातन सेवक. तुमचेविसी राजश्री उदाजी चवाण हिमत

---

१ आराप्रमाणे तारीख काढली आहे.

बहादर याणो विनंती केली की हे येकनिष्ठ सेवक आणि वतनदार आहेत यांचे बंधु स्वामीकार्यावर बरी शर्त करून खर्च झाले आहेत. त्यांच्या मुलामाणसाचे व मा।रनिलेचे चालविले पाहिजे या करिता माहाराजानी मेहरबान होऊन यास मौजे भादोळे तर्फ वडगाव येथे इनाम जमीन दिल्ही पाहिजे म्हणून. त्यावरून मनास आणिता तुम्ही यकनिष्ठ सेवक तुमचे बंधू स्वामी कार्यावर पडिले.. तुमचे वडिलांच्या बंधूचे मुलामाणसाचे चालवणे हे स्वामीस परम अवश्यक. यास्तव स्वामी तुम्हावरी कृपाळ होऊन (दिले इनाम).

तेरीख १५

रमजान सुमा तिसा आर्बेन.

---

**क्रमांक : ६६** दि. ९-८-१७२९

छत्रपती संभाजी दुसरे यानी सोनजी घोरपडे यांस मौजे वाघापूर हा गाव इनाम दिला. या इनामाच्या सनदा गहाळ झाल्या होत्या. त्या फिरून नवीन करून देण्यात आल्या.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५६ सौम्यनाम संवत्सरे श्रावण बहुल येकादसी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री सोनजी बिन गिरजोजी घोरपडे यास दिल्हे इनामपत्र यैसिजे. तुम्ही स्वामीचे राज्यातील पुरातन शेवक. तुम्ही किले पनाळेचे मुकामी स्वामी संनिध विनंती केली की मौजे वाघापूर ता खानापूर हा गाव राजश्री थोरले हिंदुराव घोरपडे यांस सरदेशमुखीस इनाम होता तो त्यानी आपणास इनाम करून दिल्हा असे. त्याप्रा रा सिवाजी राजे कैलासवासी याणीही पत्र करून दिल्हें होते. त्याउपरी थोरले हिंदुराव निधन पावलेवर त्यांचे पुत्र रा सिदोजीराव घोरपडे ममलकतमदार याणी पत्र दिल्हे त्याप्रा स्वामीनी

पूर्वी इनामपत्रे करून दिल्ही होती. त्यास अवघे कागदपत्र आपणा-जवळून हरवून गेले. भोगवटेस नवीन पत्रे असावी या करता माहाराजानी मेहेरबान होऊन नवीन सनदा सादर करावयास आज्ञा केली पाहिजे म्हणून तुम्हो विदित केले. त्यावरून मनास आणिता तुम्ही स्वामीचे पायासंनीध निष्टा धरून त्रिकर्ण शुध्धने सेवा करीत अहा. तुमचे चालवणे स्वामी(स) परम अवश्यक. (म्हणून दिले वतन).

तेरीख २४ मोहरम. सु॥ सलामीन मया.

रुजु

---

क्रमांक : ६७ दि. १६-११-१७२९

येसाजी भोसले यांचे मोकदम मौजे उचगाव यास अभयपत्र की गावास कोणत्याच प्रकारचा उपसर्ग पोहोचणार नाही, निर्भयपणे राहावे.

श्री

सु॥ ११३०

श्री राजा शा
हु चरणी तत्पर
येसाजी भोस
ले नीरंतर

अभयेपत्र समस्त राजकार्यधुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री येसाजी भोसले ता मोकदमानी मौजे उचगाव ता हवेली कोलापूर सुहुरसन सलासीन मया अलफ. दिल्हे अभयपत्र ऐसेजे. मौजे मजकूर हा गांव श्री----कडे आहे. त्याविसी वेदमूर्ती रा शामभट मुनेश्वर याणी हुजूर येऊन विदित केले की इकडील स्वारी सिकारीचे धास्तीमुले रयेत डावाडोल[1] जाहाली आहे. ऐसीयासी गावास अभयेपत्र दिल्हे म्हणजे गावी सुखरुप राहातील म्हणोन

---

१ डावाडोल (डामाडोल) = त्रस्त, घाबरी.

तुम्हाविसी सांगितले. त्यावरुन तुम्हास अभयपत्र सादर केले असे. कोणे गोस्टीचा वसवसा[1] न धरिता बेसक होऊन गावी सुखरुप राहाणें. इकडील उपसर्ग गावास लागणार नाही ऐसे समजोन निर्भयपणे सुखरुप गांवी राहाणे.[2] अभयें असे. जाणिजे.

ता. छ ५ जमादिलावल. मोर्तब सुद.

मोर्तब

सुद

---

क्रमांक : ६८ दि. १०-१२-१७२९

नागोजी नाईक साठम याच्या पाच म्हशीची व दहा बैलाची जकात माफ केली आहे म्हणून सेखोजी आंग्रे सरखेल यांचे प्रतापजी नाईक काळेगुडे, नामजाद विजयदुर्ग यास पत्र.

राजश्री प्रतापजी नाईक काळेगुंडे नामजाद विजयदुर्ग.

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री स्ने॥ सखोज आंगरे सरखेल रामराम सुरु सन सलासीन मया व अलफ. नागोजी नाईक साठम यांच्या पांच म्हैसी पाळक व दहा बैलाची वन जकात माफ केली आहे. त्याप्रमाणे हल्ली करार करून सनद सादर केली आहे. सदरहू चालवीत जाणे. प्रतिवर्षी नूतन सनदेचा उजर[3] न कर्णे. या पत्राची तालिक लिहून घेऊन असल भोगवटीयास परतोन देणे. जाणीजे. छ २९ माहे जमादिलावर.

---

१ वसवसा = संशय, काळजी.

२ असेच अभयपत्र सेनापती त्र्यंबकराव दाभाडे यांचे दि. ३-२-१७३० चे व दावलजी सोमवंशी सरलश्कर यांचे दि. ११-२-१७३० चे आहे.

३ उजर (उजूर) = उपसर्ग.

क्रमांक : ६९ दि. २१-१२-१७२१

संभाजी दुसरे यानी गुणाजी, कृष्णाजी व देवजी विश्वासराव सरनाईक तर्फ राजापूर, याना दिलेले वतनपत्र.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५६ सौम्य नाम संवत्सरे पौष शु।। त्रयोदशी भानुवासरे[1] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी गुणाजी विश्वासराव, कृष्णाजी विश्वासराव व देवजी विश्वासराव सरनाईक तर्फ राजापूर यांस दिल्हे वतनपत्र ऐसिजे. तुम्ही स्वामी सन्नीध विनंती केली कीं आदिलशाई कारकीर्दीस आपणांस रयत निसबत हक लवाजिमा चालत होता तो चालत नाहीं. स्वामीनी मेहरबान होऊन वतन चालवावे म्हणोन. त्यावरुन मनास आणिता तुम्ही पूर्वापार वतनदार प्रामाणिक. स्वामी चरणापासी निष्टेने वर्तत आहां. यास्तव स्वामी तुम्हावरी कृपाळु होऊन पेशजी वतन चालत होते त्या प्रमाणे स्वामीनी वतन करार करुन हे सनद सादर केली आहे. येणे प्रमाणे हक व जमीन इनाम. बी तां

गावगन्ने देहे ६४ एकून रयत नि।। करी व (दा) भोली १२० घाट वाकोला ऊर्फ आनस्कुरा येथे जकात दर बैली राजश्री परशरामपंती रुके ०३ दिल्हे आहेत. त्याप्रमाणे करार रुके दर बैली ०३.

जमीन पेशजी राजश्री परशरामपंत प्रतिनिधि याणी दिल्ही आहे त्याप्रमाणे बिघे पड.

०२।। मौजे धामणदे.

०२।। मौजे हरळे.

येकूण करी दाभोली एकवीस व पड जमीन गावगन्ने पांच बिघे व जकात तीन रुके याप्रमाणे वतन तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंश-

---

१ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

परंपरेने अनभवून स्वामीच्या पायासी निष्टेने वर्तोन रहाणे. निदेश समक्ष. मोर्तब.

तारीख ११.

जमादिलाखर सु।। सल्लासीन मया. रुजु

---

**क्रमांक : ७०** दि. ११–२–१७३०

मौजे उचगाव या गावास लष्कराचा उपसर्ग लागून सिवारे, वरेदारे लुटली गेली. त्यामुळे गावचे मोकदम परागंदा झाले. अथःपर त्याना लष्कराचा उपसर्ग लागणार नाही म्हणून राणोजी घोरपडे सेनापती यांचे अभयपत्र.

श्री
शंभु छत्रपती
राणोजी घो
रपडे

अभयपत्र समस्त सेना धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री राणोजी घोरपडे सेनापति ता। मोकदमानी मौजे उंचगाऊ का। हवेली कोल्हापूर. सु।। सलासीन मया अलफ. दादे कौलनामा यैसाजे. मौजे मजकूर राजश्री शामभट पूजारी उपनाम मुनेस्वर श्री करवीर निवासी यास योगक्षमास व निमे व मोहछावास श्रीस दिल्हा आहे. पेसजीचे तुम्हास सनदा सादर आहेत. साल मजकुरी गावास लस्करचा उपसर्ग लागोन खराब जाहले. सिवार लुटून गेला. घरे कोपटे लुटून गेली. तुम्ही परागंदा ज़ाहला म्हणून वेदमूर्तीनी हुजुर येऊन विदित केले. त्यावरून तुम्हास हे अभयेपत्र सादर केले आहे तुम्ही गावावरी येऊन गावीचे कीर्दि माहामुरी करून सुखरुप राहणे. तुम्हास लस्करचा उपसर्ग लागणार नाही. दरीबाब कौल असे[१] र।। छ ४ माहे शाबान.

मोर्तब सुद सिका

---

१ असेच अभयपत्र दावलजीराव सोमवंशी सरलष्कर यांचे दि. ११–२–१७३० चे आहे. त्यांत म्हटले आहे की " प्रस्तुत दहशतीमुळे तुम्ही परागंदा झाला...... तरी तुम्ही कोणे गोष्टीचा शक न धरिता मौजे मजकूरी घरदार बांधून गावाची कीर्दी मामुरी करून सुखरूप राहाणे ".

क्रमांक : ७१ दि. ५–६–१७३०

छत्रपती संभाजी दुसरे यानी सुभानजी जाधव याजकडे असलेला कडगाव हा गाव काढून तो रेखोजी जाधव यास इनाम दिला. छत्रपती राजाराम जिंजीमध्ये असता रेखोजी जाधव याने त्यांची सेवा केल्याचा उल्लेख या पत्रात आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५७ साधारणनाम संवत्सरे आषाढ शुध प्रतिपदा भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री रेखोजी जाधव बिन नरसोजी जाधव यास दिल्हे इनामपत्र येसेजे. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन सेवक, वडील वडिलापासून या राज्यात सेवा करीत आहा. तिर्थस्वरुप राजश्री— कैलासवासी स्वामी चंजी प्रांते असता तुम्ही बहुतच निष्ठेने सेवा करून त्याची कृपा संपादून घेतली. त्या उपरी राजश्री शिवाजी राजे दाजी यांचीही सेवा निष्ठेने केली. स्वामी राज्यासनारूढ झालियापासोन स्वामीच्या पायांसी निष्ठा धरून त्रिकर्ण शुध्दीने सेवा करीत आहा. (म्हणून दिले इनाम).

तेरीख २९

जिल्काद सूमा ईहिदे सलासीन.

---

क्रमांक : ७२ दि. २१–५–१७३०

बाबाजी शंकर याने रायाजी माने याजकडून तीनशे रुपये कर्जाऊ घेतले. व्याजाचा दर दर माहे दर शेकडा रुपये ५ असा होता.

श्री शंकर

राजश्री रायाजी मानेजी गोसावी यास स्ने।। बावाजी शंकर आमीन पेट शाहुनगर राम राम विनंती. सुर सन सलासीन आशर व मया आलफ. आम्ही आता कार्यप्रवर्त संमंधे तुम्हापासोन कर्ज घेतले रु।। ३०० तीनशे. यासी व्याज दरसदे दरमाहे पंचोत्रा प्रा। दोन महिने

फारीक करून देऊ. यास १४ जिलकाद शके १६५२ वर्षे वर्तमाना साधारण नाम संवत्सरे जेष्ट वद प्रतिपदा. मोर्तब.

सुद

बी कलम. माहादाजी पाटील.

१

---

क्रमांक : ७३ दि. ५-६-१७३०

मौजे हिरवडे या गावावर गोविंद नागनाथ याने स्वारी केली, तेव्हा हिरोजी शिंदे याचा बाप राणोजी मारला गेला. छत्रपती संभाजी दुसरे यानी हिरोजी शिंदे यास खूनकाट म्हणून तीन बिघे जमीन इनाम दिली.

श्री

सिका

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५७ साधारणनाम संवछरे आषाढ शु॥ प्रतिपदा भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी हिरोजी बिन राणोजी प॥ सिंदा मौजे हिरवडे ता तारळे यासी दिल्हे इनामपत्र यसीजे. तुवा स्वामी संनीध अर्थ केला की मौजे

सिका सिका
परशुराम त्र्यंबक याचा

मारावर गोविंद नागनाथ याणे स्वारी केली तेव्हा गाव मारिला. ते समई आपला बाप राणोजी पा जिवे मारिला. स्वामीनी खूनकाटे[१] इनाम दिला पाहिजे म्हणोन. त्यावरून गावची लावणी जाहली पाहिजे याकरिता तुजवरी स्वामी मेहेरबान होऊन खूनकाटे इनाम (दिले. बि तपशील).

ता २९ जिल्काद सुमा ईहिदे.

---

१ खूनकाट = युद्धात मेलेल्या शिपायाच्या कुटुंबास सरकारातून मिळणारी इनाम जमीन.

क्रमांक : ७४ दि. १८–६–१७३०

मोकदम मौजे डोणोली यास कृष्णाजी परशराम प्रतिनिधी यांचे पत्र की सद्हू गावच्या पाटील–कुलकर्ण्यास दोन बिघे पड जमीन इनाम दिली आहे.

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री कृष्णाजी परशराम प्रतिनिधी ताहा मोकदमानी मौजे डोणोली पा। सिराळे सुहुरसन ईहिदे सलासीन मया व अलफ. तुम्ही हुजुर येऊन विनंती केली जे पाटील कुलकर्णी यास शिरस्ताचे इनाम चालते. त्याणे करून संसारिक चालत नाही. गावची चाकरी करावी लागते. याकरिता स्वामीने कृपाळू होऊन शिरस्त्या खेरीज नूतन इनाम आर्जी करून दिलीयाने जमिनीची कीर्द करून कुटुंबाचा योगक्षेम चालवून गावची कीर्द करू म्हणवून. त्यावरून मनास आणून आर्जी नूतन इनाम भारा जमीन ०२ बिघे दिली असे. जमीनीची कीर्द करून गावची लागवड करणे. छ १२ जिल्हेज.

---

क्रमांक : ७५ दि.२०–७–१७३०

छत्रपती शाहू यानी राणोजी घोरपडे यास सुभा पन्हाळयात दहा व सुभा मिरजेत चौदा कर्यातीच्या देशमुखीचे वतन दिले.

श्री

श्री
वर्धिष्णो विक्रमो
विष्णोः सामूर्तिरिव
वामनी शंभू सूनो
रसौ मुद्रा शिवरा
जस्य राजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५७ साधारण नाम संवत्सर श्रावण

| श्री राजा शाहू नरपति हर्षनीधान बाजिराव बल्लाळ प्रधान | श्री आद्य आदि पुरुष श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी कृपानिधी तस्य श्रीनिवास परशुराम प्रतिनिधि |
|---|---|

बहुल द्वितीया इंदुवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यानी राजश्री राणोजी बिन पिराजी घोरपडे यासी दिल्हे वतनपत्र यैसेजे. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन येकनिष्ट सेवक. तुमचे वंशपरंपरेने चालवणे आवशक जाणोन तुम्हावर स्वामी कृपाळू होऊन सुभा प्रांत पनाळा व सुभा प्रांत मिरज येथील सरदेशमुखीचे वतन तपशील

| सुभा प्रांत पनाळा कर्याती | सुभा प्रांत मिरज कर्याती |
|---|---|
| १ कर्यात ठाणे | १ कर्यात हवेली मिरज |
| १ कर्यात कळे | १ कर्यात सांगली |
| १ कर्यात बोरगाव | १ कर्या तासगांव |
| १ कर्यात रुकडी | १ की।। इसापूर |
| १ कर्यात आस्टे | १ की।। कविटे येकंद |
| १ कर्यात वडगाव | १ कर्यात अंजनी |
| १ कर्यात कोडोली | १ कर्यात मणे राजुरी |
| १ कर्यात सातवे | १ कर्यात देसिंग |
| १ कर्यात वाळवे | १ कर्यात कविटे महाकाल |
| १० | १ कर्यात वेडग |
| | १ कर्यात ढालगाव |
| | १ कर्यात म्हैसाळ |
| | १ कर्यात सावर्डे |
| | १ कर्यात नांदरे |
| | १४ |

येकून सुभा पनाळा कर्याती दाहा व सुभा मिरज कर्याती चौदा येणेप्रमाणे तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने वतन मरामत करून दिल्हे असे. तर तुम्ही सदरहू वतनाचा हक व लाजिमा पानमान

तश्रीफ व इनामती व बाजेकानू कांइदे पूर्वील सिरस्तेप्रमाणें तुम्ही व तुमचे वंशपरंपरेने घेऊन वतन आनभऊन सुखरुप राहाणे. जाणिजे.

लेखनालंकार. मर्या
देयं रा
जते

रुजु समत् समत् स॥

सुरनिविस सुमंत मंत्री सरकार.

तेरीख पंधरा मोहरम सुमा इहिदे सलासीन मया आलफ.

बार सुद्र.

---

क्रमांक : ७६ दि. ११-११-१७३०

मौजे चिंचवडे या गावावर पडलेल्या छाप्यात सदहू गावचा पाटील रुद्राजी हिरोजी पाटील शिंदे याचा मुलगा ठार झाला होता. त्याबद्दल पाटलास मातुश्री साहेबांच्या कडून तीन बिघे खूनकाटे जमीन इनाम मिळाली होती. नंतर त्यास छत्रपती संभाजी दुसरे यांचे कडून आणखी जमीन इनाम मिळाली. एकूण त्यास पांच बिघे जमीन इनाम मिळाली आहे, म्हणून भगवंतराव अमात्य यांचे मौजे चिंचवडेच्या मोकदमास पत्र.

श्री

शिक्का वर्तुळाकार
आहे

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी (राज)मान्य राजश्री भगवंतराऊ रामचंद्र अमात्य हुकुमतपन्हा. ता॥ मोकादमानी मौजे चिंचवडे ता। किल्हे सुभा प्रांत पनाळा सु॥ ईहिदे सलासीन मया अलफ. बाजिदे + + + ई॥ वा॥ मजकूर बाहीर पडोन जाऊन गावगना भाव तुम्ही अवघे गाव सोडून येणे. त्यास कोणी येईनात म्हणऊन मौजे मजकुरावरी स्वारी रात्री घालून रुद्राजी बिन हिरोजी पाटील

सिंदा मौजे मजकूर याचा पुत्र संदजो पाटील जिवे मारिला. त्या उपरी देसक मजकुरास समाजाविसी करून ता मजकुरास आणिला. (पा)टील मजकूर याचा खून जाहिला हे वर्तमान किले पनाळीयाचे मुकामी श्रीमंदर मातुश्री साहेबास विदित केले. त्यावरून मातुश्रीसाहेबी पाटील मजकुरास खूनकाटे इनाम जमीन तीन बिघे देऊन सनद सादर केली व आम्हाकडील सन(द) दिली. सदरहू तीन बिघे जमीन आनभवीत होता. हाली पाटील मजकुराने माहाराज राजश्री स्वामीस विनंती केली कीं आपला पुत्र देसाई याणी स्वारी घालून मारिला. मातुश्री साहेबी तीन बिघे जमीन इनाम दिली आहे. अशास माहाराजाही कृपाळू होऊन आणखी दोन बिघे जमीन द्यावी म्हणऊन अर्ज केला. त्यावरून पाटील मजकुरावरी माहाराज राजश्री स्वामी कृपाळू होऊन खूनकाटे जमीन इनाम बिघे ०५ पांच मौजे मजकुरी दिल्हे.

| पेसजी सनदे प्रमाणे. | 'हली नूतन जमीन बी–पड |
|---|---|
| ०२ भात जमीन | नवकीर्दीपैकी भात ०२ |
| ०१ वरकस मळा व माळ | जमीन. |
| ०३ | |

येकून पांच बिघे जमीन इनाम खूनकाट देऊन सनद सादर केली आहे. त्याप्रमाणे हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी सदरहू जमीन माहालकरी––––चे बिघयाने पेसजी तीन बिघे नेमून + + आहे. हली दोन बिघे जमीन पड पैकी याचे बिघयाने नेमून देऊन सदरहू जमीन याचे वंश परंपरेने चालवीत जाणे. जाणिजे.

छ ११ जमादिलाकर प॥ हुजुर मोर्तब असे.

---

**क्रमांक : ७७** **दि. २१–११–१७३०**

गावास लष्कराचा उपसर्ग पोहोचला हे लक्षांत घेऊन वसूल साडे एकवीस रुपये आकारण्यात आला आहे. तरी तो भरावा, जुलुम जबरदस्ती होणार नाही, म्हणून येसाजी भोसले यांचे मोकदम मौजे बहादुरवाडी यांस अभयपत्र.

श्री

श्री
श्री राजा शाहू
चरणी तत्पर
येसाजी भोसले
निरंतर

अभयेपत्र समस्त राजकार्येधुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री येसाजी भोसले ताहा मोकदमानी मौजे बाहादुरवाडी ता॥ वाळवे सुहुरसन इहिदे सलासैन मया अलफ. दिल्हे अभयेपत्र ऐसेजे. साल-की + + + चे खंडणीविसी हुजुरून तुम्हास आज्ञा केली होती त्यावरून तुम्हाविसी रा॥ आणाजी जिवाजी मु॥ देशमुख ता॥ मजकूर याणी हुजूर येऊन अर्ज केला जे साल गु॥ मौजे मजकुरावरी लस्कराचा कसाला पडोन गावाची खराबी जाहाली. ऐसेयासी गावावरी नजर देऊन + + + माफिला. माथा बेरीज ठेविलियाने उगवणी करून पेस्तर सालची लावणी करतील म्हणोन. त्यावरून बाराई अर्ज खातरेस आणून गावावरी नजर देऊन मख्ता खंडणी बि॥ इनाम तिजाई विभाग जिल्हेकडील करार रुपये

२० येन खंडणी
१॥ कारकुनी कौलावण
२१॥

येकून साडे येकवीस रु॥ करार केले असेत.

येणे प्र॥ वसूल देऊन कीर्द मामुरी सुखरूप करणे. जाजती जलल होणार नाही. अभय असे. जाणिजे.

छ २१ माहे जमादिलावल. मोर्तब सुद.

मोर्तब
सुद

---

**क्रमांक : ७८** दि. २०-१२-१७३०

क॥ कागल येथें झालेली एक हुजीरमजालसी. यात भाग घेणाऱ्यांची नावेच फक्त उपलब्ध आहेत.

माहजर ब त॥ २० माहे जमादिलाखर दरजागा को कागल पो मार सरकार रायबाग सुभे दारुल जफर बिज्यापूर सु॥ इहिदे सलासीन मया अलफ. सन ११४० साधारण नाम सवत्सरे मार्गसीर्ष बहुल सप्तमी रविवार बे॥ सभा नाईक हाजारमज्यालसो यानी----

राजश्री अबाजी सर्ज्याराऊ घाटगे जाहागीरदार व फौजदार पो मार------

सिका पारसी
बे॥ राजमुनसो
मोर्तब पारसी

मल्हार कळसो पेशवे

कोनेरी संगम मुजुमदार चाकर सरकार

गोविंद विनायक
शामजी गोविंद

गोपाळ मल्हार कोटीनविस पो मार

सिपाईयानी

गणोजी नलवडे चाकर सरकार (कठार)

दाजी यादव देसाई ता अरळ चाकर सरकार-----(कठार)

फिरंगोजी यादव देसाई ता अरळ चाकर सरकार-----(कठार)

मालोजी नलवडे चाकर सरकार (कठार)

संताजी मुह्मकर सिलेदार चाकर सरकार-----(कठार)

सेख गवार पठाण चाकर सरकार (कठार)

अबाखान सिलेदार चाकर सरकार-----(कठार)

पिरोजी नलवडे सिलेदार चाकर सरकार-----(कठार)

खंडोजी कोरे सिलेदार (कठार)

मरोजी जाधव हुजरे (कठार)

देसकानी पो मार

राजश्री पिराजी सर्ज्याराऊ घाटगे अनंद भिकाजी देसकुलकर्णी
नि।। यादो नारायण हवाले पो मार
देशमुखी पो मार
सिका बालबद.

नरहरी यादव हवाले नाडगोंडा
पो मार मोर्तब बालबद.

नाईकवाडी यानी पो मार

| | | |
|---|---|---|
| ब।। गोसो बाळाजी सबनीस पै।। मार | सिदक नाईक नाईकवडी | मोकदमानी क।। कागल |
| मर्दा नाईकवाडी सरगुरु के।। चिखली | को हवेली पो मार कठार | जखगोंडा पटेल बिन रायगोंडा पटेल |
| सेख सिराज नाईक सरनाईक क।। मुरगोड ——कठार | सैद हुसेन नाईक नाईकवडी को वाळवें बु।। ——कठार | नागर लखमोजी कृष्णाजी तासिलदार नरसिंह कुलकर्णी |
| फकिराभाई भालदार—— कांटी | कमाल बंडू नाईक नाईकवडी क।। मांजरी कठार | लगमणा चौगला |
| सुभानजी नाईक वाकिरी | लगमाणा काटीवाला ——तागडी | |

(अपूर्ण)

---

क्रमांक : ७९ दि. २३-१-१७३१

छत्रपती संभाजी दुसरे यानी रामचंद्र नाईक पुंडे यांस मौजे माजनाळ हा गाव इनाम दिला. रामचंद्र नाईक यांचे पिते शामजी नाईक यानी छत्रपती राजाराम यांची जिंजी येथे सेवा केल्याचा निर्देश या सनदेत आहे.

श्री

श्री
प्रतिपच्चंद्ररेखे
व वर्धिष्णुर्विश्ववं
दिता शंभु छत्रप
ते मुद्रा रामसूनो
विराजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५७ साधारणनाम संवत्सरे पौष बहुल येकादसी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री रामचंद्र नाईक उपनाम पुंडे गोत्र जामदग्नी सूत्र आश्वलायन यास दिल्हे इनामपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन येकनिष्ट सेवक. तुमचे पिते र॥ शामजी नाईक पुंडे याणी तीर्थरूप माहाराज राजश्री कैलासवासी

सिका: श्री आई आदि पुरुष श्री राजा शिव छत्रपती स्वामि कृपा निधि॥ तस्य परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि

स्वामीची सेवा स्वामी चंजीस गेले त्या तागायत केली व मारनिले तुम्हीही स्वामी सेवा निष्ठेने केली व करिता आहा तुमचे चालवणे हे स्वामीस परम आवश्यक. (म्हणून मौजे माजताळ हा गाव इनाम दिला.)

मर्यादेयं
विराजते

---

**क्रमांक : ८०** **दि. ३१-१-१७३१**

रामचंद्र नाईक पुंडे, मंत्री यानी छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडे काही मागण्या केल्या होत्या. त्या त्यानी मान्य केल्या व त्यांचे पुत्र शामजी नाईक पुंडे याना मंत्रिपदाचा हुद्दा देऊन निशाण चालविण्यात येईल असे आश्वासन दिले.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५७ साधारणनाम संवत्सरे माघ शुध पंचमी रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रामचंद्र नाईक पुंडे मत्री यास आज्ञा केली यैसीजे. तुम्ही आपले स्वकीय प्रसंगविषईंची याद पाठविली ते हुजुर प्रविष्ट होऊन विदित जाली. यैसियासी तुम्ही स्वामीची सेवा निष्टेने करीत आहा. स्वामी तुमचे न चालवीत की काय. हाली यादी पाठविली त्यापैकी निर्वाह करून दिल्हा आहे. बी तपसील.

गावाचेविशी लिहिले त्यावरून मौंजे माजनाळ तर्फ बोरगाव हा गाव इनाम दिल्हा असे——

कलम १

तुम्हास वराता चंदावरचे यैवजी रुपये देविले असे ते

३००० हाली यैवजी

- २००० पेस्तर वरात मादर आहे.
- १००० हाली वरात सादर.
- ———
- ३०००

४००० पेस्तर यैवजाचा निर्गर जालियावरी घेणे——

———

७०००

——

कलम

तुमचे घरचे बेगमीस गला देसरी सोळुले मापे येणे. भिकसेट याकडेस खंडी १० दाहा देविली असे.

——कलम

तुम्हास मंत्रीपणाचा हुदा आहे त्याचे निशाण चालवावयाची आज्ञा करून तुमचे पुत्र राजश्री शामजी नाईक यांचे हातून स्वामी सेवा घेतली——

कलम १

पोतदारी विशई तुम्ही सांगून पाठविले. तरी पोतदारीचा धंदा चालतच आहे. दस्तुरी चालवणे. ते तुम्ही हुजुर आलियावरी सुदामत चालिल्याप्रमाणे चालवावयाची आज्ञा होईल. कलम १

येणेप्रमाणे निर्वाह करून दिल्हा आहे. तुम्ही समाधान असो देणे. जाणिजे. बहुत काय लिहिणे. तरी तुम्ही सूज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते

---

क्रमांक : ८१ दि. ७-२-१७३१

गंगाजी चौगला, मौजे गोटखिंडी व त्याचा भाऊ या दोघामध्ये देण्या-घेण्याचा तंटा उद्भवला असता मातुश्री गंगाबाई घोरपडे (बहादुरवाडीकर) यानी मोकदम मौजे कोरेगाव याच्याकडे गंगाजी चौगला याच्याबाबत जामिनकी मागितली होती. ती त्याने दिली.

श्री

गंगाजलनिर्मल मातुश्री गंगाबाई घोरपडी
देसमुख का। वाळवे साहेबाचे सेवेसी.

दि॥ बे॥ मोकदमानी मौजे कोरेगाव का॥ वडगाव सु॥ इहिदे सलासीन मया अलफ. दिल्हा हजीरजमान कतबा यैसाजे. गंगाजी चौगला मौजे गोटखिंडी यामधे व यांचा भाऊ यांमधे देणे घेणेचा कजिया आहे. याबदल साहेबी हजीरजमान मागितले. तरी गंगाजी चौगला यासी हजीरजमान[1] असो. उभयेतांचे बोली होय तो पावतो हजीरजमान असो. गंगाजी चौगला वेव्हारास हजीर न होता गेला तरी हजीर करून. हजीर न करु तरी त्याचे ताकितीचा जाब करून देऊ. हजीरजमान कतबा.

सही. छ १० माहे साबान.

नांगर

---

१ हाजीरजामीन = हमीदार.

क्रमांक : ८२ दि. २३-२-१७३१

तुम्ही आम्हाला घरच्या सारखेच आहात. तुम्हाला कधी अंतर देणार नाही- म्हणून श्रीनिवास परशराम प्रतिनिधी यांचे मालोजी घोरपडे यांस पत्र.

श्री

राजश्री मालोजो घोरपडे

गोसावी यास

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने ॥

श्रीनिवास परशराम प्रतिनिधि आसीर्वाद. सुमा ईहिदे सलासीन मया आलफ. सर्वविसी आपण वडील आहेत. सांभाळला नाही म्हणून लिहिले. तरी तुम्ही पहिलेपासून या घरीचे आहा. तुम्हाविसी आंतर होणार नाही. आपले समाधान आसो देणे. जाणिजे.

छ. २६ साबान. बहुत काय लिहिणे.

राजते
लेखना
वधी

श्री
श्री आई आदि पुरुष
श्री राजा शाहू छत्रप
ति स्वामी कृपानिधि त
स्य श्रीनिवास परश
राम प्रतिनिधि

---

क्रमांक : ८३ दि. १३-४-१७३१

छत्रपती शाहू व छत्रपती संभाजी दुसरे यांच्यात झालेला तहनामा.

श्री

तालीक

तहनामा चिरंजीव राजश्री संभाजी राजे यासि प्रति राजश्री शाहू राजे याणी लेहून दिल्हा सुहुर सन ईहिदे सलासैन मया व आलफ. छ १६ शौवाल विरोधीकृत संवत्सर चैत्र वद्य द्वितीया वी ता

ई।। वारुण माहाल तहद संगम दक्षण तीर कुल दुतर्फा मुलुक दरोबस्त देखील ठाणी व किले तुम्हास दिल्हे आहेत.
----कलम १.

वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षण तीर तहद निवृती संगम तुंगभद्रा पावेतो दरोबस्त देखील गड व ठाणी तुम्हाकडे दिल्ही असेत.
-----कलम १.

तुंगभद्रेपासून तहद रामेश्वर देखील संवस्थान निमे आम्हाकडे ठेऊन निमे तुम्हाकडे करार करून दिल्ही असेत
कल(म) १

कोकण प्रांत साळसी पलीकडे तहद पंचमाहाल आंकोले पावेतो दरोबस्त तुम्हाकडे दिल्हे असे
---कलम १

किले कोपल तुम्हाकडे दिल्हे. त्याचा मोबदला तुम्ही रत्नागिरी आम्हाकडे दिल्ही.
कलम १

इकडील चाकर तुम्ही ठेऊ नये तुम्हाकडील चाकर आम्ही ठेऊं नये.
कलम १

वडगावचे ठाणे पाडून टाकून
कलम १

मिरज प्रांत विज्यापूर प्रांतीची ठाणी देखील आथणी तासगांव वगैरे तुम्ही आमचे स्वाधीन करावी
कलम १

तुम्हासी जे वैर करतील त्यांचे पारपत्य आम्ही करावे. आम्हासी वैर करतील त्यांचे पारपत्य

तुम्ही करावे. तुम्ही आम्ही येका विचारे राज्याभिवृधी करावी.

कलम १

येकूण नऊ कलमे करार करून तहनामा लेहून दिल्हा असे. सदरहू प्रमाणे आम्ही चालऊ. यासि अंतराय होणार नाही.

---

**क्रमांक : ८४** दि. १६–४–१७३१

छत्रपती संभाजी यांचे स्वाधीन किल्ले गगनगड करावा म्हणून छत्रपती शाहू यांचे भगवंतराव अमात्य याना आज्ञापत्र.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५७ विरोधीकृत संवत्सरे चैत्र बहुल शष्टी भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराव पंडित यासी आज्ञा केली ऐसीजे. स्वामीची व चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांची भेटी होऊन सौरश जाला. वारणेपासून तुंगभद्रेपावेतो मुलुक दरोबस्त देखील गड कोट ठाणी त्याकडे दिल्ही. किले गगनगड चिरंजीव राजश्री यांकडे देविला असे. तरी त्याची पत्रे घेऊन यतील त्याचे स्वाधीन किला करणे. जाणिजे.

[१] बहुत लिहिणे तरी सूज्ञ असा.

शिक्का
मोर्तब

---

**क्रमांक : ८५** दि. १६–४–१७३१

छत्रपती शाहू राजे यांचे हिंदुराव घोरपडे याना पत्र की, वारणेपासून तुंगभद्रेपर्यंतचा सर्व मुलुख संभाजी राजे याना देण्यात आला आहे. तरी तुमच्यापाशी जे गडकोट व ठाणी असतील ती त्यांची पत्रे घेऊन येणारांच्या हवाली करावी.

---

१ अक्षराचे वळण वेगळे.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५७ विरोधकृत सवछरे चैत्र वहुल षष्टी भृगुवासरे क्षेत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री हिंदुराव घोरपडे ममलकतमदार यासो आज्ञा केली यैसीजे. स्वामीची व चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांची भेटी जाहली. सौरस्य जाहले. वारणेपासून तुंगभद्रेपर्यंत मुलुख दरोबस्त देखील गडकोट ठाणी दिल्ही. येसीयास तुम्हाकडे गडकोट ठाणी असतोल ती चिरंजीव राजश्री याकडे देविली असेत. तरी त्याची पत्रे घेऊन येतील त्याच्या हवाली करणे.

बहुत लिहिणे तरी सूज्ञ असा.

मोर्तब

---

**क्रमांक : ८६** दि. १६-४-१७३१

वारणेपासून तुंगभद्रेपर्यंतचा मुलुख छत्रपती संभाजी यांचे स्वाधीन केला आहे. तरी किल्ले कोपल त्यांच्या ताब्यात द्यावा, म्हणून छत्रपती शाहू यांचे गोविंदराव मोरे याना आज्ञापत्र.

श्री

तालोक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५७ विरोधकृत संवत्सरे चैत्र बहुल शष्टी भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री गोविंदराव मोरे यासी आज्ञा केली यैसीजे. स्वामीचो व चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांची भेट जाहाली. वारणेपासून तुंगभद्रे पावेतो मुलुक दरोबस्त देखील गट कोट ठाणी त्याकडे दिल्ही. किले कोपल चिरंजीव राजश्री याकडे देविला आसे. तरी त्याची पत्रे

घेऊन येतील त्याचे स्वाधीन कोपल किला करणे. जाणिजे. बहुत काय लिहिणे.[१]

---

क्रमांक : ८७ दि. १६-४-१७३१

हेरले, आळते, नांदणी इत्यादि ठाणी छत्रपती संभाजी यांच्या स्वाधीन करावीत व वडगाव हे ठाणे पाडून द्यावे म्हणून छत्रपती शाहू यांचे कुसाजी भोसले व येसाजी भोसले याना आज्ञापत्र.

श्री

तालिक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५७ विरोधीकृतनाम संवत्सरे चैत्र बहुल शेष्टी भृगुवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री कुसाजी भोसले व येसाजी भोसले यासी आज्ञा केली ऐसीजे. चिरंजीव राजश्री संभाजी राजे यासो वारणेपासून तुंगभद्रेपर्यंत मुलुक दरोबस्त देखील गड कोट ठाणी दिल्ही आहेत. तरी तुम्ही त्या प्रांते उपसर्ग न करणे. हेरले, आळतें, नांदणी हा(त)कलंगणे, घुणकी, सदरहू ठाणी त्याचे स्वाधीन करणे. वडगावचे ठाणे पाडून स्वाधीन करणे. जाणिजे. बहुत लिहिणे तरी सूज्ञ असा. मोर्तब.

---

क्रमांक : ८८ दि. २४-६-१७३१

सुभा पन्हाळा व मामले मिरज येथील सरदेशमुखी छत्रपती संभाजी दुसरे यानी राणोजी घोरपडे यांस दिली.

---

१ याच आशयाची व याच तारखेची छत्रपती शाहू यांची बळवंतराव सिवदेव व सुभानराव मोरे याना लिहिलेली आज्ञापत्रे उपलब्ध आहेत.

श्री

सिका

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५८ विरोधकृत नाम संवछर आशाढ शु।। २ गुरुवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राणोजी बिन पिराजी घोरपडे नवकस यास दिले वतनपत्र यसाजे. तुम्ही मनोलीचे मुकामो स्वामी संनीध विनंती केली की आप (ले) अजे राजश्री संताजी घोरपडे याणो तीर्थस्वरुप राजश्री कैलासवासी स्वामीचे सेवा मनोभावे केली. राज्याभिवृध्धी विषई बहुत श्रम साहास केले. या करितां कैलासवासी स्वामीनी चंदीचे मुकामी मशारनिल्हेवर मेहेरबान होऊन प्रांत पनाळा व मामले मिरज या दोनी सरदेशमुखीचे वतन दिवाणाच होत ते मरामत करुन दिल्हे. त्याप्रमाणें त्यानी आनभविलें. त्यामागें आपले चुलते राणोजी घोरपडे याणी आनभविले. ते स्वामी कार्यावर खर्च जाहाल. त्या उपरी आपले पिते राजश्री पिराजी घोरपडे याणी स्वामीची सेवा केली. त्याणी वतन आनभविलें. भोगवटीयास पत्रे पूर्वील होती ती आवांतर प्रसंगामुळे गेली. पुड भोगवटीयास पत्र पाहिजेत या करिता सातारयाचे मुकामी राजश्री शाहु राजे यासि विनंती केली. त्याणी आपली पत्र करुन दिली. आपण स्वामीची सेवा करीत आहे. तरी वतनाची पत्रे द्यावयास आज्ञा केली पाहिजे म्हणोन तुम्ही विदित केले त्यावरुन मनास आणिता राजश्री संताजी घोरपडे याणी ती।। राजश्री कैलासवासी स्वामीची सेवा बहुत निष्टेनी केली या करितां त्यास सुभा पनाळा व मामले मिरज या दोही सुभेची सरदेशमुखीचे वतन दिल्हे. त्याप्रमाणें चालत आहे. तुम्ही स्वामिची सेवा निष्टेने करीत आहां. तुमचे सर्व प्रकारें चालवणें स्वामीस परम आवशेक. यास्तव पूर्वी कैलासवासी राजश्री स्वामीनी सरदेशमुखीचे वतन दिल. त्याप्रमाणें स्वामीनी वतन तुम्हास आजरामरमत करुन दिल्हे आसे. सुभा पनाळा व मामले मिरज कर्याती आठावीस यकूण देहे बी त।।

सिका सिका

सुभा प्रांत पनाळा

किता माहाल यकूण देहे

१ ता बोरगाव ३३
१ ता ठाणे २७
१ ता कळे १२
१ ता सातव २१
१ ता कडोली १२
१ ता वडगाव १८
१ ता वाळव २९
　२१ ता मा।र
　८ मिरज ब।। क।। भिलवडी
　२९
१ ता आष्ट २०
　१० ता मा।र
　१० मिरज क।। मा।र
　२०
८

किता माहाल देहे

१ ता आळत ३५
　१६ ता मा।र
　१९ मिरज ब।। क।। २ य।।
　　९ क।। उदगाव
　　१० क।। सिरहटी
　　१९
　३५
१ ता रुकडी २३
　१२ ता मा।र
　११ मिरज ब।। क।। १
　　१ क।। इचलकंर्जी
　　१० ब।। रुकडी
　　२३
५८

१७२

२

मामले मिरज सुभेचे माहाल

किता माहाल देहे यकून

१ ता हवेली मिरज ११
१ क।। सांगली ८
१ क।। म्हैसाळ ७

किता माहाल यकून देहे पलिट

क।। नांदर फुट गाव का। य।। देहे
१ क।। नांदरे
१ मौजे रायबाग वाडी येक

| | | |
|---|---|---|
| १ क॥ बसापूर | ८ | १ मौजे हतनोली |
| १ क॥ तासगाव | १० | १ मौजे बेंदरी |
| १ क॥ बेडग | १० | १ मौजे चिंचणी |
| १ क॥ कवट यकंद | ९ | १ मौजे बेणापूर |
| १ क॥ आंजनी | १२ | १ मौजे मोरकळे |
| १ कवट म्हांकाळ | १५ | १ मौजे जुजगाव |
| १ क॥ ढालगाव | १२ | १ मोजे आळसंद जाधवाचे |
| १ क॥ सावर्डे | ८ | १ मौजे मलणगाव |
| १ क॥ देसिंग | ९ | १ मौजे डोंगरसुनी |
| १ क॥ मनेराजोरी | ८ | १ मौजे आकली |
| ——— | ——— | १ मौजे डिगरज खुर्द |
| १३ | १२७ | १ मौजे मांजरी |
| | | १ मौजे गोवरगांव |
| | | १ मौजे बोरगाव |
| | | १ मौजे सावळज |
| | | १ मौजे तिसिंग |
| | | १ मौजे निपट बोरगाव |
| | | १ मौजे राजापूर |
| | | ——— |
| | | यकूण क॥ येक |

सुभा खटाव क॥ दोन प्रांत मिरंज

| | | |
|---|---|---|
| १ तर्फ खानापूर देहे | २० | वीस |
| १ तर्फ विटे भालवणी देहे | २० | वीस |
| २ | ४० | |

सुभा प्रांत कोल्हापूर क॥ इजलकंर्जी प्रांत

मिरज देहे ——— ९ नऊ

ता सदलगे पाौ देहे — ता यकसंब

१ मौजे कोडोली — १ मौजे टाकली

१ मौजे हुपरी
१ मौजे रेंदाळ
१ मौजे सुळकूड
१ मौजे सिरदवाड
१ मौजे उटवाड
१ मौजे अबदुल लाट
—
७

१ मौजे बस्तवाड
—
२

तेरीज यकंदर माहाल यकूण देहे.

| | माहाल | यकूण देहे |
|---|---|---|
| सुभा प्रांत पनाळे | १० | २३० |
| मामले मिरज सुभा माहाल | १८ | १९६ |
| | | ४२६ |

| | माहाल | देहे |
|---|---|---|
| मामले माार | १४ | १४७ |
| सुभा खटाव | २ | ४० |
| सुभा कोलापूर | २ | ९ |
| | १८ | १९६ |

२८

येणे प्रमाणे सुभा पनाळा व मामले मिरज सुभा दर माहाल येथील माहाल आठावीस एकूण देहे च्यारसेहे सवीस हे सदरहू वतन आजराम्हरामत करून दिल्हे आसे. या वतनास हक व लवाजिमा मानपान तासरीफ इनामत व बाजे कानू काइदे पूर्वील सिरस्ते प्रमाणें करार केले आसे. तरी तुम्ही सरदेशमुखीचे वतनाची सेवा करीत जाणे आणि सुभा पन्हाळा व मामले मिरज सुभा दर माहाल येथील सरदेशमुखीचे वतन तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंश परंपरेने आनभऊन

स्वामीच्या पायासी निष्टा धरून सुखरुप राहणे.[१] निदेश समक्ष. मोर्तब सिक्याचे.

तेरीख छ १.

माहे रजब सूरसन इसने.

---

**क्रमांक : ८९** दि. २४-६-१७३१

राणोजी घोरपडे याना मामले मिरजेची सरदेशमुखी दिली आहे म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे देशाधिकारी व कारकून मामले मिरज यांस पत्र. यांत शिवाजी महाराजानी ही सरदेशमुखी अनामत केल्याचा निर्देश आहे.

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५८ विरोधीनाम संवत्सरे अशाड शुध्द द्वितीया गुरुवासरे[२] क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी—

राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान
(व) भावी मामले मिरज यासि.

अज्ञा केली यसीजे. राजश्री राणोजी बिन पिराजी घोरपडे नवकस देशमुख मामले मजकूर याणी मनोलीचे मोकामी स्वामी सनीध विनंती केली कीं आपले आजे राजश्री संताजी घोरपडे याणी तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामीची शेवा मनोभावें केली. या करितां कैलासवासी स्वामी आपले आज्यावर मेहेरबान होऊन मामले मिरज येथील सरदेशमुखीचे वतन पूर्वी जैन व ब्राह्मणाचे होते त्यास थोरले माहाराज कैलासवासी याच्या पायापासी अनराहट केली यास्तव त्याचे वतन दूर केले होतें. ते मशारनिलेस चंदीच्या मुकामी मरामत करुन दिल्हे. त्याप्रमाणे आपल्या आज्यानी अनभविले. त्याप्रा आपले.

---

१ याच तारखेची मिरजेच्या अठरा कर्यातीचीहि देशमुखी सनद आहे.
२ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

चुलते राणोजी घोरपडे याणी अनभविले. ते स्वामी कार्यावरी पडले. या उपरी आपले बाप पिराजी घोरपडे याणी अनभविले. हाली वतन सेवकास चालत आहे. परंतु भोगवटीयास पूर्वील पत्रे होती ती अवांतर प्रसंगामुले गेली. पुढे भोगवटीयास पत्रे पाहिजेत. यसीयासी सातारेयास राजश्री शाहु राजे यासि विनंती केली. त्याणी आपली पत्रे करुन दिल्ही आहेत. तरी स्वामीनी आपली पत्रे भोगवटीयासी करुन दिल्ही पाहिजेत. (वतनाचा तपशील आहे).

---

**क्रमांक : ९०** **दि. २९-६-१७३१**

महाराज राजश्री स्वामीनी राणोजी घोरपडे यांस मिरज प्रांती नऊ गावची सरदेशमुखी दिली आहे. तरी सदर्हू गावच्या सरदेशमुखीचा ऐवज त्यांच्याकडे द्यावा म्हणून हिंदुराव घोरपडे यांचे सगुणाबाई निंबाळकर यांस पत्र.

श्री

श्री मार्तंड विरंची च
रण भजन तत्पर
हिंदु सुत मुरारराव
घोरपडे निरंतर

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री हिंदुराव घोरपडे ममलकतमदार मातुश्री सगुणाबाई निंबाळकर ता मोकदमानी मौजे देहाय——

का॥ इचलकर्जी
पा॥ देह खाली सदलगे
१ मौजे कोडोली
१ मौजे हुपरी
१ मौजे रणदाळ
१ मौजे सुळकोड
१ मौजे सिर्दवाड
१ मौजे दत्तवाड
१ मौजे लाटी
७

मौजे सिरटी खाली यकसंबे
१ बस्तवाड
१ मौजे टाकळी
२

येकून देह नव प्रां मिरंज सुहुरसन इसने सलासीन मया अलफ. देहाये मजकूरची सरदेशमुखी माहाराज राजश्री—— स्वामीनी चिरंजीव राजश्री राणोजी घोरपडे सेनापती यासी दिल्ही आहे. तरी तुम्ही सरदेशमुखीचा यैवज त्याजकडे देत जाणे. उजुर न करणे. जाणिजे. छ ५ मोहरम.

राजते
लेख
नावधी

---

क्रमांक : ९१ दि. ३०-६-१७३१

**पिराजी घोरपडे हे नागनूर गावी ठार झाले होते. तो गाव आपणास इनाम मिळावा म्हणून राणोजी घोरपडे यानी छत्रपती संभाजी दुसरे याना विनंती केली असता त्यानी ती मंजूर केली.**

श्री
प्रतिपच्चंद्र रेख :
व वर्धिष्णुर्विश्व वं
दिता शंभु छत्रप
तेर्मुद्रा राम सूनो
र्विराजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५८ विरोधकृत संवत्सरे अशाढ शुध सप्तमी सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री राणोजी घोरपडे बिन पिराजी घोरपडे नौकस यांसी आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही मनोळीचे मुकामी स्वामी संनीध विनंती केली की आपलें बाप रा।।

श्री
राजा शंभु छ
त्रपति हर्षनिदान
त्र्यंबक सुत निल
कंठराव मुख
प्रधान

श्री आई आ
दि पुरुष श्री राजा
शिवछत्रपती स्वामी
कृपानिधि । तस्य प
रशुराम त्र्यंबक
प्रतिनिधि

पिराजी घोरपडे स्वारीस गेले होते. तेव्हां मौजे नागनूर क।। नूल येथील देशमुख बाहेर निघाला. जुंझ झाले. त प्रसंगी म।।निले निधन

पावले. यास्तव मौजे म॥र आपणास इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून तुम्ही विदित केले. त्यावरून स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन ( वतन दिले इत्यादि).

मर्यादेयं तेरीख ५ मोहरम सु॥ इसने
विराजते सुरु सुद्र बार.

रुजु संमत
मंत्री

---

**क्रमांक : ९२** दि. ९-७-१७३१

मौजे कणेरी या गावाच्या मार्गावर होणाऱ्या व्यापारावरील जकातीचे उत्पन्न श्री काडेश्वरास दिलेले आहे. ते पूर्ववतप्रमाणे चालवावे म्हणून दिवाण कोट कोल्हापूरचे मौजे कणेरीच्या मोकदमास पत्र.

श्री श्री काडेश्वर

शिक्का

आज दिवाण कोट कोल्हापूर ता। मोकदमानी मौजे कणेरी क॥ हवेली व मार्ग माहालानिहाय क॥ हवेली सु॥ इसनें सलालीन मया आलफ. मौजें म॥ च्या मार्गानें वाणी उदमी येतात त्यास महतकदीम श्री——देवाची जकासी आहेत. श्री चे येणे प्रा। आहे——

| नगास रुके | गोणास | + + + |
|---|---|---|
| ८६ | | ८॥। |

येणे प्रमाणे सा रुके गोणीस ती रुका सवाडास[1] सापिका[2] आहे. येणेप्रमाणे चालत आहे ते अविछिन चालविणे. फिरोन बोभाट येऊ न

१ सवाड = पातळ.

२ सापिका = एक तांब्याचे नाणे.

देणे. महतकदीमने चालत आहे त्याप्रमाणे चालवीत जाणे. जाणिजे.

ता. छ १५ मोहरम. मोर्तब सुद.

शिका

---

**क्रमांक : ९३** दि. ९-७-१७३१

छत्रपती संभाजी दुसरे यांचे देशमुख व देशपांडे परगणे मुळगुंद यांस पत्र की, सिदोजी घोरपडे यांस त्यांचे वडील हिंदुराव घोरपडे यांचे वतन चालू केले असून मौजे आतिकट हा गाव इसाफती म्हणून व रयत नि।। आकारास दर सदे दहा रुपये नेमून दिले आहेत.

असाच आणखी सदतीस गावच्या सनदा छत्रपती संभाजी दुसरे यानी सिदोजी घोरपडे यांचे नावे करून दिल्या.

श्री नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५८ विरोधीकृतनाम संवछर अषाढ बहुल प्रतीपदा भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती याणी देशमुख व देशपांडे परगणे मुळगुंद यासी आज्ञा केली अैसीजे. राजश्री सिदोजी बिन बहिरजी हिंदुराव घोरपडे याचे वडिलास ती।। राजश्री कैलासवासी स्वामीनी सरदेशमुखीचा वतन दिल्हे आहे. त्याप्रो यास स्वामीनी करार केलीं आस. या वतना हक त।। मजकूर पैण[1] रयत नि।। आकारास दर सदे रुपे दाहा व इसाफतीचे गाव पूर्वी नेमून दिल्हे आहे. त्याप्रो स्वामींनी चालवावयाची आज्ञा करावी म्हणून याणी विनंती केली. त्याप्रो चालवावयाची आज्ञा केली आस. तर तुम्ही वतनाचे आमल सुरळीत चालवीत जाणे. इसाफतीचा गाव मौज आतीकटे हा गाव पैण मजकूर पैब नेमील आहे. तो चालवीत जावे. निदेश समक्ष.

सिका सिका

मोर्तब रुजु. समत मंत्री.

सिका बाद सुरु. सुद्र बार बार.

---

१ पैण = करार.

सदरहूप्रो खालील गांवचे देशमुख व देशपांडे याना आज्ञापत्रे :—

१) प।। अजिरे (आषाढ शु।। पंचमी रविवार)
२) मुकदमानी मौजे माघेडं त।। तारळ (आश्विन व।। ७ इंदुवासर)
३) मुकादमानी मौजे सिरऊर त।। अैनापूर ( + + व।। १ रविवासर)
४) ,, ,, कुर्दवाड प।। अलता (आषाढ शु।। ५ ,, )
५) देशमुख व देशपांडे पाो आजिरे (आषाढ शु।। रविवासर)
६) मोकादमानी मौजे मलिकवाड (आषाढ व।। १ भृगुवासर)
७) देशमुख व देशपांडे क।। तटकोड ( ,, ,, ,, )
८) मुकादमान मौजे बेगल क।। तटकोड ( ,, ,, ,, )
९) देशमुख व देशपांडे परगणे गदग ( ,, ,, ,, )
१०) मुकदमानी मौजे लिगदहाल प।। गदग ( ,, ,, ,, )
११) ,, मौजे चित्र ( ,, ,, ,, )
१२) देशमुख व देशपांडे प।। जमगी ( ,, ,, ,, )
१३) मुकदमानी मौजे बड प।। देवर हुबळी ( ,, ,, ,, )
१४) देशमुख—देशपांडे प।। देवर हुबळी ( ,, ,, ,, )
१५) ,, ,, क।। येकोडी ( ,, ,, ,, )
१६) मुखदमानी मौजे कत रहाल क।। येकोडी ( ,, ,, ,, )
१७) ,, ,, विरापूर रायरे हुबळी ( ,, ,, ,, )
१८) देशमुख देशपांडे पें।। मुळगुंद ( ,, ,, ,, )
१९) मोकदमानी मौजे अतीकट क।। मुळगुंद ( आषाढ व।। भृगु )
२०) देशमुख व देशपांडे परगणे यादवाड ( ,, ,, ,, )
२१) मुकदमानी मौजे आरली मोट प।। ( ,, ,, ,, )
२२) देशमुख देशपांडे पाो मुरगाड ( ,, ,, ,, )
२३) मोकदमानी मौजे अरलीबेड क।।बेनिमटे ( ,, ,, ,, )
२४) देशमुख देशपांडे क।। पेर्माकटे ( ,, ,, ,, )
२५) मुकदमानी मौजे कोलवी प।। गोकाक ( ,, ,, ,, )
२६) देशमुख देशपांडे पाो ,, ( ,, ,, ,, )
२७) ,, ,, समातन ( ,, ,, ,, )
२८) मुकादमानी मौजे मुलपुतल्ल क।। नरेंद्र ( ,, ,, ,, )

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २९) मुकादमानी मौजे मुनवाड पा। मुरगोड | ( आषाढ | व।। | भृगु | ) |
| ३०) ,, ,, येलापूर पा। धारवाड | ( ,, | ,, | ,, | ) |
| ३१) देशमुख देशपांडे पा। ,, | ( ,, | ,, | ,, | ) |
| ३२) मुकदमानी मौजे मलापूर पा। नवलगुंद | ( ,, | ,, | ,, | ) |
| ३३) देशमुख देशपांडे पा। ,, | ( ,, | ,, | ,, | ) |
| ३४) ,, ,, ता। उगरगोल | ( ,, | ,, | ,, | ) |
| ३५) मुकदमानी व रयानी मौजे येडगाव | ( ,, | ,, | ,, | ) |
| ३६) ,, ,, कपली ता। कोणूर | ( ,, | ,, | ,, | ) |
| ३७) देशमुख देशपांडे ता। कोणूर | ( ,, | ,, | ,, | ) |

---

**क्रमांक : ९४** **दि. २५–७–१७३१**

बाबूराव शंकर दिनकरराव चिटणीस यास सोंधे संस्थानच्या खंडणी पैकी एकशे सव्वाऐक्यांशी रुपये देणे म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे त्यांचे सोंधे येथील हेजीब भानजी बल्लाळ हेजीब यास आज्ञापत्र.

श्री

ता।

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५८ विरोधकृत नाम संवत्सरे श्रावण शुद्ध त्रितिया रविवासर क्षत्रिय कुलवतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी राजश्री भानजी बलाळ हेजीब मुा। सोंधे यास आज्ञा केली यैसीजे. बदल देणे वेत[1] राजश्री बाबूराव शंकर दिनकरराऊ चिटणीस यास दे + + + + यकूण रुपये यकसे सवायक्याइसी रास देविली असेत. तोफियांचे[2] यैवजी आदा करणे. पावलियाचा जाब घेणे. तेणेप्रमाणे

---

१ वेत = इस्टेटीच्या एका भागावर सारा कमी चढल्यास दुसऱ्या एकाद्या भागावर जो जास्त बसवितात तो.

२ तोफ = नजर, फर्मास.

गुजरा होईल.[1] जाणिजे. बहुत काय लिहिणे.

तेरीख १ माहे सफर. मर्यादेयं

सु॥ इसने सलाशीन मया. राजते

अलफ. बार.

---

क्रमांक : ९५ दि. २६-८-१७३१

श्री महालक्ष्मीचे पूजा अर्चेच्या हक्काबाबत गोपाळभट, बाबाभट व शामभट मुनेश्वर ह्या तिघांमध्ये कलह उपस्थित झाला होता. त्याचा निवाडा ब्रह्मवृंदानेच करणे श्रेयस्कर असा विचार करून करवीरचे छत्रपती संभाजी दुसरे यानी वरील तिघाना पैठण येथील ब्रह्मसभेकडे पाठविले. ब्रह्मसभेने तिघांचे म्हणणे ऐकून घेऊन श्री देवीच्या पूजेचा एकेक वार तिघाना नेमून दिला.

श्री लक्ष्मी

स्वस्ति श्री नृप शालिवाहन शके १६५३ विरोधकृतनाम संवछरे भाद्रपद शु॥ ५ पंचमी ब्रहस्पतीवार ते दिवसी श्री मग्दोदावरी तीर विराजमान माहास्थल—प्रतिष्ठान स्थित—धर्माधिकारी प्रमुख विद्वं-द्विकीय ग्रहस्थ येहीं धर्मतः निर्णय पत्र केले ऐसीजे. शामभट मुनीश्वर बि॥ तुकणभट मुनीश्वर गोपाळभट बि॥ बाबदेभट मुनीश्वर—करवीरस्थ श्रीचे पूजक हे उभयवादी राजश्री संभाजी राजे यांचे पत्र व हुजरे घेऊन —आमच्या स्थळामी अले असता (—ग तीर्थी शकस्थानीं—गोदा तटी विद्वदैदिकी सभा करून—बहुमान्य पुरसर राजपत्र पाहिले—पत्री लिहिले होते जे शामभट गोपाळभट या उभयताचा कलेह होऊन दिवा-णात आले. त्यास + न प्रति—स्थल नेमून पाठविले आहे याची बरहक मनसुबी करून यथान्याये जे + + + + पाठविणे. या नंतर द्वितीय

---

१ याचप्रमाणे निळकंठ बाबाजी यास ५० रुपये द्यावे म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यानी भानजी बल्लाळ हेजीब यास दि. ७-११-१७३१ रोजी लिहिलेले पत्र उपलब्ध आहे.

सभेमध्ये या उभयवर्गी राजीनामे लिहून दिल्हे ऐसेजे. शके १६५३ धक्रनाम संवछरे आषाढ व॥ १ भृगुवासरे तदिनी प्रतिष्ठानी शकस्थळी धर्मसभेस अग्रवादी शामभट बि॥ तुकणभट मुनीश्वर पूजक श्री देवी यानी लिहुन दिधले ऐसेजे. आपला व गोपाळभट मुनीश्वर आम्हा या उभयतात वृत्ती अशा निमेत कलह आहे. ये तनिमित्त राजश्री शंभु छत्रपति यानी तुम्हापासी पाठविले आसे. तुम्ही जो धर्मता निवाडा कराल त्याप्रमाणे आम्ही वर्तणूक करू. यास अन्यथा करू तरी देवा ब्राह्मणाचे अन्यायी. हे लिहिले सत्य व पश्चमवादी गोपाळभट बि॥ बाबदेभट मुनीश्वर पूजक श्री देवी यानी लिहोन दिधले ऐसेजे. आपण व शामभट आम्हा उभयतास वृत्त अशा निमित्त कलह अला अहे. ये तनिमित्त राजश्री शंभु छत्रपती यानी तुम्हापासी अम्हा उभयतासी पाठविले असे. तुम्ही जो धर्मता निवाडा कराल त्या प्रो आम्ही वर्तणुक करूं. यास अन्यथा करू तरी देवा ब्राह्मणाचे ब्राह्मणाचे[१] अन्याई. हे लिहिले सत्य असे. राजिनामे उभयी स्वसंतोशे लिहून दिधले यावरी तृतीय सभेमध्ये तकरीरा लिहून दिधल्या त्यात अनुपयुक्त बहुत आहे. ये तनिमित्त उपयुक्त लेख लिहिजे. तो शामभट बिन तुकणभट यानी तकरीर केली. मूळ पुरुष कृष्णभट. त्याचे पुत्र दोघे. नरसी भट मुनीश्वर १. लिक्ष्मीधर भट मुनीश्वर, लक्ष्मीधरास औरस पुत्र नाही म्हणून ज्येष्ट बंधु नरसी भट याचा कनिष्ट पुत्र नारायण भट दत्तपुत्र घेतला. लक्ष्मीधर भट मृत्यु पावला असता नारायण भटा + + + उत्तर + + +

नरसी भटाचे पुत्र ३

| पद्मनाभी भट १ | कृष्णभट १ | नारायण भट १ |
|---|---|---|
| याचे पोटी पुत्र ३ | याचे पुत्र २ | |
| तमण भट | कमळाकर भट १ | |
| + + + | हरभट १ | |
| + + + | कमळाकराचे पोटी | |
| तुकणभटास पुत्र २ | पु. २ | |
| शामभट १ | बाबदे भट | |
| अश्वत्थ भट १ | मुकुंद भट | |

---

१ मुळातच दुबार.

पद्मनाभी भट व कृष्णभट नारायण भटास म्हणो लागले जे अम्ही तिघे बंधु. परंतु तीर्थरुपानी तुज हाती उत्तर कर्म करविले. त्याचे वित्त तू घे. वार तो ती ठाई करावे. मग त्रिवर्गी समजोन वार तीन केले. नारायण भटास औरस पुत्र नाही– म्हणोन जेष्ट बंधु पद्मनामी भट– त्याचा पुत्र तमण भट दत्तपुत्र घेतला. तो तेथे येथे होता. मग नारायण भटास अपभ्रंश जाहला. इकडे कमळाकर भट शांत जाहले. त्याचे पुत्र बाबदे भट. मुकुंद भट हे मुंजे थोर जाहले तेव्हा लोकलाजेस्तव नारायण भटाची स्त्री लक्ष्मीबाईस अवसक नसतांही तमण भटी त्या उभयताच्या मुंजी धर्मार्थ केल्या. पुढे काले करून तमण भट शांत जाहले. त्याचे उत्तर कर्म तमण भटी केले. पुढे तमण भटाचे श्रात्ध लक्ष्मी बाईच्या आज्ञेस्तव + + नारायण भटाचेही श्रात्ध तुकण भट करीत होते. पुढे बाबदे भट व मुकुंद भट हे दोघे तमणभटी आमच्या मुंजी बांधल्या आहेत त्याचे वतन आपण भक्षु ऐसा कलह करू लागले. मग चौघा गृहस्थाही मनास आणून सांगितले की तुमच्या मुंजी धर्मार्थ केल्या. तुम्हास तमण भटाचे वंतास संबंध नाही. तथापि कलह कराल तरी कमळाकर भटाचे वंतास संबंध नाहीं असे समजा लिहून दिधले असता ते मान्य करून स्वसंतोषे तुकणभटास लिहिली दिधली की आपण आपला पिता कमळाकर भट त्याचा विभाग भक्षू. तमणभटाचे वंतास संबंध नाही. यानंतर साता पाचा वर्षी तुकण-भट नारायण भटाचे श्रात्ध करीत होते. ते समई दाहा जणाचे बले करून बाबदेभटी तुकणभटास मारामार करून वृंदावनावरी आणून टाकिले अणी आपण + + + बैसला. तदारभ्य तमण भटाचे गृहात प्रवेशून बळेच नकल घर खात अला. पुढे बाबदेभटास गोपाळभट मध्य पुत्र झाला तो मुकुद भटी दत्त घेतला. त्याचे जातकर्म नामकर्म व्रतबंध विवाहादि मुकुंदभटीच केले. बाबदेभट वारले तेव्हा गोपाळ भटास क्रिया करावयासी उभा केला. तेव्हा अम्ही मुकुंद भटास अक्षेप केला की गोपाळ तुम्ही दत्त घेतला आहे तो तुझा पुत्र त्यासी बाबदे भटाची क्रिया करायासी संबंध नाही. मग मुकुंद भट बोलिला की त्याचा पुत्र त्यास देतो. मग आम्ही बोलिलो की पुत्र घ्यावयाचा मंत्र आहे. परंतु द्यावयाचा मंत्र कोणही शास्त्री नाही. मग मुकुद भट बोलिला की + +

तरी याची क्रिया कोणी करावी. त्याचे उत्तर आपण दिधले की तूं कर अथवा मी करीन. हो गोष्ट मान्य केली असतांही शेजारी ग्रहस्थ व ब्राह्मण बोलिले की त्याचे पोटी जन्म घेतला आहे. तनिमित्त बाबदे भटाची क्रिया मात्र करायास अईता असे. वंत तुम्हा उभयतांचा असे-असे चौघ ग्रहस्थ व ब्राह्मण बोलिले. मग शवाची दुराई सोडिली. पुढे मुकुंदभट होता तोही जरी मध्ये वारला. ते समई आपणासही ज्वरावस्था होती. तैसेच जाऊन बोलिलो की पुत्र असता दिवाणाची पाटी करून बळेच नातवा करावी. क्रिया करविली हे तकरीर लिहिली सत्य. यामध्ये यकही कलम खोटे जालिया आपण खोटे. शके १६५३ विरोधकृन्नाम संवत्सरे आषाढ वद्य सप्तमी बुधवासरे ॥ छ ॥ व पश्चिमवादी गोपाळ-भट बि॥ बाबदे भट मुनीश्वर यानी तकरीर लिहून दिली ऐसीजे. अमचा व शाम भटाचा वडील- येक. त्याचे पुत्र नरसि भट १, लक्ष्मीधर भट १- नरसि भटास पुत्र तिघे. पद्माकर भट १ कृष्ण भट १ नारायण भट १. लक्ष्मीधरास औरस पुत्र नाही म्हणून नरसि भटाचा पुत्र नारायण भट दत्त पुत्र घेतला. लक्ष्मीधर मृत्यु पावला असता नारायण भटीच उत्तर क्रियाही त्याची केली. तदुतर नरसिभट मृत्यु पावले. मग पद्माकर भट बोलिले की वृतीचे तीन विभाग करावे. नारायण भटी उत्तर दिधले जे आपण निमे वृतीचे धनी निमे वृत्ती घेउ. तुम्ही व कृष्ण भट मिळोन निमे वृतीस राहाणे. या नंतर पद्माकर भट बोलिले की वडिली आज्ञा केली आहे त्या प्रा। तीन वार करु असा निश्चय करून तीन वार भोगवटियास घातले. पुढे पद्माकर भटास पुत्र ३. तुकण भट १ तमण भट १ नरसि भट १. कृष्ण भटास पुत्र दोघे २. कमलाकर १ हरिभट १. पद्माकर भट मृत्यु पावले व कृष्ण भटही पावले. नारायण भटास संतती नाही म्हणून वृध्दपणी कमलाकर भटाचा पुत्र बाबदे भट नारायण भटी दत्त पुत्र घेतला. तदनंतर कमळाकर भट व नारायण भट मृत्यु पावले. नारायण भटाची क्रियाही बाबदे भटी केली. पुढे तुकण भट व कमळाकर भटाचा पुत्र मुकुंद भट व बाबदे भट हे तिघे तीन वार अनुभवित असे. पुढे तुकण भटास पुत्र २. शाम भट १ व आश्वत्थ भट १. आश्वत्थ भटास संतान नाही. बाबदे भटासी कोणी कथला केला नाही. पुढे तुकण भट व नरसि भट

व तमण भट मृत्यु पावले. शाम भट व मुकुंद भट व बाबदे भट आपले तीन वार यथापूर्व भक्षीत अले. यानंतर पुढे बाबदेव भटाचे दोन तीन पुत्र झाले ते मेले. मग बाबदे भटी मुकुंद भटाची प्रार्थना केली की गोपाळाची मुंजी तुम्ही करा. तुमच्या हस्त महिमेस्तव व्हावावेल या करिता मुकुंद भटी माझी मुंजी धर्मार्थ मात्र केली. विवाह तर बाबदे भटीच केला. मग बाबदे भट सत्तर पाऊणशे ७०।७५ वर्षाचे होऊन वारले. त्याची क्रियाही आपणच केली. त्या नंतरहि आपला आपला वार यथापूर्व भक्षीस अलो. पुढे मुकुंद भटास वय बहुत झाले. पुत्र संतान नाही म्हणून यज्ञपुत्र झाला तो समस्त स्वक्षेत्रस्थ ब्राह्मणाचे संमतीने दत्तविधिपूर्वक घेतला. जात कर्म ना कर्म केले. बाबा ऐसे नाम ठेविले. चौलहि[1] केले. उपनयनकाळी शाम भट श्री स्वामीपासी बोलिले की पूर्वी मुकुंद भटी गोपाळ भटास दत्त पुत्र घेऊन त्याचा व्रतबंध केला. अता त्याचा पुत्र बाबा यास नूतन घेऊन वृतबंध काय निमित्त करितो तरी यासी तुम्ही सांगणे. मग श्री स्वामीही समस्त ब्राह्मण व मुकुंद भट यास बोलाऊन शोध केला असता समस्त ब्राह्मणाचे संमते हा अर्थ सिद्ध झाला की मुकुंद भटी गोपाळ भटाचा दत्तविधि केला नाही. उनयन मात्र धर्मार्थ केले. अता बाबा दत्तविधि पूर्वक घेतला हे सत्य शाम भट बोलतो ते खोटे. मग बाबाची मुंजी मुकुंद भटाच्या मांडीवर समस्त ब्राह्मण मिळोन केली. श्री स्वामीहि पत्र करून दिधले की बाबदे भटाच्या वत्तीचा अधिकारी गोपाळ व मुकुंद भटाचा वृत्तीचा अधिकारी बाबा यास अन्यथा नाही. जो अन्यथा करील त्यास श्री देवीची शपथ असे. असे पत्र समस्त ब्राह्मणाचे साक्षीने करून दिधले.

पुढे मुकुंद भटाचे उत्तर कर्म बाबाने केले. त्यावर आठा नवा महिन्या शाम भटी आम्हासी कलहे मांडिला की तुज मुकुंद भटी घेतले आहे. दोनी वार करून भक्षू असा बोलिला. मग आम्ही समस्त ब्राह्मणापासी उभयता गेलो. समस्त ब्राह्मणी उभयत्तापासी तकरीर

---

१ चौल = लहान मुलाचा शेंडी राखण्याचा विधि; चूडा कर्म.

मागितली. त्यास शाम भटी तकरीर लिहून दिधली. आपणही तकरीर लिहून दिधली जे माझी मुंजी मुकुंद भटी धर्मार्थ केली. माझा पुत्र बाबा मुकुंद भटी दत विधीने घेतला इतके मात्र लिहोन दिधले. त्यानंतर समस्त ब्राह्मण शाम भटास बोलिले जे श्री स्वामीही पूर्वीही पत्र करून दिधले. मग ती लटका व्यवहार करितोस ही गोष्ट उत्तम नाही असे स्पष्ट शाम भटासी सांगितले. या उपरी रखमाजी साळोखा हवालदार या पासी जाऊन लटिके कागद काहाडिले की मुकुंद भट व बावदे भट याही तुकण भटास लिहून दिधले जे तमण भटाच्या वंतास आपणास संबंध नाही. मग ते कागद समस्त ब्राह्मणी शोध करिता लटिके जाणून हवालदारास सांगितले. पुनः हवालदाराने द्रव्य लोभे आमचे तीन वार अमानत करून आम्हा उभयतास स्थळांतरासी पाठविले असताही शामभट माघार पळोन गावास गेला. आम्ही शामभटाची मार्गप्रतीक्षा करीत मौजे वठार उध्धव गोसावी येकनाथ संप्रदायी यांपासी येऊन आपले वर्तमान सांगितले. त्यानी पत्रे पाठविली. शामभट पाठविले नाही. तेथून आम्ही कराडे क्षेत्रास अलो. आपले वर्तमान निवेदन केले. यानीहि हवालदारास व समस्त करवीर क्षत्रस्थ ब्राह्मणास पत्रे पाठविली जे शामभट पाठवून देणे. शामभट पाठविला नाही. पत्रे माघारी फिरोन टाकली. ते पत्र बजिन्नस आम्हापासी आहेत. त्यानंतरही शामभटी हवालदारास पैका देऊन खोटा कागद करून घेतला. माणसे लाऊन बळेच ब्राह्मणाच्या साक्षी घेतल्या. अम्ही कराडी होतो. त्यानंतर राजश्री संभाजी राजे अले. त्यास वर्तमान निवेदन करून त्या बराबर करविरास गेलो असता राजश्रीही श्री स्वामी व समस्त ब्राह्मण यांस आज्ञा केली की या उभयतांचा न्याय यथार्थ करणे पक्षपात न करणे. मग स्वामी व ब्राह्मण यांही श्रीचे देवालयी बसून उतर दिधले जे गोपालभट खरा व शामभट खोटा आहे. त्यावरून राजश्री अम्हास महजर करून देऊ लागले जे तीन वार यथापूर्वक अनुभवित जाणे. शामभटही यजीतखत देऊ लागला. परंतु अम्ही हवालदाराचा कोटा कागद मागितला तो देईनात. निमित्त राजश्रीनी निग्रह केला असता शामभट बोलिला की मजवर जुलूम करितातो. हे ऐकून राजश्री अपले पत्र देऊन तुम्हाकडे उभयतास पाठविले आहे. स्वामीही धर्मनीतीने निवाडा करून दिधला

पाहिजे' हे तकरीर सत्य. यामध्ये खोटे येक कलम जालिया आपण खोटे. शके १६५३ विरोधकृतनाम संवछरे आषाढ व॥ ७ सप्तमी बुधवासर या नंतर उभयवारी प्र॥वादी यांच्या तकरीरा विच्यारिता ती स्थळी मुख्य विवाद दिसून अला. नारायणभटाचा पुत्र बाबदेवभट अथवा तमणभट हे यक विवाद स्थळ. गोपाळभट मुकुंदभटी दत्त विधीने घेतला किंवा नाही हे द्वितीय विवाद स्थळ. गोपाळभटाचा पुत्र बावा मुकुंदभटी दत विधाने घेतला किवा नाही हे तृतीय विवाद स्थळ. या उपरी 'ततोर्थी लेखयेत्सद्यः प्रतिज्ञातार्थसाधनं॥ तत्सि- ध्दौसिध्दि माप्नोति विपरीतमतोन्यथा ॥ व्याख्यातं चैतद्विज्ञानेश्वरेण ॥ तत उत्तरानंतरं अर्थी साध्यवात्सद्य एव अनंतरमेव लेखयेत् ॥ प्रतिज्ञातः साध्यः सचासावर्थश्चेति प्रतिज्ञातार्थस्तस्य साधनं साध्यते नेनेति साधनं प्रमाणं तस्य साधनस्य प्रमाणस्य लिखितं साक्षि मुक्तिणस्य- सिध्धौनिवर्तौ सिध्दिसाध्यं जयलक्षणं प्राप्नोति अतोस्मात् प्रकारादन्य- था प्रकारांतरे साधनासिध्दौ विप्रितं साध्यस्यासिध्दि पराजय लक्षणं प्राप्नोतीति ॥ किं तत्साधनमित्यपेक्षितमाहा प्रमाणं लिखितं मुक्तिः साक्षिणश्चेति कीर्तितं ॥ एषामन्यतमाभावे दिव्यान्यतमुमुच्यते ॥ प्रमीयते परिछिद्व ते नेनेति प्रमाणं तच्च द्विविधं मानुषं दैविकं चेति ॥ तच्च मानुषं प्रमाणं त्रिविधं लिखितं मुक्तिः साक्षिणश्चेति ॥ लिखितं लेख्यं ॥ भुक्तिरुपभोगः ॥ साक्षिणोवक्ष्ययाणलक्षणाः ॥ ननु लिखितस्य साक्षिणां च शब्दाभिव्यक्तिद्वारेण शब्दांतर्भावाद्युक्तं प्रामाण्यं॥ भुक्तेस्तु कथं प्रामाण्यमिति चेत् ॥ भुक्तिरपि कैश्चिद्विशेषणैःर्युक्ता स्वत्व हेतुभूतक्रियादिकमव्यभिचारादनु मापयति अनुपपद्यमाना वा कल्पयतित्यनुमानेर्थापत्तौ वांतर्भवतीति प्रमाणमेव ॥ एषां लिखिता दीनां त्रयाणामन्यतमस्थाप्यभावे दिव्यानां वक्ष्यमानुषाभाव एव दिव्यस्य प्रामाण्यमस्मादेव वचनादवगम्यते ॥ इत्यादि शास्त्रोक्त मार्गे उभयतास सभासदी अज्ञा केली की तुम्हास प्रकृति साधक प्रमाण जे असेल ते लेहोन प्रत्येक देणे. मग शामभटी लेहोन दिधले जे नारायणभटाचा तमणभट दत्त पुत्र व मुकुंदभटाचा दत्त पुत्र गोपाळभट हा अर्थ पत्र साक्षी प्रमाणे सिध्द करून देऊ. न देऊ तरी

खोटे हे लिहिले सत्य. गोपाळभटाने लेहोन दिधले ऐसेजे. नारायण भटाचा बावदेवभटच दत्त पुत्र हा अर्थ अनाक्षिप्त भोगप्रमाणे सित्ध करून देऊ. न देऊ तरी खोटे. मुकुंदभटी आपणास दत्त विधीने घेतले नाही व आपला पुत्र वावा यासत्र मुकुंदभटी दत विधीने घेतले. हे दोन्ही अर्थ पत्र व साक्षी व भोग याप्रमाणे त्रय सित्ध करून देऊ. न देऊ तरी खोटे. हे लिहिले सत्य. यावरी शामभटी नारायणभटाचा दत्तपुत्र तमणभट येतद्विषई साधक पत्रे दाखविली. पत्रे लिहिले होते जे शके १५९० कीलक नाम संवछरे भाद्रपद शु।। पंचमीस तुकणभट मुनीश्वर यासी लेहोन बाबदेभटी दिधले ऐसेजे. आपण तुम्हासी कलहो करीत होतो की आमची मुंजी तमणभटी केली. आपण त्याचे पुत्र. आपण त्याचा विभाग भक्षु ऐसे म्हणत होता. त्यास चौघा ग्रहस्थानी सांगितले की तुमची मुंज धर्मार्थ केली. तुम्हास तमणभटाच्या वंतास संमंध नाही. ऐसे भोग्य साध्य समजाविले. अजीपासून तुम्हासी कलह सहसा न करू. आमचा पिता कमळाकर भट त्याचा विभाग भक्षून सुखे असो हे सत्य. या प्रमाणेच मुकुंदभटीही तमणभटास लेहोन दिधले असे. या उभयपत्री साक्षी आपदभट लाटकर १ बंडभट जेरे १ तुकणभट जपे १ अपदेवभट अष्टावधानी १ लिंगणभट धर्माधिकारी १ सरस्वतीभट ग्रामोपाध्ये १. हे पत्र शोधपूर्वक विच्यारिता तमणभट नारायणभटाचा पुत्र हा आर्थ तो या पत्री नाही. प्रत्युत नारायणभटाचा पुत्र तमणभट हे सत्य जरी असते तरी निपुत्रिक तमणभट मृत्यू पावलिया त्याच्या अर्ध्या अंशाचा अधिकारी तुकण भट होय व अर्ध्या अंशाचा अधिकारी बाबदेवभट व मुकुंदभट होयत. ऐसे असताही तमणभटाच्या वंतास आपणास संबंध नाही ऐसे तुकणभटास बाबदेवभट व मुकुंदभट लेहोन न देते. या वरूनहि ऐसे दिसोन येते की तमणभट नारायणभटाचा पुत्र नव्हे. यास्तव शामभटी पत्र दाखविले ते कृत्रिम असे. ऐसा सभासदी निश्चय केला व कोलापूरस्थ ब्राह्मण येथे सिहस्थ विधीनिमित्त गंगा-स्नानार्थ अले त्यास समस्ती विच्यारले की गोपाळ भटास मुकुंदभटी दत्त विधीने घेतले आहे किंवा नाही. यावरी ते ब्राह्मण उभयताच्या विद्यमाने समस्तांप्रति बोलिले की गोपाळभट मुकुंदभटी दत्त विधीने

घेतला नाही. मुंजी मात्र धर्मार्थ केली. गोपाळभटाचा पुत्र बाबा मुकुंद भटी दत्त विधीने घेतला हे आम्हास ठाऊके आहे. यावरून शामभटाचा व्यवहार मिथ्या आहे ऐसा समस्तांही निश्चयें केला. तदुतर गोपाळभटी नारायण भटाचा वृतांत व घर याचा अनाक्षिप्त भोगवटा बाबदेव भटास अमरांत होता. ते वारले. नंतरही आपणास हा कालपरायंत आहे हे साक्षीने सित्ध करून दिधले अणी श्री स्वामीचे पत्र दाखविले. पत्री लिहिले होते जे शके १६४३ प्लवनाम संवछरे वैशाख बहुल पंचमी शुक्रवार तद्दिवसी समस्त ब्राह्मण क्षेत्र करवीर यासमवेत श्री स्वामी यानी लेहोन दिधले पत्र ऐसे. शामभट व मुकुंदभट व गोपाळभट श्रीचे पुजारी या त्रिवर्गात मुकुंदभटास पुत्र संतान नाही. या करिता मुकुंद भटानी गोपाळभटाचा पुत्र बाबा दत्त पुत्र विधीने पहिले घेतला नंतर वृतबंध करीत होते. त्या समई शामभटी अम्हास सांगितले की, मुकुंद भटी पहिले बाबदेवभटाचा पुत्र गोपाळास दत्त पुत्त घेऊन वृत्तबंध केला. त्या नंतरे बाबदेवभट मृत्यु समई मागती गोपाळ त्याकडे लाऊन दिधले. अणि गोपाळाचा पुत्र बाबास नूतन घेऊन व्रतबंध करितातो. तरी स्वामीनी त्यास सांगणे. यावरून समस्त ब्राह्मण व मुकुंदभट यासी बोलाऊन विच्यारले. मग मुकुंदभट बोलिले जे गोपाळभटाची मुंज मात्र धर्मार्थ केली दत्त विधीने घेतल नाही. गोपाळाचा पुत्र बाबा दत्त विधीने घेतला. याचा व्रतबंध करितो. स्वामीहि दुषण न ठेवणे. त्या उपरी विच्यारून पाहाता समस्त ब्राह्मणाचे मते मुकुंदभटाची गोष्ट सिद्ध जाली. शामभट बोलिले ते अनुचित जाणून बाबाची मुंज मुकुंदभटाचे मांडीवरी लाविली. बाबा मुकुंदभटी विधिपूर्वक घेतला हे यर्थार्थ. यास्तव बाबदेवभटाचा वृतीचा अधिकारी बाबा यास अन्यथा नाही. विभाग परत्वे त्रिवर्ग पुजारी यानी पूर्ववत वृती भक्षून सुखरूप असावे. यास अन्यथा कोण्ही करील त्यास श्री देवीची शफत असे. पत्री साक्षी कृष्णाचार्य १ महादेवभट जपे १ व शामभट स्मार्त शेणगावकर १ व तुकणभट अध्यापक १ व माहादेवभट जोसी १ व भिकण भट ग्रामोपाध्ये १ व हरिभटात्मज आपा लाटकर ग्रामोपाध्ये १ व गणेशभट स्मार्थ १ व भास्करभट धर्माधिकारी १

कृष्णभट जमखिडकर १ व शिव जोसी १ व जिवभट जेरे १ व धोंडभट लाटकर १ व नागेशभट जपे १ व रामभट अष्टेकर १ व नारायणभट नळवडेकर १ ऐसे पत्र दाखविले. मग या पत्राचा शोध करिता हें पत्र प्रमाण जाणून या पत्रावरून व पत्रारूढ साक्षीवरून हा निश्चय झाला की गोपाळभट मुकुंदभटी दत घेतला नाही. गोपाळ भटाचा पुत्र बाबा दत्त घेतला. गोपाळभट बावदेव भटाचेच वृतीचा अधिकारी. ऐसा समस्तास निश्चय जाला. याहीवरी शामभटी सुरत मजालस दाखविली. तीमध्ये बावदेव भट मुकुंद भट याही तुकण भटास पुत्र लेहोन दिधले असे म्हणून शामभटी पत्र जे दाखविले त्या पत्राचे मुळे निमे शामभट व निमे गोपाळभट ऐसे दोनी वार करावे ऐसे पंचायतानी आपल्या मते केले आहे. परंतु ते पत्र तो पूर्वोक्त प्रकारे कृत्रिम असे. ऐशास त्या पत्राचे वळे पंचायतानी जे केले ते मिथ्या असे अणि शास्त्रविरुद्धहि असे— ऐसे उभयतांची साधके पाहता गोपाळ भटाचे तिन्हीहि अर्थ प्रमाण करून सिद्ध जाले व शामभटाचे दोन्हीहि आर्थ सिद्ध न जाले यास्तव प्रकृत व्यवहारी गोपाळ भट खरा व शामभट खोटा असे. या उपरी पूर्वोक्त सकल विचार मनास अणून याची वंशपरंपरा ऐसी निर्धारिली ।। छ ।।.

मूळ भट कृष्णंभट १
यासी पुंत्र दोघे २

| | | |
|---|---|---|
| १ जेष्ट पुत्र नरसिं भट यास पुत्र दोघे २ | | १ कनिष्ट पुत्र लक्ष्मीधर भट याचा दत्त पुत्र |
| १ पद्मनाभ भट याचा पुत्र | १ कृष्ण भट याचा पुत्र | १ नारायण भट याचा याचा पुत्र |
| १ तुकणभट याचा पुत्र | १ कमळाकर भट याचा पुत्र | १ बाबदेव भट याचा पुत्र |
| १ शामभट | १ मुकुंद भट याचा पुत्र दत | १ गोपाळ भट |
| | १ बाबा भट | |

ऐसा समूळ विच्यार पाहतां गोपाळ भट लक्ष्मीधर भटाचा वंशीचे होय. तत् निमित्ये दोनी वार श्री देवीची पूजा गोपाळ भटी करावी. शामभट व बाबा भट हे दोघेही नरसिं भटाच्या वंशीचे. यास्तव या दोघे जणी मिळोन दोनी वार पूजा करावी ऐसे अहे. तथापि पुरुषत्रय परयंत ती वाराचाच भोगवटा आहे. यास्तव शामभट बि॥ तुकण भट मुनीश्वर वार १ एक व गोपाळ भट बि॥ बाबदेव भट मुनीश्वर वार १ (बाबा भट बि॥ मुकुंद भट मुनीश्वर वार १) असे तीन वार तिघाजणी अनुभऊन श्री देवीची पूजा करून सुखरुप असावे ऐसा समस्त विद्वद्वैदिकी धर्मशास्त्र प्रमाणे निर्णय करून सित्धांत केला असे.
इत्यलयतिविस्तरेण॥ छ॥

१ संमत माधव भट धर्माधिकारी
१ पत्रार्थ साक्ष आच्यार्ये वेंकटेश
१ पत्रार्थयो: संमत: पना भटी अपा भटस्य

१ बी कलम अनंत देव धर्माधिकारी
१ पत्रार्थ साक्ष आच्यार्ये रंगनाथ
१ पत्रार्थ साक्ष रघुनाथ
१ पत्रार्थ साक्ष कुमारी अनंत

संमत गोपाळ पाठक धर्माधिकारी
पत्रार्थ साक्षी गोस्वामी केशव
पत्रार्थ साक्षी आच्यार्ये गोविंद:

१ पत्रप्रमाणे साक्ष बाबदेव महेश
१ पत्रार्थ साक्ष गोविंद पडके

पत्रार्थ साक्ष कृष्ण जोसी
१ पत्रार्थीय समत: सेशाच्यार्यस्य

१ पत्रार्थ साक्षी विठलस्व
१ पत्रप्रमाण साक्षी शामभट पनाभटी हस्ते गंगाधर

१ पत्रार्थ साक्ष तोरो हरिहर
१ पत्रार्थ साक्ष शाम दिक्षित स्मार्थ
१ पत्रप्रमाण साक्ष नागेश पडके हस्ते नरहरी काळवीट

१ पत्रार्थीय समत: सदासिव भटस्य
१ पत्रार्थ साक्ष शामभट डोहकर
१ पत्रार्थ साक्ष तापस साम राज्यस्त

१ साक्षी विश्वनाथ भट राम डोहकर
१ साक्षी नरहर भट नाम्ने
१ पत्रप्रमाण साक्ष पुंडलिक भट काळवीट

१ पत्रप्रमाण साक्ष
रामभट अपमणे

१ पत्रप्रमाण साक्ष
नारायण दीक्षित

१ पत्रप्रमाण साक्षी
अवा गोरे

१ पत्रप्रमाण साक्ष
भवानीभट भागवत

१ पत्रप्रमाण साक्ष
विश्वनाथ भट
स्मार्थ

१ पत्रप्रमाण साक्षी
लक्ष्मण द्वितीय
सरस्वती

१ पत्रप्रमाण साक्ष
बावा जोशी

१ पत्रप्रमाण साक्ष
गिरभट स्मार्थ

१ पत्रप्रमाण साक्ष
विभ्युभट तैत्र

१ पत्रप्रमाण साक्षी
लक्ष्मी प्रसाद
गांठाळे

१ पत्रोर्थ साक्ष
आच्युत भट
स्मार्थ

१ समतोय मथी
१ हरिभट उपाध्ये

१ पत्रप्रमाण साक्षी
गोपाळ भट वाकरे

१ पत्रप्रमाण साक्ष
कृष्ण भट भागवत

१ पत्रार्थ साक्ष
वचंभट वैद्य

१ पत्रप्रमाण साक्षी
रामभट गुर्जर

१ पत्रप्रमाण साक्ष
धोंड जोसी

१ पत्रप्रमाण साक्ष
विश्वनाथ उपाध्ये

१ पत्रप्रमाण साक्षी
हरिभट किरकिरे

१ पत्रप्रमाण साक्ष
बाळंभट मडके

१ पत्रप्रमाण साक्षी
कान जोसी

१ पत्रप्रमाण साक्षी
गोविद भट कवीश्वर

१ पत्रप्रमाण साक्षी
कानोबा सवंछरकर

१ पत्रप्रमाण साक्ष
बाळंभट सप्ते राजापूर

१ पत्रप्रमाण साक्षी
शिवराम गोसावी

१ पत्रार्थ साक्षी
गोविंद जोसी

१ पत्रप्रमाण साक्ष
त्रिंबक भट

१ पत्रप्रमाण साक्ष
नारायणभट पराडकर

१ पत्रप्रमाण साक्ष
गिरभट सेवतेकर

१ पत्र प्रमाण साक्ष
केशवभट वारे

१ पत्र प्रमाण साक्ष गणेश भट
थोरपे सेगावकर

१ पत्र प्रमाण साक्ष गोपाळ भट
रामडोहकर

१ पत्र प्रमाण साक्ष
हरभट पनाभटी

१ पत्र प्रमाण साक्ष
नारायण भेडसगावकर

१ पत्र प्रमाण साक्षी
हरभट वाळवेकर

१ पत्र प्रमाण साक्षी
मकरीभट जनवाडी

१ पत्र प्रमाण साक्ष
धोंड भट गोरे

१ पत्र प्रमाण साक्ष
बाबा गोरे

१ पत्र प्रमाण साक्षी
शिवबा देव भटी

१ पत्र प्रमाण साक्षी
जळनाथ भट सिरगावकर

१ पत्र प्रमाण साक्षी
मोरेश्वर मडके

गोही————

१ गंगाजी माहादेव अज्यात
सरदेशमुख परगणे मजकूर

१ पत्र प्रमाण साक्षी नारोजी
माहाजन ठाणे कसबे पैठण

१ पत्र प्रमाण साक्ष गिरमाजी
माहाजन वाखरे कसबे पैठण
हस्ते हरबाजी

१ गोही बापूजी चौधरे
कसबे पैठण

१ पत्र प्रमाण साक्षी जिजाजी
पाटील मखदुम कसबे
मजकूर

१ पत्र प्रमाण साक्षी
केशवराव यादव

१ गोही विठोबा कावळे

१ पत्र प्रमाण साक्ष
बच्याबा भोकरे

१ पत्र प्रमाण साक्ष
बच्योबा स्मार्थ

१ पत्र प्रमाण साक्ष
शामजी काशी

१ पत्र प्रमाण साक्ष विसाजी
रघुनाथ व खंडेराव रघुनाथ
अजात देशमुख परगणे मजकूर

१ पत्र प्रमाण साक्ष गिरमाजी
बुकार व उधोजी चिंतामणी
गुमास्ते देशपांडे परगणे मजकूर

१ पत्र प्रमाण साक्ष तिमाजी
माहजन भोकरे कसबे पैठण

१ पत्र प्रमाण साक्ष देवजी
माहाजन हस्ते बाबाजी
माहाजन कावळे कसबा मजकूर

१ गोही निंबाजी मखदुम गोवारी

१ गोही जिजाजी गोविंद
कुलकर्णी कसबे मजकूर

१ पत्र प्रमाण साक्ष
केसोजी भोकरे

१ पत्र प्रमाण साक्ष
गोदाबा वाखरे

१ पत्र प्रमाण साक्ष
शामजी झालते

१ पत्र प्रमाण साक्ष

१ पत्र प्रमाण साक्षी
पेणको जगनाथ
थोरात

१ पत्र प्रमाण साक्षे
मेघशाम गोसावी

१ पत्र प्रमाण साक्ष
सखोजी वावडेकर

१ पत्र प्रमाण साक्ष
निरांजी नागनाथ
कसबे नासिक

१ पत्र प्रमाण साक्ष
सदासिव वेडके

सदाशिवजी भोकर

१ पत्र प्रमाणे साक्षी
माहादाजी भोकर

(या पत्राची असल फार जीर्ण असोन बालबोध अक्षरानी लिहिलेली रामचंद्र दामोदर मुनेश्वर याजपासी येंकट नानाभट बि॥ बाबाभट मुनेश्वर निम्या घराणेतील यांजपासी येक याप्रो असोन रामचंद्र मुनेश्वर यांजपासी असलेले असलावरून ही प्रत अक्षरशः रुजू मुकाबेलनिसी अज रोजी तयार केली आहे. मि॥ मार्गसीर्ष व॥ १२ शक १८०४[1] चित्रभानुनाम संवछरे. दस्तुर गोविंद वामन मुनेश्वर रा॥ करवीर. गोविंद वामन यानी माहितीकरिता आपले दप्तरी ठेविली आहे.

गोविंद वामन मुनेश्वर श्रीपूजक दस्तुर खु॥)

---

**क्रमांक : ९६** **दि. २८-९-१७३१**

सखो देवजी कुलकर्णी याच्या पूर्वजानी व्यंकटगिरीहून श्री व्यंकटेशाची मूर्ति आणून व्यंकटपूर नावाची वाडी वसविली होती. या देवस्थानास छत्रपतींनी तीन चावर जमीन इनाम दिली आहे, म्हणून राणोजी घोरपडे यांचे मोकदम मौजे रुबी तं॥ रुकडी यास पत्र.

---

१ दि. ६-१-१८८३.

व्यंकटेश श्री तालीक

सिका

आज्ञापत्र समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री राणोजी घोरपडे सेनापति ता। मोकदमान मौजे रुबी ता। रुकडी सुभा प्र। पनाळा सु। इसने सलासीन मया आलफ. सखो देवजी नाईक कुलकर्णी मौजे मजकूर याणी मनोळीच मु। राजश्री स्वामी. संनीध विनंती केली की आपले पूर्वज याणी श्री———ची भक्ति विशेशात्कारे केली. त्यावरून श्री प्रसन्न होऊन प्रसादिक मुहूर्ति व्यंकटगिरीहून गंडकीसिलेची दिल्ही. ती गावास घेऊन आले. मुहुर्ति स्थापना केले. तेथे व्यंकटपूरवाडी वसविली. तेथे पूजा पुनस्कार करीत होते. आलीकडे आनकूलता नाही याजकरिता उत्साह राहिला आहे. पूजेस जमीन नेमून दिल्हीयाने श्री———ची पूजा चालऊ. येणेकडून कल्याणाह आहे म्हणोन विनंती केली. त्यावरून स्वामीनी मनास आणून श्रीच पूजेस जमीन इनाम करून दिल्हीयाने स्वामीस व राज्यास कल्याण आसे जाणून (दिले इनाम)

जाणिजे. रा। छ ७ माहे राखर. मोर्तब असे.

---

**क्रमांक : ९७** **दि. १०-११-१७३१**

**मौजे मोघर्डेचा सर्व वसूल हरीहराचार्य पंडितराव यांजकडे देत जाणे म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे मोकदम मौजे मोघर्डे यास आज्ञापत्र.**

स्वस्ति श्री राज्याभीषेक शके ५८ वीरोधकृत नाम संवत्सरे आश्वीन बहूल सप्तमी इंदुवासरे क्षत्रींय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी मुकदमानी मौजे मोघर्डे ता। तारळे यांस आज्ञा केली ऐसीजे. मौजे मा। राजश्री हरीहराचार्य पंडीतराव याकडे बाबती-देखील मुकासा दिल्हा असे. तरी तुम्ही बाबतीदेखील ऐवज पंडीतराव याकडे देत जाणे व सेत सनदे मौजे मारी आहेत ते दूर करुन तो ही

वसूल पंडीतरायाकडे देववीला आहे. तरी सेत सनद्याकडे एकंदर वसूल न देता सारा वसूल सेत सनद्याचा देखील पंडीतरायाकडे देत जाणे. जाणीजे. निदेश समक्ष. मोर्तब व सनदेचे तिसरे ओळी खाली सिके दोन आहेत.

---

**क्रमांक : ९८** दि. २०-११-१७३१

मौजे पांगिरे हा गाव सेनापतीकडून काढून दुसऱ्या वाड्याकडे दिला आहे म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे मोकदम मौजे पांगिरे यास पत्र.

मूळ पारसी दप्तर
सन १२०६ फसली यातील—

स्वस्ती श्री राज्याभिषेक शके ५८ विरोधीकृत नाम संवत्सरे मार्गशीर्ष शु।। द्वितीया मंदवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी मोकदमानी———

मौजे पांगिरे त।। कापसी यासी

आज्ञा केली ऐसीजे. मौजे मजकुरी पेशजी कारखान्याकडील सेनापतीकडे दिले होते. ते हाली दूर करून दुसरा वाडियाकडे दरोबस्त दिल्हे आहे. कमावीसदार येईल त्यासी रुजू राहून आकार प्रमाणे ऐवज दुसरा वाडियाकडे बिलाकसूर पाववित जाणे. निदेश समक्ष.

मर्यादेयं
विराजते

तेरीख १
जमादिलाखर सूर सन इसने

रुजु संमत मंत्री
बार सुरु सुद्र बार

---

क्रमांक : ९९ इ. स. १७३१

खंडो बल्लाळ चिटणीस यानी केलेली सेवा लक्षात घेऊन त्यांच्या वंशजाचे वतन अविरोध चालविले पाहिजे म्हणून छत्रपती शाहू राजे यांचे छत्रपती संभाजी दुसरे यांना पत्र. करवीर राज्यातील आपले वतन वारणेच्या तहा पासून सुरळीत चालत नाही अशी तक्रार जिवाजी खंडेराव चिटणीस याने केल्याने छत्रपती शाहू राजे यानी हे पत्र लिहिले.

श्री

नकल

श्रियासह

चिरंजीव राजमान्य राजश्री संभाजी राजे यासी प्रति शाहू राजे आसीर्वाद. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणे. विशेष राजश्री जिवाजी खंडेराव चिटणीस याणी विनंती केली की पूर्वी आपले वडिलानी स्वामी सेवा बहुत निष्ठेने केली. त्याजवरून कृपाळू होऊन संपूर्ण राज्यातील सरकारातून व सरदार व किलेकोट व जंजिरे येथील चिटणिसी व कारखानिसी व जमिनिसी हे तीन धंदे वंशपरंपरेने करून दिल्हे आहेत याजप्रमाणे चालत आहेत व स्वामीनी प्रांत पनाळा येथील नाडगंवडीचे वतन करून दिल्हे. त्यास सांप्रत दोही राज्यातील तहनामा याजमुळे वारणे पलीकडील पनाळ प्रांतीची नाडगौडीस दिमत पडली आहे व येक दोन गाव राजपत्री चालत नाहीत व तीन धंदे पूर्वीपासून चालतात त्याप्रमाणे सुरळीत चालावे. येविसी एकदोन पत्रे नेली असता चालत नाही. यावरून हे पत्र लिहिले आहे. तरी तीन धंदे व नाडगौडी पेशजी प्रमाणे चालते करावे. तुम्हास येक दोन वेळा चिटणिसीच्या धंदयाविसी लिहिले असता सुरळीत केले नाही. हे उचित नसे. याचे वडिलानी कैलासवासी तीर्थरुप माहाराजापासी सेवा येकनिष्टे बहुत केली तेव्हा संतोष होऊन शफत करून राज्यातील तीन धंदे वंषपरंपरेने दिल्हे व चंजीवर संकट पडले तेव्हा जिवाभ्य श्रमे करून काढून आणिले. तेव्हा केली तर हे तुम्ही जाणत आहा. तर सुरळीत तिनी धंदे याजकडे चालावे. वारणे पलीकडीलहि नाडगवंडी याची याजकडे चालावी. हा आसीर्वाद.

---

क्रमांक : १०० दि. १९-२-१७३२

नारो अनंत सबनिस यांच्या मुलाच्या मुंजीसाठी १०० होन अहेरादाखल देऊन पावती घ्यावी म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे भानजी बल्लाळ हेजीब मु॥ सोंधे यास पत्र.

श्री

त॥

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५८ विरोधकृत नाम संवत्सरे फाल्गुण शुध पंचमी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा छत्रपति स्वामी याणी राजश्री भानजी बलाळ हेजीब मु॥ सोंधे यास आज्ञा केली यैसीजे. राजश्री नारो अनंत सबनीस दिमत कारखाने याच्या पुत्राच्या व्रतबंधाकारणे वेतानत होन १०० येकसे रास देविले आहेत. तोफियाचे यैवजी आदा करणे आणि पावलियाचा जाब घेणे. ते प्रमाणे मजुरा असेत. पेसजी मा।।रनिलेस याचे समधे यैवज देविला होता तो यांस पाविला नाही. तरी पावता करणे. जाणिजे. बहुत काय लिहिणे.

मर्यादेयं
विराजते

तेरीख ५ माहे रमजान
सुमा इसने सलासेन मया अलफ.

बार

---

क्रमांक : १०१ दि. २१-३-१७३२

राजश्री हरिहराचार्य पंडितराव यांना तुमच्यामार्फत पन्नास होन दिले आहेत. तरी ते देऊन पावती घ्यावी, म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे भानजी बल्लाळ हेजीब मुक्काम सोंधे यांस पत्र.

श्री

तालिक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५८ परिधावीनाम संवत्सरे चैत्र

सुध सप्तमी भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजमान्य राजश्री भानजी बलाळ हेजीब मुकाम सोंधे यास आज्ञा केली यैसीजे. वेदशास्त्र संपन्न राजश्री हरीहराच्यार्य पंडितराय यास वेतनाचे यैवजी तुम्हाकडून होन पनास देविले आहेत. ते तोफियाचे यैवजी आदा करणे. पावलियाचा जाब घेणे. ते प्रमाणे गुजरा असे.

जाणिजे. बहुत काय लिहिणे.

मर्यादेयं
विराजते

तेरीख ६ [1] माहे शौवाल.

सु।। इसने सलासीन मया अलफ

बार.

---

क्रमांक : १०२ दि. ९-४-१७३२

बाळाजी माहादेव मुतालिक दि।। मजमू यास तुमच्या विद्यमाने वेतनाचे पन्नास होन दिले आहेत. तरी ते देऊन पोहोचल्याची पावती घेणे म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे भानजी बल्लाळ हेजीब मु।। सोंधे यास पत्र.

श्री

त।।

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५८ परिधावी ना(म) संवत्सरे चैत्र बहुल यकादसी[2] रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शंभू छत्रपति स्वामी याणी राजश्री भानजी बलाळ हेजीब मु।। सोंधे यासी आज्ञा केली यैसीजे. बदल देणे वेतनात राजश्री बाळाजी माहादेव मुतालिक दि। मजमू यासी तोफियाचे यैवजी होन पनास ५० देविले आहेत. आदा करणे पावलियाचा जाब घेणे. तेणे प्रमाणे मुजरा असे.

---

१ जंत्रीप्रमाणे तेरीख ५ पाहिजे.

२ ११ चा क्षय असल्याने दशमी धरणे बरोबर आहे.

बहुत काय लिहिणे.

मर्यादेयं
विराजते

तेरीख २४ माहे सावान[1]
सु॥ इसने सलासीन मया
अलफ

वार

---

**क्रमांक : १०३** **दि. १-६-१७३२**

परस्परांचा स्नेह वृद्धिंगत व्हावा या आशयाचे तुळजा राजा यांचे छत्रपती संभाजी दुसरे याना पत्र. यातील बराचसा मजकूर अंतरथ स्वरूपाचा आहे.

श्री

सहस्त्रायु चिरंजिव अखंडित लक्ष्मी आलंकृत राजश्री संभाजीराजे यासी प्रती माहाराज तुळजा राजा कृतानेक आशीर्वाद उपरी. एत्रत्य कुशल जाणुन स्वकुशल लेखने प्रमादोत्राप्ति करीत असिले पाहिजे. यानंतर तुम्ही वार्तीका[2] समेवात पत्र पाठविले व राजश्री रामचंद्र नाईक याचे नावे विस्तरे लिहिले त्यावरुन वृत्त अवगत होऊन बहुत समाधान जाले. चीरकाळादारभ्य जे गोष्टी येथे ऐशास्य + + + + होती तैच ईश्वरें सिधी पावविली. याहून विशेष संतोषावह इतर कार्य जे गोष्टी मोहूंत कीर्तीस दरगं + + + रास व स्वार्थास व राज्याभिवृद्धीस कारण ते गोष्टी घडोन आलीयावरून चित बहुतच सानंद जाहाले. पुत्री लेखन केले जे येथील मनोदय सिधी ते पाववायाच्या उद्योग चिरकाळादारभ्य होता. त्यास तेथील्या परस्पर वैमनसेयामुळें विलंबावरी पडले होते. तो अर्थ अवघा अनुकुल जाहाला. यावरी

---

१ महिना सवाल पडतो.

२ वार्तिक = बातमीदार, दूत.

अविलंबे येथील मनोदय सिद्धीते पाववणे. ये विषई सर्वोद्योग केला आहे. येथे या गोष्टीस अन्य भाव नाही. हा विस्तार साभिमान तदनुगुण अंग संपत्ती केल्याचा अर्थ लिहिला तो सकलही चितरुढ जाला. येथील चिरकाळादारभ्य ऐशास्य तेच मनोरथ सिधी करावे. ये विषईची कबरता हे उचितच की तुम्ही ये विषई मन:पूर्वक उद्योग धरलियावर अशक्य काय आहे. कही त्या (वि ?) षई लिहिले तरी तो अर्थ लागोन राजश्री नाईक मारनिलेसच रवाना करून पाठविले आहेत. याच्या सांगणीयावरून द प्र त होईल. येविषई येथून अंतर न ये. तुम्ही केला उद्योगच क्रीयापर्य व कईक करून अचिरकाले महत्कीर्तीस मात्र होऊन उभय राज्ये ही आभीवृधीस पावे त गोष्टी करूनच स्वत: साभीमान प्रवृत जाहालीयाउपरी याचा विस्तार लिहिणे काय आहे.

मोर्तब.

पौ जेष्ठ बहुल चतुर्थी सौम्यवासर परीधान नाम संवछरे.

---

**क्रमांक : १०४** **दि. ३-८-१७३२**

छत्रपती संभाजी दुसरे यानी पिराजी व शहाजी बागूल याना मौजे यळगूड गाव इनाम दिला. हा गाव मूळ बागूल यांच्या इनामतीचा होता. परंतु मध्यंतरी तो रघुनाथ गिरी गोसावी यास इनाम देण्यात आला होता. पिराजी व शहाजी बागूल यांचा बाप ' स्वामि कार्याविर खर्च जाहला ', असा सनदेत उल्लेख आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५९ परिधावीनाम संवत्सरे श्रावण बहुल नवमी गुरुवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री पिराजी बागुल व शाहाजी बागुल बिन मानाजी बागुल यासी दिल्हे इनामपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामीचे पुरातन येकनिष्ठ सेवक. तुमचे पिते मानाजी बागुल यानी स्वामीच्या राज्यात श्रमसाहास करून सेवा निष्ठेने केली. ते स्वामी कार्यावरी खर्च जाहाले. या करिता तुमचे चालविणे स्वामीस आगत्य. यास्तव स्वामीनी तुम्हास सन ईहिदे

आश्रीनामध्ये प्लव संवत्सरी छ १ शाबानी[1] मौजे यळगुड परगणा रायबाग सुभा कोल्हापूर हा गाव इनाम अजरामऱ्हामत करून दिल्हा होता. त्यास अलिकडे घालमेल होऊन मौजे मजकूर रघुनाथगिरी बावा गोसावी यास दिल्हा होता. प्रस्तुत तुम्ही व तुम्हाकडील रा।। राघो विठल करवीरचे मुकामी स्वामीसंनीध येऊन (विनंती केली की आपला गाव आपणास मिळावा. सनदाही दाखविल्या म्हणून गोसावी-कडून काढून यळगुड तुम्हास दिले असे. इ. इ.)

तेरीख २२ सफर सु।। सलास सलासेन.

---

**क्रमांक : १०५** **दि. ६–८–१७३२**

**सोंधेकरानी छत्रपती शाहू याना पांच हजारांची खंडणी देण्याचा तह केला होता. वारणेच्या तहान्वये ही खंडणी छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडे आली. परंतु नंतर छत्रपती शाहू यानी सदहूं खंडणी छत्रपती संभाजी दुसरे याना न देण्याचे पत्र सोंधेकरास पाठविले.**

**या पत्रानुसार छत्रपती संभाजी दुसरे श्रीनिवास परशराम प्रतिनिधी याना सूचना करतात की, उपर्युक्त खंडणी आपणास परत मिळविण्याचा व अकिवट, शिरवळ व मनपाडळी येथील उदाजी चव्हाण यांची ठाणी उठविण्याचा प्रयत्न छत्रपती शाहू यांच्यापाशी करावा.**

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५९ परिधावीनाम संवत्सरे श्रावण बहुल त्रयोदसी रविवासरे[2] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री श्रीनिवासराऊ पंडीत प्रतिनिधि यासी आज्ञा केली ऐसीजे. सोंधेकरकडून प्रति वर्षा पाच हजार होन तीर्थस्वरुप राजश्री आबासाहेब याणी घ्यावयाचा तह केला होता. तो यैवज अगंदी स्वामीकडस देविला. यैसे असता प्रस्तुत संस्थानकराचे लिहिलेवरून यैवज न घ्यावा म्हणून

---

१ दि. १७–५–१७२१

२ वारा प्रमाणे तारीख काढली आहे.

तीर्थरूप राजश्रीनी पत्र संस्थानकराकडस दिले. त्यावरून त्याणी पैकीयास उजूर केला. तरी अगोधर उरकोन गेल्या प्रसंगास पुन्हा यैसे व्हावे हे उतम नव्हे. तुम्हीच्या बोली चालीत असोन जे करणे ते केले अहे त्यास तफावत होऊ द्यावी यैसे नाही. ये विशई तीर्थस्वरूप राजश्री आबासाहेबास लिहिले आहे. तरी तुम्ही विनंती करून सदरहू पाच हजार होन पूर्वी तह साल दरसाल द्यावयाचा संस्थानकरानी मान्य केला आहे त्याप्रमाणे बिलाकुसुर स्वामीकडस देत जाणे यैसे तीर्थ-स्वरूप राजश्रीचे संस्थानकरास पाठविणे. येविसी राजश्री रामचंद्र नाईक पुंडे मंत्री यासी आज्ञा केली आहे. ते सांगतील तदनरूप निर्वाह होऊन ये ते करणे व अकिवाट व सिरवळ मनपाडळे ही तिन्ही ठाणी राजश्री उदाजी चव्हाण याकडस आहेत त्यास उदाजी चव्हाण स्वारीहून आलियावरी आज्ञा करून ठाणी सोडऊन देविली जातील म्हणून तीर्थस्वरूप राजश्रीनी लिहिले होते. तरी त्यास ताकीद करून सोडून देवणे. मा मारनुले समागमे जानोजी वेताळ पा। आहे. सांगता कळेल. बहुत काय लिहिणे तरी सूज्ञ असा[1]

मर्यादेयं
विराजते

---

**क्रमांक : १०६** **दि. ६-८-१७३२**

**छत्रपती संभाजी दुसरे यानी रामचंद्र शामजी नाईक पुंडे पोतदार याना त्यांचे जुने पोतदारीचे वतन व त्या वतनाचा दस्तुरीचा हक्क पूर्ववत चालू केला.**

श्री

श्री
प्रतिपच्चंद्र रेखे
व वर्धिष्णुर्विश्ववं
दिता शंभु छत्रप
तेर्मुद्रा राम सूनो
र्विराजते

---

१ याच आशयाचे दि ७-८-१७३२ चे आज्ञापत्र नारोराम मंत्री याना आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५९ परिधावी नाम संवत्सरे श्रावण बहुल द्वादसी रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री रामचंद्र शामजी नाईक पुंडे पोतदार यास दिले वतनपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामी संनीध विनंती केली की आपल्या वडिली वंशपरंपरेने स्वामी सेवा करून पोतदारीचे वतन संपादून अनभवीत होणे. त्या प्रमाणें पोतदारीचे वतन आपले स्वामी कृपाळ होऊन चालवीत आहेत व वतनास दस्तुरी[1] पहिले चालत होती. सांप्रत चालत नाही. या करिता स्वामीनी पोतदारीस दस्तुरी पोते व वसनागार येथे करून द्यावी म्हणून विदित केले. त्यावरून तुम्ही स्वामीचे परंपरागत सेवक. तुमचे वडिलानी स्वामी सेवा परंपरेनें केली व तुम्हीही करीत आहा. तुमचे स्वामीस अवशक या करिता पोतदारीचे वतन वडिलाप्राो स्वामी तुम्हास चालवीत आहेत. दस्तुरी चालत नाही या करिता स्वामी कृपाळू होऊन दस्तुरी करून दिली असे. जामदारखाना वसनागार व पोता दरसदे दस्तुरी रु॥

श्री आई आदि पुरुष श्री राजा शंभु छत्रपती स्वामी कृपानिधी तस्य कृष्णाजी परशराम प्रतिनिधि

पोता ऐवज येईल त्यास दरसदे रुाो ·।।·

वसनागाराकडे कापड खरेदी होईल त्यास दरसदे रु॥ ३८= दस्तुरी आहे. त्या खेरीज दरसदे रु॥ ·।।·

येणे प्रमाणे दस्तुरी पोतदारीस नव्हतास रुाो निम व कापड खरेदीस रु॥ ·।।· निम येकून येक रु॥ करून दिला असे. तरी तुम्ही सदरहू पोतदारीचे वतन पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें अनभऊन सुखरूप राहणे. जाणिजे निदेश समक्ष.

तेरीख २५ सफर सु॥ सलास सलासीन.

मर्यादेयं विराजते

---

१ दस्तुरी = रस्तापट्टी.

क्रमांक : १०७ दि. ४-९-१७३२

वीराप्पा माने याच्या कसबे कोल्हापूरच्या महाजनकीबद्दल तंटा उद्‌भवला होता. तो छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडे गेला असता त्यानी तो नाईकवडी व वतनदार यांच्याकडे सोपविला. त्याचाच हा महजर आहे. त्यावर अनेक लोकांच्या सह्या असून यशवंतराव दाभाडे व अंताजी त्रिमल यांचा त्यांत अंतर्भाव होतो हा ह्या महजराचा विशेष आहे.

श्री

सिका पारसी

महजर ब तेरीख २४ रबिलावल दर जागा कसबे कोट कोल्हापूर क।। हवेली प्रा मजकूर———सलास सलासिन मया आलफ. सन ह + + + ११४२ ———

राजमुद्रा

कोंडाजी भोसले + + + + रा।। मुरारजी मोहिते सरनोबत कोट कोल्हापूर——— गुंडो वेंकाजी सबनिस कोट मजकूर तिमाजी सखो कारखानिस कोट मजकूर

श्री राजा शंभु छत्रपती चरणी कोंडाजी भोसले सुभेदार निरंतर

श्री स्वामी चरण तत्पर मुरारजी मोहिते निरंतर

कृष्णाजी नरसिह फडणीस नि।। सबनिसी कोट मार

कृष्णाजी अनंत फडनीस नि।। कारखानिसी कोट मार

भिकाजी + + द कोट + + र———

खान अजम बहादुर खान सर हवालदार पो निहाये.

श्री शंभु छत्रपति चरणी सादर बाहादुर खान कोतवाल निरंतर

गोपाल माणके
स्वर हवालदार का।
मार-----

नाईकवाडी प।। कोल्हापूर
उसमान
+ रु
कटचार

माणकोजी जाध-
व सरनाईक
कटचार

अंताजी त्रिमल
सरदेसपांडे
क।। हवेली प्रा कोल्हापूर
दि।। देसकानी क।। हवेली
प।। मार

अंताजी हुरगोजी
जाधव
कटचार

जोत्याजी रायाजी
साकवे
कटचार

येसवत राऊ
बिन खंडेराव
दाभाडे देसाई
शिक्का

आपाजी
रामक्रस्ण
देसकुलकर्णी
गणेश गोमाजी
म।। नाडगोडा
हवेली कोल्हापूर

सखजी भीमा
जी सासने
कटचार

भिमाजी भुताजी
नलवडा
कटचार

नरसोजी उमाजी
ढपला ?
कटचार

खाचोजी यवस
वकर
कटचार

रायाजी दलवी
कटचार

मुंजाजी यदव
कटचार

धुलोजी नरसोजी
विगवकर ?
कटचार

संभाजी आखेरकर
कटचार

माहादजी कासी
कटचार

बापूजी रुद्रा हास-
मनीस

मोकदमानी कसबा मजकूर

अंदोजी मान्ये
बारगीर
कटचार

जखगोंडा बिन मानाजी
देये गौडा पटेल गोविंद कुलकर्णी
कसबा मजकूर भिकाजी बलाल
नांगर कुलकर्णी कस-
बा मजकूर

इभरामखान
देसाई ता। ठाणे
किले पनाळ

अनंत सेटी पाथरे दि।। सर
-सेटे मु।। सरसेटे

नारो हरि कुल-
कर्णी क।। मजकूर

भिकाजी बिन
फारगौडा चौ-
गला कसबा मा।र
पदमपा बिन होनपा
सेटे पा कसबे मजकूर

आलगौडा बिन विर-
गौडा पटेल पेठ
केसापूर
नांगर

+ + गौडा बिन
+ लस गौडा पटेल
मौजे हेरले क।। ठाणे
प्रा। किले पनाला
नांगर

बहिरोजी बिन
तुकोजी कसबेकर
कसबे मजकूर
कटचार

रेखोजी बिन
नरसोजी ना। कसबे-
कर क।। मा।र
कटचार

माहारुद्र माहादेव देशपांडे प्रा। मा।र
मौजे पळूस

मावजी प।।
नांगर

पदु गणाचारी
जंगम क।। मा।र
सिरमणा दिगा
बकाळ कसबे मजकूर
जक्रणि मुग
सदासिव महादेव
पुडली

मलणा गडू (?)
साइसेटे पेट
कसापूर

आबाजी पा।।
नांगर
कृष्णाजी चौगले
साक्ष

पुजाजी पा।।
मौजे खानापूर
संताजी पा।।
मौजे सावरगाव
नांगर
+ + गा सर पाटील
मौजे सांगवडा
क।। म्हयसाळ
प्रा।। मिरज
नांगर

चिमणाजी
रघुनाथ
कुलकरणी
मौजे पलुस

गाडपा पाा
सागाऊ
पा।। मौजे
धरगुती
+ + +
नांगर
फकीरभाई
नाईकवडी
ताा पलुस

भोव्राणा लटे
लखपा लोगाळे
हानपा सादळकर

चनपराय घाक
अंताजी डुणुंग
चमण चाटगी
जिनापा
मालद
गुरवणा
सोहणे
शामजी
यते सातोडकर
गुणाजी येलुरकर
म्हाल मजकूर
शंकराजी रघुनाथ
पत्र प्रमाण साक्ष
रामाजी पणदे
पत्र प्रमाण साक्ष
नरसापा कोलखडी
हीर छतमग
आपाजी पारगावकर
पत्र प्रा।। साक्ष

भगवंत बिन गोविंद
मेहतर
चाठे कसबा मा।र

घलु रामछ निधे
सिदोजी मेहतर पानाळी
क।। मा।र

सिदराम कासार
सिदोजी बिन नरस–
सेटी मेहतर वली
कसबा मजकूर

बलुते

सुतार

| | |
|---|---|
| नरसिया बिन | भिकणा बिन परमणा |
| सिदणा मेहतर | मेहतर क।। म।।र |

कुंभार

| | |
|---|---|
| जोती कुंबार | रामा बिन सोमाजी |
| बिन आपाजी कुंबार | कुंभार क।। म।।र |
| होनाजी बिन | रघु बिन सिवाजी |
| तिनजी कंबार क।। म।।र | कुंबार क।। म।।र |

गुरव

| | |
|---|---|
| भिकाजी बिन | गेना बिन मोतजी |
| कृपाम गुरव | गुरव क।। म।।र |
| जोती बिन सिवाजी | मुंजाजी बिन गोतोजी |
| मेहतर नाह्वी क।। म।।र | नाह्वी मेहतर क।।म।।र |

माहार मेहतर क।। म।।र

| | |
|---|---|
| बेधनाक बिन | सुभनाक बिन |
| कुमनाक क।। म।।र | सरसनाक क।। म।।र |
| | भोन सेठ मेहतर |
| | बिन तुक सेठ |
| | मेहतर प्र।। पनाला |
| | पत्रा प्र।। साक्षे. |

या हुजूर आहाला माहजर यैसाजे. विरोजी बिन बुकपा माने माहजन कसबे मजकूर व देवजी व संकरू व रायाजी बिन नरस सेटी

हे कोटीवालेपणाचे वतनाबद्दल भांडत आले. माहराज राजश्री क्षेत्रपती साहेबापासी गेले. माहाराज-----साहेबी मनसुबी नाईकवाडी व वतनदारावरी घातली. त्यानी करिना लिहून दिल्हा त्यावरून माहाराज साहेबाची सनद राजपत्र सादर जाहाले. पैवस्ती छ २८ रबिलावली सादर जाहाले. तेथे आज्ञा जे वा॥ राजपत्र आज्ञा केली यैसीजे. विरोजी बिन बुकपा मान्या माहजन कसबे कोल्हापूर याने कसबे मजकूरचे मोकामी स्वामी संनिध विनती केली की कोट कसबे मजकुरचे कोटीपणाचे वतन पुरातन आपले. त्यास आपला आजा विरपा माहजनकी करीत आसता कोटवालेपण व माहजनकी या दोहोची चाकरी होईना. याकरिता देवजी ढुमा याचा आजा यासी कोटीवाले-पणाचे मुतालिकीस ठेविला आणि बोली केली जे मिलेल ते निमे आपणास घ्यावे निमे त्याने घ्यावे आणि चाकरी करावी. यैसी बोली करून घर जागा घेऊन चाकरीस लाविला. तो चाकरी करीत आसता मृत्य पावल. त्याची बायको साताई हिने सांगितले की आपणास चाकरी होत नाही. दुसरा मुतालिक ठेवणे. त्यावरून वाटेगावाकडून देवजी बिन नरसिया याचा वडील सिद सेटी व जाव सेटी हे येऊन कसबे मजकुरी सुखवृतीने होते. त्यास निमेची बोली करून मुतालिकीस ठेविले. कोटीवालेपणाचा हासील निमेप्रमाणे घेऊन चाकरी करीत असता सिद सेटी मृत्य पावला. त्याचा लेक कल सेटी. कल सेटीचा लेक नरसिया याचा लेक देवजी व संकरू व रायाजी हे त्रिवर्ग कोटीवालेपणाची मुतालकी करीत आसता आपला वंत देत नाही आणि वतनासी कजिया आरंभिला आहे. माहराजानी हर दो जणाची मनसुबी बर हक निवाडा करून आपले वतन आपले दुमाला केले पाहिजे म्हणऊन विदीत केले. त्यावरून स्वामीनी कसबे मजकूरचे नाईकवाडी वतनदार आणून मनसुबी मनास आणिता कोटीवालेपणाचे वतन पुरातन मान्याचे हे हुजरे व नाईकवाडी व वतनदार यांचे मुखे खरे जाहाले. देवजी व संकरू व रायाजी हे खोटे जाहाले. या करिता स्वामीनी विरोजी बिन बुकपा मान्या याजवरी कृपाळू होऊन सदहू कोटीवालेपणाचे कोट मजकूरचे वतन यासी मऱ्हामत करून दुमाला केले असे. तरी

तुम्ही सदरहु कोटीवालेपणाची सेवा याचे हातून घेत जाणे व याचे घर याचे स्वाधीन केले आसे व कोटीवालेपणाचे दुकान यासी दिल्हे आसे. वतन समंधे कानू कायेदे जे सुदामत चालत आले आसल त्याप्रमाणे चालवित जाणे. आणि सदरहू वतन यासी व याचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने चालवित जाणे. प्रति वर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे. या पत्राची प्रति लेहून घेऊन आसल पत्र भोगावटियासी कोटवाले मजकूर या जवल परतोन देणे. कोटीवालेपणाचे वतनाची सेवा घेणे म्हणऊन राजपत्र सादर जाहाले व यैजितखतहि देवजी व संकरू व रायाजी बिन नरस सेट यानी लिहुन दिल्हे की कोटीवालेपणाचे वतन तुमचे यैसे येजितखत लिहून दिल्हे. त्यावरून कोटीवालेपणाचे वतन विरोजी बिन बुकंपा माने माहजन याचे कोटीवालेपण खरे. देवजी व संकरू व रायाजी हे मुतालिक खरे. यास वतनास आर्थाआर्थी समध नाही.[1] हा माहजर.

साक्षी———

---

**क्रमांक : १०८** दि. १८-९-१७३२

छत्रपती संभाजी दुसरे यानी यशवंतराव म्हाळोजी गायकवाड यास तर्फ सिराळे प्रांत मलकापूरची नागौडकी दिली.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५३ परिधावी नाम संवत्सरे आश्वीन शुद्ध विजयादशमी इंदुवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजेश्री येशवंतराव बिन म्हाळोजी गायकवाड नाडगोंडे ता॥ सिराळे सुभा मलकापूर यास दिल्हे वतनपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन येकनिष्ट सेवक. तुमचे वडील

---

१ कसबे कोल्हापूरच्या महाजनकीचे वतन विरोजी माने यास दिल्याची आज्ञापत्रे छत्रपती संभाजी दुसरे यानी कोंडाजी भोसले सुभेदार, चिंतो महादेव, देशमुख, देशपांडे, कुलकर्णी व नाईकवडी कसबे कोल्हापूर याना पाठविली. ती उपलब्ध आहेत.

वडिलानी तीर्थरूप माहाराज राजेश्री थोरले कैलासवासी स्वामीपासून येकरूप निष्टेने सेवा करीत आले व तुम्ही स्वामीची सेवा त्रिकर्ण शुद्धीने करीत आहां. स्वामीच्या पायांविना आन्य जाणत नाही. तुमचे वंशपरंपरेने चालविणे हे स्वामीस परम आवश्यक. या करिता तुमचे लेकराचे लेकरी चाले ऐसे वतन करून द्यावे हे स्वामीच्या चित्तांत सदयतेने येऊन तुम्हास नूतन वतन ता।। सिराळे प्रांत मलकापूर येथील नाडगौंडकीचे वतन पेशजी जगजीवन गोविंद यासि दिले होते ते दूर करून हाली स्वामी तुम्हावरी कृपाळु होऊन सदरहू ता।। मजकूरचे नाडगौंडकीचे वतन मऱ्हामत केले असे. गावगन्ना बी ता।।

( या पुढे गावाचा तपसील आहे देह ७७ )

येकून देह सत्याहतर येथील नाडगौंडकीचे वतन मऱ्हामत करून दिली असे. या वतनास हक लवाजिमा व इनाम व पालक याची मोईन करून दिली असे——

हक दर सदे दिवाण[1]दस्ताचे
बेरजेस रयत नि।। दर सदे
रुपये २
जकात दर बेरजेस रुके
८२ भूस व मीठ दर गोणीस
८६ कापड व तंबाकू व घोंग-
डी दर नगास
८३ केणे दर बैली
८११
तेल्याचे घाण्यास
दर माहे तेल वजन
८८१

इनाम गाव मौजे सांवर्डे
बु।। ता।। मजकूर
देह १ पालक दर गावास
१ म्हैस
१ चाकराचे घर
२
हक रुके सालिना
॥ दर दुकानास
॥ साळी व कोष्टी दर मागास
१८
तांबोळी याचे दुकानास दर माहे
पान सुमार १००

१ दिवाण दस्त = शेतसारा.

आठवडे बाजारास
फसकी उकाळा[1] देश-
कुलकर्णी या प्रा। व बाजे-
बाब या प्रा। करार

येणेप्रमाणे हक दर सदे दोनु रुपये व इनाम गाव व मौजे सांवर्डे बु।। ता।। मजकूर व पालक दर गावास म्हैस व चाकराचे घर व जकातीस रुपये आकरा व दर दुकानास व साळी कोष्टी मागास दर रुके २४ व तेल्याच्या घाण्यास तेल एक शेर व फसकी व दर दुकानास पाने एकसें. येणेप्रमाणे मोईन हक्काची करून दिली असे. तरी तुम्ही सदरहू नाडगौंडकीचे वतन तुम्ही पुत्र पौत्रादि वंश परंपरेने आनभवून सुखरूप राहाणे. निदेश समक्ष (शिक्के वगैरे असत).

तेरीख ९ रबिलाकर सु।। सलास सलासीन मया व अलफ.

---

**क्रमांक : १०९** दि. २४–९–१७३२

सदाशिव भट उपाध्ये यांचे बैल वरघाटी व तळघाटी विविध प्रकारचे जिन्नस आणण्यासाठी गेले आहेत. तरी त्या जिनसावर जकात आकारू नये म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांची कमाविसदार, लोक व जकात महाला ि बेट यांस आज्ञा.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५९ परिधावी नाम संवत्सरे आश्वीन बहुल द्वितीया भानुवासरे क्षत्रीय कुलवतंत श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी कमाविसदारानी व लोकानी व जकात माहालानी बेट यास आज्ञा केली ऐसीजे. बेदशास्त्र संपन्न राजश्री सदाशिव भट्ट उपाध्ये याकडे बैल[2]सर १२ बारा हरजिनस भरून आणावयाकरिता

---

१ फसकी उकाळा = धान्य व भाजीपाला व्यापारी यांच्याकडून घेतला जाणारा कर.

२ बैल सर १२ = जन्या काळी बैलांची मोजदाद करणारा संख्यावाचक शब्द.

तळघाटे व वरघाटे रवाना केले आहेत. हे वर जागा जाऊन हरजिनस खरीदी फ़रोस्त करून भरून घेऊन येतील. तरी तुम्ही यास मार्गी जकातीचा व हरयेक विसीचा उपसर्ग न करणे. सदरहू बैल जिनस भरून येतील त्यास सुखरुप येऊ देणे. निदेश समक्ष.

---

क्रमांक : ११० दि. २६-१०-१७३२

छत्रपती संभाजी दुसरे यांचे देशाधिकारी व कारकून सुभा प्रांत कोल्हापूर यांना पत्र की. कुमाजी डायाजी माळी ह्याला पुत्र संतान नसल्याने त्याचे म्हेतरकीचे वतन निंबाजी फिरंगोजी माळी याला देण्यात आले आहे.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक ५९ परिंधावी नाम संवछरे कार्तिक बहुल पंचमी गुरुवासरे[1] क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपती स्वामी------ याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान भावी सुभा प्रांत कोल्हापूर यासि आज्ञा केली यैसीजी.

सिका प्रतिनिधीचा

निबाजी वा।। फिरगोजी माळी म्हेतर कसबे कोलापूर याणे करवीरचे मुकामी स्वामी संनिध विनंती केली कीं कसबे मारचे माळी याचे म्हेतेरकीचे वतन पुरातन कुमाजी वा।। डायाजी माळी याचे होतें. त्यास त्याचे पोटी संतान नाही निपुत्रीक नकल जाहले. वतन दिवाणचे याकरिता पेशजी राजश्री उदाजी चवाण कसबे मारी होते त्यासी जाऊन वर्तमान सांगितलें. त्यावरून माळी याचे म्हेतरकीचे वतन निरवरीस पाहून त्याणी आपणास म्हेतरकीचे वतन दिल्हे. पत्रेही करुन दिल्ही आहेत. माहाराज कृपाळू होऊन सदरहू माळी याचे म्हेतरकीचे वतन मन्हामत केलें पाहिजे म्हणोन विदित केले व राजश्री कोंडाजी भोसले सुभेदार याणाही विनंती केली. त्यावरून मनास आणिता

---

१ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

म्हेतरकीचे वतन नकल जाहाले. वतन दिवाणचे. माहाराज याजवरी कृपाळू होऊन माळीयाचे म्हेतरकीचे वतन नूतन मऱ्हामत करून दिल्हे आसे व या वतनास हाक व लाजिमा व पालक याचा मोईन करून दिल्ही आसे. माळी याच्या खुमास बी तपसील——

पालक नक्त बावेस
२ घरे
२ म्हसी
४

इनाम जमीन कसबे मारी
पड बिघे ८५
कवटे मालिणी दर बाजारास
आगर दुकानास फसकी घ्यावी
कलम
१

बाजारास माळी याच्या बैलास
व खांदा ऊस माळवे अणतील
त्यास माळवे वजनी
८८२ गोणीस.
८८१ खांदा ऊस
८८३

धोतर व पासोडी घोंगड्या
बदल माळी याच्या खुमास
सादिलवारी सालिना होन
१

माहाल व गोंधळ व लग्न व पाट
करतील त्या (अक्षरे नाहीत) पान
मान घ्यावे————कलम
१

वेखालाव व गोत पात होईल ते
म्हेतरांचे गुजारतीने करावे. त्याणी
तशरीफ घ्यावी.
सेरिखा————
लेवाजे येईल ते (+ + +)
लणे जाले तर म्हेतर माराचे
गु॥ वजन करून द्यावे
१

बाग बागाईत दिवाणचे कोणे
जिनस (पुढील अक्षरे फाटली आहेत)

तारीख[1] १९
जमादिलावल सुरु सन
सलास सलासीन मया
आलफ

---

१ जंत्री प्रमाणे दि. २८–१०–१७३२.

**क्रमांक : १११**                    दि. ४-१२-१७३२

विरोजी माने याची महाजनकी चालवावी म्हणून नीळकंठ त्र्यंबक प्रधान यांचे राणी जिजाबाई याना विनंती पत्र.

श्री                    तालिक

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेबाचे सेवेसी. विनंती सेवक निलकंठराव त्रंबक प्रधान कृतानेक विज्ञापना. साहेबाचे कृपावलोकने मार्गशीर्ष बहुल द्वीतीया मंदवासरे पावेतो कुशल आस. विशेष राजश्री विरोजी माने याचा कोल्हापूरचा माहाजनकीचा वतन पूर्वापार आहे. ते निर्वेध चालावयाविसी राजेश्री स्वामी सातारियास आल ते समई माहाराज राजेश्री स्वामीनी आगत्यवाद धरून सांगितले त्यावरून स्वामींनी मान्य करून पत्र दिली. प्रस्तुत सेवकास माहाराजादि बोलाऊन नेऊन याचा वतनी प्रसंगाकरिता बहुताचा आगत्ये धरून आज्ञा केली आणि विरोजी माने यासी सेवकाचे हाती दिल्हा. लक्ष प्रकार माहाजनकीचा आमल पूर्वापार आसल तो चालवावा म्हणेन आज्ञा. अशास हाली राजेश्री विरोजी माने यासी मा(हा)राजादि करविरास पाठविले आहेत. साहेबाचे दरशेण घ्यावयाची आज्ञा. त्या प्रमाण साहेबाकड येऊन सर्व वर्त(मान) निवेदन करतील. तदनुरूप राजेश्री कोडजी भोसले सुभेदार व राजेश्री चितोपंत यासी आज्ञापत्र सादर करून माहाजनकीचा कानु कायेदा पहिलेपासून आसल त्यामध्ये चालतो काय आणि राहिला काय हे मनास आणोन जे राहिल आसल ते सुरलित चालोन याची वतनावरी स्थापना होय ते करणार साहेब धणी आहेत. येविसी माहाराजाचहि पत्र आहे त्यावरून सेवेसी विदित होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेः।। फतेसिंग भोसले रामराम. सुमा सलास सलासीन म(या) अलफ. मौजे मुडे क।। तलबोड ये(गा)वीच्या पाटीलकीचा कजया आहे. येसियास जमाले व सालवी दोघाची मनसुबी मागेच विल्हे लागली. सालवी खोटे जाले. ते गैर हजीर जाले. ते तुमच्या परगणियात आहेत. त्यांस आणावयास माणसे पाटविली आहेत. तरी तुम्ही अटकाव न करणे.

जाणिजे. + + + + हुत काये.

सिका

---

क्रमांक : १२१ इ. स. १७३३

महमद खान गुमास्ता देशमुख कसबे तळबीड यास आज्ञा की, सदहू गावच्या गत सालच्या व चालू सालच्या तिजाईच्या उत्पन्नापैकी पंचवीसशे रुपये पाठवून द्यावे.

श्री

म।। महमद खान गुमास्ते देशमुख कसबे तळबीड सुमा आर्बा सलासीन मया आलफ. तुम्हाकडे इनाम तिजाईचा येवज साल गु।। व साल मजकूर येणे. त्या येवजी तुर्त रु।। २५ पंचवीस सद आणविली आसे सिताबा[1] पाटऊन देणे. दिरंग न करणे. या कामास सिदोजी नलवडेस पा।। असे. यासी रु।। पंचवीस आदा करणे.

जाणिजे छ. २० जमा + +

सिका

---

क्रमांक : १२२ दि. २७-१-१७३४

मौजे कुरुंदवाड या गावची चौथाई चिंतो महादेव यांजकडून दूर करून राणोजी घोरपडे सेनापती याना देण्यात आली आहे, म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे सदरहु गावच्या मोकदमाना पत्र.

१ सिताबा=जलद

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ६० प्रमादीनाम संवत्सरे माघ शुध चतुर्थी भानुवासर क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी

| | |
|---|---|
| श्री<br>शंभु छत्रप<br>ति हर्षनिधान<br>त्र्यंबक सुत निळ<br>कंठराव मुख्य<br>प्रधान | श्री आई आ<br>दि पुरुष श्री राजा<br>शिव छत्रपती स्वामि<br>कृपानिधि ।। तस्य प<br>रशुराम त्र्यंबक<br>प्रतिनिधि |
| पान घाटी | वर्तुळाकार |

मोकदमान मौजे कुरदवाड ताा आळते यासि अज्ञा केली यैसीजे. मौजे मजकूरचे चौथाईचा यैवज पेशजी राजश्री चितो माहादेव याकडे जमावाचे बेगमीस दिल्हा होता. हाली माारनुलेकडून दूर करून राजश्री राणोजी घोरपडे सेनापती याकडे दिला आहे. तर तुम्ही सनापतीकडे मौज मारचे अकाराची चौथाईचा यैवज होईल तो वसूल देणे. दुसरेकडे वसूल न देणे. मौजे मारपैकी हुजुर नजरेचे रु।। १५० करार केले आहेत. तो यैवज हुजुर सिताब पाठऊन देणे.

जाणिजे. निदेश समक्ष.

मर्या देयं
विराजते

तेरीख २
रमजान सु।। आर्बा

बार सुद्र.

---

क्रमांक : १२३ दि. २९-१-१७३४

भरमोजी माने यास तीस बिघे जमीन इनाम दिल्याचे महाराणी जिजाबाई यांचे बाजी निकम व शशो कोंडदेव कमाविसदार मौजे भादोले यांस आज्ञापत्र.

श्री

श्रीमंत सकल सौभाग्यादिसंपन मातुश्री जिजाबाई साहेब याणी राजेश्री बाजी निकम व शशो कोंडदेव कमाविसदार मौजे भादोले प्रांत वडगाव यासी आज्ञा केली येसीजे. सु॥ आर्बा सलासीन मया आलफ. भरमोजी माने प॥ मौजे मजकूर यास मौजे मारी जमीन बिघे तीस बिघे देविली आसेत. तरी तुम्हीं जमीन पडीची विसा पांडाचे बिघयाने मोजून सदरहू पाव चावर म॥रनिलेचे पदरी घालणे यविसी उजूर न करणे.

जाणिजे. छ ४ रमजान. लेखनसीमा. मोर्तब आसे.

---

**क्रमांक : १२४** दि. ११–४–१७३४

कसबे कालेढोण, वांगी व तळबीड येथील हक्क सुरळित मिळत नाही, अशी तक्रार संभाजी मोहिते, संक्राजी मोहिते देशमुख व कृष्णाजी नरसिह देशपांडे यानी केल्यावरून श्रीनिवास परशराम प्रतिनिधी यानी सदहूं हक्क त्याना सुरळित मिळावा म्हणून वरील कसब्याना ताकीद दिली.

नक्कल

मर्‍ा आनाम संभाजी मोहिते व संक्राजी मोहिते देशमुख व कृष्णाजी नरसिव्ह देशपांडे कसबे कालेढोण व वांगी व तलबीड यासी श्रीनिवास परशराम प्रतिनिधी सुमा सन खमस सलासीन मया आलफ. कसबे म॥चे हक सुरलित देत नाहीत म्हणोन तुम्ही पेशजी हुजुर येऊन विदित केले होते.

सीका

त्यावरून वरात[1] करून दुसाला हाक हुजूर वसूल घेतला होता. त्यास पाटील कुलकर्णी तुम्हाकडे येऊन हाक व इनाम सुरलित द्यावा अशा करार केला म्हणोन तुम्ही येऊन विदित केले.

---

१ वरात =-मामलेदार वा खोत यांजकडून कुळांकडे येणारा तगददार.

त्या वरून कसबे मजकुरास आज्ञापत्र सादर केले आहे. तरी तुम्ही आपला हाक इनाम वाडा जो पुरातन असल तेणे प्रमाणे घेणे. तुमचे माथा नजर रुपये ३०० तिनशे करार केले असे. याचा वसूल देऊन सुखरूप राहाणे.

छ. १७ जिलकाद निधी समक्ष. मोर्तब असे.

सुर सुद्र बार.

---

**क्रमांक :** १२५ दि. २७–५–१७३४

महाराज राजश्री स्वामीकडे एक हत्ती रवाना केला आहे. तरी तो नरगुंदला सुरक्षित पोहोचता करावा म्हणून हिंदुराव घोरपडे यांचे खानगोंडा बहादूर देसाई, परगणा लक्ष्मेश्वर यास पत्र. हिंदुराव घोरपडे यानी या पत्रात 'व्यास राजऋषी देव, सेनापती जप्तनमुलुक, फत्तेजंग बहादूर' हे किताब वापरल्याचे आढळते.

श्री सुबराज

राजेश्री खानगोंडा बहाद्दर देसाई पा।
लक्ष्मेश्वर गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये——स्ने।।
हिंदूराव घोरपडे ममलकतमदार व्यास राजरुषी देव सेनापति

जप्तन मुलूक[1] फतेजंग बहाद्दर रामराम. सुहूरसन खमस सलासीन मया आलफ. महाराज राजश्री——स्वामी कारणे हती येथोन रवाना केला आहे. खंडोजी कदम घेऊन जात आहे. तुम्हापासी येतील. तुम्ही त्या समागमे पंनास प्यादे देऊन नरगुंदपावेतो पावता करणे खोळंबा न करणे मार्गी. सुरक्षीत पोहोचते करणे.[2]

---

१ जप्तनमुलूक फत्तेजंग बहाद्दर हा हिंदुराव घोरपडे यांचा नवीन किताब आहे.

२ अशाच आशयाचे पत्र हिंदुराव घोरपडे यानी तिरकप्पा देसाई व देशकुलकर्णी किल्ले कोपळ यास पाठविल्याचे उपलब्ध असून, तेहि दि. २७–५–१७३४ चेच आहे. त्यांत हत्ती गिरहट्टीपर्यंत पोहोचता करावा असे म्हटले आहे.

जाणिजे ५ छ मोहरम.

लेखन
मर्यादा

सुरु सुद्द बार

---

क्रमांक :: १२६ ख्रि २७-५-१७३५

लष्करातील एक हत्ती हिंदुराव घोरपडे यानी छत्रपती संभाजी [illegible] यांच्याकडे रवाना केला होता. तो घेऊन जाणारांच्या मार्गात व्यत्यय आणू नये म्हणून त्यानी लष्करापासून किल्ले पन्हाळा या दरम्यानच्या ठिकठिकाणच्या सरकारी अधिकाऱ्याना या पत्रात ताकीद दिली आहे.

मारुल अनाम देशकानी व स्वारानी पागा व सिलेदारानी व कमाविसदारानी व चौकिदारानी जकायतो महालानिहाय अहद लस्कर तहद किले पनाळा यांस हिंदुराव घोरपडे ममलकतमदार सुहूर सन (खमस) सलासीन मया आलफ. चौकोनी सिका लस्कराहून हती फील एक हुजूर महाराज राजश्री——स्वामीकडे रवाना केला आहे. समागमे खंडोजी कदम अफराद[1] दिल्हा आहे. तरी मार्गी जकायतेविसी व हरएक बाबे मुजाइ(क)[2] ना होता सुरक्षीत ठिकाणास पोहोंचते करणे. दरींबाब[3] ताकीद असे.

जाणिजे. छ ५ मोहरम.

लेखन
मर्यादा

---

१ अफराद = चाकर, नोकर; २ मुजाईक = प्रतिबंध;
३ दरीबाब = या बाबतीत.

**क्रमांक : १२७** **दि. २२-९-१७३४**

मौजे तेरणी बुद्रुक हा गाव सेटगौडा संकगौडा देसाई यास इनाम दिला आहे, म्हणून दिवाण कोट कोल्हापूर याचे मोकादम मौजे तेरणी बुद्रुक यास पत्र.

आज दिवाण किले सामानगड त।। मोकदमानी मौजे तेरणी बुदरुख क।। नूल सु।। खमस सलासीन मया आलफ. सेटगौडा संकगौडा देसाई कर्यात मजकूर हे किला येऊन विनंती केली की आपण किलीयासी रुजुवात वर्तोन हमीशा येकनिष्ठपणे सेवा करीत आलो. मागे कितेक खस्त मेहनता केल्या. ऐसीयास साहेब कृपाळू होऊन नूतन इनाम गाव करून दिला पाहिजे (म्हणून इनाम दिले, इ. इ.)

छ ५ माहे जमादिलावल.

---

**क्रमांक : १२८** **दि. ९-११-१७३४**

चितो महादेव याने आपण जिजाबाईचा मानस पुत्र असल्याचे सांगितले म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यानी त्याला अष्ट प्रधानामध्ये न्यायाधिशाचे स्थान दिले.

श्री तालीक

स्वस्ति श्री राज्याभिशक शक ६१ आनंदनाम संवछर कार्तीक बहुल दशमी मंदवासर क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विस्वासनिधि राजमान्ये राजेश्री चितो मा(हा)देव न्यायाधीश यास आज्ञा केली आसीजे. तुम्ही स्वामीचे नवाजीस.[१] स्वामीच्या पायाविना आन्य दैवत माहीत नाही. याकरिता दिवस दिवस तुमचे उर्जित करून चालवण हे स्वामीस परम आवस्यक. तुम्ही स्वामीचा राणीवास चौथा वाडा याचे पुत्र म्हणविल. याकरिता हाली स्वामी तुम्हावर कृपाळू होऊन तुमची आष्टप्रधाना मध्य गणना

१ नवाजीस = आश्रित, लालन पालन केलेला.

करून तुम्हास न्यायाधिसीचा हुदा सांगितला आस. तरी तुम्ही निस्टन वर्तोन न्यायाधिशीचा हुदा देऊन प्रमाण करून स्वामीची कृपा संपादन करणे. तुम्हास वेतन सालिना दखील चाकर होन्न पा। ५००० पाच हजार केले आसत. तरी ई॥ पैवस्तीपासून दंडक प्र॥ वजावाट करून राहिल वेतन सिरस्ताप्र॥ घेत जाणे. वतनाचे माईनप्र॥ चाकर व॥(द)पल त्या दिवसापासून त्याचा हाक घेत जाणे. तुमच्या हुद्यास जिल्हा पाहिजे याकरितां सुभा प्रां पनाळा पै॥ ता आळता व रुकडी दोनी माहाल दरोबस्त व कोल्हापूर सुभांच माहाल वरकड माहालची चौथाही दिल्ही आहे. तरी जिल्हा कबज करून फौज वागऊन स्वामीची शवा करीत जाणे. स्वामीची दया संपादीत जाणे. तुम्हास जमान राणीवास चौथावाडा घेतल आसत. जाणिजे. बहुत लिहिणे तरी तुम्ही सूज्ञ आसा. मोर्तब.

तारीख २४ जमादिलाखर सु॥ खमस

बार बार

---

**क्रमांक : १२९** इ. स. १७३४–३५

राणोजी घोरपडे सेनापती यानी छत्रपती संभाजी दुसरे याना सादर केलेल्या या अर्जात आपला सरंजाम, फौजेचा खर्च, वगैरे गोष्टीचा तपशील दिला असून खासगी खर्चासाठी मुलुख मागितला आहे.

यादी वोली राजश्री राणोजी घोरपडे सेनापती सु॥ खमस सलासीन मया व आलफ—

राजश्री सुभानराव सिंदे सेना खासकल व राजश्री दादाजीराव यास आज्ञा केली आहे ते तुम्हास सांगतील म्हणोन आज्ञापत्र सादर जाहले. त्यास उभयता येऊन भेटोन गेले. बोली चाली काही खुलाशाने

स्वामीनी मनोलीचे मुकामीहून सरंजाम निवडून दिल्हा तो सरंजामी यैवज निर्माण काय होतो तो शेवेसी विदीत आहे. सेवकपासी दोनी हजार फौज नेहमी आहे. त्याची उस्तवारी काय आहे त्यामध्ये

बोलोन गेले नाहीत. उपर येकतों जे राजश्री दादाजी राऊ यानी राज्यभाराचे व फौजेची यख्तीयारी करून गेले आहेत. परंतु सेवकास आज्ञा जाहली ते काही कलले नाही. सेवकाची उमेद स्वामी सेवा एकनिष्ठेने करावी. हा हुदा धणी-याचा नेहमी आहे. दोन हजार फौज धणीयाची स्वामी कार्य पाहून आणिखी मेलवावे लागतात. यास्तव विनंती लिहिली आहे. आज्ञा करावया स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय.

१

मनोलीचे मुकामी पा। यादवाड राजश्री सुभानराऊ सिंदे याजकडे दिल्हेस व कोलार परगणे नेसरी माहाल दरोबस्त दिल्हे. त्यास सेना-खासकील यांनी नेसरी आपण घेऊन यादवाड माहाल आम्हास दिल्ह आहे. याचे सनद सादर करावया स्वामी समर्थ आहेत. चांदगड माहालाचे मनोलीचे मुकामी सातही गाव दिल्हे आहेत. त्यास दोनी वरसे तिकडे जावे. तरी कितूर बेलगाव व दोनी माहालास उपसर्ग लागल म्हणून कित्तूर बेलगल हे दोनी माहाल ठेऊन घेतले. त्यास कित्तूर चवदा कर्याती व बेलगाव साहा कर्याती येस माहाल पोक्त[1]. त्याचे मुबदला व्हनगुपे व येलबारगे व करडियेस तीन कर्याती लाहान मलप्रवा पैलकडे दिल्हे. तरी कितूर बेलगाऊ व खानापूर तिनी माहालाचे दस्तकाय[2] आणि तीन कर्यातीचा दस्तकाय एका कर्या-तीचा मुबदला हे यैस वर्तमान आहे. स्वामी कृपालु होऊन पूर्ववत प्रमाणे कितुर बेलगाऊ व खानापूर करार करून घ्यावया स्वामी समर्थ आहेत.

१

पा। बागलकोट देखील बेळगाव केरूर आनवाल हे माहाल पूर्वी-पासून दिल्हे आहेत. त्यास घालमेल होऊन कब्ज पडले नाही. साल गु। माहाली मुकाम करून बोलीचाली कारकून ठेविले. त्यास मागती घालेमेली जाहली. कारकून उठोन आले. त्यावर मागती स्वामी कृपाळू होऊन सनद सादर केली. ती रवाना केली आहे. परंतु मागती सनदेचा उजुर पडला आहे. हली ताजे सनदा व (नवाजोस) ...पत्र जे राजेश्री हिंदुराऊ याकडून दूर करून

१ पोक्त = पूर्ण; २ दस्तकाय = अमल

क्रमांक : ११२ दि. ४-१२-१७३२ (?)

विरोजी माने याच्या कोल्हापूरच्या वतनासंबंधीचे हे पत्र आहे. महाराजांच्या पूर्वीच्या आज्ञापत्राप्रमाणे व आता मातुश्री आईसाहेब जी आज्ञा करतील त्यानुसार विरोजी माने यांच्या वतनाचा व महाजनकीचा अधिकार चालविण्याची ताकीद पाटील-कुलकर्णी व वरकड वतनदार याना द्यावी, म्हणून नीलकंठराव त्रिंबक प्रधान यांचे कोंडोजी भोसले सुभेदार व चिंतोपंत याना पत्र.

श्री तालीक

राजेश्री कोंडोजी भोसले सुभेदार व
राजश्री चिंतोपंत गोसावी यासी

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्ने॥ निलकंटराव त्रिंबक प्रधान रामराम. येथील कुशल जाणोन स्वकीये लेखन करणे. यानंतरी राजेश्री विरोजी माने याच कोल्हापूरच वतन आपेत्यविसी गतवर्षी राजेश्री स्वामी सातारियासी आल त्या समई माहाराजानी बहुता रीतीने राजेश्री स्वामीनी मान्ये करून पत्र दिली आहेत. प्रस्तुत माहाराजादि आम्हास बोलऊन विरोजी माने यासी आमचे हाती देऊन वतन अमल सुरळित चालऊन स्थापना वतनावरी करणे म्हणोन बहुता रीतीने आज्ञा केली. अशास हाली मा॥रनिलेस वतनी प्रसंगाकरिता रो माहाराजाची आज्ञा देऊन श्रीमंत मातोश्री आईसाहेबाकडे पाठविले आहेत. तरी तुम्हास मातुश्री साहेब आज्ञापत्र सादर करितील व पेसजी राजेश्रीची पत्रे आहेत ते मनास आणून त्याप्र॥ कानु कायेदा माहाजनकीचा आसल तो सुरळित चालण येविसी पाटील कुलकरणी वरचील[1] वतनदार यासी ताकीद करून सांगण. रो माहाराजादि बहुत आगत्यवाद असून आज्ञा केली आहे.

जाणिजे. छ १५ जा॥कर.

बहुत काये लिहिणे.

---

१ वरचील = वरकड.

क्रमांक : ११३ दि. २३-१-१७३३

छत्रपती संभाजी दुसरे यानी वे॥ सदाशिवभट उपाध्ये या त्यांच्या 'कुलगुरू' ना करवीरात घरासाठी जागा दान दिली त्याचे हे दानपत्र.

श्री

माथ्यावर सिका असे

स्वास्त श्री राज्याभिषेक शके ५९ परिधामी नाम संवछरे माघ बहुल चतुर्थी इंदुवासरे[1] क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदासिवभट

सिका उपाध्ये उपनाम आरवीकर गोत्र शाकल्य सूत्र आश्वलायन यास दिल्हे दानपत्र आसे जे. स्वामीचा

मुकाम करविरी जाला ते समई करवीर माहाक्षेत्र येथें घरदान द्यावे येसे स्वामीच्या चित्तात आले. त्यावरून कसबा मजकुरी खुशरजांव[2] दिले घर कसबे मजकूरचे देशमूख व पाटील कुलकर्णी व नाईकवडी यास जागा करून देणे म्हणोन आज्ञा केली त्यावरून समस्तानी हसन दरवेस (व) मिरा गोरीशानी दिवाण मइवडी कसबा म॥ याचे घर खुशरजांव दिले. जागा रिकामा करून दिवाणांत नजर केला आणि हासन दरवेस व मिरा गोरीशानी दिवाण यास घराचा दुब दिले. घर बांधावयासि मिरा हुसेन मिरजुमले कसबे म॥ याचा जागा घेऊन त्यास दिल्हा. हसन दरवेस व मिरा गौरीशानी याची जागा कसबे मजकूरचे देशमुख व पा॥ कुलकर्णी व नाइकवडी कसबा म॥ याणी स्वामीस नजर केला. ते घर स्वामीने तुम्ही स्वामीचे उपाध्ये कुलगुरू तुम्हास ग्रहदान दिधल्याने स्वामीस कल्याणावह याकरितां साधरण संवत्छरी माघ शु॥ पोर्णिमा माहापर्वकाली सहहिरण्योदक घर बांधावयास स्थलयान दिल्हे आहे. तरी तुम्ही कसबे मजकुरी जे स्थल तुम्हास दान दिले तेथे तुम्ही

---

१ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

२ खुशरजाव = खुषरजा ?; स्वतोषे.

इमारतीचे उत्तम घर बांधोन तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने नांदोन स्नानसंध्यादिक शटकर्मे आचरोन सुखे राहणे. निदेश समक्ष.

मोर्तब असे.

तेरीख १७
साबान सुरू सन सलास.

---

**क्रमांक : ११४** **दि. ९-३-१७३३**

कुडाळचे सरदेसाई नागसावंत भोसले याना परगणा गलगली लष्कराच्या खर्चासाठी मोकासा म्हणून दिला आहे. तरी त्याच्या मोकासाबाबेचा ऐवज नागसावंताना द्यावा म्हणून हिंदुराव घोरपडे यांचे देशमुख व देशकुलकर्णी व नाडगीर परगणा गलगली यांस पत्र.

श्री सुबराज

मा। अनाम देशमुख व देशकुलकर्णी व नाडगीर[१] पा। गलगले यांसि हिंदुराऊ घोरपडे ममलकतमदार सुहुरसन सलास सलासीन मया अलफ. पा। मजकूर राजेश्री नागसावंत भोसले सरदेसाई कुडाळ यास जमावाच्या बेगमीस मोकासा करार करून दिल्हे आसे. तरी तुम्ही मानिलेकडे मोकसा बाबेचा यैवज देत जाणे[२].

चौकोनी सिका

जाणिजे. छ ३ शौवाल. लेखन मर्यादा

---

१ नाडगीर : महाराष्ट्रांतील देशपांड्यासारखा कर्नाटकांतील एक वसूल अधिकारी.

२ अशाच प्रकारे का। कले, का। बोरगांव, पा। जमखंडी, तपे असडोली, का। अरळे, का। तारळे, क। रांगणे व प्रांत गोकाक येथील मोकासे हिंदुराव घोरपडे यानी नागसावंत भोसले याना दिल्याची दि. ९-३-१७३३ ची पत्रे उपलब्ध आहेत.

क्रमांक : ११५ दि. २–४–१७३३

मौजे वेलफळे येथील सरकारी जमिनीत म्हावसीचे मोकदम पाटणकराचे आश्रयाने शेते करतात असे कानी आल्यावरून त्याना तसें न करण्याची श्रीनिवास परशराम प्रतिनिधि यांची ताकीद.

श्री

श्री
श्री आई आदि पुरु-
ष श्री राजा शाहू छत्रप
ति स्वामि कृष्णनिधि त
त्स्य श्रीनिवास परशु
राम प्रतिनिधि

आज्ञापत्र राजश्री पंत प्रतिनिधी ता। मोकद + + मौजे म्हावसी ता। पाटण सुमा सलास सलासीन मया व आलफ. मौजे इलफुलेचे जमीन तुम्ही दर + + तुम्ही कीर्द करून पाटणकराचे आश्रा करून खाता म्हणून कलो आले. तरी पूर्वी रवा दि (व्य) होऊन निर्वाह जाला असता तुम्हास दरम्यान सेते वलफिलेचे जमिनीत करावयाचे प्रयोजन नाही. जमीन हुजरुन अमानत केली असे. पेस्तर इनसाफामुले निर्वाह होईल. तरी तुम्ही कीर्द न करणे.

जाणिजे. छ २७ सवाल (?) निदेश समक्ष.

राजते
लेखना
वधीं

क्रमांक : ११६ दि. १२–६–१७३३

रुद्राजी आदिम हा स्वामी कार्यावर खर्च झाला. त्याच्या मुलास तीन बिघे 'जान परवेसी' जमीन् इमान दिली आहे म्हणून दिवाणकोट कोल्हापूर याचे मोकदम मौजे बावडे यास पत्र.

आज दिवाण कोट कोल्हापूर ताहा मोकदमानी मौजे बावडे कसबे हवेली सु॥ सन अर्बा सिलासैन मया अलफ. मौजे मजकुरी जाफेजी (जाखोजी ?) बिन रुद्रोजी आदिम यास [1]जानपरवेसी चालविणे जरूर. सबब रुद्राजी आदिम हा स्वामी कार्यावरी चीज जाहला. त्याच्या मुलाचे योगक्षेम चालावायाबद्दल नूतन इनाम मौजे मजकुरी पडी जमीन पैकी भातरोपे जमीन तिन बिघे मुलास जान परवेसीस दिली असे. जमीन नेमून चतु:सीसा करून देणे. साल दरसाल ताजे सनदेचा उजूर न करिणे.

जाणिजे. छ १० मोहरम.

---

क्रमांक : ११७ दि. २८-७-१७३३

तळबीडकर मोहिते व पाटणकर हे मौजे वेलफळे येथील सरकारी जमिनीत आक्रमण करतात असे आढळून आल्यावरून, तसे करू नये म्हणून श्रीनिवास परशुराम प्रतिनिधि यांनी नागोजीराव पाटणकर यांस ताकीद.

श्री

राजश्री नागोजीराव

पाटणकर गोसावी यास

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्ने॥ श्रीनिवास परशराम (प्रति) निधि आसीर्वाद. सु॥ सलास सलासी (न) मया व आलफ. मौजे वेलफले कर्यात तलबीड गावीची जमीन म्हावसीकरानी + + + + दरम्याने कथाला सिवेचा करून कीर्दी करितात. येसियास त्याचा रवा (?) निर्वाह होऊन गेला असता ब + + + म्हावसीकर कीर्दी करून उसूल देत नाहीत हे गोस्टी उत्तम नाही. हाली ते जमीन आमानत केली असे. कीर्दी जाली असेल त्या + वसूल ताकीद करून हुजुर देव + + पुढे त्यास कीर्दी करावयास गरज (? कार्य)

---

[1] जान परवेसी = जान + परदेसी ( परवरीस ) = जीव सांभाळण्यासाठी, योगक्षेमासाठी.

दूसरी गोस्टी वेलफाले पेशजी इद(ल्शा)हीचे वेलेस घोरपडे यानी सेरीं + + + होती ते तुम्ही आपणास दिल्हे (म्हणता). मोहिते आपणास दिल्ही म्हणतात. येसियास घोरपडे गेले. दिवाणाची (ज)मीन दिवाणात राहिली. त्याची क + + + स कथला करिता तरी दिवाणाची सन(द) पत्र नसता तुम्हास आथवा मोहिते यास कथला करावयास प्रयोजन ना(ही). हाली ते सेरी दिवाणात अमानत क(ली) असे. तीस कौल देऊन कीर्दी करविली आहे. तुम्हास कथाला करावयास प्रयोजन नाही. नसते कथले करीत नच जाणे. फ़िरोन ब्रो (भाट) येऊ न देणे. छ २७ सफर.

श्री<br>श्री आई आदि पुरु<br>ष श्री राजा शाहू छत्रप<br>ती स्वामि कृपानिधि त<br>स्य श्रीनिवास परश<br>राम प्रतिनिधि

राजते<br>लेखना<br>वधी

---

**क्रमांक : ११८** **दि. २२–१०–१७३३**

छत्रपती संभाजी दुसरे यानी श्रीमहालक्ष्मीच्या पूजेची दोन आठवड्यांची वृत्ती बाबाभट व गोपाळभट या दोघांना दिली.

श्री

महालक्ष्मी

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६० प्रमादी नाम संवछरे आश्वीन बहुल येकादसी इंदुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा संभु छत्रपती स्वामी याणी वेदमूर्ती राजश्री बाबाभट बिन मुकुंदभट व गोपाळभट बिन बाबदेभट मुनीश्वर पूजारी श्री वास्तव्य करवीर यासी आज्ञा केली यैसीजे. तुम्हास व शामभट मुनीश्वर यास वृत्तीविशयी कथला लागला

होता. याकरितां तुम्हां उभयेता बराबरी हुजरे देऊन प्रतिष्ठानास पाठविले. तेथे निवाडा होऊन शामभट वेव्हार सांगत होते ते खोटे जाले. श्रीची पूजा दोन आठवडे तुम्ही उभयेतानी करावी (व) येक आठवडा शामभट यांचा या प्रमाणे निवडिले. तेणे प्रमाणें प्रतिष्ठानचे पत्र घेऊन तुम्ही आलेस त्याप्रमाणें स्वामीनी पत्रें करून दिल्ही. तदनरूप तुम्ही श्रीची पूजा करीत आसतां मध्ये पूजा सांग चालत नव्हती म्हणून विदित जाले. त्यावरून तुमचे दोन आठवडे अमानत केले होते. प्रस्तुत श्रीची पूजा सांग करून उंच वस्त्र भूषण येईल ते श्रीस योग्य करूं म्हणून तुम्ही विनंती केली. त्यावरून स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन तुपचे दोन आठवडे पूजा वृत्ती तुमचे दुमाला केली असे. तुम्ही आपलें दों आठवड्यांत श्री ची सांग पूजा करून उंच वस्त्र भूषण श्रीस योग्य करीत जाणे. आणी दोन आठवडे पूजावृत्ती तुमची तुम्ही पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें आनभवून सुखरूप राहणे. श्रीकडील इनाम गांव मौजे कुरडू हवेली कोल्हापूर तुमचे दुमाला आहे. तेथील उत्पन्न श्रीचे पूजा उत्साहास व्यय करणे.[1] निर्देश समक्ष.

मोर्तब असे

सुरु सुद्र बार बार — रुजु संमत मंत्री

---

**क्रमांक : ११९** **दि. ४–१२–१७३३**

नारो विठ्ठल प्रभु 'नामजाद खासगी हुजरात', त्रिंबकराव भानजी, सुंदर केशव व त्रिंबक बालारा(म) यानी रायापा माने याजपासून दोन हजार रुपये दर महा दर शेकडा रुपये पांच व्याजाप्रमाणे कर्ज घेतले.

श्री राम प्रा
श्री
श्री राजा रा
चरणी तत्पर
नारो विठल
प्रभु निरंतर

---

१ या नकलेची असल श्रीपाद रामचंद्र मुनीश्वर श्रीपूजक वास्तव्य करवीर याजकडे असे.

शके १६५५ प्रमाथीनाम सवछरे माहे मार्गेश्वर सुद ९ नवमी मंगलवार ते दिनी खत लिखते धनको नाम राजेश्री रायापा माने यासी रिणको नाम नारो विठल प्रभु नामजाद खासगी हुजरात व त्रिबकराऊ भानजी व सुंधर केशव व त्रिबकजी बालारा(म) लिहून दिधले जे आत्मकार्य समंधे तुम्हापासोन घेतले मुदल आंके रु।। २००१ दोन हजार. यास व्याज दर माहे दर सदे रु।। ५ पंचोत्रा प्रमाणे सव्याज बि।। हिसाब प्रविष्ट करून हे खत लिहिले. सही. बि।। त्रिबकराऊ भानजी यास मुदत आखेर साल पावेतो करुन हे लिहिले. सही छ ७ माहे रजब सु।। आर्बा सलासीन मया आलफ. हे खत लिहिले. सही. मोर्तब सुद.

गाही

माहादापा सेटे वस्ती
मायेणी
निंबसड
१

जोती श्रीनिवास
कुलकर्णी मौजे
ओझरडे प्रा। पो
१

आनराली गंगाधर मुसे
कुलकर्णी मौजे खरसी
प्रा। कुडाळ
खागीर गोसावी

---

**क्रमांक : १२०** इ. स. १७३३

जमाले व साळवी यांच्यामध्ये कसबा तळबीडच्या पाटीलकीबाबत भांडण लागून साळवी मौजे मुढे येथे पळून गेले होते. त्याना आणण्यासाठी फतेसिंग भोसले यानी शिपायी पाठविले व त्यांना अटकाव करू नये म्हणून राजश्री जीवनराव शंकर, सुभेदार व कारकून प्रांत इंदापूर यास हे पत्र पाठविले.

श्री

राजश्री जीवनराव शंकर
सुभेदार व कारकून प्रांत
इंदापूर गोसावी यांस

तिकडे जाणे जाहले नाही. तेथील यैवज आला नाही. त्याचे मुबदला राजश्री नारो खंडेराऊ विनंती करतील त्याप्रा॥ द्यावया स्वामी समर्थ आहेत.

सेनापतीचे फौज म्हणजे धणि-याचे उजवा हात. सेवकास येक बाजूने स्वामी कार्याची आज्ञा करावी स्वामीचे पुण्यप्रतापे सेवा करून मजुरा करून घेऊ हे उमेद सेवकाची आहे. शेवेसी श्रुत होय. चौथाई सरंजामाचे हुजुर द्यावी. त्यास फौजेस सरंजाम नाही. चौथा-ईचा यैवज द्यावया स्वामी समर्थ आहेत. शेवेसी श्रुत होय.

शेवक येकनिष्ठ. स्वामीनी दाली[1] बांधोन हे शेवा सांगितली त्यासारिखे प्रोख्त फौज करून स्वामीकार्यविसी स्वामी आज्ञा करितील त्याप्रमाणे सेवा करून मजुरा करून घ्यावा येस उमेद सेवक धरीत आहे. येविसी राजश्री बाबुराउ व राजश्री सोनजी नाईक तांबट यास सांगितले आहे व राजश्री नारो खंडेराउ शेवेसी विनंती करतील. शेवेसी श्रु॥ होय. पा॥ मुदगल सरकारचे माहालची सेवकास दिल्हे आहेत म्हणून आज्ञा पत्र सादर करावया स्वामी समर्थ आहेत. शेवेसी श्रुत होय.

वारल तर्फचे खेडीयाचा बोभाट हुजुर येतो. त्यास स्वामी कृपालु होऊन सरदेशमुखी दिल्ही आहे. त्यास मुकासी आकाराप्रमाणे सरदेशमुखी देत नाहीत. यामुळे रोखे होतात आणि ते बोभाट मात्र करितात. त्यास ताकीद करून सरदेशमुखी गावीचे आकाराप्रमाणे सुरळीत कमाविसदारास उसूल देत आसे करावया स्वामी समर्थ आहेत. शेवेसी श्रुत होय.

निशाणास हती हुदा सांगितले ते समई दिल्हा. यास व्येथा होऊन निधन पावला. ऐसीयास हुदा धणीयाचे. निशाण हती धणीयाचा. उतम हाती निशाणास द्यावया स्वामी समर्थ आहेत.

सरदेशमुखी पनाळा व मामले मिरज देशमुखी व सरदेशमुखी सेवकास दिल्ही आहे. त्यास मिरज प्रांत कृष्णापैलीकडे गेला. उरला गाव पताल सुभा व जुजवी मिरज तर्फ गाव गडकिलेचे. त्यास त्याचे

१ दाल = चामड्याचा कमरपट्टा.

यादी पाठविली आहे. जैसे कित्तूर चवदा कर्याती महाल तैसे पो मजकूर अठरा कर्याती महाल आहे. त्यास स्वामी कृपाळु होऊन याही करार करून द्यावया स्वामी समर्थ आहेत. मनोलीचे मुकामी गाव दिल्हे त्या पो गावीचे घालेमली जाहली आहे. त्याचे मुबदला गाऊ द्यावया स्वामी समर्थ आहेत.

१ इंचनहाल.

१ मुतनहाल.

१ बेले.

राज्यातील सरकार सरंजाम आहे तो वाटून द्यावा हा करार दोन वरसे जाहला. तो सिधीस पावला नाही. तो सिधीस पावावया करणार साहेब धणी आहेत.

कर्याती तूल येथील देसमुख्याचा आमचा कजिया वाढला होता. तो याणी निवारून समजाविसी केली होती. पुन्हा कजिया आरंभिला आहे. ये विशई नारो खंडेराऊ विनती करतील.

विचारे यैवज घ्यावा लागतो. त्यामुळे सेवेलास काही पावत नाही. वरकड आवघे वतनदार यास गाव इनाम व सेत इनाम दिल्हे आहेत. सेवकास नाहीत. यामुळे खासगत उपजीविका नाही. येसीयास स्वामी कृपालु होऊन गावगना इनाम व इनाम गाऊ करून द्यावया स्वामी समर्थ आहेत.

मनोलीचे मुकामास सरंजाम दिल्हा आहे त्याप्रमाणे माहालास व गावास ताजे आज्ञापत्र सादर करावया स्वामी समर्थ आहेत. शाहू राजाचे खंडणीमध्ये फौजेचे हवेले घेतले होते. ते वसूल होता बाकी राहिली. देहास (त्यास) त्या यंदा आमचे कर्जदारानी गवगवा केला आहे. तो म्हालासी वसूल द्यावयासी आज्ञा दिल्ही पाहिजे.

येणेप्रमाणे शेवेसी विनती पत्र लिहून पाठविली आहे. त्याप्रमाणे पारपत्य करावया स्वामी समर्थ आहेत. शेवेसी श्रुत होय. आर्धा सिका सेनापती याचा आहे.

**क्रमांक : १३०** दि. १२-२-१७३५

वादी आपाजी आणाजी रोखा, धर्माधिकारी सोनार व प्रतिवादी मल्हारी मेतपा व रामजी संकराजी रोखा, सोनार यांच्यामध्ये सोनार व पांचाळ यांच्या धर्माधिकारपणाच्या वतनाबद्दल तंटा उदभवला असतां वादीने तो छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडे नेला.त्यानी कसबा कोल्हापूरचे मामलेदार व वतनदार यांच्याकडे तो सोपविला असतां वतन दोघांचे असे सर्वांनुमते ठरले. त्यावर छत्रपती संभाजी दुसरे यानी निवाडा दिला की सदर्हू वतन दोघानी निम्मे निम्मे भोगावे.

श्री

सिका

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६१ आनंदनाम संवत्सरे फाल्गुन शु।। १ प्रतिपदा सोमवासरे क्षेत्रिय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी आपाजी बिन आणाजी रोखा धर्माधिकारी सोनार क।। कोल्हापूर यासी दिल्हे वतनपत्र यैसीजे. तुवा

सिका सिका

हुजुर येऊन विनंती केली की सोनार व पंचाल्याचे धर्माधिकारीपणाचे वतन आपले पुरातन आहे. त्यास मल्हारी बिन मेतपा व रामाजी बिन संकराजी रोखा सोनार हे कजिया करीत आहेत. तरी स्वामीने आपले वतनाचा प्रसंग सुरळीत करून दिल्हा पाविजे म्हणोन. त्यावरून मल्हारी बिन मेतपा व रामाजी बिन संकराजी यासी हुजूर आणून हर दो जणाचा करीना मनास आणोन याची मनससुधी करून निवाडा करावयाविसी क।। कोल्हापूरचे मामलेदार व क।। मजकूरचे वतनदार यासी स्वामीने आज्ञा केली. त्यावरून क।। मारचे मामलेदार व क।। मारचे वतनदार व दैव माहाजार दैव सोनार बसून पंचाइतानी तुम्ही हर दो जणाचा पूर्ववंत भोगवटा पुसता तुमचे मूळ येक अवघे भाऊबंद खरे असे सर्वांचे मते होऊन तुमची समजावीश केली की पाो कोल्हापूर प्राां कराड व प्राां पनाळा व मामले मिरज पाो हुकेरी व पाा रायबाग व पाा कागल पाो माहालानी येथील धर्माधिकारी सोनार व पंचाल या वृती समंधेने उत्पन्न होईल ते आपाजी बिन आणाजी रोखा व त्याचे भाऊबंद निमे व

मल्हारी बिन मेतपा व रामाजी बिन संकराजी व त्याचे भाऊबंद निमे या प्रमाणें निवाडा केला. त्यास येक वर्ष व आपाजी बिन आणाजी याचे येक वर्षी करावी व मल्हारी व रामाजी याणी येक वर्षी करावी. वर्सीली समंधे काळंमाची पूजा व मुंजी व लग्न व गोंधळ व श्राध्ध व पक्ष नवरात्र हारवा लावण कार्य प्रयोजन सणवार जे काय पूर्वापार आसेल ते ज्याचे वर्षीलीत येईल ते त्याणी घ्यावे आणि उभेताचे वर्षीलित आहार व्यवहार प्रायश्चित गोतपंता येईल त्यामुळे जे उत्पन्न होईल ते हर दो जणानी निमें निमे प्रा॥ वाटून घ्यावे आणि प्रायश्चित काय कर्णे ते करवीर क्षेत्री करावे. आनयत्र स्थली न करावे. क्षेत्राविर हरदोजणानी केले तर दिवाणचे गुन्हेगार व गोताचे अन्याई या प्रा॥ हरदोजणाची समजाविश करून या प्रमाणे हरदुजणानी अनभऊन सुखरुप आसावे. वडिल धाकटेपण पेशजीचे कागदपत्र हरदुजणाजवळी आसिले तर ते दिवाणात आणून दाखवावे. दिवाणचे आज्ञेप्रा॥ वडिल धाकटेपण हरदोजणानी वर्तावे. पूर्वील कागदपत्र कोणाजवळ नसतील तर सदरहू वरषिलिचा निवाडा जाला आहे या प्रा॥ वर्तावे शुध्यपत्र देणे जालिया ज्याचे वर्षीलितील त्याणी द्यावे. सदरहू निवाडा केला आहे. यासी कोणी लवादिगर करील तर दिवाणचा गुन्हेगार. असा निवाडा करून क॥ मारत्ने थलपत्र करून देऊन सर्वानी स्वामी जवळ येऊन विनंती केली व निवाडयाचे थलपत्र आणोन दाखविले. त्यावरून स्वामीनी मनास आणोन सोनार व पंचाल याचे धर्माधिकारीपण तुजे व मल्हारी बिन व रामाजी याचे तुम्ही हरदुजणानी गोताने व पंचाइताने समजाविश तुम्हा हरदोजणाची केली आहे त्याप्रमाणे आपलाली वर्षील चालऊन जे वर्षीलित उत्पन्न होईल जे ज्याचे त्याणी घ्यावे. आहार व्यवहार प्रायश्चित गोतपंत जाली तर तुम्ही हर दुजणानी जे उत्पन्न होईल ते निमे प्रा॥ घेऊन कोणासी परस्परे केल्हाल करिता धर्माधिकारीपणाचे वतन पूर्वापार चालत आहे त्या अलिकडे नवे काही वतन मिळवणे. त्याणे आनभऊन कथला आण आपल्यात न करिता राहावे. असी स्वामीने आज्ञा केली आसे. तरी तुवा मल्हारी बिन मेतपा व रामाजी बिन संकराजी रोखा आसे हरदुजण धर्माधिकारपणाचे वतन आपल्या पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन सुखरूप राहाणे. या वतना

समंधे तुमचे माथा शेरणी रु. १०० येकशेहे करार केले असे. तयाचा निमा जमा भांडारग्रह व नीमे का। कोलापूर या प्रा॰ जाला आहे. तरी तूं धर्माधिकारीपणाचे वतन आनभऊन सुखरूप राहाणे.

निदेश समक्ष. मोर्तब.

रुजु संमत

मंत्री

तेरीख २९ रमजान सु॥ सलास.

सलासीन मया आलफ.

बार सुरु सुद्र बार.

---

**क्रमांक : १३१** **दि. १८–५–१७३५**

शामजी नरसी (नरसिंह) देशपांडे यांचे मौजे उतरेचे कुलकर्ण अमानत केले होते; ते त्यांस हवाली केल्याचे छत्रपती संभाजी दुसरे मोकदम उतरे यास आज्ञापत्र.

स्वस्ति श्री राज्यभीषेक शके ६१ राक्षस नाम संवत्सरे जेष्ट शूध आष्टमी रवीवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी मुकदमानी मौजे उतरे ता॥ ठाणे यांस आज्ञा केली येसीजे राजश्री शामजी नरसी देशपांडे प्रांत पनाला याचे मौजे मजकूरचे कुलकर्ण ते पेसजी आमानत केले होते. हाली याचे याकडे करार करून तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी तुम्ही हें जाणून मौजे मजकूरी शामजी नरसिंह याचे कुलकर्णाचा हक ईनाम बाजे बाब पूर्वापर चालत आल्या प्रमाणे सुरलीत चालवीत जाणे. खलेल या उपरी कांही न करणे. जाणीजे. निदेश समक्ष.

---

**क्रमांक : १३२** **दि. १८–५–१७३५**

निजामउल्मुलुकचा बारवलानजीक मुक्काम पडला असता कृष्णाप्पा नाईक स्वामीसेवेवर हजर झाला म्हणून त्यास मातुश्री गुणाबाई व सुभराव शिंदे यानी मानपान व जमीन इनाम दिली.

श्री

सिका

म॥ अनाम कृष्णपा तिमी नाो कसबे बनूर यासी मातुश्री गुणाबाई व सुबराऊ शिंदे साो सुभा सु॥ सीत सलासीन मया आलफ. नबाब निज्यामनमुलुख या प्रांतास येऊन बारवला नजिक मोकाम केला असता तुम्ही हुजुर येऊन साहेब कामावर रुजु जाला. या करिता तुम्हावरी मेहेरबान होऊन तुम्हास आप्तागिरी मान्य माचर[1] खालसा जमीन पैकी मणभर बीज काो माारचे मापे येक मण सामादे मौजे बीज कोपात पड रान घालोन दिल्हे आहे. रामापा ह्यास सनद सार आहे. अनभव करून साहेब कामावर दुरुस्त असणे. जाणिजे.

शिका

र॥ छ ६ मोहरम माो सुद्र लेखन सीमेचे म॥ असे.

---

**क्रमांक : १३३** **दि. १२–६–१७३५**

शिवाजी घोरपडे अमीरुल् उमराव यांजकडून आजरे. ठाणे घेण्याबाबत नारायण व्यंकटेश यांस हुकूम झाला, त्याप्रसंगी झालेल्या कराराचा हा कागद आहे. तो बहुदा राणोजी घोरपडे यांच्या आज्ञेनुसार झाला असावा.

तालीक

करारनामा चिरंजीव सिवाजी घोरपडे आमीरुलुमराव याजकडोन आजरे ठाणे सुधा घेवणेविसी राजश्री नारायणराव व्यंकटेश यासि आज्ञा होऊन करार जाहला येसीजे. सु॥ सीत सलासीन मया व अलफ.

य॥ देहे ९६

ठाणे नि॥ सिबंदी वगैरे खर्च देहाय ३२

खासगीकडे ठेवावे देहाय ३२ घासदाणा व सरदेशमुखीचा

---

१ माचर (माचेल ?) = मेणा, पालखी.

| | |
|---|---|
| मशारनिलेस सरंजामास देहाय ३२ | यैवज पेशजी वहिवाटीप्रमाणे हुजुर यावा. |
| पा। वजा देहाय ५ बाकी देहाय २७ | ठाणेचे खर्चाकडे वगैरे देहाय ३२ नेमून दिल्हे. याची वहिवाट आमचे कारकुनाचे नि।। व्हावी. |

येणेप्रमाणे करार ठरला. त्याप्रमाणे वहिवाट व्हावी. यात कोणी आंतर करील त्यास कुलस्वामीची शफत आसे.

जाणिजे. छ १ माहे सफर मोर्तब आसे.

---

कासीब काले मौजे सिंदवाड.

विसाजी नारायण सित सलासीन मया व आलफ.

---

**क्रमांक : १३४** **दि. १४–६–१७३५**

गोदी नावाची बाई कोकणात बदकर्म करून तारळे प्रांतीं येऊन राहिली होती. तिची चौकशी होऊन छत्रपती संभाजी दुसरे यानी तिला बटीक म्हणून द्वारकोजी यादव यांस दिली.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६२ राक्षसनाम संवत्सरे आशाढ शुध पंचमी मंदवासरे क्षत्रीये कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री द्वारकोजी यादव नाईक दि।। दरुनीबंक[१] यासीं दिलें

| श्रीराजा | श्री आई आ |
|---|---|
| शंभु छत्रप | दि पुरुष श्री राजा |
| ति हर्षनिधान | शंभु छत्रपती स्वामि |
| त्रिंबक सुत नि | कृपानिधि ।। तस्य प |
| ळकंठराव मु | रशुराम त्र्यंबक |
| ख्य प्रधान | प्रतिनिधि |

पत्र ऐसेजे. बाजारा गोदी बाइको कोकणातून बदअमल करून तारळे प्रांते राहिली होती. तिला हुजुर आणून बाजपूस करितां तिजकडे कर्म लाजीम[2] जालें. याकरितां तिला हुजुर कोटीस जमा करून तुम्हास बदल मुशाहिरा दिली असे. तरी तुम्ही बटीक आपले घरी मागऊन तिचे हातून सेवा घेत जाणें. इची किंमत सिरस्ताप्रा तुमचे वतनांत खर्च पडेल.[3] जाणिजे. निदेश समक्ष.

मर्यादेयं
विराजते

तेरीख ३

सपूर सु।। सिल सलासीम बार सुरु सुद्रवार.

---

**क्रमांक : १३५** **दि. १७–६–१७३५**

महमद खान याच्या शेताचा वसूल व नगारा वाजविणाऱ्याचा मुशाहिरा याबाबत सुभानजी चव्हाण यास आज्ञापत्र.

श्री

त।। सुभानजी चवाण क।। तलबीड सुमा सीत सालासीन मया अलफ. महमद खान याचे इनामाचे सेत तुवा केले आहे. त्याची इनाम तिजाईचा वसूल येणे. त्यास वसूल काय दिला तो काही कलत नाही.

---

१ नीबंक = अंतपुराची चौकी; २ लाजिम = सिद्ध.

३ दि. १६–६–१७३५ या दिवशी रखमी या नावाची वाकडा पाय पडलेली स्त्री द्वारकोजी यादव याना बटीक म्हणून दिल्याचे राणी जिजाबाई यांचे पत्र उपलब्ध आहे.

बाकी राहिली आहे. हाली सदरहूचे येवजी ब।। देणे. नगारची[1] हूजरात दिमत राजश्री पंत प्र।। रुपये १६ सोला देविले असे. आदा करणे. या साली याचे कबज घेणे. तेणेप्रमाणे मजुरा असे.

जाणिजे. छ ६ माहे सफर.

लेख

नावधी

या कामास फते महमद वहिदा बान नगारची पाठविले. यास रु।। ·।। निमे देणे.

लेख

नावधी

---

**क्रमांक : १३६** दि. १६-७-१७३५

कृष्णाप्पा तिमी नाईक यास क।। बनूरच्या पाटीलकीचे उत्पन्न पूर्ववत्-प्रमाणे दिल्याचे गुणाबाई व सुबराव शिंदे यांचे पत्र.

श्री

मो।। अनाम कृष्णापा तिमी नाईक देसाई क।। बनूर यास मातुश्री गुणाबाई व सुबराव शिंदे साहिब सु।। सित सलासैन

शिका

मया व आलफ. नरसापा तुमचा भाऊबंद यास को मारचे पाटीलकीचे जितरुब तुम्ही सुरनुत चालवीत नव्हता या करिता नरसाणा हुजूर येऊन फि।। केली. तेव्हा पाटीलकीचे जितरुब सरकारात अमानत केले. ते सोडून द्यावे म्हणोन राजश्री देवापास हुजुर पाठविले. त्याणे अर्ज केला तो खातरेस आणोन को मार चे पाटीलकीचे जितरुब अवघे सोडून तुमचे दुबाला पूर्ववत् प्रा। केले असे. तरी आपल्या भावाबंदास सन्मत करून घेऊन पूर्ववत

---

१ नगारची = नगारा वाजविणारा.

प्रा पाटीलकीचें जितराब अनभव करुन सुखी असणे. कडेराचा म्हसूल सेरकारात घेतला आहे. कोलबाब वगैरे तुमचे तुम्हास दिल्हा आहे. येविसी राजश्री मादणास सनद सादर आहे. सरकारास शेरणी ११० रु. एकशे दाहा मोकरार केले आहे. ते वसूल देणे. जाणिजे.

र॥ छ ६ माहे रबिलावल सुद्र मोर्तब असे.

---

**क्रमांक : १३७** **दि. ९–८–१७३५**

*राणोजी चव्हाण आवटे व गंगाजी चव्हाण आवटे यांच्यामध्ये घर–वाटणीवरून भाऊबंदकी लागली असता, ती अखेर देवस्थान पंचायत मौजे सिरवडे येथे गेली. राणोजी चव्हाण आवटे याने तत्संबंधी लिहून दिलेला हा कागद आहे.*

श्री

राजश्री देव थल पचाईत मोकदमानी मौजे सिरवडे गोसावी यास बा॥ दो राणोजी बिन चंदाजी चव्हाण आवटे का॥ तलबीड प्रात पनाला सु॥ सीत सलासीन मया व आलफ. कारणे लिहून दिल्हा कागद येसाजे. आमचा व येसाजी बिन गंगाजी चवाण आवटे याचा भाऊपणियाचा घर वाटणीचा कजिया लागला. या करिता उभयेता तुम्हापासी भांडत आलो. त्याजवरून पंचनाइकी आज्ञा केली की तुमची वाटणी जाली की नाही. येसियासी आम्हा उभयताची घर वाटणी काही जाली नाही हे आपण खरे करून देऊ. दाखल्या मोकादल्यानिसी घर वाटणी जाली येसे जाले तरी आपण वाद सागतो तो खोटा. तुम्ही देव सागाल त्या प्र॥ ऐकू. न यैकू तरी दिवाणचे गुनगार व गोतांचे आन्याई. हा कागद लिहून दिल्हा.

सही. छ १ माहे राखर.

---

**क्रमांक : १३८** **दि. ३–९–१७३५**

छत्रपती संभाजी दुसरे यानी हरीहराचार्य पंडीतराव याना दिलेले मौजे मोघर्डे गावचे इनामपत्र. यात त्यांचे पिते श्रीकराचार्य यानी राजदरबारी शास्त्रचर्चेसाठी आलेल्या पंडितांच्या समस्याना उत्तरे दिल्याचा निर्देश आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ६२ राक्षस नाम संवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदशी सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजेश्री हारीहाराचार्य पंडीतराव गोत्र काश्यप सूत्र आश्वलायन यासी दील्हे इनामपत्र ऐसेजे. तुमचे पिते राजश्री श्रीकराचार्य पंडीतराऊ याणी तीर्थरुप राजश्री कैलासवासी स्वामी संनीध राहोन बहूत श्रम केले. वेदशास्त्रसंपन्न कोणेक प्रसंग दरबारी शास्त्राचा पडिला तो याणि विद्यायोगे संपादिला. जे जे पंडीत आले त्याची समशा पुरविली. स्वामी वेगळे त्रिकर्ण शुद्धीने चिताल न आणीता आजिवरी स्वामीसंनीध होते. सांप्रत नीधन पावले. त्याचे पुत्र तुम्ही विद्यावंत. तुमचे सर्वप्रकारे चालवणे हे स्वामीस परमावश्यक. या करिता पेशजी श्रीकराचार्ये यासी इनाम गांव दिल्हे होते ते तहामुळे वारणे पलीकडे गेले. यास्तव हाली तुम्हास नूतन इनाम (करून दिले, इत्यादी)

तेरीख २६ रबिलाखर सु॥ सीत सलासीन.

---

**क्रमांक : १३९** **दि. ६–१०–१७३५**

रामचंद्र नाईक पुंडे यांस छत्रपती संभाजी दुसरे यांजकडून मौजे मरळी हा गाव इनाम. त्यांचे वडील शामजी नाईक पुंडे यानी 'थोरले कैलासवासी माहाराजांची सेवा राज्याभिवृधी विषई विशेष केली. त्या उपरी तीर्थरूप राजश्री कैलासवासी यांची सेवा चंजी प्रांते असता यकरुप निष्टेने केली' असा उल्लेख या सनदेत आहे.

श्री
श्री
प्रतिपच्चंद्र रेखे
व वर्धिष्णुर्विश्व वं
दिता शंभु छत्रप
तर्मुद्रा रामसूनो
र्विराजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६२ राक्षसनाम संवछरे कार्तिक शुध्र प्रतिपदा रविवासरे[१] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री रामचंद्र नाईक पुंडे गोत्र जामदग्न्य सूत्र आश्वलायन यासी दिल्हे इनामपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन धुरंधर सेवक तुमचे पिते राजश्री शामजी नाईक पुंडे याणी थोरले कैलासवासी माहाराजांची सेवा राज्यभिवृधी विषई विशेष केली. त्या उपरी तीर्थरूप राजश्री कैलासवासी यांची सेवा चंजी प्रांतें असतां यकरूप निष्ठेने केली श्रमसाहास असाधारण करून नाम्ना करून घेतली. हाली तुम्ही स्वामीची सेवा त्रिकर्ण शुधीने करिता. स्वामी विना दुसरे (दैवत) जाणत नाही. याकरिता तुमचे चालवणे स्वामीस परम अवश्यक. या करिता हाली स्वामीने तुम्हास नूतन इनाम कुलबाब कुलकानू साहोतरा व पंचोतरा येकमणी व इनाम तिजाई व चौथाई दिवाणात वसूल घ्यावयाचा तह आहे. तो देखील खेरीज हकदार व इनामदार करून मौजे मरळी त।। कल्हे सुभा पनाळा हा गाव देह १ येक रास इनाम अजरामऱ्हामत करून दिला असे. तरी तुम्ही मौजे मजकूर पूर्व मर्यादेप्रमाणे चतु:सीमा आपले स्वाधीन करून घेणे आणि इनाम तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन सुखरूप राहाणे. मौजे मजकुरावरी हुजरून सेरीकराब यास जमीन बिघे ८२ दोन बिघे

| | |
|---|---|
| श्रीराजा | श्री आई आ |
| शंभूछत्रप | दि पुरुष श्री राजा |
| ति हर्षनिधीन | शिवछत्रपती स्वामी |
| त्रिंबक सुत नि | कृपानिधि तस्य प |
| ळकंठराव मु | रशुराम त्र्यंबक |
| ख्य प्रधान | प्रतिनिधि |

---

१ जंत्रीत सोमवार पडतो.

ठेविली होती ती देखील इनाम दिली असे. तरी तुम्ही सदरहू मौजे मजकूर वंशपरंपरेने अनभवणे निदेश समक्ष[1].

मर्यादेयं
विराजते

पाठीमागे
तारीख २८
जमादिलावल सु।। सित
सलासीन मया अलफ.

---

**क्रमांक : १४०** **दि. १८–१०–१७३५**

रायाजी विरोजी माने व हेगोजी विरोजी माने या दोघा भावामध्ये तर्फ वाळवा येथील देशमुखीची जी विभागणी फत्तेसिंग भोसले यांच्या विद्यमाने झाली तिचा तपशील.

श्री

याद वाटणी देशमुखी ता। वाळव सु।। सित सलासीन मया व आलफ. छ १२ माहे जमादिलाखर.

| रायाजी वलद वीरोजी. माने | हेगोजी वलद वीरोजी माने |
|---|---|
| १ कसबा वाळव | १ मौजे उरुण |
| १ मौजे सिरगाव | १ मौजे काकेरो |
| १ मौजे कुंडल | १ मौजे येडे |
| १ मौजे पुणद | १ मौजे येलूर |
| १ मौजे बांदे | १ मौजे देवारर्डे |
| १ मौजे कणेगाव | १ मौजे नागाव |
| १ मौजे गोटखंडी | |
| ७ | |

---

१. अक्षरे वेगळी.

१ मौजे पलुस
दरोबस्त इनाम
—
८

१ मौजे नागठाण
१ मौजे खेड
—
८

१ मौजे बाहादुर
वाडी दरोबस्त
इनाम.
—
९

सदरहू दरबारी राजेश्री फत्तेसिंग भोसले याचे विदमान निवाडा जाहला छ मार.

---

क्रमांक : १४१ दि. २४-१०-१७३५

शामजी नाईक पुंडे यास मौजे मरळी हा गाव इनाम दिला आहे. तरी त्यांचे हे इनाम चालवावे म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा याना पत्र.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६२ राक्षसनाम संवत्सरे कार्तिक बहुल चतुर्थी भृगुवासरे क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा यास आज्ञा केली यैसीजे. मौजे मरळी ताा कल्हे व मौजे मांजनाळ ताा बोरगाव हे दोन्ही गाव राजश्री रामचंद्र नाईक पुंडे मंत्री यासी चौथाई व पंचोत्रा व यकमणी व साहोत्रा इनाम तिजाई व सेरी देखील कुलबाब कुलकानू माफ करून दरोबस्त इनाम दिल्हे असेत. नाईक म।।रनिले याचे सर्वप्रकारे चालवणे हे स्वामीस अवश्यक आहे. तरी तुम्ही मौजे मजकुरास इनाम तिजाई आदिकरून कोण्हेविसी उपसर्ग न देणे आणि दोन्ही गाव नाईक म।।रनिले याकडे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम सुरळीत चालवणे.

प्रतिवर्षी नवीन पत्राचा अक्षेप न करणे. या पत्राची प्रति लेहून घेऊन असलप्रो परतोन देणे. बहुत लिहिणे तरी तुम्ही सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

---

क्रमांक : १४२ दि. ५-१२-१७३५

रायाजी माने याजकडून कान्होजी भोसले सेनासाहेब यानी बाराशे रुपये कर्जाऊ घेतले होते. व्याजाचा दर दर मांहे दर शेकडा पाच रुपये, असा या पत्रात उल्लेख आहे.

श्री

राजश्री रायाजी माने गोसावी
यासी

स्नेहांकित कान्होजी भोसले सेनासाहेब सु॥ हुर सन सित सलासैन मया आलफ. आम्ही तुम्हापासी कर्ज घेतले मुदल रुपये १२०० बारासे घेतले. यासी व्याज दरमाहे दरसदे रु॥ ५ पांच प्रो मुदल व व्याज जेष्ट शुध प्रतिपदे ग वरून देऊ. आंतर होणार नाही. जाणिजे. छ १ मोहरम शके १६५७ राक्षसनाम संवत्सरे पौष्य शुध (द्विती) या भृगुवासरे[१] लिहिले सही.

लेखन
सीमा

............
... ........
कान्होजी
... . ... ..
............

---

१ हिंदु तारीखेत तिथी व वार जुळतो. ती अधिक ग्राह्य आहे. या दिवशी मुसलमानी तारीख १ साबान, सीत सलासीन मया अलफ अशी येते.

**क्रमांक : १४३** **दि. ५-१२-१७३५**

राजाजी माने (रायाजी माने ?) यांजकडून 'बावासाहेब' (कान्होजी भोसले ?) यानी १२०१ रुपये कर्जाऊ घेतले. त्यावद्दल शिवाजी भोसले जामीन राहिले.

श्री

राजश्री राजाजी माने गोसावी यास

अखंडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नेहांकित सिवाजी भोसले राम राम. सु॥ सीत सलासेन मया अलफ. तुमचे कर्ज सरकारात राजश्री बावासाहेबी घेतले. मुदल रु॥ १२०१ बारासे येक याचा अलाहिदा रोखा लेहून दिल्हा आहे. त्याचा वायेदा जेस्ट सुद प्रतिपदेचा केला. मुदतीस सरकारातून व्याज व

शिका

मुदल तुमचे पावले तर उतम नाहीतर हे रुपये आपण उगऊन देऊन. यास आंतर करनार नाही. रा छ १ माहे शाबान सके १६५७ राक्षसनाम सवतछरे पौश सुंद त्रितिया[1] भृगुवासर हे लिहिले. सही-

मोर्तब

सुद

बी॥ गणेश केशव कारकुन सरकार.

---

**क्रमांक : १४४** **दि. ६-१२-१७३५**

अमात्य व आंग्रे यांच्या कलहाच्या वेळी कृष्णाजीराव राणे उपयोगी पडले म्हणून त्यांना अमात्यांकडून मौजे वाभवे हा गाव इनाम मिळाला.

श्री

सिका

आज दिवाण किले गगनगड त॥ मिरासी व गाउकर मौजे

---

१ शुक्रवारी द्वितिया येते.

वाभवे तर्फ खारापाटण सु।। सन सित सलासीन मया अलफ. रा।। कृष्णाजीराव राणे अरूळेकर याणी अंगऱ्याचा आमचा कलह लागला त्याप्रसंगी बहुत सेवा केली याकरिता मौजे मा।र यास इनाम दिल्हा आहे. ब।। सनद हुजुर तरी तुम्ही याचे रजातलब वर्तोन कीर्द माहामुरी करून सुखरूप राहणे छ. २ शाबान.

---

**क्रमांक : १४५** **दि. १०-१२-१७३५**

सेटीगौडा देसाई पा नूल यास दिलेल्या या वतनपत्रात छत्रपती संभाजी दुसरे यांच्या सामानगड प्रांती झालेल्या स्वारीचा उल्लेख आहे.

स्वस्ति श्री राज्यभिषेक शके ६२ राक्षसनाम संवछरे पौष शुध सप्तमी सौम्यवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी रा सेटीगौडा बिन सिदगौडा देसाई पा नूल यास दिल्हे इनामपत्र येसेजे. स्वामीची स्वारी सामानगड प्रांते जाली ते समई तू निष्टा धरून स्वामीच्या दर्शनास आलेस आणि स्वामी संनीध विनंती केली. माहाराजानी बहूता वतनदाराचे ऊर्जीत केले आहे. आपणही स्वामीच्या पायास निष्टेने वर्तत आहे. तरी आपले ऊर्जीत केले पाहिजे म्हणून (हे नूतन इनाम, इ. इ.)

तेरीख ६
साबान सु।। सीत सलासीन.

---

**क्रमांक : १४६** **दि. २०-१२-१७३५**

कान्होजी भोसले सेनासाहेब सुभा यानी रायाजी माने याजकडून तीन हजार रुपयाना चार घोडे विकत घेतले होते. ही रक्कम आपण दसऱ्यापर्यंत फेडू असे आश्वासन त्यानी या पत्रात दिले आहे.

श्री

राजश्री रायाजी माने गोसावी यासी

अखंडित लक्षुमी आलंकृत राजमान्य स्ने।। कान्होजी भोसले सेनासाहेब सुभा सु।। सित सलासीन मया आलफ. तुम्हापासून खरीदी केले घोडे रास ४ च्यार येकून किमत रुपये ३००० तीन हाजार. हे दसरियास करून देऊ अंतर न पडे. जाणिजे छ १६ शाबान मुदतीस पैके न व।। + + + तिवोत्रा व्याज पुढें देऊन. छ मा।र

पाठीमागे सिका

श्री
शाहू भूपतीव
घस्य येसाजी तनु
जत्मज़ कान्होजी
भोसलस्ये यंभा
ति मुद्राय
शस्करी

---

**क्रमांक : १४७** दि. २०-१२-१७३५

**कान्होजी भोसले यानी रायाजी माने याच्या कडून विकत घेतलेल्या घोड्यांच्या रकमेबाबत संताजी भोसले जामीन राहिल्याचे पत्र.**

श्री

राजश्री. रायाजी माने गोसावी
यास

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने।। संताजी भोसले राम राम. सु।। सित सलासीन मया आलफ. तुम्हापासून + + + राजश्री कान्होजी भोसले सेनासाहेब (सु) भा याणी घोडे रास ४ घेतले. याची किंमत रु।। तीन हाजार दसरियास आपण उगवणी करून देंऊ अंतर न पडे. सदरहू रु।। ३००० तीन हाजार दसरियास खु।। निं।। देऊन. ना देऊ मुदतीसतरी तिवोत्रा

प्र।। पुढें व्याज देऊ. मुदती आलीकडे आपली स्वारी आली तरी सावकारीनिशी तुमचा करून जाऊन अंतर न पडे.

छ १६ साबान. मोर्तब.

श्री<br>
शिव चरणी<br>
तप्तर जिवाजी<br>
भोसले निरंतर<br>
..............<br>
..............

बी कलम नरसिह लक्ष्मण

---

**क्रमांक : १४८** **दि. २-२-१७३६**

मौजे ओझर हा गाव विशाळगडच्या तनख्याखाली असल्याने, त्याचा वसूल किल्ल्याकडे सुरळीत देत जाणे, म्हणुन छत्रपती संभाजी दुसरे यांची सदर्हू गावचा खोत व रयत याना ताकीद.

श्री

नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६२ राक्षसनाम संवत्छरे फाल्गुन शु।। २ भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी———

खोत व रयानी मौजे वोझर ता। राजापूर यांसी आज्ञा केली ऐसीजे. मौजे मा।र पेशजी पासून किले विशाळगडच्या तनखियास आहे. त्यास तुम्ही किल्याकडे यैवज सुरळीत देत नाही म्हणोन हुजुर विदित जाहाले. त्याजवरून हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी मौजे मजकूर पेशजी प्रो किल्याकडे करार आहे. ऐसियासी तुम्ही यासी रुजुवात वर्तोन आकार प्रमाणे मौजे मा।रच्या यैवजाचा वसूल किल्याकडे सुरळीत देत जाणे. इस्कील न करणे. जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब आसे.

क्रमांक : १४९ दि. ४-२-१७३६

मौजे रायेपाटण, वाटूल, वगैरे पांच गावे विशाळगडच्या तनख्याखाली पूर्वीपासून आहेत. त्यांचा वसूल अलीकडे किल्ल्याकडे जात नसल्याचे विदीत झाल्याने सदहूं गावाना वसूल किल्ल्याकडे सुरळीत पोहचता करण्याची ताकीद दिली आहे. तरी ह्या हुकमाची अंमल बजावणी करावी म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे संभाजी आंग्रे सरखेल याना आज्ञापत्र.

ताराबाईनी तर्फ राजापूर आंग्र्याकडे दिला तेव्हा उपरिनिर्दिष्ट महाल यांच्या अमलातून वगळले होते, असा आज्ञापत्रात उल्लेख आहे.

श्री

नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६२ राक्षसनाम संवछरे फाल्गुन शु॥ त्रितीया सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री संभाजी आगरे सरखेल यासि आज्ञा केली ऐसीजे. मौजे रायेपाटण व मौजे वाटुळ व मौजे कोलवण व मौजें वोझरे व मौजे कोपवली ता राजापूर हे गाव पेशजी पासून विशाळगडच्या तनखियास आहेत. त्यास सदरहू गाव किल्याकडे सुरळीत चालत नाही म्हणोन हुजुर विदित जाहाले. त्यावरुन हे आज्ञापत्र सादर केले असे. तीर्थस्वरुप मातुश्री थोरले ऐसाहेबी तहचे वेळेस किल्याचे तनखियाचे गाव सदरहू हे पाच गाव देखील वजा करुन माहाल तुम्हाकडे दिल्हे. यैसीयास पेशजी प्रमाणे सदरहू गाव किल्याकडे करार करुन आलाहीदा गावास ताकीद-पत्रे सादर केली आहेत. तरी तुम्ही गावास ताकीद करुन आकारप्रमाणे गावचा यैवजाचा वसूल किल्याकडे सुरळीत देत ते करणे. कोणीविसी इस्कील न करणे. किल्याकडे गाव सुरळीत चालो देणे. जाणिजे. बहुत लिहिणे तरी सूज्ञ असा.

**क्रमांक : १५०** दि. १२-३-१७३६

खासा स्वारी जयगडास येणार आहे. त्यावेळी तुमची बेगमी करून दिली जाईल, म्हणून शिवाजी नाईक साठम यास अभयपत्र.

श्री

पु।। राजश्री शिवाजी नाईक साठम गोसावी
यासी

सुरु सन सीत सलासीन मया व अलफ. तुम्ही विनंतीपत्र कानो रत्नाकर + + + पाठविले ते विक्षेप[1] होऊन सविस्तर लोकाची व तुमची हकिगत विदीत जाहली. एशास खासा स्वारी सत्वर जयगडास येणार आहे. तेथे तुमची व लोकांची बेगमी करून दिली जाईल. तुम्ही आपले समाधान असो देणे. जाणिजे.

छ: ९ माहे जिल्काद.

---

**क्रमांक : १५१** दि. २५-३-१७३६

लिंगोजी जाधव पाटील व लिंगोजी बोगर पाटील यांच्याम बे पाटिलकीच्या हक्कासंबंधी तंटा लागला असता तत्संबंधी हजीर मजालसी होऊन लिंगोजी बोगर याने लिंगोजी जाधव यास पुढील पत्र लिहून दिले

श्री

स्वस्ती श्री नृप शालिवाहन शके १६५८ वर्षे नल नाम संवत्सरे चैईत्र बहुल दशमी गुरुवासरे ते दिनी बी हुजुर हाजीर मजालसी.

| | | |
|---|---|---|
| जिनगौडा प।। | दर विलायेती | |
| क।। कोलापुर | बहिरोजी बिन | सिवगौडा प।। |
| नांगर | सिदोजी जाधव | क।। जत |

---

१ विक्षेप = व्यग्रता.

पा मौजे ऐतवड
क।। कोडोली प्रांत
पनाला
नांगर

प्रांत विजापुर
नांगर

जीवनाजी बीन
सखोजी सिंदे
प।। मौजे तांदुळवाडी
क।। आस्टे
प्रांत मिरज
नांगर

तपे मजकूर

देसकानी
विरोजी माने
देशमुख

राघो नारायण
देशपांडे

मौजे उरुण
खेलजी बिन
पाटोजी प।।
नांगर
नागोजी दामोधर
कुलकरणी
कोंडाजी बिन सताजी
प।। मौजे गोटखिंडी
नांगर
नरोजी बिन जीवनाजी प।।
मौजे येडे
नांगर

गोल सिका

मौजे कामेरी
बाजी बिन नरसो हरी
कुलकरणी
भैरोजी प।।
व सिदोजी
जाधव प।।
सिंदोजी मरुजी
प।।
नांगर
कृष्णाजी बिन तुकजी
प।। मौजे कणेगाव
नांगर

आबाजी प।। मौजे पलूस

मल्हारजी रायाजी
कुलकर्णी
मौजे मजकूर
कक्षु मौजे मजकूर

कुलकर्णी
१ ब्रावाजी तुकदेऊ
१ मल्हार रायाजी
कुलकरणी

चौगला
१ रतोनाजी चौ
१ पिराजी चौ॥
महादु
खोत
१ समजी घोडका
१ लिंबाजी घोडका

बलुत मौजे मजकूर

१ धौंडभट जोती (षी)
१ लिगोजी सुतार
१ दवलोजी कुभार
१ परीट दारकोजी

१ सिदपा जगम
१ भैरू नाहवी
य र क (ला ?)
१ तुलसाई गुरवीण
१ रामा पोतदार
१ सुभाना गस्ती
नाटकर
१ तुळजोजी चाभार
१ तराळ रामा
६

माहार
१ रामनाक मेहतर
१ मगरनाक मेहतर
१ धननाक मेहतर
१ माणनाक मेहतर

१ मांग सुलताना

समस्त हुजूर राजेश्री लिंगोजी बिन आबाजी जाधव पटेल मौजे

येलूर खोनगी ताो मजकूर यासी लिंगोजी बिन तानाजी बोगर पटेल मौजे मजकूर याने लिहून दिल्हे पत्र यैसेजे. आपला आजा फिरंगोजी पाटील यान तुमचा बाप आबाजी पाटील यासी चौथी तकसीम पटेलगी देऊन पेसजी आमचे संतोषपत्र व महालीचा महजर तुम्हास करून दिला आसता त्या पत्रात मोघम कलम पानमान व हक लाजमा व सेवधार देखील आपणास चौथी तक्षीम यावी म्हणोन तुमचा आमचा तट पडिला. त्या बद्दल. राजेश्री देसकाजवळ तुम्ही व आम्ही जाऊन आपली हकीकत सांगितली. त्यावरून देसक मौजे मजकुरास येऊन गावगनाचे पाटील कुलकरणी जमा केले. मग गोतापुढे तुम्ही व आम्ही आपले करीन लिहून दिल्हे. त्यावरुन गोतानी आज्ञा केली की मोघम कलमा बदल तुम्ही उभयता भांडता तरी पेशजीची पत्रे उभयेता आणून पुढ ठेवणे. त्यावरुन मनास आणून नविन लाऊन देऊ म्हणून आज्ञा केली. त्यावरी आज्ञेप्रमाणे तुम्ही आम्ही पेसजीची पत्रे गोत्रापुढे ठेवली. मग गोतानी पेसजी पत्रात कलमे निवडली ती व मोघम कलमे आम्ही मनास आणून वाटून तुम्हा आम्हास दिल्ही बी।।

लिगोजी बिन तानाजी
बोगार पाा

नागऱ्या याकडे कलमे

७ नागराखाले कलमे

१ नांगर निशान

१ राबता बेगारी

१ होलीची पोळी

१ बाबे जमा होन
पाा ५

७

१ तश्रीफा २ वजा
जाधव १ बाकी

लिंगोजी बिन आबाजी
जाधव याकडे कलमे

१ तश्रीफ

१ चांदवा

१ पडख कलम

१ इनाम येदलशाही
जमीन ०२२।। कलम

१ पालक ज।। ०१५
कलम

१ मेटकुडो दर
चावरे गला ०१
कलम

१ चांदवे २ वजा
 जाधव १ बाकी
१ जोडे २ वजा
 जाधव १ बाकी

७

१४ कि॥ कलमे तीन
 तक्षिमा लिंगोजी
 पा। बोगार व चौथी
 तक्षीम लिंगोजी जाधव
 पा।
 १ सवासीन तीन
 १ घर पालक
 १ इना(म) येदलशाही
 चावर ।॥। वजा
 जाधव ०२२॥
 बाकी ।॥ ७॥

 ७

 १ पालक चावर ।॥
 वजा जाधव ०१५
 बाकी १॥ ।१५
 ये॥ कलम
 १ मेटकुडो दार
 चावरे गल्ला
 ०४ वजा जाधव
 गल्ला ०१ बाकी
 ०३

१ माहे जमा होन
 १॥= ये॥ कलम
१ जोडा कलम
१० कि॥ कलम
 चौथाई
 १ सवासीन
 १ घर पालक
 दरोबस्त
 १ म्हैस पालक दरोबस्त
 १ वटेल दाम
 १ गुगलाचा परवत
 १ सेवधार
 १ उकाला
 १ गुरालाची सेरणी
 व ऊस
 १ पाने कलम
 १ बारा गणी मोतर्फा
 कलम

१०

६ कि॥ कलमे तीन
 वरसे लिंगोजी बोगार
 पा व चौथी व यँ स[1]
 लिंगोजी जाधव पा।
१ भावई
१ गलेफ पीर
 मुला हसन

---

१ वरीस ?

८

कलम

१ बहे जमा होन पात-
शाही दहा वजा नांगरा
खोले होन ५ बाकी
होन ५ वजा जाधव
पा होन १॥=
बाकी ३।= ये॥ २४

कलम

१ म्हैस पालक
१ अभिषेक श्रावण
मास श्रेय
१ देवजाती पुनिवेची
मुद
१ दल लक्ष्मी
१ कांबला

६

लंग ०

७ क॥ कलमे तीन

तक्षीम

१ वटलदाम
१ गुगलाचा
परवत
१ सेवधार
१ उकाळा
१ गुराळाची
शेरणी व उस
१ पाने
१ बारागणी
मोतर्फा

७

६ क॥ कलमे तीन

वरषे लिंगोजी पाटील
बोगार व चौथे
वरीस लिंगोजी जाधव
पाटील.

१ भावई
१ श्रावण मास
अभिषेक श्रये
१ देव जाती पुनिवेची
मुद
१ गलेफ पीर
मुला हसन
१ दल लक्षुमी
१ कांबला

६

२७

येकूण कलमे लिगोजी बिन तानाजी बोगार पा।। याजकडे सतावीस व लिगोजी बिन आबाजी जाधव पा। याजकडे चोवीस करार करून वाटून दिल्ही असेत. या प्रमाणे तुम्ही आम्ही आनभऊन भाऊपणे सुरलित वंश परंपरा चालावे. पुढे तुम्हाआम्हास कतला करावयास आर्थाअर्थी समंध नाही. पुढे वतनदारीमुळे तुम्ही आगर आम्ही काणु कायदा काडला तरी तुम्हास चौथी तक्षीम प्रो चालऊ. या खेरीज तुम्हास रहाण्यास घर जागा पेसजी बा।। भैरोजी पा।। व सेत सिव बावी देखील दिल्हा आहे. त्या प्र।। करार आसे.

---

**क्रमांक : १५२** दि. ३१-५-१७३६

छत्रपती संभाजी दुसरे यांजकडून राणोजी घोरपडे सेनापती यांस मौजे इचलकरंजी इनाम. छत्रपती शाहू व छत्रपती संभाजी यांची भेट झाली, तेव्हा सदहू गाव छत्रपती संभाजी याना नजर करण्याचा प्रसंग झाला असे इनाम पत्रांत म्हटले आहे. " मौजे इचलकरंजी तालुका रुकडी " असा उल्लेख त्यांत आहे.

श्री

श्री
प्रतिपच्चंद्र रेखे
व वर्धिष्णुर्विश्ववं
दिता शंभु छत्रप
तेर्मुद्रा राम सूनो
विराजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६२ नलनाम संवत्सरे जेष्ट शुद्ध द्वितीया इंदुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी

श्री राजा शंभु छ
त्रपति हर्षनिधा
न त्र्यंबक सुत नि
ळकंठराव मु
ख्य प्रधान

श्री आई आ
दि पुरुष श्री राजा
शंभु छत्रपती स्वा
मी कृपानिधि तस्य
कृष्णाजी परशरा
म प्रतिनिधि

राजश्री राणोजी घोरपडे बिन पिराजी घोरपडे देशमुख प्रांत मिरज यांसी दिल्हे इनामपत्र यैसेजे. मौजे इचलकरंजी तो रुकडी हा गांव पेशजी तुम्हांस इनाम दिल्हा असे. त्यास स्वामी तीर्थस्वरूप राजश्री आबासाहेब यांचे दर्शनास आले ते समई इचलकरंजी नजर करावयाचा प्रसंग जाला. त्यावरून तुम्ही तिर्थस्वरूप यांचे आज्ञेप्रमाणे मौजे मजकूर स्वामीस नजर केले. त्यास तुमचे चालवणे स्वामीस अवश्यक जाणोन स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन पूर्वंवत प्रमाणे मौजे मजकूर तुम्हांस इनाम करार करून दिल्हा असे. तरी तुम्ही मौजे मजकूर इनाम पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन सुखरूप राहणे. अभय असे. तुमचे माथी शेरणी रुपये ५००० पाच हजार करार करून हुजुर वसूल घेतला असे. जाणिजे. निदेश समक्ष.

संमत मंत्री

मर्यादेयं विराजते

तेरीख १ सफर[1] सु॥ सबा.

---

१. मराठी तारखेवरून मुसलमानी महिना मोहरम निघतो. म्हणजे तेरीख १ सफरच्या ऐवजी १ मोहरम पाहिजे.

**क्रमांक : १५३** दि. ३१-५-१७३६

तुमचे सेनापतीपद व सरंजाम तुम्हास पूर्ववत करार करून दिला आहे, म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे राणोजी घोरपडे याना आज्ञापत्र.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ६२ नलनाम संवत्सरे जेष्ठ शुध द्वितीया इंदुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री राणोजी घोरपडे सेनापति यांसी आज्ञा केली यैसीजे. स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन पूर्ववत् प्रमाणे तुमची सेनापति तुम्हास करार व सरंजाम आदि करून पेशजी प्रमाणे करार करून दिल्हा असे. तरी तुम्हीं स्वामी सेवा यख्तीयारीपणे करून स्वामीस संतोष पावऊन सर्वप्रकारें निष्ठेस अंतर न करणें. स्वामी तुमचे विशेषात्कारें उर्जीत करून चालवितील. याविषई आपले समाधान असो देणें. जाणिजे. बहूत लिहिणे तरी सूज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते

---

**क्रमांक : १५४** दि. १९-६-१७३६

कृष्णाजी राणे अरुळेकर यास ' दर बैली तीन रुके ' जकातीचे इनाम दिले आहे म्हणून पंतअमात्य यांचे कमाविसदार जकातमार्ग अणसकुरा यास आज्ञापत्र.

श्रीरामचंद्र

सिका

आज्ञापत्र राजश्री——पंत आमात्य त।। कमाविसदार जकात मार्ग अणसकुरा. सु।। सबा सलासीन मया आलफ. रा। कृष्णाजी राणे अरुळेकर याणी बहुत दिवस निष्ठे (ने) सेवा केली व हाली मनोभावे

शवा करीत आहेत. या करिता कृष्णाजी राणे यास जकात म॥री दर बैली खंडणीस रुके ९३ तीन देविले असत. तरी साल दर साल कृष्णाजी राणे याजकडेस दर बैली तीन रुके देत जाणे. जाणिजे.

छ २० सपर. निदेश समक्ष.

मोर्तब

---

**क्रमांक : १५५** **दि. ३०–६–१७३६**

**मौजे वाडे येथे भगवंतराव अमात्य यांची इनाम बाग होती. त्या बागेवर हुबसीपटी घेऊ नये म्हणन (संभाजी आंग्रे) सरखेल यांचे कमाविसदार मौजे वाडे यास आज्ञापत्र.**

श्री

सिका

आज्ञापत्र राजश्री सरखेल ता। कमाविसदार मौजे वाडे ता। खारापाटण सु॥ सबा सलासीन मया व आलफ. राजेश्री भगवंतराव आमात्य सरदेशमुख तर्फ मजकूर याची बाग मौजे मजकुरी इनामतीची आहे. त्याजवरील हाबसीपटी[1] न घ्यावी म्हणोन खारापाटणचे मुकामी मशारनुले याही विदित केले त्याजवरून आज्ञापत्र सादर केले असे. तरी बागेवरी हाबसीपटीचा आकार होईल तो मशारनुले याजकडे साल दर साल खर्च लि॥ जाणे. जाणिजे.

रा॥ छ १ माहे रावल. मोर्तब असे.

---

१ हबसी सरकाराने बसविलेली पट्टी.

क्रमांक : १५६ दि. २१-९-१७३६

छत्रपती संभाजी दुसरे यानी मौजे नांदगाव हा गाव मोरेश्वर रामचंद्र यांस इनाम दिला. पूर्वी हा गाव त्याना इनाम होता. परंतु तो काढून घेऊन मुदपाकखान्याकडे दिला होता.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६३ अनलनाम सवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी भोमवासर क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी मोकदमानी मौजे नंदगाव ता हवेली

सिका सिका कोल्हापूर——

आज्ञा केली ऐसीजे. मौजे मा।र पेशजी राजश्री मोरेश्वरराऊ रामचंद्र याकडे इनाम होता. मध्ये मुदबाखाचे[1] बेगमीस ठेविला होता. हाली मुदबाखाकडून दूर करून राव मा।रनिल्हे यासी इनाम दिल्हा असे. तरी तुम्ही मौजे मा।रचा वसूल राऊ मा।रनिल्हेकडे देणे. याचे रजातल्ब वर्तत जाणे. दुसरेकडे वसूल न देणे. निदेश समक्ष.

मोर्तब असे.

रुजु समंत
मंत्री

तरीख २५[2]
जमादिलोवल सु।। सबा
सलालीन. बार सुरु सुद्र बार.

---

१ मुदबाख = मुदपाक.
२ तेरीख २६ पाहिजे.

**क्रमांक : १५७** दि. ५-१०-१७३६

मौजे मुदरुल येथील मशिदीचा मुलाणा वारला म्हणून दुसरा मुलाणा नेमण्यात आला होता. परंतु मयताच्या मुलीस मुलगा असल्याने व मुसलमानी कायद्यानुसार सदहू मशिदीचे मुलाणीपण त्याच्याकडे येत असल्याने मुलाणी म्हणून त्याचीच नेमणूक करावी, असे कृष्णाजी विठ्ठल याचे मोकदम मौजे मुदरुल यास आज्ञा पत्र.

श्री

शिक्का

आज्ञापत्र राजश्री कृष्णाजी विठल ता। मोकदमानी मौजे मुदरुल प।। कराड. सु।। सबा सलासीन मया व अलफ. मौजे मजकुरी महसीद आहे. त्याचा मुलाणा वतनदार होतो. त्याची अफलाद महमद खान असता तुम्ही परकी मुला(णा) आणून ठेविला आहे आणि वतनदाराचे आफलादीचे बाजूने मसिदीचे खिजमत घेत नाही म्हणोन विदित जाहले. येसियास वतनदार मुलाणा असता दुसरा ठेवावा येसे नाही. येविसी हुजूरचेहि आज्ञापत्र सादर जाले आहे की कदीम वतनदार होता त्याची आफलाद महमद खान आहे. त्याचे हवाला मसिदीचे खिजमत करून त्याचा इनाम असेल तो त्याचे हवाला करणे. येसे असता तुम्ही कोताई[1] करिता हे गोष्टी बरी नाही. या उपरी महमद खानापासून मसिदीचे खिजमत करून त्याचे इनाम असेल ते याचे हवाला करणे. फिरोन बोभाट येऊ न देणे. जाणिजे.

छ १० जमादिलाखर.

शिक्का

---

१ कोताई = कोतेपणा.

क्रमांक : १५८ दि. २६-११-१७३६

मौजे बाविडे या गावच्या पाटीलकीबाबत सरकारात पैसा भरायचा होता. या पाटीलकीचे हिस्सेदार नरोजी, नरसोजी, जोतजी व येसाजी पवार याना सदहू रकमेचा फाळा भरणे अशक्य झाल्याने त्यानी आपल्या पाटीलकीचा हिस्सा विकावयास काढला. प्रथम त्यानी हा हिस्सा विकत घेण्याची विनंती आपल्या भाऊबंदाना केली. पण त्यांच्याकडून नकार मिळाल्याने त्यानी तो द्वारकोजी यादव यास विकला.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १६५८ वरुश अनलनाम संवत्सरे मार्गेश्वर शुद्ध पंचमी भृगुवासर ते दिनी हजीर मजालसी दर जागा कोट कोल्हापूर.

| नाईकवाडी पा कोल्हापूर | | देसकानी |
|---|---|---|
| उसमान मखदुम सरगुरु गोविंदराव व भेल सरनाईक | माणकोजी सरनाईक बाजि बिन सिदाजी चौगुला | आंताजी त्रिमल सरदेस कुलकर्णी क॥ हवेली |
| सेखाजी बिन भिमाजी व सुभानजी सासने | फुरंगोजी जाधव | देसक को॥ हवेली पा॥ मजकूर येसवंतराऊ वलद खंडेराऊ |
| नरसोजी नाईक | गोविंदराऊ भोसले | |
| नागोजी नलवडा | धुळाजी हिंगावकर | --दाभाडे देसाई--- हवेली पा॥ मजकूर |
| रवळाजी राऊत | संभाजी आहिरेकर | |
| | शाहजी थोरात | |
| रायाजी दळवी बयाजी रुद्र हसमनी (स) | { देवराऊ भिमाजी देसाई क॥ वडगाऊ | व्यंकाजी हरी व भगवंत राऊ आपाजी देसपांडे क॥ हवेली पो॥ म॥ |
| { नाईकजी बिन कुमाजी पा॥ प्रांत वडगाव | देवणा बि (न) अदेपा सेट्या क॥ वडगाव | } मोकदमानी कसबे कोल्हापूर |

| | | |
|---|---|---|
| सिवगोडा पटेल मौजे हेरले क।। टोप प्रा पनाळा | बनाजी बिन माणकाजी दानधर्मे पाटील वाडी रत्नागिरी क।। ठाणे | जखगोडा बिन देवगोंडा पटेल को मजकूर |
| आबाजी बिन भगवंतजी कदे पा वाडी रत्नागिरी क।। ठाणे | | नारो हरी कुलकर्णी को मजकूर |
| | | तुकोजी बिन सत्रपा चौगुला क।। मजकूर |
| | | रेखोजी बिन नरसोजी नारकणेकर कारकून नाईकवाडी क।। मजकूर |

वेंकाजी मेलगिरी सराफ को कोल्हापूर    हरी जोसी कोल्हापूर

मौजे बाविडे

| | | |
|---|---|---|
| खंडो भिकाजी सभासद कमावीसदार | जोतजी बिन भिकाजी पा १ | महादजी बिन बाळजी पा १ |
| सुभानजी बिन विठोजी पा १ | मरगोजी बिन धालजी पा १ | |
| खळोजी बिन मानाजी पा १ | रायाजी बल्लाळ कुलकर्णी १ | माणको नरसिव्ह कुलकर्णी |
| जोत्याजी बिन केदारजी पा १ | रामजी बिन रवळोजी चौगुला १ | रामभट बिन कृष्णभट जोसी |
| जोत्याजी बीन संताजी पा १ | रामजी बिन चांदजी व शाहजी व बाबू करतुंडा व रामजी बिन भार्याजी | |
| सिदजी पा बिन नरसोजी पा १ | हणगोजी करडेकर १ | हणमाजी ढगा १ |
| | जोत्याजी पवार गावडा १ | |

मुजाजी बिन बनाजी पा १
बाजी बिन एसाजी पा १
लिंगाजी उलके १
लिंगाजी डोंगरा १

या हुजुर राजश्री द्वारकोजी बिन कृष्णाजी यादव————यास नरसोजी बिन मुरारजी व नरोजी व जोतजी व एसाजी बिन बाळोजी पोवार पाटील मौजे बयेवड कों हवेली पां मजकूर यानी लिहून दिले विक्रयपत्र ऐसाजे. मौजे मजकुरी पाटीलकी बा कजिया पडला व पेशजीचा कजिया व सवसारिकामुळे कर्ज जाहाले त्यास आपणास ध्यावयासी ताकत नाही. देणेची निकड लागली. आपण मोखलीस पडिलो. ऐवज पाहता आपले वतन मात्र आहे. त्यास आपले भाऊबंद वडिल घर सुभानजी बिन वीरोजी पाटील मौजे मजकूर यास बोलिलो जे आपले तक्षिमेस रुपये ९० णवद घातले आहेत ते द्यावयासी आपणापासी ऐवज नाही ऐसीयास आपले तक्षिमेचे वतन तुम्ही घेऊन रुपये फुरीद[1] करून घेणे म्हणोन बाजीद[2] होऊन सांगितले. त्यासी त्याने उत्तर दिल्हे की आपलेस तुझे वतन लागत नाही. रुपये आम्हास मिल्हत नाहीत म्हणऊन बोलिलो. मग सिवाजी पा व भाऊबंद यापासी सदरहू प्रमाणे सांगितले. त्यानीही मान्य केले नाही. ते बोलिले जे तू हर कोणास तरी आपले तक्षीमेचे वतन देऊन पैका फुरीद करणे. त्यावरून तुम्ही भले प्रामाणिक वतनदार पाहून आम्ही तुम्हापासी आलो. तुम्हास आवघे वर्तमान सांगितले. त्यास आपले तक्षिमेचे वतन घेऊन तगादा फुरीद करणे. त्यास तुम्ही बोलिला जे तू आपले तक्षीम आपले भाऊबंदास देऊन आपला तगादा वारून घ्या म्हणून बोलिला. त्यास आपण उत्तर दिल्हे जे आम्ही आपले भाऊबंदास विचारले त्यास ते कोणी आंगीकार करीत नाहीत. देण्याची निकड लागली या करिता तुम्ही आपला वंते[3] घेऊन रुपये वारणे. त्यास नाईकवाडी व देशमुख

---

१ फुरीद = फारीख; २ बाजीद = लाचार;
३ वंते (वंत) = वांटा; विभाग.

व देशपांडे यांचे विदमाने बोली केली की हली देणेचे रुपये ९० नवद व पेशजीचे देणे पैकी रुपये ८५ पंच्याऐंसी एकूण रुपये पावणेदोनसे घेऊन आपले तक्षिमेमधे दोन तक्षिमा आपणाकडे घर ठाव पाच आंकणे माळी आहे ती तुम्हाकडे व परसू आहे ते दोन तक्षिमा तुम्हाकडे. एक तक्षीम आम्हाकडे. येणे प्रमाणे चौघाचे विद्यमाने बोली करार केली. ते आपले आत्म संतोषे कबूल केले. सदरहूप्रमाणे रुपये आपणास पावले. तुम्ही वतन आपले तक्षिमेपैकी दोन तक्षिमा इनाम व हक व कानू कायदे जे असतील ते तुम्हाकडे घर ठाव माळी पाच आकणे तुम्हास परसा पैकी दोन तक्षिमा तुम्हास एक तक्षीम आम्ही घेतली. येणेप्रमाणे वतन तुम्हास दिल्हे असे. तुम्ही आपले लेकराचे लेकरी अनभऊन सुखरूप राहणे. ये विसी बाप भाऊ कोणी बोलतील त्याचे स्वालजाब आपण करू. आपले तक्षिमेमध्ये वडिलपण तुमचे. चावडी चौतिरा कारभार हे तुमचा. आम्ही तिसरे तक्षिमेचे मात्र खावंद. आम्हास कारभारात समंध नाही. तिसरी तक्षीमवंत खाऊन आसो. कालाकाल आमच्या घरातील कोणी आले तरी त्यास आमचे आम्ही समजू. हे लिहून दिल्हे विक्रयपत्र.[1] सही.

तेरीख छ ४ शाबान सु॥ सबा सलासीन मया अलफ.

गोही

बलुते मौजे मजकूर

| नरसिया सुतार बिन आपाजी | हणमाजी कुंभार बिन वाकोजी |
|---|---|
| सुतार १ | कुंभार १ |

---

१ द्वारकोजी यादव यानी ही पाटीलकी विकत घेतली आहे म्हणून छत्रपती संभाजी दुसर यानी दि. २७-१-१७३७ या दिवशी देशाधिकारी व कारकून प्रांत कोल्हापूर यास आज्ञापत्र पाठविले. तसेंच या पाटीलकीला राहात्या महार नव्हता तो मिळावा म्हणून द्वारकोजी यादव यानी महाराजांना विनंती केली असतां त्यानी दि. १०-२-१७३७ च्या आज्ञापत्रकान्वये ही मागणी मंजूर केली. हे दोन्ही कागद उपलब्ध आहेत.

| | |
|---|---|
| भिकाजी बिन तुकरासी गुरव १ | आबाजी बिन रामोजी न्हावी १ |
| आबाजी बिन मुजाजी आंबी १ | नरसोजी बिन मुजाजी परीट १ |
| चिलोजी बिन बहिरोजी कोळी तराळ १ नि॥ काठी | खंडोजी बिन धाकोजी चांभार १ नि॥ रापी |
| सुदनाक बिन भिकनाक बोगारी १ | नरसनाक बिन जोतनाक बोगारी १ |
| रुद्रनाक बिन हुणगनाक बोगारी १ | देवनाक बिन कासनाक बोगारी १ |

---

दि. ७-१२-१७३६

**क्रमांक : १५९**

द्वारकोजी यादव याने मौजे बाविडे या गावची पाटिलकी विकत घेतली तत्संबंधाने कोट कोल्हापूर येथे झालेला महजर. यावर तत्कालीन लहान मोठे अधिकारी व बलुतेदार यांच्या साक्षी आहेत. (त्यांची नावे तेवढी येथे घेतली आहेत. बाकी मजकूर बहुतेक मागील सनदे प्रमाणे आहे.)

येथे पारसी मजकूर तीन ओळी आहे.

सिक्का पारसी

माहाजर ब तेरीख १४ साबान बी हुजूर हजीर मजालसी यानी दर जागा कोट कोल्हापूर प्रां॥ मजकूर सु॥ सन सबा सलासीन मया अलफ सन———

राजमुद्रा

| | | | |
|---|---|---|---|
| राजश्री मल्हारराव भोसले हवालदार कोट करवीर | केदारजी यादव सरनोबत कोट मजकूर | गुंडो वेकाजी सबनीस कोट मजकूर | तिमाजी सखो १ कारखानीस कोट मजकूर |

| श्री<br>राजा शंभु छत्र<br>पति चरणी तत्पर<br>कोंडाजी सुत मल्हा<br>रराव भोसले<br>निरंतर | श्री<br>श्री राजाशंभु<br>छत्रपती चर<br>णी तत्पर केदा<br>रजी यादव<br>निरंतर | कृष्णाजी नरसिंह<br>फडणीस दि॥<br>सबनिसी<br>कोट मा॥र | कृष्णाजी अनंत<br>फडणीस दि॥<br>कारखानिसी<br>कोटमा॥र |
|---|---|---|---|

नाइकवाडी प्रां॥ कोल्हापूर

हुसेन वली सदगुरु
नि॥ कटचार

गोविंद राऊ भोसले
नि॥ कटचार

सेखोजी सासने
नि॥ कटचार

नरसोजी तुकोजी
अदम
नि॥ कटचार

नागोजी नलवडे
नि॥ कटचार

रवळोजी राऊत
नि॥ कटचार

नरसोजी यादव
नि॥ कटचार

रायाजी हणगोजी
दळवी
नि॥ कटचार

माणकोजी सखो
नि॥ कटचार

खानजी सिदोजी
साळोखे
नि॥ कटचार

फिरगोजी जाधव
नि॥ कटचार

गोविंद राऊ
भोसले
नि॥ कटचार

धुळोजी इंगवले
नि॥ कटचार

संभाजी अंबेडकर
नि॥ कटचार

अबु बाभर
नि॥ कटचार

बहीरजी कासीद
नि॥ कटचार

देसकानी प्रां॥ कोल्हापूर

अंताजी त्रिमल सरदेस कुल
करणी क॥ हवेली

देसक क॥ हवेली-----

| यशवंत राऊ<br>वलद खंडेराऊ<br>दाभाडे देसाई<br>सिका | वेकाजी हरि व<br>भगवंतराऊ<br>आबाजी देशपांडे<br>क॥ मा॥र |
|---|---|

मोकदमानी कसबे मजकूर

| जखगौंडा बिन<br>देवगौंडा पटेल<br>क॥ मजकूर<br>नि॥ नांगर | नारो हरि<br>कुलकर्णी<br>क॥ मजकूर |
|---|---|

| पिराजी दिमवरा<br>नि॥ कटचार | शाहाजी थोरात<br>नि॥ कटचार | तुकोजी बिन<br>राचपा चौगला<br>क॥ मा॥र | हेगापा बिन<br>विरोजी माने<br>माहाजन क॥<br>मजकूर |
|---|---|---|---|

भिकाजी हळवे
नि।। कटचार

बहिरजी कम-
ळाकर
नि।। कटचार

रायेणा बिन
पदमणा सेटचा
क।। मजकूर

रायाजी भोवानजी
साळोखे
नि।। कटचार

बापूजी रुद्र
हंसमनीस

भैरोजी बिन तुकोजी
कसबेकर नाईक
क।। मार
नि।। कटचार

मौजे बायेवडे

खंडो भिकाजी सभासद
व कमाविशदार

सुभानजी बिन
विठोजी पाटील
नि।। नांगर

सिदजी बिन
नरसोजी पाटील

मुरारजी बिन
बजाजी पाटील
खानजी बिन
येसाजी पाटील
माणको नरसिंह व
रामाजी बलाळ
कुलकर्णी

रवळोजी बिन
सुभानजी पाटील

जोत्याजी बिन
केदारजी पाटील

जोत्याजी बिन
संताजी पाटील
जोत्याजी बिन
भिकाजी पा।।
माहादजी बिन
बकाजी पा।।

मौजे ब्रीड

जगदेव पाटील
बिन देवजी पाटील
नि।। नांगर

मौजे नागाव बु।।

भिमगोंडा बिन
खनगोंडा पटेल
नि।। नांगर

मौजे हलोंडी क।। हवेली

शेफशगौंडा बिन
चेडगौंडा पटेल
व बारवा
नि।। नांगर

| | | | |
|---|---|---|---|
| | नारगोजी बिन | मौजे वसगडे | का। हवेली |
| लिंगोजी उलफ | धावजी पाटील | अदगोंडा बिन | को हवेली |
| लिंगोजी डोंगरा | रामाजी बिन | होनगोंडा पटेल | भोमगोंडा |
| | खळोजी चौगला | नि।। नांगर | बिन खानगोंडा |
| हणगोजी रेडकर | रामजी बिन | केरणा बिन | बजाजी |
| हणमाजी ढगा | चांदजी व शाहाजी | नागणा चौगला | आबाजी |
| | व बाबू व रामजी | | कुलकर्णी |
| | बिन मानजी परगुडे | | |
| | जोत्याजी पवार गावडा | | |

बलुते

नरसिया बिन आपाजी सुतार

भिकाजी बिन मुकरासी गुरव
नि।। धुपाटण

आपाजी बिन मुंजी अंबी
नि।। वल

चिलोजी बिन बहिरोजी कोळी
तराळ नि।। काठी

सिदनाक बिन भिकनाक बोगारी

रुद्रनाक बिन हणगनाक
बोगारी

हणमाजी बिन वोखाजी कुंभार
नि।। चाक

आबाजी बिन रामजी नाह्वी
नि।। आरसा

नरसोजी बिन मुराजी परीट

खंडोजी धाकोजी चांभार
नि।। रापी

नरसनाक बिन जोतनाक बोगारी

देकनाक बिन कलसनाक
बोगारी

का।। ठाणे
मौजे हेरले — आपाजी सिवदेव कुलकर्णी
सिवगोंडा पटेल

भोमगोंडा बिन होनगोंडा
पटेल मौज सांगोली
का।। सावगाव प्रांा हुकेरी
नि।। नांगर

कसबे रुकडी या सुलतान पटेल व पिरगोंडा पटेल व भिमाजी ब्रह्माजी कुलकर्णी का।। मा।र मामले मिरज
नि।। नांगर नि।। नांगर

पिरगोंडा पटेल मौजे नांदणी
का।। सिरोळ प्रांा रायबाग
नि।। नांगर

लिंगगोंडा पटेल मौजे माणगाऊ
क।। मांजरी त।। कागल
नि।। नांगर

प्रांत पनाळा

देसक———

मिराखा वलद रहिमान
देसाई क।। ठाणे प्रां म।।र
सिका

शामजी नरसिह
देशपांडे प्रां म।।र
व मामले मिरज

मौजे देवठाणे क।। ठाणे
सुभानजी पाटील
रु।। रुद्राजी पाटील
नि।। नांगर

कसबेवासी जोतजी पाटील नि।। नांगर
सिदोजी पा।। नरहरी भागो
नि।। नांगर कुलकर्णी

मौजे माजगाऊ
रुद्राजी पाटील
नि।। नांगर

मौजे वाघवे
सुभानजी पाटील
नि।। नांगर

रुद्राजी पाटील
नि।। नांगर

राणोजी पाटील पिपळे
नि।। नांगर

शामजी नरसिह
ग्राम कुलकर्णी

मौजे वरनगे
माहदजी पाटील
नि।। नांगर

नरसोजी भिमाजी
कुलकर्णी

मौजे असुरळे
तुकोजी पाटील
नि।। नांगर

रामाजी सिवदेव
कुलकर्णी
तुकोजी चौ।।
नि।। नांगर

मौजे वर॰नगे
राणोजी पाटील
नि।। नांगर

माहादजी त्रिंबक
कुलकर्णी

मौजे निगवे
विठोजी पाटील
नि।। नांगर

माहादजीपंत कुलकर्णी
खेगोजी चौगला

मौजे केरले
कोंडाजी भोसले [illegible]टील
नि।। नांगर

भिकाजी लाड पाटील
नि।। नांगर

सटवोजी भोरपी भंडारी
मौजे वाडी रत्नागिरी

| | | |
|---|---|---|
| कृष्णाजी चौगला | भिमाजीपंत व लिंगोपंत कुलकर्णी | |
| सिदोजी बिन नरसोजी पाटील मौजे सिरोली क।। ठाणे नि।। नांगर | क।। वाडी।। मौजे पारगाऊ केदारजी पाटील बिन धायाजी पाटील नि।। नांगर | धारोजी पाटील बिन दाजी प।। नि।। नांगर गोविंद जनार्दन कुलकर्णी मौजे मजकूर |

---

**क्रमांक : १६०**

दि. २७-१२-१७३६

छत्रपती संभाजी दुसरे यानी मौजे फूर, तर्फ देवरूख या गावच्या खोतीचे वतन विश्वनाथ भट अग्निहोत्री यास दिले, सदर्हू गावची खोती आपली असल्याचा दावा धोंडो गोपाळ खांडेकर याचा होता. परंतु गावचे वतनदार व वलुतेदार तसेच जुने खोत यांच्या साक्षी काढल्या असता सदर्हू दावा खोटा ठरला.

श्री

तालीक

सिका

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६३ अनलनाम सवत्सरे पौष शु।। शेष्टी इंदुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी वे।। राजश्री विश्वनाथ भट बिन नारायण भट अग्नीहोत्री.

उपनाम साठे गोत्र वसिष्ट सूत्र अश्वलायन यास दिल्हे वृतिपत्र यैसीजे. तुम्ही करवीरचे मुकामी स्वामी संनीध येऊन विनंती केली कीं स्वामीने पेशजी मौजे फूर तर्फ देवरूख हा गाव इनाम करून दिल्हा आहे त्या प्रो भोगवठा चालत आहे. सांप्रत धोंडो गोपाळ खांडेकर हा मौजे म।।रीची खोती आपली पुरातन मिरासीची आहे

म्हणोन आम्हांसी खटला आरंभिला. या करिता आपण राजश्री कृष्णाजी पंडीत प्रतिनिधी याकडे विशाळगडचे मु।। जाऊन वर्तमान सांगितले. त्यावरून पंडित म।।रनिलेनी तर्फ मार देशमूख व देशपांडे व हुमशाई भोवरगावीचे खोत व मौजे म।।रचे मिरासी आपल्याजवळी नेऊन धोंडो गोपाळ हा मौजे म।।रची खोती आपली म्हणतो. याचा करिना कैसा आहे म्हणोन सर्वास पुसिले. त्यास मौजे मारचे मिरासदारानी सांगितले मौजे म।।रचे खोत पूर्वी येणे प्रा खोती करीत अले.

अदलशा पादशा विज्यापूर या चे वेळेस काजी खतीब याणे च्यार साले खोती केली.
आसामी १

हे राज्य महाराज थोरले याणी काबीज केले तेव्हा खोती कीर्दसाले
४ कासी देवस्थले

५ नारबा चिंदरेकर
३ केसो नरसिव देवदार
३ देकोजी यशवंतराऊ
८ मलजी व खंडोजी कासार
२५ रामाजी बाबदेव व गोपाळ बाबदेव खांडेकर

४८
असामी ६

येणे प्रा खोती करीत आले. मिरासीची खोती कोणाची नाही म्हणोन. त्याचप्रा देशक व भोवर गावीचे वतनदार याणी सांगितले त्यावरून धोंडो गोपाळ पुरातन खोत नव्हे याचा पाचा जणानी खोती केल्या उपर धामधुम जाहाली. गाव खराब पडिला तेव्हा धोंडो गोपाळ याणे पंचवीस वर्षे खोती केली. मिरासदार खोत कोणी नाही यैस सर्वाचे मते जाहाले. धोंडो गोपाळ कजिया करितो याकरिता पंडितमार निलेनी त्याची खोती दूर करून आपल्यास गाव इनाम आहे त्याच प्रा खोती वतन करून दिल्ही आहे. पुढे भोगवठा

चालिला पाहिजे तरी स्वामीने दिवाणची पत्रे द्यावयास आज्ञा केली पाहिजे म्हणोन विनंती केली. त्यावरून मनास अणिता तुम्ही भले सिष्ट विद्यावंत तुमचा योगक्षेमास दिवाणातून गाव इनाम दिल्हा आहे. हाली मौजे मा।रची खोती तुम्हास वतन करून दिल्ही असे. तरी मौजे फूर तर्फ देवरूख सुभा प्रांत राजापूर हा गाव तुम्हास पूर्वी इनाम दिल्हा आहे. हाली मौजे मा।रची खोती वतन दिल्ही आहे. तरी तुम्ही मौजे मा।र इनाम व खोतीसहवर्तमान व आपल्या पुत्रपौत्रादि वंश-परंपरेने अनभऊन स्नान संध्या करून स्वामीस कल्याण इछून सुखरूप राहाणे. निदेश समक्ष. मोर्तब.

रुजु समत
मंत्री

तेरीख ४.
रमजान सु।। सबा सलासीन

बार सुरू सुद्र बार

जोड बंदास मोर्तब दोन.

---

**क्रमांक : १६१** **दि. १६-१-१७३७**

लिंगोजी जाधव याने मौजे मनपाडळची पाटीलकी एका सोनाराकडून विकत घेतली होती. तो उदाजी चव्हाण यांचे बरोबर परसेवेस गेला तेव्हा त्याची पाटीलकी पागेकडे होती. त्याने तिकडून परतल्यावर छत्रपती संभाजी दुसरे याना पाटीलकी बाबत अर्ज केला असता, त्यानी त्याचे इनाम चालू करून त्यास वेगळी सनद दिली.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६३ अनलनाम संवत्सरे पौष बहुल द्वादशी रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी देशमुख व देशपांडे ता।। वडगाव सुभा प्रांत पनाळा यास आज्ञा केली येसीजे. मौजे मनपाडळ ता। मजकूर येथील पेसजी पाटीलकी

सिका सिका

सोनाराची होती. त्याचे राजीमते पाटीलकी लिंगोजी बिन केदारजी जाधव याणी विकत घेतली. त्याप्रमाणे हुजुरूनही पेसजी पाटीलकीची पत्रे लिंगोजी जाधव यास दिल्ही आणि मौजे मजकूर इनाम दिल्हा होता. मध्यें उदाजी चव्हाणाबराबरी परसेवेस गेले त्यामुळे गाव पागेकडे दिल्हा होता. सांप्रत लिंगोजी जाधव करवीरचे मुक्कामी येऊन स्वामीस अर्ज केला कीं आपणास पेसजी प्रमाण गाव इनाम घेऊन सेवा घ्यावी. त्यावरून याचे खाते सवे घेऊन चालवणे हे स्वामीस अवश्यक. या करिता हाली स्वामी यावरी कृपाळू होऊन मौजे मजकूरचे पाटीलकीची पत्रे पेसजी प्रा दिल्ही आणि गावहि पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम पेसजी प्रा करून देऊन अलाहिदा सनद सादर केली आहे. तरी तुम्ही पाटीलकीचे वतनाची सेवा यापासून घेणे आणि गाव लिंगोजी जाधव यास व याचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवणे. प्रतिवर्षी नवीन पत्राची उजूर न करणे. याची प्रति घेऊन असल भोगवटीयास परतोन देणे. निदेश समक्ष, मोर्तब.

---

दि. २०-१-१७३७

**क्रमांक : १६२**

छत्रपती संभाजी दुसरे यानी द्वारकोजी यादव यास बाविडे या गावी अठरा चावर जमीन इनाम दिली. मौजे बाविडेची पाटीलकी द्वारकोजीकडे होती. परंतु त्यातून आपला उदरनिर्वाह होत नाही म्हणून त्याने महाराजांकडे जमिनीची मागणी केली होती.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६३ अनलनाम संवत्सरे फाल्गुन शु।। द्वितीया इंदुवासरे क्षत्रीयकुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत कोल्हापूर यास आज्ञा केली, ऐसीजे. द्वारकोजी बिन कृष्णाजी यादव पा। बाविडे ता। हवेली प्रांत मजकूर याणी स्वामी संनीध विनंती केली की मौजे मजकूरचे पाटीलकीचे वतन आपले आहे. वतनास हक व इनाम आहे तेणे करून आपला संसार चालत नाही. कुटुंब फार आहे.

याचे चालवणे स्वामीस परम आवश्यक यास्तव यावरी स्वामी कृपाळू होऊन यासी नूतन इनाम कुलबाब कुलकानू खेरीज हकदार करून मौजे मजकूर पैकी धुरंग धडोळे व पटी खुलखुला सग्यार रयतावा विसापांड्याचे बिघेने जमीन चावर १८ एकरास अजरामरहामत करून दिल्हा असे. तरी सदरहू जमीन मोजून चतु:सीमा करून याचे स्वाधीन करणे आणि इनाम यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. या इनाम-संमंधे याचे माथा सेरणी रुपये ३०० तिनसे ठेविले आहेत. याचा वसूल हुजूर जाला इनाम सुरक्षीत चालवणे. प्रतिवर्षी नवीन सनदेचा उजूर न करणे. या सनदेची तालिक घेऊन असल सनद याजवळी परतोन देणे. निदेश समक्ष.

तेरीख १

जिलकाद. सु॥ सबा सलासीन.

---

**क्रमांक : १६३** दि. २८-२-१७३७

त्र्यंबकभट ढवळीकर हे छत्रपतीना हरिवंशादि पुराणे सांगत असत. त्याना छत्रपती संभाजी दुसरे यानी दहा बिघे जमीन इनाम दिली.

स्वस्ति श्री राजाभीषक शक ६३ आनल[1] नाम संवत्सरे फाल्गुन शुध दशमी इंदुवासर[2] क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी वेदमूर्ती राजश्री त्र्यंबकभट बिन हरभट उपनाम ढवळीकर गोत्र भारद्वाज सूत्र आश्वलायेन वा॥ करवीर यांस दिल्हे इनाम पत्र ऐसेजे. तुम्हीं स्वामी संनीध विनंती केली कीं आपण ब्राम्हण कुटुंबवत्सल योगक्षेमाचा आनकूलता नाही. स्वामी धर्मपरायण आहेत. सवसार चाले ऐसी आनकुलता करून दील्हीया स्नानसंध्या करून स्वामीस कल्याण

---

१ नल संवत्सर पाहिजे;

२ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

चिंतून राहोन म्हणोन. त्यावरून मनास आणिता तुम्ही भले सीष्ट विद्यासंपन्न पौराणीक स्वामी संनीध हरीवंश आधी करून कितेक पुराण सांगितले. तुमचे योगक्षेमाची आनकूलता करून दीधल्याने परमश्रेयस्कर व कल्याणवह (म्हणून १० बीघे जमीन इनाम दिली इ. इ.)[१]

तेरीख ८

जिलकाद सूहूरसन सबा सलासीन मया अलफ.

---

**क्रमांक : १६४** **दि. ३१–३–१७३७**

उदाजी चव्हाण यांची स्वारी शिरोळहून कसबे कुंभोजवर झाली तेव्हा नारायण पाटील ठार झाला होता. त्याच्या मुलास महाराणी जिजाबाई यानी तीस बिघे जमीन इनाम दिली.

श्री

श्रीमन्सकल सौभाग्यादिसंपन्न जिजाबाईसाहेब याणी मोकदमानी क॥ कुंभोज प्रा। रायबाग यासि सु॥ सबा सलासीन मया अलफ दिल्हे इनामपत्र यसीजे. आपगोंडा पा। क॥ मा।र शिवगोंडा याचा भाऊ याचा बाप नारायण पा। उदाजी चवाण याची स्वारी सिरोलहून क॥ मा।रावरी येऊन झुज जाले. ते प्रसंगी नारायण पा। ठार पडला त्याचे मुलाचे योगक्षेम चालण्यानिमित्य साहेब कृपालु होऊन आपगोंडा पा। क॥ मा।र यास नूतन इनाम (दिले इत्यादी) जाणिजे.

छ १० जिल्हेज मोर्तब सिक्याचे अष्टपैलू असे.

---

१ दि. १–३–१७३७ चे छत्रपती संभाजी दुसरे यांचे मौजे पाडली येथे त्रिंबकभट ढवळीकर याना दोन बिघे जमीन दिल्याचे, त्या गावच्या मोकदमाना लिहिलेले पत्र उपलब्ध आहे.

क्रमांक : १६५ दि. १७-४-१७३७

मौजे तोडोली येथील ज्योतिषपणाचे व कुलकर्णाचे वतन बापूजी जनार्दन क्षीरसागर याचे होते. विजापूरच्या अमदानीत त्याच्यावर दंड पडला असता त्यानी ही दोन्ही वतने सूर्याजी घारगे देशमुख यास विकली. त्याच्या मुलाकडून ती शामजी नाईक पुंडे यानी घेतली. परंतु मोगलांच्या धामधुमीत पुंडे राजाराम महाराजाबरोबर जिंजीस गेले तेव्हां वतनाच्या भोगवटयास खंड पडला. वतनाचा भोगवटा चालवावा म्हणून रामचंद्र नाईक पुंडे यानी छत्रपती संभाजी दुसरे याना विनंती केली असता त्यानी ती मान्य केली.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६३ पिंगलनाम संवत्सरे चैत्र बहुल चतुर्दसी रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री श्रीनिवासराऊ पंडित प्रतिनिधि यास आज्ञा केली यैसीजे. राजश्री रामचंद्र नाईक पुंडे याचे पिते रा। शामजी नाईक पुंडे याणी तीर्थरूप राजश्री थोरले कैलासवासी स्वामी राज्यासनारूढ असतां त्यांचे वेळेस मौजे तोडोली कर्यात माइणी या गावी बापूजी जनार्दन क्षीरसागर कुलकर्णी होता. कुलकर्ण व जोतीशपण दोन्ही वतने त्याची त्यास. विजापूरचे पादशाहाचे वेळेस कसाला पडोन दंड पडला. त्याने आपली वतनें विकिली. ती वतने सूर्याजी घारगे देशमूख कर्यात माईणी याणे पैके देऊन विकत घेतली. दोन्ही वतने चालवावयास मुतालिक मुशाहिरा देऊन ठेविला आणि वतनाचा हक इनाम कानू काइदे आपल्या स्वाधीन करून घेऊन अनभऊ लागला. त्यावरी कितेका दिवसान बापूजी जनार्दन खीरसागर मृत्य पावला. त्याचे वौशी कोण्ही नाहीस जाले. याकरिता सूर्याजी घारगे देसमूख याचे पुत्र बहिरायजी घारगे देसमूख याणी कुळकर्ण व जोतिशपणाचे वतन घेतले तो पैका उगऊन यावयास्तव वतन विकावयास लागले. हे वर्तमान शामजी नाईक पुंडे यास कळले. याणी बहिरायजी देशमूख याजवळ बोली करून दोन्ही वतनाचे होन पा। ५१ यकान्न देऊन देशमुखाचे संतोषे दोन्ही वतने खरीदी केली. गोताचे गोहीं साक्षानसी महजर करून घेतला. दिवाणची पत्रे व्हावीं याकरिता

दिवाणात सेरणी होन पा। २५ पंचवीस देऊन दिवाणची पत्रे करून घेतली आणि वतने आपले दुमाला करून घेऊन अनभऊ लागले. त्याउपरी या प्रांते तांम्राचे उल्बण होऊन तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामी राज्यासनारुढ जाले. तेही चंजी प्रांते गेले. नाईक मारनिले संनीध होते. कुलकर्ण जोतीशपणाचा इकडे भोगवटा चालत होता तो राहिला. चंजीस असता चंजी ताम्राने घेतली ते समई वतनांची पत्रे दिवाणची व इत्यादिक होती ती गेली. महजर मात्र तंजावरी यांचे घर होते तेथे होता तो राहिला. सांप्रत आपली वतने आपल्यास हस्तवश्य करून भोगवटा चालवावा म्हणून रामचंद्र नाईक याणी विदित केले. पूर्वील महजर आणून दाखविला. वतने यांची खरी आहेत. हाली वतनाचे प्रसंगाकरिता नाइक मारनिले + + + + + + पाठविले आहे व महजराच नकल करून पाठविली आहे. स्वामीनी तुम्हास हे पत्र सादर केले असे. तरी कर्यात माईणी येथील देशमूख देशपांडे व मौजे तोडोलीचे पाटील आणून वतनाचा हा पूर्व. वृत्तांत चितांत आणून मौजे मजकूरचे कुलकर्ण जोतीषपण दोन्ही वतने नाईक मारनिलेचे स्वाधीन करून सुरक्षित भोगवटा चाले ते करणे. रामचंद्र नाईक पुरातन परंपरागत राज्यातील सेवक. तुम्ही जाणतच आहा स्वामीस यांचे सर्व प्रकारे अगत्य आहे. तरी सदरहू यांची दोन्ही वतने यास सुरळीत चालत ते करणे.

(बहूत लिहिणे तरी सूज्ञ असा). मर्यादेयं विराजते

---

दि. १३–१०–१७३७

**क्रमांक : १६६**

द्वारकोजी यादव यानी शृंगेरीच्या मठाची व मठधिपती श्रीमत शंकराचार्यान्वय श्री विद्याशंकर भारती स्वामी यांची सेवा केली म्हणून स्वामीनी त्यांच्या पाटीलकीच्या गावी साडेतीन बिघे जमीन इनाम दिली. ही जमीन मठास कोल्हापूरच्या महाराजांकडून मिळाली होती.

श्री विद्या शंकर

श्री
अनेक शकीत

विद्याशं
करभारती

श्री मत्परमहंसादिये थोक्त बीरुदांकित शृंगेरी सिव्हासनाधीस्वर श्री मत्छंकराचार्यान्विय श्री विद्याशंकर भारती स्वामी करकमल संजाताभिनव श्री विद्या नरसिंह भारती स्वामीकृत नारायेण स्मरण.

स्वस्ति श्री नृप शालिवाहन षक शके १६५९ पिंगलनाम संवत्सर, कार्तीक सि॥ प्रतिपदा गुरुवासरे वास्तव्ये क्षेत्र करवीर तदिनी राजमान्ये राजश्री द्वारकोजी बिन कृष्णाजी यादव पाटील मौजे बाविडे क॥ हवेली प॥ कोल्हापूर यासी—

आज्ञा करून दिल्हे इनामपत्र यैसेजे. तुम्ही स्वामी कार्यास तत्पर आणि मठीची सेवा बहुत प्रकारे केली. याकरिता स्वामी संतुष्ट होऊन तुम्हांस काहीं उपजीविका करून द्यावी हे ध्यानास अले. आणि केवळ येकनिष्ट जाणोन स्वामी दयाळू होऊन मौजे मजकुरी माहाराज राजेश्री छेत्रपती यानी मठास इनाम भूमि बिघे ८७ सात धारादत सर्वमान्ये इनाम दिल्ह आहे. त्यापैकी भूमी जमीन बिघे ८३॥ मी वीसां पांडाच्या बिघेनें सर्वमान्य इनाम तुम्हास अत्य संतोषें देऊन हे इनामपत्र सादर केले असे. तरी पुत्रपौत्रादि वंशपरंपरा इनाम अनभऊन सुखरूप राहणे. यासी कोण्ही विक्षेप करणार नाहीत. जरी काही कब समधीक विक्षेप करितील त्यास गुरुद्रोह घडल. अणी हिंदुलोक खलल करितील त्यांस गोहत्या व ब्रम्हहत्त्या दोष असे. मुसलमान लोक इस्कील करितील तरी त्यास आपले महजबाची शेफ्त असे. अविछिन्न इनाम मठीच्या तीनी बिघे अनभवीस जाणे बहुत काय लिहिणे जाणिजे.

इत्ये

---

१ सदरहू ब॥ आज्ञापत्र वरील मितीचे स्वामीचें राजश्री कमाविसदार वर्तमान भावी व देशमूख व देशपांडे व मोकादमानी मौ. बायेविडे क॥ हवेली परगणे कोल्हापूर यास ता. छ. २९ माहे जमादिलावल.

**क्रमांक : १६७** **दि. १३-११-१७३७**

तर्फ असडोली येथील जकातीचा वसूल भगवंतराव अमात्य यांच्याकडे द्यावा म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे आज्ञापत्र.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६४ पिंगलनाम संवत्छरे मार्गशीर्ष शु।। त्रितिया रविवासरे क्षेत्रीयकुलावतंस श्री राजा शंभु छेत्रपति स्वामी याणी देशमुख देशपांडे ता।। असडोली यासी

सिका सिका आज्ञा केली ऐसीजे. ता। मा।रच्या बाबती देखील जकात राजश्री भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा याजकडे करार केले आहेत. तरी तुम्ही हे जाणून ता।। मजकूरचे बाबतीचा येवज जकात देखील राव मा।।रनुलेकडे वसूल देत जाणे. दुसरीकडे वसूल न देणे. जाणिजे. लेखनालंकार मोर्तब.

रुजु संमत

मंत्री

बार

---

**क्रमांक : १६८** **दि. २९-८-१७३८**

मौजे डिग्रज बुद्रक प्रांत कागल मालजी चव्हाण याकडे सैन्याच्या बेगमी साठी दिला आहे, म्हणून छत्रपती शाहु यांचे मोकदम मौजे डिग्रज बुद्रुक यास पत्र.

श्री तालिक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६५ कालयुक्त नाम संवत्सरे भाद्रपद बहुल यकादसी भोमवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी याणी मोकदमानी मौजे डिगरज बु।। प्रांत कागल यासी

आज्ञा केली ऐसीजे. मौजे मजकूर पेशजीच्या मोकाशाकडून दूर करून हली राजश्री मालजी चवाण याकडे जमावाचे बेगमीबदल मोकासा दिल्हा असता तुम्ही यास

रुजू होऊन मौजे मजकूरचे मोकासबाबेचा ऐवज याकडे वसूल देणे. जाणिजे. लेखनालकार मोर्तब.

ताा छ २४ जमादिलावल सु।। मया अलफ.

रुजु समत समत समत

मंत्री सरकार

बार सुद्र

---

क्रमांक : १६९ दि. २७–११–१७३८

मौजे केरले येथील पाटीलकी निम्मी अलवणी यांची व निम्मी काडांची. पैकी अलवणी निपुत्रिक. या घराण्यांतील विधवा साखराई हिचा प्रतिपाळ करण्यास कोणी नसल्याने तिने आपले निम्मे वतन कोंडाजी भोसले पाटील यांना तिनशे रुपयांना विकले. हे वतन छत्रपती संभाजी दुसरे यांनी कोंडाजी भोसले यांचे नावे प्रस्तुत सनदेनुसार केले असतां अलवणी यांचे अधिकारहि त्याना बहाल केले.

श्री

सिका आसे

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६५ कालयुक्त नाम संवत्सरे कार्तिक बहुल द्वादशी इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामि याणी कोंडाजी भोसले पाटील मौजे केरले कसबा ठाणे प्रांत पनाळा यासी दिल्हे वतनपत्र ऐसीजे. तुम्ही करवीरचे मुकामी स्वामी संनिध विनंति केली की

शिका पेशवेचा शिका प्रती

मौजे मजकूरचे आलवणी निमे पाटील व निमे पाटील लाड. संभाजी अलवणी याचे पोटी संतान नाही व भाऊबंद कोण्ही नाहीत. आलवणे याचे नकल जाहले. त्यास संभाजी पाटील याचा बाप तुकजी पाटील व भाऊ रुद्राजी पाटील या त्रिवर्गानी ब्राह्मस्व रुपये तीनशेहे करून मृत्य पावले. ब्राह्मस्व फारीख करावयासी व संभाजी अलवणे पाटील याची

बायको साखराई पाटलीण इचे पाली गोहण करावयासीं कोणी अधार नाही. या करिता साखराबाई पाटलीण अलवणी इणे आपले आत्म-संतोषे सदरहू निमे पाटीलकीचे वतन आपली तकसीम विकत रुपये तिनशेहे ३०० घेऊन दिली अणि ऋयपत्रही करून दिल्हे अहे. परंतु माहाराजानी भोगवटियासी सनद करून देविल्या पाहिजेत म्हणून विदीत केले व पत्रहि विदित केले. त्यावरून मनास आणिता मौजे मजकूरचे अलवणी पाटील याचे नकल जाहले या करिता संभाजी पाटील याची बाइको साखराई पाटलीण अलवणी इणे आपली तकसीम वतन तुम्हास विकत दिल्हे आहे. त्या प्रमाणे स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन मौजे मजकूरचे निमे पाटीलकी अलवणी याची तुम्हास दिली असे. या वतनास कलमे

| किता | किता |
|---|---|
| १ नांगर | १ हक |
| १ होलीची पोली | १ इनाम |
| १ कलस | १ मेट कुडो |
| १ राहटचा कनंवर | १ पडद |
| | १ श्री यमाईची पूजा |
| ४ | ५ |

यकूण कलमें नऊ ९ करार करून निमे पाटीलकीचे वतनी वडीलपण दिल्हे असे. तरी तुम्ही सदरहू निमे पाटीलकीचे वतन अलवणी यांचे वडीलपण व कानु काइदे पुरातन चालते आहेत त्या प्रमाणे तुम्ही व लाड या उभयतानी अनभवणे व मौजे मजकुरी नांगर दोन त्यास आधी नांगर तुम्ही करावा. मागून भिकाजी लाड पाटील याणे करावा. या प्रमाणे निर्वाह करून दिला असे. तरी तुम्ही सदरहू अलवणे याचे निमे पाटीलकी वडीलपण व कानू काईदे असतील ते तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन वतनाची सेवा करीत जाणे. वतनसंबंधे तुमचे सेरणी रुपये शंभर १०० करार केले आसे. याचा वसूल हुजूर चा इ. ला. तुम्ही वतन अनभऊन सुखरूप राहणे. निदेश समक्ष.

शिक्का आसे.

तेरीख २५

शाबान सु॥ तिसा सलासीन

---

क्रमांक : १७० इ. स. १७३८

छत्रपती शाहू यांची बाळोजी साळोखे यास ताकीद की, मिरज प्रांतातील चार कर्यातीची मोगलाईबाब छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडे वारणे कृष्णेच्या तहान्वये देण्यात आली आहे. तरी सदहूं कर्यातीना उपसर्ग देऊ नये.

श्री

तालीक

राजश्री बाळोजी साळोखी यासी आज्ञा केली येसीजे. कृष्णे व वारणे पलीकडे चिरंजीव राजश्री यासी पूर्वी तह करून दिल्हा आहे. त्यास मिरज प्रांतीच्या कर्याती ४ च्यार पलीकडे आहेत. त्याची मोगलाईबाब त्याकडे दिल्ही असे. कर्याती बी त॥

| | |
|---|---|
| कर्यात इचलकंर्जी देहे ९ | कर्यात सिरहटी |
| येकून कर्यात १ | देह १२ पै॥ वजा |
| कर्यात रुकडी देह ९ | कृष्णे आलीकडे देह |
| येकून कर्यात १ | ४ च्यार |
| कर्यात उदगाव देह ९ | १ आलास १ गौरवाड |
| येकून कर्यात १ | १ आउरवाड १ सेडसाळ |
| | २ २ |

येणे प्र॥ च्यार येकून देह पंचवीस येथील मोंगल बाब चिरंजीव राजश्री याकडे दिल्ही आसे. तुम्हास दखलगिरी करावयास गरज नाही. कृष्णे वारणे पलीकडे पूर्वील तह आहे त्या प्रांतात रोखापत्र येकंदर न करणे. बहुत काय लिहिणे.

---

**क्रमांक : १७१** **दि. ५–२–१७३९**

बाजीरावाच्या सैन्याने गोव्यावर स्वारी केली, त्या सैन्यांत करवीरचे छत्रपती संभाजी दुसरे यांच्या काही सेनाधिकाऱ्यानी भाग घेतल्याबद्दल गोव्याच्या व्हाइसरॉयने संभाजी दुसरे यांना पाठविलेल्या या पत्रात सौम्य तक्रार केली आहे.

संभाजी राजे यांस

मला बातमी कळली आहे की, सांप्रत आपण आपल्या राजधानीहून मेलुंडीला माझ्या शेजारी आला आहात. ह्या शेजारधर्मानुसार मी आपणाला हे पत्र लिहित आहे व आपल्या मैत्रीस अनुसरून आपले आपले स्वागत करीत आहे. हे मैत्री टिकावी अशी माझी इच्छा आहे. परंतु मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे की; माझ्या साष्टीच्या प्रदेशांत बाजीरावाने जे सैन्य धाडले आहे त्यात आपल्या काहीं सेनाधिकाऱ्यांचा व प्रजाजनांचा अंतर्भाव आहे. माझी अशी समजूत आहे की, त्यांनी आपली संमती न घेतां बाजीरावाची मर्जी संपादन करण्यासाठी ह्या स्वारीत भाग घेतला असावा. कारण, आपली मैत्री बिघडण्यासारखे कोणतेच कृत्य घडलेले नाही. मला आपणास कळवायचे आहे की, आपल्या मैत्रीत विद्रोह होण्यासारखे कोणतेच अनुचित कृत्य मी माझ्या हातून होऊ देणार नाही. उलट मैत्रीं टिकविण्याचाच प्रयत्न करीन. आपण एकमेकांचे चांगले शेजारी आहोत हे सिद्ध करण्याचे प्रसंग वारंवार यावेत अशीच माझी इच्छा आहे.

देव आपले भले करो.

गोवा ५ फेब्रुवारी १७३९

कौंट द सांदोमिल

---

**क्रमांक : १७२** **दि. १८–९–१७३९**

भोवाणा आणि तवणाना या दोघांमध्यें मौजे हेरलें तर्फ ठाणे येथील चौगलकी बाबत तंटा लागला होता. सदहू चौगलीवर भोवाणाचा हक्क असल्याचे अभयपत्र चिंतो पंडीत न्यायाधीश यानी दिले.

श्री

शिका वर्तु
ळाकार आहे

आभेयपत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री चितो पंडीत न्यायाधीश ताहा भोवाणा बिन चोवाणा चोगुले मौजे हेरले तर्फ ठाणे प्रांत पनाला सुरु सन आर्बैन मया आलफ. दिल्हे आभेयपत्र येसीजे. हेरले याचे मुकामी तवणना चोगले याने हुजूर येऊन विदीत केले की भोवाण याने वतन खातो म्हणोन आर्ज केला. त्यावरुन तुज हुजूर आणून विच्यारले. त्यास तू बोलिलास की आम्हास वडील देशमुख व देशपांडे व पाटील कुळकर्णी आहेत. जे विचारण ते त्यास विचारणे. त्यावरुन देशमुख व देशपांडे व पाटील कुळकर्णी व समस्त मोकदम व बारा बलुते यास हुजूर आणून आज्ञा केली की आपले सत्य-स्मरोन इमानपूर्वक जे आसेल ते उभयतांचे सांगणे. त्यावरुन देशमुख व देशपांडे व पाटील व कुळकर्णी व समस्त मोकदम वतनदार बलुते यानी सांगितले जे भोवणा बिन भोमणा हा चोगली याचे वोशान खरा. त्यास चवणा बिन आवणा गावं जलाला ते समई उभयता वाईमा समवेत मृत्य पावला. ते समई आम्ही समस्तानी तवणना मजकूर यास विचारले जे चवणास गतीस लाऊन त्याचे आसामीचे सेत व घर जागा व मठ चोगलकीचे वतन तू करणे. त्यास तो बोलिला जे आपण आशक्त आपले हातून होत नाही. आमचा वडील भोवाणा आहे. त्यास विचारुन त्याने मान्य केल तर त्याचे स्वाध्यन करणे म्हणोन बोलिला. त्यावरून आम्ही सर्वत्रानी भोवाणा यास आणून विचारले जे चोगुला मजकूर मृत्य पावला. त्यास गतीस मिळवून त्याचे आसामीचे चोगलकीचे वतन खाणे ये गोष्टीस काही फिकीर नाही येसे सांगितले. त्यावरून उतर दिल्हे जे आपणास तुम्ही मायेबाप वडील निरोपाल त्याप्रमाणे हजीर असो म्हणोन बोलिला. त्यावरून भोवाणाने चवणास गतीस मिलविले त्यापासून चवणाचा पुत्र भोवणास केले. चोगलकीचे वतन वडीलपण त्याचे स्वाधयन केले. तो आनभवित आला. त्यास पत्रे आम्हा समस्ताची वणनाचे करून दिल्ही आहेत. येसे आसता हाली तवणना मजकूर

साहेब यासी दयाल जाह्ला. त्यावरून आम्हा समस्तास बोलाऊन आणून याची तहकीकाता विचारली. त्यावरून सेवेसी जाह्ला करीना सांगितला आसे. त्यावरून मनास आणून तू चोगले याचे वौशज खरा येसे चितास आणून तुजे वतन तुजे दुमाला केले आसे. तवणानास तुजसी चवणाचे वंताविसी कजीया करावया समंध नाही. तू चवणाचा मला व घुमणाचे आसामीचा. मला सेत आनभऊन दिवण चाकरी करून सुखरुप राहणे. चोगलेकीचा हक दला पान मान व इनाम पुरातन पूर्वापार जे आसल ते आपले वौशपरंपरेने आनभऊन वतन खाऊन सुखरुप राहणे. जाणिजे.

छ २५ जमादिलावर पौ हुजूर मोर्तब आसे.

---

**क्रमांक : १७३** **दि. २९-३-१७४०**

छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडून नागेशभट धोपेश्वरकर यास मौजे बेळकेवाडी तर्फ आजरे हा गाव इनाम. आजऱ्यावर इचलकरंजीचे व्यंकटराव नारायण घोरपडे यांनी स्वारी केली, तेव्हा नागेश भट धोपेश्वरकर याने आपली कागदपत्रे पुरून ठेवली होती. ती वाळवीने खाल्ल्याने छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडे त्याने नूतन इनाम पत्राची मागणी केली होती.

श्री

सिका

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६६ रौद्री नाम संवत्छरे चैत्र शु॥ त्रयोदसी मंदवासर क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शंभू छत्रपति स्वामी याणी वेदमूर्ति राजश्री नागेशभट बिन गणेश भट उपनाम धोपेस्वरकर गोत्र काश्यप सूत्र आश्वलायन वास्तव्य कसबे आजरे

शिका शिका यासी दिल्हे इनामपत्र अैसाजे. तुम्ही करवीरचे मुकामी हुजुर येऊन विदित केले की आपणास पैशजी माहाराजानीं पेसजी सौम्यनाम संवत्छरी मौजे बेळकेवाडी तर्फ आजरे

हे वाडी इनाम करून दिल्ही आहे व पत्रेही माहाराजाची होती ती राजश्री व्यंकटराव नारायण याची स्वारी कसबे मजकुरावर होऊन स्थळ हस्तगत केले ते समई पत्रे भूमिगत करून ठेविली होती. तेथे वाळवीचा उपद्रव होऊन पत्रे नाशाते पावली भोग(व)टयाची पत्रे असली पाहिजेत याकरिता माहाराजानी नूतन पत्रे भोगवटीयास देविली पाहिजे म्हणोन विनंती केली. त्यावरून (नवीन पत्रे दिली इत्यादी.)

तेरीख ११ मोहरम सु॥ आर्बैन.

---

**क्रमांक : १७४** **दि. १७–६–१७४०**

**छत्रपती संभाजी दुसरे यानी मौजे बाविडे या गावातून वाणी व इतर धंदेवाले लोक जातील त्यांच्याकडून दर बैली कुमारकी वतन केणे व भूस रुके तीन दर बैलास घेण्याचा अधिकार द्वारकोजी यादव यास दिला. सदरहू गाव त्यांच्या पाटीलकीचा होता.**

श्री

श्री
प्रतिपच्चंद्ररेखे
व वर्धिष्णुर्विश्व वं
दिता शंभु छत्रप
तेर्मुद्रा राम सूनो
विराजते

स्वस्ति श्री राज्याभिषयक शके ६७ रौद्रनाम संवत्सरे आषाढ शुध चतुर्थी भोमवासरे क्षत्रीये कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपती स्वामी याणी द्वारकोजी बिन कृष्णाजी यादव सिका सिका पाटील मौजे बाविडे ता। हवेली कोल्हापूर यासी दिले वतनपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामी संनीध विनंती केली कीं आपण वतनदार माहाराजांची सेवा करीत आहो. माहाराजानी पाटीलकीच्या वतनास मौजे मजकूरच्या

मार्गे वाणी बकाल जातात त्यास दर बैली कांहीं कुमारकी चालत नाहीं म्हणोन विदित केलें. त्यावरून मनास आणितां तुम्ही वतनदार स्वामीच्या पायांसी निष्ठेनें वर्तन आहां या करितां तुमचें चालवणें स्वामीस अगत्य. यास्तव स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन पाटीलकीच्या वतनास मौजे मजकूरचे मार्गे वाणी बकाल जातात त्यासी कुमारकी द(र) बैली केणें[1] व भूस[2] रुके ८८३ तीन रुके दर बैली करून दिले असेत. तरी तुम्ही सदरहू कुमारकी तीन रुके प्रा तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरे आनभऊन वतनाची सेवा करून सुखरूप राहणें.[3] निदेश समक्ष.

मर्यादेयं
विराजते

तेरीख ३
रबिलाकर सु॥ ईहिदे आर्बैन रुजु समल
मंत्री
सुरु सुद्र बार बार समत सुद्र बार

---

**क्रमांक : १७५** **दि. २०-१२-१७४०**

वेदमूर्ति बाळंभट गाडगीळ यांचे मौजे मिटबावी येथील धर्मादाय वतन पूर्ववत चालू ठेवले आहे म्हणून नरसिंहाचार्य पंडितराव यांचे देशाधिकारी व देशलेखक प्रांत राजापूर यांस पत्र.

---

१ केणे = विक्रीसाठी जाणारा कोणताही जिन्नस. त्यावर घेतली जाणारी जकात ते केणे; २ भूस = एक जूना कर.

३ याच प्रो॥ याच मितीचे शंभु छत्रपती यांचें आज्ञापत्र राजश्री मल्हारजी भोसले मुद्राधारी व कारकून किले कोट कोल्हापूर यास. सिके २ व मोर्तबसहीत. आज्ञापत्र शंभू छत्रपती यांचे सेटे माहाजन व माहानाड व वाणी उदमी मार्गं मौ. बाविडे ता॥ हवेली कोल्हापूर यांस. मिती मूळ सनदेप्रमाणे. सिके २ व मोर्तबसहीत.

श्री

श्रीसकलगुणमंडित अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री देशाधिकारी व देशलेखक वर्तमान(व) भावी प्रांत राजापूर गोसावी यासी

श्री चि तामणिच रणी शरण

प्रति नृसिन्हचार्य पंडितराय असीर्वाद. राज्याभिषेक शके ६७ रौद्रनाम संवछरे पौष शुद्ध त्रयोदसी भृगुवासरे वेदमुहूर्ती बाळंभट बिन माहादेवभट उपनाम गाडगीळ गोत्र + + + सूत्र आश्वलायन वास्तव्य मौजे मिटबावी ता।। साळसी प्रां।। म।।र याणी समीप येऊन विदित केले की आपले पिते महादेवभट बिन फटंभट यास मौजे मारी श्री ---- देव जागृत आहे त्याचा नित्याभिषेक पूर्वी दिल्हा आहे तो चालत आहे. त्यास आपले पिते + + + जाले त्याच नावे पत्र होते ते आपल नावे करून द्यावे म्हणोन विदित केले. त्यावरून वेदमूर्ती साक्षर भले कुटुंब वत्सल. याचा योगक्षेम चालावयाकरिता पेशजी राजश्री पंडितराय याणी श्री——चा अभिषेक सांग व्हावा यैसे पाहून वेदमूर्तीचे पित्यास अभिशेक दिल्हा होता तो करार करून वेदमूर्तीचे योगक्षमास पहिला धर्मादाय कैली कोटी मापे देसरी बारुले भात ।।।.१ सोळा मण होते ते करार करून हे नवीन सनद भोगवटियास दिल्हे आहे. तरी सदरहू धर्मादाय प्रविष्ट करीत जाणे. वेदमूर्ती श्री———स नित्याभिषेक करून सुखरूप राहेत असे कर्णे. प्रतिवर्शी नवीन पत्राचा अक्षेप न कर्णे. प्रति लिहून घेऊन मुख्य पत्र भोगवटियास वेदमूर्तीपासी परतोन देणे. जाणिजे.

छ ११ शौवाल सु।। इहिदे आर्बैन मया अलफ. पै।। हुजुर हे असीर्वाद

मोर्तब शुभंभ वतु

---

**क्रमांक : १७६** **दि. ११-१-१७४१**

छत्रपती संभाजी दुसरे याना मिरज प्रांतातील चार कर्यातीतील पस्तीस गावची 'मोगलाई बाब' छत्रपती शाहू यानी दिल्याचे हे पत्र आहे.

श्री

तालीक

श्रीयासह चिरंजीव विजईभव. राजश्री संभाजी राजे यासि प्रति शाहू राजे कृतानेक असीर्वाद. उपरी कृष्णे व वारणे पलीकडे तुम्हांस पूर्वी तह करून दिल्हा आहे. त्यास मिरज प्रांतीच्या कर्याती च्यार पलीकडे आहेत त्याची मोगलाईकडील बाब तुम्हाकडे दिल्ही आहे.

कर्याती बी तपसील—

कर्यात इचलकरजी देह नव

| | |
|---|---|
| १ कसबा | १ रेणदाळ |
| १ दटवाड | १ चंदूर |
| १ कोडोली | १ सुळकोड |
| १ लाट | १ सिरदवाड |
| १ हुपरी | ४ |
| ५ | |

कर्यात रुकडी देह नव

| | |
|---|---|
| १ कसबा | १ कवनूर |
| १ हरोली | १ तिळवणी |
| १ येडराव | १ मुर्डसिगी |
| १ शाहापूर | १ आतिकरे |
| १ कोंडिकरे | ४ |
| ५ | |

कर्यात सिरहटी देह १२

पै।। वजा कृष्णे आलीकडे

देह—

| | |
|---|---|
| १ आलास | १ आउरवाड |
| १ गौरवाड | १ शेडबाळ |
| २ | २ |

वजा देह ४ बाकी देह ८

| | |
|---|---|
| १ कसबा | १ टाकळी |
| १ कनवाड | १ हासूर |
| १ कुंटवाड | १ धरणगुती |
| १ धारवाड | १ बस्तवाड |
| ४ | ४ |

देह ८

कर्यात उदगाव

| | |
|---|---|
| १ कसबा | १ जैनापूर |
| १ उमलवाड | १ वाठार |
| १ कोथळी | १ नेज |
| १ दानोळी | १ खोपसी |
| १ चिपरी | ४ |
| ५ | |

७

देहे ९

येणेप्रो देहे ३५ पसतीस येकून कर्याती च्यार येथील मोगलाई-बाव तुम्हाकडे दिल्ही असे. इकडील दखलगिरी होणार नाही. रौद्रनाम संवछरे माघ शुध पंचमी. ( येथून खासे दस्तुरची आक्षरे ) पंचतीस ३५ गावची मोगलाई बाब मिरज प्रांतीची कृष्णा व वारणा पलीकडची दिल्ही आसे. पूर्वील तहतील. आसीर्वाद.

---

**क्रमांक : १७७** इ. स. १७४१–४२

शामभट मुनेश्वर यांच्या विनंतीवरून मोकदम मौजे उचगाव यास विजापूरच्या सुभेदाराने दिलेले हे अभय पत्र आहे. गावी निर्भयपणे येऊन लावणी संचणी करावी असे अभय यांत दिले आहे.

शिक्का पारसी

कौलनामा ताा मोकदमानी मौजे उचगाव का। हवेली पाा कोल्हापूर सरकार रायेबाग अजमदारुलजफर विजापूर सु।। सन ११४२ दादे कौलनामा यैसाजे. तुम्हाबाबे म।। शामभट मुनेस्वेर येऊन मालुम केला जे साल गु।। लावणी जुजबी जाहाले होती. त्यास लस्करचा कसाला पडोन रयेत परागंदा जाहाले. गाव उज्याड पडला. लावणी होत नाही. तुम्हाकडील स्वारी शिकारी होईल म्हणून धासत घेतली अहे. त्यास कौल दिल्याने बेशेक होऊन गावावर येऊन लावणी करतील म्हणून मालूम केले. बराये मालुमाते खातीरसे अणून तुम्हास कौल मऱ्हामत केला असे. अपला खातीरजमा राखोन गावावर येऊन कीर्दी अबादानी करून खुशाल राहाणे. कोणे बाबे शेक न धरणे. दरीबाब कौल असे. मो।। सुद.

---

**क्रमांक : १७८** दि. १७–६–१७४२

भानजी संभाजी घाटगे सर्जेराव याने सादर केलेला हा करीणा म्हणजे कागलच्या घाटगे घराण्याची हकीकत आहे.

श्री

राजेश्री गोतगंगा थल मौजे वाघेरी प्रांत कराड

यांचे सेवेसी——

करीणा बे।। भानजी बिन संभाजी घाटगे सर्ज्याराव देशमूख प्रांत कागल सु।। सलास आर्बेन मया व अलफ. कारण लिहून दिल्ह करीणा यैसाजे. त्रिबकजी बिन मलजी घाटगे सर्ज्याराव देशमुख प्रां। म।।र यात व आम्हात वतन समध कजिया लागला. त्यामुळ हुजुरून निवाडियास तुमचे थल देऊन उभयतास पाठविले. राजीनामे व जामीन घेऊन करीणा लेहून द्यावयाची आज्ञा केली त्यावरून करीणा आम्ही तुमचे सेवेसी लिहून दिल्हा आहे. आमचे पणजे भानजी घाटगे सर्ज्याराव याचे बाप पदाजी घाटगे बाजी व त्याचे धाकटे भाऊ आबाजी घाटगे बाजी या उभयतांचे पोटी पुत्रसंतान नाही. पदाजी घाटके बाजी यासी तिघी बायका असून पुत्र नाही. तैसच आंबाजी घाटके बाजी यासीही पुत्र नाही. त्याची बहीण गुणाबाई तानाजी काटकर हे पादशाजवळ आपले दौलतीवर होते त्यास दिल्ही होती. ती गरोधर होती म्हणोन माहेरास भावानी प्रसूत व्हावयास आणिली होती. घरी बहिण व भाऊ येक ठाई त्रिवर्ग जेविता उभयेता भाऊ बोलिले की तुझे पोटी पुत्र जाहाला तर आम्हास देणे यैसे बोलिले. नंतर गुणाबाइन उतर केले जे तुम्हा खेरीज मज दुसरी जोड काय आहे. त्यावरून उभयेता बंधू बोलिले जे ताठावर हात ठेऊन ते आम्हास सत्य सांगणे. त्याजवरून गुणाबाईने ताठावर हात ठेऊन सांगितले जे आपले वडिलापासून मागून घेणें म्हणजे आम्ही मात्र आसो हे सत्य यैस उतर दिल्हे. त्याजवर प्रसूत होऊन पुत्र जाहालीवरी पुढे गुणाबाईस व मुल पालखीत घालून पदाजी घाटगे बाजी व आबाजी घाटगे बाजी याणी आपले कबिले समवेत घेऊन विज्यापूरास गेले. मग गुणाबाईचे दादलेस सांगून पा। जे आम्ही आलो म्हणोन सांगो पा।. त्यास ते समई सामोर आल नाहीत म्हणोन रुसवा करून दुसरे जागा राहिले. तेव्हा त्याची बायको त्याजकडे पाठऊन दिल्ही. त्यावर दुसरे रोजी उभयता बंधू पादशाहाच्या मुजरेस

गेले. मेहेरबानीचा वख्त समजोन पदाजी व आबाजी घाटगे बाजी याणी अर्ज केला जे आपले पोटी संतान नाही. साहेबी दौलतही बहूत दिल्ही आणि कागलचे देशमुखीचे वतन आहे. परंतु पोटी पुत्र नाही. त्यास तानाजी काटकर यासी आपली बहीण दिल्ही आहे तिचे पोटी पुत्र आहे तो घ्यावा याचा हुकुम काय म्हणोन आर्ज केला. त्याउपरी पादशाई हुकुम जाहला जे आवलादकी आफलाद या दोहोतील घ्यावा. यैसी आज्ञा जाहलियावरी मागुती पदाजी घाटगे बाजी याणी आर्ज केला की तानाजी काटकर यास आणून हुकुम होऊन साहेबी वोटयात घालावा. त्याजवरून वजीर उमराव मानकरी इत्यादिक सर्वत्र बोलाऊन आणून नंतर काटकर यासी आणून तुझा लेक आपणास देणे म्हणून त्यास वचेनास गोविले. मग पदाजी घाटगे बाजी याच्या *वस्त्राआलंकार देऊन मूल वोटयात घातला. ते समई नाव भानजी घाटगे यैस ठेविले आणि उभयतासी समजाविसी केली. साखरा वाटल्या. नौबतीस हुकुम जाहला. त्याजवर पदाजी घाटगे बाजी यासी वडील बायको राजाई वांज होती. तिने या मुलाची निगा करून आपल्या स्थनास लाविताना पाना फुटला. तिण मूल थोर केला. दाहाबारा वर्षाचा होताच तिसरे बायको आंताईस तिघ पुत्र जाहाले. वडील नरसोजी दुसरा कृष्णाजी तिसरा आनेसाजी यैस तिघ पुत्र जाहाले. दुसरे बायकोस लेक जाहाली. धाकठा भाऊ आबाजी घाटगे बाजी यासी दोघ पुत्र जाहले. त्याउपरी भाऊ भाऊ काही दिवसानंतर वेगळे निघाले ते समई वतन व कमत हाक कानू-कायदे व मळी प्रगणेपै।। वडील विभाग काढून निमी निम केले. त्याउपरी पदाजी घाटगे बाजी याचे म्हातारपण जाहाले. ते समई चवघा पुत्रास आणोन विच्यारिल जे आणला जीवमान आहे तो तुमची विल्ह लाऊन देतो म्हणोन बोलिले. मग घरची बिशाद पै।। जेष्ट वाटा भानजी घाटगे यासी दिल्हा. त्याचा तपसील छत्री व घोडा देवास व फिरंग व नागाई कुणबीण यैस पाच दागिने वडिलाकडे दिल्हे. बाकी बिशाद चऊ जागा केली व घरवाडा कागलातील दोन जागा केला. आपले वडील भानजी घाटगे यासी निम व त्याचे भाऊ तिघ यासी निम याप्राो जागा वाटून दिल्हा. त्यावर इनाम कसबा कागलचे वतनापै।। निम भाऊ आबाजी घाटगे बाजी याची वंशाकडे निम जाऊन

निम उरल त्यापै।। आपले वडिलाकडे निमी बाग दिल्ही. तिचे नाव भान बाग यैस ठेविले. निमी उरले ती या तिघा भावास दिल्ही. तिच नाव खासबाग ठेविले. तसेच कमत काटी व हाक दक कानू कायदा प।। मजकूरचे सिरस्तेप्रमाणे वडिलानी नेमून देऊन विल्हे लाविली. पुढ देह आवसानाचे समई भानजी घाटगे याणी मांडी दिल्ही होती तेव्हा हे तिघ भाऊ जवळ होते. ते वेळेस पदाजी घाटगे बाजी यानी भानजी घाटगे वडील पुत्र याचे गळा सिका घातला. त्याउपरी पदाजी घाटगे बाजी मृत्य पावले. त्यावर कांही दिवसान दौलत भाहाल[1] करावया-बदल चवघ भाऊ मिळून विजापुरास गेले. पादशाहाचा मुजरा जाहाला तेव्हा भानजी घाटगे बाजी याजवर मेहरबानी होऊन त्याचे नाव दौलत जाहागीर भाहाल जाहली. याउपरी गावास येऊन पहिले मुतालिक वतनावर करार करून ठेविले. आपण चाकरीवर विज्यापुरास मागुती गेले. त्यावरी कितका दिवसा हिंदुस्थानाहून विज्यापुरावर नामजाद मुधां सर्ज्याराव रजपूत आला तेव्हा राजश्री शाहाजी राजे भोसले व भानजी घाटगे बाजी व इत्यादिक उमराव पादशाहानी त्याजवर रवाना केले. तेथ लढाईमधे मुधा सर्ज्याराव यासी भानजी घाटगे याणी येकांगी करून त्यास मारून त्याचा घोडा सर्ज्या समवेत पाडाव करून आणिला. ही खबर कागलास पोचली. त्यावरून नरसोजी घाटगे विज्यापुरास भेटीस गेले. नंतर भानजी घाटगेही लष्कराहून विज्यापुरास आले. नंतर भावाभावाच्या भेटी जाहाल्या. तेव्हा सर्ज्या भावाजवळ बजीद[2] होऊन मागितला तेव्हा भानजी घाटगे बोलले जे पादशाहापासून आर्ज करून देऊ यैसे बोलून मुजऱ्यास गेले तेव्हा पादशाहा मेहरबान होऊन घोडा सर्ज्यासमवेत वस्त्र जवाहीर भानजी घाटगे यासी दिल्ही आणि सर्ज्याराव किताबदी दिल्ही. ते समई भानजी घाटगे सर्ज्याराव याणी आर्ज केला जे आपला भाऊ नरसोजी घाटगे यासी द्यावा. तेव्हा पादशाहा हुकुम जाहला जे तुम्ही पाडाव केला

---

१ भाहाळ = बाहाळ = घेणे.

२ बाजीद = अजीज; दीन; श्रमी.

तुम्हास दिल्हा. तुम्ही आपले घरी ठेवणे. तेव्हा आपल्या भावांस देणे यैसा जाब जाहल्यावर आपल्या डेऱ्यास येऊन सर्ज्यासमवेत घोडा भावास दिल्हा. भाऊ भाऊ येका विच्यार पुढ चालत होते. वतनाचा कारभार मुतालिकाकडून घेत होते. त्यावर कितेका दिवसी भानजी घाटगे सर्ज्याराव मृत्य पावले. नंतर काही दिवसान परगणे जप्ती होऊन राजश्री शहाजी राजे यासी जाजती बेगमीस दिल्हा. यावर भानजी घाटगे सर्ज्याराव याचे पुत्र पाचजण राजश्री शाहाजी राजे याजकडे तैनातीस राहून परगणे सोडविले. नंतर त्याचे पदरी पाळ्याच्या मसलतीस पदाजी घाटगे सर्ज्याराव पडले. संताजी घाटगे सर्ज्याराव व तानाजी घाटगे सर्ज्याराव व त्रिबकजी घाटगे सर्ज्याराव व विठोजी घाटगे सर्ज्याराव हे चवघ भाऊ माहाराजाजवळ होते. तेथ नरसोजी घाटगे याणी माहाराजास आर्ज केला जे बदभाऊ जोरावर होऊन आम्हासी रेटितात. याजकरिता साहेबी रजा दिल्हेया वतनावर घेऊन जाऊ यैसा आर्ज केला. त्यावरून निरोप दिल्हा. मग चवघास घेऊन येत होत. वाटेस बावाजी भोसले यांची गाठ पडली. त्याणी 'माहादजी नाईक निंबाळकर याचे आपली लढाई आहे म्हणोन बजीद होऊन घेऊन गेले. गार घोडेवर झुज जाहले. तेथे नरसोजी घाटगे व आपले वडील संताजी व तानाजी घाटगे सर्ज्याराव यैस तिघ पडिले. त्रिबकजी व विठोजी घाटगे सर्ज्याराव यासी जखमा लागल्यावर मलवाडीकर साबाजी घाटगे बाजी याणी बर करून गावास लाऊन दिल्हा. तेथ आपल वडील पदाजी व आबाजी घाटगे यैस एकरूप वतन आनभऊन होते. त्याउपरी बदभाव-कीच्या पेचामुळ नरसो तुळजो ठाणेदार रायबाग यासी सामील करून घेऊन पदाजी घाटगे यासी बागमधे मारिले. मग त्रिबकजी घाटगे सर्ज्याराव सिके जमदाड सर्ज्या देऊन पळविले. वाड्याच्या कुसबा वरून खाली सोडून पळविले. त्यावर त्रिबकजी घाटगे सर्ज्याराव त्याच झुंजात पडले. उपरी आमचा आजा विठोजी घाटगे सर्ज्याराव त्याचा आजा धाकटा आबाजी घाटगे येऊन कसबा डिगरजात राहिले. त्याचेमध्ये कितेका दिवसी कागलही वसाड होऊन निमचा भाऊही तेथ आले. तेथे येकरूप चालत होते. त्याउपरी कागलात आवघ्यानी जाऊन बस्ती केली.

मग निमेचे पिराजी घाटगे याणी दौलताबादावर जाऊन कागल जाहागीर आपणाकडे करून आले व आवरगशा यासही आणिले. नंतर आमचे वडील कोकणात सावंताच्या आसरेस जाऊन राहिले. तेथे आमचे वडिलास कोकण सोसना. चुलत मलजी घाटगे सर्ज्याराव मारुल भवालेत होते त्यास खबर कळली. त्यावर ते येऊन आमचे वडिलास घेऊन आले. मग राजश्री राज व इत्यादिकही चंदावरास गेले. मग राजश्री रामचंद्र-पंताजवळ राहून कागलचा परगणा त्याजकडून सोडऊन घेऊन वतनावर राहिले. त्यावर विशाची बाधा होऊन मलजी घाटगे सर्ज्याराव मृत्य पावले. मग संभाजी घाटगे आपले वडील राजश्री हिंदुराव घोरपडे याजकडे जाऊन राहिले व संताजी घाटगे कोकणात होते. यमगेकर पाटील याचा भाऊ पिराजी घाटगे जिमेदार याणी मारिला म्हणोन यमगेकरानी संभाजी घाटगे व संताजी घाटगे या उभयतास खबर कळविली. नंतर त्रिवर्ग मिळोन चिकोडीकर देसाई बस(व)प्रभू याजकडे जाऊन सेंडुरात जागा मागून घेतला. तेथून सिलसिली लाऊन मुरगूडचा हुडा घेऊन तेथ राहिले. त्यावर दोन वरशात कागलास राजश्री हिंदुराव घोरपडे व चंद्रसेन जाधवराव याणी वेढा घातला ते समई आमचे वडील हिंदुराव घोरपडे याकडे चाकरी होते. तेव्हा रदबदली करावयासी कागलात गेले. परंतु बंनाव जाहला नाही. आपण वतनदार भावावर वाखा आला त्यासी अंतर करू नये यास्तव लस्करात आपले वडील बंधू तुकोजी घाटगे सर्ज्याराव याचे पुत्र चांदजी घाटगे सर्ज्याराव घोडी बिशाद डेरा दाडा याची सोड करून भावाचे कुमकस कागलात राहिले. हे वर्तमान हिंदूराव यासी कळलेवर त्याची घोडी बिशाद लुटून चांदजी घाटगे सर्ज्याराव यासी कैद केले. दुसरे रोजी गावावर हाला जाहाली. ते समई हाला मारून काढिली. तेव्हां गावांत तुकोजी घाटगे सर्ज्याराव आमचे चुलते पडले. त्यासी माती द्यावयासी भाहीर नेहले ते समई आबाजी व मलजी व संताजी घाटगे यासी बोलाविले. त्याणी सांगू पा।। जे आमचे बागेत लस्करची दाटी त्याच बागत माती द्याल तरी आपण येत नाही. यैसे सांगून पा. तेव्हा संभाजी घाटगे याणी आपली बागमध्ये नेहून माती दिल्ही. त्यापासून आपले बापात व त्यात कलह लागला. याबद्दल पनाळेवर मातुश्री ताराआऊसाहेब याजपर्यंत खटला पडला. तेव्हा तेथ

इनसाब जाहली ते ' समई राजश्री रामचंद्रपंत व हिंदूराव व चंद्रसेन जाधवराव व कुसो मल्हार व शाहाजी नाईक व साबाजी नाईक निंबाळकर व गिरजोजी यादव येसाजी मोहिते तळबिडकर व लष्करात इत्यादिक म्हराट होत. त्याचे वि।। करार जाहला जे वडील वडील येथाविभाग चालत आले त्याप्र।। चालाव. त्याची पत्रे हुजुरची होती त्या निवाडेप्रो। डिगरजत आपले वडील राहून वतन अनभवीत होते व त्रिंबकजीच वडिल मुरगुडांत राहून वतन आनभवीत होते. काही याचा त्याचा वतनसमंध कजिया नव्हता. काही दिवसी राजश्री बाळो विश्वनाथ याणी आष्टेच ठाण घेतले. ते समई हुजुरची पत्र गेली. पुढ डिगरजवर मिर(ज)कराची स्वारी आली तेव्हा झुज जाहले. तेथ आपले बाप संभाजी घाटगे सर्ज्याराव पडले. त्याउपरी आपले मातुश्री गुणाबाईन वीस बावीस वर्ष वतन आनभविले. नंतर पनाळेहून राजश्री संभु माहाराज छत्रपती याणी मुरगुडावर जाऊन मुरगुडास तोफा लाऊन मुरगूड घेतले. नंतर त्रिंबकजीचे वडील डिगरजस आले. काही वाडीस गेले. त्यावर आपणही दाहा पाच वर्ष वतन आनभवीत आलो. यैलीकडे त्रिंबकजीचा शेरीर समध सातारेस भोसले याचा राजश्री राज माहाराज याणी करून दिल्हा. त्रिंबकजीस भवानीबाई दिल्ही. नंतर यैलिकडे त्रिंबकजी घाटगे याणी कजिया करून सातारेस जाऊन माहाराज राजश्री याजकडे जाऊन गैरवाखा समजाविला. आपले बदभाऊ डिगरज येथील वतन आनभवितात आणि आपणास काही नाही त्यावरून मिरजस राजश्री बाळोजी साळोखे यासी ताकिदी लाऊन डफळापूरच्या थळास पत्र दिल्हे. तेथ त्रिंबकजी त्या थळास आले नाहीत. त्याजवरून आणखी मागती आम्ही थलपत्र घेऊन माघारे आलो. त्याज वरून हाली तुमचे थलास उभयतास प।। आहे. त्याजवरूण करीणा लेहून दिल्हा आसे. तुम्ही गोत गंगाधर्म ता बर हक निवाडा करणार आसा. ह करीणा लेहून दिल्हा. सही.

तेरीख छ २४ माहे रबिलाखर.

**क्रमांक : १७९** **दि. ११–८–१७४२**

मौजे बेरडीवाडी हा गाव पाटगावच्या मौनी बावाच्या मठास इनाम दिला आहे, म्हणून दिवाण किल्ले भुदरगड याचे सदहू गावच्या मोकदमास पत्र. पूर्वी हा गाव मौनी बावाच्या मठास इनाम होता. " आलिकडे धामधूमीमुळे चालत नाही " असे सनदेत म्हटले आहे.

मौनी बावा

आज दिवाण किले भुदरगड ता।। मोकदमानी मौजे वडगाव ता।। खानापूर सु।। सलास आर्बैन मया व अलफ. बेरडीवाडी मौजे मजकूर हे पूर्वी श्री———मठ पाठगाऊ याकडे दिल्ही होती. त्यास आलिकडे धामधुमीमुळे चालत नव्हती. त्यास हाली किले मजकुरी तपोनिधि घनशामगिरी बावा आले व सर्व लोकानी आर्ज केला की श्री–——कडे वाडी मा। पूर्वी चालत होती त्याप्रमाणे द्यावी म्हणून. तसी सर्वाचा + + + आर्ज मनास आणून मटची ऊर्जा चालावी लागते या करिता वाडी मजकूर श्रीकडे दिली असे. (इ. इ.)

छ २० जमादिलाकर.

---

**क्रमांक : १८०** **दि. २८–९–१७४२**

छत्रपती संभाजी दुसरे यानी द्वारकोजी यादव याना तर्फ हवेली, कोल्हापूर येथील एकसष्ट गावचे नाईकी वतन दिल्याचे वतनपत्र. यांत द्वारकोजीची नेमणूक छत्रपतीनी जिजाबाईच्या 'बंकची नाईकी' वर केली, तसेच नवरात्राच्या वेळी 'तली' चे साहित्य छत्रपतीना उपलब्ध करून दिले, म्हणून छत्रपतीनी खूष होऊन वरील इनाम दिल्याचे नमूद आहे.

द्वारकोजीस शाबसकी देत असतां छत्रपती म्हणतात, 'जे सेवक असावेत ते याचरीतीने...'

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६९ दुंदुभी नाम सवत्सरे आश्वीन शुद्ध विजयादशमी इंदुवासरे[1] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी रा॥ द्वारकोजी यादव बिन कृष्णाजी यादव नाईक ता॥ हवेली कोल्हापूर यासि दिले वतन पत्र ऐसेजे. तुम्ही स्वामीचे पुरातन सेवक. स्वामीच्या मनोदयानुरुप मनोभावें सेवा केली यास्तव पेशजी राणीवास चौथा वाडा याचे बंकची नाईकी स्वामी तुम्हावरी संतोसी होऊन सांगितली. त्या दिवसा पासून येकरूप निष्टेने स्वामीची व चौथावाडा याची सेवा करुन बहुत संतोसी केले. सांप्रत नवरात्र प्रसंगाची तली[2] स्वामीकडील चौथा वाडा याकडे होत आहे. चौथा वाडा यांची तली प्रति वर्षी स्वामीस होत आहे. यंदा चौथा वाडा याची तली स्वामीस आली. त्याचे साहित्य मनास आणिता जे जे वस्तु पाहिजे ते धणीयाचे आज्ञेप्रमाणे मेलऊन आणून स्वामीस आदा करुन आश्रित व सोइरे व सर कारकून व सरदार व कारकून आठरा कारखाने यसि मेवे फळ फळा आदिकरुन वस्त्रे साहित्य करुन विध यथासांग संपादिला. कोण्हेविसी न्हुन पडले नाही. या उच्छाहाच्या सेवे करून स्वामी उभयता तुम्हावरी बहुत संतोसी जाहले. चौथा वाडा यांचे चितास आले जे जे वस्तु समई आसावी ते मनोदयानुरुप आणून तलीच्या उछाह सांग केला. येणे करिता त्याची दया विशेषात्कारे जाहली. स्वामीत्रे चित्तात आले जे सेवक आसावेत ते याच रीतीने. धणीयांचे मनोदये जाणोन वर्तणूक करून सेवेचा मजुरा करुन सेवेचा मजुरा करुन घेईल ऐसा आसावा. त्याजप्रमाणे तुम्ही उभयताच्या मनोदयानरुप सेवा करून उभयतास बहुत संतोसी केले. तुमच्या सेवेवरी तुमचे ऊर्जित करावे हे स्वामीच्या चितात येऊन तुम्हास भूषणे कडी कुंडल्या वस्त्रे द्यावयास आणविली. ते समई चौथा वाडा याणी विनंती केली की वस्त्रेभूषणे यासि देतच आहेत. आता याचे ऊर्जित करणे तरी यासि लेकराचे लेकरी चाले असे वतन करून द्यावे.

---

१ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

२ खंडोबाच्या भक्तानी कपाळास ताम्हण लावण्याचा प्रकार.

म्हणजे यांचे सेवेचा व धणी यानी सर्फराजी केल्याचा लौकिक होऊन चालेल. तरी माहाराजानी ता हवेली कोल्हापूर येथें वतनदार पुरातन आहेत ते आपलेले वतने आनभवीतच आहेत. नाईकीचे वतन हवेली व कसबा आदि करुन नाईकीचे वतन करुन द्यावे. म्हणजे आपले परंपरेने वतन आनभवितील म्हणऊन विनंती केली. त्यावरुन स्वामी संतोसी होऊन तुम्हास नूतन वतन करून द्यावे ऐसे चितांत आले. विजयादशमीचे दिवसी स्वामी सीमा उलंघन करुन सदरेस मंचकारोहण करून बैसले. उछाह प्रसंगाचे विडे येथा पधतीने सर्वास दिले. त्या उपरी तुमचे उर्जित करावे हे आवशक: यास्तव पुरातन वतनदार आपलीली वसने आनभवितात. या वतनास कोण्ही नाहीं असे पाहून नूतन नाईकीचे वतन तुम्हास ता॥ हवेली कोल्हापूर देखील कसबा देह ६१ यांचे नाईकीचे वतन आजरामऱ्हामत करुन दिल्हे ऐसे. या वतनास वतनाची सेवा देसाई व देशपांडे व तुम्ही यथानुक्रमे करीत जाणे. या नाईकीच्या वतनास इनाम व हक व लाजिमा देसाई देसपांडे यास पुरातन चालत आहे. त्यास देसपांडे या प्रो तुम्हास करार करून दिल्हा असे. देसाई देशपांडे यासि हक व इनाम पुरातन चालत होता. सदरहू नाईकीच्या वतनास इनाम व हक व कानु काइदे देसाई व देसपांडे उभयता येथा विभागे निमे निमेप्रमाणे अनुभवितात. ऐसियासि नाईकीच्या वतनास इनाम व हक व कानु काइदे देसपांडे याचे पुरातनाप्रमाणे नाईकीच्या वतनास करून दिले असे बी ता———

कसबे कोल्हापूर

| इनाम | | हक होन ९ | फसकी उकाला |
|---|---|---|---|
| ठिकाण | जमीन बिघे | | वजा |
| | | | रूकी |
| १ | ८५ | | १ |
| चामबार जोड | | | साली कोष्टी दर मागास |
| १ | | | रूके ।. |

| धणगर दर मागास रुके | पानारी याचे नगाग |
| --- | --- |
| .॥. | पाने सुमार १०० |

पानारी याचे दुकानात दररोज पाने सुमार १२
जकात दर गोणीस रुका ०१
ठोकरा दर गोणीस रुका ०१

गावगना इनाम ता॥ हवेली कोल्हापूर (प्रती गाव इनाम जमीन टके व हक होन व कानु काइदे)

| इनाम जमीन | रुके | हक होन | कानुकायदे |
| --- | --- | --- | --- |
| मौजे आरे | १ | ६ | १ |
| मौजे काविणे | १० | ३ | १ |
| मौजे कोगील बु॥ | १० | २ | १ |
| मौजे गोलिवडे | ५ | २ | १ |
| मौजे चुये | १ | ५ | १ |
| मौजे पाडळी बु॥ | ३ | ३ | १ |
| मौजे कुदरे | २ | ७ | १ |
| मौजे वडक सिवाल | १ | ३ | १ |
| मौजे सिरगांव | १५ | ३ | १ |
| मौजे इस्पुरली | ५ | ३ | १ |
| मौजे नंदगाव | .॥. | ६ | १ |
| मौजे सातरडे | १ | ३ | १ |
| मौजे कोगील खुर्द | ५ | २ | १ |
| मौजे नागाव खुर्द | १ | ३ | १ |
| मौजे देवाळ खुर्द | ५ | २ | १ |
| मौजे कोपर्डे | १ | ३ | १ |
| मौजे दिंड नेरली | २० | ६ | १ |
| मौजे पाडळी खुर्द | १ | ६ | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| मौजे पडळ | २ | ६ | १ |
| मौजे मई | १ | ३ | १ |
| मौजे वाकरे | १ | ६ | १ |
| मौजे सिंगणापूर | ३ | ६ | १ |
| मौजे कणेरी | ३० | ६ | १ |
| मौजे भेव नेरली | १० | ३ | १ |
| मौजे पाचगाव | १ | ३ | १ |
| मौजे बालिंगे | ५ | ३ | १ |
| मौजे जेवतिळे | १ | ३ | १ |
| मौजे बाचणी | २ | ३ | १ |
| मौजे देवाळे बु॥ | ५ | ६ | १ |
| मौजे यवचून | .॥. | ६ | १ |
| मौजे दानेवडे | १ | ५ | १ |
| मौजे कोगे | १ | ६ | १ |
| मौजे गिरगाव | ५ | ५ | १ |
| ३३ | १५६।. | १३७॥. | ३३ |

प्रती गांव इनाम इदलशाई व हक व कायदे.

| | इनाम जमीन चावर | हक होन | कानु कायदे |
|---|---|---|---|
| मौजे नागाव बु॥ | ८१५ | ६ | १ |
| मौजे मुडसिंगी | ।. | ६ | १ |
| मौजे हालोंडी | ८१५ | ६ | १ |
| मौजे कुरलप | ८१५ | ६ | १ |
| मौजे सिये | ।. | ६ | १ |
| मौजे नंदवाहळ | ८५ | १॥ | १ |
| मौजे उंचगाव | ८१५ | ६ | १ |
| मौजे वडगाव बु॥ | ८१५ | ३ | १ |
| मौजे वसगडे | ।. | ६ | १ |
| मौजे तांबगाऊ | ८१० | २ | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| मौजे सापले | २ | २ | १ |
| मौजे वडगाव खुर्द | ०१५ | ३ | १ |
| मौजे निटवडे टका १ ये॥ | ०५ | १। | १ |
| मौजे बाविडे | .॥. | ८ | १ |
| मौजे वळिवडे | .।. | ६ | १ |
| पेट केसापूर | ०२ | ४ | १ |
| १६ | २।२४ | ७२॥ | १६ |

प्रती गाव इनाम कुडो व हक व काइदे.

| | इनाम कुडो जमीन | हक होन | कानु कायदे |
|---|---|---|---|
| मौजे कुडचे | ०१ | ६ | १ |
| मौजे कोथळी | ०१ | ३ | १ |
| मौजे कुरडु | ०१ | २ | १ |
| मौजे माहुलंगें | ०२ | ६ | १ |
| मौजे येबॅती | ०॥. | ३ | १ |
| मौजे हाळदी | ०१ | ४ | १ |
| मौजे सडोली | ०३ | ६ | १ |
| मौजे बीड | ०३ | ८ | १ |
| मौजे वासी | ०१ | ६ | १ |
| मौजे बेले | ०१ | ३ | १ |
| मौजे बहिरेश्वर | ०४ | ३ | १ |
| ११ | १८॥ | ५० | ११ |

येकून प्रति गावगना देह ३३ ये॥ इनाम जमीन टके येकसे सक्व छपन व हक होन येकसे साडेसतावीस व प्रति गावगना देह सोळा इनाम जमीन इदलशाई चावर सवा दोन चावर चवीस विघे व हक होन पावणे आहतर व प्रति देहं ११ ये॥ इनाम जमीन कुडो साडे अठरा व हक होन पनास ये॥ देह ६० व कसबा पैकी इनाम ठिकाण येके व जमीन विघे पाच व हक होन नरु येकून देखील कसबा देहे ६१ येकसष्ट

येथील इनाम जमीन व हक होन व कानु कायदे सदरहू प्रा पूर्वी चालत होते. त्याउपरी तीर्थरुप थोरले कैलासवासी माहाराजानी राज्य काबीज केल्यानंतर पूर्वील हक इनाम होता तो राकून आकाराप्रमाणे देसाई देसपांडे यासि सिरस्ता इनाम दर चावरी बिघे ८५ व हक होन आकारास दर सदे रुपये ३ तीन व कानुकाइदे व तूप आहे त्या पैकी निमे निमे (देशमुख व देशपांडे यामध्ये) देसपांडे याकडे दर चावरी इनाम जमीन बिघे ८२।। व ऐन आकारास दरसदे रु।। १।। व कानुकाईदे व तूप चालत आहे त्याप्रमाणे तुम्हास नाईकीच्या वतनास इनाम व हक व कानु काईदे व तूप ता। हवेली देखील कसबा देह ६१ यासी मोईन देसाई देसपांडे यासी पूर्वीपासून करून दिली आहे. त्यासि देशपांडे ब।। (बरहुकुम) तुम्हास नाईकीच्या वतनास नूतन मोईन करून दिली आसे. बी।।

| | |
|---|---|
| इनाम दर चावरी बिघे ८२।। | हक ऐन आकारास दरसदे रुपये १।। |
| कानु कायदे कलमे— | तूप पक्षास दर गावास कलम १ |
| १ चांबारास जोडा | मोली दर गावास दर सणास कलम १ |
| १ फसकी उकाला सेवधर | गावगना घर ठाव कलम १ |
| १ पानारी याचे नगास पाने सुमारे १००. | ठोकरा दर गोणीस रुका १ |
| | बकरे दर गावास १ |
| १ पानारी याचे दुकानास दररोज पान सु।। १२. | |
| १ साळी कोष्टी याचे मागास सालिना रुके ।. (दर मागास) | |
| १ धणगर दर मागास सालिना रुके ।।. | |
| १ जकात दर गोणीस रुका १. | |

... येकून इनाम जमीन विघे अडीच व हक रुपये दीड व चामारास जोडा व फसकी उकाला व सेवधार व पानारी याचे दुकानास पानें शंभर व पानारीयाचे दुकानास पाने रोजिना बारा व साळी कोष्टी मागास रुके बारा व धणगर मागास रुके चवीस व जकात दर गोणीस रुक यक व तूप दर गावास प्रक्षास व दर गावास सणास मोळी व गावगना 'घरठाव व ठोकरा दर गोणीस रुका येक व गावास बकरे येक येणे प्रमाणे नाईकीच्या वतनास मोईन करून दिली असे व या खेरीज तुम्हास तेली याचे घाण बुडास तेल दररोज ०।०।०४॥. साडे च्यार टांक प्रमाणे मोईन करून दिली आहे. तरी तुम्ही नाईकीचे वतन देखील कसबा देह एकसष्ट आपले स्वाधीन करून घेऊन सदरहू प्रमाणे हक इनाम कानु काइदे अनभवून देसाई व देसपांडे व तुम्ही मिळोन वतनाची सेवा करीत जाणे. तुम्हास पान मान तश्रीफ कानु काईदे देसाई देसपांडे या बरोबर देसपांडे याचे मागून द्यावयाची आज्ञा केली आहे. त्याप्रमाणे घेत जाणें व कसबे मजकुरी नाईकीस दर जागा राहावयासी दिला त्या वरुन तुम्ही अर्ज केला जे आपण कुटुंबवछल कुटुंबास पुरे सारिखे स्थल देविले पाहिजे म्हणून तुम्ही विनंती केली. त्यावरून कसबे मजकूरचे वतनदार यासी आज्ञा केली. त्यावरुन त्याणी सिवाजी राम हे व्यापारी याचा घरठाव पडक होता. त्यास वारीस कोणी नाही. तो जागा वास वासी उदमी सराफ त्याचे सेजारचा होता. तो बहुत दिवस गेला. त्याचे कोणी नाही. रयत आपले घर टाकून देशांतरावरी गेला. त्याचा थाक कोठे न लागे. ऐसे जाहलिया-नंतर तो जागा दिवाणचा व त्याचे पुढे रणमाल्या तेली रयत व कोडोलीकर सराफ ऐसे दोघे रयत सराफ व तेली दोघे होते. त्यास दुसरा मुबदला जागा देऊन तो जागा दोघाचा घरठाव येणे प्रमाणे तुम्हास कुटुंब योग्यस्थल नेमून देविले असे. याची चुतःसीमा बी ता

| | |
|---|---|
| सिवाजीराम व रणमाल्या आबाजी तेली या दोघाचे पूर्व पश्चम हात सु॥ ९२ उतर दक्षण | समजी रयत सराफ व कोडो-लीकर सराफ या दोघा बा |

हात सुमार ४० 

जागा हात सु।।
पूर्व पश्चीम हात
९९
उतर दक्षण ६०

या खेरीज़ समजी याचे
जागी या बा। कोस
आवधीक दक्षण भागी
नैरत्य कोणी हात
पूर्व पश्नम १९
उतर दक्षण २१

येणे प्रमाणे चतु:सीमा करून दिली असे. यासि सेजार :

उतरेस उभामार्ग पदमाळे दरवाजे कडील लागला आसे.
१

दक्षणेस शेजार गुरवाची घरे चेनरासी व लिंगरासी व नैरत्य कोनी आवार श्रीरंक बहिरव.
१

पश्चमेस तिमणभट बिन माधवाचार्य घलसासी व सेसभट बिन माहादेव भट मुंजामणीचे घर उतर भागी मार्ग पै ।। १

येणे प्रमाणे हद महदूद करून घर दिल्हे असे. या जागियावरी इमारत बांधोन राहणे व सदरहूप्रमाणे नाईकीचे वतन व हक इनाम कानु काईदे व वाडा तुम्ही तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन वतनाची सेवा करून सुखरूप राहणे.[1] निदेश समक्ष. मोर्तब असे व माथा सिका येक सनदेचे तिसरे ओळीखाली सिके दोन व चिकटवणीवर मोर्तब सोळा आहेत.

---

१ महाराजांनी द्वारकोजी नाईक यादव याना एकसष्ट गावच्या नाइकीचे वतन दिले आहे म्हणून दिवाण कोट कोल्हापूर यानी सदहू गावच्या मोकदमास दि. ४-१०-१७४२ रोजी लिहिलेले पत्र उपलब्ध आहे.

तेरीख ९ शाबान सु॥ सलास अर्बैन मया अलफ.

बार, सुरु, सुद्र बार, समत सुद्र बार बार.

---

**क्रमांक : १८१** **दि. १८–१०–१७४२**

शिरोळच्या ठाण्यास लष्कराचा वेढा देऊन छत्रपती संभाजी दुसरे यानी कुरुंदवाड येथे मुक्काम केला होता. त्यावेळी ठाणे केव्हा हस्तगत होईल असे बाळ जोशी याना विचारले असता त्यानी जो दिवस सांगितला त्याच दिवशी ठाणे काबीज झाले. म्हणून बाळ जोशी यांस छत्रपतींनी राज्यातील सर-ज्योतिषीपणाचे वतन दिले.

कृष्णे

स्वस्ति श्री राज्याभीषेक शके ६९ दुंदुभीनाम संवत्सरे कार्तीक शुध प्रतीपदा इंदुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी वेदमूर्ती राजश्री बाल जोसी बीन दशरथा जोशी उपनाम सवदागर गोत्र शाडील्य सूत्र आश्वलायन यांसी दील्हे वतनपत्र येसेजे. तुम्ही स्वामीचे पुरातन येकनिष्ट सेवक. तुमचे वडील वडीलापासून तीर्थरुप राजश्री कैलासवासी माहाराजाजवली सेवा नीष्टेने करीत आले व तुम्हीही स्वामीचे सेवा येकरुप नीष्टेने करीत आहां. स्वामीवीना आन्य जाणत नाहीं. स्वामीनी तुम्हांस जो प्रश्न केला तो तुम्ही सांगीतल्याप्रमाणे स्वामीच्या प्रत्ययास आला व ठाणे सीराले ता॥ आलते येथील ठाणेसी स्वामीनी परीघ घालून मुकाम केला होता ते समई स्वामीनी तुम्हास कुरुंदवाडचे मुकामी ठाणे कीतेक दीवसात हस्तगत होईल म्हणून प्रश्न केला. त्या वरुन तुम्हीं सीधांत करुन ज्या दीवसी ठाणे हास्तगत होईल म्हणून सांगीतले व लीहून दील्हे होते त्या प्रमाणे ते दीवसी ठाणे हास्तगत जाहले. त्यावरुन स्वामी तुम्हावरी बहूत संतोशी जाहले. तुमचे दिवसे दीवस उर्जीत करून चालवणे हे स्वामीस आवश्यक. तुमचेवीसी राणीवास चौथा वाडा याणी वीनंती केली कीं बाळ जोशी आम्हांसनीध सेवा करीत आहेत

यांसी राज्यातील सरजोतीषीपणाची वृत्ती करून द्यावी म्हणून. त्यावरुन स्वामी मनास आणीतां तुम्ही ज्योतीशी विद्यावंत सिधांतवेते जोतीष-वीद्यानीपुण यास्तव स्वामा तुम्हावरी कृपाळू होऊन स्वामीच्या राज्यातील सरजोतीषपणाचे वतन श्री—चे उदक घालून धारादत करून दील्हे आसे. या वतनास कानु काईदे याची मोईन करून दील्ही असे. गावगना माहालनिहाये.

कानुकाईदे बी त॥

| कीता कलम रुपये | | किता कलमे सुद्रादिक रुपये | |
|---|---|---|---|
| २ | जकातीस दर सदे रुपये | .॥. | लग्नास |
| १॥ | ब्राम्हणाचे घरी | .।. | पाटास |
| | १ लग्नास | —— | |
| | .॥. मुंजी व बारसे व संस्कार | .॥। | |
| | —— | | |
| | १॥. | | |

इनाम जमीन महाल निहाये बीघे.

(यापुढे निरनिराळ्या तर्फाखालील गावांची नांवे यांची मोठी यादी आहे)

........................ सदरहू सरजोतीषपणाचे वतन स्वामी तुम्हास वंशपरंपरेने सुरक्षीत चालवीतील. तुम्ही वतन आनभवीत जाणे.[1] निदेश समक्ष.

तेरीख २९

शाबान सु॥ सलास अर्बैन.

१ या इनामाबद्दल शंभू छत्रपतींनी दिलेली कांही आज्ञापत्रे, याच तारखेची, खालील व्यक्तींच्या नावे आहेत.

कृष्णराव अमात्य, गंगाधर पंडीत प्रतिनिधि, राणोजी घोरपडे सेनापती, चांदोजी घाटगे नामजाद व कारकून किल्ले पन्हाळा, अर्जोजी यादव.

**क्रमांक : १८२** दि. १८–१–१७४३

नाग सावंत भोसले निधन पावले आहेत, त्यांचे पुत्र लखम सावंत यांस उपद्रव न देता त्यांची साह्यता करावी म्हणून हिंदुराव घोरपडे यांचे रवळोजी रामजी देसाई, तर्फ उचगाव यास पत्र.

श्री सुबराज

म।। अनाम रळोजी रामजी देसाई तर्फ उचगांव यांसी हिंदूराव घोरपडे ममलकतमदार. सुहूर सन सलास आर्बेन मया आलफ. नाग सावंत भोसले सरदेसाई निधन पावले. त्यांचे पुत्र राजश्री लखम सावंत भोसले याचे चालविणे आम्हास परम आवश्यक. याकरिता सर्वत्रांस ताकीदपत्रे सादर केली आहेत. त्याप्रो तुम्ही आपल्या मर्यादेनी राहोन म।।निलेच्या तालुकातीस अगर हरएकविशी उपद्रव होऊ न देतां म।।रनिलेच्या मनोदयानुरुप वरचेवरी साहिता करीत जाणे. येविसी उजूर न करणे.[1] जाणिजे.

छ २ जिल्हेज प।। हुजूर.

लेखन
मर्यादा

---

**क्रमांक : १८३** दि. १९–१–१७४३

चिंतामण जोशी जोशीराव यांच्याकडे सरकारी शिधा व इतर जिन्नस श्रीच्या उत्सवासाठी चालू होते. ते छत्रपती संभाजी दुसरे यानी पूर्ववत चालू ठेवले.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६९ दुंदुभीनाम संवत्सरे माघ शुध

---

१ अशाच आशयाचे पत्र हिंदुरावं घोरपडे यानी यमाजी रुद्र म।। चिकोडी यांस पाठविले.

पंचमी सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी वेदशास्त्रसंपन राजमान्य राजेश्री चितामण जोशी जोशीराव यास आज्ञा केली ऐसीजे. तिर्थस्वरूप राजश्री थोरले माहाराज कैलासवासी यांचे वेळेपासून तुमचे उलफ्याची[1] मोईन आहे. त्याप्रमाणे चालवणे स्वामीस आगत्य. याकरिता उलफ्याची मोईन गला व जिन्नस व श्री———चे उत्साहाचे साहित्य येणेप्रमाणे नेमणूक करून दिली आहे.

| | |
|---|---|
| श्रीचे उत्साहाचे साहित्य व उलफ्याचे साहित्य हुजूर बाजाराकडे——— कलम १ | सरदेशमुखी तालुका तारळे उलफ्याचा गला देसरी सा॥ मापे खंडी २।. सवादोन खंडी |
| तूप गौळी माहाल नि॥ हुजुर बाजार वजने ८४।७॥. येणेप्रमाणे कलम १ | उपसाहित्य परभारे हुजुरबाजाराकडे व गडधण देशमुखीकडे ।. पाव मण |

येणेप्रमाणे नेमणूक स्वामी तुम्हास व तुमचे वंशपरंपरेने चालवितील. तुम्ही भोग्य करून सुखरूप राहाणे. जाणिजे.

बहुत काय लिहिणे.

---

**क्रमांक : १८४** **दि. १०-५-१७४३**

**छत्रपती संभाजी दुसरे यानी शाबास हसन खान भालदार दिमत पंत प्रतिनिधी यास पंधरा बिघे जमीन इनाम दिली.**

श्री तालिक

श्रीप्रतिपच्चंद्र लेखेव वर्धि
ष्णु विश्ववंदिता शंभु छत्रपतेर्मु
द्रा समसुनो विराजते.

---

१ उलफा = शिधा.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६९ रुधिरोग्दारी नाम संवछरे वैशाख बहुल त्रयोदसी भोमवासर क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी शाबस बिन हसन खान भालदार दि॥ राजश्री पंत प्रतिनिधि यासी दिल्हे इनामपत्र ऐसीजे. तुजविसी राजश्री गंगाधर पंडित याणी विनंती केली की, भालदार मजकूर याणी बहुत दिवस सेवा केली की यासी काही इनाम जमीन करून देविली पाहिजे. त्याजवरून तुजवर स्वामी कृपाळू होऊन नूतन इनाम जमीन मौजे भामट ता राजापूर पैकी जमीन बिघे बी तपसील------

श्री राजा शंभू छ
त्रपती हर्ष निघान
केशव सुत भगवं
त पंडित मुख्य
प्रधान

श्री आई आदि
पुरुष श्रीराजा
शिव छत्रपती
स्वामी कृपानि
धी तस्य परशुराम
त्रिबक प्रतीनीधी

| भातरोप बिघे. | वरकस बिघे |
|---|---|
| ॅ१० | ॅ५ |

येकूण पंधरा बिघे आजरामरामत करून दिल्ही आहे. जमीन आपले श्वाधीन करून घेऊन पुत्र पौत्रादि वौंशपरंपरेने आनभऊन सुखरूप राहाणे. जमीन स्वामी चालवितील. जाणिजे. निदेश समक्ष.

रुजु समत समत
मंत्री सरकार

तेरीख २६

सावल सु॥ सलास आर्बेन.

---

क्रमांक : १८५ दि. ११-७-१७४३

औषधासाठी पन्नास काळी व पन्नास पांढरी कमळे व कमळाचे दहा गड्डे पाठवा म्हणून दौलतराव हिंदुराव घोरपडे यांचे आपा सावगावकर यास पत्र.

श्री सुब्रंम्हण्य

वेदशास्त्रसंपन राजश्री आपा सावगावकर प्रधान यांस:

प्रती दौलतराव हिंदूराव घोरपडे दंडवत विनंती. उपर येथील कुशल जाणून स्वकीय लेखनी संतोशवीत असावे. विशेष अवराधास कमळे पाहिजेत. तर काली पंनास व तांबडी पंनास असी सेंभर कंबले अगत्य रूप मजुरीचा मनुश करून रायाजी जासुदासमागमे पाठवावी आणि लावणीस कमळाचे गडे धाहा पाठवून द्यावे. माणूस मजुरी करून पाटवाल त्याची मजुरी येथे देऊ. सदैव पत्रद्वारे परामृश करावा.

रा छ ३० माहे जमादिलावल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

क्रमांक : १८६ इ. स. १७४२–४३

" धारराव यादव हवालदार माहालदरुनी " यांचे द्वारकोजी यादव यांचे नाईकीचे वतन चालवावे म्हणून तर्फ हवेले कोल्हापूर येथील आठ गावच्या मोकदमाना पत्र.

श्री

श्री राजा शं<br>भु छत्रपति चरणी<br>सादर धारराव या<br>दव हवालदार नि<br>रतर

राजश्री धारराव यादव हवालदार माहाल दरुनी ता मोकदमांनी देहाय गावगना मौजे फुदेरे, मौजे कडुत्रे, मौजे येवळूज, मौजे पडल,
१ १ १ १

मौजे बालिंगे, मौजे माहुलंगे, मौजे वसगडे, मौजे मुडसिंगी.
१ १ १

येकून देहे आठ ता। हवेली कोल्हापूर सु॥ सलास आर्बैन मया आलफ. राजश्री द्वारकोजी यादव बिन कृष्णाजी यादव नाईक का। हवेली कोलापूर यास हुजु (र ?) साहेबाची सेवा येकरूप निष्टेनें केली. याचे ऊर्जित करून चालवावे यास्तव याजवरी कृपाळु होऊन कर्यात हवेली मजकूर येथील कसबा देहे ६१ येथील नाईकीचे वतन नूतन आजरामऱ्हमत करून दिल्हे. या वतनास हक इनाम व कानू काइदे देशमुख व देशपांडे निमेनिम प्रमाणे आनभवितात त्या बरहुकुम देसका प्रा। नाईकीच्या वतनास नूतन मोईन नूतन करूनी दिल्ही. वा। आज्ञापत्र बा ता।—

इनाम दर चावरी बिघे ८२॥

तूप पक्षास कलम १

ठोकरा दर गोणीस
रुका १

पाने नगास पाने दर
१००

तेली घाणेस दररोज तेल
वजन ८८८४॥.

हर यैन आकारास दरसदे रुपये १॥

मोळी दर सनास कलम १ बकरे दर गावास १.

पानारी याच्या गावास दर रोज पान
१२

---

फसली उकाला
सेवधार कलम
१

जकात दर गोणीस
रुका
१

साळी कोष्टी मागास
सालिना रुके
.।.

धणगर मागास
सालिना रुके.
.॥.

गावगना घरठाव
कलम
१

चांभाराकडील जोडा
१

येणे प्रो मोईन करून दिल्ही आसे. याच्या सनदा हुजूरच्या आलाहिदा सादर आहेत. तरी सदरहू आज्ञेप्रमाणें देहाये मजकुरी मारनिलेचे वतनाचे कानू काइद हक व इनाम चालवीत जाणे. प्रति वरसी ताकिंदीचा उजूर न करणे. याची तालीक लेहून घेऊन आसेल मारनिलेकडे भोगवटीयास परतोन देणे. नाईकीचें वतन यास व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवीत जाणें. जाणिजे.

मोर्तब
सुद्र

---

**क्रमांक : १८७** **दि. १०–१–१७४४**

पुरुषोत्तम नारायण याने मौजे खाजू तर्फ हातखांबे येथे काही ओसाड जमीन लागवडीस आणून खोती केली होती. त्या जमिनीबाबत सरकारास राजभाग मिळत होता. असे असता गंगाजी बाबाजी, देशाधिकारी व देशमुख प्रांत प्रभावळी याने सदहूं जमीन दुसऱ्यास दिली. त्याबद्दल पुरषोत्तम नारायण याने छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडे कागाळी नेली असता महाराजानी पुरुषोत्तम नारायण याची जमीन त्याला परत करण्याची आज्ञा गंगाजी बाबाजी यास केली.

श्री

तालीक

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ७० रुधिरोग्दारीनाम संवछरे वैशाख शु॥ सप्तमी गुरुवासरे क्षत्रीये कुलावतंस (श्री) राजा शंभु छत्रपती (स्वामी) याणी राजश्री गंगाजी बाबाजी देशाधिकारी व देशमुख प्रांत प्रभावळी यास आज्ञा केली यैसाजे.

पुरुषोत्तम नारायेण वस्ती मौजे आजणारी तर्फ देवाळे हुजुर येऊन विदित केले की मौजे खाजू तर्फ हातखांबे हा गाव आपण खोती केली होती. पहिले वसाड होती. त्यास आपण मामुर करून सालदरसाल दस्त[1] जाजती[2] करीत गेलो व

---

१ दस्त = हुवक; २ जाजती = आधिक्य.

मौजे मजकुरी कीर्द आहेत. औटे दोनी वेळे इकडून येऊन मिळाले होते. तेथे कितेक जमीन पडली होती ते व काही जमीन खोती खालील खोताची व त्याचे जवळील दोघे रयत पेशजी मावजी गुजरास कोड होता तेव्हां तेथे घरठाण होते. त्या जमीनीस गिलावस करीत आसत. त्यामधून वोहाळ जात आसत. आपण सेत कीर्द करावी त्याला पाटवाणी पाणी पाहिजे व बांद बांधोन काडून सेते किर्दीस सेत ते करावी या करिता गटार नाला साड वळाकरयाला वहोळा जवळी आणिक पड-जमीन होती तेथे वावी पाडु तो जागा त्यास देऊन त्याखाले जमीन होती ते घेतली. वळहात नाला वरियाला मावजी वावद कोडा खालील मौजीने जमीन कोड टाकिल्याउपर खोती खाले दोनीच्यारी वरिसे कमाविस होते. होती ते जमीन याला देऊन म्हातराकाखाले जमीन होती ते घेतली. तेणे प्रमाणे कुणबियास राजी करून मुबदला जमीन त्याला देऊन त्याखाली जमीन घेऊन ते व कितेक पड जमीन व खोती खालील काही जमीन ऐसी यक करून पेस्तर किर्दीच्या उमेदीने आपण मबलग पैका खर्च करून सेताच्या तोंडी ओहाळ बांधोन पाट काडून सेतास पाणी लाऊन तो जागा किर्दीस आणिला आणि काही यक दोन जागा दोनी च्यारसे कहरी खर्च करून वोहोळ सेते बांधोन काडून कीर्दी करायाची उमेद धरितो. या सेताच्या उमेदीने पहिले खोत घर होते तेथे पाणी नाही म्हणून तो जागा टाकून सारणेपासी रानामध्ये पाणी करून घर बांधिले. कितेक आंबे व नारळी व वरकड झाड झाडोरा लाविला आहे व पुढे लावावयाची उमेद धरितो. साहेबास राजभाग हासील ये ते करितो. यैस आसता सन समान सलास इनात ता बाळाजी नारायेण हावालदार याणे आपला गाव काडून + + ला खोती दिल्हा आहे. तो सदरहू सेत जाग्याविसी आपणासी कटकट करू लागला तेव्हा आणाजीपंत सुरनीस होते त्यास वर्तमान कळविले. त्याणी ताकीद करून + + + बाळखडी पटविलें. हाली गंगाजी बाबाजी यास + + + च्या मालमतीवरून सेते आपण पेरिली आसता काही + + + लिबले केली आहेत. पारपत्ये करून सेते आपली आपणास देविली

पाहिजेत. हिशेबी राजभाग[1] देत जाईन. पुढेही कितेक कीर्द करावया होईल म्हणून विदित केले. गंगाजी पंतो तुम्ही याची सेते काढून त्याच्या मुबदला करावयास गरज काय. जरी याणी पैके वाचून कष्ट करून पाणी साधून सेते व झाड झाडोरा केला आहे. तरी मिरास त्याची खोती खालील जमीन काही या सेता खाले सांपडली आहे. याकरिता झोंबत आसेल तरी खोती + + + + ची मिरास नाही. हाली खाता म्हणौन सेते कांहीं फुकट सोडित नाहीं. ज्याणे कीर्द करावी त्याणे हिशेबी राजभाग द्यावे. ऐसे आसता तुम्ही काय समजोन वेंकाणाच्या बोले हे केले आहे हे काही कळत नाही. पुढे तरी यैसे करीत न जाणे. जरी सदरहू करितात हकीम आहे तरी पुरुषोतम नारायेणाने पैके वाचून कष्ट करून पाणी व जागा साधून सेते व झाड झाडोरा व घर केले आहे. ते सारे याचे याच्या दुमाले केले आहे. दुमाला कर्णे साल मजकूरचे याचे पेरणीचे पीक घेतले आसल ते याचे यास देववणे. हिशेबी राजभाग होईल तो याजपासून वसूल घेणे व पेस्तर सदरहू व या खेरीजही जेथवर याचे होते कीर्द करावयासी याला उमेद आसेल तेथवरी कीर्द कर्णे. रास्ती राजभाग घेववीत जाणे. गैर जलल सर्वथा न कर्णे. जरी कांहीं कटकट केला व वाथंग करील त्याला हुजुरून बर हक निवाडा करून आज्ञा होईल तैसी वर्तणूक कर्णे. तालिक लिहून घेऊन आसल पुरुषोतम नारायेण यापासी परतोन देणे. लेखनालंकार. मोर्तब आसे.

तारीख छ ५

माहे जिल्हेज. सु॥ आर्बा आरबैन मया व आलफ.

सुर सुद्र बार

पै॥ छ ८ जिल्हेज

मोर्तब यक असे जोड बंदास.

---

१ राजभाग = वसुलातील किंवा धान्याच्या पिकातील सरकारी हिस्सा.

क्रमांक : १८८ दि. २८–१–१७४४

पंत प्रतिनिधी व आप्पाजी सोमवंशी याच्यामध्ये झालेला करार. यात दहा कलमे असून परप्रांतातील संस्थानांचे राजकारण उभयतातर्फे व्हावे, असे म्हटले आहे.

श्री

तहनामा सरकार राजश्री पंत प्रतिनिधि सु।। आर्बा आर्बेन मया व आलफ. तालुक राजश्री आपाजी सोमवंसी सरलस्कर.

तुमचे सरंजामी मुलुकांस सीका रोखा तुम्ही करावा. घासदाणा याचाही रोखा तुम्हीच करणे. उभयेतानी खंडणी करावी. कलम

१

खंडणीमुळे जो यैवज तुमचे मुलुकांत खेरीज करून पर मुलुकांत खंडणी होईल त्यापैकी हुजूरची चौथाई यैवज वजा करून बाकी यैवज फौजेवर वाटून घ्यावा. कलम

१

आमचे मुलुकांत बाबती व सरदेसमुखीची खंडणी होईल तो यैवज आम्ही घ्यावा. घासदाणीयाचा यैवज होईल त्यापैकी चौथाई यैवज काढून बाकी फौजेवर वाटून घ्यावा. कलम

१

परमुलुकास सिका रोखा तुम्ही करू नये. हुजूरचा सिका रोखा होईल. कलम

१

तुमचे मुलुकांत मुकासबाबेची खंडणी होईल तो यैवज तुम्ही घ्यावा. घासदाणा याचा यैवज होईल त्या पैकी चोथाई काढून बाकी राहील तो यैवज दामाशाही[1] फौजेवर वाटून घ्यावी. कलम

१

तुमच्याचा सिधांत तुम्ही आम्ही करावा. आम्ही चिठी तुम्हाकडे पाठाऊं. मग नगारा करावा. कलम

१

परमुलुकी संवस्थानचे राजकारण

---

१ दामाशाही = हिस्सेरशी; प्रमाणशीर वाटणी.

जे कोणी येतील त्याची भेट उभये-ताकडे व्हावी. तुम्हाकडे येतील (ते) तुम्ही आम्हास भेटवावे. आम्हाकडे येतील ते तुम्हास भेटऊ

कलम

१

खंडणी उभयेतानी मिळुन करावी

कलम

१

येईल ते उभयेताचे विद्यमाने बोली करावी.

कलम

१

बिनी बरावर तुमची आमचा चालावी. बिनीचा आकार होईल तो बाराबरी वाटून घ्यावा.

कलम

१

येकून कलमे दाहा. सदरहू लि।। प्रमाणे करार केली असेत. छ २२ जिलकाद.

---

क्रमांक : १८९ दि. २७–३–१७४४

छत्रपती संभाजी दुसरे यांजकडून व्यंकटाद्री चौंडो देशकुलकर्णी यांस मौजे निलजी हा गाव इनाम. समानगडास बेदरबक्षचा वेढा पडला तेव्हा व्यंकटाद्री कुलकर्णी याचे वडील चौंडो कुलकर्णी यानी जमावानिसी येऊन किल्ल्यात साहित्य पुरविले होते.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७० रक्ताक्षीनाम संवत्सरे चेत्र बहुल दशमी भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी मोकदमानी मौजे निलजी कर्यात नूल प्रांत आजरे यांस आज्ञा केली येसीजे. ता।।

शिका पेशवेचा शिका प्रतिनिधींचा वेंकटाद्री चौंडो गोत्र काश्यप सूत्र आश्वलायन देशकुलकर्णी व नाडगोडा कसबा नुल प्रांत मजकूर यांचेविसी. राजश्री जिवाजी दलवी नामजाद किले भुदरगड याणी करवीरचे मु।। स्वामी संनीध विनंती केली की हे पुरातन वतनदार येकनिष्ट सेवक. साबाजी

क्षीरसागर नामजाद किले समानगडास आसता बिदारबक्ष याणी वेढा किल्यास दिल्हा त्या वेळेस याचे वडील चवंडो वेंकटाद्री जमावनिसी येऊन कस्त मेहनत करून किल्याचे साहित्य केले. चाकरी करून दाखविली. ते समई सावाजी क्षीरसागर याणी व किल्लेकरी मेहेरबान होऊन किल्याचे तर्फेन मौजे मजकूर हा गाव यासी नाडगोंडीचे वतनास इनाम करून दिल्हा आहे त्याप्रमाणे चालत आहे. अनभवित आहेत. किल्यासी स्वामी सेवेवर निष्ठेने वर्ततात. याजवर माहाराजानी कृपा करून सदरहू गाव इनाम करून देऊन भोगवटियास सनदा घ्याव्या म्हणून विनंती केली. त्यावरून मनास आणिता हे पुरातन वतनदारानी निष्टेने वर्तत आहेत. यासी इनाम देऊन चालविणे स्वामीस आगत्य याजकरिता स्वामी याजवर कृपाळू होऊन कुलबाब कुलकानु खेरीज हकदार व इनामदार करून मौजे मजकूर इनाम करून दिल्हा आसे. तरी तुम्ही इनाम गाव वंकटाद्री चोंडो यासी व याचे पुत्र पौत्रादी वंशपरंपरेने चालवणे. प्रती वर्षी नवीन पत्राची उजूर न करणे. याची प्रती घेऊन आसल पत्र भोगवटियास परतोन देणे.

जाणिजे. निदेश समक्ष.

सिका आसे.

रुजु समंत मंत्री.

---

**क्रमांक : १९०** दि. २७–३–१७४४

व्यंकटाद्री चौंडो विभुते यास कर्यात नूलमध्ये जमीन इनाम होती. त्या इनामाची पत्रे वाळवीने खराब झाली म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यानी त्यास नवीन सनद दिली.

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ७० रक्ताक्षी नाम संवत्सर चैत्र बहुल दशमी भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी रा। व्यंकटाद्री चौंडो उपनाम विभुते गोत्र काश्यप सूत्र आश्वलायेन देशकुलकर्णी व नाडगौडा कर्यात नूल प्रांत आजरे यासी

दिल्हे इनामपत्र ऐसेजे. तुम्हाविसी राजश्री निंबाजो जाधव नामजाद किले भुदरगड याणी करवीरचे मुकामी स्वामीसनिध विनंती केली की कर्यात मजकुरी गावगना इनाम देऊन पूर्वी थोरले माहाराज कैलासवासी यानी पत्रे करून दिल्ही होती. त्याप्रमाणे भोगवटा चालत आहे. परंतु पूर्वील पत्रे होती ती हाली वालवी लागोन जाया जाहाली. यास्तव माहाराजानी कृपा करोन भोगवटियास नूतन पत्रे करून दिल्ही पाहिजेत म्हणऊन. त्याजवरून मनास आणिता तुम्ही वतनदार एकनिष्ठ सेवक परंपरागत सेवा करीत आला व जीर्णपत्रे जाया जाहाल्याली हुजूर आणून दाखविली. त्यावरून स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन जीर्ण पत्राप्रमाणे जमीन माबाल मादी गाव सिरस्ते बरहुकूम करार करून दिल्ही असे. बी ता।।

---

क्रमांक : १९१ दि. १७-५-१७४४ नंतर

नागोजी शिदोजी पाटील हा कर्जबाजारी आणि वृद्ध होता. शिवाय त्याला पुत्रसंतानहि नव्हते. यास्तव त्याने आपले मौजे मुर्डशिगी या गावचे पाटिलकीचे वतन द्वारकोजी यादव यास विकले. छत्रपतीनी या व्यवहारास आपली मान्यता देऊन द्वारकोजीस तसे पत्र दिले. "वतनदाराची नीत यैसी आहे की, आपले भावावंदाकडे जाऊन आपले वतन त्यास देऊन त्याचे हातून स्वस्ता करून घ्यावी" असे सनदेत म्हटले आहे.

श्री

तालीक १।१२

स्वरित श्री राज्याभिशेक शके——संवछरे——क्षत्रीय कुलावतंस श्री राजा छत्रपती याणी——द्वारकोजी बिन कृष्णाजी यादव नाईक व पाटील मौजे मुर्डसिगी क।। रुकडी प्रां।। मिरज याणी स्वामी संनीध करविरीचे मुकामी विनंती केली की नागोजी बिन सिदोजी पाटील यान आपणाजवळ करविरास येऊन सांगीतल-आपले पाटीलकीच वतन पुरातन मौजे मजकूरच वडीलपणाच आपल आहे. त्यास आपला वृधापकाळ जाहाला. पुत्रसंतान नाही. कर्जदारानी उपद्रव केला. आपण

आनावस्त्रास महाग जाहालो. या करितां पाटलकीच वतन हरकोणास देऊन आपल कर्ज वाराव आणि आपले आनावस्त्राची स्वस्ता करावी यास्तव तुम्ही भले प्रमाणिक वतनदार आहां ऐस पाहून तुम्हाकड आलों. वतन तुम्हास आत्मसंतोष विकत देतों. तुम्ही आपले कर्ज वारणे आणि आपला प्रतिपाल करणें. ऐस सांगीतल्यास आम्ही बोललों जे तुझ भाऊबंद आसतील त्याजकड जाऊन आपल वर्तमान सांगाव. वतन देणे, तरी त्यास देऊन कर्ज वारण. आपली स्वस्ता करून घेणे. ते मान्ये न करीत. तेव्हां वतन परकीयासी द्याव ऐस सांगितलेवरून नागोजी जाधव आपल्या भावाबंदाकड जाऊन त्यासी वर्तमान सांगितल. त्यानी नागोजी पाटील यासी उत्तर सांगितल जे आपणास तुझ वतन पुर्वेत नाहीं व तुजा आगावही घेवत नाहीं. आपल वतन कोणास तरी देऊन कर्ज वारणें. त्यावरून मागती आम्हाकड आला. भावाबंदाचा मजकूर सदरहू प्र।। सांगितला या उपर तुम्ही आपला आंगीकार करणें. आपले वतन तुम्हास देतों हे घेऊन आपनास कर्जापासून मुक्त करणें म्हणऊन आग्रह केला आणि वतनाचा क्रयपत्र करून दिल्ह. त्या प्र।। माहाराजानीं दिवाणची पत्र भोगवटीयासी करून देऊन वतन चालवावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणून विदित केलें व विक्रीत पत्र आणून निवेदिल. त्यावरून मनास आणिता ब।। विक्रीत पत्र बी तपसील----

राजश्री द्वारकोजी बिन कृष्णाजी यादव यासी नागोजी बिन सिदोजी पाटील मौजे मुडसिंग क।। रुकडी प्रां मिरज लिहून दिल्ह विक्रीत पत्र यैसीजे. रक्ताक्षी नाम संवछर जेष्ट वध द्वितीया गुरुवासरें छ. १५ रबिलाखर[1] लिहून दिल्ह जे. आपणास कर्ज होऊन आनावस्त्राचे पाटीस लागलो. कर्जदारानी बहुत उपद्रव केला. आपले पोटी पुत्र संतान नाहीं. आपले भावाचा पुत्र आपाजी हा लाहान नेणता. तो आनावस्त्रासाठी मावळेचे घरी पडिला आहे. त्याचे हातून कर्जावामाचा आगाव घेऊन आपली स्वस्ता न होयेसी जाहाली. या मुळ आपली पाटीलकीच वतन हरकोणास देऊन कर्जदाराचे कर्ज फेडाव, आनाची

---

१ दि. १७-५-१७४४.

व आनाची स्वस्ता करुन घ्यावी, परंतु निम पाटीलकी रेठाईन सिंदे खातात याज करिता कजिया पाहून आवघे पाटीलकीच वतन कोणी घेतो यैस नाहीं. पुढ जे काय होईल ते होऊ. सद्या निमे पाटीलकी वडीलपणाचे नांगर व नांगराचे कलमी आम्हाकडे साळसूद चालत आहें. त्यास कोणाचा कांही कजिया नाहीं. हे निमे पाटीलकीचे वतन वडीलपणाचें हरकोणास द्यावें यैस आपले चित्ती योजून तुम्हाकडे करविरास आलों, आणि आपले सविस्तार वर्तमान तुम्हास सांगितले. त्यावरुन तुम्ही बोलिला जे वतनदाराची नीत यैसी आहे की, आपले भावाबंदाकडे जाऊन आपले वतन त्यास देऊन त्याचे हातून स्वस्ता करुन घ्यावी, यैसा विचार आहे. तरी तुम्ही आपले भावाबंदाकडे जाणे. त्याणी तुमचा आगाव घेतला तरी उत्तम. त्याचे हातून घेवावे. यैस जाहालिया वतन हरकोणास द्यावे. म्हणोन सांगितले. त्यावरुन आम्ही आपाजी बिन मानाजी याजकडेस गेलो. तो लाहान दाहा वर्षाचा त्याचाच काल कठीण तो मावळेच घरी आनावस्त्रासाठीं पडिला आहे. आपला आगाव त्याच्यानी न घेवेस जाहला मग तेथून निघोन मौज मजकुरास सिंदे कडस आलो. सिंदेस बोलिलों कीं आपले पाटीलकचे वतन तुम्ही घेऊन आपले कर्जवाम फेडणें. आपले जीवात्मा आहे तो पावेतो आपले आनवस्त्राची स्वाता करणें. यैस बोलिलो त्यास सिंदे बोलिले जे आपले हातून तुमचे कर्जाचा व आनवस्त्राचा आगाव घेवत नाहीं. तुम्हीं आपले वतन ह(र) कोणास देऊन आपलें कर्ज फेडणें. आनावस्त्राची स्वाता करून घेणे. यैस बोलिले. उपरी मागती करविरास तुम्हापासी येऊन आपले वर्तमान तुम्हास सांगितले. त्यावरुन तुम्ही मान्य करुन आमचा कर्जाचा व आपला जीवात्मा आहे तो पावेतो आनावस्त्राची आगाव घेतल. मग तुम्हा पासून आम्ही रुपये घेऊन कर्जदाराचे कर्ज फेडिल. आनावस्त्राची स्वाता करून घेऊन तुम्हास निमे पाटीलकीचें वतन वडीलपणाचे नांगर व नांगराचे कानू कायेदे आपले आत्मसंतोष देऊन विक्रीत पत्र सिंदेच साक्षीनिसी करून दिल्ह. पुढ थलचा महजर करून घ्यावा या बदल तुम्ही मौज मजकुरास आला. आणि श्री देव हणमंत व पांढरीचे देवात्र

दर्शन घेऊन गुळपान उभी पांढरीस वाटून सर्वांच्या भेटी घेतल्या. त्यावर माहाजर करावयासी पंचाईत देसक व भोवर गांवीच वतनदार हकजवर[1] ऐस येऊन कसबे रुकडी येथ हजरत पीर आलीयाचे दरग्यामध्ये बैसल. आणि तुम्हास माहाजर करून देते समई आम्ही पंचाइतापासी उभे राहून सांगितल जे यादव यासी आपले पाटीलकीच वतन आत्मसंतोष विकत दिल्ह आहे. तुम्ही आमचे वडीलपणाच पाटीलकीचा यादवास माहाजर करून देणें ऐस सांगितल. त्यावरून आम्हास पंचाईत बोलिल जे तुमचे पाटीलकीचे वडीलपणाच कानु काइदे तुम्हाकडेस आसतील ते माहाजरामध्ये ल्याहाव लागतात ते सांगोन देणें. त्यावरून आम्ही बोलिलो की आम्हाकड नांगर व नांगराचे कानु काइदे आमचे ऐस म्हणताच तुकोजी बिन बनाजी व वीराजी व सुभानजी बिन मुदोजी सिंदे हे आम्हास बोलिल की आमची होळीची पोळी व भावई ही दोनी कलम व निम इनाम व निम मेटकुडो ऐस आम्हाकड टाकून वरकड तुम्ही आपले वतन वडीलकीच देणें. ऐस म्हणताच सिंदे मजकुरास आम्ही बोलिलों कीं पाटीलकीस तुज काय समंध. आमचे वडिलाचे मारे करून आमची कमकुवत पाहून रैठाईन पाटील म्हणून घेता. तुम्हास पाटिलकीस समंध नाहीं. ऐस बोलिलो त्यावरी त्याचा आमच कथला होऊन पंचाइतापासी उभे राहिलो. पंचाइतानी आमचा व सिंदेचा करीना लिहून घेऊन उभे पांढरीच व भोवरगात्रीच कराने लिहून घेऊन त्याची झाड पिछाडी व साक्षी मोझा पाहून पंचाइतानी निवाडा करून आमची पाटीलकी पुरातन खरी सिंदे खोट जाहाल याणी पाटीराखपणें आसाव. ऐसा निवाडा करुन निवाडपत्र आम्हास करून दिल्हे. आमची पाटीलकी आवघी आमची आम्हाकड जाहाली. पूर्वी आम्ही तुम्हास निमे पाटीलकी व वडीलपणाची तुम्हांस देऊन विक्रीत पत्र करून दिल्ह. हाली निमे पाटीलकी भाऊवाडा सिंदे वा। हा तुम्हीं घेणें म्हणऊन तुम्हास बोलिलों. मग तुम्ही आम्हास बोलिला जे पूर्वी तुम्ही निमे पाटीलकी वडीलपण नांगर व नांगराची कलम आम्हास दिली आहेत त्यास टका पडिला

---

१ हकजवर = हक्कदार.

आसतां सांप्रत निमे भाऊ वाटेस खर्च वेच पाहाता बहुत दिसतो हे गोष्ट आमचे ध्यानास येत नाहीं. पूर्वी निमे पाटीलकी वडीलपणाची दिली आहे तेवडीच आमची आम्हास पुरे. हाली भाऊवाठा निमे निवाडे मुळ तुम्हाकड जाहाला तो तुमचा तुम्ही आनभवणें. आगर हर कोणास देऊन खर्च वेच पडला आहे तो वारुण घेणें ऐसे पष्ट आम्हास झाडून बोलिला. त्यावरी आम्ही तुम्हास बोलिलो की निमे पाटीलकी भाऊवाटेची आमचे हातून निभावेना आणि या वतनास धणी दुसरा करावा तरी खर्च वेच फार पडिला भाऊवाटेचा वंत घेतो ऐस नाही. आणि येक वतन दोन ठाई होते. हे गोष्ट कार्याची नव्हे. जैसा पूर्वी माझा आंगीकार करून कर्जातून मुक्त केल तैसच हाली हाहीं भाऊवाठा घेऊन निवाडे मुळ खर्च वेच हका पैका पडिला तोही तुम्हीच देणें म्हणजे आम्हां जाधवाच पाटीलकीच वतन अवघे येके ठाई आनभवेल ही गोष्ट उत्तम म्हणऊन आर्जमात होऊन तुम्हापासी उभे राहिलो. त्यावरून तुम्ही पंचाइतास बोलिला जे नागोजी पाटील यान करवीरचे मुकामी निमे पाटीलकी नांगर व नांगराची कानू काइदे आम्हांस विकत दिल्ह आहेत. हाली भाऊवाठा सिंदे कडील सोडविला आहे. तोही तुम्हींच घेणें आणि टका पैका तुम्हीच वारणे ऐस म्हणऊन आमचे गळा पडतो. ही गोष्ट समस्त तुम्हां पंचाचे ध्यानास आणून काय ते सांगणे. तेणे प्रा आम्ही वर्तणूक करु. त्यावरुन पंचाइतानी ध्यानास आणून तुम्हांस उत्तर दिल्ह जे पूर्वी नागोजी पाटलाचा आंगीकार केला आहे. तेणेप्रमाण हाली आंगीकार करुन आवघे वतन येक जागा आनभवलियान उतम गोष्टी आहे. ऐस बोलिल्यावरून पंचाइताची गोष्टीस तुम्ही मान्ये होऊन आवघा पाटीलकीचा खर्च वेचाचा व दिवाण नजरेचा आंगीकार करून आम्हास बोलिल जे तुझा पुतण्या आपाजी बिन मानाजी जाधव आहे. आम्हांस पूर्वी करविरीं निमे पाटीलकी वडीलपणाची दिलीस तेव्हा आपाजीस करार करून दिलास तेणे प्रमाण आम्ही व आपाजी वर्तू. परंतु सधा सिंदेकडील भाऊवाठा पंचाइता मते सोडविलास तो आम्हास देतोस तरी या वाटेस आम्हास व आपाजीस कोणता विचार सांगणें म्हणऊन आम्हास बोलीला

त्यावरून तुंम्हास आंम्ही बोलिलों कीं पूर्वी तुम्हांस आम्हीं निमे पाटीलकी दिली आहे. त्या इनामपैकीं भाऊवाटेची चौथी तक्षीम आपाजीनं खाऊन आसावे. आपाजी हा चौथे तक्षिमेचा भाऊ तुझा कैसा म्हणाल. तर त्याचा तपसील आमचा बाप सिदोजी व बहिरुजी हे दोघ चुलत चुलत भाऊ त्यास बहिरोजी मृत्ये पावला पोटी पुत्र संतान नाहीं सिदोजीचे पोटी आम्ही व मानाजी. मानाजीचे पोटी हाली आपाजी आहे. त्यास बहिरोजीची बायको रखमा इने आपले पोटी पुत्र संतान नाही. आनावस्त्राची स्वस्ता व्हावी. मेलिया माती जिता रोटीं द्यावी. त्यावरुन वडील दीर सिदोजीचा लेक वडीलभी हा भाव चितात आणून पाचाच्या विचारे मजला वोटेत घेतल. या मुळं बहिरजीची तक्षीम येकून तीन तक्षिमा. आमच्या बहिरुजी कडून आम्ही वडील व सिदोजीकडून वडील आम्ही या दोही कडून वडील आम्ही. चवथी तकसीम भाऊवाठा इनामातील मानाजीचा लेक आपाजी याजकडे येणे प्रमाण आमची व त्याची वाटणी आसे तेणे प्रमाण चौथी तकसीम इनामातील आपजीस देणे म्हणऊन सांगितल्यावरून चौथी तक्षीम इनामा पै।। देऊं. परंतु सिदे बावत भाऊवाठा इनामातील त्याचा मजकूर काय सांगता तो सांगून देणे ऐसं म्हणो लागला. त्यावरून आम्ही तुम्हास सांगितले जे आपाजी जाधव हा नेणता या वंतास[1] टका पडिला. त्याणे कोठून द्यावा. आम्हा जाधवाची पाटीलकी आवघी ते तुम्हा यादवास विकत दिली. त्या प्र।। आवघी पाटीलकी तुम्ही आनभवणे. आमचे जाधवाचे वंशाचा म्हणावयासी तेवडा मूल आपाजी दाहा वरिसाचा आहे. त्यांचा ही भरवसा नाही. ईश्वर इच्छेनें जगोन आपण मौजे मजकुरास याव ऐसं घडोन आला. तरी सदरहू इनाम निमे जमीन भाऊवाटे पै।। चौथाई जमीन बिघे ८७।। साडेसात बिघे देऊन त्याच चालवणें. वरकड कानू काइदस त्यास काही गरज नाही. आपाजी हा न ये तरी ते ही जमीनीच तुम्ही धणी ऐस असता त्या रुपयाचा मजकूर त्यासी विचाराव. ऐसे

---

१ वंस = वाटणी; खंडणी.

नाही. रुपये आपण देऊन विभाग तुम्ही आनभवणें. तेव्हा पंचाइतास तुम्ही बोलिला कीं नागोजी पाटील हा काय बोलतो हे बोली तुम्ही दैव मनास आणोन आम्हास काये सांगावयाच असेल ते सांगणे. तेणेप्रमाणे आपण वर्तणूक करू. त्यावरून आवघी बोली पंचाइतानी ध्यानास आणून तुम्हास सांगीतल की जाधव मजकूर यान गुंजाईस ठेऊन कांही सांगीतल नाही. आवघे वतन तुम्हास देऊन आपाजी आला तरी जमीन सदरहु देऊन चालवणे. न येच तरी तोही विभाग तुमचा असे. आवघे गोष्टोविसी कांही लढा ठेविला नाही. त्यास ज्याच तो पाटीलकी खुषे रजावंदीन बोलोन विकत देत असता तुम्हा घेणारास काय चिंता आहे. आम्हा सर्वांचे साक्षीनिसी होऊन तुम्हास पाटीलकी सदरहूप्रो विकत दिली आहे. तरी तुम्ही पाटीलकी सुखरूप आनभऊन असणें. म्हणोन पंचाइतानी येविसी झाड पिछघाडी करून सांगितल्यावरून पंचाइताचे वचेनावरून मान्ये तुम्ही जाहाला. तेव्हा देसकाचे व समाकुल पांढरीच वतनदार व बलुते व भोवर गावीचे हकजवार याचे साक्षीन मौजे मजकूरच वतन आमच आम्ही आवघे आमचे आत्मसंतोष खुष रजावंदीन विकत दिल्ह आणि तुम्हास विकरीत पत्र करून देऊन तुम्हा पासून रु।। ७०० सातशेहे घेऊन कर्जदाराच कर्ज फेडले व खर्च वेच पडिला होता तो व दिवाणचे नजर ऐसा भाग वारिला. आपला जीवात्मा आहे तो आनावस्त्राची स्वस्ता करुन घेतली. सदरहू रु।। तुम्हाकडून झाडियानिसी भरून पावलो आसो. हे पाटीलकीच वतन आवघे तुम्हास दिल्ह. पाटीलकीच कानू काइद बी त।। नागर लक्ष्मी दिवाळीचा व्हन राहाटचा माहार पड्द होळीची पोळी भावई दिवा, नवरात्र कळस बायजमा व्हन पांच पटी पिछोडी व्हन आडीच सेवाधार तेल घाणि ग्रास दररोज नव ठाक तश्रीफ चादवा वाणियाकडील सणास गूळ पानारि याकडील पान उभा मार्गं दर नगास पान ५० पनास गोंधळ कोने चवथा पानारियाकडील पान दररोज रतीब पन्नास कटलदाम[1] घरटका व नख्त बाब चाभारा-

---

१ कटलदाम = कटला = कडता = वजनी एक मण जिन्नस विकला असता त्यावर द्यावयाचा कर.

कडील जोडा येक मेटकुडो दस्तावरी गला[1] .।. पाव मण कुमारकी[2] गुगोळ सवासीण मोतंफा साळी कोष्टी धणगर दरमागास सालिना रुके .॥. चवीस गुराळ घाणेस दररोज गूळ ᳵ३ तीन सेर व ऊस पाच व तेल बेंदूर व॥ च्यार सेर पालक जमीन पंधरा बिघे व इनाम जमीन पावणा चावर यासी तपसील नागर वडीलकी जमीन .।. पाव चावर व खासा वाटणीं जमीन .।१५ पंचे ताळीस बिघे व आपाजी बिन मानाजी याकड इनाम जमीन निमें पै॥ चवथी तक्षीम इदलशाई ८७॥ साडेसात बिघे व सिंदे पाठोराख नि॥ इदलशाई ८७॥ साडेसात बिघे येणे प्रमाण पाटीलकीच वतनाच कानूकाइद कलम सुमार ३० तीस तुम्हास लिहून दिली आसत. तरी सदरहू मौजे म॥रचे पाटीलकीचे वतन वंशपरंपरेनें आनभऊन सुखरूप आसणे. आपाजी गावास आला तरी सदरहू साडेसात बिघे जमीन देऊन चालवणे. तो न ये तर तुमच तुम्ही आनभवणे व सिंदे पाटीराख याणी साडेसात बिघे ज॥[3] आनभऊन तुमची पाठ राखणेपणाची सांगीतली. चाकरी करून आसाव आणि कोणी कोणासी बोलावयासी समंद नाही. कोणी कोणासी खटला करितील त्यासी आपले पूर्वजाची सेफत आस. आम्हास पंचाइतानी निवाडपत्र करून दिल. ते व सिंदे यास यजीतखत ऐसी दोनीपत्र आम्हापासी होती ती तुम्हास दिली आसत येणे प्र॥ विक्रीत पत्र सही.

सदरहू प्र॥ विक्रीत पत्र मनास आणिता नागोजी बिन सिदोजी जाधव याण आपले वतन आत्मसंतोष विकत दिल आहे त्याप्रमाण स्वामीनी याजवरी कृपाळु होऊन मौजे मुडसिंगी कर्यात रुकडी क॥ मजकूर येथील पाटीलकीच वतन आवघे यासी करून दिल आस. या वतनास हक व इनाम कानू व काइद पुरातन आहेत त्याप्रमाण बोली करार करून दिल आसत बी तपसील-----

---

१ दस्तावरी गला = दस्त = सारा, पट्टी.

२ कुमार = कुंभार.

३ ज॥ = जमीन.

किता कलम

१ नागर
१ लक्षुमी
१ दिपवाळीचा व्हन
१ राहाटघा बेगारी
१ पडद
१ होळीची पोळी
१ भावइचा दिवा
१ नवरात्राचा कळस
१ बाय जमा व्हन ५
१ पटी पिछोडी व्हन
२॥
१ सेवाधार
१ तेल घाणियासी
दररोज ८८८९
१ तश्रीफ
१ चादवा[1]
१ वाणियाकडील सणास
गूळ
१ पानारियाचे उभे मार्ग
दरनगास पान ५०
१ गोंधळ कोना चवथा
१ इनाम जमीन ।॥ यासी

किता कलम

१ पानारी याजकडील रतीब
दररोज पान ५०
१ कटल दाम
१ घर नख्त बाब
१ चांभाराकडील जोडा १
१ मेटकुडो दर चावरी गला ।.
पाव मण
१ कुमारकी
१ गुगोळ
१ सवासीण
१ मोतर्फा साळी कोष्टी
व धणगर दर मागास
सालिना रुके ॥
१ गुराळ घाणियासी दररोज
गूळ व॥ ८८३
व ऊस सुमार ५
१ तेल बेंदूर व॥
८८४
१ पालक ज॥ बिघ
८१५

—

१२

---

[1] चादवा = मंडपावरचे छत्र.

तपसील

•।• नागर वडीलकी
•।१५ खासा वाटणी
८७।। आपाजी बिन
मानाजी याकड
निमे इनाम पा।
चवथाई तकसीम
इदलशाई वडीलकी
खेरीज करून
८७।। सिदे पाटीराखे
इदलशाई

———

•।।।•

**१८**

येणेप्रमाणे कलम तीस नागर लक्ष्मी दिवाळीचा व्हन १ व राहाट्या माहार व पडद व होळीची पोळी व भावइचा दिवा, नवरात्र कळस व बायजमा व्हन पाच व पटी पछोडी व्हन आडीच व सेवाधार तेल दररोज ८८८९ व तश्रीफ व चांदवा व वाणियाकडील सणास गूळ व पानारी याचे उभे मार्गास दर नगास पाने ५० पनास व गोधळ कोन चवथा व इनाम जमीन •।।।• पावना चावर त।। नागर वडीलकी पाव चावर वाटणी पाटील पेचेताळीस बिघे व आपाजी बिन मानाजी जाधव वडीलकी खेरीज करुन निमे इनाम पै।। चवथाई जाा साडेसात बिघे आनभऊन आसाव वरकड कानू काइदेस समंध नाही. आपाजी गावास न आला तरी सदरहु जमीन आपाजीची द्वारकोजी यादव पाटील याणी ती ही जाा व आवघी पाटीलकी आनभवावी. तुकोजी बिन बनाजी व वीरोजी व सुभानजी बिन सिदोजी सिंदे व सिंदे मजकूर याचे भाऊबंद पाठराखे याणी साडेसात बिघे जमीन आनभऊन पाटीराखेपणाची सांगितली चाकरी करुन आसाव. सदरहू प्रमाण

तुम्ही चालवित जाणे. आणि पाटीलकीच वतन कानूकाइद व इनाम वाटणी प्रा द्वारकोजी यादव पाटील यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवीत जाणे. साल दर साल ताजा सनदेचा उजूर न करणे. यासी सनदेची तालीक लिहून घेऊन आसल पत्र भोगवटीयासी यादव पाटील मजकुराजवळ परतोन देणे. आणि पाटीलकीची सेवा याचे हातून घेत जाणे. वतन समंध याचे माथा शेरणी रु।। ३०० तीनशेहे ठेविल आसत. निदेश समक्ष. मोर्तब.

रुजु सा। सा।
मंत्री सरकार
बार सुरु सुद्र
बार संमत सुद्र बारबार

तेरीख छ ११ सु।। खमस आर्बैन.

---

क्रमांक : १९२ दि. २–६–१७४४

राणोजी घोरपडे सेनापती यानी व्यंकाजी कोनेरी देशपांडे याचे मौजे जलालपूर या गावचे इनाम पूर्ववत चालू ठेवले.

श्री

राजश्री लक्ष्मी वेंकाजी कोनेरी देशपांडे प।। रायेबाग गोसावी यांसी

अखंडीत लक्ष्मी आलकृत राजमान्य स्ने।। राणोजी घोरपडे सेनापती. सु।। खमस आर्बैन मया आलफ. तुम्ही हुजूर येऊन विनंती केली की आपण पुरातन वतनदार. पूर्वीपासून यक निष्टेने वर्तणूक केली आहे. पुढेही येकनिष्ट आतर होणार नाही. मौजे जलालपूर प।। मजकूर पेशजी इनाम करून दिल्हे आहे त्याप्रमाणे करार करून दिल्हेया स्वामी सेवा करून राहू म्हणून. त्या वरून मनास आणिता तुम्ही पुरातन वतनदार. येकनिष्टपणे वर्तावया आंतर करणार नाही. तुमचे

शिका अष्टपैलू आहे

चालवणे आवश्यक जाणून मौजे मजकूर पेसजी-प्रमाणे इनाम करार करून दिल्हे आसे. पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन स्वामीसेवा करून सुखरूप राहाणे. जाणिजे. छ २ जमादिलावल.

मोर्तब आसे.

---

**क्रमांक : १९३** दि. १०–६–१७४४

तुळजोजी बिन शिवाजी याचा भाऊ नागोजी बिन शिवाजी लढाईत ठार झाला होता. म्हणून राणोजी घोरपडे सेनापती यानी तुळजोजी व नागोजीच्या बायका यांचे चालविण्यासाठी त्याना आठ बिघे जमीन इनाम दिली.

श्री

शिका

आज्ञापत्र समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री राणोजी घोरपडे सेनापति ता। तुळजोजी बिन शिवाजी प।। मौजे नदेहाळ को। कापसी सु।। खमस आर्बेन मया आलफ. तुझा भाऊ नागोजी बिन शिवाजी प।। मौजे मजकूर हे साहेब कामावरी झुंजात ठार पडून त्याचे बायकाचे व तुजे चालवणे अवश्यक जाणून तुज मौजे मजकुरी इनाम जमीन विसा पांडाचे बिघेयाने जमीन बिघे ८८ आठ दिल्ही असे. तरी तुम्ही आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन दिवाण चाकरी करून सुखरूप राहणे. येविसी गावकरास ही सनद आलाहिदा सादर आहे. जमीन सदरहूप्रो आपले दुमाला करून घेणे. जाणिजे.

छ १० जमादिलावल. मोर्तब आष्टपैलु.

**क्रमांक : १९४** **दि. ५-११-१७४४**

छत्रपती संभाजी दुसरे यांचे कृष्णराव पंडीत अमात्य याना पत्र की सुभा प्रांत पन्हाळयाच्या सरदेशमुखीचे वतन राणोजी घोरपडे सेनापती यांजकडे आहे. तरी त्याचा वसूल जकातीसह त्यांच्या कमाविसदाराकडे सुरळीत पोहोचेल ते करावे.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७१ रक्ताक्षिनाम संवत्सरे कार्तिक शुध येकादसी इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री कृष्णराव पंडित अमात्य यास आज्ञा केली यैसीजे. सुभा प्रांत पन्हाळयाचे सरदेशमुखीचे वतनाचा हक इनाम पूर्ववत चालत आला असेल त्याप्रमाणे चालवावयाविसी हे पत्र सादर केले असे. तरी तुम्ही आपणाकडील गावगना ताकीद सरदेशमुखीचा अमल जकात देखील पूर्ववत कार्य चालले आहे त्याप्रमाणे सेनापतीकडील कमाविसदाराकडे वसूल देत ते करणे. बहुत लिहिणे तर तुम्ही सूज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते

---

**क्रमांक : १९५** **दि. २८-१-१७४५**

छत्रपती संभाजी दुसरे यानी यशवंतराव गायकवाड याना दिलेले इनामपत्र. यांत यशवंतराव यांचे पिते म्हालोजी गायकवाड यानी छत्रपती शिवाजी महाराज यांजपासून राज्यांत सेवा केली, असे म्हटले आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७१ रक्ताक्षिनाम संवत्सरे माग शु॥ सप्तमी इंदुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शंभू छत्रपति स्वामी याणी राजेश्री यशवंतराव गायेकवाड बिन म्हालोजी गायेकवाड यास दिल्हे इनामपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामीच्या राज्यातील पुरातन येकनिष्ठ सेवक. तुमचे वडील तिर्थरूप राजश्री थोरले कैलासवासी स्वामी

पासून या राज्यात येकरूप निष्टेनें सेवा करीत आले. तुम्ही स्वामी राज्यारूढ झालियापासून स्वामीच्या पायासी निष्टा धरून त्रिकर्ण शुद्धीने सेवा करीत आहा. स्वामीच्या पायाविना दुसरे जाणत नाही. (म्हणून नूतन इनाम करून दिले तपसील इ. इ. )

तेरीख ५ मोहरम

सु॥ खमस आर्बैन मया अलफ.

---

**क्रमांक : १९६**        दि. २५–२–१७४५

जमखिंडीचे देशमुख व देशपांडे हे छत्रपती संभाजी दुसरे यांच्या आज्ञेत वागत नाहीत व मातुश्री ताराबाई यांचा वसूल सुरळीत देत नाहीत, असे कानी आल्यावरून छत्रपती शाहू यानी त्याना या पत्रात ते नीट वागले नाहीत तर फौज पाठवून त्यांचा बंदोबस्त केला जाईल असा इशारा दिला आहे.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७१ रक्ताक्षिनाम संवत्सरे फाल्गुण शुध पंचमी इंदुवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी देशमूख व देशपांडिये

श्री
राजा शाहू
छत्रपती हर्षंनी
धान बाळाजी
बाजीराव पं
प्रधान

श्री
श्री आई आदिपुरु
ष श्री राजा शाहू छत्रप
स्वामी कृपानिधी त
स्य श्रीनिवास परशु
राम प्रतिनिधि

पा॥ जमखिंडी यास आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही चिरंजीव राजश्री———यासी रुजुवात राहून निष्टापूर्वक मर्यादेने वर्तत नाही. व पा॥ म॥र मातुश्रीसाहेब याजकडे मुकासा आहे त्यास अमल सुरळीत देत नाही म्हणून हुजूर विदित जाले. तरी हे गोष्टी कार्याची नाही. या उपरी तुम्ही त्यासी मर्यादेने निष्ठापूर्वक वर्तोन पा॥ म॥रचा अमल सुरळीत देऊन त्याची पत्रे तुम्ही निष्टेने वर्तता अमल सुरळीत देता ऐसी स्वामीस

ये ते करणे. फिरोन तुमचे अमर्यादा वर्तणुकेचा बोभाटा हुजूर अलिया फौज पाठऊन पारपत्य करणे लागेल. यैसे स्पष्ट जाणून वर्तणूक करणे. (जाणिजे लेखनालंकार).[1]

सिका

रुजु संमत सं॥ संमत
सुमंत मंत्री सरकार
बार सुद्र सुद्र सुद्र बार बार बार

---

क्रमांक : १९७ दि. २५-२-१७४५

छत्रपती शाहू यांचे देशमुख व देशपांडे परगणे हानेगुंदे याना पत्र की, छत्रपती संभाजी दुसरे यांच्या आज्ञेत न वागल्यास फौज पाठवून पारिपत्य करावे लागेल. सदहू देशमुख आणि देशपांडे छत्रपती संभाजी दुसरे यांच्याशी गैरनिष्ठेने वागत असल्याची तक्रार छत्रपती शाहू यांच्याकडे आली होती.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७१ रक्ताक्षिसंवत्सरे फाल्गुण शुध पंचमी इंदुवासर क्षत्रिये कुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति याणी

| श्री | श्री |
|---|---|
| राजा शाहू | श्री आई आदि पुरु |
| छत्रपती हर्ष नी | ष श्री राजा शाहू छत्रप |
| धान बाळाजी | स्वामी कृपानिधि त |
| बाजीराव प्र | स्य श्रीनिवास परशु |
| धान | राम प्रतिनिधि |

देशमूख व देशपांडिये पो होनगुंदे यास आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही चिरंजीव राजश्री———यासी रुजुवात राहोन निष्ठापूर्वक मर्यादेने वर्तत नाही म्हणून हुजूर विदित जाले. तरी हे गोष्टी कार्याची नाही. या उपरी त्यासी निष्ठापूर्वक मर्यादेने वर्तणूक करून तुम्ही निष्ठेने वर्तता अमर्यादा करीत नाही यैसी पत्रे त्यांची

---

१ () अक्षर वळण वेगळे.

स्वामीस येत ती गोष्टी करणे. फिरोन तुमचे अमर्यादा वर्तणुकेचा बोभाटा हुजुर आलिया फौज पाठऊन पारपत्य करणे लागेल. यैसे जाणून वर्तणूक करणे. ताकीद असे. (जाणिजे लेखनालंकार)[१]

मयादे
यंरा
जते

रुजु संमत संमत संमत बार सुद्र
सुमंत मंत्री सरकार

---

**क्रमांक : १९८** **दि. २६–८–१७४५**

रजेवरील लोकांस लढाईवर त्वरीत पाठवावे. खर्चाची व्यवस्था केली जाईल. असे तुळाजी आंग्रे सरखेल यांचे उमाजी नाईक साठम यास पत्र.

राजश्री उमाजी नाईक साठम
अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजेश्री स्ने।।
तुळाजी आंगरे सरखेल राम राम. सुरु सन शीत अर्बेन मया व अलफ. तुमचे जमावाचे लोक रजेन घरास आहेत. जमा करून रवाना कर्णे. रजेपैकी एक असामी न ठेवणें. जलदी लोक रवाना करणें. रवाना छ. १९ माहे शावान. तुमचे लोक नामजाद गोपाळदुर्गास आहेत. त्यांचा मुकाबला जाहला पाहिजे. तरी जलदीनें लोक पाठविणें. आणखी नवे लोक ठेवण्याची तरतूद करणें. आणी लिहून पाठविणें. खर्चावेचाची बेगमी कर्णे ते केली जाईल. जाणिजे. रवाना

छ. १९ माहे शाबान (लेखन सीमा).

---

१ () अक्षर वळण निराळे.

क्रमांक : १९९ इ. स. १७४५(?)

दर्याबाई निंबाळकर हिचे छत्रपती शाहू याना रामराजाच्या पूर्ववृत्ताबाबतचे पत्र.

तालीक

तीर्थस्वरुप महाराज राजश्री
बाबासाहेब वडिलाचे सेवेसी——

अपत्य दर्याबाई निंबाळकर कृतानेक दंडवत विज्ञापना. ता। छ १८ माहे रमजान मु। पिळीव येथ वडिलाचे कृपे करून सुखरुप असो. विशेष——चिरंजीव राजश्री——सरलश्कर सह सैन्यात गेलो होतो. तिकडून आल्यानंतर नाझरेच्या मु। श्रीमंत सकल सौ. संपन्न मातुश्री बयाबाई साहेब याच दर्श(न) जाहले. त्यानी आपल्या डेऱ्यास सन्मान नेऊन बहुता प्रकारे गौरव केला. सप्तरुसीकडील मा।र पुसिला. येविसीचा मजकूर ता। आर्थ समक्षे निवेदन केला. सारांश येतद्विसीचा मजकूर तीर्थस्वरुप मातुश्री साहेब यासी दखल आहे. त्यासच जे पुसणे ते पुसाव. आमचे दखलगिरीचा मा।र श्रीमंत तीर्थरूप कैलासवासी—— भोवानी बाईस पुत्र जाहाला तो मृत्य पावला. येवढ आपणास दखल होते. त्या आलीकडील मा।र आई साहेबाकड आपणास दखल नाही. सेवेसी श्रुत होय.——

---

क्रमांक : २०० दि. २६–११–१७४५

मानाजी बागुल हे 'हुजूर जमावानिशी' आहेत. त्यांच्या पा। कागल येथील सरदेशमुखी, सर जकायत व इसाफती या वतनांचा वसूल त्यांच्याकडे देत जाणे, म्हणून हिंदुराव घोरपडे यांचे आबाजी घाटगे यांस पत्र.

श्री सुबराव

तालीक

राजश्री आबाजी सर्ज्याराऊ घाटगे
देसाई पा। कागल गोसावी यांस——

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने।। हिंदुराव घोरपडे ममलकतमदार राम राम. सु।। सित अरबैन मया अलफ. पाो मा।र यथील सरदेशमुखी व सरजकायत व इसाफती देह बाबत कमाविसी यैवज दिमत मा।रची यावी तरी राजश्री मानाजी बागुल हे हुजूर जमावानिशी अहेत. यास सरंजामाबदल देविली कमाविसी तपसील देहाय व परगणे—

| | |
|---|---|
| पाो म।। यथील सर-<br>देशमुखी दर सदे दाहाप्राो<br>व सरजकायती कमाविसी<br>येणेप्राो कलम १ | इसाफती देह मौजे बोरिवडे<br>दरोबस्त कमाविसी देणे<br>कलम<br>१ |

येणेप्राो मा।रनिल्हेस रास करून दिल्हे असे. तरी सरदेशमुखी अकाराप्राो ऐवज होईल ते व सरजकायत कमाविसीबाब व इसाफती यैन जिनस देह यक देविलेप्राो दुमाला करणे. यविसी दुसऱ्या पत्राचा उजूर न करता लिहिलेप्राो कमाविसी देणे. उजूर न करणे. जाणिजे.

छ १३ माहे जिलकाद. मोर्तब.

सिका चौकोनी

---

**क्रमांक : २०१** **दि. २२-१२-१७४५**

कर्नाटकाच्या सालाबाद वसुलापैकी ६० हजार रुपये छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडे पोहोचते करावे. त्याची तक्रार येऊ देऊ नये. म्हणून छत्रपती शाहू यांचे बाबूराव सदाशिव यास आज्ञापत्र.

श्री आसल

राजमान्य राजश्री बाबूराव सदासिव यास आज्ञा केली ऐसीजे. तुम्हाकडे कर्नाटक प्रांतीचा यैवज साल मजकूरचा येणे. त्यापैकी प्रतिवार्षिक चिरंजीव राजश्री————यास हा। देणे. ऐवज सालमजकूर रुो।। ६०,००० साठ हजार देविले असेत पावते करून कबज घेणे. तेणे

प्रमाणे मजुरा पडतील यविसी राजश्री यशवंतराव माहादेव खासनिवीस लेहून पाठवितील त्याप्रमाणे निसंदेह यैवज पावता करणे. उजूर न करणे. अगत्य जाणोन हे आज्ञापत्र सादर केले आहे. तरी उजूर न करिता सदरहू लिहिल्या प्र॥ यैवजाचा निर्गम होय चिरंजीव राजश्री ——— याजकडील बोभाट हुजूर नये ते गोष्टी करणे. जाणिजे.

छ ९ जिल्हेज. सुहूरसन सित अर्बैन मया अलफ (रा॥ येसवंतराव लेहून वरात पाठवतील त्या प्रमान निसंदे पावने. उजर न करन. सुखी असा)[१]

---

**क्रमांक : २०२** **दि. ३०-१२-१७४५**

का॥ उचगांव येथील सरदेशमुखी व इसाफतीचे एक गाव ही वतने चि. मनाबाई सावंत याना दिली आहेत म्हणून हिंदुराव घोरपडे यांचे रवळोजी देसाई यांस पत्र.

म॥ अनाम रवळोजी रामजी देसाई का॥ उचगांव यांसि हिंदुराव घोरपडे ममलकतमदार सु॥ सित अर्बैन मया अलफ. का॥ मजकूर येथील सरदेशमुखी व इसाफती देहे १ येक दिमत मजकुरास चालत आले प्र॥ पेशजीया-

चौकनी सिका कडील दू(र) करून हली चिरंजीव मनाबाई सावंत यास सदरहु प्रमाणें करार करून दिल्हा असे. तरी तुम्ही सरदेशमुखीचा यैवज व इसाफती देहे दरोबस्त (दे) विले प्र॥ दुमाला करून (देणे) ये विसीई दुस(ऱ्या) पत्राचा उजूर न करणे.[२] जाणिजे.

छ १७ मा(हे) (जिलहेज)

---

१ ही अक्षरे शाहू महाराज यांचे हातची.

२ श्री. हिंदुराव घोरपडे यानी याच आशयाची पत्रे देशमुख व देशपांडे कसबा सांबोर व कसबा कामती याना पाठविली. ती उपलब्ध आहेत.

**क्रमांक : २०३** **दि. ७–१–१७४६**

पत्र मिळताच त्वरीत भेटीस येणे म्हणून जयराम सावंत भोसले व रामचंद्र सावंत भोसले यांचे अत्माजी नाईक साठम यास पत्र.

श्री

राजमान्य राजश्री अत्माजी नाईक साठम यांस जयराम सावंत भोसले व रामचंद्र सावंत भोसले सरदेसाई प्रांत कुडाळ व महालानीहाय सुरू सन सीत अर्बेन मया आलफ. जे क्षणीं पत्र पावेल तेच क्षणी हुजूर येऊन भेटणे. घडीचा विलंब न कर्णे. अति सत्वर यावें यासी येणें. जाणीजे ता।। छ २५ जिल्हेज.

---

**क्रमांक : २०४** **दि. २७–२–१७४६**

काशिबा काळे व सेनापती राणोजी घोरपडे या दोघांमध्यें मौजे सिरदवाड ह्या ठाण्याबाबत तंटा उद्‌भवला होता. शेवटी हे ठाणे काशिबाने सेनापतीस देण्याचे ठरविले. ते विसाजी नारायण यांस कळताच त्यानी काशिबास ते ठाणे सेनापतीस न देण्यास प्रवृत्त केले. त्यानी ते काळ्याकडून आपल्या रखवालीस घेण्याचा काळ्याशीं करार केला.

श्री

तालिक

राजश्री कासीबा काळे ठाणे मौजे सिरदवाड
क।। मांजरी म।। कागल गोसावी यास––

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्ने ।। विसाजी नारायेण असीर्वाद. सु।। सित अर्बैन मया व अलफ. कारणे लेहून दिल्हा तहनामा यसाजे. मौजे म।।रचे ठाणे श्रीमंत राजश्री सेनापती याजकडून तुम्हाकडे होते. त्यास सेनापतीमधे व तुम्हामधे विरोध वाढला. मग सेनापती याणी मध्यस्तीवर घालविले जे जामीनगतीचे तुमचे देणे घेणें व पडले घोडे व गावची सिबंदी व वाड्या हुड्यास

पैंका जो लागला असेल तो आम्ही तुमची निशा करून देऊ आणि आपले ठाणे आपण घेऊ म्हणोन तुम्हासी सेनापती याणी करार केला. त्याजप्रो तुम्ही मान्य होऊन मौजे मजकूरचे ठाणे सेनापतीस द्यावेसे करार केले हे वर्तमान आम्हास कळले. श्रीमंत राजश्री सेनापतीचा व आमचा दावा जबरदस्त. त्यामुळे आम्ही तुम्हास बोलाऊन आणून सांगितले जे तुम्ही अजी सिदरवाडचे ठाणे सेनापतीस देता म्हणजे कसबे इचलकर्जीचा दरवाजा बंद होतो आणि आमचे संस्थान बुडते. यैसे बहुता प्रकारे क्रियापुरस्कर तुम्हास सांगितले जे तुम्ही सेनापतीचा तह करून ठाणे न देणे जी वाट आमची ती तुमची. आदी तुमचे बरे करून देऊ. मग आमचे बरे करून घेऊ. तो पावेतो कसबे इचलकंर्जी व मौजे सिरदवाड ही दोणी ठाणी आम्ही जतन करितो म्हणून आम्ही तुम्हास कृपा दिल्ही. तेव्हा तुम्ही मौजे मजकूरचे ठाणे राजश्री जिवराव बोकरगांवकर याचे विद्यमाने अमाचा ठराव केला असे. यसीयासी जे समई सेनापतीची व आमची भेट होऊन त्याचा आमचा सवरंश होईल ते समई तुमची व सेनापतीची भेट करून तुमचे ठाणे तुमचे स्वधीन करुन देऊ. कदांचित ठाणेचे नहोंन तरी तुमचे खुदनें लिहिले आहे ते बर हुकुम जमा नक्ती रुो ७०० सातशेहे व किरकोळ देणेघेणे व पडली घोडी ५ पाच व गावची शिबंदीचे कर्जवाम जाहले आहे ते रुो व वाडाहुडा बांदविले याचे रुो जे क्रिया पूर्वक असतील ते आम्ही तुमचे निशा करून देऊ आणि सेनापतीचे ठाणे सेनापतीस पावले आसे कबज तुम्हास आणून देऊ. मग गाव ठेऊन घेऊ. तो पावेतो तुमचे ठाणे आम्हाकडे रखवालीस आसे. ठाणेचे लिहिले प्रमाणे निवाडे पावेतो मौजे म।।री जमीन चालवावी. बी ता।। ता।। खासगत तुम्हास चालवावी. जमीन काळी बिघे ।। तीस व मळी जमीन बिघे ०५ पाच व अंतोराम यासी जमीन काळी बिघे ०७ सात व मळी जमीन बिघे ०३ तीन येणेप्रमाणे कोटीमूळ जमीन चालवावी. याप्रो तुमचा आमचा तह होऊन तुम्हास हा तहनामा लिहून दिल्हा. सई

तेरीख छ. १७ माहे सपर

साक्ष

| | |
|---|---|
| सुरु चंवडो कुलकर्णी | नरसो शंकर कुलकर्णी |
| मौजे येडराव | का। मा।र |

सिवाय घोडी २ दोन थोरली किमतीची तोतियाचे वेळेस पागेत हवाला केली होती. जखमा घोडेस लागल्या होत्या म्हणोन पागेत नीट करितो म्हणोन न्हेली होती.

---

**क्रमांक :** २०५ दि. ३०-४-१७४६

आबाजी मोहिते यांच्या देशमुखीचा वसूल सुरळित द्यावा म्हणून फत्तेसिंग भोसले यांचे मोकदम मौजे कोराले, कर्यात तळबीड यांस आज्ञापत्र.

श्री

गोल सिका

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री फत्तेसिंग भोसले त।। मोकदमानी मौजे कोराले कर्यात तळबीड सु।। सीत आर्बैन मया अलफ. राजश्री आबाजी मोहिते याणी हुजूर येऊन विदित केले की मौजे मजकुरचे देशमुखीचा हक आपला दोन चार वरसे देत नाही म्हणोन विनंती केली. त्यावरून हे आज्ञापत्र सादर केलें असे. तरी सुदामत हक याचा जो असेल त्याप्रमाणे न द्यावयासी प्रयोजन काये. या उपरी याचे देशमुखीचा हक सुदामत प्रमाणे सुरलित देणे. येविसी फिरोन बोभाट आलिया मुलाहिजा होणा(र) नाही. जाणिजे.

छ १८ रबिलावल. निदेस समक्ष.[1]

लेखना
वधि मुद्रा

---

१ " निदेस समक्ष " ही अक्षरे तुटक तुटक असून त्यांचे वळण निराळें दिसते.

**क्रमांक : २०६** **दि. २०-७-१७४६**

आबाजी मोहिते यांचा देशमुखीचा हक्क त्याना सुरळित द्यावा म्हणून सरकार दारुनी महाल वाडा पहिला यांचे मोकदम कसबे तळबीड यांस आज्ञापत्र.

श्री

आज्ञापत्र सरकार दरुनी महाल वाडा पहिला ताा मोकदमान का। तळबीड सुहुर सन सबा आर्बैन मया आलफ. राा आबाजी मोहिते याचा देशमुखीचा हक तुम्ही सुरलीत देत नाही म्हणुन विदीत जाहाले. त्यास याचा हक ठेवावयास तुम्हास प्रयोजन काये. देखत आज्ञापत्र देशमुखीचा हक दम साल सुद मशारनुलेकडे देणे. ऊजुर केलीया मुलाहिजा होणार नाही. या उपरी याचा बोभाट अप्लीया कार्यास येणार नाही. जाणीजे.

छ १२ माहे रजब. लेंखनसीमा. सही.[1]

---

**क्रमांक : २०७** **इ. स. १७४६ ?**

नाईकवडी याची तलवार तळबीडच्या देशमुखांचा गुमास्ता महमदखान याच्याकडून घेऊन जावी व गावास आणि तळबीडच्या देशमुखांच्या तक्षिमेस उपद्रव देऊ नये, म्हणून कृष्णाजी विठ्ठल याचे रामराव पाटणकर यास ताकीदपत्र.

श्री

राजश्री रामराव पाटणकर
गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने ।। कृस्णाजी विठल आसीर्वाद. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत गेले पाहिजे. विशेष मौजे वेलफले येथील सिवेचे कथलिया

---

१ अक्षरे वेगळी.

निमित्य हुजरुन हुजूरे गेले होते. त्याणी नाईकवडी याची तलवार घेतली. ते रा आबाजी मोहिते याणी राजश्री फतेसिंग भोसले यासी रदबदल करून तरवार मागोन घेतली. ते महमद खान गुमास्ते देसमुख + + + या ठेविली आहे. घेऊन + वली पावे उतर पाटविले पाहिजे. तुम्हाकडून उपसर्गाकरिता गाव पडितो.

शिक्का

रा आबाजी मोहिते यास मोकासा आहे. परंतु यक तकसिम त्यास व तीन तकसिमा खालसा वसूल होतो. गाव पडिल्याने खालसियाचा येवज बुडतो. हे निमित्य घेऊ नये याकरिता लिहिले असे. सर्वविसी गावास उपसर्ग न लागे ते करणे. बहुत काय लिहिणे.

छ ११ सावान.

लेख

नावधी

---

**क्रमांक : २०८**          इ. स. १७४६ ?

आबाजी मोहिते व शंकराजी मोहिते यांच्या देशमुखीचा हक्क सुरळितपणे देण्याची ताकीद कसबेकरांस द्यावी म्हणून केदारजी मोहिते यांचे मानाजी मोहिते हवालदार व कारकून किल्ले वसंतगड यांस आज्ञापत्र.

**राजश्री मानाजी मोहिते हवालदार व**
**कारकून किले वसंतगड गोसावी**
**यांसी**

॥ अखंडत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने ॥ केदारजी मोहिते रामराम विनंती. उपरी क॥ तळबीड येथे राजश्री आबाजी मोहिते व संकराजी मोहिते यांचे देशमुखीचा हक सुरलित देत नाही म्हणून हुजूर विदीत जाहाले. त्यास रा॥ आबाजी मोहिते व शकराजी मोहिते याणी माहाराजास व देवडीस अर्ज केला त्या वरुन राजश्री पंत प्रतीस आम्हास आज्ञा केली की म॥र निलेचे हक देवणे.

त्यावरुन राजश्री पंत प्रतिनिधी याणी आज्ञापत्र का। मा।स दिल्हे आहेत. तरी तुम्ही कसबेकरास किलावरी नेऊन ताकीद करून देशमुखीचा हक्र सुरलित देवणे. का। मारचे पाटील नौदिगर[1] + करतील तरी बरे. ताकी + + + + + पडे येसे करणे + + + + + + विनंती.

(पत्राच्या समाप्तात पुढील मजकूर आहे.)

सदरहू हक्र का। मा।रचा व घेऱ्याचा हक सुरलित देवित जाण हे विनती.

---

**क्रमांक : २०९** **दि. १०-११-१७४६**

छत्रपती संभाजी दुसरे यांची वाणी वकाल मार्ग मौजे आरळे याना आज्ञा की सदहू मार्ग गावात येणाऱ्या दर बैलामागे जी सहा रुके जकात आकारण्यात आली आहे, ती यशवंतराव गायकवाड यांजकडे पोहोचती करावी.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७३ क्षये नाम संवत्सरे मार्गसीर्ष शुध नवमी इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छेत्रपती स्वामी याणी वाणी बकाल मार्ग मौजे आरळे ता। सांतणे यासि आज्ञा केली येसीजे. मौजे मजकूर र॥ येशवंतराव गायेकवाड याकडे आहे. त्यास मौजे मजकुरी मार्गाचा बोलांडा[2] जकात पुरातन चालत आहे. त्याप्रो हाली राव मा।रनिलेकडे जकात दर बैली रुके ०६ साहा रुके करून दिले असेत. तरी तुम्हो सदरहू जकात दर बैली साहा रुके प्रो मा।रनिलेकडे सुरळीत देत जाणे. निदेश समक्ष.

तेरीख ७

जिल्काद सु॥ सबा अर्बैन.

---

१ नौदिगर (नवदिगर) = भलते सलते, अडथळा.

२ बोलांडा जकात = ओलांडण्यासाठी द्यावी लागणारी जकात.

**क्रमांक : २१०** दि. १९–१२–१७४६

वेदमूर्ति त्र्यंबकभट ढवळीकर यानी छत्रपती संभाजी दुसरे याना महाभारत ऐकविले. पुराणाची समाप्ति कुरुंदवाड येथे झाली. त्या निमित्त छत्रपतींनी वेदमूर्तीस मौजे सेणवडे हा गाव इनाम दिला.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७३ क्षयेनाम संवत्सरे पौष्य बहुल त्रितिया भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी मुकदमानी मौजे सेणवडे त।। आसडोली प्रांत तारळे यासी आज्ञा केली ऐसीजे. वेदमूर्ति राजश्री त्र्यंबकभट बिन हरीभट उपनाम ढवळीकर गोत्र भारद्वाज सूत्र आश्वलायन वास्तव्य क्षेत्र करवीर याचे मुखे स्वामीनी माहाभारत पुराण श्रवण केले आणि पुराणाची समाप्ति श्री----कृष्णातिरी कुरुंदवाड क्षेत्री श्री----देवसंनीध केली. ते समयी वेदमूर्ति ब्राह्मण बहूत थोर विद्यापात्र आग्नीहोत्री कुटुंबवत्सल यास्तव स्वामीनी यासी मौजे मजकूर (इनाम दिले इ. इ. )

---

**क्रमांक : २११** दि. ५–३–१७४७

संमत कोकटनूर उदाजीराव चव्हाण हिंमतबहाद्दर याना जमावाचे बेगमी-साठी मोकासा म्हणून दिला आहे, असे छत्रपती शाहू यांचें देशमुख व देशपांडे संमत कोकटनूर यांना पत्र.

श्री

तालिक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७३ प्रभवनाम संवत्सरे अधिक चैत्र शु।। पंचमी गुरुवासर क्षत्रिय कुलावतंस श्री राज्या षाऊ छत्रपती स्वामी याणी देशमुख देशपांडे संमत कोकटनूर सिका सिका खावंद सरकार हावली विज्यापूर यासी अज्ञा केली असीजे. समंत मजकूर परगणे फुट मोकासी वजा करून पेशजीच्या मोकासियाकडून दूर करून हली राजश्री उदाजीराव चवाण इमतबाहादर ममलकतमदार याजकडे जमावाचे

बेगमी ब।। मोकासा दिल्हा असे. तर तुम्ही यास रुजु होऊन समस्त मजकूरचा मोकास बाब व निमे जकातीचा ऐवज मशारेनिल्हेकडे वसूल सुरळीत देणें. जाणिजे.

लेखणालेक्यार मोर्तब आहे.

रुजु सुरु समत स।। स।।
निविस सुमंत मंत्री सरकार

छ ४ र।।वल सु।। सबा
अर्बैन मया तैन व अलफ.

सुद्र
बार

---

क्रमांक : २१२ दि. २०-६-१७४७

मौजे सुले हा गाव रेखोजी जाधवाचा पुत्र सुभानराव यास मोकासा दिला आहे म्हणू । छत्रपती संभाजी दुसरे यांचे आज्ञापत्र.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७४ प्रभवनाम संवत्सरे जेष्ट बहुल नवमी मंदवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती याणी मुकादमानी मौजे सुले ता।। असडोली यासी आज्ञा केली ऐसीजे. मौजे मजकूर पेशजी रा।। रेखोजी जाधव याकडे मुकासा होता. त्यास रेखोजी जाधव मृत्य पावले या करीतां त्याचे पुत्र रा।। सुभानराव जाधव याचें चालवणें हें स्वामीस आवश्यक. यास्तव स्वामीं याजवरी कृपाळू होऊन मौजे मजकूर यांकडे मुकासा दीला आहे. तरी तुम्ही याचें रजातलबेत वरतोन मौजे मजकूरचा ऐवज याकडे सुरलीत साल दर साल पाववीत जाणे.. पेसजी प्रमाणे गावीचा हिसेब यासी रुजु करी । जाणे. निदेश समक्ष.

तारीख २२
जमादिलाखर
सू।। समान

---

**क्रमांक : २१३** दि. २४-६-१७४७

छत्रपती संभाजी दुसरे यांचे मुद्राधारी व कारकून कोट कोल्हापूर यास आज्ञापत्र की, बाळोजी जाधव दारवान यास मौजे पाडळी येथे पाच बिघे जमीन इनाम दिली आहे. " स्वामीचा मुक्काम कोट मजकुरी असता स्वामीची सेवा बहूत निष्ठेने केली ". असा उल्लेख पत्रात आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७४ प्रभवनाम संवत्सरे जेष्ट बहुल त्रयोदशी सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती

| श्री<br>राजा शंभु छ<br>त्रपती हर्ष निधा<br>न केशव सुत<br>पंडीत मु<br>खे प्रधान | श्री आई आ<br>दी पुरुष श्री राजा<br>शिवछत्रपती स्वामी<br>कृपानिधी तस्यं प-<br>रशुराम त्र्यंबक<br>प्रतिनिधी |
|---|---|

स्वामी याणी---- राजश्री मल्हारजी भोसले मुद्राधारी कारकून कोट कोल्हापूर यांसी आज्ञा केली ऐसीजी---- बाळोजी बिन धोंडजी जाधव दारवान दरवाजा केसापूर कोट कोल्हापूर याणे स्वामीचा मुक्काम कोट मजकुरी असता स्वामीची सेवा बहुत निष्टेने केली. याचे चालवणे हे स्वामीस अगत्य या करिता स्वामी यावरी कृपाळू होऊन यास नुतन इनाम कुलबाब कुल + + + + दार करून मौजे पाडळी बु॥ + + + न पडीची बिघा ०५ पांच + + + + तुम्ही बाळोजी जाधव + + जमीन पडची पुत्र पौत्रादी वंश परंपरेने इनाम चालवणे. या पत्राची तालीक लेहून घेऊन अस्सल परतोन देणे.[1] जाणीजे. निदेश समक्ष.

मर्यादीत
विराजते

रुजु स॥ समत संमत
मंत्री सरकार

बार सुरु सुद्र बार समत सुद्र बार.

---

१ याच आशयाची पत्रे छत्रपती संभाजी दुसरे यानी कृष्णराव भगवंत अमात्य व देशमुख आणि देशपांडे तर्फ हवेली कोल्हापूर याना पाठविली.

क्रमांक : २१४

दि. ५-१०-१७४७

या इनामपत्रात पूर्वी कोल्हापूर येथे मोगली ठाणेदार होता असा उल्लेख आहे.

श्री

शिक्का

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७४ प्रभव नाम संवत्छरे अस्वीन शु।। त्रयोदसी इंदूवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु स्वामी याणी

शिका पानघाटी पेशवे यांचा

शिका परशुराम त्र्यंबक प्रतीनिधी याचा असे

अदोजी बिन देवजी पाटील खाड्या मौजे सडोली ता हवेली पा। कोल्हापूर यांसी दिल्हे इनामपत्र यसेजे. तूंवा करवीरचे मुकामी स्वामी सं(निघ ये) ऊन अर्ज केला कीं आपणांस पूर्वी मोग़लाई कारकीर्दीस मोगलाई दिवाण ठाणे करवीर येथें होता त्याणें मौजे मजकुरी पांच बीघे जमीन इनाम देऊन फर्मोन करुन दिला आहे. त्या प्रमाणें इनाम चालत आहे. परंतू माहाराजाची पत्रे इनामाची भोगवटीयांसी करुन देवीली पाहीजेत म्हणून अर्ज केला त्या वरुन मनास आणीतां तूं वतनदार सेवा निष्ठेने करीत आहेस. या क़रीतां स्वामी कृपाळू होऊन तुजला नूतन वतन इनाम कुलबाब कूलकानू जमीन धूरुंग साकर शेत पैकी बीघे ०५ पांच बीघे इनाम पेशजी चालत आहे त्या प्रमाणे करार करुन दिल्ह असे. तरी तूं सदरहू जमीन भोग(व)टीया प्रमाणे आपले स्वाधीन करुन घेणे अणी इनाम जमीन तूं व तुझे पुत्र पौत्रादी वंशपरंपरेने अनभऊन वतनाची शेवा करुन सुखरुप राहणें. सदरहू इनाम सुरळीत चालेल. जाणीजे. निदेश समक्ष. मोर्तब शिक्याचे अष्टपैलू घाटी दोन वोलीचे असे.

तेरीख ११
शैवाल सु।। समान अर्बैन मया.

**क्रमांक : २१५** **दि. ६-११-१७४७**

सेटयाजी बळवंतराव देवकाते यानी छत्रपती शाहू यांच्या दरबारात केलेल्या खर्चाचे टिपण.

हिसेब राजश्री सेटयाजी बळवतराऊ देवकाते
दरबार खर्च गु॥ माहादाजी जीवाजी प्रभु
सु॥ सन ११५७ ता॥ छ १३ जिलकाद.

| ७ | जमा | पैकी वसूल | बाकी देणे |
|---|---|---|---|
| माहाराज स्वामी | ३००० | २००० | १००० |
| गोवीद राऊ | २००० | १००० | १००० |
| धनीन | ४००० | १००० | ३००० |
| सीवाऊ।पंत | १००० | १००० | ० |
| आऊबाई | २०० | २०० | ० |
| लखमोजी खोडो | १०० | १०० | ० |
| सी र पा मा (?) वधनी | ११ | ११ | ० |
| मामा व बहिरोबा प्रभु | २५० | २०० | ५० |
| येसू नी॥ गोविंदराऊ बाबा | ३५ | ३५ | ० |
| पंत अमात्य | ४८० | ४८० | ० |
| प्रंत प्रधान | ४०० | १८५ | २१५ |
| पंत प्रतिनिधी | ४०० | २७५ | १२५ |
| पंत सचीव | ४२५ | ४२५ | ० |
| पंत सुमंत | २६० | १८० | ८० |
| मंत्री | २५० | २१० | ४० |
| पंत राज्याज्ञा | ३०० | २१५ | ८५ |
| साबाजी प्रभु | १० | १० | ० |
| आनद राऊचा | ३० | २० | १० |
| चोपदार देवडी | ३५ | २५ | १० |
| दामाजी प्रभु | २५ | २५ | ० |
| गंगाधर | ५० | ५० | ० |
| आपाजी प्रभु | २५ | २५ | ० |
| | १३२८६ | ७६७१ | ५६१५ |

**क्रमांक : २१६** **दि. ११-१२-१७४७**

खासा स्वारींचा मुक्काम कुडाळास आहे. तरी पत्र मिळताच लोक घेऊन कुडाळास येणे म्हणून जयराम सावंत भोसले व रामचंद्र सावंत भोसले यांचे आत्माजी नाईक साठम यास पत्र.

श्री

राजमान्य राजश्री अत्माजी नाईक साठम यास

जयराम सावंत भोसले (व) रामचंद्र सावंत भोसले सरदेसाई प्रांत कुडाळ महालानीहाय सुरु सन समान आर्बैन मया व आलफ. खासा स्वारी कुडाळास मुकाम जाहले आहेत. तरी असामी प्रमाणें लोक घेऊन जे क्षणीं कागद पावेल ते क्षणी कुडाळास येणें. एक घडीचा दिरंग न करितां लोकानीशीं कुडाळास येणें. जाणिजे.

छ. १९ माहे जिल्हेज. १२

---

**क्रमांक : २१७** इ. स. १७४०-४७ (?)

सातारा दरबारात (?) शिजत असलेल्या एका राजकारणासंबंधी दरबारातील वकीलाचे पेशव्यास (?) पत्र.

श्रीनिवास

सेवेसी विज्ञापना विनंती स्वामीची आज्ञा घेऊन स्वार जालो ते तडक अस्तमानास परभारे दरबारासच पावलो. श्रेष्ठ भोजनास थोरल्या वाडीयांत जात असता हुजरावर बरीच जाला. त्यावर दरबारही उठला. बाहेर आलो तो आधी राजश्री येशवंतरावजी व राजश्री देवरावजी यांची भेटी जाली. त्यासही जे सांगणे ते सहजस्तीचे व स्वामीचे मर्जीप्रमाणें सांगितलें. त्यांपासून यैकणे ते यैकिलें. तो

राजश्री गोविंदरावजी धाकट्या[1] वाडीयाहून आले. त्याची आमची गांठी पडोन लागलेच त्यांचे घरासच गेलों. त्यास सर्व आभिप्राय मर्जीप्रमाणें सांगितला. त्याणीही त्याचप्रमाणें अगोधर रदबदलीचा पाया सर्वही घातलाच होता. श्रेष्ठांची मर्जी बहुतसी मुवजे आहेसी दिसली. जे विल्हे लागले म्हणजे उत्तम. त्यास हे त्रिवर्गही कालरात्रौ सिदजीपंताकडे गेले. त्याचे जाणें बाहेर कोठे जाले होते म्हणून गांठी न पडतां आले. आजी प्रातःकाली दरबारास सारेच मिलाले मागती श्रेष्ठांनीं ताकीद करून देवडीस त्रिवर्गास व राघोबासही अस्तमानी पाठविले व प्रातःकाली गेले होते. कराराप्रमाणें चालावें हा आशय श्रेष्ठांचा. असेच परिछिन्न का पुसाना म्हणून अस्तमानी सांगून पाठविले. हे वाडीयात गेले आम्ही घरास आलो. दिलासा श्रेष्ठांची चीतवृती सुप्रवर्तसी आहे. उदईक सिधांत करून गोविंदरावजी[2] सेवेस येतील. विचारांत आलेसे दिसले. स्वामीचे पुण्य समर्थ आहे. परंतु तोच मुकाम आणखी येक दोन रोज उतमसा दिसतो. यावर जसी स्वामीची मरजी तपसील आर्ज रावजीच लिहीतील त्यावरून विदित होईल. हे विज्ञापना.

---

**क्रमांक : २१८** **इ. स. १७४७ (?)**

बाजीराव व चिमाजी आप्पा यानी केलेल्या कराराप्रमाणे चालवावे अशी स्वामींची (शाहू ?) इच्छा आहे असे पत्र लेखक सदाशिवराव भाऊ याना लिहितो.

---

१. सदर पत्रात निर्देशलेली धाकटावाडा म्हणजें शाहूची राणी सगुणाबाई असावी. ही राणी दि. २५ ऑगस्ट १७४८ रोजी मरण पावली तत्पूर्वीचें हे पत्र असावे.

२. या पत्रातील गोविंदरावजी म्हणजेच खंडो बल्लाळचे तृतीय पुत्र गोविंद खंडो चिटणीस हें असावेत. छत्रपती शाहू व नानासाहेब पेशवे या दोघांचाहि विश्वास याने संपादन केला होता. शाहूने आपल्या मृत्यु समयी राज्याची व्यवस्था याच्याच सल्ल्याने केली.

छ. ३ ज॥ लौवल.

श्री

पु॥ तीर्थरूप राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेशी.

विनंती उपरी देहूकर गोसावी यांचा मजकूर आपण बोलावयाचा प्रकार लिहिला तो कलो आला. उत्तमच आहे. आज्ञेप्रमाणें बोलत जाऊ. परंतु राजश्री स्वामीनी बेमर्जीपणें साफ आज्ञा केली की पूर्वी जो तह आम्ही करून दिल्हा व राजश्री राव व आपा यानी चालविला त्याप्रमाणें तुम्ही चालवावें उचित आहे. जुने मोडून नवे करू लागलेस तर तुम्हासी आमचा ईलाज काये. परंतु हे तुम्हीं सर्वथैव करूं नये हेच आमचे मनोभिष्ट आहे यैसे निक्षूण बोलतात. पाबले किमपि बोलत नाहींत. स्वामीपासी उभयेता तुकोबाचे आहेत. तेथेंच गरम नरम करून विल्हेस लावावे. येथील म॥र तर असा आहे. सेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

---

**क्रमांक : २१९** इ. स. १७४७ (?)

उदाजी चव्हाण व प्रीतीराव चव्हाण याना दिलेल्या किताबांची यादी.

श्री

यादी—

१ उमदेतुल्ल उमराव बहादर हे किताब सिवाजी माहाराजानी प्रतीराव चवाण यास शक १७२० कालयुक्ताक्षि नाम सवछरी दिल्हा.

१ राज शक ७३ प्रभवनाम संवछर चैत्र शुध पंचमी उदाजीराव चवाण हिमत बहादर यास ममलकतमदार हा किताब शाहू माहाराज याणी दिल्हा.

**क्रमांक : २२०**　　　　इ. स. १७४७ ?

आत्मारामभट याचे घर निळंभट आष्टेकर याने घेऊन भिंत बांधली म्हणून आत्मारामाने देवालयांत उपोषण सुरु केले आहे असे उदाजीराव चव्हाण व मोरो चिटको हे छत्रपतींना लिहितात.

शेवेसी विनंती. शेवक उदाजीराव चवाण उमदेतुलउमराव बहादर व मोरो चिटको कृतानेक सेवेसी विज्ञापना. तागायत छ १९ रोज गुरुवार माहे शाबानपर्यंत स्वामीचे कृपावलोकने करून वाडियातील व शेवकाचे सकल वृत यथास्थित आसे. विज्ञापना ऐसीजे. वेदमुहुर्ती राजश्री आत्माराम भट आष्टेकर हे श्री——चे देवालयात बायकामुलासुधा उपोषेत बैसले आहेत. त्यास विच्यारले आसता माजे नांदते घर वे॥ राजश्री निळंभट आष्टेकर याणी चौकसी न होता जबरदस्तीने घेऊन भिंत घातली याजकरिता उपोषण करितो असे म्हणतात. समजोन सांगितले आसता ऐकत नाहीत. आजपर्यंत साहा उपोषणे जाहाली. सेवेसी निवेदनार्थ विनंती. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

**क्रमांक : २२१**　　　　दि. २१-२-१७४८

मौजे सांगवड हा गाव हिंदुराव घोरपडे यांच्या सरदेशमुखीच्या वतनातून दूर करून मुरारराव घोरपडे यांच्या वतनास इनाम दिला आहे. म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे मोकदम मौजे सांगवड यास पत्र. " राजश्री मुरारराव घोरपडे हुजूर आले आणि स्वामीची सेवा निष्ठेने करून स्वामीस संतोषी केले " असा पत्रात उल्लेख आहे.

श्री　　　तालिक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७४ प्रभवनाम संवछरे फाल्गुण शु॥ ४ चतुर्थी भानुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी—— याणी मोकदमानी मौजे सांगवड त॥ सावगाव यासी आज्ञा केली ऐसीजे. मौजे म॥र पेषजी

सिका　　　सिका

पासून राजश्री हिंदुराव घोरपडे याकडे सरदेशमुखीच्या वतनास इनाम होता. त्यास अलीकडे राजश्री मुरारराव घोरपडे हुजूर आले आणि स्वामीची शेवा निष्टेनें करून स्वामीस संतोषी केले. याकरिता स्वामी याजवर कृपाळू होऊन मौजे मा।र पेषजीच्या मोकासियाकडून दूर करून हली राव मशारनिल्हेकडे सरदेशमुखीच्या वतनास इनाम ज्यल तरू तृण काष्ट पाषाण निधिनिक्षेप सहीत खेरीज हाकदार व इनामदार करून देह यक रास इनाम दिल्हे आसे. तरी तुम्ही सदरहू मौजे मा।र पूर्व गर्यादिप्रो चतु:सीमा याचे स्वाधीन करणे आणि इनाम मौजे मा।र यासी व याचे पुत्र पौत्रादि वौष परंपरेने चालविणे. साल दर साल ताजा सनदेचा उजूर न करणे. या सनदेची तालिक घेऊन असल सनद भोगवटीयासी परतोन देणे. आणि याचे रज्यतल्बेत वर्तत जाणे. निदेश समक्ष. मोर्तब असे.

रुजु संमत संमत
मंत्री सरकार

तरीख २
रबिलावल[1] सु।। समान

बार सुरु सुद्र बार
समत सुद बार बार

---

**क्रमांक** : २२२ दि. २१-२-१७४८

करवीरकरांच्या तर्फेने दक्षिणेचा बंदोबस्त करण्यासाठीं मुरारराव घोरपडे निघाले असता त्यांच्या कुटुंबियाच्या संरक्षणाकरितां त्याना गजेंद्रगड तालुका छत्रपती संभाजी दुसरे यानी इनाम दिला.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७४ प्रभवनाम सवत्सरे फाल्गुन शु।। ४ भानुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी

---

१. जंत्रीत ३ रबिलावल येतो.

यानी राजमान्य राजश्री मुरारराव घोरपडे यास दिल्हे पत्र ऐसाजे. तुम्ही स्वामी सेवा एकनिष्टपणे करीत आहां. आतां दक्षिण प्रांती राज्य बंदोबस्ती ठेवण्यास जाणार. तरी तुमचे कुटुंब सर्व ठेवणेस पोक्त स्थळ पाहिजे. त्यास पेशजी तुमचे वडीलास कैलासवासी स्वामीनी गजेंद्रगड तालुका दिल्हे होते ते हल्ली पूर्ववत् दरोबस्त तालुका तुमच्या कुटुंबाच्या संरक्षण होणेस इनाम खर्चाबद्दल दिले आहे. तरी तुम्ही व तुमचे वंशपरंपरा आचंद्रार्क अनभऊन सुखरूप राहणे. जाणीजे. बहुत काय लिहीणे सूज्ञ आहा. मोर्तब सुध. सु॥ अर्बेन मया.

तारीख माहे जमादिलाखर समत मंत्री

२ समत सरकार

बार सुरु सुद्र बार सुरु बार बार.

---

**क्रमांक : २२३** दि. १-३-१७४८

मुरारराव घोरपडे यानी सदाशिव जगज्जीवन यास आपल्या सरदेशमुखीच्या वसुलातून पंधरा रुपयाचे वर्षासन नेमून दिले.

श्री सुबराज

नकल

स्वस्ति श्री नृप शालिवाहन शके १६६९ सोळासे येकोणाहतर प्रभवनाम सवत्छर फाल्गुण शु॥ त्रयोदसी भोमवासरे[1] राजश्री जेगजीवन गोसावी याच पुत्र सदासिव गोसावी गोतम गोत्र अस्वीलायन सूत्र वास्तव्य करवीर सिका यासी मुरारजी हिंदूराव घोरपडे वजारतमाब दंडवत. तुम्ही बहुत थोर. तुमच्या कुटुंब पोशणास कांहीं उपजीवका करून देऊन चालवावे असे जाणून सरदेशमुखीच्या ऐवजपैकी वरशासन वंशपरंपरेने रुपये पंधरा १५ करार करून देऊन कमाविसदाराचे नाव

---

१ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

पत्र आलाइदा दिल्ह असे. तरी तुम्ही पत्राप्रो सदरहु वरशासन अनभवीत जाणे. यास अभ्यांतर होणार नाहीं. जाणिजे.

छ १२ माहे रबिलावल सु।। समान आर्बैन मया अलफ. रवाना हुजुर मोर्तब असे.

याबद्दल पत्र—

सुभेदार व हवालदार वर्तमान भावी दि।। सरदेशमुखी यास मुरारराव घोरपडे यांचे. सु।। समान अर्बैन मया अलफ.

मोर्तब असे.

---

**क्रमांक : २२४** **दि. १–३–१७४८**

मुरारराव घोरपडे यानी सदाशिव पोदार (पोतदार) यास शंभर रुपयाचे व एक खंडी धान्याचें वतन दिले.

श्री

सिका तालीक

स्वस्ति श्री नृप शालिव्हान शके १६६९ प्रभव नाम सवछर फाल्गुण शु।। १३ त्रयोदसी भोमवासरे[1] राजश्री नारो सदासिव पोदार रा। करवीर यासी मुरारजी हिंदूराव घोरपडे वजरातमाब दंडवत. तुम्हास पनाळे पंच माहाल सरदेशमुखीचे वहिवाटीचे आसामी सांगितलो असे. यासी वतन दि सालिना बी ता।

| नख्त———रुपये | गला कैली———दसर मापा |
|---|---|
| १०० | १ |

येकून रुपये शंभर व गला खंडी येणे प्रा। करून दिल्ह आसे.

---

१ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

तर तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वौश परंपरेने अनभऊन स्वामी शेवा येकनिष्टपणे करीत जाणे. सदरहू सरदेशमुखीचा ऐवज सरकार जिकडे आज्ञा करील तिकडे आज्ञा प्रा + + + आभेंतर होणार नाही. जाणिजे.

छ १२ माहे रबिलावल सु॥ समान अर्बैन मया अलफ. र॥ हुजुर मोतंब आसे.

---

**क्रमांक : २२५** दि. २७-५-१७४२

सिदापा हेल्या मौजे मडलगे हा परागंदा झाला होता. त्याचे वतन त्याला परत मिळावे म्हणून मोकदम मौजे मडलगे याने छत्रपती संभाजी दुसरे याना विनंती केली असता त्यानी ती मान्य केली व शेटयाचे वतन त्याला परत केले.

सिका

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके[1] ७५ शुक्लनाम संवत्सरे जेष्ट बहुल सप्तमी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी सिदापा बिन चेनपा हेल्या शेटचा कसबा खानापुर व मौजें मडलगे बु॥ ता॥ मा॥र यासि दिल्हे वतनपत्र यसीजे. तुजविसी मुकाम मौजे मा॥र याणी स्वामी संनीध करवीरचे मुकामी विनंती केली कीं शेटचा मजकूर पुरातन वतनदार परागंदा होऊन गेला आहे. तो आणलियाने मौजे मजकूरचे पेटेची उस्तवारी होईल म्हणोन. त्यावरोन तूं पुरातन वतनदार तुजे चालवणे स्वामीस आगत्य. यास्तव स्वामी तुजवरी कृपाळू होऊन मौजे मजकुरचे शेटेपणाचे वतन पूर्ववत प्रमाणे करार करून दिल्हे आहे. या वतनास कानु कायदे याची मोईन करून दिल्ही.

---

१ राजशक ७६ पाहिजे.

| पालक | वाहतीचे बैस जकायत | इनाम जमीन मौजे मजकुरी |
|---|---|---|
| १ घर | माफ बैल सर | पडीची तीन प्रतीची बिघे |
| १ म्हैस | ५ | ८३ फसकी उकाला पानमान |
| १ दुकान | | तश्रीफ १ |
| ३ | | |

येकूण पालक घर येक व म्हैस येक दुकान येक बैल पाच व इनाम जमीन बिघे तीन. फसकी व जकातीस विश्वा व पानमान तश्रीफ या प्रमाणे करार करून दिल्हे आहे. तरी तूं सदरहू मौजे मजकूरचे शेटे-पणाचे वतन व कानु कायदे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन सुखरूप राहणे व इनाम जमीन चतु:सीमा करून आपले स्वाधीन करून घेणे आणि इनाम तूं वंशपरंपरेने आनभऊन राहाणे. जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब आसे.

तेरीख २१ सं॥

जमादिलाकर सु॥ खमसैन. मंत्री सरकार

---

**क्रमांक : २२६** **दि. २४-७-१७४८**

कर्नाटकातील राजकारणासंबंधीचे पेशव्यांच्या वकिलाने त्यांना लिहिलेले हे एक महत्त्वाचे पत्र आहे. त्यात तो म्हणतो, की जिजाबाई तोरगल येथे आल्या असून मुरारराव घोरपडे यांनी त्याची भेट घेतली. जिजाबाई व मुरारराव यांचे ऐक्य झाले असून सुबराव घोरपडे यांनी नासरजंगाकडून वस्त्रे पाठविली आहेत ती घेऊन ते करवीरास जाणार आहेत. तिकडून संभाजी दुसरे यांना घेऊन सावनूरवर स्वारी करण्याचा त्यांचा बेत आहे.

याच पत्रात लेखकाने श्रीरंगपट्टण, त्रिचनापल्ली, अर्काट (आरकाड) व तंजावर येथील राजकीय हालचालींचा वृत्तांत दिला आहे.

श्री

पै।। छ. २५ शाबान.

श्रीमंत राजमान्य राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी. विनंती सेवक राजो तमाजी कृतानेक सा।। नमस्कार विनंती.

येथील कुशल श्रावण सूध दसमी रवीवासर मोकाम सावणूर जाणून स्वामीनी आपले स्वकुशल लेखन आज्ञा विरोचित गेले पाहिजे. विशेष राजश्री नारोपंतावराबरी पत्र पाठवीले ते पावले असेल. सांप्रत येथील वर्तमान तर नवाब आबदूल मजीदखान याचे पुत्राचे लग्न छ. २७ रजबी आरभ तो अखेर छ १७ शाबानी त्याचे लोकांत साडे करीताती. यैसीयास तीकडे लग्न पत्रीका देऊन पाठवीले आहेत. सांप्रत राजकी वर्तमान तोरगलास मातुश्री बाईसाहेब आले आहेत. रा।। मुराररावजी घोरपडे यास बलाऊ पाठऊन भेटी घेतली. यानी दोनी हजार रुपये नजर बाईसाहेबास रा।। घोरपडे याना केली. त्यानी संतोषी होऊन पुढ मनसुबा रा।। घोरपडे जैसे सांगतील तैसे बाईसाहेबानी यैकाव यैसी तजवीज केली आहे. रा।। घोरपडेचे भाऊ रा।। सुबराव नासरजंगाकडे आहेत. त्यानी मनसुभा करून करवीर स्वामीस नासरजंगाचे तर्फेने पाच वस्त्रे तोरगलास पाठवीले. ते वस्त्रे घेऊन बाईसाहेब व घोरपडे उभयेता करवीर स्वामीकडे जाऊन मनसुभा करून या प्रांतास करवीर स्वामीस घेऊन येऊन भेटी करून कर्नाटकाचा पैका टका स्वामीस द्यावा सप्तरुसीचे फौज येऊ देऊ नये यैसे मनसुभा केला आहे. या बराबरी देऊन करवीर स्वामीकडे पाठवील आहेत. अंतरंग राजकारण लिहील आहे की सालाबाद पन्नास हजार रुपये देतो ते नगद देतो आणीक दाहा हजार जास्ती देतो. परंतू स्वामीचे आगमन या प्रांती होऊ नये. तहनामा लिहून दिला आहे तो परतून आणून द्यावा यैसा करार येथील्या येवनाजवळी सिवरायानी करून आपले विदीमानी यादोरायास करवीर स्वामीकडे रवाना केले आहेत. थोडेबहुत वर्तमान चालले होते ते रा।। नारोपंती सेवेसी विदीत केले असेल. रा।। नारोपंती म्हणाले होते कीं झाले

वर्तमान सेवेसी लिहून पाठवणें. यैसीयास लिहिले आसे. श्रीरंग–पटणाकडील राजकारण अद्यापी वारले नाही. पटण मजकूर यैशी लक्ष रुपये देऊ म्हणताती. येवन म्हणतो की येक करोडी वीस लक्ष रुपये घेऊ म्हणतो. अद्यापी फैसल जाले नाहीं. श्रीरंगपटणकर बहुत मस्त जाले. त्रीर्चनापलीची विलायत नित्य प्रतिनित्य साधीत साधीत गेले. येवनाचे चिती आहे की मोकदमा फैसल जाल्यावर त्रीर्चनापलीचे विलायेती साधीली आहे त्याचे त्याचे गुनेगार वीस पत्रे ( पचे? ) वीस लक्षे घ्याव यैसा हेत आहे. चंदावरचे वर्तमान पालेगाराचे उपद्र(व) विलायेतीस अतीशये जाला आहे. कारभारी अणाजी सेटगे होता त्यास मारून टाकीला. दुसरा मानाजीराव जाला आहे. त्याच्याने कारभार आटोपत नाही. या दोनी सवस्थानचे मजकूर या प्रकार आहे. अरकाडचे वर्तमान चेनपटणकराचे उपद्रव अरकाडचे विळायेतीस बहुतसा जाला असे. येथ वर्तमान आहे की स्वामीचे फौज हींदुस्तानाकडे जात आहे. या साली सावणुरचे प्रांतास येत नाहींसा नीश्चये येथील्या वकील मजकुरानी केले आहेत. यैवजास येणप्रमाणें वरचेवर आणे करीत असताती. इतःपर जाले वर्तमान सेवेसी लिहून पाठवितो. सेवेसी येतो. विशेष काय लिहीणे हे विनंती.

---

**क्रमांक :** २२७ ऑगस्ट १७४८ (?)

सातार्‍याहून त्रिंबक सदाशिव पुण्यास लिहितो कीं छत्रपती शाहू राजे यांच्या धाकट्या राणी रोगाने जर्जर झाल्या असून त्या वाचणे ईश्वराधीन आहे.

तीर्थरूप राजश्री बाबा
स्वामीचे सेवेसी————

अपत्यें त्रिंबक सदासिव कृतानेक सा. ना।। वि।. येथील वर्तमान + + + श्रावण वद्य नवमी पावेतों स्वामी + + + + कृपे-करून यथास्थित असे. विशेष + + + + + पुणियास आल्यावर तीन च्यार विनं + + + + + पाठविली. परंतु

येकदाहि सेवका + + + + + स्मरण करून कृपापत्र पाठवावयास आज्ञा न जाहाली. येणे करून वहुत उदास आहे. मज पासून अंतरहि येखादे पडले असेल तर सिक्षा करणार स्वा(मि) समर्थ आहेत. परंतु कृपापत्र पाठवावयास विस्मर सहसा न धरावा. येथील वर्तमान काहीं अधिकोतर नाहीं. धाकटीबाई[1] वहुत रोगानें ग्रासिली आहेत. येणे करून माहाराज फार श्रमी आहेत. राजश्रीहि रोडले आहेत. बाई वाचणे ईश्वराधीन आहे. सेवेसी श्रृत होये हे विज्ञापत्र.

---

**क्रमांक : २२८** **दि. १८–९–१७४८**

सनतापा व कलापा कलंतरे जैन याना वाडी रत्नागिरीचे शेटेपणाचे वतन दिल्याचे संभाजी दुसरे यांचे आज्ञापत्र. यांत वाडी रत्नागिरी येथे संभाजीचा मुक्काम असता सदहुं वाण्यानी त्यांची सेवा केल्याचा निर्देश आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७५ विभवनाम संवत्सरे अस्वीन बहुल सप्तमी रविवासरे क्षत्रीय कुलावंतस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी—————

| सिका | सिका | |
|---|---|---|
| केशव सुत भगवंत | कृष्णाजी परशराम त्रिंबक | मुकादमानी वाडी |
| पेशवे | प्रतिनिधि | रत्नागिरी यासी |

आज्ञा केली येसीजे. सनतापा व कलापा बिन आदापा कलंतरे जैन शेटे वाडी मजकूर डोंगर कसबा म॥ याचे विसी राजश्री आनंदराव शामजी देशपांडे प्रांत मजकूर याणी करवीरचे मुकामी राजश्री नारो माहादेव हुजूरबाजार याकडे पत्र पाठविले. त्यावरून याणी स्वामीसंनीद्ध विनंति केली की वाणी मजकूर हे माहाराजाचे पायासी निष्ठा धरून वर्तत आहेत. याकरिता यासी माहाराजानी वाडी रत्नागिरी डोंगर येथील शेटेपणाचे वतन नूतन करून देविल्याने माहाराजाची शेवा करून

---

१ सगुणाबाई

वतन आनभऊन राहतील म्हणोन विदीत केले. त्यावरून मनास आणिता याणी स्वामीची शेवा वाडी मा। री डोंगरचे मुकामी यात्रेमध्ये केली व हलीही शेवेची उमद धरून हुजुर आले. यास्तव यावरी स्वामी कृपाळु होऊन यास वाडी मा।र डोंगर येथील सेटेपणाचे वतन नूतन करून दिल्हे आसे. या वतनास हक व इनाम व पालक व जकात गावापैकी व यात्रेपैकी याची मोईन करून दिल्ही असे. कलम बी तपसील————

| गावापैकी कलमे | यात्रेपैकी कलमे |
|---|---|
| पालक घर १ दुकान १ —— कलम १ | हक दर दुकानास रुके ।।. |
| वाहतीचे बैलास जकायत माफ बैल सुमार २५ | केणे दर गोणीस रुके ।. |
| सदरहू बैल हर जागा जाऊन हर जिनस खाते प्रोक्त करतील त्यास जकात माफ १ | कापड नगाम रुके ।।. |
| मोहतर्फ याचे घरास सालिना रु।। ।।. | सिंगोटी दर रुपयेस रुके ०१।। |
| तेले याचे दुकानास दररोज तेल वजन ००००९ | गुगुळास दर शो रुके ०३ |
| इनाम जमीन पडीची भात रोप बिघे क।। ठाणे व दर गाव रुके<br>०४ मौजे पारळे पैकी<br>०३ डोंगर पैकी<br>——<br>०७ | बगाडास दर शो ०६ |
| मौजे पारळे येथे पालक<br>१ घर<br>५ म्हैसीं<br>——<br>६ | तेल्याचे दुकानास दररोज तेल वजन ००००९ |
| | पाने विडेची दर दुकानास दररोज सुमार २५ |
| | दुकान पालक १ |
| | पान विडेची दर नगास १०० |
| | उकाला भुसास मूठ पसा कलम १ |
| | वाणी याच्या दुकानास दर सुपारी सुमार १ |

ये।। कलमे गावापैकी घर व दुकान पालक व पानारी याचे दुकानास दररोज पान सुमार २५ पंचवीस व वाहनीचे बैल पंचवीस. यास जकात माफ व मोह तर्फ याचे घरास सालिना रुपे चवीस व तेल्याचे दुकानास तेल वजन नवटाक व इनाम जमीन-पडीची भाते रोप बिघे सात व मौजे पारले मधील पालक घर येकं व म्हसी पांच व यात्रापैकी कलमे हक दर दुकानास रुपेये चवीस व केणे गोणीस रुपे बारा व कापड नगास रुपे चवीस व सिंगोटी दर रुपयास रुपे दीड व गुगुळास रुपे तीन व पाने दर नगास शंभर दररोज पंचवीस व दुकान पालक येक व उकाला पसा मूठ व वाणीयाचे दुकानास दर सुपारी येक येणे प्रो करार करून शेटेपणाचे वतन दिल्ह असे. तरी तुम्ही सदरहू शेटेपणाचे वतन वाडीमा।र डोंगरचे व या वतनास हक इनाम कानु काइदे सदरहू प्रो सातापा व कलापा शेटे वाडी मा।र यास व याचे पुत्र पौत्रादि वंश परंपरेने चालवीत जाणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन असल पत्र भोगवटीयास देणे व इनाम जमीन चतु: सीमा करून याचे स्वाधीन करुन देणे.[१] जाणिजे. निदेश समक्ष. सिक्याचे मोर्तब असे.

---

**क्रमांक : २२९** दि. २–११–१७४८

कसबा वडगाव प्रांत पन्हाळा येथील शेटचेपणाबद्दल तंटा उद्‌भवला असता छत्रपती संभाजी दुसरे यानी रायशेट बिन सातशेट शेटचा याचे नांवे शेटचे-पणाचे वतनपत्र करून दिले. वादी व प्रतिवादी यांचे करीणे अर्जोजी यादव यानी लिहून घेतले, असा पत्रात उल्लेख आहे.

श्री

प्रतिपचंद्र लेखव वर्धिष्णुविश्व
वंदिता शंभु छत्रपते मुद्रा राम सुनु विराजते

(शिका वर्तुळाकार)

---

१ सातापा व कलापा या दोघांचे वतन चालवावे म्हणून महाराणी जिजाबाई यानी मुकादम मौजे पोरले याना दि. १२–०–१७४८ रोजी धाडलेले आज्ञापत्र उपलब्ध आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १७५ विभवनाम संवछरे कार्तिक बहुल अष्टमी सौम्यवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी रायशेट बिन सातशेट शेटया क॥ वडगाव प्रा पनाळा

सिका सिका
परशराम
त्रिबक प्रति
निधी

यासी दिल्हे वतनपत्र यसाजे. तुजेविसी तर्फ म॥ चे देशमुख व देशपांडे व को म॥ चे मोकादम याणी करवीरचे मुकामी स्वामी संनिध विनंती केली कीं रायशेट शेटया यामध्ये व समशेट बिन तमशेट शेटया को म॥ यामध्ये वतन संबंधे वडील थोरपणाचा कजिया लागला होता. त्यास हर दो जणाची मनसुबी पेशजी राजश्री अर्जोजी यादव याणी समडोलीच्या थळास कडील दिल्ही तेथे थलकरी याणी हर दु जणाचे करीने लेहून घेतले आणि या खुरी (?) करावी तो समशेट पलोन गेला. त्या उपरी मागती म॥ निंले यांनी दुसरे थल मौजे आलासचे थलास पाठविले. तेथे थलकरी याणी हर दु जणाचे करिने व जमान कतबे लेहून घेतले आणि साक्ष मौझे मनास आणिता समशेटीची साक्ष पुरावेनासी जाहली. गोष्ट त्याकडे लागली पाहून थकूप केले. गलेल कागद लिहून दिल्हा आहे जे आपण करिन्या प्र॥ साक्ष मौजे पुरऊन देईन. त्यास साक्ष पुरवली नाही. मनसुबी आपणाकडे लागली असे पंचाइत मते जाहले तेव्हा पलोन गेला. रायशेट अडीच तीन वर्षे थकत राहिला. समशेट व साबशेट हे थलास हजीर न जाहले पलोन गेले. त्या उपरी थ(ल)करी याणी पत्र लेहून दिल्हे. तेथे लिहिले जें समशेट व साबशेट थकून पलोन गेले गैर हजीर जाहले. मनसुबी त्याकडे लागली यसे. पाचाचे मते जाहले यसे पत्र देऊन रायशेट शेटया यांस पाठविले. त्यावरुन हाली हुजुर हर दुजणास आणोन मनसुबी मनास आणिता हुजुरूनहि समशेट पलोन गेला यसे आहे. याकरितां माहाराजानी सेटेपणाचे वतन रायशेट बिन सातशेट शेटया याचे दुमाला करावे म्हणोन विदीत केले. त्यावरून मनास आणिता तू मनसुबीमुळे थली खरा जाहलास व भोगवटाहि शेटे-पणाचा तुजा चालत आला याकरिता को म॥ चे शेटेपणाचे वतन तुजे दुमाला केले आसे. समशेट बिन तमशेट व साबाशेट शेटे भाऊबंद याणी भाऊवाटा खाऊन असावे. शेटेपण तुवा करावे. शेटेपणाचे कानु काइदे

पुरातन चालत आहेत त्याप्रमाणे करार करून दिल्हे असे.

इनाम यदलशाही जमीन
.।.
तेल घाण्यास अठवडा वजन
८८.।.

बैल आठवडेस + + + + +
होलीची पोली १
फसकी उकाला १

साटया मार्गे तश्रीफ व
तागडी १
साली व धनगर व कोष्टी खाटीक व पेंढारी सालीना रुके तीस
१००
दररोज कुटाली मापास खरेदी प्र।। दर गोणीस कैली ८८=
होईल तेथे.

येणे प्रो इनाम पाव चावर व तेल आठवडा घाण्यास पावसेर व जकात माफ. + + + + + शिक्याचा मोर्तब असे.

---

**क्रमांक : २३०** **दि. ५–१–१७४९**

दरमहा चार रुपये वेतनावर तुमची जकात वसुलदार म्हणून नेमणूक केली आहे. तरी काम निष्ठेने करावे. म्हणून येसाजी घाटगे नामजाद व कारकून किल्ले प्रसिध्दगड याचे कृष्णाजी रामजी धवन यास पत्र.

राजश्री कृष्णाजी रामजी धवन
जकात उमरजा गोसावी यासि

स्नेहांकित यसाजी घटगे नामजाद व कारकून किले प्रसिधगड रामराम. सु।। तिसा आरबैन मया आलफ. जकात मजकूरची निघाव[1] तुम्हास सांगितली आहे. तरी धंदा–त्रंदा–निष्टेने करीत जाणे. तुम्हास याची मोईन दर माहे रुपये ४ चार वेतन केले असे. जाणिजे.

छ २६ मोहरम.

---

[1] निघा = देखरेख

**क्रमांक : २३१** दि. २०-३-१७४९

छत्रपती संभाजी दुसरे यानी महादेव भट अष्टेकर यास तीन बिघे जमीन इनाम दिली. राज्य क्रांतीत आपले वतनाचे कागद नष्ट झाले असा उपर्युक्त ब्राम्हणाचा दावा होता.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७५ शुक्लनाम संवत्सरे चैत्र बहुल सप्तमी सोमवासरे[1] क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी वेदमूर्ति राजश्री माहादेव भट बिन नागेश भट उपनाम आष्टेकर गोत्र जामदग्नी सूत्र आश्वलायन वास्तव्य मौजे सोळांकुर तर्फ तारळे यासी दिल्हे इनाम पत्र ऐसीजे. तुम्ही करवीरचे मुकामी स्वामी संनीध विदीत केले की आपणास इनाम जमीन मौजे सावर्डे बिघा ८१ व मौजे पेणारी बिघा ८१ एकूण बिघे दोन बिघे पुरवी पासोन चालत आहे. पत्रे होती ती राजक्रांतिमुळे गेली. इनामाचा भोगवटा चालत आहे. माहाराजानी नवीन पत्रे भोगवटीयासी करून देविली पाहिजेत म्हणून (दिले इनाम वगैरे)

तेरीख ११[2] रबिलाखर सु।। तिसा अर्बैन मया.

---

**क्रमांक : २३२** दि. २८-३-१७४९

करवीरचे छत्रपती संभाजी दुसरे यानी गोव्याच्या व्हाइसरॉयला पत्र पाठवून वाटाघाटीसाठी एकादी वजनदार व्यक्ति आपणाकडे पाठविण्याची सूचना केली होती. त्याला व्हाइसरॉयने उत्तर पाठविले की वाटाघाटी कशाच्या ते अगोदर कळवावे.

---

१ जंत्रीप्रमाणें सप्तमीला बुधवार येतो.

२ मुसलमानी तारखेप्रमाणे इंग्रजी तारीख २० मार्च पडते. त्या दोन्ही तारखा चैत्र बहुल सप्तमीशीं जुळत नाहीत. जंत्रीत चैत्र बहुल सप्तमीला सोमवार न येता बुधवार येतो. म्हणून मुसलमानी तारखेप्रमाणे इंग्रजी तारीख काढली आहे.

संभाजी राजे यांस

मी हळदोणे येथील किल्ल्यात असतां मला आपले पत्र मिळाले. पोर्तुगालचे बलाढ्य राजे माझे स्वामी यानी मला हा किल्ला कावीज करण्याची आज्ञा केली होती. हा किल्ला स्वामींच्या सैन्याने घेतल्याने मी त्याला भेट दिली.

आपल्या पत्रावरून मला कळले की, आपले आगमन मेलुंडी येथे झाले आहे. ह्या बातमीचे मी स्वागत करतो. तथापि मी नेवती येथे असता मला जर ही बातमी कळली असती तर आपणास भेटण्यास व आपणाशी बातचित करण्यास मला आनंद झाला असता. या राज्याशी असलेली आपली मैत्री पुरातन आहे. ती टिकविण्याच्या बाबतीत आपण कसूर करणार नाही याची मला खात्री आहे. माझ्या मैत्रीच्या बाबतीतहि निश्चित असावे. त्याचा प्रत्यय आपणाला नेवती येथे आलाच आहे. कारली येथील नदीत ज्या नौका होत्या तींत भोसल्यांच्या काही नौका होत्या. पण ह्या नौकाना उपद्रव द्यायचा नाही असा हुकूम मी काढला. त्याचप्रमाणे मेलुंडीच्या बंदरातहि भोसल्यांची सहा गलबते आश्रयास येऊन राहिली होती. ती बळजबरीने घेण्याचा मी प्रयत्न केला नाही. त्यावेळी मी आरमाराबरोबर नेवतीला होतो व भोसल्याची गलबते तेव्हा मेलुंडीच्या बंदरात होती. आपण मला कळविले आहे की, एकादी व्यक्ति वाटाघाटीसाठी पाठवावी. या वाटाघाटी तहाच्या असाव्यात असे मी गृहीत धरतो. तसे जर असेल तर आपणास कळवायचे आहे की, पूर्वीच्या तहाचा[१] भंग होण्यासारखे कोणतेच कृत्य माझ्या हातून घडलेले नाही. आपणहि आपल्या मेलुंडी येथील लोकाना ताकीद द्यावी की, गोव्याच्या व्यापाऱ्याना किंवा त्यांच्या नौकाना मेलुंडी बंदरात उपद्रव देऊ नये. कारण, आपल्या नौकाकडून गोव्याच्या नौकाना उपसर्ग होतो ही तक्रार नेहमीचीच आहे. यापुढे जर ही तक्रार माझ्या कानी आली, तर आपल्या नौका विरुध्द मला उपाय योजना करणे

---

१ हा तह मार्च १७१६ मध्ये झाला.

भाग पडेल. यंदाच दक्षिणेकडून आलेल्या काही नौकांची आपल्या नौकाकडून हानि झाल्याची तक्रार आल्याने मला हा इशारा द्यावा लागत आहे. ही गैरसोय दूर करणे आपल्या हाती आहे.

तुकू शामाजी व मालोजी मोलप यांच्या बोलण्याप्रमाणे जर आपणाला भोसल्यांबाबत बोलणी करायची असतील, तर मला त्याचे स्वागत करावेसे वाटते. मला आठवते की, गेल्या वर्षी आपण तुकू शामाजी व नार सावंत या दोघाना माझ्याकडे पाठवून आंग्र्याविरुद्ध मदत मागितली होती. आपण मला वचन दिले होते की, मी जर आपणाला मदत केली, तर आपण मला भोसल्याविरुध्द सैन्याची मदत करू. या मोहिमेत जो प्रदेश आपण घेऊ त्याची दोघांमध्ये विभागणी करण्याची सूचना आपण केली होती. या शिवाय आपणाला माझ्याशी दुसऱ्या एकाद्या प्रश्नाबाबत जर बोलणी करावयाची असतील तर आपण माझ्याकडे आपला एखादा विश्वासू मनुष्य पाठवून मला त्याची कल्पना करून द्यावी. त्या शिवाय मला कुणाशी बोलणी किंवा पत्र-व्यवहार करायचा ते कळू शकणार नाही. आपण मला शस्त्रवैद्य पाठविण्याबद्दल लिहिले होते. शस्त्रवैद्य पाठविण्याची मी तयारी केली होती. परंतु एकजण आजारी पडल्याने लगेच त्याचे जागी दुसऱ्याची नेमणूक केली. त्याला घेऊन जाण्याबाबत मी आपल्या माणसांशी बोलणी केली. त्यानी त्याच्या प्रवासाची व्यवस्था कां केली नाही ते ती माणसे आपणाला सांगतील.

गोवा २८ मार्च १७४९.

----

**क्रमांक : २३३** दि. २९–३–१७४९

छत्रपती संभाजी दुसरे यानी सिंधुदुर्गास भेट दिली, त्या वेळी नरसप्पा व होनप्पा शेटये यानी त्यांची चांगली सेवा केली म्हणून त्यानी त्याना मौजे सोळांकूर येथे अर्धा बिघा जमीन इनाम दिली.

श्री

शिका

स्वस्ति श्री राज्याभीषेक शके ७५ शुक्लनाम संवत्सरे चैत्र बहूल सप्तमी सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपती स्वामी याणीं नरसपा बीन शिवलिंग व होनपा सेटया मौजे सोळांकूर ता।। तारळे यांसी दिल्हे ईनामपत्र येसीजे.

शिका असे शिका असे

स्वामीची स्वारी जंजीरे सींधेदुर्गास जाली तें समई मौजे मजकुरी मुकाम जाहला होता. तेव्हां तूंवा स्वामीची सेवा येकनिष्टेने केली त्याजवरुन स्वामी तुजवरी संतोसी होऊन तुज नूतन अर्जी इनाम कुलबाब कूलकानू जमीन मौजे मजकूर पेकी भात रोप कीर्दीची दुपीकी विसा पांडाच्या बिघयाने सेत तरुरी पेकी नजीक थलगांव परगांवचे पश्चीम जागीं बिघे ८।।. अर्ध बीघा इनाम दिली असे. तरी तूं सदरहू जमीन चतु:सीमा करुन घेऊन आपले स्वाधीन करुन घेणे आणि इनाम जमीन तूं व तुजे (पुत्र पौत्रादि) वंशपरंपरेने अनभऊन सुखरुप राहणे. निदेश समक्ष.

मोर्तब असे रुजु

तेरीख २१
रबीलाखर[1] सु।। तीसा अर्बेन

---

क्रमांक : २३४ दि. २७-५-१७४९

छत्रपती संभाजी दुसरे यानी सिदाप्पा हेल्या याचे मौजे मडलगे या गावचे शेटयेपणाचे वतन पूर्ववत चालू ठेवले.

---

१. २० रबिलाखर पाहिजे.

सिका

स्वस्ति श्री राज्याभीषेक शके ७६ शुक्लनाम संवत्सरे जेष्ठ बहूल सप्तमी मंदवासरे क्षत्रीय कुलावंतंस श्री राजा शंभू छत्रपती स्वामी यांणीं सिदापा बिन चेनपा हेल्या शेट्या कसबा खानापूर व मौजे मडलगे बु॥ ता॥ मार यासी दिल्हे वतनपत्र ऐसीजे. तूजवीसी मुकादम मौजे मार (परगणा) यांणीं स्वामी संनीध करवीरचे मुकामी विनंती केली की शेटचा मजकूर पुरातन वतनदार परागंदा होऊन गेला आहे. तो आणलीयाने मौजे मजकुरचे पेटेची उस्तवारी होईल म्हणोन. त्यावरोन तूं पुरातन वतनदार तुजें चालवणें स्वामीस आगत्य यास्तव स्वामी तूजवरी कृपाळू होऊन मौजे मजकूरचें शेटेपणाचें वतन पूर्ववतप्रमाणे करार करुन दिल्हे आहे. या वतनास कानु कायदे याची मोईन करुन दिल्ही.

| पाळक | वाहतीचे बैलास जकायत | इनाम जमीन मौजे |
|---|---|---|
| १ घर | माफ वेळेसर | मजकुरी पडीची |
| १ म्हैस | ५ | तीन प्रतीची बीघे ८३ |
| १ दूकाने | | फसकी उकाला |
| ३ | | |

जकायतीस थलभरीत व थलमोड दर गोणीस १ — पानमान तश्रीफ १

येकूण पाळक घर येक व म्हैस येक दुकान येक बैल पांच व इनाम जमीन बिघे तीन व फसकी व जकातीस विश्वा व पानमान तश्रीफ या प्रमाणें करार करुन दिल्हे आहे. तरी तूं सदरहू मौजे मजकुरचें शेटेपणाचे वतन व कानु कायदे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने आनभऊन वतनाची सेवा करून सुखरूप राहणे व इनाम जमीन चतु:सीमा करुन आपले स्वाधीन करुन घेणें आणि इनाम तूं वंशपरंपरेनें आनभऊन राहणें. जाणीजे निदेश समक्ष मोर्तब आसे.

तेरीख २१ संभु

मंत्री सरकार

जमादिलाकर सु।। खमसैन

---

**क्रमांक : २३५** दि. १९-६-१७४९

कृष्णराव भगवंत आमात्य यानीं छत्रपती संभाजी दुसरे यांच्या आज्ञापत्रा-वरून भिकंभट फणसरकर या नावाच्या ब्राह्मणास तीन बिघे जमीन इनाम दिली.

आज्ञापत्र समस्त राज्यकार्य धुरंधर विश्वास-निधी राजमान्य राजश्री कृष्णराउ भगवंत अमात्य याणे वेदमूर्ती राजश्री भिकंभट बिन नारायण भट उपनाम फणसरकर गोत्र अत्रिसूत्र आश्वलायेन वास्तव्य क।। देवले सु।। खमसैन मया अलफ. दिल्हे भूमी इनामपत्र यैसेजे. सालवणचे मुक्कामी येऊन आपला योगक्षेम चालणेविसयी विदित केले. त्यास ब्राहमण वैदिक साक्षर कुटंबवत्सल याचा योगक्षेम चालावा लागतो. येविसी महाराज राजश्री छत्रपती स्वामीचे आज्ञापत्र सादर आहे त्यावरुन तुम्हास हे इनामपत्र करुन दिल्हे असे. तरी महालकरी व देसाई देशपांडे व गावकर याचे विद्यमाने चतुःसीमा करुन (तीन बिघे) जमीन आपले स्वाधीन करुन घेऊन लावणी करुन उपभोग करुन स्नान संध्यादि शटकर्मे करुन राज्यास कल्याण इच्छून सुखरुप राहणे. इनाम तुम्हास व तुमचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने अनभवीत जाणे. जाणिजे. छ १५ माहे रजब.

---

**क्रमांक : २३६** दि. २९-८-१७४९

बाबूराव शंकर दिनकरराव चिटणिवीस याना तीन बिघे जमीन इनाम दिली आहे. तरी ती चालवावी म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे कृष्णराव पंडीत आमात्य याना पत्र.

श्री तालिक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७६ शुक्लनाम संवत्सरे[1] भाद्रपद बहुल त्रयोदसी भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री कृष्णराव पंडित आमात्य यासी आज्ञा केली यसीजे. राजश्री बाबुराव शंकर दिनकरराव चिटणिवीस याणी स्वामी सनीध करवीरचे मुकामी विनंती केली जे राजश्री दादाजी पांडुरंग दि।। चिटणिसी यासी सेवकाकडे मौजे गुडाळ व मौजे पणुत्र दोन गाव चालतात. या गावात इनाम करून द्यावे म्हणोन विनंती केली. यावरून दादाजी पांडुरंग याजवर स्वामी कृपाळू होऊन मौजे गुडाळ ता।। तारळ या गावी विसापांडाच बिघे प्रा किर्दीची जमीन बिघे ८३ तीन दिल्ही आस. तर तुम्ही सदरहू जमीन यास व याचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवणे. प्रतिवर्षी नवीन पत्राचा हुजुर न करणे. या पत्राची प्रति लेहून घेऊन आसल पत्र भोगवटेस म।।रनिलेकडे देणे. जाणिजे. बहुत लिहिणे तरी सूज्ञ आसा. मोर्तब आसे.

बार बार

---

**क्रमांक :** २३७ **दि.** ३१-१०-१७४९

छत्रपती संभाजी दुसरे यानी नारायण भट व जिवाभट लडकते यांचे बारा बिघे जमिनीचे इनाम पूर्ववत चालू ठेवले. त्यांची सनदापत्रे जीर्ण झाल्याने नवीन पत्रे करून दिली पाहिजेत, अशी त्यानी विनंती केली होती.

स्वस्ति श्री राजाभिषेक शके ७६ शुक्लनाम संवत्सरे कार्तिक शु।। प्रतिपदा भोमवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शंभू छत्रपति स्वामी याणी मुकादमानी देहाये गावगन्ना ता। तारळे यासी आज्ञा केली ऐसीजे. वेदमूर्ति नारायण भट बिन आणा भट व नरहरी भट बिन

---

१. अधिक भाद्रपद पाहिजे.

जिवा भट उपनाम बडकते गोत्र अत्री सूत्र अश्वलयन वास्तव्य कसबे तारळे याणी करवीरचे मु॥ स्वामी संनीध विनंती केली की आपण आगंतुक कसबे मजकुरी बहूत दिवस आहो. आपणास राजश्री श्रीकांताचार्य[1] पंडितराव यानी सन खमस सया आलफ छ ५ जमादिलावली भूमि इनाम करून दिली आहे. त्याप्रमाणें उपभोग करीत आहो व माहाराजांचीही पत्रे इनामाचीच आहेत तो जीर्ण जहाली या करिता माहाराजानी नवीन पत्रे भोगवटयासी करून दिली पाहिजेत म्हणून विदित केले व जीर्ण पत्रे निवेदन केली. त्यावरून स्वामीनी पेशजी प्रो यासी इनाम जमीन करार करून दिली असे. गावगन्ने जमीन बिघे ८१२ (इत्यादि)

निदेश समक्ष

तेरीख २९

जिल्काद सु॥ खमसेन मया.

---

क्रमांक : २३८ इ. स. १७४९–५०

अनाजी साठम याच्या चार म्हशी व एक कालवड भालवडी येथे नेण्यात येणार आहेत. तरी त्यांच्यावर जकात आकारू नये म्हणून नाना साहेब पेशवे यांचे कमाविसदार, चौकीदार, वाजेलोक व जकाती महालानिहाय याना पत्र.

श्री

श्री
राजाशाहू नरप
ती हर्षनिधान
बाळाजी बाजीराव
प्रधान

---

१ श्री कराचार्य पाहिजे.

दस्तक सरकार राजश्री पंतप्रधान ताहा कामाविसदारान व चौकीदारान व बाजे लोकानी व जकाती महालानीहाय सुरु सन खमसेन सया व अलफ. राजश्री अनाजी साठम याच्या म्हसी ४ चार व पाडी एक भालवडी प्रगणे कल्याण येथें नेतील. त्यास कोणेविसी मुजाहिम न होणे. जकातीचा तगादा न कर्णे. जाणिजे छ. २४ ( लेखन सीमा )

---

क्रमांक : २३९ दि. २९-२-१७४८

संस्थानचा थकलेला ऐवज अहिलोजी यादव व आप्पाजी जनार्दन यांच्याकडे द्यावा म्हणून महाराणी जिजाबाई यांचे सोंधे संस्थानचे अधिपती सदाशिव नाईक यांस पत्र.

श्री असल

राजश्री सवाई इमडी सदाशिव नाईक सोंधे यास

श्रीमंत सकल सौभाग्यादि संपन्न मातुश्री जिजाबाई साहेब उपरी येथील क्षेम फाल्गुण शुध द्वादसी इंदुवासरे[1] पर्यंत वर्धिष्णुता जाणोन तुम्ही आपणाकडील निजानंद वैभव लेखनी प्रमोदवीत आसावे. यानंतर संस्थान मजकूर यानियेत द्रव्य प्रति वरशी झाडयानिसी पोहचावा तो सुरळित निका यैवज पोहचत नाही. आजीपर्यंत बाकी म्हणता संवस्थानाकडे बे मोबलग टका राहिला आहे तन्मुळे संवस्थानासी कसालाही पडतो. सुरळीत निका यैवज हुजूर पोहचलियाने संस्थानावरी कसाला पडणार नाही. साहेबास संस्थानची ममताहा लागेल ते बेत नाही तेव्हा चिती प्रकारांतर भासोन कोणाची ममता कोण्हासीही नाहीसे होऊन या न्याये होत जाते हा अर्थ चिती धडतर समजोन आजीपर्यंत राहिला यैवज व साल मजकूरचा द्रव्ये अधिकोतर झाडयानिसी राजश्री रामाजी भास्कर हेजीब व भगवंत गणश यांच्या विदमान निकाल करून हुजुरून राजश्री आहिलोजी यादव व आपाजी जनार्दन

---

१ वारा प्रमाणे तारीख काढली आहे.

पाठविले आहेत याचे पदरी घालून हुजूर रवाना करून देणे. येविसी तुम्ही दि॥ लोकावरी लोस्ती मानील तरी सहसा न मानणे. येविसियास विस्तर आर्थ उभयेता म॥रनिलेस व दोघे हेजिवास आज्ञा करणे ते केली आहे. आज्ञेनरूप तुम्हासी सांगतील ते ध्यानासी आणोन संवस्थान मजकूरचे सवरक्षण व साहेबाची कृपा तुम्हावरी जेणेकरून होत असेल ते तुम्ही करणे. . पत्री विशेषा आर्थ तुम्हासी निरोपावे यैसे नाही. यावरी तुम्ही बुधिमंत आसा. निरंतर पत्रार्थी साहेबास संताशावह होत ते करणे. जाणिजे. छ १२[1] रबिलावल. ( बहुत काय लिहिणे तरी सुज्ञ असा ).[2]

गोल शिका (यातील अक्षरे लागत नाहीत).

सुहूर सन समान आर्बैन मया अलफ.

---

**क्रमांक : २४०** इ. स. १७४९ पूर्वीचे

सोंधे संस्थानच्या खंडणीच्या व्यवहारासंबंधीचे संस्थानाधिपती सदाशिव नाईक यांचे छत्रपती संभाजी दुसरे याना पत्र. यांत पोर्तुगिजांनी पंचमहालावर स्वारी करून मुलुखाची नासाडी केली, बंड करून जाळपोळ केली असा उल्लेख आहे.

माहाराज राजश्री शंभू छत्रपति
गोसावी यासी–

श्रीमत्सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत परोपकारपुर +
+ +

स्ने॥ सवाई इमडी सदाशिव राजेस्वरू सोधा शरणार्थी. येथील कुशल जाणोन माहाराज—स्वामी याणी स्वं साम्राज्याद्यखिल वैभव लेखन करून चिताल्हाद होयतो अर्थ करीत गेले पाहिजे. साप्रंत

---

१ जंत्रीत ११ रबिलावल येतो.

२ () अक्षर वळण निराळे.

राजश्री रामाजी भास्करपंत व रा० भगवंत गणेशपंत हे उभयता हेजिवी संस्थानातून यैलिकडे काही यैवज उसूल होऊन अला नाही म्हणोन विनंती करून घेतले. कल्पिता अपूर्व वाटले. अश्यास अतां राजेश्री रामाजी गणेश व नारोराम याचे विद्यमाने आजी तागायेत नख्ती व चिठीया व हवाले वजिनस अर्था करून जो पावला असेल त्याचा हिसेब रास्ता लेहून पाठवणे. तेणेप्रमाणे यैवज + + + खर्च पडेल. यास जो दिगर करून यैवज पावला असोन तफावतीने लेहिलेयास संस्थानास अप्रामाणिकता येऊन खराबीस कारण होईल व पावला यैवजही मजरा पडणार नाही म्हणोन तपसिले लेखन करून पाठविले. पत्र वरून अभिप्राये समजोन आपले हुजरे याणी सांगितलेवरून अत्याश्चर्य प्राप्त जाहाले. का जे पूर्वीपासोन थोरले कैलासवासी माहाराज—स्वामी याणी संस्थानचे सर्वार्थी संरक्षण करावे म्हणोन भाषा + + पत्रे सादर केल्यापासून आजवर येकनिष्ठेने वर्तणूक करावेयास संस्थानातून अंतर न जाहाले. येखादे वख्ती संस्थानावर कसाला पडिला तरी माहाराज स्वामी संस्थानचे सुखदुख निवेदन करऊन काहीतरी सोडमोकळ करून संस्थानचे ऊर्जित करावे म्हणोन सांगून घेतलेवर माहाराज स्वामीनीही हे संस्थान सवार्थी स्वकीये तेव्हा सांगोन घेतलेचे चिती धरून सोडमोकल करून देऊन संस्थानचे संरक्षण करून कीर्ति संपादिलीच. परंत यैसे हिशेब विषई अंतर दिसोन हे प्रकारे पत्र सादर जाहाले म्हणावयाचे किमपि घडोन आले नाही. तेसेच अजच हे प्रसंगी घडोन न आले तरी हेही संस्थानचे स्वहितच का जे अजपावेतो भलता प्रसंग असिला तरी हेजिबचे विद्यमानेच अर्ज करऊन कारण करून घेत होतो. अशास बजिनस पत्र सादर जाहाले तेव्हा संस्थानची नातवानी जी आहे ती खुद चितास अणून चालऊन द्यावे म्हणोनच. न हून दुसरा विचार नाही. तर संस्थानास कांही हेजेब मा।रनिलेनिच माघाही कार्य शेखर करून दिल्ही व पुढेही तेच देणार म्हणावे याचा अर्थ नाही. कोण्ही विचारास माहाराज———स्वामीनीच पूर्वीही संस्थानची संरक्षणा केली होती. अताही ततोप्याधिक करणार हा निश्चये पूर्ण केलाच आहे. अशास

म।।रनिले हेजिबचे मु ला जे जे संस्थानातून पावला यैवज त फु + + + करून लेहून पाठऊ म्हणावेयाचे नाहीच. ह्याकरिता उभयता म।।निले हेजिब विद्यमाने फजीसाहा साला पोटी पावला यैवज सदरहू लेहिलेप्रा सेणवी म।।रनि विद्यमाने लेहून पाठवाव तरी रा रामाजी मंगेश आपले धंदे करिता आपले धण्या सनिधेस गेले आहेत. यास्तव रा नारोराम यास बोलाऊन घेऊन उभयता हेजीब गुजारतीने साहासाला समधे जो येवज पावला आहे तो रुजू पाहून प्रत्येक जाविता लेहून पाठविला आहे

श्री सौंदा
नगरे शस्य प
+ + +
सदाशिवस्यै
षा सदाते

तेणवरून अवगत होईल व आणिखी काही यैवज पाठऊन द्यावा म्हणोन केले असता गोमांतकचे फिरंगीयाचा शाहा पंचमाहालावर पडोन मुलुक सर्वही लुटला. वंड करून जाळून फना केले. करिता फार कौ बि ड नासाड जाहाला. तंनिमित्ये सद्य: यैवज पाठवावेयास अनुकूल घडोन आले नाही. यैसेच वर्ष त्रिवर्षी कसाला पडत जातो. तणेकरून पैकेचे उत्पन्न राहून संस्थान म्हणावेयाचे एक नावमात्र राहिले अहे. म्हणोन हजूरचा यैवज पावावेयास दा रण नाही. जाहाले करिता पेशजी संस्थानचे जासोद जोडी समागमें पत्र सादर केले. मध्येही काही सोडमोकळे करिता लेहावेयाचे लेहून संस्थानचा बचाव होय व हुजूरचा यैवज पावला म्हणावेयाचे करून संस्थानचे संरक्षणा केली म्हणावेयाचे यश पदरी घ्यावेच म्हणोन लेहिले होते. तेणे वरून तो अवगत जाहालेच असेल. अताही लेहिले जाते जे संस्थान सकलार्थी नातवानीस पडले आहे. तेव्हा गोसावी यानीच साभिमान धरून चालऊन घेतले तरीच ऊर्जित होऊन माहाराज——स्वामीस कीर्ति येईल. न होन दुसरे विचारे संस्थानचा परिणाम किमपि लागणार नाही. हा घट भरोसा धरिला आहे. हे अभि कित्तेक राजेश्री शिवैया मर्जवार्तो व वीरभद्रैया लेखन करिता सर्वही चितारूढ होईल. सर्वज्ञाप्रति विस्तर काय ल्याहावे——

श्री
शंभु लिंग सिका
ते

क्रमांक : २४१ इ. स. १७४९ पूर्वीचे

सोंधे संस्थानची खंडणी नानासाहेब पेशवे यांजकडे देत जाणे म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे संस्थानाधिपती सदाशिव नाईक यांस पत्र.

आसल

राजश्री सवाई इबडि सदासिव
नाईक सोंधे गो।। यासी—

।।द अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य प्रति राजश्री उपरी संस्थान मजकूरचा मामला हुजुरून राजश्री बाळाजी पंडित प्रधान याजकडे दिल्हा आहे. त्याप्रमाणे करार असे. तरी तुम्ही पंडित म।।रनुलेकडे रुजु होऊन संस्थान मजकूरचे तोफियाचा यैवज बाकिचा व साल मजकूरचा सुरळीतपणे देत जाणे. उजूर न करणे. संस्थानचा यैवज पंत प्रधान हुजूर पावता करितील. तुम्ही यैवज देत जाणे. जाणिजे

(बहुत काय लिहिणे)[१]

श्री
प्रतिपच्चंद्ररेखे
व वर्धिष्णुर्विश्ववं
दिता शंभु छत्रप
तेर्मुद्रा रामसूनों
विराजते

मर्यादेयं
विराजते

---

क्रमांक : २४२ इ. स. १७४९ नंतरचे

संस्थानची खंडणी सावनुरी होनास साडे तीन रुपये चवल या मूल्याने घ्यावी अशी सोंधे संस्थानचे अधिपती बसवलिंग नाईक यानी छत्रपती भाजी दुसरे याना विनंती केली असता त्यानी ती मान्य केली. छत्रपतींची स्वारी या संस्थानात झाल्याचा निर्देश या पत्रात आहे.

---

( ) निराळ्या वळणाची अक्षरें

श्री

तालीक

राजश्री सवाई बसवलिंग नाईक
सोधे गोसावी यास---

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राति राजश्री राजा संभु छत्रपति. उपरी गतवर्षी स्वामीची स्वारी तुमच्या देशास आहाली ते प्रसंगी घास दाणियाचा यैवज ह।। सन सलास ता सन खमस येकूण साले तीन हा यैवज तहा प्रमाणे हुजूर यावा. त्यास सवणुरी होनास रुपये ३।÷- सवातीन रुपये चवल प्रमाणे निर्ख करून यैवज यावयाची आज्ञा केली होती. यैसीयास संस्थानावरी कसाला पडिला. देशात उत्पन्न नाही. संस्थान रिक्त जाले आहे. याकरिता पूर्वी पासून होनास साडे तीन रुपये चवल प्रमाणे निर्ख चालवावा हिशेब रुजू करवावा म्हणून तुम्ही बहुता प्रकारे हुजूर लेहून पाठविले. राजश्री भानजी बलाळ तानाजी बलाळ याणी तुमच्या आशयावरून विनंती पत्री लेहिले तो सर्वही अर्थ विदित जाहला. यैशसि पहिले होनास धारण साडेतीन रुपये चवल होती. त्यावरून तो निर्ख चालविला. प्रस्तुत सावनुरी होनास निर्ख कम जाला आहे. या करिता सवातीन रुपये चवलप्रमाणे घास दाणियाचा यैवज व मागील सा सालियाचा हिशेब करावा. पुढे तीन रुपयाप्रमाणे होनाचा निर्ख चालवावा ऐसी आज्ञा केली होती. परंतु तुम्ही आपले निष्टेचा व पुढे साल दरसाल निर्वाहकतेचा अर्थ सांगोन पाठविला. संस्थानचा सर्व प्रकारे अभिमान धरून चालवावे म्हणून राजश्री गंगाधर पंडित सुमंत याणी विनंती केली त्यावरून सालाबाद चालल्या प्रमाणे चालवावे यैसी आज्ञा भानजी बलाळ हेजिब व तानाजी बलाळ यास केली. ते सालाबाद प्रमाणे सावणुरी होनास रुपये ३।।= साडेतीन चवलप्रमाणे हिशेब रुजु करून देतील. तुम्ही येकरूप निष्ठेने वर्तोन तहाप्रमाणे सुरळीत द्रव्य साल दरसाल पाववीत असलियामधे काही कालोचित प्रसंग अगर कालहरण करीत नसलिया सालाबाद

श्री
प्रतिपच्चंद्ररेखे
व र्वधिष्णुर्विश्व
वंदिता शंभु छत्रप
तेर्मुद्रा राम सूनो
र्विराजते

तहाप्रमाणे सावणुरी होनास साडे तीन रुपये चवलाप्रमाणे चालविले जाईल. जाणिजे. (बहुत काय लिहिणे.)[१]

मर्यादेयं
विराजते

---

क्रमांक : २४३ इ. स. १७४९ नंतरचे

सोंध्याचा वकील (ह ?) सनखान याला जी आज्ञा करावयाची होती ती केली आहे, म्हणून सोंधे संस्थानचे राजे सवाई बसवलिंग याना छत्रपती संभाजी दुसरे यांचे पत्र.

श्री

गोल सिका राजश्री सवाई बसवलिंग सवस्थान
सोधा गोसावी यासी-----

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य प्रति राजश्री उपरी आपणाकडून बहुत वासर अविक्रमिल्यानंतर पत्र आले. ते सुसमई माहाराजास प्रविष्ट होऊन चितास परम अनंदावाप्ती होऊन लेखनाभिप्राये निवेदन जाहला. याच रितीने वरचेवरी पत्री साद्यंत कुशलाभिप्रायें सविशंदे लेहून पाठऊन माहाराजास संतोषावाप्ती होय ते करीत जावे. कितेक मजकूर आपणाकडील जुबानी अजम सनखान याणी हुजूर निवेदन केला. त्यास जी आज्ञा होणे ती खान मजकूर यास जाहाली आहे. आपणास सांगतील त्यावरून कळो येईल. रवाना छ. ५ माहे शवाल. बहुत काय लिहिणे. मोर्तब सिक्याचे.

---

१ अक्षर वळण निराळे.

क्रमांक : २४४ इ. स. १७४२ नंतरचे

लष्कराचा उपसर्ग व अनावृष्टि यामुळे मुलुख नापीक झाला असून खंडणी मध्यें सूट मिळावी म्हणून सोंधे संस्थानाधिपती बसवलिंग यांनी संभाजी छत्रपती यांना लिहिले असता त्यानी पुढील पत्र लिहिले. पत्र संपूर्ण आहे.

श्री

राजश्री सवाई बसवलिंग नाईक
सोंधे गोसावी यास---

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य प्रति राजश्री राजा शंभु छत्रपति उपरी आपले संस्थानावरी इत्यादिक लष्करचा उपसर्ग लागोन देशाची खराबी जाली. पर्ज्यन्य अवरोधामुळे नापीक जाले. कोणे गोष्टीचा उवार राहिला नाही. यैसियासी हे संस्थान म्हणिजे स्वामीचे स्वराज्यांग यैसे चितात आणून संस्थानाला प्रति वार्षिक द्रव्य द्यावयाचा नियत चालत आहे त्यामध्ये सोड मोकल करून दिल्हीयांनी साल दर साल यैवज पाववावयासी आपणा पासून अंतर पडणार नाही म्हणून तुम्ही आपला अभिप्राय विषई राजश्री भानजी बलाळ हेजीब यासी सांगितला. तो त्यानी हुजुर लेहून पाठविला व यतद्विषई तुम्हाकडील गो रामाजी सिवराम याणी निवेदन केला तो सविस्तर अर्थ विदित जाला. यैसियासी पहिलेच स्वामींनी संस्थानचा विचार चितात आणून प्रतिवर्षी क जि य त करून दिल्हा. यैसे असता क्षणक्षणा सोडीची बोली म्हणजे काय. परंतु राजश्री गंगाधर पंडित सुमंत याचे विनंती वरून इ॥ सन सलास शुभकृत संवत्सर

..........................................................

..........................................................

..........................................................

———————————— ( बहुत काय लिहिणे )[1]

श्री
प्रतिपच्चंद्र रेखे
व वर्धिष्णुविश्ववं
दिता शंभु छत्रप
तेर्मुद्रा रामसूनो
विराजते
सिका

मर्यादेयं
विराजते

मोर्तब

क्रमांक : २४५

इ. स. १७५० (?)

करवीरकरांच्या अधिपत्याखालील एका संस्थानच्या खंडणीबाबत छत्रपती संभाजी दुसरे यांचे तेथील कारभारी शहाक्षरी यास पत्र. करवीरकराना तीस हजार व हिंदुराव घोरपडे याना पंधरा हजार रुपये सालिना देण्याचा करार होता. नानासाहेब पेशवे यानी या संस्थानाकडून पैसे घेऊन करवीरकरास पोहोचते केल्याचा निर्देश या पत्रात आहे.

श्री

राजेश्री शहाक्षरो गो। यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य प्रति राजश्री------

उपरी राजश्री नरसिंगराऊ बारगी या समागमे कितेक भावगर्भयुक्त प्रेषित पत्रे प्रविष्ट होऊन ह्या अन्वये व मशारनिलेच्या विनंतीवरून संस्थानचे कसालीयाचा सकल अर्थ विदित जहाला. संस्थानचे संरक्षण व्हावे हेच आवश्यक आहे. प्रति वर्षिला तह व॥ भाषापत्र रुपये पन्नास हजार ५०००० बी॥

३०००० हुजूर सालीना
१५००० राजश्री हिंदुराव घोरपडे यांजकडे
५००० मोताद[2] तुमचे यजमानास
———
५००००

एकूण पन्नास हजार रुपये येणे. त्यापैकी हिंदुरावाबाबद व मोतादीबाबत वीस हजार रुपये वजा होता बाकी रुपये तीस हजार

---

१ अक्षर वळण निराळे; २ ठराविक किंवा परिमित प्रमाण किंवा परिमाण.

३०००० तुमचे यजमानाकडून निर्वाह[1] होऊन यावे. ई।। दुंदुभी संवत्सर ते।। प्रभव संवत्सर अखेर एकूण साले ६ प्रमाणे येणे रुपये १८०००० एक लक्ष ऐंशी हजार. पैकी संस्थानच्या कसाल्यावरी दृष्टी देऊन नरसिंगराव बारगी यांचे विनंतीवरून दुसाला सोड व।। सनद आलाहिदा रुपये साठ हजार ६००००. बाकीचे झाला येणे रुपये १२०००० एक लक्ष वीस हजार. त्यांस राजश्री गंगाधर पंडित सुमंत यांचे विद्यमाने हुजूर पावले रुपये बी।।

९०००० इ।। दुंदुभी संवत्सर ता।। प्रभव संवत्सर पैकी तिसाला ऐवज गु।। राजश्री रघुनाथ शामराज हेजीब व राजश्री नरसिंगराव बारगी.

३०००० क्षय संवत्सरी राजश्री बाळाजी बाजीराव प्रधान यांकडे पावले. त्याणी हुजूर प्रविष्ट कले.

१२००००

एकूण एक लक्ष वीस हजार रुपये रास हुजूर पावले. हिशेबी मजरी असेत. सदरहू पावलियाचा जाब शुक्ल संवत्सरी नरसिंगराऊ बारगी हुजूर आले असता दिल्हा असे. पुढे संवस्थान निरोपद्रव व्हावयाची कितेका अर्थे आज्ञा म।।रनिलेस केली आहे. तदनुरुप तुम्हाकडून होऊन आलीया संरक्षण होईल. एतद्विषयीचा हृग्दतार्थ म।।रनिले सांगतील तो चितांत आणून समर्पक उत्तर सत्वर पाठवून देणे. जाणिजे. बहुत काय लिहिणे[2]

श्री
प्रतिपश्चंद्र रेखेव
वर्धिष्णु विश्ववंदिता
शंभू छत्रपतीमुद्रा
राम सुनो विराजते

मर्यादेयं
विराजते

१ व्यवस्था.

२ याच आशयाचे राजश्री देवाप्पा यास लिहिलेले पत्र उपलब्ध असून दोन्ही पत्रांतील मजकूर जवळ जवळ एकच आहे.

क्रमांक : २४६ इ. स. १७५० ?

वेगवेगळ्या प्रसंगी काय काय दानधर्म करावा त्याची माहिती करवीरच्या जिजाबाई यानी या पत्रात गिरजोजी यादव याना विचारली आहे.

श्री

राजमान्य राजश्री गिरजोजी यादव यासी श्रीमंत सकल सौभाग्यादि संपन्न मातुश्री जिजाबाईसाहेब याणी आज्ञा केली ऐसिजे. येथे सदक्याची[१] पधत पाहिली कसी हुजूर आहे हे साहेबास विदीत व्हावी. याजकरिता तुम्हास दखल आहे. याजकरिता आज्ञापत्र सादर केले आहे. तर सिंहासनावर बसल्या सदका जाहाला तर कोणाचा कोणी घ्याव्हा, तैसेच निजल्या माहालात सदका जाहाला तर कोण कोणी घ्याव्हा तसेच दरुनी महालात दऊळात सदका जाहाला तो कोण कोणी घ्यावा तैसेच सुदबाखात जाहाला तर पालखीत बसलिया जाहाला तर हत्तीवर बसलियावर व घोडियावर बसलियावर व आठरा कारखानियात जाहाला सदका तर कोणी कोणी घ्यावा व दरुनी माहालाकडील कारखानियात सदका जाहाला तर कोण कोणी घ्याव्हा ते तपसीलवार विनंतीपत्री लेहोन पाठवणे व सिंहासनाधिविरहित बसले असलिया सदका जाहालिया कोणी घ्याव्हा हे सविस्तर विनंतीपत्री लिहोन पाठवणे व देवघरात सदका जाहाला तर कोणी घ्याव्हा हे लिहिणे व तुम्हास साहेबाकडील दरुनी माहालाचा सरहवाला घेता हे पधत सविस्तर वर्तणूक तुम्हास दखल आहे. याकरिता तुम्हास आज्ञापत्र सादर केले आहे तर विनंती पत्री लिहोन पाठविणे व हुदेकरी याही सदका कोणी घ्याव्हा

---

१ दानधर्म

हे लिहणे. आम्हाकडील पधत सालाची व सणाची व वरकड विदित नाही. तुम्हास दखल आहे. तुमच्या लेकास पुसावे तर त्यासहि दखल नाही. याजकरिता कोण कोण दिवसी व सणावारास कसी पधत आहे ते तपसीलवार विनंतीपत्री साहेबास लिहोन पाठविणे. य विसीची आज्ञा गोदजी सिदा पा। मूल यासी केली आहे. सविस्तर सांगता कळेल. जाणिजे. छ १७ रबिलावल दसरियास विडे सिंहासनावर बसलियावर कोणे कारखानियावर ध्यावे हे तपसीलवार विनंतीपत्री लिहोन पाठविणे. बहुत काय लिहणे. साहेबाकडील मामलेदार व गु ला ही कोणत्या कारखानियाचे पाठीमागून ध्यावे हे लिहणे. विडे ध्यावे हे पधत लिहणे. बहुत काय लिहिणे--

मोर्तब

सुद्र

---

क्रमांक : २४७ इ. स. १७५० ?

**भिकशेट या दुकानदारापासून गिरजोजी यादव यानी घेतलेल्या कापड खरेदीची यादी. यात पातळे, शेले, लुगडी, पासोड्या यांचा समावेश आहे.**

( सदरहू यादी फाटकी आहे )

मदारखना दि।। स।। कापड या गिरजोजी यादवसो सु।। समान कापड गु।। भिकसेट---

१।।। = छः ३ जिल्काद ख।। जोट[1] १

देणे. बहिरजी बाग चवरेकी पै।।

---

१७९। =

---

१ शेल्यासारखे वस्त्र.

५२|||=। छ ४ जिल्काद

२८|||. कितापटी

८||। जोट ३

२|||≡ प्रा। १

३८ ≡। प्रा। १

२||. प्रा।। १

८||=।

४|||. सेले न.
२

२||| प्रा।
दर १।=

४|||.

१०८ गजनी[१] १||

७। प्रा।। १

२|||. ||.

१०८

२|||–। लुगडी २

२||. जोड सिंगणापुरी
२

२८|||.

१ अर्ध सुती व अर्ध रेशमी वस्त्र

२४८=। किताफटी
१।=। लुगडे १
७॥ सेले ५ पदर १॥
१। छीट १
४।= कि॥ सेले २
५॥ साडी १
१ ताफ्ता[1] खण १
५।= खडे ३ दर ।॥=
।= ताफ्ता वस्त्र
देवास
गज

२४८=।

५२॥ =।
१५॥- छ ७ जिल्काद
१॥ पासोडी १ यकूण
३॥ पातळे ४ दर ।॥=
१०॥- सेले ५ यकूण
२ प्रा॥ १
४। प्रा॥ २
२।= प्रा॥ १
२८= प्रा॥ १
१०॥-

१५॥-

१ ताफ्ता = एक प्रकारचे चमकणारे रेशमी वस्त्र.

८॥। छ ८ जिल्काद तिवटे २ देणे
रघुनाथ जाधव व कृष्णाजी
पाटील

यकूण किंमत
४॥ प्र॥ १
४। प्रा। १

८॥।.

१। छ १० जिल्काद सेला देणे
राणोजी खराडा सणग १
यक यकून

।= छ १४ जिल्काद ख॥ कापड
ब॥ यकूण देणे ४
आकासदिव्या कारणे

---

क्रमांक : २४८ दि. २३-३-१७५०

गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालच्या राजाचा चिटणीस मार्कु आंतॉनियु द आझावेद कौतिन्य याला लिहिलेल्या या पत्रांत छत्रपती शाहू यांचा आजार, सकवारबाई यानी साताराचा किल्ला ताब्यात घेण्यासाठी केलेली धडपड, शाहूचा मृत्यु, नानासाहेब पेशवा व ताराबाई यानी रामराजास गादीवर आणण्यासाठी केलेले संगनमत व नानासाहेब पेशवे यांच्या तदनंतरच्या हालचाली यांची माहिती दिली आहे. या पत्रांतील सुरवातीचा आंग्र्यांसंबंधीचा परिच्छेद गाळण्यात आला आहे.

महाशय,..........................................................

..................................................................

संभाजी राजे यानी मला पत्र पाठवून आपणाकडे एकाला मनुष्य पाठविण्याची सूचना केली होती. त्याना माझ्याशी एका प्रश्ना-वर वाटाघाटी करावयाच्या होत्या. परंतु मी त्यांच्याकडे मनुष्य पाठविण्याचे टाळले. ज्यावेळी इकडच्या राजाना दुसऱ्यांशी वाटा-घाटी करायच्या असतात, तेव्हा ते आपणाकडे मनुष्य पाठविण्याची सूचना करतात. मी संभाजी राजे याना कळविले कीं, त्यांचे आणि आमचे संबंध चांगले असल्याने त्यांच्याशी वाटाघाटी करण्या-साठी मनुष्य पाठविण्याची आवश्यकता मला भासत नाहीं. मात्र त्यांना माझ्याशी वाटाघाटी करावयाच्या असल्यास त्यानी आपला मनुष्य पाठवावा. मी त्याचे बोलणे ऐकून घेईन.

शाहू राजे आजारी असल्याची बातमी मी आपणाला १५ अक्टोबरच्या पत्रातून कळविली होती. संभाजी राजे यांच्याप्रमाणे त्यांचे चुलतबंधु शाहू राजे यानाहि पुत्रसंतान नाही. त्यांतच संभाजी राजे हे निष्क्रिय असल्याकारणे शाहू राजे यांच्या मागे ते मराठ्यांचे राजे होण्याची आशा नव्हती.

नाना[१] हा ब्राह्मण असल्याने त्यांच्या चालीरीतीप्रमाणे राजा होऊ शकत नाही. परंतु त्याच्या हाती सैन्य आणि सत्ता असल्याने त्याने आपणाला अनुकूल राहू शकणारा राजा निवडण्यासाठी शाहू राजे यांची चुलती व संभाव्य राजाची आजी ताराबाई हिच्याशी संधान साधले. त्याने तिची मर्जी संपादन करण्याचा प्रयत्न सुरू केला. त्याने भावी राजाशी संपर्क साधून त्याला गादी-वर येण्यासाठी सर्व प्रकारची मदत देण्याचे वचन दिले आणि या योजनेच्या मार्गात कोणत्याहि प्रकारचा अडथळा येऊ नये म्हणून त्याने साताऱ्यांत अधिकाधीक घोडदळ आणण्याचा सपाटा सुरू केला.

१. नानासाहेब पेशवे

ही संख्या अखेर ३० हजार झाली. शाहूच्या दरबारात जे मंत्री नानाच्या योजनेच्या विरुद्ध होते, त्याना दहशत घालण्यास हे सैन्य पुरेसे होते.

शाहूची पट्टराणी सकवारबाई ही जसी धाडसी तसीच कार-स्थानीहि होती. नानाचा हाडवैरी यमाजी शिवदेव हा तिचा मदत-नीस. या दोघानी नानाची योजना हाणून पाडण्यासाठी नाना प्रकारचे उपाय केले. जादूटोण्याचा देखील त्यानी अवलंब केला. परंतु नानाची त्यांच्या हालचालीवर कडक नजर होती.

एक दिवस सकवारबाईने आपल्या नवऱ्याची अलोट संपत्ती हस्तगत करण्याच्या हेतूने साताऱ्चा किल्ला ताब्यात घेण्याचा डाव रचला. तिने हूल उठविली की आपल्या नवऱ्याच्या प्रकृतीस आराम पडावा म्हणून आपण किल्ल्यांतील मंदिरात यज्ञ करणार आहोत. ती पांचशे निवडक सैनिक घेऊन किल्ल्याकडे निघाली. परंतु किल्लेदारास तिच्या हालचालींचा संशय आल्याने त्याने तिच्याबरोबरच्या पांचशे सैनिकाना किल्ल्यात घेण्यास नकार दिला. ते पाहून राणी चिडली. तिने किल्ल्यास वेढा घालणेचे ठरविले. किल्लेदाराची गाळण उडाली. त्याने आणीबाणीची इशारत देऊन नानास सैन्य धाडण्याची सूचना केली. नाना सैन्य घेऊन किल्लेदाराच्या मदतीस आला.

शाहू त्यावेळी रुग्णावस्थेत बिछान्यावर पडून होता. उपर्युक्त घटनेमुळे राजधानीत मोठीच खळबळ माजली. ती वार्ता जेव्हा शाहूच्या कानी गेली, तेव्हा त्याने सकवारबाईस आपणासमक्ष बोल-वून घेऊन तिला जाब विचारला. त्यावेळी त्याचे सर्व मंत्री तेथे हजर होते. शाहू सकवारबाईस इतका रागे भरला की, त्या भरात तो दोनदा बिछान्यावरून उठण्याचा प्रयत्न करीत असता खालीं जमिनीवर कोलमडून पडला.

या घटनेमुळे शाहूने आपला वारसदार लवकर निवडण्याचा निर्णय घेतला. त्याने वारसदाराचा तपास करण्याचा हुकूम सोडला.

तत्पूर्वी त्याने बाजीरावास[1] बोलावणे पाठविले. कारण त्यानेच शाहूला त्याच्या संभाव्य वारसदाराबाबतची पहिली बातमी दिली होती. परंतु बाजीरावास सकवारबाईची भीति वाटल्याने तो शाहूच्या भेटीस येण्यास तयार होईना. इकडे शाहूला आपल्या जगण्याची शाश्वति वाटत नसल्याने वारसदार नेमण्याची घाई झाली होती. त्याने आपला मंत्री घनःशाम यास बाजीरावाकडे पाठवून त्यास आश्वासन दिले की, तूं जर माझ्या भेटीस आलास तर नानाचा तुझ्यावर मुळीच रोष होणार नाही.

अखेर बाजीराव शाहूच्या भेटीस आला. तो म्हणाला की संभाजीने आपणास कोल्हापूरचे राज्य अविरोध प्राप्त व्हावे म्हणून शिवाजीचे दोन मुलगे ठार केले, तसेच यालाहि (रामराजास) तो मारील या भीतीने त्याला ताराबाईने माझ्या हवाली केले. मी त्यास त्याची चुलती[2] पांडव[3] देशाची निंबाळकर हिच्याकडे नेऊन ठेविला.

शाहू राजा दि. २८ डिसेंबर १७४९ या दिवशी निधन पावला.

शाहूच्या निधनाचे पूर्वी सकवारबाईने सती जाण्यास नकार दिला होता. तिने युक्त्या प्रयुक्त्या लढवून सती जाण्याचे टाळण्याचा प्रयत्न केला होता. कारण ती अतिशय महत्वाकांक्षी असून आपल्या जीवावर तिचे प्रेम होते. परंतु अखेरच्या क्षणी सगळ्यांनीच तिचा त्याग केल्याने तिची जगण्याची धडपड फुकट गेली. अखेर ती तिच्या सर्वांत मोठ्या शत्रूस (नानासाहेबास) देखील शरण गेली.

सकवारबाई शाहूबरोबर सती जावी व तिच्या देहाची राख व्हावी ही नानाची इच्छा होती. सकवारबाईचे आढेवेढे बाजूस काढून त्याने तिला सती जाण्यास प्रवृत्त केले. तो म्हणाला की, ती जर सती गेली नाही तर तिची जगांत अप्रतिष्ठा होईल.

---

१ भगवंतराव अमात्य

२ चुलती नसून बहीण, दर्याबाई निंबाळकर, शिवाजीची मुलगी

३ पांडवदेश म्हणजेच 'पाणगाव' असावे

अशा रीतीने जीव बचावण्याची शेवटची धडपड करून देखील सगळ्यांनी त्याग केलेल्या सकवारबाईस शाहूच्या चितेत उडी घ्यावी लागली. शाहूबरोबर सती जाण्याचा निर्धार आणखी दोन तरुणींनी बऱ्याच दिवसापूर्वी केला होता. त्या आणि शाहूची आणखी एक आवडती रखेलीहि सती गेली.

शाहूच्या मृत्यूनंतर रामराजाची आजी ताराबाई हिने नानाच्या सल्ल्याने द्वाही फिरविली की, आपला नातू ( रामराजा ) राजा झाला आहे. तरी सगळ्यानी त्याच्याशी एकनिष्ठ असावे. नानाने यत्किंचितहि विलंब न लावता महादबा ( पुरंदरे ) ह्याला घोडदळाची एक तुकडी देऊन रामराजास आणण्यासाठी पांडवदेश प्रांती रवाना केले.

रामराजाचे साताऱ्यास आगमन झाल्यावर त्याचा राज्याभिषेक घडवून आणण्याचे ठरले. परंतु शिवरात्र झाल्यावर हा समारंभ करण्याचा निर्णय घेण्यात आला.

इकडे शाहू अत्यवस्थ असल्याचे कळताच कोल्हापूरचा संभाजी तांतडीने साताऱ्यास निघाला होता. कारण शाहूची गादी आपणास मिळाल्यावांचून राहाणार नाही अशी त्याला आशा वाटत होती. परंतु तो साताऱ्यास निघाल्याची वार्ता नानास कळताच त्याने सैन्य पाठवून त्याचा रस्ता रोखून धरला. त्याने त्याला निरोप धाडला की, शाहू राजे निधन पावले आहेत, तरी तुम्ही माघारा परतावे. संभाजीची घोर निराशा झाली. नानाचे सैन्य मोठे असल्याने तो त्याच्याशी दोन हात करू शकत नव्हता. त्यामुळे त्याला कोल्हापुरास माघारा परतावे लागले.

नानाने आपणास राज्यकारभार मनासारखा करता यावा म्हणून आपल्या प्रतिस्पर्ध्यांचा बंदोबस्त करण्याचे काम हाती घेतले. त्याने काही मंत्र्यास अर्धचंद्र दिला. त्याने दादोबा प्रतिनिधीस कैदेत टाकले, व यमाजी शिवदेव ह्याच्या हातापायाना बेड्या ठोकून त्याच्या बायकामुलासह त्याला कारावासात बंदोबस्तात ठेवले.

अशा रीतीने नवीन राजा गादीवर आणून व राज्यकारभारावर घट्ट पकड बसवून नाना इतर उद्योगास लागला. पोर्तुगिजाकडेहि त्याचे दुर्लक्ष झाले नाही. त्याने गोव्यास जासूद पाठवून मला कळविले की, दक्षिणेकडे आरमार पाठविण्याचा आपला विचार आहे. तरी पोर्तुगीज आरमाराने ह्या आरमाराची कुरापत काढू नये व त्याचा अपमान होण्यासारखे कृत्य घडू देऊ नये. अशा रीतीने आमच्या हालचालींची बातमी काढून आम्ही आपल्या उत्तरेकडील ठाण्यावर हल्ला केला तर आम्हास शह देता यावा ह्या इराद्याने त्याने भोसल्यांच्या हाताखाली ५०० घोडदळ व ४००० पायदळ वाडीस जय्यत ठेवले. गोव्यातून उत्तरेकडे आमचे सैन्य निघाल्यास वाडीस ठेवलेले सैन्य गोव्यात घुसविण्याचा त्याचा बेत होता.

सातान्यात जी मोठी क्रांति झाली तिच्या परिणामाचा अंदाज करता येतो. नवीन राजा जर नानाच्या आहारी गेला, तर नाना पूर्वीपेक्षा अधिक मोठा हुकूमशहा बनण्याची भीति आहे, कारण तो राजास सांगू शकेल की, मी तुम्हास राज्यावर आणले तेव्हां मी सांगेन तसे तुम्ही वागले पाहिजे. नानाचे प्रतिस्पर्धि बलहीन आहेत. त्याला विरोध करण्यास समर्थ असा एकही संघटित पक्ष नाही. तसेच हिंदूंच्या नैसर्गिक डळमळीत स्वभावानुसार व काही अदृश्य हितसंबंधानुसार आहे ते ठीक आहे ह्या प्रवृतीस अनुसरून नानाचा कारभार सुरळीत चालेल.

सांप्रतची परिस्थिती ही अशी आहे. परंतु मी जागरूक आहे. मी ठाण्याच्या रक्षणासाठी ती बळकट करीत आहे. माझ्या हाताशी जे फार थोडे सैन्य आहे त्याच्यासह मी राज्याचे रक्षण करू शकेन. मायदेशी जाणान्या नौकाना व अन्नाची बेगमी आणणान्या जहाजाना आरमार संरक्षण देईल.

देव आपले रक्षण करो.

गोवा २५ जानेवारी १७५०

# पुरवणी

क्रमांक : २४९ दि. १५(अंदाजे)-१२-१७३९

बाजीरावाने गोव्यावर स्वारी करण्याचे ठरविले, तेव्हां गोव्याच्या व्हाइसरॉयने करवीरचे छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडे बाजीरावाविरूद्ध मदत मागितली होती. संभाजी दुसरे यांनी व्हाइसरॉयच्या सेक्रेटरीस उत्तर धाडले की, करवीर व गोवा यांच्यामधील मैत्रीचे संबंध लक्षात घेऊन हिंदुराव घोरपडे याना कुमक देऊन पाठविण्यांत येत आहे. *

बाजीरावानी गोव्यामध्यें चिंतेचे वातावरण निर्माण केलें आहे. त्यानी गोव्यामध्यें सैन्य पाठविण्याचा निर्धार केला असून आम्हाला आपला हा हेतु विदीत केला आहे.

रंगो नारायण यांच्याकडून आम्हाला कळले की, आमची आणि गोव्याच्या व्हाइसरॉयची दोस्ती असून तींत फरक व्हायचा नाही असे व्हाइसरॉयचे म्हणणे आहे. गोवा बाजीरावाच्या हल्ल्यापासून अलिप्त राहावा ही व्हाइसरॉयची इच्छा आहे.

हे जर आम्हाला अगोदर कळले असते, तर या बाबतींत आवश्यक ती खबरदारी घेतली असती. आतां ह्या प्रकरणावर प्रकाश पडला. ज्याअर्थी गोव्याचे राज्य फार पुरातन आहे व आमच्याशी तह करण्याची ज्या अर्थी व्हाइसरॉयची इच्छा आहे, त्या अर्थी त्या राज्यास मदत करणे श्रेयस्कर आहे हे लक्षांत घेऊन आम्ही हिंदुराव घोरपडे ममलकतमदार यानां कुमक देऊन गोव्याकडे पाठवित आहोत. ते गोव्याकडे येथून लवकरच

* ह्या छत्रपती संभाजी दुसरे यांच्या मराठी पत्राच्या पोर्तुगीज भाषांतराचा तर्जुमा आहे.

निघतील. रंगो नारायण व रामचंद्र बाबाजी यांच्याकडून या प्रश्नाचा तपशील कळेलच. या प्रश्नाबाबत दिरंगाई होणार नाही याबद्दल निश्चित असावे.

---

क्रमांक : २५० दि. १३-१-१७४०

गोव्याचा व्हाइसरॉय पेद्रु मास्कारेन्यास कौंट द सांदोमील ह्याने आपल्या सल्लागारासमोर मांडिलेल्या या ठरावांत गोवा वेट घेण्यासाठी बाजीराव व भोसले यांच्यामध्ये झालेली बोलणी व करवीरचे छत्रपती संभाजी दुसरे यांनी बाजीरावाचा विरोध पत्करून फोंडयाचा प्रदेश सोंधेच्या राजास देण्यासाठी सुरू केलेली खटपट यांचा उहापोह केला आहे. संभाजी राजे यांच्या माणसांपासून सावध राहाण्याचा इशाराहि व्हाईसरॉयने या ठरावात दिला आहे. या प्रदीर्घ ठरावातील बाजीराव व संभाजी राजे यांच्या संबंधीचा मजकूर तेवढा या कागदात घेण्यात आला आहे.

दि. १३ जानेवारी १७४० या दिवशी व्हाइसरॉय पेद्रु मास्कारेन्यास कौंट द सांदोमिल यांच्या आज्ञेवरून राज्याच्या सल्लागारांची सभा भरली असता व्हाइसरॉयनी पुढील ठरावाचे वाचन करण्याची आज्ञा फर्मावली:

.......................................................

यंदाच्या उन्हाळयात बाजीराव सैन्य घेऊन हिंदुस्थानाला निघणार होता व त्यानुसार मराठयांचे सैन्य इकडे येणार नाही अशी बातमी होती. त्याचप्रमाणे संभाजी राजे हे सोंधेच्या राजाचा पक्ष घेऊन आमच्या राज्याला लागून असलेला व बाजीरावाने घेतलेला फोंडयाचा मुलुख घेणार असल्याचेहि वृत्त होते. ........................

ही सर्व परिस्थिती लक्षात घेऊन ह्या प्रदेशाला उपसर्ग पोहोचू नये............सतत कैक वर्षापासून व्यापारास खंड पडल्याने ......... ............. गोवा बेट घेणे कठीण नाही असे बोलल्याचे कानावर आले. असे कळते की चिमाजी अप्पा याच्यासमोर ही योजना मांडण्यात आली. त्याने त्याना आश्वासन दिले की, आम्हाला लष्कराची कुमक मिळाली तर ठराविक अटीवर ही योजना पार पाडू. अर्थात ह्या अटी भोसल्याना फायदेशीर असल्या तरच, हे सांगण्याची काही आवश्यकता नाही. असे कळते की, चिमणाजीने ह्या मोहिमेसाठी सरदारांची नेमणूकहि केली होती. परंतु बाजीरावाचे हिंदुस्थानचे प्रयाण तहकूब झाल्याने ती योजना मागे पडली.

पण बाजीराव आतां हिंदुस्थानला जात आहे.

ह्या सर्व बातम्या सांतु शेणवी ह्याने पाठविल्या. त्याची मी ह्या कामासाठी खास नेमणूक केली होती. तो प्रथम साताऱ्याला व तेथून पुण्याला गेला. बाजीरावाचे हिंदुस्थानला जाण्याचे निश्चित झाल्याचे त्यानेच कळविले होते. पण नंतर ते प्रयाण तहकूब झाल्याची बातमी आली.

मुंबईहून आलेल्या पत्रात बातमी आहे की, व्यंकटरावला गोव्यात पाठविण्याचे निश्चित झाले आहे. तिकडून आलेल्या माणसाकडून कळते की, हरिपंत ह्याला सातशे घोडेस्वार देऊन ............ तो लवकरच फोंड्याला येऊन दाखल होणार आहे. त्यावरून बाजीरावाचे सैन्य या उन्हाळ्यात इकडे येणार नसल्याच्या ज्या बातम्या आल्या होत्या त्या खऱ्या मानता येत नाहींत..... मला भीति वाटते की, चिमणाजीने पसंत केलेली भोसल्यांची योजना बाजीराव मान्य करील. कारण त्याचे हिंदुस्थानचे प्रयाण तहकूब झाले आहे. आणि मी जरी शाहू राजे यांचे मुख्य प्रधान नारोराम मंत्री यांच्यामार्फत भोसल्याशी तह घडवून आणण्याचा प्रयत्न करींत असलो .................... फार थोडी शक्यता ........... बाजीरावाचे सैन्य .................. फोंड्याला जी शिबंदी आहे तिला कुमक

आली तर हे सैन्य त्याला जवळ असणाऱ्या हद्दीवरून गोवा बेटात प्रवेश करू शकेल. ह्या हद्दीवरील आसची ठाणी फारच कमकुवत आहेत. काही ठाण्यांत तर दोन अथवा तीन पोर्तुगीज सैनिक आहेत. देशी शिपायी हद्दीचे रक्षण करण्यास निरुपयोगी आहेत हे मागच्या अनुभवावरून सिद्ध झालेच आहे. रासई येथे ह्या देशी सैन्याने शत्रूचा प्रतिकार करण्यास असमर्थ ठरल्याने शरणागती पत्करण्याची जी तयारी दर्शविली, त्यावरून शत्रूने ह्या सैन्याची कुवत ओळखली. तत्पूर्वी गोव्याची हद्द संरक्षणाचे दृष्टीने दुबळी असल्याची शत्रूला कल्पना नव्हती.

हद्दीचे रक्षण आपण समर्थपणे करू शकत नाही ह्या जाणिवेनेच भिक्षुणी, बायकामुले व मौल्यवान वस्तू मुरगावला हलविण्याचा ठराव मला ह्या सल्लागारांसमोर मांडावा लागला होता. शत्रूला हे सर्व माहित झाल्याने तो गोवा बेटावर हल्ला करण्यास प्रवृत्त होईल. ह्या बेटाची संरक्षक फळी बळकट नाही म्हणून पोर्तुगीज सैन्याला ह्या फळीवर ठेवल्याखेरीज.....................

फोंडयाचा किल्ला संभाजी राजे यांच्या हस्तक्षेपामुळे सोंध्याच्या राजास मिळेल ही अपेक्षा करण्याचे कारण की, संभाजी राजे व शाहू राजे या दोघांमध्ये झालेल्या एका जुन्या करारानुसार[1] हा टापू संभाजी राजे यांच्या अधिपत्याखाली मोडतो. संभाजी राजे ह्यांनी ................. परंतु बाजीरावाचे सामर्थ्य मोठे असल्याने ................ त्यानी पत्रे पाठवून ... ...... आश्वासन दिल्याप्रमाणे ह्या पैशाच्या बळावर .................... आपले सैन्य .............. आपल्या विभागणीमधील हे जिल्हे .. ......... ह्या मदतीच्या बळावर बाजीरावापासून बचाव करण्याची त्याची अपेक्षा आहे; त्याला बाबुली शेणवी, व्यंकटी, उपा कामत याना

1 वारणेचा तह

पत्रांसह पाठविण्याचा इशारा मिळाला. ह्याच लोकांनी साष्टीच्या तहात हस्तक्षेप केला होता. आणि ह्याच लोकांकडून शत्रूला सामान मिळाले होते. संभाजी राजे यांच्या ह्या उद्योगामुळे त्यांचे काही सरदार सोंधेच्या राजास मदत करण्याच्या मिषाने आपल्या माणसा-सह तुम्हाला येऊन मिळाले आहेत. त्यानी गोव्यांतील नद्यामधील उताराच्या वाटा कोणत्या त्याची माहिती गोळा केली आहे यांत शंका नाही. तुमच्या हद्दींचे नकाशेहि त्यांच्यापाशी आहेत. अशा परिस्थितीत मला तुम्हास इशारा द्यावासा वाटतो की, आमचे मित्र म्हणून येणाऱ्या ह्या लोकांऐवजी उघड शत्रू परवडला. ह्याचा अनुभव आम्हाला आमच्या माणसांच्या निष्काळजीपणामुळे आलेला आहे. . . . . . . . . . .

ह्या सर्व परिस्थितीचा विचार करून मला तुम्हाला इषारा द्यायचा आहे की, गोवा बेटाच्या हद्दीचे रक्षण करण्याचा केव्हा नाही तो प्रसंग आज आला आहे. आणि म्हणून मी सां लौरेंसु. पासून सांतियागुपर्यंतच्या हद्दीवरील ठाणी वाढविली आहेत. कारण ह्या जिल्ह्याच्या हद्दी उघडचा आहेत. त्यामुळे ह्या जिल्ह्याला पूर्वी धोका पोहोचला आहे ..................................

..............................................................

ती योजना अशी की, खुष्कीच्या मार्गे आमच्या सैन्यावर हल्ले चढवून समुद्रमार्गे ह्या बेटाच्या किनाऱ्यावरहि सैन्य उतरायचे. परंतु मुरगावच्या किनाऱ्यावर ठेवलेल्या तोफांनी व तिथल्या नौकांनी ही योजना हाणून पाडली. त्याचा सूड आंग्रेने आम्हाला तांदूळ घेऊन येणाऱ्या 'व्हितोरिया' ह्या फ्रिगेटवर उगविला. हा तांदूळ जर गेला असता तर आमच्यावर मोठीच आपत्ती ओढवली असती. त्या संकटातून आमचे देवानेच रक्षण केले. ह्या फ्रिगेटने शत्रूच्या सात पालांशी व सात गलबतांशी सतत दीड दिवस लढाई दिली.[1]

---

१ ही आरमारी लढाई संभाजी आंग्रे व पोर्तुगीज यांच्यामध्ये झाली

..........................................................................

..........................................................................

चालू वर्षाच्या मे महिन्यापर्यंत अथवा सप्टेंबर महिन्यापर्यंत आमच्या अस्तित्वाबाबतच्या संशयाचे निरसन होणार आहे. कारण एकतर भोसले, बाजीराव व शाहू राजे यांच्याशी आमच्या ज्या तहाच्या वाटाघाटी चालू आहेत, त्यातून काहीतरी निष्पन्न होईल अथवा बाजीरावाचा विरोध पत्करून संभाजी राजे यांनी सोंधेच्या राजाला आपल्या साम्राज्यातील जे जिल्हे देण्यासाठी जी खटपट सुरू केली आहे त्याची परिणती तहात किंवा युद्धात तरी होईल. आणि असे जर घडले तर आमच्या एका बलाढ्य आणि महत्वाकांक्षी शेजाऱ्यापासून आमची मुक्तता होईल व आमची काळजी तात्पुरती तरी मिटेल. ..........................................................

# सूची

( आकडे पृष्ठांचे आहेत )

इ



उ



ए



औ



क

प

भ



म

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| 2 | 16 | Pirajl | Piraji |
| 8 | 21 | -11-1725 | 19-11-1725 |
| 13 | 19 | toi | to |
| 14 | 8 | rcqest | request |
| 18 | 13 | whetever | whatever |
| 22 | 24 | 68-1735 | 6-8-1732 |
| 32 | 11 | Villages | Village |
| 38 | 26 | througout | throughout |
| ६ | ६ | गडगरी | गडकरी |
| १४ | २४ | पूव | पूर्वी |
| ४६ | २३ | जालिल्याने | चालिल्याने |
| ४९ | १६ | शाभकृत | शोभकृत |
| ५२ | १५ | ठवली | ठेविली |
| ६० | १९ | संताष | संतोष |
| ७२ | ११ | नापीफ | नापीक |
| ७८ | ६ | नाहो | नाही |
| ७९ | २३ | गल्यास | गेल्यास |
| ८४ | १३ | सेखोज | सेखोजी |
| ८८ | १५ | अर्थ | अर्ज |
| ९६ | ११ | जामजन्नी | जामदग्नी |
| ९७ | ३ | समस्स | समस्त |
| १०८ | ८ | अनामत | अमानत |
| ११७ | ५ | पद्मनामी | पद्मनाभी |
| १२३ | २३ | यर्थार्थ | यथार्थ |
| १२४ | २२ | याचा याचा | याचा |
| १३१ | ५ | शहू | शाहू |
| १४५ | १७ | नागौडडकी | नाडगौंडकी |
| १५० | १४ | म्हणेन | म्हणोन |
| १५२ | ५ | स्वास्त | स्वस्ति |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १५२ | ५ | परिघामी | परिधावी |
| १५४ | २५ | इमान | इनाम |
| १६० | १४ | सनापतीकडे | सेनापतीकडे |
| १६३ | ५ | २७–५–१७३५ | २७–५–१७३४ |
| १८० | ९ | रामजी | रामचंद्र |
| २०८ | ११ | खीतीचे | खोतीचे |
| २२१ | ८ | हे | हीं |
| २२१ | ८ | आपले आपले | आपले |
| २२१ | २२ | चौगली | चौगलकी |
| २२३ | १ | दयाल | हयाल |
| २२८ | ५ | तहतील | तहातील |
| २४५ | ३ | स्वामा | स्वामी |
| २४६ | ६ | रळोजी | रवळोजी |
| २७७ | ६ | सिदरवाडचे | सिरदवाडचे |
| २७९ | ९ | अल्लीया | आलीया |
| २९४ | ७ | २७–५–१७[illegible] | २७–५–१७४८ |
| २९४ | १४ | ब | व |
| ३१० | १ | लडकते | बडकते |
| ३१२ | ९ | संताशावह | संतोशावह |
| ३३० | १२ | क्रांति | क्रांती |

## शिवाजी विद्यापीठाचे आद्य कुलगुरू
## व थोर इतिहास संशोधक
## डॉ. आप्पासाहेब पवार यांची ग्रंथ-संपदा
(शिवाजी विद्यापीठ प्रकाशन)

१) ताराबाईकालीन कागदपत्रे - खंड पहिला

२) ताराबाईकालीन कागदपत्रे - खंड दुसरा

३) Tarabai Papers - A Collection of Persion Letters

४) ताराबाईकालीन कागदपत्रे - खंड तिसरा

५) Rajarshi Shahu Chhatrapati Papers, Vol. I : 1884-1894 A. D.

६) जिजाबाईकालीन कागदपत्रे

७) Studies in Maratha History, Vol. I

८) Maratha History Seminar Papers

शिवाजी विद्यापीठ ऐतिहासिक ग्रंथमाला : पुष्प तिसरे



# ताराबाईकालीन कागदपत्रे
## खंड तिसरा

संपादक

डॉ. आप्पासाहेब पवार

किंमत ८ रुपये

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

शिवाजी विद्यापीठाच्या वतीने प्रकाशित होत असलेल्या ऐतिहासिक ग्रंथ-मालेपैकी ताराबाईकालीन कागदपत्रे या साधन ग्रंथाचा हा तिसरा खंड आज प्रकाशित होत आहे. यातील बहुसंख्य कागद 'एलिएनेशन' ऑफिस पुणे आणि कोल्हापूरच्या दप्तरखान्यातील आहेत. गोवे दप्तरातीलहि काही कागद घेतलेले आहेत. आणि इतिहास संग्रहात पूर्वी प्रकाशित झालेले ताराबाई संबंधीचे पाच कागद असून 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने,' खंड ६ मधील एक आहे.

या खंडात प्रसिद्ध होत असलेल्या कागदपत्रात राजकारणाच्या दृष्टीने दोन महत्वाच्या घटनांचा उल्लेख येतो. त्या म्हणजे शाहूनंतर रामराजाचे राज्यारोहण आणि महाराणी ताराबाई व नानासाहेब पेशवे यांच्यातील संघर्ष. या दोन्ही विषयासंबंधाने आतापर्यंत बरीच माहिती उपलब्ध झालेली आहे. या एकंदर माहितीचा उपयोग करून घेऊन या प्रस्तावनेत या दोन विषयांचा साकल्याने विचार करून विस्तृतपणे लिहावयाचे ठरविले होते. पण कार्यबाहुल्याने ते होऊ शकले नाही. म्हणून प्रस्तुत खंडात प्रसिद्ध होत असलेल्या काही कागदपत्रांच्याच बाबतीत लिहावयाचे योजिले आहे.

रामराजाला गादीवर बसविण्याची कायदेशीर जबाबदारी कोणाची, या प्रश्नाचा सांगोपांग विचार केल्यावर उत्तर देणे क्रमप्राप्त होते की, ती बाळाजी बाजीराव पेशव्याची म्हणून. हे खरे, की शाहूच्या शेवटच्या कालात वारसाच्या प्रश्नावर पुष्कळच खल झाला आणि रामराजाचे नाव सुचविले गेलेहि. या संदर्भात राजवाडे खंड ८ मध्ये प्रसिद्ध झालेले ताराबाईचे पत्र सर्वश्रुत आहे. शाहू महाराज राजारामाला "आणावयाच्या विचारात", होते असे प्रस्तुत खंडाच्या पहिल्या पत्रातच म्हटलेलेहि आहे. हे सर्व खरे असले तरी, प्रत्यक्ष रामराजाला आणावयाची आणि सिंहासनावर बसविण्याची जबाबदारी पेशव्याचीच होती. शाहू महाराजानी मृत्युपूर्वी दोन सनदा करून सर्व सत्ता पेशव्याच्या हाती दिली. या गोष्टीचा उल्लेख करून पेशवे लिहितात, "कैलासवासी महाराज वर्तमान असता आम्हास समीप बोलावून, स्वकीय स्वार्थकाविसी व सलतनतेच्या बंदोबस्ताविसी कित्येक प्रकारे सांगितले. त्यावरून आगाव पंचवीस तीस हजार फौज जमा करून सातारा राहिलो. राजश्रीने परलोकवास करताच तमाम पुरेजात व कारखाने व राजमंदिरी चौक्या

ठेवून बंदोबस्त केला. राजश्रीस संगमी नेऊन यथोचित सार्थक केले. राजश्री राजारामसाहेब पानगावी होते, त्यास आणावयाच्या विचारात कैलासवासी महाराज होते. तेंव्हा प्रसंग जाहालियावरी आणावयास फौज पाठविली. छ. २६ मोहरमी (म्हणजे २६ डिसेंबर १७४९ रोजी) आले. तमाम राज्यातील सरदार सरकारकून अरकानी दौलतानी समस्त लहानथोरी तसलिमात बज्या आणिली. श्रीने राज्यपदारूढ केले. छ. ६ सफरी ( म्हणजे ४ जानेवारी १७५० रोजी ) सिंहासनारूढ जाह्ाले. मोठा जलूस जाहला. उमर बेवीस तेवीस वर्षाची तारूण्य राजतेजयुक्त प्राक्तनवान आहेत. तदनुरूप किमपि व्यंग न पडता राज्याचा बंदोबस्त उत्तम रीतीने जाहाला......" ( प्रस्तुत खंड क्र. १ ). शाहूच्या मृत्युनंतर सर्व सरदाराना नानासाहेब पेशव्यानी पाठविलेले हे पत्र आहे. रामराजाचे वर्णन "तारुण्य राजतेजयुक्त प्राक्तनवान आहेत" असे त्यानी केले आहे. म्हणजे रामराजा त्यांच्या पसंतीस उतरला होता असे दिसते.

रामराजा प्रकरणी ताराबाईवर भलताच दोष लादण्यात आला आहे. त्याचा साग्र विचार येथे करता येणे शक्य नाही. केवळ वादासाठी हे मानिले की, ताराबाईमुळे रामराजाचे नाव पुढे आले तरी, तो जर खरा नव्हता, तर त्याचे राज्यारोहण करण्याचे काहीच कारण नव्हते. कोणाच्या सांगण्यावरून अथवा दबावाने पेशव्यानी ही गोष्ट केली, असे म्हणता येणार नाही. शाहूकडेहि बोट दाखविता येणार नाही. कारण, शाहूने करून दिलेल्या दोन्ही सनदात रामराजाचे नाव आलेले नाही. शाहूची तशी इच्छा असती तर दोन्हीपैकी एकातरी सनदेत रामराजाला गादीवर बसवावे, असे त्याने म्हटले असते. याचा अर्थ, याबाबत निदान शाहूची खात्री झाली नव्हती असाच होतो. असे असताना पेशव्यानी सर्व गोष्टीबाबत स्वतःची खात्री करून घेतल्याशिवाय रामराजाला गादीवर बसविले असल्यास चूक पेशव्याची आहे. पण ज्या अर्थी आपल्या पहिल्याच उद्गारात "तारूण्य राजतेजयुक्त प्राक्तनवान" असे रामराजाचे वर्णन पेशवे करतात, त्या अर्थी त्यांची काही का असेना खात्री झालेली असावी. पेशव्याना घाईघाईने सर्व आटोपून घ्यावे लागले असेहि म्हणता येणार नाही. एका थोर राज्याच्या भवितव्याचा हा प्रश्न होता, आणि तो नीट रीतीने सोडविणे अगत्याचे होते. एवंच रामराजाला गादीवर बसविण्याची जबाबदारी नानासाहेब पेशव्यांची. पुढे खरी वस्तुस्थिती उघड झाल्यावर नानासाहेबानी कानावर हात ठेवलेला दिसतो. तारीख २९ जुलै, १७५२ रोजी लिहिलेल्या पत्रात ते म्हणतातः "जे कारागृही आहेत ते पूर्ण लटके. आमक बाप, आमकी आई आहेत, गाव आमका यैसा पूर्ण पत्ता लावावा तो जगविख्यात व्हावा. मग हा अर्थ ताराबाई करोत अथवा सौ।। संपन्न जिजाबाई करोत. हा अर्थ जगविख्यात जाहलिया मग आम्हास तिळमात्र अभिमान नाही." ( प्रस्तुत

खंड, क्र. ८५ ). पेशव्यानी हा कांगावा करून उपयोग काय? या गोष्टीची काळजी जी घ्यावयाची ती त्यानी प्रारंभीच घ्यावयास पाहिजे होती. जर ती त्यानी घेतली नसेल तर दोष त्यांचा आहे; ताराबाईचा अथवा जिजाबाईचा नाही. पेशव्यानी हे सर्व संतापाने लिहिलेले असले तरी, त्याच्या बुडाशी असलेला हेतु त्यानीच सुस्पष्ट केला आहे. नानासाहेब पुढे म्हणतात : " आम्हास लोकानी बेभान मात्र न म्हणावे. आम्ही भोसल्याचे वंशाचे चाकर, तेच नाहीसे जाहल्यावरी आम्हास दोष नाही. " म्हणजे भोसल्यांची सत्ता राहिली नाही; सर्व सत्ता पेशव्यांची झाली असे का नानासाहेबाना म्हणावयाचे आहे, असे त्यांचे म्हणणे संभवनीय वाटते. सर्व सत्ता आपल्या हाती यावी ही नानासाहेबाचीच नव्हे, तर बाजीराव आणि चिमाजी अप्पाचीहि इच्छा होती अशी विश्वसनीय नोंद सापडते. याच खंडातील पत्र क्र. १ चा लेखक अमृत शंकर दिनकरराव नानासाहेब पेशव्याना लिहितो : " पूर्वी श्रीमंत कैलासवासी रावसाहेब ( म्हणजे बाजीराव ) व श्रीमंत आपासाहेब ( म्हणजे चिमाजी आप्पा ) वर्तमान असता, सेवकासमक्ष चर्चा केली, की राज्यातील सेना व खावंदाचे चितवाती असते तरी, एकवेळ प्रजापाळण करून दाखवितो. त्या उभयतांचे मनोभिष्ट पूर्वपुण्ये स्वामीच्या पदरी आले. " म्हणजे वाडवडिलांपासून आलेली महत्वाकांक्षा पुरी करण्याचे भाग्य बाळाजी बाजीरावाला लाभले आणि सर्व सत्ता त्यानी बळकावली, असेच म्हणावयाचे ना ?

" आम्ही भोसल्याचे वंशाचे चाकर तेच नाहीसे जाहाल्यावरी आम्हास दोष नाही, " असे जे नानासाहेब म्हणाले, ते चुकीचे आहे. भोसल्याचा वंश नाहीसा होतो कसा ? शाहू नंतर " वंश " जतन करण्याची जबाबदारी नानासाहेबाची. ती जर योग्यरीतीने त्यानी पुरी केली नाही, तर सर्वस्वी दोष त्यांचा. " आम्हास दोष नाही, " असा पुकारा करून उपयोग काय ?

ताराबाई–पेशवे संघर्षाची माहिती देणारे मुख्यत्वेकरून चार कागद या खंडात छापलेले आहेत ( क्र. १६, २८, ८१ आणि १२३ ). यातील पहिल्याच म्हणजे क्र. १६ च्या पत्रात ताराबाईचा कणखरपणा दिसून येतो. पेशव्यानी ताराबाईना लिहिले होते की " साहेबी सेवकावर कृपा करून सर्व राज्यभाराचा एखतियार दिल्हा. सेवकाने दीड वर्षे जी जी कार्ये केली ती आज्ञेनेच केली. " याला ताराबाईनी सणसणीत उत्तर दिले. त्या म्हणतात, " तुम्ही एकनिष्ठ सेवक. आज्ञेने वर्तला. त्याचे प्रमाण इतके जे या समयी तुम्ही फौजसुद्धा येऊन परिघ घातला आहे, तो उठवून तुम्ही स्वस्थळास जावे. तदनंतर जे बोलणे असेल ते सांगोन हर कोणी आपले तर्फेने पाठवून द्यावा. त्यासी जाबसाल करावे तो केला जाईल. "

क्र. २८, ८१ आणि १२३ हे कागद ताराबाई आणि नानासाहेब या दोघामधील वाटाघाटी, करारमदार या संबंधाचे आहेत. त्यापैकी क्र. २८ त मूळ भांडणाचे स्वरूप उघड झालेले आहे. ताराबाईचे म्हणणे होते की, पेशव्यानी पूर्वी नव्हती ती सत्ता बळकावली, ती त्यानी सोडली पाहिजे. या कागदातील कलम १० अत्यंत महत्वाचे आहे. त्यात प्रथम ताराबाईचे म्हणणे काय ते दिले असून नंतर पेशव्यांचे उत्तर दिलेले आहे.

ताराबाई :– "हुजुरचे कारभारात पेशजी चिरंजीवाचे कारकीर्दीस (म्हणजे शाहूचे काळात) तुमचे विद्यमाने जो काम कारभार होत होता त्याप्रमाणे तुमचे हाती घेतला जाईल व हुजूरून जो काम कारभार होत होता, त्याज प्रमाणे हुजूर होणे तो होईल. त्यामध्ये तुम्ही चित्त घालू नये."

पेशवा :– "थोरले महाराजानी कैलासवास केलियावर साहेबी सर्वा सेवकापेक्षा सेवकावरच कृपा विशेष करून सर्व यख्तयार दिल्हा. इमान प्रमाण दिल्हे. आता जी मर्जी असेल ते प्रमाण दुराग्रह नाही."

ताराबाईनी नानासाहेबाना "सर्व यख्तयार" काय करून दिल्हा, कोणते "इमान प्रमाण" करून दिले ठाऊक नाही. ताराबाईनी वचन मोडले असे नानासाहेबाना म्हणावयाचे दिसते. ताराबाईनी कोणते वचन दिल्हे माहित नाही. परंतु वादासाठी ताराबाईनी दिलेले वचन मोडले असे मानले, तरी सर्व सत्ताधारी नानासाहेबाना ताराबाईचे वचन का घ्यावे लागले ? ताराबाईना कांही सत्ता स्थान होते का ? तिचे काही म्हणणे होते का ? असेल तर पेशव्यानी ते ऐकले का ? त्यांच्याकडून "इमान प्रमाण" नानासाहेबानी का घेतले ? शाहूने दिलेल्या सनदाद्वारे पूर्ण "यख्तयारी" लाभल्यावर ताराबाईकडून यख्तयारी कशासाठी घेतली ? या आणि अशा प्रश्नांचा विचार साकल्याने करावा लागेल. तूर्तास नानासाहेब पेशव्यानी ताराबाईस जे उत्तर पाठविले तेवढेच पाहावयाचे आहे. पेशव्यानी माघार घेतली म्हणून म्हणा अथवा भांडण मिटविण्यासाठी म्हणा, त्यानी उत्तर पाठविले की "आता जी मर्जी असेल ते प्रमाण. दुराग्रह नाही."

क्र. ८१ च्या कागदावरून कळून येते की, खरा प्रश्न निष्ठेचा होता. ताराबाईनी नानासाहेबास स्पष्टच बजावले की, "तुमचे येकनिष्टतेस योग्य ते करणे."

क्र. १२३ चा कागद अतिशय महत्वाचा आहे. यात रामराजाचाहि संबंध आला आहे. पहिल्या कलमातच ही गोष्ट स्पष्ट होते. पेशव्यांचे म्हणणे होते की " जो देव वडिलानी करून दिल्हा त्याची पुजा आम्ही करू लागलो. " पेशव्याचे हे म्हणणे वरपांगीपणाचे तर होतेच, शिवाय पूर्ण चुकीचे होते. देव स्वत: पेशव्यानी केला, रामराजाला त्यानी स्वत: गादीवर बसविले. याची चर्चा वर केलीच आहे. मात्र ताराबाईनी जे उत्तर दिले ते मूले प्रहार करणारे आहे. पहिल्याच दिवशी रामराजा खरा नसल्याची गोष्ट स्पष्ट केली होती, असे ताराबाईचे म्हणणे आहे.

त्या म्हणतात :– " प्रथम दिवशीच श्री——कोटेश्वरी साहेबाची स्वारी न्हेली. तेव्हा श्रीच्या देवालयात पुराणीक व गोपाळराव यादव व गोविंद खंडेराव व बापूजी खंडेराव चिटनवीस या चतुवर्गास साहेबी तत्क्षणीक आज्ञा केली की ही वस्तु खरी नाही. वंशास दाग लागतो. तेंव्हा मुरडोन चौघानी अर्ज केला की आता समय नाही. म्हणावयाचा नव्हे, घात होतो. या प्रमाणे साहेबाचे बुद्धीस भ्रंश करून तो समय या प्रमाणे संपादिला. साहेबाचे मानसी की ते क्षणीच तुम्हास समक्ष बोलावून हे आज्ञा करावी. तो मध्यस्त प्रकार कारभारी याचे चिती की समक्षता होऊ न द्यावी······प्रायश्चित आरंभिले तेव्हा साहेबी आज्ञा निरोपिली की पूर्ता शोध होऊ द्या. मग हा विधी करणे. हेही कोणाच्या चित्तास न ये. तोहि विध केला. त्यानंतर मुंजीबंधन व शरीर समंधाच्या निकडी होऊ लागल्या. ते सययी आज्ञा करीतच गेलो की त्वरा कार्याची नाही······ गोत्पत आरंभिले. तेंव्हा साहेबी व रामाऊ भोसली याणी एक प्रहर तट केला की हे काय करता ? ते वेळेस मराठे याणी तरी विचार करावा तर त्यास ताकीद तुमची. सर्वांनी भिडेस्तव कईम केली······ तुमच्या पक्षी अभिमान पूर्ण असता मराठे निषेध खोटे यैसे म्हणू सकतात की काय ? तुम्हीच याचा विवेक चितात आणून भोसल्याच्या वरदी राज्यास व वंशास दाग न लागे यैस करावे हे तुम्हा मंत्रियास उचित आहे····· भोसल्याच्या वंशास दाग नसावा······ दुराग्रहावरी द्रिष्टि किमपि न देणे.······ "

अगदी प्रथमपासून रामराजाच्या खरेपणाबद्दल ताराबाईनी संशय घेतला, असे त्या स्वत: म्हणतात. असे असता बखरींचा आधार घेऊन ताराबाईवर वाटेल

ते आरोप करणाऱ्याना काय म्हणावे ? ताराबाई तेवढ्या खोट्या, बाकी सर्व खरे, इतकेच त्याना म्हणावयाचे आहे ना ?

ताराबाई बरोबरची ही पेशव्याची नरमाईची भाषा, करवीरकराशी त्यानी जो करार करून दिला त्यात दिसून येत नाही. क्र. १३६ येथे हा करार दिला आहे आणि त्याची तारीख जानेवारी–फेब्रुवारी १७५९ आहे. कराराच्या पहिल्याच कलमात राजमंडळाची मागणी होती की " वारणे ऐलेकडे राजमंडळाचा तालुका जो आहे तो साहेबाकडे निर्वेध असावा." याला उत्तर देताना पेशवे म्हणाले नाहीत की, तो निर्वेध राहील. ते म्हणाले की, " सुदामत चालत आल्याप्रमाणे चालऊ." त्याचा अर्थ काय करावयाचा तो ज्यानी त्यानी करावा !!

पंतप्रधानाचा दरारा केवढा वाढला होता याची दोन उदाहरणे प्रस्तुत खंडात प्रसिद्ध होत असलेल्या दोन कागदावरून पहावयास मिळतात. क्र. १४४ हा पंतप्रधानाना यशवंतराव घाटगे कागलकर यानी लिहून दिलेला करीना आहे. कागलकरानी पेशव्याना करीना का लिहून द्यावा, समजत नाही. तसेच क्र. १४५ मध्ये पेशव्यानी राणोजी घोरपडे कापशीकर याना दरडावलेले दिसते. खरे पाहाता पेशव्याचा कापशीकराशी संबंध काय ? याचा अर्थ एकच दिसतो की, पेशवे बलीष्ठ झाल्यावर त्यानी आपली हुकमत चोहोकडे गाजविण्यास सुरवात केली, मग त्यांचा प्रत्यक्ष अधिकार असो वा नसो.

ताराबाई–पेशवे कलहाच्या काळात ताराबाईनी पेशव्याच्या विरूद्ध उठाव करण्याचा प्रयत्न केला. त्या पैकी एका प्रयत्नाचा उल्लेख येथे करणे चुकीचे होणार नाही. कारण, त्याबद्दलची माहिती फारशी उपलब्ध नाही. प्रस्तुत खंडातील क्र. १२२ चे पत्र गोव्याच्या गव्हर्नरानी ताराबाईना लिहिलेले आहे. सदर पत्रात ते म्हणतात :–

" आपले पत्र मिळून फार आनंद झाला···· आमच्याकडून आपणाला दोन हजार बंदूका हव्या आहेत आणि त्या आम्ही इस्माईलखान याच्या मार्फत आपणाकडे पाठवाव्या अशी आपली इच्छा असल्याचे कळले·····आपली मागणी मान्य असल्यामुळे आम्ही आश्वासन देतो की, ती आम्ही तत्परतेने पूर्ण करू····"

हे पत्र ता. २५ एप्रिल १७५८ चे आहे. पत्रातील इस्माईलखान पोर्तुगीजाकडे नोकरीस असलेला एक मुसलमान होता. ताराबाईनी त्याला लिहिलेल्या पत्राचे पोर्तुगीज भाषांतर गोवे दप्तरामध्ये आहे. त्या पत्रावरून ताराबाईनी विठोजीराव

पाटोळे यास गोव्यास पाठवून त्याच्यामार्फत काही गुप्त मसलत केल्याचे कळते. डॉ. पिसुर्लेकर म्हणतात की Livro das Mocoes च्या जुन्या सूचीत ( Vol 2° पृ. ९० ) ताराबाईनी पेशव्याविरूद्ध सहाय्य मागितल्याचा उल्लेख आहे. (पोर्तुगीज–मराठे संबंध पृ. ३१). गोव्याचा व्हाईसरॉय मार्केज द ताव्होरा याच्या चरित्रकाराने म्हटले आहे की " सलाबतजंगच्या पेशव्या विरूद्धच्या कारस्थानात महाराणी ताराबाई यांचे अंग होते. कारण, नाना त्याना वाईट वागणूक देई " ( पोर्तुगीज–मराठे संबंध पृ. २३६ ). सदर व्हाईसरॉय मार्केज द ताव्होरा यांच्या पत्नीने पोर्तुगालमधील आपल्या मुलांस लिहिलेल्या पत्रात ताराबाईचे वर्णन "अत्यंत बुद्धिमान, स्वाभिमानी स्त्री" ( Mulher sumamente espirituosa ) असे केले आहे. (पोर्तुगीज–मराठे संबंध पृ. ३०).

सातारा आणि कोल्हापूर यांच्यामध्ये अधुन मधुन ज्या चकमकी उडत होत्या, त्यांचा उल्लेख आता प्रसिद्ध होत असलेल्या काही कागदातून आढळतो (क्र. ४६, ४८, ४९, ५१, ५३, ५७). यांतून फार मोठे प्रसंग काही निर्माण झालेले दिसत नाहीत. पण एकदा साताराचे जासूद कोल्हापूरास गेले तेव्हा त्याना दरवाज्याच्या आत घेतलेच नाही. क्र. ४६ चे पत्र सुभानजी नाईक याने ताराबाईना लिहिलेले आहे. त्यात तो म्हणतो: " साहेबी करवीरवासी यासी पत्र दिले. त्यास ते पत्र देऊन जासूद करविरास रवाना केले. ते जासूद त्यानी दरवाजेचे आत येऊ दिले नाहीत. दाहा बारा रोज जासूद त्यानी बाहीर ठेविले······"

ताराबाईनी जिजाबाईना ता. ३ जून १७५८ रोजी लिहिलेले पत्र राजकारणी तसेच महत्वाचे आहे. मागे सांगितले आहेच की, ताराबाईनी पेशवे याना रामराजाबद्दल प्रथम पासून संशय असल्याचे स्पष्ट केले होते. आता जिजाबाईना लिहिताना तीच गोष्ट त्यानी सांगितली आहे. त्या म्हणतात– " साहेबाचा वंश असता तोतया करून डाग लाऊन घ्यावा हे प्रथम दिवसापासून साहेब म्हणतात, त्याप्रमाणे तुम्हास आज्ञा करीत असता धैर्य न होय········· हा विषय क्षत्रिय कुलावतंस आहेत त्यास उचित नसे······वंशानुरूप कर्तूत्व घडोन न आले······" ताराबाईचे म्हणणे दिसते की, कोल्हापूरच्या संभाजीनी आणि त्यांची राणी जिजाबाई ( वाडा चवथा ) या दोघांनी धैर्य धरून या रामराजा प्रकरणामध्ये उडी घ्यावयास पाहिजे होती. ताराबाई म्हणतात की, त्यानी याबाबत त्याना कळवायचे ते कळविले होते, पण त्याना धैर्य झाले नाही. ( " तुम्हास आज्ञा करीत असता धैर्य न होय " ). क्षत्रिय कुळाला आणि भोसल्याच्या वंशाला हे शोभण्यासारखे झाले नाही, असा दोष ताराबाईनी त्याना दिला आहे.

नानासाहेब पेशव्यानी इंग्रजाशी हातमिळवणी करून तुळाजी आंगऱ्याला बुडविले. तुळाजीने स्वसंरक्षणासाठी गोवेकर पोर्तुगीजाशी एक करार केला. त्या संबंधीचे तीन कागद या खंडात आले आहेत ( क्र. ९९, १००, १०१ ). शेवटचा म्हणजे क्र. १०१ चा कागद हा त्या दोघात झालेला करार आहे. या करारान्वये पोर्तुगीजानी पाचशे सैनिकांची कुमक आंगऱ्याकडे पाठवावयाची होती आणि ठरल्या प्रमाणे तुळाजीने रक्कम द्यावयाची होती. तुळाजीचा पाडाव झाल्यावर नानासाहेब पेशव्यानी पोर्तुगिजांमागे ससेमिरा लावला की, पोर्तुगीजानी आंगऱ्याकडून घेतलेला पैसा पेशव्यांना द्यावा. ता. २२ जानेवारी १७५७ ( क्र. १११ ) चा कागद हा पोर्तुगालच्या राजाला लिहिलेले पत्र आहे. त्यात खालील मजकूर आहे :—

" आंगरे आता नानाच्या ( म्हणजे नानासाहेब पेशवे यांच्या ) ताब्यात असल्याने त्यांच्या मालकीचे जे काय होते, त्याच्यावर तो आपला हक्क सांगत आहे. आपणाला माहीत आहेच की, आंगऱ्याच्या मदतीला आम्ही ' ग्रिये ' येथे सैन्य पाठविले होते. या प्रसंगी आंगऱ्याकडून आम्हाला चार लक्ष अश्रफी मिळाल्या, असा नानाचा दावा असून ही रक्कम आम्ही आपणास परत करावी अशी मागणी त्याने आमच्याकडे केली आहे······आंगऱ्याकडून मिळालेली रक्कम चार लक्ष अश्रफीची असली तरी, खजिन्यामध्ये फक्त साडेतीन लक्ष अश्रफी जमा झाल्याचा हिशोब मिळतो. "

प्रस्तुत खंडात लढाईची वर्णने फारशी उपलब्ध नाहीत. मात्र एका लढाईतील जखमा झालेल्यांचे वर्णन आलेले आहे. ते बहारीचे आहे. बत्तीस शिराळयावर झालेल्या एका लढाईत काय काय झाले त्याचे वर्णन क्र. ५७ च्या पत्रात दिले आहे ते असे :—

" इकडील वर्तमान तरी मंगळवारी त्रितीये प्रहरी सिराले गुमट येथे हाला जाहाला. आम्हास निराळी यक बाजू दिली. तेव्हा चालोन घेतले. ह्याती नेऊन मावकुसास लाविला ······· निंबाजी भोसला ठार जाला केरोजी नाईक प्यादा चाकरास गोळी मांडीवर लागली. चिमाजी शामजी यास थानावर गोळी लागली. तिघे तेथेच पडले. फार मार झाला. मुर्दे निघेनात यैसे जाले. तेव्हा लाहाने व खंडनाक याणी जोरावारीने चिमाजीस घेऊन आलो (?). चिमाजीची गोळी पाठीवर कापून काढली. जिवंत आहेत. निंबाजी भोसला व केरोजी नाईक जागाच राहिले. हात्तीच्या माहात्तास हातावर गोळी लगली निशानबारदार यास गालावर भाला लागला व हात्तीस तीन चार भाले लागले व तरवारीच्या जखमा व

गोलीच्या जखमा यैशा दहाबारा जखमा लागल्या. संताजी व महारप्यादे तीघे यासी गोलीच्या जखमा लागल्या. नामाजी नाईक यास घोंडा लागला व सिग्यास तीर लागला. लक्ष्मण रूद्र याच्या मुंडाशास गोली लागली. मुंडाशियाचे टुकडे जाले. वरकड लोकास घोंडा गुंडा बहुत लागला. चार घटका मार सोसून कुसासी लागले सारे लष्करानी तमासा पाहिला. ते काही पत्री लिहिता पुरवत नाही ........ "

पत्रलेखकाने घडल्या गोष्टीचे वर्णन हुबेहुब केलेले आहे. त्यातील कांहीच्या-कडे लक्ष वेधले पाहिजे. आयुधामध्ये बंदुका, भाले, तरवारी महत्वाच्या असल्या तरी दगड, धोंडे, तीर यांचा वापर होत होता. सैन्यात महारप्यादे होते. चिमाजीला पाठीवर लागलेली गोळी कापून काढली आणि चिमाजी जिवंत राहिला असे म्हटले आहे. (रणांगणावर सुद्धा थोडी बहुत शस्त्रक्रिया होत असे, तर) गंमत म्हणजे गोळी लागून मुंडाशाचे तुकडे झाले असेहि सांगितले आहे.

या लढाया करणारे लोक कोण असत ? ते काही कवायत शिकलेले, काय-मच्या नोकरीतले शिपाई नसत. बहुदा ज्या वेळी कारण पडेल, त्यावेळी गोळा केलेली ही माणसे असत असे दिसते. या विषयावर प्रकाश पाडणारा प्रस्तुत खंडात एक अतिशय मजेशीर कागद आला आहे. तो क्र. १३९ चा असून तो एक निवाडा आहे. या निवाड्याची थोडक्यात हकीकत अशी :— जोत्याजी बिन सटवोजी सकपाळ पाटील मौजे बाबवडे प।। मिरज हा स्वतः इतर वीस जणाबरोबर रोजमऱ्याच्या बोलीवर सैनिकी कामासाठी रघोजी बिन रुद्राजी नलवडे पाटील मौजे काला कसबा वाघवे प।। पन्हाळा याजकडे नोकरीस राहिला. या "सैन्याची" भरती आंगऱ्याच्या वतीने लढण्यासाठी विजयदुर्गावर जाण्यासाठी होती आणि आंगरे व सावंत यांच्या झुंजात त्याला भाग घ्यावा लागला. पुढे नालबंदी आणि पाडाव केलेल्या घोड्यां-वरून सकपाळ आणि नलवडे यांच्यात तंटा निर्माण झाला. त्याचा निवाडा गोत-गंगेने ता. ६ ऑगष्ट १७५९ रोजी श्री देव दुधेस्वर क।। दुधगाव प।। हुकेरी येथे केला. निवाड्याची एकंदर पद्धत पाहिल्यास ती अत्यंत चोखंदळ होती असेच म्हणावे लागेल. जिज्ञासूनी सर्व निवाडा वाचून पाहिला पाहिजे. भांडणाचे मूळ नाल-बंदीच्या पैशात आणि लढाईत पाडाव केलेल्या घोड्यात होते. सकपाळाचे म्हणणे की, रोजमरा मिळाला नाही; लोकानी पोटास नाही म्हणून गवगवा केला; त्यामुळे सावकाराचे कर्ज काढावे लागले; लढाईत लोकांची हत्यारे गेली ( ५ फिरगे, ५ बंदुखा, २ ढाला, १ सिंग एकूण १३ नग ) ती लोकाना द्यावी लागली; बुरजा-वर तरवार मारली तेव्हा लोकास जखमा झाल्या, खराबी बहुत झाली; त्याची "बकसिसी" मिळाली पाहिजे; बुरजात घोडा पाडाव केला तो आंगऱ्याकडून बक्षीस मिळविला तो काही नलवडे याला घेता येणार नाही; लढाईत मुलगा

सावंतानी धरून नेला. तो परत मिळविण्यास खर्च आला; इत्यादी. रघोजी नलवडे याचे म्हणणे की, तूर्त एक महिन्याची नालबंदी संकपाळाच्या पदरात घातली; आंगरे व सावंसात 'झुंज' झाले, त्यावेळी संकपाळानी एका घोडीचा पाडाव केला. त्या घोडी करता आंगऱ्यानी आपणास अटक केली. हे ऐकोन संकपाळ "घोडी सुद्धा पळोन गेला." ती घोडी मिळाली पाहिजे, इत्यादी. पंचाय़तीने कागदपत्र साक्षीदार सर्व तपासून अतिशय काटेकोर निर्णय दिला. रोजमऱ्याचा हिशोब करून संकपाळाला १८३ रुपये द्यावे लागणार असे ठरविले. पण घोडा नलवडे याचा ठरवला आणि त्याची किंमत रु. २०० धरली. त्यामुळे या एकंदर व्यवहारात संकपाळाने नलवडे याला रु. १७ परत केले पाहिजेत असे ठरले. पैशाचा आणि घोड्याचा प्रश्न बाजूस सारला तरी सैन्यभरती कशी होत होती, करार मदार कसे होत, त्यातून अडचणी कोणकोणत्या येत, त्यांचा न्यायनिवाडा कसकसा होत असे, इत्यादी गोष्टी या कागदावरून दिसून येतात. अतिशय बारकाईने अभ्यास करण्या-सारखा हा कागद आहे.

जसे सैनिकांचे तंटे पंचायतीकडे येत असत तसे घरचे तंटेहि येत असे दिसते. क्र. ११७ च्या कागदात सरनाईकीच्या भावाभावातील वतनाचा कज्या सोडविल्याची हकीकत दिलेली आहे. "पंचाइताने राजनामे करीने लेहून घेऊन साक्ष मोज पास कोट म॥रच्या सड्या नेल्या आणि मनसुबीची झाड पिछाडी करून सरनाईक याची भावाबंदाची समजाविसी केली." असा मजकूर या निवाडपत्रात आहे.

प्रस्तुत सारख्या ग्रंथात वतनासंबंधीचे बरेच कागद राहाणार: त्यांच्यापैकी कांहींचा उल्लेख उद्बोधक होईल असे वाटते. शिवाजी महाराजानी सर्व सामान्य वतने अमानत केली ही गोष्ट स्पष्ट असता कांही लोकाचे म्हणणे वेगळे दिसते. परंतु या खंडात क्र. ८९ चा जो कागद प्रसिद्ध होत आहे, त्यात शिवाजी महाराजानी या बाबत काय केले ते अगदी स्पष्टपणे सांगीतले आहे. ही एक सनद आहे आणि तिचा आशय गुळवणी ज्योतिशी यांचे इनाम चालविण्याबाबतचा आहे. गुळवणी महाशय म्हणतात: "आपणास इदलशाही कारकीर्दीस गावगना जमीन ठिकाणे इनाम चालत होती. तेणेकरून आपला योगक्षेम चालत होता. त्यावरी हा देश राजश्री थोरले कैलासवासी स्वामीस (म्हणजे शककर्ते शिवाजी महाराजांस) कबज जाला. त्याणी वतनदाराच्या इनामती दूर करून वतनदार यास जे पावणे ते दिवाणातून पावावे याची मोईन करून दिली······त्याप्रमाणे तांदुळ पावत होते······ या उपर तांब्र या प्रांते आला. देशात धामधम जाली. देश उद्वस जाला. याकरिता धर्मादायातून द्यावयाचे केले होते ते चालेनासे जाले······"

निर्वंशीक म्हणून मानले गेलेले वतन कोणास दिल्यास पूर्वीच्या वतनदाराचा वंशज कोणी पुढे आला तर, जो खर्च झाला असेल तो "व्याजासुद्धा" आदा करून वतन परत मिळविण्याची पद्धत होती असे दिसते. शिवाजी बिन कालोजी जाधव यास पिसवी गावच्या चौगुलकीचे वतन "वतनास कोणी नाही" म्हणून दिले. परंतु हे वतन करून देणाऱ्या सनदेत स्पष्ट म्हटले आहे की, "पुढे मागे या वतनास कोणी निर्माण झाला तर मौजे मजकुरच्या वतनदाराच्या साक्षीने मनसुबीमुळे खरा जाहालेया हुजुर शेरणी देईल आणि तुझ्या पैकियाचा व व्याजसुद्धा भाग वारून देईल अणी वतन अनभविल" (क्र. ८).

परचक्र आले असता पळून जाणाऱ्यांची वतने का चालवावीत हे मात्र कळत नाही. क्र. ३३ची सनद खोताना दिलेले इनामपत्र आहे: खोत म्हणतात "आपले आजे महादाजी कृष्ण हे किले रायगडी थोरले महाराज राजश्री——कैलासवासी सिवाजी महाराज सिंव्हासनारूढ जाहाले ते समई किले मजकुरी त्यास दप्तरदारीचा धंदा होता. त्याउपरी हुजूर सेवा करीत असता पुढे महाराज राजश्री——कैलासवासी संभाजीराजे माहाराज याचे कारकीर्दीस संगमेश्वरचे मुकामी मौजे मजकूर हा गाव इनाम करून देवून सनदा देविल्या. नंतर गावचा उपभोग करावा त्यास मोगलाई-होऊन आपले पिते कृष्णाजी महादेव हे देशांतरास पळूण प्र।। सुभा दाभोळ येथे गले······" असे असूनही त्यांच्या वारसाना कोल्हापूरच्या संभाजीनी सनद करून दिली, हे योग्य वाटत नाही.

वतनाची खरेदी विक्री होत होती (क्र. १०७). उदाजी चव्हाणानी १०,००० रुपये, घोडी २ (किंमत रुपये दोन हजार), मोत्याच्या माळा दोन उंच वगैरे जवाहीर देऊन सत्तावीस गावे विकत घेतली. (क्र. ९४).

कोल्हापूरच्या जिजाबाईनी एका खोतीच्या उत्पन्नाची सनद दिली (क्र. १२८). खोतीची गरज काय हे सांगताना सनदेत म्हटले आहे की, "खोती वतन करून दिल्ह्याने वाडीत जाऊन रयत मेळवून घरे खोपटे बांधोन वसाहत करून जमीनीची जरा बाजरा लावणी करील......" याचप्रमाणे "नवी पेठ करून बाजार" भर-विल्याबद्दल संभाजीनी महाजनकीचे वतन करून दिले आहे (क्र. १३५).

क्र. १५१ चा कागद वतनासंबंधीचा असला तरी विलक्षण आहे. चंदनगोंडा पटेल याच्या विनंती वरून त्याला आबदागिरी दिली गेली. पण आबदागिरी चाल-वायला भोई लागतात. चंदनगोंडा पटेल याला आबदागिरीसाठी भोई ठेवता यावेत म्हणून त्याला जमीनहि इनाम दिली !

वतनाबाबत बोलताना हे सांगितले पाहिजे की, खालच्या जातीतील लोकानाः सुद्धा मानाची वतने करून दिली जात. एका धनगराला " गाउडकीचे " वतन दिलेल्याचा उल्लेख आहे ( क्र. ११२ ).

वतनदारांची जबाबदारी कोणती असे याची आठवण क्र. १६२ च्या कागदा-वरून होते. अनाजी साठम याला राघोबाने लिहिलेले हे पत्र आहे. मोहिमेवर अद्यापी का आला नाही असे म्हणत राघोबा लिहितो : " खासा स्वारी मोगलावर दरमजल चालली······ असे असोन तुम्ही घरीच राहिला, येत नाही······· तीन हजार रुपयाचा गाव तुम्हाकडे आहे. चाकरीच्या समयी हुजुर येत नाही हे उत्तम की काय ? "

काही सामाजिक गोष्टींचाहि उल्लेख या कागदपत्रातून मिळतो. जैनाची वरात बाजारातून मिरवत जाऊ शकते किवा नाही असा प्रश्न निर्माण झाला होता, असे दिसते. आणि त्याबाबत खुद्द ताराबाईनीच चवकशी केलेली आहे ( क्र. ८० ). परंतु निवाडा काय झाला याचा उल्लेख नाही. गावात चोरी झाली की, काही लोकांवरच वहीम येई असे दिसते. बाळोजी करांडा खिदमतगार याच्या घरात चोरी झाली आणि त्याच्या बायकोच्या अंगावरील दागिने आणि काही वस्तु चोरानी नेल्या. हे कळल्यावर पंतप्रधानानी संबंधीत व्यक्तीना हुकुम सोडला की " आवती भवतीच्या गावातील बेरड व मांग जमा करून घरी चोरी जाली आहे त्याचे ठिकाण लावून देणे " ( क्र. ११० ).

त्याकाळी वाहातूक करणे सोपे नव्हते असे दिसते. क्र. ५५ च्या कागदात म्हटले आहे की, " माले, काठया, पालखीची दांडी येथे नीट करून ठेविले आहे. भोयांबरोबर पाठवावी. परंतु मार्गाचा निर्गम न पडे या करिता ठेविली. मागाहून मार्गाचे सुधामत पाहोन दांडी व पाळखींची तबकडी रवाना करतो. " वास्तविक पालखीची दांडी वगैरे कांही इतक्या मोलाच्या अथवा जोखमीच्या वस्तु नव्हेत की त्या पाठविण्यासाठी रस्त्याची अडचण यावी. पण अशा वस्तुसुद्धा पाठविण्यासारखी अनेकदा स्थिति नव्हती असे दिसते.

ताराबाईनी स्वतः निवाडा दिलेला एक घरगुती तंटा क्र. ७० मध्ये वर्णिलेला आहे, तो असा : " श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब ( म्हणजे ताराबाई ) याणी सेख सुलतान यासी आज्ञा केली यैसीजे. फती हुजूरची बटीक इणे तुमचे . सोय-रीकीची मध्यस्ती केली. त्याबद्दल तुम्हास देणे लागले. ते देणे पेसजी तुम्ही वारून फारकती घेतली. यैसें असोन फती म।। तुम्हावर तुफाने घेती. हे हकीकत हुजूर मनास आणिली साक्षी रूजु मोझे फारकती पाहाता रूबरू हकीकत मनास आणिता

तुम्हाकडे काही कझ्या राहिला नाही. अेकून हिसेबी तुम्हाकडून फती मजकूर इजला रु. ८ आठ देविले आणि तुम्हासी व फतीसी अर्थाअर्थी समध नाही येसे केले आणि हे आज्ञापत्र तुम्हास दिल्हे असे. फिरोन तुम्हास कजीया करील तर पारपत्य केले जाईल. तुम्ही आपल्या घरी सुखरूप राहणे. तिजपासी कागदपत्र आसीले तरी रद्द असेत."

कोल्हापूरच्या जिजाबाईचे काही कागदपत्र या खंडात आले आहेत. त्या पैकी क्र. १२१ हा अत्यंत महत्वाचा आहे. कारण, त्यावर जिजाबाईचा शिक्का आहे. तो शिक्का असा :—

शंभु राजस्य भार्यायां जिजादेव्यां धरातले ।
बालेंदुरिव वर्धिष्णु मुद्रा भद्रा विराजते ।।

"बालेंदुरिव वर्धिष्णु" अशी महत्वाकांक्षी मुद्रा जिजाबाईनी संभाजी जिवंत असतानाच वापरावयास सुरवात केली होती. त्या सनदापत्रे देत होत्या. (पहा क्र. १२१, १५४). इतरही राज्यकारभाराच्या गोष्टी पहात होत्या. ताराबाई सारखीच जिजाबाईही एक कर्तबगार राणी होऊन गेली.

शाहूच्या मृत्युनंतर सुद्धा "शाहू पट्टी" म्हणून बरीच रक्कम गोळा केली जात होती असे दिसते (क्र. ७१, ७२).

एकनाथ स्वामींची कन्या गंगाबाई, हिचे पुत्र मुक्तेश्वर गोसावी यांची समाधी तेरवाड प।। रायबाग येथे आहे. त्यांचे पणतु मुक्तेश्वर गोसावी बिन आकाणा गोसावी याना इनाम होते. त्यांचा वृद्धापकाल झाला म्हणून त्यानी आपली कन्या बकुबाई हिचा पुत्र निरंजन यांच्या नावे इनाम करून मागीतले. कोल्हापूरच्या संभाजीनी ते करून दिले (क्र. १३७).

ताराबाई ब्याऐंशी वर्षाच्या म्हातारी होऊन वारल्या अशी शकावलीत नोंद आहे. शेवटपर्यंत त्यांचा कार्यभाग चाललेला आणि शेवटपर्यंत सर्व गोष्टीकडे त्यांचे लक्ष होते, असे या खंडात प्रसिद्ध होत असलेल्या काही कागदांवरून दिसते. आग्नोजी साळोख्याला आसरा दिल्याबद्दल नारायण व्यंकटेश घोरपडे याना त्या ताकीद करतात् (क्र. ७५), स्वरूपजी महाडीक याचेकडे सरकारचे कर्ज आहे म्हणून त्याला त्याच्या गावचा वसूल देऊ नका, असे गावच्या मोकदमाला बजावतात (क्र. ७६); "जकातीचा आमल सुधामतप्रमाणे कमाविसदार याजकडे सुरळीत देणे" अशी ताकीद देतात (क्र. ७८).

केळीची बाग करण्यासाठी " केळीचे खुट २००० दोन हजार सोनगावच्या बागेत पोचते करणे " असे नागठाणे ता।। उंबरजच्या हवालदाराला कळवितात ( क्र. ८२ ). सचिवांच्याकडे हुजुरच्या हत्तीची व्यवस्था होती. सचिवांच्या अडचणीमुळे हत्तीची व्यवस्था नीट होईना असे कळल्यावर, " तुम्हास सर्व गोष्टींची वोढी पडली, हे साहेबास विदित आहे. थोडकेच दिवसा वोढही दूर होईल. चितात दुसरा आर्थ न आणिता हातीचा चरिता व लोकाचा रोजमरा नेमणुकाप्रमाणे चालो देणे. फिरोन बोभाटा येऊ न देणे. " अशी सचिवास ताकीद करतात ( क्र. ८३ ). सरकारी कुरणात गडबड करणाऱ्या गावच्या मोकदमाना " खिलाराकडील कुरण सुदामत प्रमाणे खिलाराकडे चालवणे " असे बजावतात ( क्र. ८४ ). ब्याऐंशी वर्षांच्या ताराबाई " राजकीय वर्तमान हिंदुस्थानचे व मोगलाकडील वगैरे विचारीत असतात " असे जानेवारी १७६१ च्या पत्रांत म्हटलेले आहे ( क्र. १५६ ). मृत्युपूर्वी सातच दिवस ताराबाईनी ता. ३ डिसेंबर १७६१ रोजी एक सनद करून दिली ( क्र. १६३ ). ताराबाई ही एक लोकोत्तर व्यक्ति होती, यात शंका नाही. त्यांचा स्वतंत्र बाणा शेवटपर्यंत कायम राहिला.

जुन्या कागदपत्रातून आढळणारे काही वाक्प्रयोग लक्षात येणारे असतात. प्रस्तुत खंडातीलहि काही वाक्प्रयोग लक्षात ठेवण्या जोगे आहेत. " आम्ही मराठे पोटचे देऊ, परंतु पाटचे देणार नाही " ( क्र. २५ ); " रोज उठोन पोटाचा गगंशा " ( क्र. १४ ); " नवरा येईल तो मुहुर्त " ( क्र. ३४ ); " तूर्त मौज मुद्रेने कौतुक पहाणे " ( क्र. ६० ); " पोटापानिया मुळे बेदिल " ( क्र. ६९ ); " तुमचे एकनिष्ठतेस योग्य ते करणे " ( क्र. ८१ ); " मुखमुद्रेने संतोष दाखवीत जाणे " ( क्र. ६० ); " ज्याणी विष दिले त्याचे हस्ते उतारा घेणे " ( क्र. ८५ ); " ज्यात कीर्ती संपादन होय ते गोष्ट करणे " ( क्र. १२४ ); वंशानुरूप कर्तृत्व घडोन न आले " ( क्र. १२५ ); " कोल्हयानी सिव्हाचे घरास यावे. होणार गोष्टीस उपाये काय ? " ( क्र. १२ ).

मागच्या दोन खंडाप्रमाणे प्रस्तुत खंडातून पोर्तुगीज साधने प्रकाशित होत आहेत. ही अस्सल साधने गोवा पुराभिलेख संग्राहालयातून मिळाली. या कामी आम्हाला गोवा पुराभिलेख संग्रहालयाचे विद्वान संचालक डॉ. टी. व्ही. गुणे व त्यांचे सहकारी श्री. गजाननराव घांटकर यानी जे सहकार्य दिले, त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत. त्याचप्रमाणे मुंबई विद्यापीठाच्या पणजी, गोवा येथील पदव्युतर विभागाचे संचालक प्रा. डी. बी. वाघ व या विभागातील पोर्तुगीज व फ्रेंच डिपार्टमेंटचे प्रमुख प्रा. कंटक त्याचप्रमाणे तेथील ग्रंथालयाचे प्रमुख प्रा. खांडेकर व त्यांचे सहकारी श्री. घुर्ये या सर्वांचेही आम्ही आभारी आहोत.

विद्यापीठाच्या संशोधन विभागातील श्री. स. शं. देसाई आणि श्री. मा. दे. खणे यानी खंडाच्या मुद्रणाच्या कामी खूपच परिश्रम घेतले आणि सूची तयार केली. त्याबद्दल त्याना धन्यवाद. श्रीसिद्धेश्वर प्रि. प्रेस, कोल्हापूरचे संचालक श्री. आ. बा. ठकार आणि त्यांचे बंधु यांचे विद्यापीठाच्या ग्रंथ प्रकाशनाच्या कामी प्रथमपासून बहुमोल सहकार्य लाभत आले आहे, त्यानाही धन्यवाद.

शिवाजी विद्यापीठ
तारीख, १५ ऑगस्ट १९७२

**आप्पासाहेब पवार**

# PREFACE

This is the third volume in the series of Tarabai Papers that are being published by the Shivaji University. Most of the papers included in this Volume come from the the Peshwa Daftar, Alienation Office, Poona and the Records of the former Kolhapur State. Only a few papers are reprinted from some earlier publications. Among the documents published here, there are a few which relate to Ramraja's accession to the throne after Shahu's death in December 1749, and the so-called struggle for power between Tarabai and Peshwa Balaji Bajirao alias Nanasahib. The differences that arose between these two personages are specifically referred to in documents No. 16, 28, 81 and 123. Although the Peshwa was able to patch up in the end his differences with the Queen-Grandmother, he does not appear to have emerged from the contest absolutely unscathed. The Marathi introduction to this volume shows how Tarabai maintained a superior tone in her dealings with the Peshwa. She exercised her authority ( whatever that may have been ) right to the end of her life. She died at the ripe old age of eightytwo and we find in this volume a grant issued by her on December 3, 1761, that is, only a week before her death ( 163 ).

Letter No. 57 gives graphic details of an action fought between to armies and we learn that in addition to swords, spears and guns, bows and arrows as well as stones were used by the fighters. Letter No. 139 is of unusual interest. It shows how soldiers were recruited by private parties, how contracts were entered into by the men that were taken into service, and how disputes were resolved when one or the other party was charged with violation of the terms of the contract. Letter No. 89 mentions categorically that whenever Shivaji, the founder of the Maratha Kingdom

conquerred a territory, he discontinued the *Watans* (grants) existing in that area. Some scholars are taking a contrary view and the point needs to be studied in greater detail. Papers at Serial Nos. 99, 100 and 101 relate to the treaty that Tulaji Angre made with the Portuguese Viceroy of Goa, when he was attacked by the joint forces of the Peshwa and the English. No. 101 gives the details of the terms of the treaty.

In the first two volumes of *Tarabai Papers* 630 papers were published. In the present valume 163 papers are brought out. It is hoped that these 793 papers published in these three volumes would be of some interest and use to the student of Maratha history.

**A. G. Pawar**

# SUMMARY

1 : 8-5-1750

Nanasaheb Peshwa conveyed to his Sardars the news of the death of king Shahu. One of his Sardars, Amritrao Shankar Dinkarrao in his reply while expressing his sorrow at the death of the king and praising his virtues, feels satisfied at the concentration of power in the hands of Nanasaheb. He observes that his father Bajirao had dreamt of this position.

2 : 19-5-1750

The writer of the letter says that according to Tarabai she had agreed to deliver the fort (Singhgad) to the Peshwa on condition that he would pay all her establishment expenditure.

3 : 4-1-1751

As Damaji Gaikwad was ravaging the province of Khandesh, the Peshwa had sent his army in pursuit of him. Ramchandra Mahadev, one of his sardars writes to Haripant Nevalkar, another Sardar of the Peshwa, asking him to write threatening letters to Damaji Gaikwad, so that he may stop creating trouble in the area. He requests Haripant to proceed to Khandesh without delay.

4 : 14-1-1751

Mahipatrao Kavde and Hari Damodar. two Sardars of the Peshawa, were on the pursuit of Damaji Gaikwad in

Khandesh. Ramchandra Mahadev in his letter to the Peshwa says that Damaji is avoiding engagements with them.

5 : 15-1-1751

Manaji Nikam, informs Nanasaheb Peshwa of the havoc caused by the Mogal subhedar of Barhanpur in Jainabad Paragana. Narsinpant the Maratha kamavisdar of the place was captured and kept in captivity. He adds that without reinforcements the place cannot be defended.

6 : 19-1-1751

This letter is written by Manaji Nikam to Sadashivrao Bhau. He says that he along with Mahipatrao Kavde, Hari Damodar and Ramchandra Mahadev was on the trail of Damaji Gaikwad, but the latter went away from Thalner. The writer of the letter urges that without strong reinforcements, the place cannot be saved.

7 : 20-1-1751

A news letter from Khandesh written by Ramchandra Mahadeo to Nanasaheb Peshwa. He reviews the activities of Damaji Gaikwad and adds that Damaji was moving swiftly from one place to another. Though Mahipatrao Kavade, Hari Damodar and the writer himself were on his track, they were unable to predict his future movements. Ramchandra Mahadev also describes the plight of the affected villages and the difficulties of revenue collections.

8 : 22-1-1751

Sambhaji II granted the *Chougulaki Watan* of the village Pishavi to Shivaji Jadhav Patil, on condition that if an heir of the earlier *watandar* claimed it in future, the same

should be transferred to him, if all the expences incured by Jadhav were paid to him with interest.

9 : 3-2-1751

The letter refers to the outbreak of trouble at Satara. The writer says that Trimbakrao Mama was not there and that Govindrao Moreshwar had asked the writer to ask for money, ammunition and reinforcements.

10 : 23-2-1751

In this paper Harbaji Ram says that he has received a letter from Nanasaheb, giving some account of the engagement with Damaji Gaikwad, in which four or five sardars and twelve hundred men will killed. According to him, Azam Kuli Khan had received an imperial farman and a letter from Nawab Gaziuddin Khan.

11 : 5-3-1751

This is a letter of Trimbak Vishwanath to Nanasaheb Peshwa and Sadashivrao Bhau. He gives an account of the skirmishes that took place between the Peshwa's army and that of Damji Gaikwad. The letter is torn in several places and cannot be clearly deciphered.

12 : 8-3-1751

Trimbak Vishwanath Pethe informs Nanasaheb Peshwa and Sadashivrao Bhau that Damaji Gaikwad has made a common cause with Senapati Dabhade and was marching towards Satara and Poona with an army of fifteen thousand men. He compares the march of Gaikwad with that of a fox towards the den of the lion. Nevertheless he advises the Peshwa to remove all the jewellary and valuables to Sinhagad.

13 :

26-3-1751

This is a letter written by Shesho Narayan from Kolhapur to Sadashivrao Bhau. He says that the queen Jijabai is entirely in favour of the Peshwa and would carry out everything that she has promised in the personal interview.

14 :

3-4-1751

In this letter Kanhoji Mohite requests Tarabai to provide for the expenses of the men under him. He assures her that both the Pratinidhi and Yamaji Shivadev are loyal to her.

15 :

29-4-1751

Trimbak Vishwanath informs Nanasaheb Peshwa and Sadashivrao Bhau that he has sent to them five maunds of fine rice. Two bullocks loaded with the rice were alreedy on the way. He also wants to know what transpired in the meeting of the Peshwa and Gaikwad.

16 :

3-5-1751

This is a reply of Tarabai to Nanasaheb Peshwa's letter. Nanasaheb had said in his letter that whatever he had done during the period of a year and a half as Peshwa was as ordered by Tarabai herself. Tarabai in her reply taunts him. "Yes indeed she said, you are a loyal servant, working under our orders. The proof of this is that you have at present besieged us with an army! Better raise the seige and remove yourself to your own place."

17 :

10-5-1751

Nanasaheb Peshwa writes to Yamaji Rudra, asking him to help Udaji Chavan Himat Bahadur with men and material.

18 : 11-5-1751

Nanasaheb Peshwa and Sadashivrao Bhau had ordered Trimbak Vishwanath at Satara, to confine Damaji Gaikwad in the home of Malharrao Holkar. Trimbak Vishwanath, in reply informs them that Damaji Gaikwad was kept in Avaji Kavde's home with a heavy guard; he adds that Senapati Dabhade would be kept in Naik's house. He assures the Peshwa that he has firm grip on the affairs of Khandesh, too.

19 : 21-6-1751

Visaji Narayan, the Peshwa's envoy at the court of Kolhapur informs the Peshwa that, as queen Jijabai's visit to Poona was postponed under his instructions, she was doubting the Peshwa's sincerity. The writer suggests that a meeting between the Peshwa and the queen should not be delayed long. The misunderstanding that had arisen may be cleared away.

20 : 30-6-1751

Trimbak Sadashiv Purandare seeks clarification from Nanasaheb Peshwa and Sadashivrao Bhau about the payment of money for the army of Chimnaji Bapuji, a sardar of the Peshwa. He adds that he had already paid rupees ten thousand to Chimnaji Bapuji.

21 : 2-7-1751

This is a news-letter written by one Bhaskar Rao, probably a Portuguese agent in Poona, to the secretary to the Portuguese Government at Goa. Among other things he mentions that the territory "on this side" of the Krishna river was made over to Sadashivrao Bhau by King Sambhaji; that Nanasaheb Peshwa and Sadashivrao Bhau went on a military expedition in Aurangabad, Barhanpur, Bhaganagar etc. to establish order and make a "decent collection of tributes" from there, as both Nizam-ul-mulk Asafja and Nasarjang

had passed away; that tension between the Peshwa and Tarabai grew worse with the result that the Peshwa had to return hurridly from his sourthern campaign; that a battle was fought between the followers of Tarabai and the Peshwa, in which the former were defeated and Dabhade and Damaji Gaikwad taken prisoner and kept in the fort of Purandar. The news writer adds that the Peshwa made about two crore of rupees in the southern campaign; that he met Murarrao Ghorpade, and that after the Dasara holidays he would see King Sambhaji and go on an expendition in the Sonda area.

22 : 9-7-1751

Trimbak Sadashiv Purandare apprises the Peshwa and Sadashivrao Bhau of the complaint made by Ramaraja against them. Ramaraja was telling people that the Peshwa had robbed him of his horses, elephants, jewellery and even household utensils. Since this had become the talk of the town Trimbak Sadashiv advised the Peshwa to return to Ramaraja whatever may have been taken from him.

23 : 11-7-1751

This is a list of the persons who participated as witnesses in the trial of Ahirrao, Ramaraja's imposter. Ahirrao was proclaimed as an imposter and was banished beyond the river Bhima. Among the dignitaries were the Panditrao ( the Minister for justice ), the representatives of Pant-Amatya, Pant Pratinidhi and the Peshwa. Among other names are those of the Court Poet Govindrao, Nawab Inayat Ali, and the head-peons Kusalsing and Sawaikhan.

24 : 11-7-1751

The writer of the letter, probably Trimbak Sadashiv Purandare, informs the Peshwa that the army leaders at Satara are planning a surprise attack on the palace; that

Tarabai, Babaji Jadhav and Ramaraja are holding consultations "day and night" and that according to the prevailing rumour, Ramaraja is to be released after Babaji Jadhav meets the army leaders and discusses the matter with Tarabai.

25 : 15-10 1751

The fort of Nandagiri had been besieged by the Peshwa's army. Negotiations were goinng on between the besieged and the besiegers about the surrender of the fort. The writer of this letter informs Peshwa that due to the instigations of Mudhoji Naik Nimbalkar, the garrison of the fort is defying the besiegers. Mudhoji is reported to have said : "We Marathas will sacrifice our children defending a cause to which we have pledged our support. But we will not betray those whom we support."

26 : 1-11-1751

Tarabai orders the Peshwa to compel Narayanrao Ghorpade of Ichalkaranji not to interfere with the Deshmukhi *watan* of Miraj, as the same belonged to the Brahmins and Jains, who were its original proprietors. Narayanrao Ghorpade was levying taxes by force of arms. The proprietors of the Deshmukhi *Watan* sought the assistance of Tarabai and that is why she intervened.

27 : 1751

The writer of the letter from Satara informs the Peshwa that the aides of Tarabai and Ramaraja had been to him with a message from their masters. In reply, he told them that Tarabai and Ramaraja should come down from the fort and stay in the palace. If they do this the Peshwa would come from Poona the next day to visit them.

28 : A. D. 1751

This is a very important document giving details of the terms which Tarabai proposed and the Peshwa accepted. The paper gives some idea of the causes of the domestic war between the indomitable Queen Grand mother and the ambitious Peshwa. The document is worth studing in great details. One important term proposed by Tarabai and the reply given by Nanasaheb were as follows :-

Tarabai's proposal :-

" In government, whatever duties were assigned to you during the reign of Shahu would alone be assigned to you and whatever duties were executed by the royal Court, would be carried out by the Court in future. You should not take interest in the latter."

Peshwa's reply :-

" When King Shahu died, your Majesty showed me more fovours than to other servants and gave me all the powers. You also pledged your word. Whatever you now wish, I accept. I shall not insist "

29 : A. D. 1751 ?

In this letter Udaji Chavan informs the Peshwa that the Nizam was seeking his alliance, but he is not thinking in that direction. He desires to be friendly with the Peshwa. Udaji Chavan highly eulogizes the virtues and achievent of the Peshwa.

30 : A. D. 1751 ?

Mahadaji Gadadhar writes to Nanasahib Peshwa requesting him to settle his affairs. He says that the grants he had recieved from King Shahu are not yieding any benefit as the district officers have disrupted the arrangements. As a result, Mahadaji Gadadhar was heavily in debts.

31 : 6-2-1752

Ranoji Ghorpade Senapati's grant of the village Arjuni to mother Yesubai.

32 : 21-2-1752

Rambhaji Khandoji Chavan went to holy places, with the remains of Rajasbai the mother of king Sambhaji of Kolhapur. The king, therefore, granted him five bighas of land for this service

33 : 26-5-1752

Sambhaji II renews the grant of village Chorwan to Dhondo Krishna and his brothers. Mahadaji Krishna, the grand father of the petitioners was appointed State Record Keeper at the time of the Great Shivaji's Coronation. Sambhaji granted him the village Chorwan, but due to the Mogal invasion of the area, the grant was not actually enjoyed.

34 : 28-5-1752

Bhikaji Shirke, the Havaldar of fort Varugad appears to have sought Tarabai's assistance in celebrating a marriage. Tarabai tells him that thc marriage season was over. "When the bridegroom was free", she adds, "the marriage was celebrated."

35 : 19-6-1752

Tarabai orders the village officers of Nagav to pay the revenue of the place to Bhagwantrao Amatya,, as the village belonged to her and its administration was handed to Bhagwantrao Amatya.

36 : 27-6-1752

Tarabai had reprimanded Shivaji Salokhe for his punitive action in Atapadi, district Manadesh. In reply he says that the people of Manadesh had not paid their dues for two years past. That is why he was compelled to take action against them. He adds that the sheep that were carried away by his men could not be traced. But he gave 150 sheep from his own flock to the shepherds that had lost them, just to obey Tarabai's orders in that respect.

37 : 1-7-1752

Sambhaji II renews the grant of the *Potadari watan* of Panhala to Abaji and Nagoji Sonar. Due to Political troubles, the watan was not actually held. That is why it was regranted.

38 : 2-7-1752

There was a litigation regarding priesthood rights between Ramaji Devale and Balaji Bhagawant Manchbahat on one hand and Balakrishna Bhat and Bapubhat Walvekar on the other. Sambhaji II referred the litigation to the Panchayat for award. The Panchayat decided in favour of Manchabhat. Sabhaji II accepted the decision and issued the necessary orders.

39 : 9-7-1752

Sambhaji II grants the '*Jyotishi Watan*' of the Village Nannde to Madobhat Gulawani. This watan formerly belonged to one Rambhat Pait. As he died without male issue and as his widow had no right to adopt the son of her daughter, the watan was laying vacant. The King gave the *watan* to

Madobhat but insisted that if the widow returned to her place, she should be given maintenance grant out of the watan so long as she lived.

40 : 18-7-1752

Laxmibai Mohite in a letter to Tarabai relates how after she took leave of her and started on her journey her party was attacked by Ratnakar Vitthal assisted by two hundred foot and two hundred horsemen. Fortunately Kanhoji Mohite came down from the fort to her rescue and repelled the attack. 50 men of the enemy were killed and another 100 drowned.

41 : 26-7-1752

The *Magdumaki Watan* of the vlllage Borivade was lay vacant. Sambhaji II granted it to Rakhamaji, a peasant from the same village at his request.

42 : 11-8-1752

The writer of the letter reports to Tarabai, that due to the harassment of Sultanji Ghatage in the villages of Nimbalak, Chikhalgotan, Borgaon and Morale, the inhabitants of these places had fled. He says that he had enlisted some armed men for the defence of the villages, but he has no money to pay them. He requests Tarabai to provide him with funds. He adds that Udaji Chavan, Haripant and Thorat are planning to start hostilities against him.

43 : 22-8-1752

Tarabai had ordered Nanasaheb Peshwa to restore the forfeited watan of Amritrao Khopade. In reply Nanasaheb urges that Tarabai should order Pant Sachiv to settle the

dispute between Amritrao and Balaji Khopade. He adds that it would be proper to take action only after the settlement of the dispute was effected.

44 : 23-8-1752 ?

Nanasaheb Peshwa in a letter to Tarabai from Pedgaon, reports that he had a meeting with Malharao, Janoji, Jashwant Nimbalker and Nasirjang; that Gaziuddin Khan had crossed the Narmada river; and that Malharao Holkar and Jayappa Shinde had also crossed the river. He requests Tarabai to write to all the sardars asking them to join the Peshwa ( and help him ).

45 : 1-9-1752

Tarabai had asked Gopalrao Pandhare Sharif-anmulook, to come to the Court. In reply he requests Tarabai to issue in his favour royal order regarding the 52 *mahals* or give him one lakh *hons* with which he would equip himself with an army and come to the Court.

46 : 20-9-1752

Subhanji Suryavanshi informs Tarabai that, the couriers that were sent to Kolhapur with her letters were not allowed to enter the palace for ten-twelve days Atlast when the news of the defeat of Sidoji Thorat at Ashta came, the couriers were given the replies with which they have returned.

47 : 28-9-1752

Burhanji Mohite relates to Tarabai the mischievous activities of Yeshvantrao Mohite in Khatao region. Among other things he was forceibly collecting taxes and seizing horses belonging to the Patils of the villages if the levy was not paid.

48 : 28-9-1752

Shivaji Salokhe the agent of Tarabai describes how lawlessness had erupted in the province after the death of King Shahu. He says that he managed somehow to maintain control with the help of an army. But the situation is going out of hands as he has no money to pay the men. The fort and the villages belong to Tarabai. She should, therefore, provide for the expenses.

49 : 30-10-1752

The writer of this letter most probably Shivaji Salokhe (see ante No. 48) describes in detail, the skirmish which took place between him and Kanhoji Mohite. He says that Kanhoji Mohite threw the gauntlet and he had to accept it. He requests Tarabai to provide for the families of the men that were killed in the action.

50 : 30-10-1752

There was a piece of land which was originally brought by a Brahmin family. Royal orders relating to the land were issued by successive kings. Tulaji Angre created disturbances in respect of the land. Tarabai issued, therefore, an order confirming the original start.

51 : 22-11-1752

Parwatibai Bhosale reports to Tarabai about the invasion by the army of Kolhapur in Sirala district. The Kolhapur army even burnt a village. It was accompanied by Ghatage of Kagal, Amuritrao Pratinidhi, Chikodikar and Ranoji Ghorpade Senapati. Parwatibai expects more troubles from the invaders and seeks advice from Tarabai.

52 : 25-11-1752

Tarabai orders Bhivaji Kasurde to mediate in the dispute between Govind Shroff and Malhar Jagannath in respect of the mare which belonged to the former and was hired by the latter, but had died. Tarabai says that if the mediation failed, the case should be sent to her.

53 : 5-12-1752

Tarabai had blamed Babaji Thorat for creating trouble with Kolhapur, accusing him that it was he who had violated the boudaries. Babaji Thorat in reply denies these charges and says that it was the army of Kolhapur that first crossed the Warna boundary. He further adds that the Kolhapur army is massing for another attack.

54 : 5-12-1752

Balaji Bajirao Peshwa asks for news from Dinakar Mahadeo about the activities of Babaji Naik and Pratinidhi. The Peshwa informs him, that the Nizam had made peace with him.

55 : 25-12 1752.

A letter from Krishnarao Bhagwant Amatya to his father Bhagwantrao Amatya mentions among other things that a peace treaty was concluded between the Peshwa and the Nizam, that Raghunathrao was being sent to the South with an army, and that the Peshwa was proceeding to Poona for the marriage of his son. Many sundry things of interest are also referred to in this letter.

56 : 1752 A. D.

Tarabai congratulates the Peshwa upon his victory over the armies of Salabat Jung. "You have brought" she

says, " victory to the King.... your forefathers have served this kingdom.... you should keep in mind that if you do things honestly and loyally you will be even more victorious . . . you must see that the administration is carried on according to rules and the principles of justice ".

57 : 1752 A. D.

Kedarji Kesarkar in a letter to Malhar Khanderao Chitnis describes the skirmish which tooks place at Sirale Gumat. He gives a graphic account of the losses. The weapons referred to in the letter include guns, spears, bows and arrows, and stones.

58 : 11-1-1753

Pratinidhi informs Tarabai that the fort Sundargad, which was held by Prabhu and which was besieged by the Pratinidhi's men for 2–3 months was captured.

59 : 12-1-1753

Shivaji Salokhe acquaints Tarabai with the action fought with Udaji Chavan, Maloji Ghorpade and Ambaji Ghatge in which they were defeated at Miraj. He further adds that Udaji Chavan is being reinforced by his brother Rataji Chavan. He requests Tarabai to send him ammunition and money.

60 : 13–1–1753

Dinkar Mahadev, Peshwa's agent at Satara, in his news letter to the Peshwa informed him that Babuji Naik and his brother had taken Ramaraja to Tarabai and it was decided that the king should do as told by Tarabai, and the two should unite so that the Peshwa dare not interfere with the court orders. In his reply the Peshwa

asks his agent to keep a 'smiling' appearance and collect news from the opposite party.

61 : 21-1-1753

Kanhoji Mohite informs Tarabai that Dadoba Pratinidhi had sent an army against him but he would give a successful fight. He requests her to send money and ammunition.

62 : 22-1-1753

In this next letter to Tarabai, Kanhoji Mohite describes the encounter which took place with Pratinidhi's troops. He says that Pratinidhi's force came in two divisions, but they were driven back. "Hunger is our main problem" he adds.

63 : 23-1-1753

Tarabai in a letter to Chavadoji Yadav acknowledges the receipt if the seasonal Tilgul, sent by him on the occasion of Makar Sanskrant. She says that she too has sent him the same.

64 : 26 1-1753

Tarabai had ordered Kanhoji Mohite to set free the men of Pratinidhi whom he had imprisoned. Kanhoji Mohite in reply questions the wisdom of Tarabai's order. He says that the enemy had looted, ransacked and put to fire Government property. Even so he had released six men and would release their horses also if ordered.

65 : 28-1-1753

Tarabai rebukes Yamaji Pant for the fall of Sony, a village, to Udaji Chavan. She orders him to recapture the village, and throw back Udaji Chavan within his limits.

66 : 28-1-1753

One Kamloji Ambore is given three bighas of land by Tarabai, for cultivation. Tarabai informs the village officer to allow Kamloji Ambore to hold it.

67 : 11-2-1753

This is a letter written by Pratinidhi to Tarabai, in which he gives a detailed account of the steps he took to consolidate the position. He upset the arrangement made by Mirajkar, took in service Yamajipant Chikkodikar alongwith his troops, won over Maloji Ghorpade and some others. He complains that his earlier letters to Tarabai have not been attended to "This will not" he adds "bring an end to the troubles. The whole territory is plundered and devastated".

68 : 16-2-1753

Dadoba Pratinidhi acquaints Tarabai that Kanhoji Mohite seized six horses of Ganpatrao Shirke and imprisoned twenty men. He says that if Kanhoji Mohite obeys the order of Tarabai and releases the horses and men captured by him, there would be no enmity between Kanhoji Mohite and himself.

69 : 18-2-1753

This is a report of a skirmish which took place at Talbid, between the forces of Pratinidhi and Yamajipant on one side and the forces of Kanhoji Mohite on the other. Kanhoji Mohite says that the attack was repulsed. He describes the starving conditions of the people.

क्रमांक : ११ दि. ५-३-१७५१

त्रिंबक विश्वनाथ याने नानासाहेब व भाऊसाहेब याना लिहिलेल्या या पत्रात गायकवाडांच्या हालचाली बाबतचा वृत्तांत दिला आहे. पत्र ठिकठिकाणी फाटले असल्याने मजकुराचा संदर्भ नीट लागत नाही.

श्री शंकर

श्रीमंत राजश्री नाना व भाऊ स्वामीचे शेवेसी –

विनंती सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता।। छ० १७ रबिलाखरपर्यंत सुखरूप आसो. विशेष येकदोन पत्रें पूर्वी सेवेसी राजश्री बापूकडील वर्त्तमानची लिहून पाठविली ती पावलीच असतील. प्रथम जुंज जाले. त्या+ + +येक पत्र पाठविले होते कीं आज पत्र शहापुरीहून आले. त्यांत लि।। कीं कारकून जवल आहे सर्व सांगेल. त्यास कारकुनास पुसता प्रथम पु+ +चे वर्तमान पुसले. त्याणे खुलासा सांगितला + + कानी फारच घालविले. सरदाराचे व लोकाची बाकी काही राहिली नाही. च्यार हती गेले + + चे निशाण नगरीयाचे दुसरे दोन दोन + डे गेले. गायेकवाडाकडील येक हती आला. तिन चार घोडेही पाडाव आले. सत्य मिथ्या तो जाणे. सबब कीं इतके घोडे आलीयाचे वर्तमान आण साचे ++ येत नाही. बापूनी पत्री आज्ञा लि।। आहे कीं फितवा आमचे लोकांत आहे नाहीं हे काही कलत नाही. परंतु सोय पडत नाही. गाइकवाड तर अंमलनेर परगणेयातून निबाईत प।। कडे आला. मग घाट चढोन येईल की काय पाहावे. कासरबारीचे सुमारास आमलथेवर गेला. मग त्याचे जखमी बुनगे सोनगडास लाऊन देऊन मागती सडा होऊन घाट + +की काय पाहावे. गाईकवाड सा सात कोस + +हे त्यासी गाठ उगीच तरी सडे फौजेनी + + घालीत नाही.तीन+ + +कोसचे तफावतीने + + फौजा चालतात. परंतु हरकोठें तोड + + +मुले त्याचे मजलीस खोलंबा पडेल ऐसे आम्हा वाटत होते + + + + +पुनी सांगोन प।। की याचा इतबार नाही + + फौजा मेलवणे. बहुत सावध राहाणे ऐसा + + +प आम्हास पा।। स्वामीकडे वर्तमान जुज जाली + + +येकदा मात्र लि।। तेही दो चौ दिवसी लि।। ऐसे कारकून त्याजकडील सांगत

होत. हे वर्तमान आइकून तरतूद स्वामीनी करणे ते केलीच असेल. परंतु त्याणे ++ कुरदेसीचा विचार तूर्त येकीकडे ठेऊन तलेगावाचे सुमारें येऊ लागला तर मग या प्रांती दे णे ग +++(?) मातबर होईलसे वाटते. कांकी बापूचे फौजेत++राहिली नाही. स्वामीचे पुण्य समर्थ आहे. सर्वही परिहार होईलच. वर्तमान कलावे म्हणून लि।। असे. हे विनंती.

---

**क्रमांक १२** **दि. ८–३–१७५१**

**दमाजी गायकवाड पंधरा हजार फौजेसह साताऱ्यावर चाल करून येत असून सेनापती दाभाडे त्याला जाऊन मिळण्यासाठी निघाले आहेत, असे त्र्यंबक विश्वनाथ साताऱ्याहून नानासाहेब पेशवे व सदाशिवराव भाऊ या दोघाना कळवितो. दमाजीने पुणे–साताऱ्यावर चाल करून येणे म्हणजे 'कोल्ह्यानी सिहाच्या घरास येणें' अशा सारखे होय असे तो म्हणतो. तथापि 'भारी भारी वोझे जवाहीरखाना कापड सिहगडास रवाना केले' असा उल्लेख पत्रात आहे.**

श्रीमंत राजश्री नाना व राजेश्री भाऊ स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक त्र्यंबकराव विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता।। २० र।। करपर्यंत सुखरूप आसो. विशेष काल गुरुवारी दोप्रहरी आकस्मात रा।। नारो बावाजीचे पत्र आले की दमाजी पंधरा हजार सडे फौजेनसी पेहणी (?)आला. तो सवेच रा।। रामाजी मल्हार याचे पत्र आले की घाटाखालून निवड फौज करून सडे सडे वीस वीस कोसाचे मजली करून गाईडवाड पुणी ++++ येता सातारियास जाणार. तरी परीछिन ब।। भर (?) आहे. तुम्ही सावध राहाणे. दुसरा मजकूर आपले फौजेस त्यास वीसा कोसाचे अंतर पडले. या उपर फौजेची गाठ न पडूं देता जाणार. आपले फौजेने सलाबात ही खादली. तो इतक्यात बातमीचे राऊत होते त्याचे पत्र तेच दिवसी आले की आजचा मु।। घोड-नदीचा. तेव्हा अपूर्व भासले की आपली फौज मातबर पाठीवर असोन लांब-लांब मजलीने येतो. तेव्हा ती फौज अंतरली. या उपर बादनेजरचा (?) मजकूर खरा जाणोन मातुश्रीचे राजश्री बाबाचे व सर्वांचे विचारे जाले

की गाव फारच भरला आहे. सरकारचाही भरणा भारीच आहे आणी बे व सवस राहावे उत्तम. हे बरे तर बरे नाहीतर सर्वस्वे मूर्खपण (हो)णार. तर. भारी भारी वोझे जवाहीरखाना कापड इतके मात्र किले सिंहगडास लावावे. त्यास सुर्वाचे विचारास आले ते करावे. जाणोन लि।। प्र।। सर्व सिंहगडास रवाना केले. गावातही आकस्मात जवळ आलियाचे वर्तमान आइकोन मातबर कुले मुले माणसे सुधा किले मजकुरास गेले. तेव्हा मातुश्रीबाई मुलेसहवर्तमान मातुश्री ताई आदीकरून गेली. एक फौजचा बदनक्ष जाला दुसरे हे कर्म जाले. जर करता गावास आला असता तरी बंदोबस्त केलीया सोई पडती. काही आडकाठीच नाही आणी फौजही नाही. हशमी लोक काही आणविले. हजारबाराशे माणूस रवानगी जाली. परंतु समई येथे आले नाही. येकूण लैकिक एक प्रकारचा जाला[1] (को)ल्हानी सिव्हाचे घरास यावे होणार गोष्टीस उपाये काये. स्वामी थोर आहेत पारपत्य करतील. सेनापतीही आजच इंदुरीहून निघोन गायेकवाडाचे फौजेत गेलेचे वर्तमान सविस्तर कळावे म्हणून लि।। असे. आजचा मु।। भीमातीरी खेडाचे पूर्वेस दावडीचे सुमारे होईल म्हणून बातमी आली. येथील सर्व आश्रयास गेली हे जाणोन याउपर बोरघाटाचे वाटेने सातारियास जाईल तर न कळे. परंतु बातमीचे तो जागजागाचे अद्यापी वर्तमान येते की खामखा पुणियास येतो. आम्ही दोन तीनशे स्वार दोन चारशे पायेचे माणूस यैसे वडियांत आहो. जसा प्रसंग☆ जसा प्रसंग पाहू तसा करू. जर आमचे फौजेची मीटी इतक्यात बसली तर आम्ही जागा सोडीत नाही हे वर्तमान सातारियास● +++कसा योग पडेल+++अकस्मात आला. अवकाश नाही++ हे लिहिल्यात पुर्ती उमेद नाही. निंबाळकराची फौज सामील जाली इतके लि।। याउपर आम्ही गोट घालितो म्हणून लि।। परंतु जीव पडत(?) नाहीसे दिसते. कळावे म्हणून लि।। असे. श्रुत होय हे विज्ञापना.

---

१) यापुढील एक ओळ फाटली आहे.

☆ मुळात दूबार

● पुढील दोन ओळी फाटल्या आहेत.

क्रमांक : १३ दि. २६-३-१७५१ (?)

शेषो नारायण पेशव्यास लिहितो की करवीरच्या जोजाबाई यांचे "आपणासिवाये दुसरे राजकारण नाही."

श्री

श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी
विनंती सेवक शेषो नारायेण दोनी कर जोडून सा।। नमस्कार विनंती. येथील क्षेम चैत्र शुध येकादशी भोमवासरपर्यंत स्वामीचे दयेकरून येथास्थीत जाणून स्वकीय संतोषे लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष स्वामीचा निरोप घेऊन राजश्री विसाजीपंत आले. आज्ञे-प्रमाणे धण्यास श्रीमंताचे विनंती-पत्र प्रविष्ट करोन सांगितले प्रमाणें विनंती सविस्तरे केली. राजश्री हरीपंतही आपले निरोपाप्रमाणें धण्याची मर्जी रक्षून धण्याचे दर्षणास येऊन हुकुमाप्रमाणे आपणाकडे त्वरेनेच येत होते. तो सप्तरुषीचे दंगेमुले तिकडे गेले. त्यानी लिहिणे ते सविस्तरे लिहिलेच असेल. विसाजीपंती तपसीले विनंती केलेवरून श्रीमंत सकल सौ।। मातुश्री बाईसाहेब यांस श्रवण होऊन समाधान पावली. स्वामीच्या दर्षनसमई समक्ष ज्या ज्या प्रमाणे संदेह निरशनार्थ विनंती करणे ते केलीच आहे. त्याच प्रमाणे परिणामास श्रीमंत सौ।। मातुश्री बाईसाहेब नेहतील हा आपला खातरजिमा आसो द्यावा. कोण्ही नाना प्रकार लेहून पाठवितील त्यावर मनसबा काये आहे स्वामीचे मनोगता प्रमाणे खावंदाची दया आहे. तपसिले विसाजीपंत लिहितील त्यावरून आवगत होईल. या उपरी आपणासिवाये राजकारण दुसरे नाही. कागदीपत्री आसलिया पोषण कोण्हीं केंले तरी तोच विचार ऐसे चितात आणावे. दर्शनांती सविस्तरे निवेदन होईल. धण्यानीही आपणास आज्ञा करणे ते निक्षुणपणे श्रीमंताचे पत्री केली आहे. हुजरे समागमे आज्ञापत्र सादर आहे त्यावरून श्रृत होईल. आगमनाचा योग त्वरेने घडोन बोलले प्रमाणे निदर्षनास यावे. आपले येणेची उत्कंठा धण्यास बहुत आहे. विशेष ल्याहावे तरी स्वामी सर्वज्ञ आहेत. कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

क्रमांक : १४ दि. ३–४–१७५१

ह्याताखालच्या लोकांच्या खर्चाची तरतूद लवकर करावी. खर्चाच्या विवंचनेने हैराण झालो आहे. प्रतिनिधी व यमाजी शिवदेव हे दोघे आपणासी एकनिष्ठ आहेत, अशा आशयाचे कान्होजी मोहिते याचे ताराबाईंना पत्र.

श्री

पै।। छ. १७ जमा–
दिलोवल

श्रीमंत माहाराज मातुश्री
आईसाहेब स्वामीचे
शेवेसी

सेवक आज्ञाधारक कानोजी मोहिते चेरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग दंडवत विनंती. येथील क्षेम ता।। छ. १७ माहे जमादिलावल गुरुवार प्रथम प्रहरपर्यंत माहाराजाचे पुण्येप्रतापे करून येथास्थित आसे. विशेष आलीकड आज्ञापत्र येऊन सेवकाचा परामृश होत नाही. तरी माहाराजाती कृपालु होऊन बालकाचा सांभाल केला पाहिजे. येथील मजकूर तरी लोक सहवर्तमान ठेवले स्थली येकनिष्टपणें सेवा करीत आहो. परंतु पोटाची बेगमी करिता बहुत हैराण. रोज उठोन पोटाचा गर्गशा. लक्ष विनंती पत्र पाठवित गेलो. परंतु बेगमी जाहाली नाही. यैशा गोष्टीने मज लेकराचा तरुणूक कैसी होती, तरी कृपा करून बेगमी करून पाठविली पाहिजे यानंतर लोकाची बेगमी केलिया सेवा करून ठेवले स्थली येकनिष्ट सेवा करतील. मी सेवक समाधान पावेन. राजेश्री पंत प्रतिनिधी व राजश्री येमाजीपंत याचे अंतरीचा शोध करितां सर्व प्रकार माहाराजाचे पायासी येकनिष्ट आहेत. यांत माहाराज धनी आहेत, काये ते आज्ञा केली पाहिजे. मार्ग लक्षीत आहो. आज्ञापत्र येईल तदनंतर वर्तणूक करूं. बहुत काये लेहू. कृपा पूर्ण केली पाहिजे हे विज्ञापना.

क्रमांक : १५ दि. २९–४–१७५१

पत्राप्रमाणे पाच मण पाटणी तांदुळ पाठविले आहेत, म्हणून त्र्यंबक विश्वनाथ पेठे यांचे नानासाहेब पेशवे व सदाशिवराव भाऊ याना पत्र. दाभाडे व ताराबाई यांच्या बाबतचाहि वृत्तांत कळवावा अशी विनंती पत्रात आहे.

श्रीशंकर

छ० १५ जा।। खर

श्रीमंती राजश्री नानासो॥ श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीचे शेवेसी. विनंती सेवक त्रिबकराव विस्वनाथ कृतानेक सा।। नमस्कार विनंती. येथील कुशल ता।। छ. १३ जा।। लाखर पर्यंत स्वामीचे कृपेकरून सुख-रूप असो. विशेष आताच पत्र आले तेथे आज्ञा की प्राटणी तांदुल ।. पाच मण पाठवणे. त्याजवरून दोन बैल भरून तांदुळ आताच रवाना करविले लौकरीच येऊन पोहचतील. गाईकवाडाचे भेटीनंतर दाभाडियाकडील मजकुरियाचा सारेच कारभाराचा ठराव जालाच असेल. येथे अनेक प्रकारच्या लोकचर्चा येतात. त्यास सेवकासही करार होऊन ठरला मजकूर ल्याहावयाची आज्ञा करावी. तैसेच मातुश्री ताराबाईकडीलही संदर्भ लागलाच असेल तोही मजकूर आट चऊ दिवसी निर्गमेल की का(ये) त्याचा भाव ल्याहावयाची आज्ञा करावी. लौकर जो उरकेल तो पाहावा. खाली (?) सहजात होईल. या उपरीही लहाण पडल्या मग गैरसोयी पडेल. स्वामीचे पुण्य समर्थ आहे. ईश्वर सर्वही प्रकार उत्तम प्रकारेच करील. बहुत काये लिहिणे, कृपा करावी हे विनंती.

---

क्रमांक : १६ दि. ३-५-१७५१

पत्र ताराबाईंनी नानासाहेब पेशव्यांस लिहिलेले आहे. वेढा उठवून माघारा जावे अशी आज्ञा पत्रात आहे. पेशव्यांच्या फौजांनी साताऱ्च्या किल्ल्याची नाकेबंदी केली तेव्हांचे हे पत्र आहे.

श्री

श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब यांणी राजमान्य राजश्री बाळाजी बाजीराव पंडित प्रधान यांसी आज्ञा केली ऐसीजे :— तुम्ही विनंतिपत्र पाठविले, ते प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहाला. "कैलासवासी चिरंजीव यांनी एकच तालुका सांगोन सेवा घेतली. त्या मागे साहेबी सेवकावर कृपा करून सर्व राज्यभाराचा एखतियार दिल्हा. सेवकाने दीड वर्षे जी जी कार्ये केली, ती आज्ञेनेच केली. तेणेकरून सर्व स्नेहतेसी आज्ञेच्या वर्तणुकेमुळे विक्षेप वाढले. या प्रसंगी सेवक हुजूर आला असता साहा महिन्यांत विक्षेप वाटला असेल, त्याचा अर्थ करावयाबद्दल साहेबी इतबारी कोण्ही पाठवावा, अगर सेवकास आज्ञा केली—याने आपले तर्फेने कोण्ही पाठवून देऊं." यासी तुम्ही एकनिष्ठ सेवक याल तर राज्यकारभाराचा अखत्यार तुम्हास आहे. असे असता जी जी कार्ये जाली, ती तुम्ही साहेबांचे आज्ञेनेच केली असता, विरुद्ध कायबद्दल दिसोन आले, आणि संपूर्ण दिल्ली रामेश्वरपर्यंत लौकिक स्वामिसेवकभावाचा जाहाला ? हेही कर्तव्यता जाली ती आज्ञेनेच जाली ! तस्मात् दिसोन आले जे, हा काळपर्यंत जी जी कार्ये जाली, ती साहेबांचे आज्ञेवरून जाली. आता इतबारी कोण्ही पाठवावा त्याने याच गोष्टीचा परिहार ऐकून यावे. त्यासी तुम्ही एकनिष्ठ सेवक. आज्ञेने वर्तला. त्याचे प्रमाण इतके जे, या समयी तुम्ही फौजसुदा येऊन परिघ घातला आहे, तो उठवून तुम्ही स्वस्थळास जावे. तदनंतर जे बोलणे असेल ते सांगोन, हर कोणी आपले तर्फेने पाठवून द्यावा. त्यासी जाबसाल करावे तो केला जाईल. येणेकरून लौकिक उभय पक्षांचा उत्तम, स्वामिसेवकभावमर्यादाही राहिली. पूर्वी लौकिक जाहला आहे त्याचेही परिमार्जन या गोष्टीने

होते. तुम्ही मातबर सेवक. वडिलांचा अव्हेर करावा ऐसा किमपि साहेबांच्या चितांत अर्थ नाही. जाणीजे. छ १७ जमादिलाखर बहुत काय लिहिणे सुज्ञ असा ( लेखनसीमा )●

---

**क्रमांक : १७** **दि. १०–५–१७५१**

**उदाजीराव चव्हाण याना ससैन्य जाऊन मदत करावी व त्यांचे आज्ञेत वागावे म्हणून नानासाहेब पेशवे यांचे यमाजी रुद्र याना पत्र**

श्री

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री यमाजी रुद्र गोसावी—शेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सु।। सन ईहिदे खमसेन मया व अलफ. राजश्री उदाजीराव चवाण हिमतबहादर ममलकतमदार हे कित्येक आपले साहित्यविसी तुम्हास लिहितील. त्याप्रमाणे त्याचे साहित्य करणे. जमावसुधा येऊन याचे आज्ञेनरुप वर्तणूक करणे. याचे सर्व प्रकारे अगत्य आम्हास आहे. जाणिजे. छ २४ जमादिलाखर. आज्ञाप्रमाण. मोर्तब.

---

**क्रमांक : १८** **दि. ११–५–१७५१**

**दमाजी गायकवाड यांस होळकरांच्या वाड्यात ठेवावे म्हणून पेशव्याने त्र्यंबक विश्वनाथ यास लिहिले होते. त्यास त्याने उत्तर पाठविले की, दमाजीस कवडे यांचे वाड्यात बंदोबस्तात ठेवले आहे. रखवालीची व्यवस्था काय केली तीही पत्रात लिहिली आहे.**

श्री शंकर

छ २७ ज।। लाखर

श्रीमंत राजश्री नाना व श्रीमंत राजेश्री भाऊ स्वामीचे शेवसी. विनंती सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक सा।। नमस्कार विनंती.

---

● हा लेख इतिहास संग्रह ऐतिहासिक टिपणे भा. १ ले. ३५ ( पारसनीस संपादित ) वरून घतला आहे.

येथील कुशल ता।। छ. २५ जा।।खरपर्यंत स्वामीचे कृपेकरून सुखरूप असो. विशेष आज्ञा पा।। तेथें लि।।ते सविस्तर कळूं आले. दोनदा पत्रे पाठविली तेथे लि।। कीं राजश्री दमाजीस रा।। मल्हारजी होळकराचें हवेलीतच ठेवणे. त्यास हे पत्र शनवारी चौ घटिका रात्रीस पावले. तो आगोघरच दो प्रहरा म।।रनिले आले. त्यास आवजी कवडे याचे हवेलीत ठेविले. लि।। मजकुरास अंतर पडले. परंतु येथील बंदोबस्तीविसी किमपी चिता नाहीं. दरवाजे याजवर तीस पसतीस आंत बाहेर खासबारदार आहेत. त्यांत दोघे चौघे बहुत शाहाणे आहेत. दी प वा ड्यां क डे वाडीयात वीस खासबारदार आहेत. त्याचे बाहेर भिती सेजारी राजश्री समशेर बाहादर याचे घराचे कोनचे बुरजाजवल वाडीयासी लगती छपरे घालून शंभर माणूस हशमी ठेविले आहे. दोही बाजूस दोन्ही लगते वाडे उत्तर–कडे दक्षणकडे आहेत. त्याचे दरवाजे याचाही बंदोबस्त आहे. आणि पंचवीस तीस माणूस दोहीकडे चौकीस आहे. वाडीयात वोसरीवर रा।। गोपाल रावाकडील पंचवीस तीस खासा चौकीस असतो. तिघा जणाची निजावयाची जागा माडीवरच आहे. त्याचे पलंगाजवल दहा पंधरा भले लोक घेऊन येके दिवसी गोपालराव, येके दिवसी मोरोपंत, येके दिवसी पुरुषोत्तमपंत याप्र।। बंदोबस्त आहे. रखवालीची फिकीर किमपि नाहीं. जागा सोईकर त्यांचेही मनास आली. चांगली निर्गलती जागा कुशाद[१] होती. स्वारांची चौकी राहेती. परंतु जाले वर्तमान लि।। असे. आज्ञा येईल त्या प्र।। पुढे वर्तणूक केली जाईल. सेनापतीस राहावयास नाईकाचा वाडा सीध केला. गोविंद बलाळ याचे घरी मुले माणसे दाटी फार आहे. उदईक त्याचा ही विचार करून रिकामा आल्यास+++ अे खर्च पनास हजार माघारे न्यावे म्हणून सांडणी स्वाऱ्या न जाल्या तर तोही ऐवज फिरोन येईल. आजपर्यंत कोणी येक वरात खालेविली[२] नाही. ज्या वरात लोकानी विकत घेतल्या त्या मात्र च्यार दिवसी मागे पुढे देतो. धण्याचा धणी वरात घेऊन येताच खर्च देतो गुंता करीत नाही. दरबारचा मजकूर लि।। तर या उपर खानदेशांत वगैरे जागास[३] लिहून पारपत्य करिलों; परंतु +++ आठबार हुजरास वगैरे मागा जागा पाठऊन स्वार

---

१. प्रशस्त; विस्तीर्ण. २. बुडविणे; बुडणे. ३. माणा, ठाणे, किल्ला.

मात्र निघोन गेले. गाठ मात्र कोठेतरी पडावी त्याचेही पारपत्य होईल. इंदुरी सदापूर ही ठाणी वस्तभाव सुधा दिल्ही. देवरमहालचे मजकुराचें पत्र रा।। हरीपंताकडे रवाना केले. परंतु दाभाडीयांचे पत्र घेतले असले तर ते आले नाही हे विनंती.[1]

---

**क्रमांक : १९**

**दिनांक २१-६-१७५१**

**स्वामीच्या पत्राप्रमाणे महाराणी जिजाबाई यांचे पुण्याचे प्रयाण श्रावण महिन्यापर्यंत स्थगित केल्याने त्यांच्या मनात विपर्यास निर्माण झाला आहे, असे विसाजी नारायण यांचे पेशव्याना पत्र.**

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.
विनंती सेवक विसाजी नारायेण कृतानेक विज्ञापना. येथील क्षेस. तारीख आषाढ शुध नवमी भृगुवासर मोकाम वडगाव स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थीत असे. विशेष आलीकडे स्वामीकडून पत्र येऊन परामर्श होत नाहीं. तेणेकरून चितास समाधान नाही, तरी सदैव पत्री सेवकाचा परामर्श करावया स्वामी समर्थ आहेत. लोणंदचे मोकामी स्वामीची आज्ञा घेऊन निघालो ते समई आज्ञा जे करवीरास जाऊन उत्तर लिहीणे. म्हणजे देवदर्शनाचा योग घडावयाची आज्ञा होईल. त्यावरून करवी-रास येऊन सवीस्तर वृत श्रीमंत माहाराज सौ।। बाईसाहेव यास श्रुत केले. त्यांची आज्ञा घेऊन स्वामीस विनंती लिहिली. मागाहून धण्याचीही पत्रे पाठ-वीली. दोन्ही पत्राची उत्तरे आली जे सध्या आसाढ मास आहे. श्रावण मास उत्तम आहे. तवपर्यंत स्वारी विनंती करून तकूब करवणे म्हणून. त्यावरून

---

१. टीप:– पे. द. खं. ६. क्र. १९५ हे त्र्यंबक विश्वनाथ ह्याने नाना व भाऊ या दोघाना पाठविलेले पत्र छ.२४ ज।। खरचे आहे. त्यांत तो म्हणतो "............ राजश्री दमाजी गायेकवाड रा। गोपालराया बरोबर रवाना केले तर त्यास जागा रा।। मल्हारराव होळकर यांचे वाड्यात द्यावी ............ त्यास येक पत्र येविसी अगोधर आले की, आवजी कवडे याचाच वाडा तयार करणे ............"

वडीगावास जाऊन आसाढ मास स्वारी तकूब केली. परंतु बाईसाहेबाचे चिती विपर्यास आला, की निमित्य म्हणावे तरी आजपर्यंत बोलत आले. परंतु प्रधानपंतापासून काही परिणाम नाही. सध्याही दिनमेलीवरी[1] घातले. येवंत्र मतलबावरी आहेत. यैसे कितेक पर्याये बोलले आणी आम्हास स्वामीसनीध जावयाची आज्ञा झाली. परंतु स्वामीची आज्ञा नाही याजकरिता सेवक न आला हे विनंती लिहीली आहे. याचे आज्ञे-नरूप वर्तणू(क) होईल. येकदाचे दर्शन होऊन उभय पक्षी बोलणे जाहाले म्हणजे लगमी लागोन ठिकाणी राहाते हुयाचा खातरी करार नाही आणी इकडील सर्वत्राचे मते हे राजकारण दररोज नांदावे ऐसे नाही. याजकरिता सर्व त्याजवळ निक्षेप करितात याजकरीता विनंती लिहीली आहे. जाहाले वर्तमान सेवेसी श्रुत व्हावे यास्तव विनंती लिहीली आहे. येविसी सविस्तर अर्थ राजश्री तात्या व राजश्री हरीपंत विनंती लिहीता श्रुत होईल. जर करून दिवसगतीवर पडले म्हणजे याचे चित ठिकाणी राहात नाही. बहुत काय लिहिणे कृपा निरंतर असो द्यावी. हे विज्ञापना.

---

**क्रमांक : २०** **दिनांक ३०-६-१७५१(?)**

चिमणाजी बापूजी बरोबर पाठविलेल्या फौजेच्या रोजमुऱ्याची व्यवस्था कशी करायची ते कळविण्याची विनंती त्र्यंबक सदाशिव नानासाहेब पेशवे व सदाशिवराव भाऊ याना करतो.

श्री

छ. १८ साबान

तीर्थरूप राजश्री नाना तथा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी. अपत्ये त्रिबंक सदाशिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल ता।। छ. १७ साबान पर्यंत स्वामीचे आसीर्वादेकरून येथास्थित असे. विशेष राजश्री चीमणाजी बापुजी समागमे फौज रवाना केली यांस रोजमरीयाची बेगमी पंधरा वीस हजार रुपये एकदांच करून द्यावी की

1. दिनमेल = दिवसगत, दिरंगाई

आठवडा पंधरवडा रोजमरा म।।रनीलेकडे वरचेवरी पाठऊन देत जावा ती आज्ञा ल्याहावी. तूर्त दहा हजार रुपये रोजमरीयाचे बेगमीस मोघम म।।रनीले जवल देऊन रवानगी केली. आणीक दाहा पाच हजार रुपये एकदाच द्यावे ऐसी आज्ञा जाली तर ऐवज पाठवून द्यावा. थोडीबहूत दारू गोलीची बेगमी कोठी पैकी करून दिल्ही. विदीत जाले पाहीजे. सेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

---

**क्रमांक २१** **दि. २–७–१७५१**

भास्कर याने गोव्याचा राज्य सचिव लुईस आफाँस दांताश याला पाठविलेल्या या पत्रात नानासाहेब पेशवे व सदाशिवराव भाऊ यांच्या लष्करी हालचाली, साताऱ्यात दमाजी गायकवाड व दाभाडे यांचा पेशव्यांच्या फौजांकडून झालेला पराभव, वगैरे घडामोडींचा वृत्तांत दिला असून नानासाहेब व ताराबाई यांचा समेट होण्याची शक्यता आहे असे म्हटले आहे.

अजम लुईस आफोंस दांत सकडतार दाम मोहबत हू

मोहिवानपन्हा मखलीशान दस्तगाहा अजी दिल येखलास भास्कर राऊ सलाम खेर अज्याम सलाह बनजर जाणून कारनेकी कलमी करीत गेले पाहिजे. दरिअयाम महवल मकसूद आंकी दिगर बहुत रोज मोहि–बाकडून किताबत येऊन खबर मालूम होत नाही हे बात अश्नाई जांगा वाजीब नसे हर घडीघडी किताबत पाठऊन अश्नाइची वृधी केली पाहिजे. इकडील राजकी वृत माहाराज संभू छत्रपति यांकडून कृष्णे आलीकडील जिल्हे शाहामतपन्हा सदासिवपंत याणी करून घेतले. हे प्रांते सदासिव पंडत याची मोहिम होणार होती. त्यास नासरजंग निजामनमुलूक हक पावले याकरिता अवरंगाबादे बुराणपूर भागानगर हे प्रांत मोहीम करून मुलकाची बंदोबस्त करून पोक्ता टका मेलवावा याकरिता पंतप्रधान व सदाशिव पंडत उभयेता लक्ष फौजेनसी मोहिमेस गेले. तारासाहेबामध्ये व पंतप्रधान यामध्ये विपरयास आला त्यास सातारेस फौजा ठेवावयाच्या ठेऊन पंतप्रधान उभयेता मोहिमेस जावयासी अदवानी प्रांते गेले. तव पंतप्रधानास बातमी गेली तेव्हा पंतप्रधान फौजेसुधा सातारेस आले,

सातारेस तारासाहेबाचे कुमकेस दाभाडी व दमाजी गायेकवाड दाहा पंधरा हजार फौजेनसी आले होते. त्यांत व पंतप्रधान यांत लढाई जाहाली दाभाडीस व दमाजी गायेकवाड यास कैद करून पुरंधरावर ठेवले. पंतप्रधान उभयेता पुणेस जावयास गेले. शामतपन्हा मुरारराव घोरपडे वजारतमाब याची व पंतप्रधान याची मुलाजमत जाहाली. पंतप्रधान याणी दोन कोटी रुपये मिलविले. हे मुलुकगिरी सुरू करून मकानेस दाखल जाहाले. इजानेबा बरोबर होतो. रजा घेऊन नरगुंदास दाखल जाहालो. हे कुली हकीकत यकबालपन्हा (वि)विजुरे यास व मोहिबास मालुम होणेबदल कलमी केले असे. दसरा करून पंतप्रधान संभाजी माहाराजाची मुलाजमत घेऊन सोंधे बिदनूर सवणूर प्रांते मोहिमेस येणार असी आवई आहे. तारासाहेबाचा व पंतप्रधान याचा विवेक होणार आहे. मातबर येत जात असतात. मालूम होय. छ १९ माहे शाबान. ज्य।दा काय लिंहिणे प्यार मोहबत राखणे हे किताबत[1]

---

**क्रमांक : २२** **दि. ९–७–१७५१**

पेशव्यानी आपली घोडी नेली, हत्ती नेले, जामदारखाना लुटला, ताटवाट्या नेल्या, असे सातारचे माहाराज बोलत असल्याचे कानी आल्याने, त्रिंबक सदाशिव हा सदाशिवराव भाऊ याना लिंहितो की, वरील लोकापवाद टाळण्यासाठी छत्रपतीचे जे काय पुण्यास नेले असेल, ते सातान्यास परत पाठवावे.

तीर्थरुप राजश्री ——————— भाऊ स्वामी
चे सेवसी ——————

अपत्ये त्रिबक सदाशिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ता।। आषाढ वद्य त्रयोदसी मंगळवार परियेत स्वामीच्या आसीर्वादेकरून येथास्तीत असे. विशेष साताऱ्याचे वर्तमान आम्ही येकतो की राजश्री म्हणतात जे पेशव्यानी माझी पागा हाती व जामदारखाना लुटला. घोडी

---

१. मोत्रे दप्तरांतील हे पत्र करवीर छत्रपति घराण्याच्या इतिहासाची साधनें, संपादक मा. वि. गुजर, भाग ८; लेखांक ७४, खालीहि प्रसिद्ध झाले आहे.

नेली वाटली यैसी बकवा करतात. यैश्यास स्वामीनी हा कालपर्यंत त्याचे वाईट न केले. तनसुडी जाऊ न दिल्ही. हाती घोडी परदा होती ती थांग्यास लाऊन वाचवली. असो. ते उपकारी ठाऊकच आहेत. यैश्यास स्वामीनी हाती तो रवाना सातारियास केले म्हणून यैकतो. उत्तम जाहाले. सचीव आपले त्यांजला तरी काखचा खाले आणावे. सातारियास जाऊन हाती उपासी मरेनात का. उत्तम केले. वासीच्या गा + + + + + घोडी + + + + गशा कडून अणावी. सातारियास पाठवावी. लिगाड ठेऊ नये.जामदारखान्याची गोष्ट तरी मालमवेसी[1] टिकतो. मागे चमराजी[2] (?) काका बाबाजीने नेली. किरकोळ राहिले त्याची मोजदाद स्वामीनी करून चौक्या ठेऊन बंदोबस्त केला. धाकट्या वाड्यातील सनगाचा येक संदुख व देवपूजेकडील ताटे वाटचा तबकड्या रुप्याच्या व साहा हजार रुपये आपले सरकारांत आणले. सा हजार रुो तो त्याचेच पागेस हातीस खर्च केला. स्वामीनीचं आज्ञा करून केला. येक सनगे व ताट वाट्या राहिल्या आहेत. राजश्री खाली (आले) म्हणजे त्याचे त्यास द्यावे. म॥र काय तोवर जतन करून ठेवले त्याचें त्यास द्यावयासी. परंतु राजश्री विश्वा सामोर चर्चा करतात. यास्तव माझे मते सनगे व ताटचा वाटचा आपली-कडे जामदार खान्यात आहे. मोजदाद आहे. राजश्रीचे कारकून जामदार याचे मार्फतीची मोजदाद आहे. ती सनगे व ताटवाटचा किरकोळ राजश्रीचे नेऊन हवाला करून जाब आणावा. तिकडून पागा आणावी म्हणजे लिगाड चुकेल. राजश्रीच्या जामदारखान्यावर जागा जागा आपल्याकडील चौक्या आहेत त्या उठवाव्या. मग तो काही करू यैसे पत्र रामाजीपंत लक्ष्मणपंत यासी ल्याहावे व येक राजश्रीसहि पत्र लिहावें की जतन करून ठेवनें हें ठेवावे. पुढे राजश्री उतरतील तेव्हा उतरून आपण मोकळे व्हावे. इतका विस्तार का लिहिला तर राजश्री चर्चा करतो हे एक व पुण्यातील ग्रहस्थ थोर माणूस तुमची आमची चर्चा करतात यास्तव इतके लिहिले आहे. तीर्थस्वरुपास सांगून याप्रो कागद लेहून इकडे पाठवून द्यावे. सातारियास रवाना करून राजश्रीस पावते करून जाब आणू. पागा आणावयासी माणसे पाठवावी. मुकुंदजी प्रभूने

१. चीजवस्तु; गुरेढोरे; २. वनगायीच्या केसांची चवरी.

इतकी चाकरी केली. घोडा गेला—याजकरिता राजश्री त्याला धरावयास जपतात. चाकरी करून गुन्हा लाजीम या रीतीचे यास्तव राजश्रीचे राजश्रीचे[1] हवाला करावे. स्वामीनी याजपेक्षा या राजश्रीचे मायेत राहिले तर याला उपकार नाही पुर्ते समजावे. स्वामीहि जाणतच आहेत. हे विज्ञापना. स्वामीचे डोळ्याचे कसे आहे हे ल्याहावे. आणखी नवल विशेष आसलिया ल्याहावे. हे विज्ञापना.

---

**क्रमांक : २३** **दिनांक ११–७–१७५१**

रामराजाच्या तोतयाची चौकशी होऊन तो खोटा ठरला, त्या वेळी साक्षीदार म्हणून हजर असलेल्या लोकांची याद.

श्री

तोतयाचे करीने मध्ये साक्षीस कोणकोण होते. सु।। इसने खमसैन मया आलफ. छ. २८ शाबान प्रजापतीनाम सवसरे आशाढ वद्य आमवास्या गुरुवासरे शके १६७३ बी तपसील.

| | | | |
|---|---|---|---|
| रा।। पंडीतराव | रा।। पंतआमात्य | गोवींदराव | नवाब इनायत |
| १ | याजकडील | कवीद्र | आली |
| राजश्री पंतप्रति- | १ सिवाजीपंत | १ | १ |
| निधी याजकडील | १ आपाजीपंत | सबाजी याचे | ........ किलेदार |
| १ मल्हारराव | — | पुत्र जानोपंत | कारकून |
| १ माणकोपंत | २ | १ | गंगाधरपंत |
| — | आनंदराव कृस्ण | भीवजी भो(इ)टे | १ |
| २ | १ | १ | माणको शंकर |
| साघो बलाळ | पांडुरंग जोसी | नारोगणेश व | १ |
| १ | १ | कोनी विसर १ | भगवंतराव |
| केसो कृस्ण | आबाजीपंत व | आपाजी विठल | ठाकूर १ |

---

१. मुळातच दुबार

| | | | |
|---|---|---|---|
| १ | विठोबा दि।। | १ | कुसलसींग |
| नंदराम दि।। रा।। | गोपालराव | नानाजीपंत दि।। | चोपदार १ |
| पंतप्रधान १ | यादव २ | रा।। बावाजी | गोविंद ० |
| तानाजीराव साज- | सुभानजी सूर्यवंसी | जाधव राऊ | |
| -वलकर | १ | हीरव (भैरव?) | |
| १ | सवाईखान | जोसी | |
| वसुदेव जोसी हरी- | चोपदार | सगमेश्वरकर- | |
| हरेश्वरकर | सरकार | नारो त्रिबक देशमुख | |
| १ | १ | दंडाराजपुरी दि।। | |
| | | रा।। राव पंतप्रधान | |

सदरहू असामी येको(ण)तीस वगैरे लोक बैसोन करिना मनास आणिता तोतया हा प्रमाण. आपले तोंडे व पांचाचे मते लबाडी हे खरे जाहाले. त्याजवर उभयता माहाराज येकत्र होऊन आहिरराव तोतया रुबरु बोलाऊन वाजपुस करितां करीनाप्रमाणे बोलणे यांची उतरले. श्रीमंत माहाराज मातुश्री (आई)साहेब याहीही संभाजी आहीरराव याचे राखेचा लेक + + + + + + + तदनंतर उभयता माहाराजाही शाहारत[1] करून शहर बाहेर करून श्री भीमापार करून दिल्हा. रुबरु लबाडी जाहाला.

---

**क्रमांक : २४** **दि. ११–७–१७५१**

सातान्यातील सरदारामध्ये असंतोष माजला आहे. त्यानी गडकऱ्यांशी संधान साधले असून गारदी व तोफखाना घेऊन वाड्यावर चालून जाण्याचा त्यांचा विचार आहे, असे पत्र लेखक ( बहुदा त्र्यंबक सदाशिव ) पेशव्याना लिहिलेल्या पत्रात म्हणतो. रामराजा, ताराबाई व बाबाजी जाधव हे नेहमी एकत्र असतात असा उल्लेख पत्रात आहे.

श्री

सेवेसी विज्ञापना ता।। श्री छ. २८ शाबान स्वामीचे कृपेकरून वर्तमान येथास्थित असे. विशेष सातारियाकडील वर्तमान जे लस्करच्या सरदा–

---

१ प्रसिद्धि; आवई

रानी विचार केला जे तोफखाना व गारदी घेऊन यावेळ याजउपरी निकडी करून वाडियावरी चालोन घ्यावें. त्यास गडकरी यांचे अनुसंधान लस्करच्या सरदाराकडे लागले आहे. समीपवर्ती लोकहि भेदात आहेत. गडच्या तोफा रिते बार होतात. श्रीमंत मातुश्री आईसाहेब व माहाराज राजश्री स्वामी व राजश्री बाबाजी जाधवराव यैसे त्रिवर्ग आर्ह्निसी येकत्र असतात. प्रस्तुत वर्तमान जे राजश्री बाबाजी जाधव यांची व लस्करच्या सरदाराची भेटी व्हावी. तदनंतर मग मातुश्री आई सो। यांचे दर्शन व्हावे. मग राजश्री स्वामीची मुक्तता व्हावी, हाहि प्रकार बोलत आहेत. आणिखी वर्तमान येईल ते सेवेसी लिहिले जाईल. लस्करातून चिरंजीवाचे पत्र आलें जे हुजरून कारकून लस्करचें हजिरीस आले आहेत. लस्करची हजिरी जाली. आम्हाकडील लोकाची हजिरी घेणार. श्रीमंताचे पत्र काही नाही. आज्ञा आहे म्हणून सांगतात. त्यास आम्ही उत्तर लिहिले जे त्यास आज्ञा असेल तरीच हजिरी घेतील. तुम्ही हाजिरी देणें, उजूर न करणे म्हणून लिहिले आहे. हजिरीहि सेवेसी कारकून घेऊन येतील. रोजमुरीयाचे परम कठीण जाले आहे. इ(लां)ज चालोन(?)सेवेसी लेहू, हे घडणार नाही. सेवेसी श्रृत होय हे विज्ञापना.

---

**क्रमांक : २५** **दि. १५–१०–१७५१ (?)**

नांदगिरी किल्ल्यास पेशव्यांचे लोक वेढा घालून बसले होते. परंतु मुधोजी नाईक निंबाळकर यांच्या चिथावणीने किल्ल्यांतील लोक किल्ला खाली करीत नाहीत, असे पत्र लेखक म्हणतो.

श्री

सेवेसी विज्ञापना. येथील वर्तमान ता।। छ. ६ जिल्हेजपर्यंत स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे. विशेष. किले नांदगिरीकरानी मध्ये काही दिवस लबाडीचा संदर्भ आम्हासी लाविला होता की श्रीमंताची स्वारी स्वदेशी येईतोपर्यंत दाहा लोक व निशाण किल्यावर घेतो म्हणोन व

कितेक मुदेहि लेहून पाठविले होते. त्यांत त्यांचे मुदे कबुल करावयाचे सरकारकामाचे ते आम्ही कबूल केले होते; परंतु निशाण व दाहा लोक किल्यावर घेतो म्हणत होते त्यास बेबदल होऊन माघारे सरले. मग आम्ही मार्चेबंदी किल्याची चौगिर्दी चांगलीच केली. येक दुसरी तोफ खालून वरते गोले जावे यैसी लागू केली आहे. साहेबाचे पुण्य समर्थ आहे, किती दिवस दम धरून जुझतील ते विदीतच आहे. तीनसे लोक माजी गडकरी सातारकर व सेंभर लोक पुणियाहून हशमी आले ते व च्यारसे लोक राजश्री लक्ष्मण कोनेर याचे यैसे सात आटसे माणूस मोर्चेबंदी करून बसले आहेत. यामुळे प्रसिद्ध किल्यावरून खालते कोणी जाऊ येऊ पावत नाही. चोरी छपीने कोणी येकट दुकट जात येत असले तर न कळे. सारांश राजश्री मुधोजी नाईक निंबाळकर याच्या आश्रयाने किल्यावरील लोकांनी बल धरून जुंझतात. किला येणार काले सरकारांत येईलच. परंतु मुधोजी नाईकाचे फिसादीने[1] सिबंदी खर्च मात्र सरकारांत होतो. नाईकास येद्विषयी सरकारचे नावे प्रथम दोन च्यार वेळ पत्रे पाठविली. परंतु वाटेवर न आले. त्याजवरी स्वामीनी ताकीदपत्र त्यास पाठविले व लस्करातूनही श्रीमंत राजश्री रावसाहेबानीही ताकीदपत्र पाठविले तेहि त्याजकडे पाठवून दिल्हे. परंतु विचारावर न येता गडकरी याचे कबिले पाठवून न देत व किलाहि खाली करून देत नाही. आम्ही मराठे पोटचे देऊं, परंतु पाटचे देणार नाही. सिबंदी खर्चाचा जाबसाल पडला तर श्रीमंताची स्वारी देसी आलियावर करू. याप्रो त्याची रीतीचा जाबसाल जाले वर्तमान सेवेसी निवेदन व्हावे यास्तव लिहिले आहे. निक्षूण किल्याचा जाबसाल त्याचकडे लागू जाला आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

१. बंड; दंगा; चिथावणी

क्रमांक : २६ दि. १–११–१७५१

मिरजेच्या देशमुखीचे वतन नारायणराव घोरपडे हे सक्तीने खातात अशी तक्रार आमच्याकडे आली आहे. सदहू वतनावर त्यांचा हक्क नाही. तरी त्याना वतनाच्या वाटेस न जाण्याची ताकीद द्यावी, म्हणून मातुश्री ताराबाई यांचे नानासाहेब पेशवे याना पत्र.

श्री तालीक

श्रीमंत माहाराज मातोश्री आईसाहेब याणी राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान यासि आज्ञा केली येसिजे. राजश्री आपाजी नरसिंगराव देशमुख प्रा।। मिरज याणी हुजुर येऊन विदित केले जे प्रांत मजकुरी राजश्री नारायणराव घोरपडे याणी देशमुखीचे वतनास खलेली करून फौज पाठवून वसूल घेतात. त्यास पूर्वी राजश्री संताजी घोरपडे सेनापती याणी राजश्री छत्रपती स्वामी कैलासवासी चंदीचे मुकामी होते ते समई आर्ज केला, मिरजेचे देशमुखाचे नकल जाहले. तेथील देशमुखीचे वतन आपणास द्यावे म्हणोन विनंती केली. ते प्रसंगी सिदूजी चव्हाण हिलाले याणी सांगितले की पुरातन वतनदार ब्राह्मण व जैन आहेत. ते वृत्ती अनभवितात. त्यास हुजुर आणोन मनास अणावे. त्यावरून ब्राह्मण व जैन देशमुख हुजुर दाखल आणोन मनास आणिता पुरातन वतनदार खरे असे चितात अणोन त्याचे वतन त्यास दुमाला केले. तेणे प्र।। चालत असता हाली मशारनिलेनी दंगा करून ब्राह्मणाचे वतनास खलेली केली ही गोष्ट कार्याची नाही. याजकरिता राजश्री राणोजी घोरपडे यास आज्ञापत्र सादर केले आहे. तरी तुम्ही त्यास आपली पत्रे देऊन ब्राह्मणाचे देशमुखीचे वतन सुदामत चालत आले आहे त्या प्रा। चाले ते गोष्ट करणे.[1] छ. २३ माहे जिल्हेज सु।। इसने खमसेन. बहुत काय लिहो तर सुज्ञ असो.

---

१. याच आशयाची व याच तारखेची ताराबाई यानी शिवाजी साळोखे व राणोजी घोरपडे याना लिहिलेली पत्रे उपलब्ध आहेत.

क्रमांक : २७ इ. स. १७५१

रामराजे व ताराबाई यानी किल्ल्याखाली येऊन सदरेस बसावे. पेशवे त्यांना भेटावयास येतील. सेवकांचे क्षुद्र दोष त्यानी लक्षात घेऊ नये, असे आपण रामराजे यांस सांगितले आहे. अंश साताऱ्याहून बहुतेक नाना पुरंदरे यांचे पेशव्यास पत्र.

श्री

सेवेसी विज्ञापना. पर्वतावरून मातुश्री आईसाहेबाची पत्रें राजश्री बाबाजी जाधव व राजश्री बऱ्हाणजी मोहिते यांसं आली आहेत. तीच बजिनस व स्वामीस येक यैसीं पत्रें देऊन हावलदार याजकडील कारकून राजश्री आपाजीपंत सेवेसी पाठविले आहेत. सविस्तर वृत सेवेसी निवेदन करितील त्याजवरून श्रुत होईल. दिवसा असता वरील आईसाहेबाकडील हुजरे दोन वेला व महाराजांकडील हुजुरे+ + +मजकुराविसी आले होते.[1] स्वामीस कळावें+ + +सुक्रवार दोनप्रहर रात्र. हें मध्यच आम्हास म्हणतात की नानासाहेबी मुकाम करावा जाऊ नये. अत:पर दुसरा विचार नाही. यैश्यास आम्ही उतर केले की खावंदाचे चितात उत्तम अर्थ आला असला तर उत्तमच असे. सेवक मातबर कार्यकर्ते जे आहेत याजवर सर्व प्रकारे कृपा करावी. लोभच दिवसे दिवस करावा. मातबर काम असेल तेथें या सेवकाचा पराक्रम पाहावा. क्षुद्र च्यार दोष असले तर खावंदानीं चितात न आणावे. दयाच करीत जावी. कामाचे चाकर आहेत. खावंदाचे मनांत काही नसले तर आईसाहेबी राजश्रीनी खाली यावे. सदरेस जाऊन राहावे. दुसरे दिवसी प्रधानपंत पुण्याहून पंचविसानसी येतील. दर्शन घेतील. दर्शनांती सर्व कळेल. खावंदाचे चितात दुसरा अर्थ नसला तर खाली यावे. प्रधानपंत येतील नाहीतर उग्याच पाजण्या कामाच्या काय आहेत. सुखरुप खाली यावें. आम्ही दर्शन घेऊ बोलू. तदोतर खासे नाना स्वामीहि येतील. खाली न यावे असे

१. ताराबाईनी रामराजास साताऱ्च्या किल्ल्यावर दि. २२ नोव्हेंबर १७५० या दिवशी अटक केली आणि दि. १३ ऑक्टोबर १७५१ या दिवशी त्या रामराजास घेऊन किल्याखाली उतरून फत्तेसिंग भोसले यांच्या वाड्यांत राहिल्या.
( राजवाडे खंड ६; पृ. ७२ )

बोलावें तर यात जीव काय आहे? ऐसे बोललो. उचीत मनसबा दिसेल तो स्वामी करतील. सविस्तर बाबाजी व बराणजी बावानी लिहिलेले आहे त्यावरून कळेल. हे विज्ञापना.

---

**क्रमांक : २८** **सन १७५१**

ताराबाई व पेशवे यांच्यामध्ये झालेला हा " तह " आहे. गडावरून उतरण्यापूर्वी म्हणजे ऑक्टोबर १७५१ च्या सुरुवातीस तो झालेला दिसतो.

श्री

यादी

तह श्रीमंत महाराज मातुःश्री आईसाहेब यांसी राजश्री नाना पेशवे यानी करून दिल्हा. वि।। राजश्री मोरो शिवदेव व कारभारी नि।। श्रीमंत महाराज मातुःश्री व महादाजी नाईक निंबाळकर व दिनकर महादेव वकील निसबत राजश्री पंतप्रधान. कलमबंदाचें अक्षर मोरो शिवदेव यांचे हातचे. कलमागणित मखलाशी खुद्द श्रीमंत राजश्री पंतप्रधान नानासाहेब यांचे हातची.

१. कैलासवासी चिरंजीव राजश्री यांचे कारकीर्दीचा मामला आहे. त्याचा सरकारचा दरमाहे वगैरे ऐवज हुजूर पावत आहे. त्याजप्रों द्यावा आणि एकनिष्टेनें सेवा करावी. कलम १

याचें प्रतिउत्तर. मागील राहिला पैका मुदती फुरसतीनें घ्यावा. पुढे पूर्ववत् साहेब खाली आलियावर दरमाहे वगैरे सर्व चालेल.

७. किल्ले सिंहगड साहेबीं दिल्हा तो करार असे. कलम १

साहेबांचे प्रमाणवचन रामबाण आहे. करार केला, उत्तम असे.

२. राजश्री यमाजी शिवदेव यांची वस्तभाव हत्ती घोडे जी नेली असेल ते त्यांचे स्वाधीन करून मानिलेस हुजूर आणून स्वाधीन करावे. कलम १

जामीन द्यावा, मुतालकी न सांगावी, एणेंप्रमाणे जाहाल्यास त्यास सोडून साहेबांपाशी पाठवूं.

३. विष्णू विश्वनाथ व रामाजी केशव यांजपासून सेवा अनुकूल पडली तरी घेतली जाईल. साहेबाचे चित्तास न आलें तरी सेवा न घेऊं. परंतु त्यांचे इज्जतीस खता न करिता निरोप देऊं. त्यांनी दुसाला हिसेब सरकारचा वारून द्यावा. कलम १

वरकडाप्रमाणे यांजवरीही कृपा करावी. पुढे अंतर पडलेयास निरोप द्यावा.

४. हुजूरचे खासगीचे महाल व गांव याची घालमेल करून दुसरियास दिल्हे असतील ते हुजूरचे हुजूर ठेविले जातील. कलम १

८. निम्मे गुजराथ साहेब तुह्मावर कृपाळू होऊन दिल्ही. त्यास सरकारचा ऐवज दाभाडे हुजूर देत आहेत त्याजपैकी निम्मे ऐवज तुम्ही सन इहिदे खमसैनपासून द्यावा. कलम १

अंमल बसल्यावर रु।। सरकारचे प्रविष्ठ होतील. तूर्त तीस चाळीस पदरचे मात्र खादले. गुजराथेंतील एक पैका आला नाही.

९. हुजूरचे कारभारी र।। गोविंदराव व यशवंतराव, नामोजीराव, विष्णूपंत व रामाजी केशव, वगैरे कारकून तुम्हांकडे गेले. त्याजमुळे दिवाणकामास अंतर पडले.

याजकरिता त्यास हुजूर पाठवून द्यावे. आणि त्यांनी एकनिष्ठेंने वर्तणूक केलियानें त्यांचे हातें सेवा घेतली जाईल. कलम १

सर्व लहानमोठे कारभारी यांचे पूर्व दोषगुण एकीकडे ठेवून सर्वांपासून सेवा घ्यावी. वर्षां दों वर्षी जो लबाडी करील त्यास सुखरूप दूर करावे. सेवकाचे आड नाही.

१०. हुजूरचे कारभारांत पेशजी चिरंजीवांचे कारकीर्दीस, तुमचे विद्यमाने जो काम कारभार होत होता त्याजप्रा॰ तुमचे हातें घेतला जाईल. व हुजरून जो काम कार-

राजश्रीचे सनदेशिवाय जें जाह्ाले असेल ते न चालवावे.

५. राजश्री पंतप्रतिनिधी यांचे तालुकियाचे गड व ठाणीं व कोट व महाल व फुटगांव वगैरे लोकांकडे जे असतील ते व वस्तभाव व चिरंजीव श्रीनिवास गंगाधर व गोपाळराऊ महादेव यांजकडे आहे ते हुजूर आणून द्यावे.

कलम १

राजश्रीचे सनदेशिवाय जे गांव–खेडें गेले असेल तें सर्व नीट करून द्यावे, उचित असे.

६. उमाबाई दाभाडे व सेनापति दमाजी गायकवाड व मुलें व अंबिकाबाई यांस हुजूर आणून द्यावे. कलम १

साहेबांचे सनदेप्रों सर्वांनीं वर्तावें. ते न करिता कलहवृद्धि केली. सेवकाजवळ साहेबांची व महाराजांची सनद. त्याप्रों कल–भार होत होता त्याजप्रों हुजूर होणें तो होईल. त्याजमध्यें तुम्ही चित्त घालू नये. कलम १

थोरले महाराजांनी कैलासवास केलियावर साहेबी सर्वां सेवकांपेक्षा सेवकावरच कृपा विशेष करून सर्व यख्तयार दिल्हा. इमान प्रमाण दिल्हे. आता जी मर्जी असेल ते प्रमाण. दुराग्रह नाहीं.

११. किल्ले सातारा वगैरे किल्ल्यांचे तनखियांचे गांव लष्करचे लोकांनी लुटून नेले आहेत. तेथें जो नागाटा न न्यावा तो नेऊन किल्यांचे तनखेखोरी केले. त्याची वस्तभाव वगैरे जें गेलें असेल ते भरून द्यावें.. कलम १

गनीमी लष्करची लूट येणें कळतच आहे. हवालदाराची समजाविशी करावयाचे रीतीने केली जाईल.

हांत ईश्वरें यशच दिल्हें. परंतु एक साल मात्र गेले. पदरचे तीस लाख खादले. पंचवीस लाखांची निशा रोख केली. आणि निमे गुजराथ सनदेप्रों ठाणींसुध्दां न जुंजतां सनदेप्रों दिल्हेयावर सेवकाचा तिळमात्र गुंता नाहीं. येणेंप्रमाणें निकाल करावयास साहेबी उमाबाईस हुजूर बोलाविलें. यास साहेबांचे येणें खाली होतांच उमाबाईस साहेबांकडे जावयास सांगू. साहेबीं जी उचित आज्ञा कर्तव्य ते करून सेवकाचा वाजवी निकाल करून देवावा. न देत तर त्यांस सेवकाकडे पाठवावें. साहेबांचे सनदेप्रों सेवक वर्ततील.+

---

**क्रमांक : २९** **सन १७५१ (?)**

निजामाने आपणाशी संधान लावले आहे. परंतु ' तिकडील कुविचारास चित्त अप्रशस्त ' असे उदाजी चव्हाण हे नानासाहेब पेशवे याना लिहिलेल्या या पत्रात म्हणतात. पेशव्यांचे आणि आपले जुळले, तर आपण पेशव्यांशी निष्ठेने वागू असे त्यानी या पत्रात सूचित केले आहे.

श्री

राजेश्री पंतप्रधान गोसावी यांसी :—

६ सकल गुणालंकरणअखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित उदाजी चवाण हिंमतबहादुर दंडवत विनंति. येथील कुशल श्रीदयाउत्कर्ष जाणून

---

+ हा लेख रा. खं. ६, ले. २७६ वरून घेतला आहे.

स्वकीय निजानंदादिलेखनें चित्त आनंदित करावे. विशेष :— सांप्रत पत्रद्वारे परामर्श होत नाही. तर आपले म्हणविल्यास निष्ठुर चित्त न करून प्रतिपदी परामर्श अविस्मरणे करावा. यानंतर पूर्वी राऊलाकडेस राजेश्री अंताजी नारायण व नारो चिमणाजी उभयता पाठविल्यास आपण आज्ञा केली कीं, जेव्हा म्हणाल तेव्हा घर तुमचे; सर्वस्वे आपले आहो; म्हणोन कित्येक विशदे गुंता सांगोन पाठविले. त्याजवरून परम संतोष मानिला की, आपले साभिमानी राऊल, न्यून पूर्णाधिकारी आपले म्हणविल्यास अवलंब धरिल्यास सिद्धीते पाववून, मनकामना तृप्ति करणार. हा दृढतर पर्याय चित्ती आणिला की, आधीच कोठे राऊल भाषणी गुंतत नाहीत. न होणाऱ्या कर्माचा अवलंब चित्ती धरिला, तो परिणामास लावीत आहेत. सारांश की, हा जन्म काही बहुत नाही. थोडक्यामध्ये आहे. त्याहीमध्ये साधने दोन, एक कीर्ति व एक अपकीर्ति. ज्यावर परमेश्वरी कृपा आणि पूर्व सुकृत, तेच कीर्तीचे साधन साधितात. तसेच राऊलाठायी श्रीदया आणि पूर्वार्जित सुगम. तद्योगे या जन्मी पूर्वार्चितांसारिखा सुगम प्रसंग की, जे चित्तीं धराल ते सिद्धीते पावते. अशास स्नेह संपाद्य तर प्रामाणिक ठायींच संपादावा. नसोन संपादिल्या-सारिखा साभिमान पूर्ण धरून आपल्यासारिखे करून दाखवावे. या आशये आमचा हेत. आह्मांकडे अत्रेही बहुत येतात. आह्मीही तशाकरिता अवलंब करितो. परंतु योग घडोनच येत नाही. तस्मात् हा जन्मांतर गुण. ऋणानुबंधे हा योग घडतो. त्यास आह्मीही आपले चित्तीं दृढतर पर्याय आणिला की, प्रामाणिकता स्वामिकाजी, एकनिष्ठ, सत्यसंभाषणी हे गुण राऊलाठायी. तरीच महद्यश संपादोन कीर्ति जगप्रख्यात जाली; आणि आमची रीति वर्तणूक कोणे विचाराची ते परस्परे कळले आहे. पत्री पाल्हाळ लिहिल्या शिफारसीचा प्रसंग दिसतो. त्यास काहीएक विचाराविना प्रचीतीवांचून अनुभवास येत नाही. जेव्हा संग घडतो, तेव्हांच प्रचीतीस येते. तवपर्यंत काय कळे ? आमचे चित्तींचा हेत की, नसोन पदरी पडल्यास साभिमान धरावा. आम्ही सेवेसी अंतर करूं नये, ह्राच दृढतर विचार व्हावा. निजामनमुल्काकडील अनुसंधान कागदपत्र (घेऊन) हेजीब आले. परंतु तिकडील कुविचारास चित्त अप्रशस्त.

किंनिमित्य म्हणाल, तर राऊळाकडे अन्न लाविल्यास एक वेळ सेवा करून दाखवावी. साभिमाने चित्ता योग्य पर्याय जाला तर उत्तम जाले. नाही तर एक वेळ कार्यं करून दावावी. नानाभिमाने अभिमान धरावा हे उचित. परंतु आपल्या थोरपणास श्लाघ्य तेच करणार. आपण म्हणतील की असे काय निमत्य लिहिले, तर राजेश्री अंताजी पंतापाशी द्वैत्यार्थ धरून सिद्धांताची वाट सांगितली, तेच स्मरोन लिहिले आहे. आपले यश पराकडे जाऊं न देणें. येथे असतां तुमचे म्हणोन राहिल्यास स्वपक्षीही नेऊन आपले म्हणोन म्हणविल्याचे भूषण ते करावे. आपण तो साभिमाने योजिला अर्थ सिद्धीते पावतील, हाच दृढतर विचार चित्तीं आणून हाल्ली राजेश्री नारो चिमणाजी सेवेसी पाठविले आहेत. साकल्य सांगतील ती आमचीच वचने जाणून लौकिक उत्तम ते कीजे. सर्वस्वे हरएक विषयी भरोसा मानिला, त्यासारखे थोरपणास उचित ते करावे. बहुत काय लिहिणे, कृपा वर्धमान करावी हे विनंति. ●

---

**क्रमांक : ३०** **इ. स १७५१ ?**

माहादजी गदाधर याची नानासाहेब पेशवे याना विनंती की कैलासवासी शाहू माहाराज यानी जो सरंजाम नेमून दिला तो ठरवून द्यावा, त्या शिवाय आपल्य अडचणी सुटणार नाहीत.

श्री

सकलगुणलंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री वालाजी पंडित स्वामीचे सेवेसी–

पोष्ये माहादाजी गदाधर कृतानेक सा।। नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष आम्ही स्वामी येथे होते तेव्हा आपले वर्तमान सविस्तर स्वामीस निवेदन केले. त्यास स्वामीनीहि सर्व गोस्टी अंगिकारिल्या. परंतु आपण तातडीने

---

● हा लेख इतिहास संग्रह ऐतिहासिक टिपणे, ले. ४३ (पारसनीस संपादित) वरून घेतला आहे.

निघोन गेले. आम्ही यावे तरी आमचे शरीर स्वाधीन नाही. सर्वा गोष्टीने अपंगु पडिलो. अता चिंता इतकीच कीं लोकाच्या ब्रम्हस्वातून निघालो आणि जीवित्व आहे तो माहाराज कैलासवासि यानी सरंजाम नेमून दिल्हा आहे तो स्वामीनी ध्यानांत आणून आम्हास ऐवज नेमून द्यावा व पुढे ताकिदी नूतन देवाव्या आणि कर्जाची वाट करून देविली पाहिजे. स्वामी खेरीज आम्हास आश्रय दुसरा आहे किंवा नाही हे स्वामीस विदितच आहे. येविसीची विज्ञापना राजश्री बाजीराव दामोधर सेवेसी करितील. त्या ध्यानांत आणून आज्ञा कर्तव्य ते केली पाहिजे. विस्तार ल्याहावासा नाहीं. सर्व स्वामीस श्रुत आहे कळले पाहिजे. कैलासवासी स्वामीनी सरंजाम नेमून दिल्हा त्याचा ऐवज आम्हास पावला असता तरी आम्हास कर्ज कशास होते. जिल्हेदारानी गाव सुरलित चालो दिल्हे नाही. तरी स्वामीनी मुकासबाब आम्ही काये घ्यावी ऐसा सिद्धांत करून द्यावा. त्या प्रमाणे वर्तणूक करू. आम्हांविसी राजश्री नानास व राजश्री गोविंदराव चिटनीस यासी ल्याहावे की हरयेकविसी याच्या साहित्यास अंतर न करणे ऐसे ल्याहावे. बहुत काय लिहिणे. लोभ असो दीजे हे विनंती.

---

**क्रमांक : ३१** **दि. ६–२–१७५२**

मातुश्री येसूबाई याना मौजे अर्जुनी हा गाव इनाम दिला आहे म्हणून राणोजी घोरपडे सेनापती यांचे आज्ञा पत्र.

तालीकेची तालीख

श्री

सिका

आज्ञापत्र समस्त सेना धुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री राणोजी घोरपडे सेनापती ता।। मोकदमान मौजे आर्जुनी कसबा लाट प।। हुकेरी सु।। इसने खमसैन मया आलफ. मौजे मजकूर हा गाव साल गु।। मातुश्री येसूबाई याजकडे दिल्हा तो हाली हकदार व इनामदार

खेरीज करून दरोबस्त मौजे मजकूर हा गाव मातुश्री यास इनाम पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने करून दिल्हा असे. त्याप्राो ते मौजे मजकूरचा आन-भव करितील. तुम्ही त्याचे रजेतल्बेत राहून वर्तणूक करीत जाणे. या पत्राची प्रती लि।। घेऊन हे पत्र मातुश्री येसूवाई याजकडे भोगवटीयास देणे. छ १ रा।कर. मोर्तब.

---

क्रमांक : ३२　　　　दि. २१-२-१७५२

मातुश्री आईसाहेब (राजसबाई) यांच्या अस्थी घेऊन महायात्रेस गेल्याबद्दल छत्रपती संभाजी दुसरे यानी रंभाजी खंडोजी चव्हाण यास पांच बिघे जमीन इनाम दिली.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ७८ प्रजापथी नाम संवत्सरे फाल्गुन बहूल त्रितीया गुरुवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्रीराजा शंभू छत्रपति स्वामी याणी रंभाजी बिन खंडोजी चवाण यासी दिल्हे इनामपत्र यैसेजे. तू व तुझे बापाने स्वामीच्या पायासी बहूत निष्टेने सेवा केली व हाली तीर्थरूप मातुश्री आईसाहेब देवाज्ञा पावली त्याची आंगे घेऊन श्री माहायात्रेस रवाना केला होता. तेथून तिरस्थळी यात्रा करून आलास. त्याजवरून माहाराज बहूत संतोषी जाहाले व तुझे चालवणे हे माहाराजास बहूत आवश्यक याज करिता तुजवरी मेहेरबान होऊन मौजे गारगोटी तं।। खानापूर सुभा प्रांत तारळे पैकी जमीन भातरोप दु पिकी किर्दीची जमीन बिघे पाच ७५ जमीन इनाम दिली (इ. इ.)
तेरीख १६
रबिलाखर सु।। इसने खमसैन

---

**क्रमांक ३३** **दि. २६-५-१७५२**

छत्रपती संभाजी दुसरे यांजकडून धोंडो कृष्ण व त्याचे बंधु यांना मौजे चोरवण गावाचे इनामपत्र. यांत धोंडो कृष्ण याचा आजा माहदजी कृष्ण शिवाजी महाराज रायगडावर सिंहासनारूढ झाले तेव्हा " दप्तरदारीच्या धंद्या " वर होता, असा उल्लेख आहे.

श्री

सिका असे तालीक

स्वस्तिश्री राज्याभिशेक शके ७८ आंगिरानाम सवत्सरे जेष्ट वहुल दशेमी भोमवासरे[1] क्षेत्रीय

कुलावतंस श्री राजा
संभु छेत्रप (ती) स्वामी
याणी धोंडो कृष्ण व
१
नारो कृष्ण व बाजी
२
कृष्ण व गणेश कृष्ण
३ ४

उपनाम चिमुल गोत्र काशप सूत्र आश्वलायन खोत मौजे चोरवण ता।। देवाळ सुभा राजापूर यासि दिल्हे इनामपत्र यैसाजे. तुम्ही करवीरचे मुकामी स्वामी सनीध विदित केले की आपले अजे माहादाजी कृष्ण हे किल रायगडी थोरले माहाराज राजश्री —————— कैलासवासी सिवाजी माहाराज सिंव्हासनारूढ जाहाले ते समई किले म।।री त्यास दप्तरदारीचा धंदा होता. त्याउपरी हुजुर सेवा करीत असता पुढे माहाराज राजश्री —————— कैलासवासी संभाजीराजे माहाराज याचे कारकीर्दीस संगमेश्वरचे मुकामी मौजे म।।र हा गाव इनाम करून देऊन सनदा देविल्यानंतर गावचा उपभोग करावा त्यास मोगलाई होऊन आपले पिते कृष्णाजी माहादेव हे देशांतरास पळूण प्र।। सुभा दाभोळ

१ वाराप्रमाणे तारीख काढली आहे

येथे गेले. धामधुमीमुळे पत्रे गेली. याकरिता माहाराजानी कृपाळु होऊन नवीन पत्रें भोगवटीयासि करून देविली पाहिजेत म्हणोन. त्यावरून स्वामीनी मनास आणून तुम्हास नूतन इनाम कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार व इनामदार करून मौजे चोरवण ता।। देवाळ हा गाव देह यक सर्वमान्य करून दिल्हा असे. तरी तुम्ही सदरहू मौज मा।।र पूर्व मर्यादेप्रो चेतु:सीमा आपले स्वाधीन करून घेणे आणि इनाम तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरे(ने) अनभऊन सुखरुप राहाण. इनाम समंधे तुमचे माथा सेरणी रुो २०० दोनशेहे ठेविले. याचा वसूल हुजुर जाहाला. जाणीजे. निदेस समक्ष. मोर्तब असे.

रुजु संमत मंत्री
सुरु सुद बार

---

**क्रमांक : ३४** **दि. २८-५-१७५२**

आता मुहुर्त संपले आहेत. पुढे पाहू, म्हणून भिकाजी शिर्के हवालदार किल्ले-वारुगड यास ताराबाई यांचे पत्र.

॥ श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी राजश्री भिकाजी सिरके हवालदार किले वारुगड यांसी आज्ञा केली यैसीजे. तुम्ही विनंतीपत्र पाठविलेत ते प्रवीष्ट होऊन लेखनार्थ विदीत जाहाला. लग्न प्रसंगाविसी लि।। त्यास लग्न मुहुर्त उरकले. पहिलेच लि।। आसते तर कार्यात कार्य उरकले जाते. नवरा येईल तो मुहूर्त उरकून गेले. येरवी कार्य जाहाले असता पुढे होईल चिंता नाही. जाणीजे. छ २४ माहे रजब. सु।। सलास खमसैन मया व अलफ.

लेखनालंकार मोर्तब सुद

---

**क्रमांक : ३५** **दि. १९–६–१७५२**

मातुश्री ताराबाई यांचें मोकदम मौजे नागाव यास पत्र की सदहू गाव खासगीकडे घेण्यात आला असून त्याची कामाविसी भगवंतराव अमात्य यांच्याकडे दिली आहे. तरी त्याचा वसूल अमात्यांकडे द्यावा.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब यानी मोकदमानी मौजे नागांव ता। वाळवे प्रांत पनाला यासी आज्ञा केली येसीजे.
ता। मजकूरच्या देशकुलकर्णाचा वाद गोविंदराम व माहारुद्र माहादेव याचा आहे. त्या निमित्य मौजे मजकूर पेसजी देशपांडिये यांसी इनाम होता तो दूर करून हुजूर खासगीकडे ठेऊन कमाविसीस राजश्री भगवंतराव पंडित आमात्य याकडे दिला आहे. त्याप्रमाणे करार असे. तर तुम्ही मौजे मजकूरची लावणी करून वसूल राजश्री पंडित मशारनुले यांजकडे देत जाणे. साल गु।।ची बाकी राहिली असेल ते वसूल देणे. जाणिजे. छ. १७ माहे शाबान, सु।। सलास खमसेन मया आलफ. लेखनालंकार.

---

**क्रमांक : ३६** **दि. २७–६–१७५२**

माणदेशातील लोक दंगा करीत होते व वसूल देत नव्हते म्हणून शिवाजी सोळोखे याने तिकडे बंदोबस्तासाठी सैन्य धाडले होते. या कारवाईत सैनिकानी गुरे ढोरे नेली म्हणून महाराणी ताराबाई यांच्याकडे तक्रार आली होती. त्यानी त्या बाबत साळोखे याला जाब विचारला असता तो त्याना कळवितो, की सैनिकानी चार ढोरे नेली हे खरे आहे. परंतु खाटकाला खासगत दीडशे मेंढरे देऊन रवाना केले आहे.

श्री

श्रीमन्माहाराज मातुश्री आईसाहेबाचे सेवसी.
विनंती सेवक सिवाजी साळोखे कृतानेक विज्ञापना. ता। छ. २५ साबान पर्यंत सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. यानंतर आटपाडी प्रांतात स्वारी करून गुरे मेंढरे नेहली, मुलकांत दंगा केला म्हणून आज्ञापत्र सादर

जाहले. तरी मानदेस देखील आटपाडी पेसजीपासून मिरजेचा सरंजाम आलीकडे हालीमाजीमुले[1] दोन वर्ष वसूल देत नाही. येथे लोकानी दंगा केला म्हणून सादर जाहले. च्यार ढोर सापडली ती चौघा सिलेदारानी च्यार नेहली. साहेबी आज्ञा केली की हुजुरबाजारचे खाटिक याची मेंढरे नेली ती सोडून देणे. यैसियासी स्वारीत सापडली तेथे सरकारचीसी कलली नव्हती. मेंढरे थोडी बहूत सापडली ती चौघानी नेली. हुजरून खाटिक व पत्रे आली. येथे शोध करिता ठीक लागेना आणि साहेबाचा हुकुम सोडून देणे म्हणोन यासी उपाय नाही. तेव्हा खासगत थोडी बहूत होती ती मेंढरे सुमार १५० दीडसेहे दिली आणि खाटिक मजकुरास रवाना केले. सेवेसी विदित होय. येथे लोकानी गवगवा केला आहे. याउपरी लोकाची उस्तवारी होऊन सेवकाचा आब राहाये तो अर्थ करणार साहेब धणी आहेत. सेवेसी स्रुत होय हे विज्ञापना.

---

**क्रमांक : ३७** — **दि. १–७–१७५२**

आबाजी व नागोजी सोनार यांच्या विनंतीवरून छत्रपती संभाजी दुसरे यानी त्यांची प्रांत पन्हाळेच्या पोतदारीची सनद पुनः चालू केली.

श्री

शिका आसे

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७९ अंगिरानाम संवत्सरे अषाढ शुद्ध प्रतिपदा सौम्यवासरे क्षेत्रिय कुलोवतंस श्री राजा शंभु छत्रपती याणी

आबाजी व नागोजी बिन अवनपा
सोनार पोतदार प्रांत पनाळा
यासि दिल्हे वतनपत्र येसजे. तुवा

करवीरचे मुकामी स्वामी संनीध विदित केले की आपले पोतदारीचे वतन प्रांत मजकूरचे पुरातन चालत होते. अलीकडे धामधमीयामुळे वतनाचा भोगवटा राहिला आहे. ऐशास माहाराजानी मेहरबान

१. क्रांति; बखेडा.

होऊन पोतदारीचे वतन जीर्णोधार करून देऊन पूर्ववतप्रमाणे वतन चाल्हवायाची आज्ञा केली पाहिजे म्हणून विनंती केली व जीर्णपत्र पूर्वील आणून दाखविली. याजवरून मनास आणिता तूं पुरातन वतनदार तुझा वडील वडिलानी किले पनाळा सेवा करीत आले व तूही सेवा निष्टेने करीत आहेस. या करिता स्वामी तुजवरी कृपाळु होऊन प्रांत।। मजकूरचे पोतदारीचे वतन तुजला करार करून दिल्हे असे. गावगना माहाला-निहाय बी त।।

( यापुढे गावचा तपशील आहे ) येणेप्रमाणे देहे दोनशेहे पंधरा येकूण रुपये सवा चवल पोतदारीस हक करार करून + + तरी तू सदर गावगनाचे पोतदारीचे वतन व हक तूं व तुझे पुत्र पौत्रादि वंश परंपरेने अनभवून वतनाची सेवा करून सुखरुप राहाणे. सदरहू पोतदारीचे वतन स्वामी तुजाला वंश परंपरेने चालवितील. जाणिजे. निदेश समक्ष. सिका आसे.

तेरीख २९

साबान सु।। सलास खमसेन.

---

**क्रमांक : ३८** **दि. २-७-१७५२**

रामाजी देवाजी व बाळाजी भगवंत मंचभट आणि बाळकृष्णभट व बापूभट वाळवेकर यांच्यामध्ये वृत्तीच्या हक्काबाबत तंटा उपस्थित झाला होता. पंचांनी मंचभटाच्या बाजूने निवाडा केल्यावर छत्रपती संभाजी दुसरे यांनी सदहू ब्राह्मणाचा हक्क मंजूर केला.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ७९ आंगिरानाम संव्र ( त्सर ) (क्षत्रिय) (कुला) वतंस श्री राजा शंभु छेत्रपती स्वामी याणी रामाजी देवाजी व बाळाजी भगवंत उपनाम मंचभट गोत्र हरित सूत्र आश्वलायन जोतिषी कर्यात सिरहटी देहे ५ व कर्यात सिरोळे देहे २ यासि दिल्हे दुमालपत्र ऐसाजे. तुम्ही करवीरचे मुकामी स्वामी सनीध विनंती केली की

आपण कर्यात मजकूरचे ज्योतिषी वतनदार पुरातन. आपले वडील-वडिलांपासून वतन आनभवीत असता सालगुदस्ता सन इसने खमसेना-मध्ये बाळकृष्णभट व बापुभट वाळवेकर ग्रामोपाध्ये याणी येऊन कसबे सिरहटीत राहून दसरेचे दिवसी शमी पूजनाचे समई दुराई दिल्ही जे जोतिषपण आपले म्हणो लागले. त्याजवरी आम्ही व वाळवेकर बाळकृष्णभट व बापुभट आसे राजश्री गोपाळ विठल ठाणें सिरोळ याकडे जाऊन वर्तमान सांगितले. त्यावरुन त्यांनी उभयतांस जामीन घेऊन तकरारी लिहून घेतल्या आणि कसबे मजकूरचे वतनदार व कसबे सिरहटीचे उभी पांढर व भोवर गावीचे वतनदार पंचाईत मेळवून मनसुबी मनास आणून वाळवेकर ग्रामोपाध्ये यासि पंचाइतानी विचारले जे तुमचे वतन खरे म्हणऊन गावीचे उभे पांढरीचे साक्षीनिसी पुरऊन देणे. त्यावरून वाळवेकर याणी लिहून दिल्हे जे गावीचे उभी पांढरीचे साक्षीने पुरऊन देऊ न देऊ तर आपण खोटे आस लिहून दिले. त्यावरी आपणास विच्यारिले की तुम्ही आपले वतन खरे आसे गावीचे उभी पांढरीचे साक्षीने व भोवार गावीचे विद्यमान खरे करून देणे. त्यावरून आपण तकरीर केली जे आपले वडिलाचे वेळेस जाहले वर्तमान आमचे चुलते सिवराम भट याणी आपणास सांगितले आहे जे आमचा मूळ पुरुष मंचीभट याची वतने तीन कसबे सिरहटी व देहे साहा येथील जोतिषपण व आष्टेचे ग्रामोपाध्येपण व वाळवेची पोतदारी या वेगळे मिरजकर जोसी याचे घरचे पुरोहितपण आसे आसता आष्टेचे ग्रामो-पाध्येपण तेथील पुरोहित यासि दिल्हे. बाकी वतने दोन राहिली. त्यासी मंचीभटाचा नातू बसो भास्कर श्री माहायात्रेस जाते समई कुमणभट कुंभोजकर सुखवस्तु होता त्यास मुतालिकी साता गावाची दिली आणि कसबे सिरहटी या गावाचे जोतीषपण तुम्हास दिल्हे आहे. तुम्ही जिवंत आसीजे तोवरी मुतालकी करून होते. आसे आसता बतीस वरसानी बसो भास्कर यात्रेहून आपला पुत्र नारायणभट घेऊन आले. त्या समई कुमण भट भेटीस न येता आपणच खावंद म्हणऊन कजिया करूं लागला. मग मिरजेत सिदी आलीचे वेळेस मनसुबी जाहली. रवें जाहले त्या समई कुमणभट यासि रव्याजवळ जाता हात न घालिता + + रवा लागला.

कुमणभट बातल जाहला. दिवाणानी त्याजवर गुन्हेगारी घेतली. त्यानंतर मुतालकीचा कागद कुमणभटाने दिवाणात दाखविला ते वेळेस बसो भास्कर ही गोष्ट खरी म्हणो लागले. त्या उपरी कितीक दिवसा उपरांतिक मागती वाराणसीस बसो भास्कर जाते समई कुमणभट आले जे मी तुमचा होऊन राहीन. आता मजकडून आंतर पडणार नाही. आसे बोलिल्या उपरांतिक आणखी पूर्वीचे बोलीप्रमाणे बसो भास्कर याणी कुमणभट यासि मुतालकी सांगोन माहायात्रेस गेले. त्याज उपरी कुमणभट मरतेसमई वाळवेकर ग्रामोपाध्ये यामध्ये विष्णुभट कुमणभटाचा भाचा होता त्याणे येऊन त्यांचे सार्थक करून सिरहटी व हसूर या दोही गावास जात येत असता बसो भास्कर याचा नातु बसो नारायण आला. त्यासही मंचीभट आसे म्हणत होते. ते आलीयावरी विष्णुभट आपले स्थलास गेले. त्याजपासून बसणभट याचा पुत्र निळकंठभट याचा पुत्र भुजंगभट त्याचा पुत्र सिवरामभट आसे वडिलो वडिली वृति आनभविली व हाली आपण आणभवीत आहो. मिरजेतील रवा घेतला त्याची पत्रे व आणखी कागद व देवदेवतार्चन मिरज नागवली ते समई आवघे गेले ऐसा करीना लिहून दिल्हा. त्यावरून पंचाइतानी भोवर गावीचे सड्या आणविल्या. त्याणी लिहून दिल्हे जे मंचभट याचा वंश निळकंठभट याचा पुत्र भुजंग भट त्याचा पुत्र सिवरामभट त्याचा पुतण्या रामाजी देवाजी व बाळाजी भगवंत हे वृति आनभवीत आहेत. याखेरीज वाळवेकर ग्रामोपाध्ये आपणास दखल नाहीत ऐसे कसबे सिरहटीकर उभी पांढर व हसूरकर व कनवाड व कुटवाड व घालवाड व आर्जुनवाड व मिरजकर जोसी व देव याणी लिहून दिल्हे व सिरहटी व हसूरकर कुलकर्णी गिरमाजी दुमाजी व रामचेंद्र कुबाजी याणी लिहून दिल्हे जे आपले वडिली आपणास सांगितले होते जे वाळवेकर ग्रामोपाध्ये येथील जोसी आसे बोलत होते. त्याचे कागदपत्र काही तुम्हा जेवळ आहेत की काय म्हणऊन पंचाइतानी विचारले. त्यास ते बोलिले जे आपणापासी कागदपत्र नाहीत. त्याचा भोगवटा ऐसी वरसे नाही. येणेप्रमाणे गावगनाचे तक्रिरी आल्या. त्या मनास आणून आम्हास विच्यारले जे तुम्हा जवळ कागदपत्र असतील

ते घेऊन येणे [१] ( त्यावरून आम्ही बोलिलो आपणाजवळ कागदपत्र असतील ते घेऊन येणे ) त्यावरून आम्ही बोलिलो आपणाजवळ कागदपत्र काही नाहीत. उभी पांढर व श्रीकृष्ण व श्रीदेव हे सांगतील तें खरें. त्यांवरी वाळवेकर यासि विचारलें तुम्हांजवळ कागदपत्र असतील ते घेऊन येणें. त्यावरून त्यांस तूं (?) पंचाइतापासी येक तालीक दाखविली आणि त्याचे आसलपत्र आहे ते घेऊन आटवे रोज ती मुदतीस न आलो तरी आपण खोटे आसें जबानी करार करून गेलेस दाहवें रोजीं आले. त्यास दुसरे पत्र तांकीद येक आणून दाखविली. ते पांचाचे विचारें पाहातां बचील जाहली. पहिली तालीक दाखविली होती ते पत्र कोठें आहे म्हणऊन विचारले. त्यास तें बोलिलें जें वाळवेकर देशपांडे याणी ते पत्र कामाचे नव्हे म्हणऊन फाडून टाकिले. आसें बोलिले. त्या उपरी पाचाइतानी पूर्वेतर मनास आणून सिघात केला आणि उभी पांढर यांसी सांगितले जे तुम्ही आपले पूर्वेजा(स) सत्य स्मरोन या उभयतांतून तुमचा जोसी व वतनदार जो खरा आसेल त्यास हातीं धरणे. त्यारून त्याणी उभे राहून बोलिले जें सिवरामभट याचा पुतण्या रामाजी देवाजी व बाळाजी भगवंत हे जोसी खरे म्हणऊन हाती धरले घेऊन गेले. त्यावरून पंचाइताचे विचारे वाळवेकर ग्रामोपाध्ये खोटे जाहले. रामाजी देवजी व बाळाजी भगवंत वतनदार जोसी पुरातन याचे वतन खरे जाहले आहे. यानी वतन आनभवावे. वाळवेकर ग्रामोपाध्ये खोटे यासि वतनास समंध नाही असे पाचानी सिरोळचे थळीं निवाडा करून थलपत्र करून दिल्हे आहे. त्याप्रमाणे माहाराजाणी वतन आपले दुमाला करून दुमालेपत्र देविले पाहिजे म्हणून विदीत केले व थलपत्रहि आणून निवेदिले. त्यावरून मनास आणिता वाळवेकर ग्रामोपाध्ये खोटे जाहले. तुमचे वतन खरे जाहले. त्यावरून स्वामी तुम्हावरी कृपाळु होऊन जोतीषपणाचे वतन दुमाला केले आसे. गावगना बी तपसील ——————

---

१. मुळातच दुबार.

कर्यात सिरहटी प्रा। मिरज
पैकीदेहे

१ कसबा मजकूर
१ मौजे घालवाड
१ मौजे कुटवाड
१ मौजे कनवाड
१ मौजे हसूर
—
५

कर्यात सिरोळ प्रां। रायबाग
पैकी देहे
१ मौजे आर्जुनवाड
१ मौजे चिंचवाड
—
२

येणेप्रमाणे सात गावीचे जोतीषपणाचे वतन आसे. तरी संदरहू गावचें जोतीषपणाचे वतन व हक इनाम कानु काइदे पुरातन चालत आले आसतील त्याप्रमाणे तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंश परंपरेने आनभऊन सुखरूप राहणें. वाळवेकर ग्रामोपाध्ये खोटे आहेत. यासि तुमच्या वतनांसी संमंध नाही. तुम्ही वतन आनभऊन स्वामीस कल्याण चिंतून सुखरूप राहाणे. वतनसमंधे तुमचे माथा शेरणी रुपये १०० शंभर ठेविले. याचा वसूल हुजुर जाहला. तुम्ही वतन आनभऊन सुखरूप राहणे. जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब
तेरीख १
रमंजान सु।। सलास खमसैन मया आलफ.

---

**क्रमांक : ३९** **दि. ९–७–१७५२**

संभाजी दुसरें यांजकडून मादोभट गुळवणी यास मौजे नरंदे गांवच्या ज्योतिषपणाचे वतन इनाम. पती मरण पावल्यावर स्त्रीला दत्तक घेण्याचा अधिकार नाही ही गोष्ट सनदेत नमूद केली आहे.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७९ अंगीरानाम संवत्सरे आशाढ शुध दशमी गुरुवासरे[1] क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती याणी वेदमुर्ती रा।। मादोभट बिन त्र्यंबकभट उपनाम गुळवणी गोत्र वासीष्ट सुत्र अश्वलायन यासी दील्हे वतनपत्र ऐसाजे. तुम्ही हुजूर येऊन विनंती केली की आपण कुटुंबवत्सल. राहावयास वतन नाही. माहाराज धर्म-

१ तारीख वाराप्रमाणे काढली आहे.

परायण आहेत. तरी आपणास येक गाव जोतीसपणाचे वतन करून दील्हीया कुटुंबसहीत त्या गावी राहोन वतनाची सेवा करून समर्थ जे उत्पन्न होईल ते भक्षुन माहाराजास कल्याण चींतुन राहु म्हणुन. त्या वरून मनास आणीता तुम्ही भले. तुम्हास येक गांवचे उत्पन्न वतन करून दीलीया तेथील ज्योतीसी वतनसंमधे उत्पन्न होईल ते भक्षुन माहाराजास कल्याण चींतून राहाल हे जाणून तुम्हास मौजे नरंदे क॥ वडगाव येथील जोतीसी रामभट बीन आमणभट उपनाम पैत ( ? ) गोत्र + + + याचे जोतीसपण होते त्याचे नकल जाहाले. त्याजवरून मौजे मजकुरचे देशमुख व देशपांडे व मुकादम यासी हुजूर आणून आज्ञा केली. त्यास त्याणी विनंती केली जे रामभट निधन पावले. त्याची स्त्री बकाई आहे तीच्या पोटी दोघी कन्या मात्र आहेत. पुत्र संतान नाही व गोत्र पुरुशही कोणी नाही. तया करीता ती येक कनेचा पुत्र वोटेत घेणार होती म्हणून वीदीत केले. त्यावरून देशमुख देशपांडे व मुकादमास आज्ञा केली जे भ्रतार वारला असता वाईकोस मुल घ्यावया अधीकार नाही. तरी तुम्ही त्या बाईकोस हुजूर घेऊन येणे ऐसी आज्ञा केली. त्यास देशमुख देशपांडे व मुकादमानी वीनंती केली जे ती बाई मौजे मजकुरी नाही. आपले कनेकडे गेली आहे. तीचा शोध करून आणीतो म्हणून महीनेचा वाईदा करून गेले. त्यास वाईदेस च्यार महीणे जाहाले. नंतर माहाराजांची स्वारी वडीगावास जाली ते समई मुकादमास आणुन वीचारीले. त्यास त्यानी वीनंती केली जे बाईको येत नाही. माहाराज धणी आहेत. आज्ञा होईल त्याप्रमाणे वर्तणुक करूं. त्यावरुन मनास आणीता ता॥ मौजे मजकूरचे जोतीशपणाचे वतन नुतन मौजे नरंदे येथील दत्त करून दील्हे असे. तरी तुम्ही मौजे मजकूरचे जोतीशपणाची चाकरी करुन ईनाम लाजीमा पुर्ववतप्रमाणे तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादी वंशपरंपरेने अनभऊन माहाराजांचे राज्यास अभीवृद्धी व कल्याण चिंतून सुखरुप राहणे. ती बाईको आलीया ती जिवंत आसीजे तोपावेतो तिजला अन्नवस्त्र देऊन चालवणे. मौजे मजकुरचे जोतीसपणाचे वतनास तिजला समंध नाही. तुम्ही वतन अनभवीत जाणे. जाणीजे. निदेश समक्ष.

तारीख ७

रमजान सु॥ सलास खमसैन

क्रमांक : ४० दिनांक १८-७-१७५२

सौ. लक्ष्मीबाई मोहिते यानी ताराबाई याना पाठविलेल्या या पत्रांत रत्नाकर विठ्ठल यानी केलेल्या हल्ल्याचा वृत्तांत दिला आहे. त्या म्हणतात की " आज्ञेवरून येत असता मार्गी दगा करावयाचे ( त्याचें ) मानस होते."

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आई

साहेब साहेबाचे शेवेसी.

आज्ञाधारक सौभाग्यवती लक्ष्मीबाई मोहिते विज्ञापना. त।। छ १७ रमजान भृगुवासरपर्यंत आपत्याचें वृत यथास्तीत असे. विशेष साहेबांची आज्ञा घेऊन स्वार जाहालो ते छ १६ गुरुवारी इंदोलीस येऊन जेवण करावयास राहिलो. तेथील बातमी राखोन राजश्री रत्नाकर विठल याणी दोनशे प्यादे व दोनशे स्वार तासवडे याचे उतारावरी उतरोन आम्हावर धावत होते. चिरंजीव कानोजी मोहिते गडावरून उतरून आम्हाकडे येत होते. आम्हास रा।। रत्नाकर विठल यांची बातमी कळली. मग इंदोलीहून उठोन चेरगांवचे मार्गे गडाकडे गेलो. चिरंजीव तलबीडचे मार्गे खाली उतरला. तेथे त्याची गांठ पडली. पनास माणूस शस्त्रें करून ठार जाहले. शंभर माणूस पाणियांत उड्या टाकून मेले. या खेरीज शंभर माणूस जखमी जाहले. चिरंजीवाकडील पंचवीस माणूस जखमी जाहाले. दोन च्यार ठार जाहाले. याप्रकारची वर्तणूक रा।। रत्नाकरपंत करितात. आज्ञेवरून येत असता मार्गी दगा करावयाचे मानस होते. परंत साहेबाचे पुण्य प्रतापे पराजयास पावले. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

पै।। छ १७ रमजान सु।। सलास

खमसैन

क्रमांक : ४१ दि. २६–७–१७५२

मौजे बोरिवडे गावास मगदुम नव्हता. ती मगदुमकी आपणास मिळावी म्हणून सदहूं गावाचा कुळवाडी रखमाजी याने छत्रपती संभाजी दुसरे यांना अर्ज केला असतां त्यानी त्याला दिल्रेली ही सनद आहे.

श्री

शिका असे

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७९ अंगिरानाम संवछेर अशाढ बहुल द्वादसी[1] भानुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपती स्वामी याणी रखमाजी मगदुम मौजे बोरिवडे तर्फ सातवे यासि दिल्हे वतनपत्र येसिजे. तूं पुरातन मिरासी कुळवाडी गुडाळकर मौजे मजकुरी नांदत होतास. त्यास स्वामीसंनीध्य विनंती केली की मौजे म।।रचे मगदुमकीचे वतनदार कोणी नाही. तरी स्वामी कृपाळु होऊन वतन आपणांस करून दिलियाने वतनाची सेवा करून राहू. त्यावरी स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन मौजे म।।रचे मगदुमकीचे वतन नूतन तुजला करार करून दिल्हे आसे. या वतनास इनाम भात रोप जमीन

| बिघे | पालक | |
|---|---|---|
| ८२ इनाम | १ घर | सवासीण |
| ८२ अर्जी इनाम कीर्दी | १ म्हैस | मखदुमाची |
| ८४ | २ | १ |

येणेप्रो इनाम च्यार बिघे व पालक घर व मैस व सवासणी प्रो करार करून वतन दिल्हे असे. तरी तू सदरहू मखदुमीचे वतन व इनाम पालक तूं व तुझे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन वंतनाची सेवा करून सुखरुप राहाणे. वतनासमंधे तुजे माथा शेरणी १५० दिडशेहे ठेविली याचा वसूल जाला. निदेश समक्ष. शिका आसे.

तारीख २५

रमजान, सु।। सलास खमसेन.

---

१ वाराप्रमाणे तारीख दिली आहे.

**क्रमांक : ४२** **दि. ११-८-१७५२**

पत्रलेखक ताराबाईंना लिहितो की, सुलतानजी घाटगे याने लूटमार केल्याने मुलुखाची हानी होऊन रयत पळून गेली आहे. शिबंदी ठेविली आहे; परंतु तिचा रोजमुरा घालण्यास पैसा नाही, तरी त्याची व्यवस्था करावी.

उदाजी चव्हाण, हरिपंत व सिदोजी थोरात हे तिघे एक झाले आहेत असे पत्रलेखक म्हणतो.

श्री

पै।। छ २४
सौवाल

पुरवणी श्रीमंत माहाराज
मातुश्री आईसाहेब साहेबांचे शेवेसी.

विज्ञापना. डफलापुरी (?) सारेच जमा होऊन मुलूक मारतात म्हणोन सेवेसी विनंती लिहिली. तो छ. १२ सैवाली वांगीचे ठाणेहून राजश्री सुलतानजी बाजी घाटगे धाऊन मौजे निबलक व मौजे चिखलगोठण व मौजे बोरगाव व मौजे मोराले यैसी चहू गाविची गुरे नेली. गांवचे पाटील नेऊन गांव लुटिले. यैसा चहूकडून दंगा मांडिला आहे. त्यामुळे मुलुक खराब पडिला. रयेत पलोन गेली. यैशा च्यार आवर्ती जाल्या. खंडणिया च्यार जाल्या. हे पांचवी खंडणी रयेतेने कोठवर सोसावे किलेचा तनखा जुजबी होता. होती खेडी ती ह्या दंगियानी पलाली. सेवकानी सिवबंदी भारी ठेवली आहे. लोकास प्यादेस काये द्यावे. ते बातमीची आज्ञा करणार धणी समर्थ आहेत. या नंतर राजश्री हरिपंत याही राजश्री उदाजी चव्हाण हिंमत बाहादर यांजकडे जाऊन फौज घेऊन आले. फौजेचा मुकाम आजि छ. १२ सैवाली राजणी धूलगावावर जाला आहे. मजल दरमजल जाऊन राजश्री सिदोजी थोरात यांची कुमक करितात. सेवेसी विदित व्हावे म्हणून विनंती लिहिली असे. विदित जाले पाहिजे. र।। उदाजी चव्हाणाची व हरीपंताची व थोरातांची क्रिया

जाली आहे. अष्टे घेतलेवर सेवकासी कजिया करावा यैसा करार जाला आहे. यासी अंतर नाही. तर साहेबी हे गोष्टीचे पारपत्य होंऊन सेवकाचा उपराला होय ते आज्ञा करणार धणी समर्थ आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

**क्रमांक : ४३** **दि. २२–८–१७५२**

अमृतराव खोपडे व बाळोजी खोपडे यांच्या वतनाचा कज्जा सोडवावा म्हणून नानासाहेब पेशवे यानी ताराबाई याना केलेली विनंती. ताराबाईनी नानासाहेब पेशवे याना आज्ञा केली होती की, अमृतराव खोपडे याचे वतन मोकळे करावे.

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब साहेबाचे सेवेसी विनंती. सेवक बालाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना. ता।। छ० २३ सवालपर्यंत साहेबाचे कृपे (करून) सेवकाचे वर्तमान येथास्थीत असे. विनंती. अमृत (राव) खोपडे याचे वतन अमानत केले ते मोकळे करावयाची आज्ञा. यैशीयास अमृतराव याचा व बालोजी खोपडे याचा कजीया आहे. तो मनास आणून विल्हे लाविले पाहीजे. त्याचा इनसाफ करून विल्हेस लावावयाची आज्ञा साहेबी सचीव पंतास करून मनसुबी करवावी. मनसुबीमुळे ठरेलल्या प्रमाणें विल्हे लावावे उचीत असे. बालोजी खोपडे त्यास सुटत नाही हा अर्थ प्रसिधच आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

रसीदती छ. ८ माहे जिलकाद

सु।। सल्लास खमसैन.

---

**क्रमांक : ४४** **दि. २३-८ १७५२ (?)**

राज्यातील सर्व सरदारांना पत्रे पाठवून आपणास सामील होण्याबावत कळविले आहे. मल्हारराव होळकर व जयाप्पा शिंदे नर्मदा उतरले असल्याने आपणाला तिकडे सत्वर जावे लागत आहे, असे नानासाहेब पेशवे ताराबाईना लिहितात.

श्री

श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब साहेबांचे सेवेसी :—
विनंति सेवक बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना तागाईत छ २४ सवालपर्यंत साहेबांचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे. विशेष, सेवक दरमजल पेडगांवास येऊन पोहोचले. पाटसाखरी राजश्री माहाराव जानोजी जशवंत निंबाळकर यांची व नसीरजंग याची भेट ज़हाली. बोलणे चालणे तेही होईल. सरदार गाजुद्दीखान सुद्धां नर्मदा उतरले. याउपरी मजल दर मजल पुढे जातो. त्यास राज्यांतील लहान थोर सरदार यांस पत्रे चित्तापासून पाठवून सेवकास सामील होणे ऐसी अविलंबे सादर होऊन येत ते करावे. एतद्विषयींची विनंति पहिली केलीच आहे. त्याजवरून जे साहेबांचे चित्तांत उचित आणि राज्यकारभारास व या उमद्या मनसुब्यास योग्य तेच गोष्ट साहेबीं चित्तापासून करणे ती केली असेल. विस्तार लिहावा तरी सर्वज्ञ साहेब आहेत. निरंतर कृपापत्री सांभाळ करणार साहेब समर्थ आहेत. राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री जयाजी शिंदे नर्मदा उतरले. या उपर सत्वरच सेवकास जावे लागते. सेवेसी विदित आसावे, यास्तव लिहिले असे. सर्व साहेबांचे कृपेकरून उत्तमच होईल. श्रुत होय हे विज्ञाप्ति. ●

---

● हे पत्र पारसनीस संपादित इतिहाससंग्रह ऐतिहासिक टिपणे लेखांक ८ वरून घेतले आहे.

**क्रमांक : ४५** **दि. १-९-१७५२**

ताराबाई यानी गोपाळराव पांढरे याना दर्शनास यावे म्हणून लिहिले असता त्यांनी उत्तर पाठविले की, बावन्न महालांची राजपत्रे करून पाठवावी अथवा नालबंदीसाठी एक लक्ष होन पाठवावे, म्हणजे फौजेची व्यवस्था लावून भेटीस येतो.

श्री

माहाराज मातोश्री आईसाहेब सेवेसी–

आज्ञाधारीक गोपाळराव पांढरे शरिफनमुलुक विज्ञापना ऐसीजे-येथील कुशल भाद्रपद सुध पंचमी भोम्येवासरे जाणून माहाराजांही लेखनानंद वैभव लेखन आज्ञा केली पाहिजे. विषश कृपाळु होऊन अज्ञापत्र प्रेरिलें ते उतम समई पावोन आनंदावाप्त जाहलों. माहराजाही अज्ञा फर्माविल जे पुरवीपासोन राज्यांतील लोक सेवा चाकरी करून ऊर्जित करून घ्यावा सत्वर दर्शनास याव मणून. तर येदअर्थी सेवक लोकासही हाच हेत आहे. परंतु सांप्रत कर्जदारास व भले लोकास गवगवा पडला आहे. याउपर सरंजामीच मजकूर श्रीमंत बाबासाहेबी अमित्रास अम्हास दुहीचा प्रसंग लाऊन मुलकातील पैसा हातास येऊ देत नाही. कोणते आधारावर फौजबंदी करून दर्षनास याव हा वर्तमान माहाराजास परसपर श्रवणावगत होत असेल. सांप्रत सेवेसी विनंती लिहिल जात जे पुरवील सरंजाम बावन माहालाची राजपत्र करून पाठवाव अज्ञा प्रमाण, सेवेसी तप्तर असो किंवा नालबंदी वदल तत्व होन लक्षे पावविल्यान फौजेच निगादास्त करून तत्पर हाजीर होऊ. वरकड कितेक अर्थ जोगोजी दळवे व आपाजी खंडागळे सेवेसी निवेदन करिता चित्तावगत होईल. बहुत काये लिहिण हे विज्ञापना

पै।। छ १४ जिल्काद सु।।
सलास खमसेन मया आलफ.

क्रमांक : ४६ दि. २०-९-१७५२

सुभानजी सूर्यवंशी याचे ताराबाई याना पत्र की, करवीरला जासूद पाठविले त्याना दहाबारा दिवस दरवाजा आंत घेण्यात आले नाही. अखेर सिंदोजी थोरातास अष्ट्यातून उठवून लाविल्यावर जासुदांकडे आपले लखोटे दिले. ते सेवेस सादर केले आहेत.

श्री

श्रीमन्माहाराज मातुश्री ———— आई
साहेब साहेबाचे सेवेसी————

सेवेसी आज्ञाधारक सुभानजी नाईक सूर्यवंसी कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ. ११ जिल्कादपर्यंत साहेबाचे कृपाद्रिष्टीकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित आसे. यानंतर साहेबाकडून पत्र येऊन परामृश होत नाही तेणेकरून चित स्थिर होत नाही. निरंतर सेवकाचा सांभाळ करावया साहेब धणी आहेत. साहेबी करवीरवासी यासी पत्र दिले त्यास ते पत्र देऊन जासूद करविरास रवाना केले. ते जासूद त्यानी दरवाजेच आत येऊ दिले नाहीत. दाहा बारा रोज जासूद दरवाजेच बाहीर ठेविले. त्यास येऊ देखील दिले नाही. जेव्हा थोरात आस्टेहून उठऊन लाऊन दिले यैसे वर्तमान यैकिलेवरी मग जासुदापासी लखोटे आपले करून दिले आहेत. ते साहेबाकड पाठविले आहेत. त्यात कार्ये मजकूर आहे हे साहेबास कळेल. वरकड आम्हा कडील सविस्तर पेशजीचे पत्री लिहिले आहे त्यावरून सेवेसी निवेदन जाहले आसेल. क्षणक्षणा सेवकाचा परामृश करणार साहेब धणी मायेबाप आहेत. कळले पाहिजे. सेवेसी श्रुत होय (हे विज्ञाप्ति) ×
पाठीमागें पै।। छ १७ जिल्काद

———

× वळण निराळें.

**क्रमांक : ४७** **दि. २८-९-१७५२**

यशवंतराव मोहिते याने खटाव भागात जो उपसर्ग केला त्याचे वर्णन बुऱ्हाणजी मोहिते यानी ताराबाई याना पाठविलेल्या या पत्रात केले आहे.

श्री

श्रीमंत महाराज मातुश्री—आईसाहेबाचे सेवेसी

सेवेसी आज्ञाधारक बऱ्हानजी मोहिते कृतानेक विज्ञापना. येथील कुशल ता।। छ० १९ जिलकाद पावेतो सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. माहाराजाची आज्ञा घेऊन आलो. त्यास राजश्री येमाजीपंताची भेटी जाहली. त्याउपरी खटावा ++++ श्रीची समाराधना व तीर्थरूप बावासाहेबांचे श्राध करून येत होतो. त्यास राजश्री येशवंतराव मोहिते प्रतिनिधीची आज्ञा घेऊन मायेणीस जाते समई खतगुणच्या पाटीलकीची घोडी जबरदस्तीने देशमुखीच्या हकाबदल घेऊन गेले. त्यास बहुत प्रकारे बोध करून पत्रे लिहून माणसे पाठवून घोडी आणविली. त्याउपरी आम्ही निघोन रविवारी चिमणगावास आलो. बुधवारी राजश्री येमाजीपंत व आम्ही किनईस आलो. पंतप्रतिनिधीची भेटी जाहाली. आम्ही डेरीयास आलो तो रात्री खटावाहून पत्रे आली कीं—येशवंतराव मोहिते याही तमाम गावगना देशमुखीच्या हकाचे रोखे उपसर्ग आरंभिला आहे. खासगत इनाम गाव वाकेसर यास रोखा पाठविला आहे की रुपये शंभर हकापैकी घेऊन पाटील व कुलकर्णी येणे. दाहा माणसे गावांत बैसऊन पाटीलकीस मारामार करितात यैसे वर्तमान आले. हे वर्तमान माहाराजास कळावे म्हणऊन लिहिले आहे. आज्ञा कर्तव्य ते करावी. (तेणे प्रमाणे वा) गणूक करू. आपले वितरीक्त सेवकास कोणताही विचार कर्तणूक (?) करीता येत नाही. यास्तव (माहा)राजाचे सेवेसी लिहिले असे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

पै।। छ० १९ जिलकाद सु।।
सलास खमसैन मया आलफ

क्रमांक : ४८ दि. ९-१०-१७५२

शाहू महाराज निधन पावल्यापासून मुलखात सर्वत्र अंदाधुंदी माजली आहे. किल्ला कर्जवाम काढून हजार पाचशे प्यादे व हजार पाचशे स्वार ठेवून ताब्यात ठेवला. परंतु आता परिस्थिती हाताबाहेर गेली आहे. तरी शिबंदीची व्यवस्था करावी, म्हणून शिवाजी साळोखे याचे ताराबाई यांना पत्र.

श्री

श्री मन्महाराज मातुश्री आईसाहेब साहेबाचे सेवेसी.

विनंती सेवक सिवाजी साळोखे कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान ता।। छ १ जिल्हेज पावेतो साहेबाचें कृपाकटाक्षे सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. विज्ञापना. साहेबी आज्ञापत्र सेवकास सादर केले तेथे आज्ञा केली की, आकलखोप व येरडोली इमारतीच्या कामा ब।। राजश्री राणोजी भोसले यांकडे देवीले आहेत, त्यास रोखापत्र न करणे व गुदस्ता यैवज घेतला असेल तो माघारा देणे. तरी माहाराजानी कैलासवास केलीयापासून मुलकात डोहाणा होऊन प्रांत खराब जाहाला. किल्ल्यास वेध बहुताचे लागले. सेवकाने हातचे पदरीचे कर्जवाम व जेथवरी हात पावले तेथवरी यत्न करून मिळेल तेथवरी मिळऊन साहेबाचा किला हजार पाचसे प्यादे, हजार पाचसे स्वार ठेऊन जतन केला. या उपरी कर्जही मिळेना. मुलकातहि चहूकडील धुंदीमुळे काही ताकद राहीली नाही. येविशीचा सविस्तर अर्थ लिहून व किलाचा हिसेब लिहून राजश्री राघो अनंत याबराबर सेवेसी लिहून पाठविला आहे. आणीकही वरचेवरी विनंतीपत्रे सेवेसी पाठविली. परंतु आम्हाविसी साहेबास विनंती कोणी फळे न येऊन उस्तवारीचा प्रसंग घडोन आला नाही. सेवक तो साहेबाच्या चरणाविना दुसरे दैवत जाणत नाही. साहेबी इतबारी हरकोणी पाठऊन येथे स्वार किती प्यादे किती आहे किलास यैवज काय आहे हा सर्वही म।। पाहून येथील बेबूदी बेगमी कोण प्रकारची पाहिजे धण्याचा जागा जतन कोणत्या विचारे होईल हा सर्व अर्थ सेवेसी निवेदन करील. तदनुरुप साहेबी सेवकाची बेगमी सिबंदी सारे अर्ती केलीया सेवक ज्याप्रमाणे आज्ञा होईल त्याप्रमाणे वर्तणूक करील. सेवकापासून तिळतुल्य अंतर होणार

नाही. गावहि या प्रांती पाच सात आहेत ते साहेबाचे खासगीचे. किलाहि खासगीचा. आमचे काही वतन नाही. आम्ही कोठवरी साहास करावा. खासगीच्यां गावांमुळे तरी साहेबास किल्याचे लोकांचे आदी अंत वर्तमान कळेल. सेवकहि दंग्यात पडला आहे त्याची मुक्तता होईल. केवळ पाच सात गाव हेच खासगीचे आणि किला काही परकीयाचा नाही. गावहि साहेबाचे व किला व लोकहि साहेबाचे. सेवक आज्ञाधारक येक शाहाणा माणूस पाठवून येथील सर्व आर्थ पाहून बेगमी करणार साहेब धणी आहेत. राजश्री नरसी पंतहि येथील सर्वार्थ सेवेसी विनंती करीतच आहेत. आमची लिहा-वहायाची तो सीमा जाहाली. याउपरी साहेब धणी आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पै।। छ. १० जिल्हेज

---

**क्रमांक : ४९** **दि. ३०-१०-१७५२**

पत्र ताराबाईना लिहिलेले आहे. कान्होजी मोहिते यांचे युद्धाचे आव्हान आल्याने तें आपणास स्वीकारावे लागले. आपणाकडील जी माणसे स्वामी कार्यावर पडली. त्यांच्या बायकामुलांच्या उपार्जनाची व्यवस्था करण्याची आज्ञा करावी, अशी विनंती पत्रलेखकाने केली आहे.

पत्र बहुदा शिवाजी साळोखे याचे असावे.

श्री

सेवेसी विज्ञापना. ता।। छ २२ जिल्हेज पावेतो साहेबाच्या कृपादृष्टीकरून सेवकाचे वर्तमान येथास्थीत आसे. छ. २० जिल्हेजी राजश्री कान्होजी मोहिते याणी येक दोन पत्रे आम्हास लिहिली की तुम्ही ऊंबरजेस का बैसलेत, आज युद्धात येणे. न या तर तुम्हास शफत आहे ऐसे लिहिले. आम्ही त्यास लिहिले तुम्ही खिडी आलीकडे येणे. त्यास त्रीतीये प्रहरी ते स्वार घेऊन खिडीची दोनी तोंडे कानडे प्यादे बैसऊन आपण खिडीत उभे राहिले. आम्हाकडील स्वार त्या समोर जाऊन ओढ्या आलीकडे उभे राहिले. ते पुढे न येत. प्याद्याचे सामान पोख्ते अडचणी मेट बांधोन दोही कडील डोगराच्या सोंडास प्यादे बैसऊन आपण मध्ये

उभे राहून आमच्या स्वारास शफत घालून प्याद्याच्या मान्यात बोलावीत इकडील स्वार मैदानांत हटकीत. यैसे बोलता दोन तीन घटका दिवस उरला. स्वार माघारे न येत म्हणून येक दोन वेला स्वारास माघारा था म्हणून राऊत पाठविले. गैरवख्त जाला. ते न येत तेव्हा आम्ही मागाहून से पनास स्वारानसी आपले स्वार माघारे घेऊन यावे म्हणून पाठीवर गेलो. तो आमचे स्वार पुढे होते त्याणी जलदी करून घोडी चालविली. तेव्हा ते खिड सोडून मागे गेले. दुतर्फा प्यादे खिडीच्या दो सोंडास होते ते डोंगरावर चढले. तेव्हा आम्हाकडील पाव लोक जेजलबारदार व पालकर करोन केसरकराकडील प्यादे थोडेसे खिडीत जाऊन पोहोचले. त्याणी डावे हाताकडील डोंगरावर प्यादे मोहित्याचे चढले त्यावर गेले. उजवेकडील खिडीचे सोंडेस प्यादे होते त्यावर पालकर प्यादे व चौरकर हे गेले. तो दिवस अस्तमान जाला. जेजलबारदार दोघे चौघे गडी व केसरकराकडील दोघे चौघे वसंतगडचे सुलतानखान वगैरे दोघे आठ दहा माणूस याणी प्यादे पिटीत कड्या पावेतो नेले. तेथे त्याणी नेट धरून माघारे फिरले तेव्हा जेजलबारदार याणी व केसरकराकडील प्यादे यानी जे दाहा पाच माणूस चढले होते त्याणी फारसी मर्दुमी केली. संभाजी नाईक बाइंग याचा भाऊ त्यास जखमा तरवारेची मानेवर लागली. गोदजी नाईक चिकणा याणे शर्त केली. त्यासही उजवे खांद्यावर तरवारेची जखम लागली. सुताळी तुटोन घरनोले थोडसे उठले तो डोंगराखाले झडत पडत आला. अंधार पडत आला. केसरकराकडील तिघे जखमी जाले. आणि रा।। नाइकाकडील दोघे यैसे सातजण जखमी जाले. मोहित्याकडील पाच सात जखमी जाले. दोघे ठार पडिले यैसे वर्तमान आहे. आम्हाकडील सात जखमी पैकी जेजलबारदार गोदजी चिकणे मुकामा आल्यावर मृत्य पावले. वरकड जिवंत आहेत. जखमा बांधत आहो. खर्चा वेचाची बेगमी करणार साहेब धनी आहेत. साहेब कामावर माणुस पडले उठले फाटले त्याच्या मुलामाणसास अन्नवस्त्र देऊन चालविल्याने साहेब कामावर माणसास उमेद चढते. प्रस्तुत गोदजी नाईक चिकणा बरा माणूस स्वामी कार्यावर कामास आला. त्याच्या मुलामाणसास अन्नवस्त्र देऊन इनाम इक्रम[1] द्यावयास आज्ञा करावी. गोदजी नाईक चिकणे

---

१ देणगी

जेजलबारदार येथे साहेब कामावर पडिला. त्याचा भाऊ सिदोजी ना। चिकणा हुजूर जेजलबारदारात आहे. त्यास हुजूर बोलाऊन त्याचे बहुत प्रकारे समाधान करावे. वरकड संभाजी नाईक बाईग यांचा भाऊ जखमी आहे व आणखी जखमी आहेत. त्याची सर्फराजी खर्चा वेचाची बेगमी वस्त्रे पाठवावयासी माहाराज साहेब समर्थ आहेत. जेजलबारदाराचा रोजमुरा शाही सिरस्ता प्रो दोन महिने राहिले आहेत तें त्यास देऊन त्याचा आवघा जमा रवाना करावा. सेवेसी श्रुत होयें हे विज्ञापना.
पै।। छ. २३ जिल्हेज
( सु।। सलास खमसैन
मया व आलफ )

---

**क्रमांक : ५०** **दि. ३०-१०-१७५२**

गोविंद भट, रामचंद्रभट व बाळंभट या तिघाना ताराबाई यानी पावणे पांच बिघे जमीन अग्रहार इनाम दिली.

सदहू जमीन उपर्युक्त ब्राह्मणाच्या वडिलाना शिवाजी महाराजांकडून इनाम मिळाली होती. परंतु तुळाजी आंग्रे यानी वसुलीसाठी त्यांना उपद्रव सुरू केल्याने त्यानी ताराबाईकडे दाद मागितली होती.

श्री

श्रीमंत माहाराज मातोश्री—आईसाहेब याणी वेदमूर्ती गोविंदभट बिन रामभट व रामचंद्रभट बिन महादेवभट व बाळंभट बिन रघुनाथभट उपनाम मराटे चक्रदेव गोत्र अश्वलायन वास्तव मौजे कुर्धे तर्फ पावस प्रांत राजापूर यासि अग्रहार इनामपत्र करून दिल्हे यैसीजे. तुम्ही सातारे-याचे मुकामी येऊन निवेदन केले जे आपले वडील रघुनाथभट याणी मौजे म।।री दोही नद्याचे मध्ये स्थल होते ते कंदीम रकम दिवाण देणे लाहारी १२ बाराचे ठिकाण विकत घेऊन पूर्वी थोरले कैलासवासी माहाराज स्वामी रायगडी होते तेथे आमचे वडील याणी जाऊन वर्तमान निवेदन केले. ते माहाराज स्वामीनी मनास आणून सदरहु भूमी दिवाण धारा

लाहारी दाभाळी बारा यकूण बिघे ८४।।। पावणे पाच ते भूम चतु:सीमा पूर्वेकडे दांण्यांच्या अगराची हद व दक्षणेकडे सोमणाच्या आगराची हद व पश्चमेकडे फडक्याच्या आगराची हद व उत्तरेकडे नदीच्या पाटाच्या मार्गाची हद येणेप्राो चतु:सीमा आहेत. भूम आमचे वडील रघुनाथभट बिन नारायणभट यासि इनाम करून दिल्ही. त्यास भूमीमध्ये मेढे नाले होते तो श्रमसाहास करून भूम समान करून नारळ व सुपारी व अणखी झाडे व मळा व शेत करून लावणी करून उपभोग वडिली केला व अपणही करीत आहो. यविसी थोरले कैलासवासी माहाराज स्वामीचे व संभाजी माहाराज व राजाराम माहाराज व शाहू माहाराज याची पत्रे आम्हापासी आहेत. हा कालपर्यंत भूमीचा उपभोग आम्ही करीत आहो. सांप्रत राजश्री तुळाजी अंगरे सरखेल हे वसुलाचा उपद्रव करितात. त्यास माहाराजानी कृपाळु होऊन सदरहू भूम पूर्वी आमच्या वडिलास अग्रहार इनाम चालत आले आहे त्या प्राो वंशपरंपरेने चालविली पाहिजे म्हणऊन निवेदन करऊन पूर्वील पत्रे अणून दाखविली. ती मनास अणून तुम्ही भले ब्राम्हण सत्पात्र श्नानसंध्यादि शटकर्मे अचरोन साहेबास व साहेबाच्या राज्यास कल्याण चिंतून आहा. तुमचे वंशपरंपरेने चालवलिया श्रयस्कर यैस जाणोन पूर्वी माहाराज स्वामीनी तुमचे वडील रघुनाथभट यासि सदरहू भूम पावणे पाच बिघे धारादत इनाम करून दिल्ही आहे त्याप्रमाणे तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने करार केली असे. तरी तुम्ही व तुमचे वंशपरंपरेने अग्रहार इनाम अनभऊन सुखरुप राहाणे. जाणिजे छ २२ माहे जिल्हेज. सु।। सलास खमसैन मया व अलफ. अंगिरानाम संवत्सरे. लेखनालंकार. मोर्तब असे.

बार सुद

**क्रमांक : ५१** दि. २२-११-१७५२

पत्र शिराळ्याच्या पार्वतीबाई भोसले यांचे आहे. त्या म्हणतात की, करवीर-कराच्या सैन्याने कापरी गाव जाळले. पुढे माळावर येताच आपल्या फौजानी त्याना ओढ्यावर रोखले. तेथे झालेल्या झटापटीत त्यानी माघार घेतली. त्यांच्या फौजात कागलकर घाटगे, अमृतराव प्रतिनिधी, राणोजी घोरपडे सेनापती वगैरे लोक असून ते सिराळे प्रांतात धामधूम करणार आहेत.

श्री

श्रीमंत माहाराज तीर्थरूप मातुश्री आईसाहेब
साहेबाचे सेवेसी

आपत्येवत पार्वतीनें कृतानेक विज्ञापना. ता।। छ. १५ मोहर(म) पावेतो साहेबाचे कृपादृष्टीकडून आपत्याचे वर्तमान येथास्थीत आसे. विशेष आजी बुधवारी दोनप्रहरा दिवसा नदीपलीकडून राजेश्री करवीर-वासी माहराज स्वामीची फ़ौज आईतवड्यावरून सिराल्यास आली. आठ नवसे स्वार हजार बारासें परीयेत पायेदल यैसे येऊन नजीक कापरी म्हणून खेडे होते त्यास आगी दिल्या. गाव जाळला. तेथून चालोन पुढे माळावरी आले. आपल्याकडील फौज स्वार व प्यादे वोढा धरून उभे राहीले. त्याची याची झटपट जाहली. व सूल[1] राखीले. मग आजमास पाहून माघारा फिरोन कोडोली पारगावास मुकामास गेले. समागमे कागलकर घाटगे आहेत व राजश्री आमृतराव प्रतीनीधी चीकोडीकर व राणोजी घोरपडे सेनापती इत्यादी आवंतर यैसे जमाव भारी जाहला. आणखी पुढे जमाव करीत आहेत. मागती आणीखी चालोन येणार यैसे बातमी तहकीकास आहे. सिराळ प्रांतात वगैरे माहलांस धामधूम करणार आहेत. साहेब धणी सावध आहेत याजकरितां जाहाले सविस्तर सेवेसी लिहिले असे. येविसी आज्ञा करणार धणी साहेब आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

पै।। छ. १९ मोहरम

---

१ समतोल; ताल

क्रमांक : ५२. दि. २५–११–१७५२

ताराबाई यांचे भिवजी कासुर्डे यास पत्र की, गोविंद सराफ व मल्हार जगन्नाथ या दोघामध्ये घोडी बाबत तंटा उद्भवला आहे. तरी त्याचा निवाडा करावा. निवाडा होत नसल्यास प्रकरण आपणाकडे पाठवून द्यावे.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी राजश्री भीवजी कासुर्डे यासी आज्ञा केली यैसीजे. गोविंद सराफ याची तटानी ओझे घालून श्री यवतेश्वर येथें मल्हार जगनाथ याणी आणीली होती. त्यास रोग जाहाला. त्यास म॥नीलेनी तटानी बरी करून सराफ मजकूर याचे घरी पाठविली. त्याजवरी तटानी मृत्य पावली. यैसीयासी सराफ मल्हार जगन्नाथ याजपासी कजीया करीतो म्हणून हुजूर विदीत जाहाले. तरी हाली आज्ञापत्र तुम्हास सादर केले असे. तरी याचा कजीया मनास आणून तुम्हास विल्हे लागत असेल तर लावणे. नाहीं तरी हुजूर पाठऊण देणे. . . . जाणीजे. रा॥ छ. १८ मोहरम सु॥ सलास खमसैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे.

मोर्तब

सुद

क्रमांक ५३ दि. ५-१२-१७५२

तुम्ही करवीरकरांची कुरापत काढली म्हणून 'स्वराज्यात' धामधूम माजली. असे, ताराबाई यानी बाबाजी थोरात याला लिहिले होते. ताराबाईना पाठविलेल्या उत्तरात थोरात म्हणतो की, आगळिक करवीरकरानीच केली; इतकेच नव्हे, तर चढाईसाठी त्यानी आणखी सैन्य गोळा केले आहे.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब साहेबाचे सेवेसी.

विनंती सेवक बाबाजी थोरात कृतानेक विज्ञापना. तागायेत छ. २८ माहे मोहरम मंगलवार पावेतो साहेबाचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थीत असे. तदनंतर साहेबाचे आज्ञापत्र सादर जाहले तेथ आज्ञा की राजश्री-स्वामी करवीरवासी याचे प्रांतात तुम्ही उपसर्ग दिल्हा म्हणून जमाव करून आलीकडे श्वराज्यांत धामधूम मांडिली. तरी तुम्ही व राजश्री गोपाळजी भोसले व राजश्री सिवाजी सालोखी ऐसे येक वीचारे राहून राजश्री स्वामीचा मतलब लेहून पाठविणे म्हणोन. त्यास सेवेसी विनंती सादर व्होये ऐसीजे. आम्ही काही (वा)रणापलीकडे काडीमात्र उपसर्ग जाहला नाही. कोण्ही उपसर्ग (वा)रणा उतरोन केला हे परस्परे साहेबास विदित जाहला असेल. सेवकाकडून तो प्रसंग हा जाहला नाही. राजश्री स्वामी करवीरवासी याचा मनसुभेचा मतलब काये तो लिहिणे ऐसी आज्ञा. त्यास त्याणी भारीच मनसुभा आरंभिला आहे. आलीकडे दोन च्यार श्वाऱ्या केल्या. आजी छ. मजकुरीही स्वारीस आले आहेत. रा।। उदाजी चव्हाण याची फौज आणविली आहे. त्याजकडील शामराव वडगावास आले आहेत. रा।। राणोजी घोरपडे व चिकुडीकर व सिंदे मनोलीकर ऐसे तमाम जमा करितात. आलीकडे बरी धामधुम करणार. उपरांती काये कर्तव्य ते कलेना. साहेबी विज्ञाप्ती खातिरेस आणोन पैरवी करणार साहेब धणी समर्थ आहेत. सेवेसी विदीत व्होये हे विदनापना. पै।। छ. ९ माहे सफर.

क्रमांक : ५४ वि. ५-१२-१७५२

बापूजी नाईक व प्रतिनिधी यांच्या हालचालीची बातमी कळविण्याबद्दल सातारा येथील पेशव्यांचे कारकून दिनकर महादेव यास नानासाहेब पेशवे यांचे पत्र.

श्री शंकर

अखंडित लक्ष्मी आलंकृत
राजमान्य राजश्री दिनकर
माहादेव गोसावी यासी

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सु॥ सलास खमसेन मया आलफ. सांप्रत तेथील काये मजकूर तो लिहिणे. बाबूजी नाईकाचा विचार काये व प्रतिनिधी त्याचा काये करितात ते लिहिणे. छ. २८ मोहरम मोगलाचा सल्लूख उतम प्रकारे जाहाला. त्यास कर्नाटकांत नेऊन सदर +++ ये मेळऊन देणार यामुळे सदरी राजकारणे तुटलीच आसतील. तथापि बाबूजी नाईकानी आव धरून मनसुबा करावा आसा विचार किंवा कसा. सांप्रत तेथे येथील खवर गेलीच आसेल. त्यावर काये होते तें लिहिणे. प्रतिनिधीचा आव आहे कींवा नाही किंवा प्रतिनिधीच्या लोकामध्ये काही भेद जाहाला आहे की काये ते सविस्तर लिहिणे. जाणिजे छ. २८ मोहरम.

लेखन
सीमा

**क्रमांक : ५५** **दि. २५-१२-१७५२**

पत्र कृष्णराव भगवंत आमात्य याचे आहे. त्यात पेशवे व निजाम यांच्या मधील भाल्कीचा तह, पेशव्यांचे सरदार रघुनाथ पंत यांचे कर्नाटकातील प्रयाण व पेशव्यांचे मुलाच्या लग्नासाठी पुण्यास आगमन, वगैरे घटनांचा उल्लेख आहे.

पैं।। छ ५ माहे रबिलावल

श्रीरामचंद्र

पुरवणी विज्ञापना. उपरी वडिली बलकवडा व संभाजी नारकर याजबराबर आसीर्वाद पत्रें पाठविली ती पावली. लेखनाज्ञा कलो आली. राजश्री प्रधानपंत यांचा व मोगलाचा तह जाहला. राजश्री रघुनाथपंत कर्नाटक प्रांते फौजेसुधा रवाना करून आपण पुण्यास चिरंजीवाच्या लग्नाकरिता येणार म्हणोन आज्ञापिले ते कलले. राज्यातील विचार लि।। तो यथार्थच. कलि धर्म विपरीत आहे, होईल ते पाहावे.

धणियाकडील व आगरे याजकडील वृत लिहिणे म्हणोन आज्ञा. त्यास निराले पत्री लिहिले आहे त्यावरून कळेल. वाडीकर सरदेसाई ठिकाणीच आहेत. उभयतांत कलह माजला आहे. बोली चालीस मध्यस्त पडिले होते; परंतु बोद बैसला नाही. पुढे काय होइल ते पाहावे.

श्रीदेव रघुवीर व रेणुका वरकड घरातील देव याची ऊर्जा व गडावरील व पेठेतील देवाची ऊर्जा आज्ञेप्रो करवीत आहो.

भाले काठ्या पालखीची दांडी येथे नीट करून ठेवली आहे.

मातुश्री आईसाहेबांसही तीर्थरूप सकल सौभाग्यवती बाईचे नावे पत्रे लिहोन देऊन शर्करा दिली आणि उतरे व वस्त्रे वसरी बिदली पाठविली ती पावली. ज्यांची त्यास प्रविष्ट केली. मातुश्रीस पत्रें पाठवीत नाही म्हणोन आज्ञापिले. अशास आज्ञेप्रो वरचेवर पत्र पाठवीत जाऊं. हाली पत्रें पाठविली आहेत अवलोकन करून विचारास आले तर द्यावी.

सांप्रत वर्तमान यैकिले जे वडील मातुश्रीवर रुसोन माहुलीस गेले. काय निमित्य हे काही कळले नाही. तरी येविसीचे वृत लिहा-

भोयांबराबर पाठवावी. परंतु मार्गाचा निर्गम न पडे याकरितां ठेविली. मागाहून मार्गाचे सुधामत पहोन दांडी व पालखीची तब-कडी रवाना करिलो.

बेजाराचे (?) बीज केली ॥

पाठविले आहे.

कृपा केली पाहिजे हे विनंती.[1]

वया आज्ञा करणार आपण वडील आहेत.

---

**क्रमांक : ५६** **इ. स. १७५२**

सलाबत जंग व बुसी यांचा पेशव्याने जो पराभव केला त्याबद्दल ताराबाईनी या पत्राचे द्वारा त्याचे अभिनंदन केले आहे.

'राज्यकारभार यथापद्धतीने न्यायनीतीने चालेतो विचार करणे' असा उपदेश पत्रात आहे.

श्री

तुम्ही विनंतीपत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित जाहला. सारांष प्रसंगानरूप तुम्ही फौजेनिसी सलाबतजंग मोगल यास तंबी पोहचऊन गर्वहत केला येविसीचा कितेक अर्थ राजश्री माहादाजी नाईक निंबाळकर व राजश्री दिनकर माहादेव याणी वर्तमान विदित केले. त्याजवरून साहेबास बहुत संतोष जाहाला. यैसीयासी तुम्ही कृतकर्मे धुरंधर सेवक. साहेबांचे येकनिष्ट येकतयारी मायेचे. तुम्ही गेलिया-सारिखे स्वामी कार्य केले. बहुत उत्तम गोष्ट जाहाली. याउपरी तिकडील बंदोबस्ती करून सत्वर येणे. त्याहीमध्ये तुम्ही नूतन सेवकाप्रमाणे वर्तणार

---

टीप : १ हे पत्र कृष्णराव भगवंत यांचे आहे. क. छ. ध. इ. सा. भाग २; लेखांक ९० चें पत्र १८ सफरचे आहे. हे पत्र कृष्णराव भगवंत यांचे असून उपर्युक्त पत्र हे त्या पत्राची पुरवणी आहे.

नाही हे साहेबास कळोन गेलेच आहे. तुमच्या वडील वडिलानी या राज्यांत पुरातन सेवा करीत आले आहेत. त्याचा फलादेश होऊन ईश्वर कृपेकरून येश कीर्ती संपादली. पुढेहि प्रमाणिकपणे निष्ठेने वर्तेलिया अधिकोतर जय पावाल हा विचार चितात बरा आणोन स्वामीकार्य करणे. पूर्वमर्यादेस तफावत न होता साहेबांची कृपा तुम्हावरी विशेषात्कारे होये आणि पुढे राज्यभार येथापघतीने, न्यायनीतीने चाले तो विचार करणे. तुम्ही शाहणे चतुर आहा. तुम्हास विस्तारे लिहावे यैसे काये आहे. येविसीचा अर्थ कितेक आज्ञा करणे ते उभयेता मा।।र-निलेयास केला आहे. ते लिहितील त्याजवरून भावार्थ कळेल. जाणिजे.

---

**क्रमांक ५७ :** **इ. स. १७५२**

केदारजी केसरकर याने मल्हार खंडेराव चिटणीस यास लिहिलेल्या या पत्रात शिराळे गुमट येथे झालेल्या लढाईचा वृत्तांत दिला आहे. आपल्याकडील बरेच लोक जखमी व ठार झाले असे तो म्हणतो.

पत्रात कोणकोण कसकसे जखमी झाले त्याचे तपशीलवार वर्णन आहे.

श्री

राजश्री मल्हार खंडेराव चिटणिसी
गोसावि यांसि

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—श्ने ।। केदारजी केसरकर अजाहत[1] सरदेशमुख रामराम विनंति यैसीजे. इकडील वर्तमान तरी मंगलवारी त्रितीये प्रहरी सिराळे गुमट येथे हाला जाहाली. आम्हास निराली यक बाजू दिल्ही तेव्हा चालोन घेतले. हाती नेऊन गावकुसास लाविला ++ निंबाजी भोसला ठार जाला. केरोजी नाईक प्यादा चाकरास गोली मांडीवर लागली. चिमाजी शामजी यास थानावरी गोली लागली. तिघे तेथेच पडिले. फार मार जाला. मुर्दे निघेनात यैसे जाले. तेव्हा लाहाने व खंडनाक याणी जोरावारीने चिमाजीस घेऊन

---

१ नायब, अव्याहत; अबाधित

आलो. चिमाजीची गोली पाठीवर कापून काढली. जिवंत आहेत. निंबाजी भोसला व केरोजी नाईक जागाच राहिले. हातीच्या माहातास हातावर गोली लागली. निशानबारदार यास गालावर भाला लागला व हातीस तीन च्यार भाले लागले व तरवारेच्या जखमा व गोलीच्या जखमा यैशा दाहाबारा जखमा लागल्या. संताजी व माहार प्यादे तिघे यासी गोलीच्या जखमा लागल्या. नामाजी नाईक यास धोंडा लागला व सिग्यास तीर लागला. लक्ष्मुण रुद्र याच्या मुंडशास गोली लागली, मोंडासियाचे टुकडे जाले. वरकड लोकास धोंडा गुंडा बहुत लागला. च्यार खटका मार सोसून कुसासी लागले. सारे लस्करानी तमासा पाहिला. ते काही पत्री लिहिता पुरवत नाही. बहुतेक लोक आम्हाकडील जाया जाले ते लोक माघारे पाठवावे लागतील. याकरिता वेठे पाहिजेत. तर वेठे सुमार ५० पनास पाठविणे व लोकानी काम काय केलियासी काही द्यावे लागते. तरी राजश्रीस अर्ज करून काही यैवज मागून घेणे हे विनंती.[१]

---

**क्रमांक : ५८** **दि. ११-१-१७५३**

सुंदरगड कृष्णाजी जिवाजी याने घेतला म्हणून प्रतिनिधीचे ताराबाई याना पत्र.

श्री

पै।। छ. ७ रबिलोवल

श्री आई आदिपुरुष

सेवेसी विज्ञापना. ता।। छ. ५ रबिलोवल साहेबाचे कृपादृष्टी-करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. विशेष. किले सुंदरगड परभूकडे

---

टीप: १ या पत्रावर तारीख नाही. परंतु पत्रातील वृत्तांतावरून ते इ.स.१७५२ च्या उत्तरार्धातील असावे असे वाटते. करवीरच्या फौजा शिराळे प्रांतात घुसून त्यानी जो तिकडे धुमाकूळ घातला तत्संबंधीची पत्रे करवीर छत्रपती घराण्याच्या इतिहासाची साधने, भाग २ मध्ये बरीच आली आहेत. त्या पत्रावरून हे पत्र १७५२ चे वाटते.

होता त्यास आजी दोन तीन महिने सेवकाकडील फौज जाऊन सभोंवत्या चौक्या देऊन बसली होती. सांप्रत राजश्री कृष्णाजी जिवाजी यासी पाठविले. त्याणी साहेबाचे पुण्य प्रतापे करून किला फतेकरून निशाण चढविले. सेवेसी विदित व्हावयास्तव लिहिले आसे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

क्रमांक : ५९ दि. १२-१-१७५३

उदाजी चव्हाण, मालोजी घोरपडे व अंबाजी घाटगे हे तिघे मिरजेवर चाल करून आले असता आपण त्यांचा पराभव केला. परंतु उदाजी चव्हाणांना रतंजी चव्हाण कुमक घेऊन येणार असल्याने आपणालाहि दारू गोळ्यांची व पैशाची मदत पाठवावी अशी विनंति सिवाजी साळुंखे हा ताराबाई याना करतो.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री ————— आईसाहेब
साहेबांचे शेवेसी —————

विनंती सेवक सिवाजी साळोखे कृतानेक विज्ञापना. ता। छ. ६ रबिलोवल पावेतो साहेबाचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्तीत असे. विज्ञापना. काली गुरुवारी राजश्री उदाजी चव्हाण व राजश्री मालोजी घोरपडे व राजश्री अंबाजी घाटगे यैसे दोन तीन हजार राऊत प्यादे सेवकावर चालोन मिरजेस आले. पांच सात हिरिरीया जाल्या. साहेबांचे पुण्य सेवकाचे मस्तकी तेणेकरून त्यासी पराभवातें पाविले. त्याकडील चौघे मातबर माणूस ठार पडिले. पनास माणूस जखमी आहे. तैसेच घोडी सात पडली. च्यार घोडी सेवकाकडे पाडाव आली. मोडून नेऊन दोन कोस माघारे लाविले. सेवकाकडील पांच घोडी मातबर पडली. वीस घोडे जखमी आहेत. त्यातून काये मरतील ती पाहावी. सात आठ माणूस जखमी आहेत. रा। उदाजी चव्हाण याही सारे मिळून वहमी फार धरून आले होते की सेवकास नामोहरम करावे. परंतु सेवकाची निष्टा धणीयाचे चरणासी. धणीयाची कृपा सेवकावर. त्या पुण्य प्रतापे करून सेवकास येश धणीयाचे पुण्य प्र।।पेकरून आले. हे येश धणी यांचे धणी

यासी आले. परंतु त्यांचे बल पडत चालिले. राजश्री रताजी चव्हाण काटक-पालेगार.घेऊन दोन तीन हजार प्यादे फौज घेऊन येक दोन रोजांत राजश्री उदाजी चव्हाण यासी सामील होईल. यैशास साहेबी राजश्री ———— पंत प्रतिनिधीकडे हुजुरे पाठऊन सत्वर येक दोन रोजात येऊन सेवकाचा उपराळा करीत ते करणार साहेब धणी समर्थ आहेत. खंडी दारूगोळा व बाण सेंभर व खर्चाची बेगमी करणार धणी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पाठीमागे पै।। छ. ११ रबिलावल

---

**क्रमांक : ६०** **दि. १३-१-१७५३**

पेशव्यानी सातान्यातील आपल्या वकिलास–दिनकर महादेव यास–लिहिलेले हे पत्र असून पत्राचा पूर्वभाग वकीलाने पेशव्यास पाठविलेल्या पत्रासबंधीचा आहे. त्यांत त्याने लिहिले होते की, रामराजा, ताराबाई व बाबूजी नाईक यांची खलबते होऊन 'राज्याची क्रिया मातुश्रीस देऊन....राजश्रीनी (रामराजा) मातुश्रीचे आज्ञेत वर्तावे....' असा विचार ठरला आहे. पेशव्यानी वकीलास वरवर संतोष दाखवावा आणि बातम्या कसून चौकशी करून पाठवाव्यात अेसे लिहिले आहे.

श्री

अखंडित लक्ष्मी आलंकृत
राजमान्य राजश्री दिनकर माहादेव
गोसावी यासी

शेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सु।। सलास खमसेन मया अलफ. तुम्ही छ. ८ र।।वलीचीं पत्रें पुणियास पाठविली ती छ. १० मिनहूस तेथें पावली. तेथून इकडे रवाना जाली ती छ. ५ र।।करी आनेगोंदीच्या मुकामी पावली. लिहिले वर्तमान सविस्तर विदित जाले. बाबूजी नाईक मल्हारबाकडून आले ते बारामतीस राहिले आहेत, अद्याप आले नाही. दुसरे पत्रात बाबूजी ना।। आले सर्व मंडळीशी खलबत जाले,

मल्हारबाकडील मजकूर तो राहिला, मग उभयता नाईक बाळाजी केशव खलवत करून राजाची क्रिया मातुश्री देऊन राजश्रीस मातुश्री–पासून दोन वस्त्रें देऊन मजुरा करविला, पुन्हा पूर्वस्थलास नेले, राजश्रीनी मातुश्रीचे आज्ञेत वर्तावे. मातुश्री राजा येक जाला म्हणजे कोणास सरजाम द्यावा तो पेशवे चालो देत नाही, राजपत्री जाला म्हणजे पेशवे आड धरणार नाहीं सर्व रूजु होतील इत्यादिक कल्पना करून हा विचार योजिला आहे. पुढे होईल ते लिहूं म्हणून लिहिले ते कळले. ऐसीयास तूर्त दोन महिने मौज मुद्रेनें कौतुक पाहाणे. राजे परिछिन येऊ जाऊं बसूं लागले तर मुखमुद्रेने संतोष दाखवीत जाणे. वरकड तुम्ही सरदाराकडील व माहादावाकडील वर्तमाने लिहिली त्यात फार करून अफवाच आहेत. तहकीक वर्तमान करून लिहित जाणे. मागे प्रत्यक्ष पत्रात लिहिले त्यावरून जयापास दत्तबा मजकुराविसी लिहिले. आता तुम्ही लिहिले कीं ते आले नव्हते परंतु व्यर्थ येवढ्या सरदारास आम्ही रागे भरून लटकेंच लिहिलें ते आपले जागा किती कष्टी होतील तसेच वरकडही अर्थ आहेत. आमचा मदार तहकीक वर्तमानाविसी तुमचे पत्रावर असते. तुम्ही तहकीक करून वर्तमान लिहित जाणे. रामाजीपंतास तो येथील आज्ञेप्र।। बावाजी (स) बलाविले जे अफवा दिसेल ते अफवा म्हणून लिहीत जाणे.

छ. ७ रबिलावल लेखन<br>सीमा

---

**क्रमांक : ६१** **दि. २१–१–१७५३**

दादोबा प्रतिनिधी यानी जिवाजी बडगर यास सैन्य देऊन पाठविले. 'महाराजांच्या पुण्यप्रतापे करून मारता मारता करतो' म्हणून कान्होजी मोहिते यांचे ताराबाई यांना पत्र. साहेबी दारूगोळा पाठवावा व थोडी खर्चाची बेगमी करावी असे पत्रात म्हटले आहे.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आई साहे(ब)साहेबाचे सेवेसी.

आज्ञाधारक कानोजी मोहिते दोनी कर जोडून साष्टांग दंडवत

विज्ञापना. येथील वर्तमान ता।। छ. १५ रबिलावल रविवार दोनप्रहर रात्र परियेंत माहाराजाचे कृपाद्रिष्टी करून बालकाचे वर्तमान येथास्तीत्त आसे. विशेष राजेश्री दादोबा प्रतिनिधी यानी आम्हावरी हजार स्वार बरोबरी रा।। जिवाजी वाडगर देऊन व आणखी येक दोन पतके यैसी तेथून दिवें लावणीस केली. गा व णे (?) आम्हावरी सफा घालावया रवाणा केले आहेत. ते वाघेरी आलीकडे दोनप्रहर रात्री आले. पुढे आम्हावरी रात्रीचे येणार तो आमची बातमी त्याजबराबरी आली की त्यास हातघाई त्याची आमची बनली. माहाराजाचे पुण्ये प्रतापे करून मारता मारता मारतो. साहेबाची पूर्ण दया मस्तकीं आहे तो त्याचा दरकार धरतो यैसी नाही. माहाराजानी काही दारू व गोली व गला पाठवावा व कुमक पाठवून बालकाचा परामर्श घेत जावा. दारुगोली गला आम्हाजवल आहे. परंतु महाराजानीही पाठवावी. उदईक प्रातकालचे वर्तमान लेहून पाठवितो. मागाहून राजेश्री दादोबाही येतात. साहेबास कलावे म्हणून लिहिले आहे. माहाराजानी थोडी बहुत खर्चाची बेगमी करावी निकड फार आहे. या करिता धनियास आर्जी लिहिली आहे खर्चाची बेगमी करावी. वहुत काये लिहिणे कृपा निरंतर करावी हे विनंती. पै।। छ. १६ रबिलोवल

---

**क्रमांक : ६२** **दि. २२–१–१७५३ (?)**

या पत्रांत कानोजी मोहिते याने प्रतिनिधीच्या सैन्याशी झालेल्या चकमकीचा वृत्तांत दिला आहे. 'याजउपरी बालकावरी कृपा करून पोटापाणीयास व दारुगोळी व मदत पाठविल्या उत्तम प्रकारे सेवा लोकसुधा करीन' असे तो म्हणतो.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री
आईसाहेब स्वामीचे
सेवेसी

सेवक अज्ञाधारक कानोजी मोहिते चरणावरी मस्तक ठेऊन

साष्टांग दंडवत विनंती. येथील क्षेम ता।। छ. १६ माहे रबिलावल इंदुवासरे दोन प्रहर पर्यंत माहाराजाचे पायाचे पुण्यें प्रतापेकडून येथास्तीत असे. विशेष छ मजकुरी राजेश्री पंतप्रतिनिधि याणी दीड हाजाराच्या टोल्या दोन करून दक्षणस पाचसे स्वार गडचे माचीस पाठविले. त्याणी सूर्ये दरूषणापूर्वी येऊन माचीत बेलाशक सिरले. यानंतर माहाराजाचे लोक व प्यादे जाऊन गाठ घातली. त्यांत यांत युद्धें बरेसे जाहाले. तीन हिरीन्या मोडून घातले. त्याजकडील सात जण जखमी व एक ठार व घोडा एक ठार जाहाला. कड धरून मौजे सुपने येथें नेहुन घातले. त्याज उपरी दिवस च्यार घटका अल्यावरी हाजार स्वार व प्यादे दोनशेनिसी रो गमाजीपंत तळबिडावरी चालून आले. तदनंदर महाराजांचे स्वार व हशम यानी जाऊन तोंड लाविलें. आम्हीही गडावरून खाली आलो. त्यांत आम्हांत बरेसे जुज जाहाले. तोफेचे गोळ्याने येक भला माणूस ठार जाहाला. मोडून मौजे बेलवडेनजीक नेहून घातले. ते नदीपार जाऊन तहकूब राहिले. दक्षणेकडस युघात आमचे दोघे जखमी जाहाले व मौजे साकुर्डी खासबारदार याची पडीस त्याणी अ(ा)ग देऊन जाळली. त्याज उपरी जखमी व ठार जाहाल्यावरी परतून घातले. आगोदर रात्रीस मौजे सुपनीयाचे रानांत अंबाईची वाडी (स) गडकरी (यानी) पडसी लुटली. उपरांतीक तंबी पोहचविली. माहाराजाचे पायाचे प्रतापे फत्ते जाहाली. याज उपरी बालकावरी कृपा करून पोटापाणियास व दारूगोळी व मदत पाठविल्या उत्तम प्रकारे सेवा लोकसुधा करीन. पोटाची वखवख फारसी आहे. माहाराजाचे पाये चिंतामणी अमचे सिरी आसता बालकास धोका काये अहे. कळल तेसी सर्फराजी करून पाठवणार माहाराज समर्थ आहेत. तेथें मी बालक फारस काये लेहू, कृपा निरंतर केली पाहिजे.

(हे वीज्ञाप्ति)[1]

पै।। छ. १७ रबिलोवल

---

१ कंसातील अक्षरे बालबोध

**क्रमांक : ६३** **दि. २३-१-१७५३**

चवडोजी यादव याने ताराबाई याना तिळगुळ पाठविले असतां त्यानीही त्यास तिळगुळ पाठविले.

श्रीमंत माहाराज मातुश्री ——— आईसाहेब याणी चवडोजी यादव बेसती (?) प्रा। कराडावाद यासी आज्ञा केली यैसीजे. तुम्ही विनंतीपत्र पाठविले व संक्रमणाचे तिल शर्करायुक्त प्रविष्ट जाहाले. तुम्हास हुजूरून तील शर्करायुक्त पाठवीले आसेत. घेणे. जाणीजे छ. १७ माहे रावल. सु।। सलास खमसैन मया व अलफ. लेखनालंकार

मोर्तब
सुद

---

**क्रमांक : ६४** **दि. २६-१-१७५३**

आपल्या आज्ञेप्रमाणे दादोबा प्रतिनिधीचे राऊत सोडवितो म्हणून कानोजी मोहिते याचे ताराबाईना पत्र.

पत्रात हुजुरातीच्या फौजेशी उंब्रज नजीक युद्ध झाले असे म्हटले आहे, व मसूरकर व कराडकर यानी तळबिडास येऊन गाव कसा लुटला, शेतांची व गडाच्या माचीची खराबी कशी केली, तो वृत्तांत देऊन आक्रमकानी पळवून नेलेली गुरे व मेंढरे आणि लुटलेला दाणागोटा परत मिळवून देण्याबाबत खटपट करण्याची विनंति ताराबाईना केली आहे.

श्री

श्रीमंत महाराज मातुश्री ——— आई
साहेब साहेबाचे सेवेसी

आज्ञाधारक कानोजी मोहिते दोनी कर जोडून सा। दंडवत विज्ञापनां. ताा छ. २० रबिलावल परयेंत माहाराजाचे कृपावलोकनें करून बालकाचे वर्तमान ठेवले स्थली सुखरूप आसो. विशष

माहाराजानीं आज्ञापत्र पाठविले ते मस्तकी वंदून परम समाधान जाहाले. यसेच निरंतर पत्री बालकाचा परामृश करीत असावा. यानंतर राजश्री दादोबा प्रतिनिधि याजकडील (राऊत) आहेत ते सोडून देणें ह्मणऊन आज्ञा केली. त्यास हुजरातीस व आम्हास युद्ध उंबरजेनजीक जाहाले. तलबिडाहून युद्धास गेलो तेव्हा भाघे मसूरकर व कराडकर तलबिडास येऊन गाव लुटला. जामदारखानियांतील वस्तभाव व घोडी नेहली. यैसी बहुत सिहारसणी केली असता आणखी गडकरी याची सेते शाळूची व हरभऱ्याची यैसी रोज उठोन कबाडे बांधोन नेतात. यैसा विचार त्याणी मांडिला आहे. सेताची व गडच्या माच्याची खराबी केली ती काही कागदी लिहिता पुरवत नाही. यैसे आसोन माहाराजानी आज्ञापत्र पाठविले तेथे आज्ञा की राऊत सोडणे. त्या आज्ञेवरून राऊत आसामी साहा रूद्राजी नाईक मांडरे याज बा।। माहाराजाचे आज्ञेवरून साहेबाकडे पाठविले आहेत. सर्व गोष्टीचा अभिमान माहाराजास आहे. उदयिक शणवारी ते कडेगावाहून किला नजीक येणार आहेत. त्यांचे पारपत्य करणार महाराज समर्थ आहेत. घोडी राउताची ठेऊन घेतली आहेत, आज्ञा जाहाली तरी माहाराजाकडे पाठऊन देतो. साहेबाच्या आज्ञेसिवाये नाहीं. ज्याप्रमाणे माहाराज आज्ञा होइल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. आणखी विज्ञापना मौजे तांबवे तेथील गुरे ५०० पाचसे व आबाईचे वाडीची गडकरी याची गुरे सर[1] च्यारसे व वनवासवाडीची गुरे सुमार ३०० तीनसे व मेंढरे येक हाजार व गडकरी याचे कबिले पांच व वस्तभाव दाणा गोठा नेहला आहे त्याची सुटका करणार स्वामी समर्थ आहेत. दारू गोळी व भांडीयाचे गोळे व खर्चाची बेजमी व कुमक पाठऊन द्यावी. सर्व गोष्टीचा माणोपमान माहाराजाचा आहे. येविसी बहुत काये लिहूं. कृपा निरंतर करावी हे वीज्ञापना.

पै।। छ. २१ रबिलावल

---

१ सुमार, साडे

**क्रमांक : ६५** **दि. २८-१-१७५३**

उदाजी चव्हाण यानी सोनी येथील ठाणे घेतल्याबद्दल ताराबाई यानी यमाजी शिवदेव यांस लिहिलेल्या या पत्रांत आश्चर्य व्यक्त केले आहे व हे ठाणे परत घेण्यास त्याना सांगितले आहे. ' तुम्ही कार्यकर्ते धुरंधर असोन म।।रनिलेने ठाणे घ्यावे हेच अपूर्व मानावे ' असे त्या म्हणतात.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री ——— आईसाहेब यानी राजमान्य राजश्री येमाजीपंत यांसि आज्ञा केली यैसीजे. राश्रजी उदाजी चव्हाण हिमत बहादर याणी मिरज प्रांते येऊन दंगा मांडिला. मौजे सोनी येथील ठाणे घेतले म्हणून विदित जाहाले. तरी तुम्ही कार्यकर्ते धुरंधर असोन म।।रनिलेने ठाणे घ्यावे हेच अपूर्व मानावे. तस्मात् ठाणेची वार्ता मिथ्या भासोन हे आज्ञापत्र सादर केले आसे. तरी तुमचे पुरातन सेवक आहेत त्यासमेत फौजेचा गाहा करून ठाणे हस्तगत होऊन म।।रनिलेस मर्यादेवर ठेवणे. शहाच्या तोंडावर तुम्ही आसतां ठाण्यास अपाय होईल तेव्हा तु ++++ नांत विरुधता होईल हे जाणून पारपत्य कारणे आणि संतोषाचे वृत लिहून पाठविणे. जाणिजे छ. २२ माहे रबिलोवल सुहूर सन सलास खमसैन मया अलफ

शिका असे

---

**क्रमांक : ६६** **दि. २८-१-१७५३**

एक शिवेची जमीन कमळोजी आंबोरे यास लागवडी बाबत दिली आहे. पण " सिवेचा कजिया " आहे. तरी सदहू जमिनीची कीर्द मशारनिल्हेकडे द्यावी म्हणून ताराबाई यांचे आज्ञापत्र.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी मुकादमानी मौजे + + + यांसी आज्ञा केली यैसीजे. मौ. आगापूरचा व+लचे सिमेचा

कजीया आहे. त्यामुळे सिवेचा डाग जमीन विघे ०३ तीन बिघे आहे ते जमीन लागवड ब।। राजश्री कमलोजी आंबोरे याजकडे दिली आहे. हे कीर्द महामूरी करतील. तेथील बारीचा यैवज जो होईल तो सरकारात जमा ठेविला आसे. तरी सदरहू जमीनीची कीर्द म।।नीलेकडे चालो देणे मध्ये कोणी नवदीगर[1] केलया कार्यास येणार नाही. जाणीजे छ.२२ माहे रविलावल सूहूर सन सलास खमसैन मया अलफ.[2]

---

**क्रमांक : ६७** **दि. ११–२–१७५३**

पंतप्रतिनिधीने ताराबाई याना लिहिलेले हे पत्र आहे. कडेगावी सव्वा महिना मुक्काम करून प्रांतास उपसर्ग पोहोचू दिला नाही. मिरजकरांचा तह रद्द करून राजश्री यमाजीपंत चिकोडकर व मालोजी घोरपडे यांस चाकरीस ठेवले, इतर संस्थानकरांसीहि अनुसंधान करून राजश्री पाराशरवासी यांच्या वाड्यात भेद करून त्याची फौज वडगावी नेवविले, वगैरे घडामोडी त्याने पत्रांत दिल्या आहेत व साहेबाची अशीच सेवा यापुढेहि करूं असे आश्वासन दिले आहे.

श्रीआई आदी पुरुष

सेवेसी विज्ञापना, ता।। छ. ७ रबिलाखर त्रितीय प्रहर मुकाम चिमणगाऊ साहेबाचे कृपेकरून वर्तमान येथास्थित आसे. विशेष कडेगावी सवा महिना मुकाम करून या प्रांतात रोखा होऊ न देता मिरजकराचा तह रद्द करून राजश्री येमाजीपंत चिकोडकर यासी हजारा स्वारानसी व हजार प्याहिदानसी चाकर ठेऊन हाती द्यावयासी मान्य करून तैसेच मालोजी घोरपडे यासी चाकर ठेऊन त्या हाती द्यावयासी मान्य करून वरकडहि संस्थानकरासी आनुसंधाने क(रून) राजश्री पाराशरवासी यांच्या वाडियांत भेद करून त्याची

---

१. अडथळा; विरोध.

२. कमळोजी आंबोरे यास तीन बिघे जमीन दिली आहे म्हणून ताराबाई यांचे याच तारखेचे आणखी एक आज्ञापत्र उपलब्ध आहे.

फौज वडगावास नेविली. काटके तमाम आपल्याल्या जागीयास लाऊन दिले. राजेश्री उदाजी चव्हाण आथणीस जाणार ऐसा सिधांत जाला तो या प्रांती उत्पात होऊन जाला हे वर्तमान ऐकोन राजश्री येमाजीपंत यासी रवाना केले. पूर्व सूचना सेवेसी दोन च्यार वेळ लिहीतच गेलो. परंतु आमची विनंती साहेबा कोणी विदीत केली न केली कलेना. त्यास कलहाची निवृत्ती नव्हे. तमाम मुलूक लुटून सत्यानास होतो. फौजेने त्रिपुटीस मुकाम केला आहे हे ऐकोन छ. मजकुरी सनिध येऊन राहावे ऐसा आर्थ सेवकाचे चित्ती होता. परंतु रा(ज) श्री विठलपंत साहेबाकडून आले. त्यानीं मा(लूम) केले जे फौज उठोन जाईल. धणीयाचे आज्ञेप्रमाणे मुकाम चिमणगावीच करणे. त्यांजवरून साहेबाचे आज्ञेप्रमाणे मुकाम करून राजश्री विठलपंत यांसी माघारे सेवेसी रवाना केले आहेत. सकल वर्तमान निवेदन सेवेसी करितील. सारांश गोष्टी आम्ही सेवक लोक आमच्या जागोचा उदभव साहेबापासून. साहेबाच्या पायाखेरीज दुसरे दैवत आम्हास नाही. आम्हांपासून आन्यथा प्रसंग घडणे नाही. आमचेविसी बहुतजण विरुध सेवेसी निवेदन करितील. परंतु साहेब धणी मायबाप आमचे साहेबी आमचेविसी काही चितात आणू नये. आम्ही अज्ञेखेरीज वर्तत नाही. पुढेहि जाजती वर्तणूक करून साहेबाच्या पायासी इतर भाव आमच्या चितात येणे नाही. परंतु आम्ही नेणते खरे. आम्हास पद साहेबी सांगितले आहे त्याचा अभिमान चितात धरून पदास उपयोगी आर्थ आसेल तदनुरूप आज्ञा करावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

**क्रमांक : ६८** **दि. १६–२–१७५३**

कानोजी मोहिते यानी गणपतराव शिर्के यांची सहा घोडी घेतली, वीस वाटसरू धरून गडावर ठेवले. असे पत्र लेखक ( दादोबा प्रतिनिधि ) ताराबाईना लिहितो. 'साहेबाच्या आज्ञेप्रमाणे वर्तत असतील आमची घोडी सोडीत असतील, वाटसरे व गावगनाचे लोके धरली ती सोडीत असतील तर आमचा कलह त्यासी काही नाही' असे पत्र लेखक म्हणतो.

## श्री आई आदि पुरुष

सेवेसी विज्ञापना, ताा छ. १२ रबीलाखर साहेबाचे कृपे करून वर्तमान येथास्थीत असे. विशेष राजश्री कानोजी मोहिते याचा मजकूर साहेबास विदीतच आहे. राजश्री गणपतराऊ सिरके याची साहा घोडी घेतली. वीस माणूस प्रस्तुत वाटसरू व गावगनाचे धरले तें गडावरी मरतात. आम्ही दोन्ही शह रक्षावे, हली विचार पाहून जिकडे जाणे तिकडे जावे, साहेबास लेहून पाठवावे, म्हणुन येथे मुकाम नदी आलीकडे केला. सी का(?) देखील चव्हाणाच्या रोके दिल्या आहेत. त्यास साहेबाचे आज्ञेप्रमाणे वर्तत असतील, आमची घोडी सोडीत असतील, वाटसरे व गावगनाची लोक धरली ती सोडीत असतील, तर आमचा कलह त्यासी काही नाही. येविसी जसी साहेबाची आज्ञा होईल तसी वर्तणूक करूं. आज्ञा करणार स्वामी धणी आहेत. सेवेसी श्रुत होये + हे विज्ञापना.

पैा। छ १३ माहे रबिलाखर सुा। सलास खमसैन मया व आलफ.

क्रमांक : ६९ दि. १८-२-१७५३

यमाजीपंत व दादोबा प्रतिनिधी या दोघांचे सैन्य तळबिडावर एकत्र होऊन चालून आले असता आपण या सैन्याचा पराभव केला, असे कान्होजी मोहिते ताराबाई यांना लिहितो. पैशाची व्यवस्था करण्याची विनंती त्याने पत्रात केली आहे.

पै।। छ. १५ रा।।खर

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब साहेबाचे सेवेसी

आज्ञाधारक कानोजी मोहिते दोनी कर जोडून सां दंडवत विज्ञापना. ता. छ. १४ रबिलाखर पावेतो माहाराजाचे कृपादृष्टी करून बालकाचे वर्तमान यथास्थित असे. विशेष. रविवारी राजेश्री दादोबा प्रतिनिधीकडील फौजा व राजेश्री येमाजीपंत येसे जमून तलबिडावरी आले. राजेश्री दादोबा प्रतिनिधी तलावरी आणि येमाजीपंत चालोन आले. त्यास त्याचा आमचा येका[1] जाहाला. तेव्हा गावातून माघारे सारून कड धरले. तेव्हा त्याकडील एक भला माणूस पडला व घोडी दोन पडली व जखमी दोघे व घोडी जखमी दोन येणे प्रा लडाई जाहाली. तेव्हा माघारे सरून गेले. आम्हाकडील माहाराजाच्या पुणेकरून लोक खैर. आम्ही सुखरूप असो. येशकीर्ति माहाराजाची आहे. लोकांचे पोट पानियाविसी सेवेसी आर्जी लिहिली. परंतु करूणा येईणा. तेव्हा उपाये कोनता करावा, येऊन वा ण ली तो आहे. लोक पोटापानियामुळे बेदील. आता लक्ष्या निकडीची निकड जाणून माहाराजास आर्जी लिहिली आहे. जागा माहाराजाचा जतन जाहाली पाहिजे याजकरिता पायासी निकड जाणून लिहिले आहे. माहाराजा सिव्हा त्रिभवणांत माझे कोन आहे. नाही हे माहाराजास दखल आहे. पुढे होईल मजकूर तो लिहून पाठवितो. बहुत काये लिहू ? कृपा निरंतर करावी[2] हे विनंती.

---

१ नखरानजर

२ ही अक्षरे बाळबोधीत आहेत.

**क्रमांक : ७०** **दि. २४-२-१७५३**

एका मुसलमानी विवाहाच्या फारकती बाबतचा ताराबाईनी दिलेला निवाडा.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी सेख सुलतान यासी आज्ञा केली यैसीजे. फती हुजूरची बटीक ईणे तुमचे सोयरीकेची मध्यस्ती केली. त्या व।। तुम्हास देणे लागले. ते देणे पेसजी तुम्ही वारून फारकती घेतली. यैसे असोन फती मा। तुम्हावर तुफाने घेती. ते हकीकत हुजूर मनास आणीली. साक्षी रुजू मौझे फारकती पाहता रुबरु हकीकत मनास आणीता तुम्हाकडे काही कज्या राहिला नाही. अकून (अेकून) हिसेबी तुम्हाकडून फती मजकूर इतला रु. ८ आठ देवीले आणि तुम्हासी व फतीसी अर्थाअर्थी समध नाही यैसे केले आणी हे आज्ञापत्र तुम्हास दील्हे असे. फिरोन तुम्हास कजीया करील तर पारपत्य केले जाईल. तुम्ही आपल्या घरी सुखरूप राहणे. तीजपासी कागदपत्र आसीले तरी रद्द असेत. जाणीजे छ. २० रा।खर सलास खमसेन मया व अलफ. लेखनालंकार.

मोर्तब
सुद

---

**क्रमांक : ७१** **दि. ७-३-१७५३**

कर्नाटकांत वसूल केलेल्या शाहूपट्टीच्या हिशेबाची यादी. ही यादी नानासाहेब पेशवे चित्रदुर्गावर मुक्कामास असतां त्यांच्याकडे पाठविण्यांत आली असे शेवटी म्हटले आहे.

श्री

यादी हिशेब शाहूपटी दुसाला खमस तीत सित दर जागा

दुइलगोळ प्रांत गदग इजमाईली

५३९०० सन खमस
५३००० यैन सरकार
९०० वकिली
५३९००

५३९०० सन सित सालीं
५३००० यैन
९०० वकिली
५३९००

५३९००

१३८८५ गैर आदा ब॥
६००० रेटेहळी
तीन साल
९७८॥। दाहा हजार
समघे
६७५ दुवाली

होन
२००
१६८॥। दुंडीगीर
कळस पैं॥
५०
३३॥। जाळेइसूर
१०१। पडीघीदल
९७८॥।

६९०६। प्रांत अजमनगर
सनदात बाकी येत नाही
१३८८५

५००० कारसानी
५०० हालीपल वजा
घरतात
५५००
बाकी ४८४००

परवाने
४४८५० परवाने
बगडकोट
५००० सालाबाद
२००० कबज राघोपंत
७०००

६७७१५

४३२० कितां गैर आदा
दाहा हजार समंधे
होन नाणे १२८०
दर होनासि ३।=।
प्रमाणे

७२१०५

२०९५० सालाबाद परवाने
२००० बिनगी
२००० पाछापूर
२००० गोकाक
२००० अजमनगर
१००० नुळगुंद
११०० दे।। नुळगुंद
१००० हरीहर
४०० येरगोप
३०० आमीनबावा
२५० मोरबा
५०० आदेकिरे
१००० हुबळी
३०० मजीदपूर
३०० नवलूर
३०० ज्याढर हुबळी
१००० कतेकटे करून
१००० गुंडगेळ
१५०० तडकोळ
२००० प्रां. नवलगुंद

२०९५०

२००० बिनगी
२००० पाछापूर
२००० गोकाक
३००० आजमनगर
१००० का।। नुलगुंद
१००० हरीहर
११०० परगणे नुलगुंद
४०० येरगोप
३०० आमीन बावा
२५० मोरबा
५०० आदेगिरी
१००० हुबळी
३०० मजीदपूर
३०० नवळूर
३०० जाडिर हुबळी
१५०० तडकोळ
३९०० होन १२००बंकापुरावर
५००० प्रांत लक्ष्मेश्वरावर
२००० नवलगुंद
१००० गुंतल
४००० कितूर ता। कितूर
२००० आणाजी प्रभू
२००० गोविंद नाईक
खळांजे

४०००

५००० किता
१००० दुबल
१००० नवलगुंद

५२२५ तोसी खाना पै।। होन ६००
१९५० दर होनास
३। प्रमाणे
३२७५ गोसावी
५२२५
१६०८० फाजिल साल गु।।
सोड समंधे
५००० कारसाजी
५०० हालीहाळ बा।।
वजा धरतात
४७७५५
बाकी निवळ २४३५०

१००० सोंधे
१००० शामराव
१००० गुंतल
५०००
४४८५०
बाकी ३५५०

सदरहू यादी राजश्री यशवंतराव गाइकवाड यानी बापूजी नाईक यास आणावया गेले त्या समई संस्थानच्या कारकुनाचे दस्तुर कडून लिहून आणिली. याद असे पेशव्याकडे पाठविली त्याची नकल हुजुर लिहून ठेविली आहे. छ. १ जमादिलावल सन सलास खमसैन मया व आलफ. रवाना लस्कर पेशवे चित्रदुर्गचे मुकामास शेशोपंताकडे पाठविली.

---

**क्रमांक : ७२** **दि. ७-३-१७५३**

शाहू पट्टीच्या हिशेबाची यादी. नानासाहेब पेशवे यांच्याकडे ते चित्रदुर्ग येथे मुक्कामास असता पाठविली असा तीत उल्लेख आहे.

श्री तालीक

याद हिशेब शाहूपटी

२७९०० दुसाला यैन बाकी ता
२४३५० सन खमस
३५५० सन सित
२७९००

४३४५१ परवाने दिल्हे पै।। न।। वसूल

११२८७ बागलकोट
५७१४ बिलगी
४००० पादशापूर
५५०० दे।। नुलगुंद
१७२५ मेतकटे
३५०० गोकाक
५२५ कोलवाड
१३०० अमीनबाबी
५००० लक्ष्मेश्वर
६०० मो सिवाजीपंत
 ३०० नवलूर
 ३०० मजीदपूर
 ६००
४३४५१
५३९०० साल मार सुन सवा
१२५२५१

कमेतीस हजार रुपये पैकी
१०२५१ ८= खर्च परभारा जाता बाकी

बाकी रुपये

११४९९९ ।।।=

सदरहू यादी राजश्री येशवंतराव गाईकवाड बापूजी नाईकास आणावयाबदल गेले ते समई संस्थानच्या कारकुनाचे दस्तुरे कडून लिहून अणिली यादी असे. पेशव्याकडे चित्रदूर्गचे मुकामी शेषो नारायण याजकडे पाठविली. त्याची सदरहू नकल लेहून हुजुर ठेविली असे. छ. १ माहे जमादिलावल सुहूर सन सलास खमसैन मया व अलफ.

---

**क्रमांक : ७३** **दि. ८–३–१७५३**

दोन वर्षांच्या थकलेल्या बाकीपैकी शंभर रुपये भरावे म्हणून मोकदम मौजे कोटरोसी ( कोंडोसी ) यास कोल्हापूरच्या छत्रपतीच्या पहिल्या राणीचे आज्ञापत्र.

श्री.

आज्ञापत्र सरकार दारुनी माहाल वाडा पहीला ता।। मोकदमानी मौजे कोटरोसी ( कोंडोसी ) ता।। आटेगाव सु।। सलास खमसैन मया आलफ. मौजे मजकूरपैकी बाकी साल गुदस्ता व साल मजकूरचे ऐवजी तूर्त रसद रुपये १०० येकसे आणविले असेत. घेऊन येणे --- जाणीजे[१] छ. २ जमादिलावल.

---

**क्रमांक : ७४** **दि. ४–४–१७५३**

तुळाजी आंग्रे याने विशाळगडास वेढा घातला तेव्हां प्रतिनिधीने सैन्य धाडून तो उठविला. ही वार्ता प्रतिनिधीने ताराबाईना कळविली असतां त्यानी त्याला प्रत्युतर धाडले की, आंग्र्याकडे जो वसूल थकला आहे तो वसूल होण्याची व भगवंतराव अमात्य यांच्या किल्ल्यानां व वतनाला जो उपद्रव होत आहे, तो बंद होण्याची तरतूद आंग्र्याशी व्हायच्या तहात करावी.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री __________ आईसाहेब यानी राजमान्य राजश्री जगजीवन पंडीत प्रतिनिधी यांसि आज्ञा केली यैसीजे. तुम्ही विनंती पत्र पाठविले प्रविष्ट होऊन लेखनाभिप्राय श्रवणे साहेबास संतोष जाहाले. किले विशाळगडच्या उपराळियास आज्ञेप्रमाणे येऊन राजश्री तुळाजी आंगरे याचें पारपत्य येथास्थीत केले. प्रस्तुत म।।रनिलेकडून बावाजी विश्वासराऊ मध्यस्थीस आले आहेत. तह रह जाहालिया नंतर हुजुर दर्शनास अविलंबें येतो म्हणोन कितेक विस्तारे लिहिले. अशास तुम्ही कार्यकर्ते धुरंधर येकनिष्ट पुरातन आहा. जो कार्यभाग

कराल तो साहेबाच्या हितावहच कराल. फौजेची बेगमी होऊन घणियाचे आज्ञेत येथास्थित सेवक वर्तेत आणि साहेबाचा दरमाहा हुजुर येऊन मोईन प्रमाणे म।।रनिलेकडून पोहचे ते गोष्ट कराल हा साहेबास भरोसा आहे. आंगारकाकडे दरमाहा आजीतागायेत तटला आहे तो झाडियानिसी हुजूर प्रविष्ट होय ते करणे. आणाजी मुलिक हे हुजुर सेवा करीत आहेत. त्याचा पुत्र पोरगासुदा सावतांच्या व आगारकाच्या कजियात आंगारकाकडे हस्तगत आला आहे. तरी तुम्ही आपणाकडे मुलिकास आणून हुजुर पाठऊन देणे. वरकड कोकणांत ब्राम्हण रयेतस उपद्रव होत आहे व वतनदारास उपसर्ग लागतो त्या गोष्ट सर्व तहात आणून येथास्थीत प्रजा सुख पावे ते करणे. राजश्री भगवंतराऊ पंडीत आमात्याच्या किल्यांसी उपद्रव लाऊन वतन व इनामगांव व मोकासे व स्थले येथास्थीत म।।रनिलेकडे चालेत या गोष्टी तहात आणून पंडित म।।रनिलेचे साहित्य करणें. जाणिजे छ. २९ जमादिलोवल. सुहुर सन सलास खमसैन मया व अलफ.

---

**क्रमांक ७५** **दि. १–५–१७५३**

इचलकरंजीचे नारायणराव घोरपडे यानी मौजे खरकटवाडी हा गांव लुटला होता व अग्नोजी साळोखे यास आश्रय दिला होता. ताराबाईनी नारायणराव घोरपडे यास या पत्रातून ताकीद दिली आहे की, त्यानी साळोखेस आश्रय देऊ नये व पळवून नेलेली गुरे सोडून द्यावीत.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब यानी राजश्री नारायण वेंकटेश घोरपडे यासी आज्ञा केली यैसीजे. राजश्री अग्नोजी साळोखे हुजुर चाकर यासी तुम्ही आश्रा दिल्हात आणि मौजे खारकटवाडी ( खरकटवाडी ) प्रां मिरज हा गाव हुजूरचा येथील गुरे वळून नेली हे काही तुम्हास उत्तम नाही. तुम्ही व साळोखे राज्यातील

सेवक असोन हुजूरची खेडी खराब करावी ये गोष्टीने तुमचे येक निष्टेचा विपर्यास जाहलीयाने पुढे श्रेयस्कर पडू न होय हे चितात आणून अग्नोजी साळोखे यासी आश्रा न दणे. तथापि आश्रा देणे जरूर तर हुजूरचे वाटेस न जात आणि (गुरे) नेली ती(?) उतारू सोडून देववणे. यासी अंतर न करणे. जाणिजे छ. २६ जाकर सु।। सलास खयसैन मया व आलफ. बहुत काये लिहिणे.

मोर्तब
सुद

---

**क्रमांक : ७६** **दि. ३-५-१७५३**

स्वरुपजी महाडिक याचेकडे सरकारचे कर्ज आहे. तरी त्याला आवर्डे गावचा वसूल देऊ नये म्हणून, ताराबाई यांचे मोकदम मौजे आवरडे यास पत्र.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी ता।। मोकदमानी मौजे आवरडे ता।। (वर्ये) यासी आज्ञा केली ऐसीजे. रा।। सरुपजी माहाडीक याकडे सरकारचे कर्ज येणे. याकरिता मौजे मजकूर सरकारात दरोबस्त ठेविले आहे. मौजे मजकूरचा यैवज माहाडीकाकडे येक रु।। वसूल देण्यास दरकार[1] नाही. पाटील कुलकर्णी आणीले आहे. तरी देखत आज्ञापत्र हुजूर येणे....जाणीजे. छ. २८ जमादिलाखर सु।। सलास खमसैन मया व आलेफ. लेखनालंकार.

मोर्तब
सुद

---

१ दरकार = प्रयोजन, जरुरी

**क्रमांक : ७७** दि. ३–५–१७५३

स्वरुपजी महाडिक याच्याकडे सरकारचे कर्ज असल्याने मौजे कळंबे येथील त्याच्या मोकाशाचा आठवा हिस्सा सरकारांत ठेवला आहे. तरी महाडिकाकडे वसूल देऊ नये, म्हणून ताराबाई यांचे मोकदम मौजे कळंबे यास पत्र.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी त।। मोकदमानी मौजे कळंबे ता।। वर्ये यासी आज्ञा केली ऐसीजे. रा।। सरुपजी महाडीक याजकडे सरकारचे कर्ज येणे. याजकरिता मौजे मजकूरचा आठवा हिसा मुकासा सरकारात ठेविला असे. तरी महाडीक याजकडे वसूल येकंदर न देणे. पाटील कुलकर्णी हुजूर आणविले आहेत. देखत आज्ञापत्र हुजूर येणे — —.— जाणीजे.
छ. २८ जा।कर सु।। सलास खमसैन मया व अलफ. लेखनालंकार.

मोर्तब
सुद

---

**क्रमांक : ७८** दि. १५–५–१७५३

जकातीचा वसूल कमाविसदार जकात कसवा रहिमतपूर याच्याकडे पूर्ववत सुरळित पोहोचता करावा म्हणून मोकदम मौजे एलिव व सुलतानजी हुजरे यांस ताराबाई यांची ताकीद.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी मोकदमानी मौजे येलीव व सुलतानजी हुजरे यासी आज्ञा केली ऐसीजे. यमाजी सुरदेव कमाविसदार जकात क।। रहिमतपूर याणी जकातीच्या ऐवजावरी रोखे केले ते माघारे टाकिले म्हणून हुजूर विदीत जाहाले. तरी या

गोष्टी कार्यास येणार नाही. हाली देखत आज्ञापत्र जकातीचा आमल सुधामतप्रमाणे कमाविसदार याजकडे सुरळीत देणे. फिरोन बोभाटा येऊ न देणे... जाणीजे. छ. २१ माहे रजब सु।। सलास खमसैन मया व अलफ. लेखनालंकार.

मोर्तब
सुद

---

**क्रमांक : ७९** **दि. १६–५–१७५३**

प्रतिनिधीच्या फौजानी गाव लुटुन फस्त केला. लष्कराचा उपद्रव संपल्यावर पाटील व कुलकर्णी यांच्यासह हिशेब देण्यासाठी येतो, म्हणून नरसोजी जोतराव, मोकदम आकलखोप यांचे ताराबाईना पत्र. पेशव्यांच्या फौजांस गावात येऊ न देण्याची ताकीद द्यावी म्हणून पत्रात विनंती आहे.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री

आईसाहेब साहेबाचे सेवेसी.

आज्ञाधारक नरसोजी जोतराव मो।। आकलखोप

कृतानेक विज्ञापना. येथील क्षेम ता।। छ. १२ माहे रजबु पावेतो साहेबाचे कृपेदृष्टी करून वर्तमान येथास्तित आसे. यानंतर साहेबाच्या हुकुमाप्रमाणें दर्शनास पाटील व कुलकर्णी समागमे घेऊन यावयाची योजना केली व्होती. तो श्रीमंत राजश्री पंतप्रतिनिधी फौजसुधा येऊन मौजे मारावर तल घालून बैसले. गावची वैरण काडी कुंडी लुटून नेहली, यैसी खराबी जाहाली. लस्करची बरदास्ती करावी लागली म्हणोन गावकर राहिले. लस्कर आजीवर रोज उठोन उपसर्ग लागतो.

त्यांचे सेवेसी हजीर आसावे लागते. लस्करचा दंगा निवारण जालें नंत्रें पाटील व कुलकर्णी हिसेब घेऊन हुजूर दर्शनास येतील. हुकुमाप्रमाणे वर्तणूक करू. आम्हास आधार सर्व प्रकारे साहेबांच्या चेरणारविंदा वितरिक्त दुसरा अर्थ नाहीं. बहुत पालाल त्याहावया शक्ति नव्हे, हे विज्ञापना. श्रीमंत पेशवे यांचे लस्कर या मार्गे येणार म्हणोन वर्तमान आहे. यैसियासी त्यासहि ताकीद पत्र देणे. ती देऊन उपसर्ग न लागे तो अर्थ करणार धणी आसां. जाहाले वर्तमान सेवेसी निवेदन व्हावे म्हणोन विनंती लिहिली आहे. हे विज्ञापना.

---

**क्रमांक : ८०**

दि. १२-६-१७५३
( पोहोचल्याची तारीख )

जैनांची वरात बाजारातून वाजत गाजत जाते का त्याची माहिती पाठविण्याबाबत ताराबाई यानी मोकादम मौजे वाघोली यास पत्र पाठविले होते त्याने पत्रोत्तरी लिहिले की जैनाची वरात बाजारातून वाजत गाजत जात असल्याचे उदाहरण नाही.

पै।। छ. १० शाबान

श्री

श्रीमंत महाराज मातुश्री
आईसाहेब साहेबाचे सेवेसी

आर्जदास्त बंदे शरीकर मोकदम मौजे वाघोली ता।। हवेली प्रा।। पुणे. सन ११६३ आर्ज विज्ञापना. साहेबी कृपालु होऊन आज्ञापत्र सादर केलें तेथे आज्ञा जाली की जैणाची वरात बाजारातून मिरवत जाती किंवा नाही, हे चाल तुमचे या प्रांतात कैसी आहे ते लेहून पाठवणे म्हणोन आज्ञा. यैसीयासी पूर्वी जैणाचा चालीचा शोध आढलला नाही.

पैठणचा सड[1] व आणखी येक दोन स्थले येथील दाखले मणास (मनास) आणिले होते. त्यासीं कोठे जैणाचे चालीचा विचार आईकिला नाही. या प्रांतात येविसीचा प्रसंग पडिला नाही. साहेबाचे सेवेसी श्रुत जाले पाहिजे-हे आर्जदास्त.

---

**क्रमांक : ८१** **दि. १४-६-१७५३**

ताराबाई व नानासाहेब पेशवे यांच्या मधील वाटाघाटींचा हा कागद आहे. या वाटाघाटी महादजी नाईक निंबाळकर, दिनकर महादेव व शिवाजी खांडेकर या तिघांच्या मार्फत चालल्या होत्या.

प्रस्तुत कागदांत ताराबाई म्हणतात की, 'संशय चित्तात न ठेविता येकनिष्टतेची वृधी करून लौकिक उत्तम संपादावे.'

श्री

नकल

श्रीमत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी राजमान्य राजश्री बालाजी पंडीत प्रधान यास आज्ञा केली यैसीजे. राजश्री माहादाजी नाईक निंबालकर व रा॥ दिनकर महादेव व हुजूरुन त्रिवर्ग यैसे तुम्हाकडे रवाना केले होते. त्यास तुम्हापासी सांगणे ते सांगोन हुजूर आले. त्याणी तुमचे आशय सांगितले त्यावरुन विदीत जाहले. यैसियासी-

साहेबी पूर्वी सेवकावरी कृपा करुन येक्त्यारी देऊन राज्याचा बंदोबस्त करविला. त्या प्रमाणे

दुसरा मजकूर संशय निवृती व्हावी लागतील. त्यास आठ पंधरा रोजात संशय निवृती करणे. ती

---

१. दाखला; प्रमाणपत्र.

हाली कृपा केल्याने सेवक साहेबाच्या हुकुमाखेरीज नाही म्हणून. तरी तुमची निष्टा साहेबाच्या पायासी येकनिष्ट असल्याने साहेबांची कृपा पूर्ववत प्रमाणेच केली जाईल. कलम १

करुन तुम्हास आज्ञा करु. तुमच्या व साहेबाच्या दर्शनांती राज्योपयोगी विचार करणे तो केला जाईल. साहेबाच्या व तुमच्या विचारे होईल तो निसंशय केला जाईल. कलम १

तुम्ही मातबर सेवक येकनिष्ट यैसा साहेबाचा निशा पूर्ण असता लिक्षण वचनें बोलावी यैसा अर्थ काही नाही. साहेबाचे मानस तुम्हास कळले असता संशय धरावा असे नाही. तुम्हीच इतर प्रबोध करून संशय चितात न ठेविता येकनिष्टतेची वृधी करुन लौकिक उत्तम संपादावे. ते न करता आमची क्रिया उगविली म्हणून राजश्री दिनकर माहादेव बोलिले व सिवाजी खांडेकर याजबराबरी तुम्ही याप्रमाणेच सांगोन पाठविले. तरी तुम्हा मातबर सेवकाच्या क्रिया यावाज्जीवात्म तो साहेबापासून कशा उगवतील ? यैसी वचने तुम्ही मातबर सेवकाही न बोलावी. तुमचे येकनिष्टतेस योग्य ते करणे. वरकड सविस्तर राजश्री माहादाजी नाईक निंबाळकर व राजश्री दिनकर माहादेव पाठविले आहेत हे सांगतील त्यावरुन कळेल. जाणिजे.
छः १२ माहे शाबान सूहूर सन अर्बा खमसैन मया व आलफ. बहुत लिहिणे तरी सूज्ञ असा.

---

**क्रमांक : ८२** दि. १९–६–१७५३

सोनगाव येथील बागेत लावण्यासाठी दोन हजार केळीचे खुंट पाठवावे म्हणून नागठाणे येथील सरकारी बागेच्या रखवालदारास ताराबाई यांचे पत्र.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी रखवाली बाग सरकार व बाग नि।। हवालदार मौजे नागठाणे ता।। उंबरज यास

आज्ञा केली यैसीजे. हुजूर केळीच्या खुटाचे प्रयोजन आहे. तरी दोनी बाग श्री केलीचे कुट २००० दोन हजार सोनगावच्या बागेत पोह्चते करणे. गैई केलीया कामास येणार नाही. जाणीजे. छ. १७ माहे शाबान सु।। आर्बा खमसैन मया आलफ. लेखनालंकार.

मोर्तब
सुद

---

**क्रमांक : ८३** दि. २१-६-१७५३

हत्तींच्या दाणापाण्याची आवाळ करू नये व लोकांचा रोजमुरा नेमणुकीप्रमाणे द्यावा म्हणून ताराबाई यांचे चिमणाजी पंडीत सचिव यांस पत्र.

सचिवांची स्थिति ओढग्रस्त असल्याचा उल्लेख पत्रात आहे.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी राजमान्य राजश्री चिमणाजी पंडीत सचीव यासी आज्ञा केली यैसीजे. हुजूरचे हती कसबे सिखलास ( ? ) देऊन तुम्हाकडून नेमणूक करून दिली. त्याप्रा आजी पावेतो हतीचा बोभाट हुजूर येऊ दिल्हात नाही. हाली हतीची निगा न होय म्हणऊन हुजूर विदीत जाहाले. तरी यैसे न करणे. नेमणुकेप्र।। हतीची दाणाचाऱ्याची बेगमी करून देणे. यासी अंतर घडो न देणे. तुम्हास सर्व गोष्टीची वोढी पडिली हे साहेबास विदीत आहे. थोडकेच दिवसा वोढही दूर होईल. चितात दुसरा आर्थ (न) आणिता हातीची चरिता[१] व लोकाचा रोजमरा नेमणूकप्रा चालो देणे. फिरोन बोभाट येऊ(न) देणे. छ. १९ माहे शाबान सु।। आर्बा खमसैन मया व आलफ. या कामास जानोजी कदम व संताजी सुलाके आ।। २ यासी खर्च रुपये २५ पंचवीस देविले देणे. बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा.

लेखन
शुध

---

१ चरिदा = चाऱ्याचा खर्च

**क्रमांक : ८४** **दि. ७–७–१७५३**

सरकारी खिलाराच्या कुरणाला प्रतिबंध करू नये. ते पूर्ववत चालू असू द्यावे, म्हणून ताराबाई यांची मोकदम मौजे देगाव यांस ताकीद.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी मोकादमानी मौजे देगाव ता।। सातारा यास आज्ञा केली यैसीजे. सरकारचे खिलाराकडील कुरण मौजे मजकुरी आहे. त्यास साल मजकुरी खलेल करता म्हणोन हुजूर विदीत जाहाले. त्यावरून हे आज्ञापत्र सादर केले आसे. तरी खिलाराकडील कुरण सुदामत प्रमाणे खिलाराकडे चालवणे. कुरुणास कोणे गोष्टीविसी तसदी न देणे. येविसी बोभाटा हुजूर येऊ न देणे. जाणीजे. छ. ५ माहे रमजान सुहूर सन आर्बा खमसैन मया आलफ.

---

**क्रमांक : ८५** **दि. २९–७–१७५३**

पत्र नानासाहेब पेशवे यानी रामचंद्र नारायण यास पेशवे व करवीरकर छत्रपती यांच्यामधील संबंधाबाबत लिहिले आहे. ' लोकानी आम्हास बेमान मात्र न म्हणावे, आम्ही भोसल्यांचे वंशाचे चाकर, तेच नाहीसे जाहलियावरी आम्हास दोष नाही ' असे ज्या अर्थी पेशव्यानी पत्रात म्हटले आहे, त्या अर्थी पेशव्यांचे व करवीरकर छत्रपतींचे संबंध कोणत्या स्वरुपाचे होते त्याची कल्पना करता येते.

श्री

तालीक

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य
राजश्री रामचंद्र नारायेण गो ।।

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सु।। आर्बा खमसैन मया अलफ. तुम्ही छ. १५ रमजानचे पत्र पें।। ते छ. २४ रमजानी

पावले. लिहिले वर्तमान विदित जाहलें. सप्तरुषीहून फिरोन मातुश्रीची व बाबाजी जाधव व आणखी ग्रहस्ताची पत्रे आली व खुणेस हिऱ्याची मुद्रा पाठविली. तुमचा मार्ग च्यातक न्याये पाहात आहो. खोटा दागिना तुमच्या हावाला करितो श्री कुलस्वामिणीची शफत या आन्वये पत्रे आली, आम्हास पत्रे ध्खूण दाखविली. मुख्यासी श्रीमंत सौ बाईसाहेब याणी सांगितले की, ज्याणी वीष दिल्हे त्याचे हास्ते उतारा घेणे. येणेकरून परिणाम उतम नाही. जे होणे ते प्रधानपंताचे हाते होईल. श्रीमंत साहेब बाईसाहेब याणी उभयेता ग्रहस्तास विचारले, की आम्ही पेशव्याचे भरोशावरी आसता त्यास क्रियेस गुंतलो यैसेच म्हणतील की काय. त्यावर भगवंतपंत व शेषोपंत बोलिले जे पेशव्याच्या विश्वासावरी स्वामी आसता स्वामीच्या मनोदयानरूप त्याजकडून घडून येईल म्हणून विस्तारें लिहिले ते कळले. यैसियासी समक्ष जे जे बोलिलो त्यात आंतर तिळमात्र नाही. जे कारागृही आहेत ते पूर्ण लटके. आमक बाप आमकी आई आहेत, गाव आमका यैसा पूर्ण पता लावावा तो जगविख्यात व्हावा. मग हा अर्थ ताराबाई करोत अथवा सौ संपन्न जिजाबाई करोत. हा अर्थ जगविख्यात जाहलिया मग आम्हास तिळमात्र अभिमान नाही. आमचे आर्ज मात्र खावंदाचे कार्यसिध्धी जाहल्यावरी आयकावे लागतील व जे आम्हाविरुध सांप्रत काळीचे सप्तरुषीतील मुख्य इछितील ते कर्ता येणार नाही व खावंदाचे मनात ममता आहे तरी आसे घडणारहि नाही. पूर्ण कार्यसिधि व्हावी. आम्हास लोकानी बेभान मात्र न म्हणावे. आम्ही भोसल्याचे वंशाचे चाकर. तेच नाहीसे जाहल्यावरी आम्हास दोष नाही. इतका मात्र आमचा आर्थ आताही व समक्ष बोलिलो तेव्हाही. विस्तारे वारंवार काय लिहिणे. छ. २७ रमजान. बहुत काय लिहिणे.[1]

---

१. हे पत्र करवीर छत्रपती घराण्याच्या इतिहासाची साधने खंड १ मध्येहि लेखांक १०५ खाली प्रसिद्ध झाले आहे.

**क्रमांक : ८६** **दि. २१-१०-१७५३**

परगणे जमखिंडीचा मोकासा राणोजी घोरपडे याना करवीरकर छत्रपतीकडून मिळाला आहे. तरी त्याचा वसूल राणोजी घोरपडे सेनापती यांच्याकडे बिनतक्रार द्यावा. म्हणून नानासाहेब पेशवे यांचे देशमुख व देशपांडे, जमखिंडी यांस पत्र.

श्री

म।। अनाम देशमुख व देशपांडे जमखिंडी यासि

| | |
|---|---|
| श्री<br>राजा शाहू नर<br>पति हर्ष निधान<br>बाळाजी बाजी<br>राव प्रधान | बाळाजी बाजीराव प्रधान सु।। आर्बा खमसैन मया व अलफ. प।। मजकूर राजश्री राणोजी घोरपडे सेनापती याजकडे मुकासा राजश्री स्वामी करवीरवासी याजकडून पेशजीपासून आहे त्याप्रो करार असे. तरी तुम्ही मारनिलेच्या कमाविसदारासी रुजु राहोन मुकास- |

बाबेचा अमल सुदामत प्रो सुरळीत देणे. फिरोन बोभाट आलिया पारपत्य होईल. जाणिजे छ. २३ जिल्हेज. आज्ञा प्रमाण.

लेखन
सीमा

---

**क्रमांक : ८७** **दि. ७-१-१७५४**

रामाजी रवळनाथ आजरेकर याने बहुदा करवीरहून पोर्तुगिजांचे पुणे दरबारातील वकील घुमे व बाबा याना पाठविलेले हे पत्र आहे. नानासाहेब पेशवे यांचे इचलकरंजीनजीक आगमन झाले असून ते करवीरचे संभाजी महाराज यांच्या भेटीस जाणार असल्याची वदंता आहे, असे तो पत्रात म्हणतो.

श्री

पैवस्ती पौश सु।। १३ दसी रविवार

राजाश्रिया विराजित राजमान्ये राजश्री
गोपाळ बाबा व घुमे स्वामी
गोसावी यासी

सेवक रामाजी रवलनाथ आजिरेकर कृतानेक नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत असावे. यानंतर दोन तीन पत्रे पाठविली, परंतु त्याचे उतर एकहि न पाठविल, की निमित्य न कले. तर यैसे न करिता सर्वदा पत्री परामृश घेत असावे. चिरंजीव तेथे आहे. त्याचा तो परामृश घेतच आहा, ल्यावे येसे नाही. इकडील वर्तमान म्हणावे तर श्रीमंत पेसवे इचलकरंजीनजीक फोऊजसुदा आले आहेत. करवीरास येणार, श्रीमंतांची व म्हाराजाची भेटी होणार येसे वदंता आहे. काये घडेल ते वर्तमान मागाहून लिहून पाठवितो. पंचम्हालात जाणार येसी वदंता आहे. कलावे करिता लिहिले. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

ह्या समस्त मंडलीस नमस्कार. लिखितार्थं प्रसोन लोभ करीत असावे. कृपा कीजे हे विनंती. [१]

---

**क्रमांक : ८८** दि. १३–१–१७५४

घुमट शिरवळच्या मोर्च्यात यशवंतराव गायकवाड हे दारुच्या भडक्याने भाजले होते. म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यानी त्यांस किल्ले पन्हाळयाचे सरनाईकीचे वतन दिले.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८० श्रीमुखनाम संवछरे पौष बहुल पंचमी रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी रा।। येसवंतराव बिन म्हालोजी गायेकवाड सरनाईक किले पनाला यांस दिल्हे वतनपत्र ऐसेजे. तुम्ही स्वामीचे पुरातन येकनिष्ट सेवक. तुमचे वडीलवडिलानी स्वामीची सेवा बहुत निष्टेने केली व हली तुम्हीहि सेवा निष्टेने करीत आहा. स्वामीच्या पायाविना दुसरे

---

१ गोवा दप्तरातील हे पत्र करवीर छत्रपति घराण्याच्या इतिहासाची साधने, संपादक मा. वि. गुजर, भाग ८ मध्येहि लेखांक ७५ खाली प्रसिद्ध झाले आहे.

जाणत नाही. पेशजी घुमट सिरवलचे मुकामी मोर्चेमध्ये तुम्ही कस्त बहुत केली. तेथे दारवेने तुमचे आंग जळाले. पुनर्जन्म जाला. याकरितां तुमचे लेकराचे लेकरी चालवणे हे स्वामीस परम आवश्यक. यास्तव स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन तुम्हास नूतन वतन किले पनालाचे सरनाईकीचे करून दिल्हे आसे. या वतनास हक इनाम गावगना करुन दिला असे. ता।। बोरगांव व ता।। ठाणे पैकी गावगना जमीन पडीची भात रोप बीघे व गावगना नक्त रुपये मोईन करून दिली असे.

ता।। बोरगांव नक्त व जमीन — ता।। ठाणे गावगना व जमीन

( पुढे जमिनीचा तपशील आहे )

येकून नक्त रुपये शंभर व इनाम जमीन एक चावर साडेआठ बिघे करार करुन दिली आसे. तरी तुम्ही सदरहू जमीन चतु:सीमा करुन आपले स्वाधीन करुन घेणे आणि इनाम व हक तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन वतनाची सेवा करुन सुखरुप राहणे. सदरहुप्रो। हक इनाम स्वामी सुरलीत चालवितील. जाणिजे निदेश समक्ष (शिक्का)
तेरीख १८

रबिलावल सु।। आर्बा खमसैन ×

---

× पूर्वीच्या कोल्हापूर दरबारच्या सनदापत्रकाच्या नोंदणी पुस्तकातून घेतलेली ही सनद आहे.

' राव विश्वासराव गायकवाड घराण्याचा इतिहास ' या ग्रंथातहि ही प्रसिद्ध झाली आहे.

**क्रमांक : ८९** **दि. २४-४-१७५४**

माणिक भट, सोमभट व नारायण भट दीक्षित गुळवणी याना संभाजी दुसरे यानी दिलेली नूतन सनद.

' हा देश थोरले कैलासवासी स्वामीस कबज जाला. त्याणी वतनदारांच्या इनामती दूर करून वतनदार यांस जे पावणे ते दिवाणातून पावावे याची मोईन करून दिली ' असा उल्लेख सनदेत आहे.

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८० भावनाम संवत्सरे वैशाख शुद्ध द्वितीया सौम्यवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शंभू छत्रपति स्वामी याणी मुकदमानी देहे ताा तारळे यासी आज्ञा केली एसीजे. वेदमूर्ति माणिकभट बिन लक्षुमण व सोनभट बिन माणिकभट व नारायणभट बिन नरसीभट दीक्षित उपनाम गुळवणी जोतिसी व उपाध्ये व अष्टाधिकारी ताा देहाये मजकूर व मौजे रासिवडे ताा आरळे याणी

शिक्का शिक्का

करवीरचे मुकामी स्वामी संनिध येऊन विनंती केली की आपणास इदलशाई कारकीर्दीस गावगना जमीन ठिकाणे इनाम चालत होती. तेणेकडून आपला योगक्षेम चालत होता. त्यावरी हा देश राजश्री थोरले कैलासवासी स्वामीस कबज जाला. त्याणी वतनदाराच्या इनामती दूर करून वतनदार यास जे पावणे ते दिवाणातून पावावे यांची मोईन करून दिली. ते समई आपल्याही इनामती ठिकाणे होती तीं अमानत करून आपणास धर्मादायातून द्यावयाची मोईन केली. त्याप्रमाणे तांदूळ पावत होते. तेणे कडून आपला योगक्षेम चालोन सुखरूप होतो. त्याउपर ताम्र या प्रांते आला. देशात धामधम जाली. देश उद्वस जाला. याकरिता धर्मादायातून द्यावयाचे केले होते ते चालेनासे जाले. यास्तव आपण किले प्रसिद्धगडचे मुकामी राजश्री श्री सिवाजी राजे दाजी होते तेथे जाऊन विनंती केली की माहाराज धर्मपरायण आहेत. आम्ही वृत्यासी आहो. समुदाय बहूत आणि कुटुंबवछल आहो. आमचा

योगक्षेम चाले असे करावे म्हणून सांगितले. त्यावरून आपणास धर्मादाय तांदूळ होते ते दूर करून नूतन इनाम काटीमुळे विसा पांड्याच्या बिघयाने गावगना आमच्या ठिकाण पै।। जमीन चावर २ दोन दिली. त्याप्रमाणे पूर्वी किले पनाळियाचे मुकामी माहाजारानी ही पत्रे करून दिली होती ती पत्रे अग्नीच्या उपद्रवाने दग्ध जाली. याकरिता नूतनपत्रे भोगवटियास करून देविली पाहिजेत म्हणून. त्यावरून मनास अणिता पत्रे दग्ध जाली हे खरे. यास्तव हाली भोगवटीयास नूतन पत्रे सदरहूप्रमाणे करून दिली असेत. जमीन चावर दोन गावगना बी ता। ता। मजकूर.

( वतनाचा तपशील आहे )

येणेप्रमाणे देहाय मजकूर येकस तीन. यकूण जमीन चावर दोन पूर्ववतप्रमाणे यास व याचे गोत्रज वृत्यासी आहेत त्यास करार केली असे. आपपले ठिकाणापैकी जमीन नेमिल्याप्रमाणे वेदमूर्ती व गोत्रजा वृत्यासी अनभऊन स्नानसंध्यादि शटकर्मे आचरोन स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याण चितून सुखरूप राहातील. तरी तुम्ही सदरहूप्रमाणे जमीन गावगना याचे ठिकाण पो। इनाम यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. सदरहू नेमिल्याप्रमाणे जमिनीस मोजणीमुळे जमीन कम आली असेल ते पुरऊन देऊन जमीन अविछिन चालवणे. साल दरसाल नवीन पत्राचा उजूर न करणे. या सनदेची तालिक लेहून घेऊन असल सनद भट गोसावी याजवळ भोगवटियास परतोन देणे.[१] जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब.

रुजु

---

१ छत्रपती संभाजी दुसरे यानी देशाधिकारी व लेखक प्रांत तारळे याना लिहिलेले याच तारखेचे आज्ञापत्र उपलब्ध आहे.

**क्रमांक : ९०** **दि. २८–६–१७५४**

पत्र ताराबाईनी बाबाजी जाधव यांस पाठविलेले आहे. बाबाजी जाधव यानी ताराबाई यानी लिहिलेल्या पत्रात ज्या अर्थी ' चौथा वाडियास श्रीच्या दर्शनास पाठवायच होते. त्यात ये प्रांती राजश्री बाळाजी पंडित प्रधान नव्हते याजकरिता संवश्यास गोष्ट पडेल येदनिमित्य त्यास पाठविले नाही ', असे म्हटले आहे. त्या अर्थी राजघराण्यांतील माणसांच्या हालचालींबाबत पेशव्यांना कसा संशय येत होता त्याची कल्पना होते.

श्री

सहश्रायु चिरंजीव विजेभव राजश्री बाबाजी यांप्रति माहाराज मातुश्री – आईसाहेब आनेक आसीर्वाद. उपरी येथील कुशल – त।। आशाढ शुध आष्टमी भृगुवासरपर्यंत[1] येथास्थित जाणून स्वकीय लेखन करीत आसिले पाहिजे. विशेष सांप्रत तुम्हाकडून वहुत दिवस पत्र येऊन कुशल वृत निवेदन होत नव्हते. याकरिता चित सापेक्षित होते. त्यास प्रस्तुत पत्र पाठविले त्यावरून लेखनाभिप्राये अवगत जाला. चौथा वाडियास श्रीच्या दर्शनास पाटवावयच होते. त्यास ये प्रांती राजश्री बाळाजी पंडित प्रधान नव्हते याजकरिता संवशयात गोष्ट पडेल येद–निमित्य त्यास पाठविले नाही. हाली त्याची सध्य यावयाची पाहून चौथा वाडियाची रवानगी केली आहे. तर हे श्रीच दर्शन घेऊन वडिलाच्या दर्शनास यावयाचा हेत आहे. तर कृपा करून दर्शनाचा लाभ दिल्हा पाहिजे म्हणून विस्तारे लिहिले व र।। यशवंतराव गायेकवाड व सुभानजी जगथाप याणी कित्तेक विनंती केली ते साहेबी ध्यानात आणून जे आज्ञा कर्तव्य ते मारनिलेस केली आहे. हे सांगतील त्यावरून कळेल. बहुत काय लिहिणे. लोभ असो दीजे हा आसीर्वाद –

———

१. तारीख वाराप्रमाणे काढली आहे.

**क्रमांक : ९१** **दि. २१–७–१७५४**

अनाजी साठम याने त्र्यंबकराव दाभाडे याना पत्र पाठवून धामणे गाव फड-फर्मासिसी पासून मुक्त करण्याची विनंती केली होती. त्या पत्रास त्र्यंबकराव दाभाडे यांनी प्रत्युत्तर पाठविले की, " मोकासि याची फरमास गावकरांस सुटणार नाही "

श्रीराम

राजश्री अनाजी साठम गोसावी यांसी
अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य

स्नेहांकीत त्र्यंबकराव दाभाडे सेनाखासगेल रामराम सुरु सन खमस खमसेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले पावोन वर्तमान अवगत जाहले. मौजे धामणे तुम्हाकडे दरोबस्त जाले. फडफरमासीचा[1] रोखा मना कर्णे म्हणून लिहिले. त्यास तुम्हाकडे गाव जाहले तरी सुखरूप बंदोबस्त कर्णे. चिंता न कर्णे. परंतु मोकासी याची फरमास गावकरास सुटणार नाही. हाच कागद पुणेस दाखवावयासी पाहिजे. तरी नेणे. परंतु फडफरमास घेऊन जाणे. छ. २९ रमजान
बहुत काय लिहिणे (मोर्तब सुद)

सिका दाभा-
डे यांचा

---

१ फड फर्मास = फळ फळावळ व शाकभाजी गावकरी यानी सरकारी नोकरास द्यावयाची ती.

**क्रमांक : ९२** **दि. २८-९-१७५४**

व्यंकटराव राजे शिंदे यांच्या कमाविसीत घालमेल करू नये, त्यांचा कमा- विसदार येईल त्याच्याकडे वसुलीची कमाविसी चालवावी म्हणून संभाजी दुसरे यांची ताकीद.

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८०[1] भावनाम संवच्छर आश्विन शु।। द्वादसी मंदवासर क्षेत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री__________

आज्ञा केली असीजे. वस्तवाड प।। बेळगांव येथील यैवजास कमाविसदार राजश्री व्यंकटराव राजे सिंदे सेनाखासकील याणी आपले तर्फेने ठेऊन यैवज घेत आहेत. तुम्ही घालमेल करून कमाविसी आपणाकडे करून घेतली म्हणून विदित जाले. ती तुम्हास कमाविसी करावयास गरज नाही. सेनाखासकील याकडील कमाविसदार येईल त्या कडेस कमाविसीचा धंदा सुरळीत चाले ते करणें. मध्यें इस्कील केलिया कार्यास येणार नाही. जाणिजे निदे(श) समक्ष__________

रुजु सा

मंत्री

बार सुरु सुद बार

---

**क्रमांक : ९३** **दि. १३-३-१७५५**

लक्ष्मणराव शिंदे यांचा सेनाखासकीलचा बहुमान व त्याचा सरंजाम त्याना पूर्ववत दिला आहे म्हणून संभाजी दुसरे यांचे देशमुख व देशपांडे प्रांत बेळगाव याना आज्ञापत्र.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८१ युवानाम संवछरे चैत्र शु।।

---

१ जंत्रींत राजशक ८१ येतो.

प्रतिपदा गुरुवासरे क्षत्रिय कुलावंतस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी देशमुख व देशपांडे प्रांत बेळगाव यासि आज्ञा केली यसीजे–

| | |
|---|---|
| श्री राजा शंभू छ | श्री आई आ |
| त्रपति हर्ष निदा | दि पुरूष श्री राजा |
| न केशव सुत भ | शिव छत्रपति स्वामि |
| गवंत पंडित मु | कृपा निधि तस्य प- |
| ख्य प्रधान | रशुराम त्रिंबक |
| | प्रतिनिधि |

राजश्री लक्ष्मणराव सिंदे सेनाखासकील याजवरी स्वामी कृपाळु होऊन सेनाकासकिलीचा वहुमान करून सरंजाम त्याचा त्याज– कडे पूर्ववत प्रो करार करून दिल्हा असे. तरी तुम्ही त्यासी रूजु होऊन त्याचे रजातलबेत वर्तोन त्याचे तर्फेचा आमल जो असेल तो सुरळीत वसूल देत जाणे. कोणेविसी उजुर न कर्णे. आमलाचा बोभाट हुजूर न ये असी वर्तणूक कर्णे. जाणिजे. निदेश समक्ष.
मोर्तब

रुजु सा
मंत्री

---

**क्रमांक : ९४** **दि. १५–४–१७५५**

उदाजी चव्हाण याना हुबळी सरकारपैकी सत्तावीस गावची देशमुखी दहा हजार रुपये, दोन घोडी दोन हजार रुपये किमतीची, दोन रत्नजडित पदके, दोन मोत्यांच्या माळा, वगैरे जवाहिराच्या मोबदल्यास विकत दिल्याचा हा कागद आहे.

' मुलुक वैरान पडून आम्ही खराबीखाली आलो. कर्ज फार जाहाले ', असे देशमुखीचा विक्रय करणारा म्हणतो.

सिका पारसी

( येथे पारसी मजकूर सुमारे १४ ओळी आहे. )

तालीक

पारसी व मौजीब हिंदवी खरीदपत्र देशमुखी प्रां. बागेवाडी

वे ।। या (?) देहाय सरकार हुबळी सुबे दारुलजफर विज्यापूर आंकी आता शाहमतपनाह राऊ अजम उरफ उदाजी राऊ चव्हाण हिमत बहादर ममलकतमदार यासी ——— सु।। ११६८ हिजरी कारणे लिहून दिल्हे खरीदीपत्र ऐसेजे. बायस[1] हैरानगी व हरेशानी[2] कितयेक मोकदमें आफतर[3] होऊन मुलक वैरान पडून आम्ही खराबी खाली आलों. कर्ज फार जाहाले. त्यासबब तुम्हापासून नगद रुपये १०,००० दाहा हजार व घोडे २ दोनी किमत रुपये दोनी हजार व पदके जडीत उंच २ दोनी व मोत्याचा माळा २ दोन उंच वगैरे जवाहीर घेऊन तुम्हासी देशमुखी परगणे मजकूर देह २७ सत्तावीस कुलबाब हक लवाजिमा इनाम उमली[4] गाव मौज मुतीगी १ व इगलश्वर १ व मौज मणूर यकूण गाव तीन गावगना जिरायत व बागायत इनाम फसकी व वळगी (?) जकायत व संदी माहले सायेर माहाल व पान व तशरीफ व दसखत हक रुसुम कुलकानू नाल वतनीबाब दरोबस्त देशमुखीच वतन तुम्हासी खरी(दी) दील्हे असे. तरी यावतचंद्र सूर्य तावत्काल तुम्ही आपली अवलियादअफलाद वतन संदरहू लिहिलेप्रमाणे अनभऊन सुखरुप राहणे. आमचे अवलाद-अफलादीमधे कोणही तुम्हासी हिला हरकत[5] मुन्कीर[6] करितील तरी त्यास तलाख स द त (?) लाख असे. आम्ही आपले खुश रजावंदीने लिहून दिल्हे खरीदी पत्र. हे सही तेरीख छ. २ माहे रजब.

गोही

नरसापा हेबुळी मिची नि।। देसाई प।। चिमलगाव पत्रा प्र।। साक्ष

हादयवा पटलणी कासी भामजी कुलकर्णी मौज मणूर प।। मजकूर

घटवाणमी न।। त-नि।। देसाई प।। रोळी वगैरे पत्रा प्रमाणे साक्ष. गोई सिदपा गदिगापा

निशाणी नांगर

देसाई प्रांत मम्हंदापूर

१ बायस = कारण; २ हरेषानी = नुकसानी; तोटा;
३ आफतरी = दैन्यावस्था ४ उमली = अधिक
५ हिलाहरकत = युक्तिप्रयुक्तीने केलेला विरोध; ६ मुन्किर = नाकबूल

बसवगौडा मोकदम क॥बागेवाडी गुरगौडा मोकदम क॥ मजकूर आणाजी भानजी कुलकर्णी क॥ मा॥र

निशाणी नांगर

राग्रगौडा मोकदम व पायगौडा मोकदम मौज हालहाल प॥ मजकूर रघुनाथ गोविंद कुलकर्णी मौज हालहाल

निशाणी नांगर

सिदगौडा मोकदम मौज यरनाळ व कुमटे मोकदमानी सोमाजी नरसिंव्ह कुलकर्णी मौज तुविन हिदरगे प॥ मा॥र

निशाणी नांगर

वेंकाजी दतो माधवराऊ, कृष्णो श्रीनिवास मुरारी क॥ बागेवाडी सिदंपा पंच मौजे मुतीगी प॥ मा॥र

मोकदमानी गोविंद तीपाणा कुलकर्णी मौज हिडपर प॥ मजकूर

निशाणी नांगर

रामाजी वासुदेव कुलकर्णी मौजे मुतगी प॥ मजकूर

बसापा मोकदम व फतेसो मोकेदम मौज गुडनहाळ प॥ मा॥र

मोकदमानी शेषगिरी इगलश्वर कुलकर्णी मौज मा॥र सदनहाळ प॥ मजकूर

बसापाराव पदमराव मोकदम मौज सावळवाडिणी.

अकोजी रुद्रो कुलकर्णी मौज मा॥र

निशाणी नांगर

व्यंकाजी तिमाजी कुलकर्णी मौज कूर

निशाणी नांगर

संगापा मोकदम ऐयापा मोकदम व नागोजी त्र्यबक

निशाणी नांगर

बसापा पटेल मौज करी बावनहाळ शषगिरी कुलकर्णी मा॥र

निशाणी नांगर

मोकदम मौज अग-
सहाळ व्यंकाजी कृष्णों
कुलकर्णी मौज मा।र

निशाणी नांगर

रायापा मोकदम
करीगौड मोकदम
वेंकाजी कृष्णो
कुलकर्णी मौज मजकूर
खचिलहाळ प।।
मजकूर

निशाणी नांगर

कुलकर्णी मौज
इगलश्वर प।।
बागेवाडी

निशाणी नांगर

बी मौ। ऊ
नरसा
तुकदेव
कुलकर्णी
मौज
उदनदिनी
ब मौ ऊ

सिवापा पार्चंद
सिदगौंडा पटेल
मौज उदनदिनी

निशाणी नांगर

मोकदमानी शषागीर
कुलकर्णी मौज हुणसे-
हाळ प।। मा।र

निशाणी नांगर

तीरकापा मोकदम
अकोजी रुद्रो कुलकर्णी
मौज हुलीबची
कुलकर्णी
निशाणी नांगर

बसापा मोकदम व
माधवराव कृष्ण
कुलकर्णी मौज मर
सलगी प।। मा।र
बी ।। ० ०

मुलाना मोकदम व
रायापा मोकदम
व्यंकाजी कृष्णो कुल-
कर्णी मौज इवनगी
प।। मजकूर

निशाणी नांगर

वीरगौंडा मोकदम व
मरडापा मोकदम व

दड्यापा मोकदम व
माधवराव कृष्ण कुल-
कर्णी मौज हालहाल
प।। मार
बी।। ड

सिवापा मोकदम व
येकपा बी।। मोकदम

नरसो हिरो कुलकर्णी
मौज कसवानहाळ
प।। मजकूर

निशाणी नांगर

व व्येंकाजी दत्तो कुल-
कर्णी मौज अबलनूर
बी।। ड

निशाणी नांगर

पाटार्डेपा पाटील व
कृष्णो येमाजी कुल-
कर्णी मौज वालालकी
प।। मा।र
बी।। ड

निशाणी नांगर

पाठीमामे

लुले दावडा मोकदम

निशाणी नांगर

अयाणा मोकदम क।।
उकली

निशाणी नांगर

जखापा अरवल जय (?) क।। मजकूर उकली

भिकाजी हणमाजी कुलकर्णी क।। उकली व माहारुद्र लिंगोजी क।। मा।र

वोहाकारपा पटेल व मडिवाल बिरादर पटेल क।। तुलवाड व कृष्णो येलगुर कुलकर्णी क।। मजकूर व दत्तो लिंगोजी कुलकर्णी क।। मा।र

संक्राजी चंवडो कुलकर्णी क।। उकली मनापा शषापा देसाई प।। बिदरी बाळागौडा पटेल व सिनपा कुलकर्णी क।। मा।र हमदापूर

निशाणी नांगर

| | |
|---|---|
| मलकापा बनापा मोकादम मौज हान-उटगी प।। उकली | बाळयापा वलद लिंगापा मोकदम मौज उपूर |
| निशाणी नांगर | निशाणी नांगर |
| मोकदमानी हणमाजी श्रीनिवास कुलकर्णी मौज हडलगी प।। उकली | धोंडो नरसिंह कुल-कर्णी मौज मार प।। उकली सिवापा मोकदम |
| | मानी |
| निशाणी नांगर | कुलकर्णी मौज हेगडहाळ पा। उकली |
| | निशाणी नांगर |
| | सत्यापा मोकदम व मुडालगौडा ( ? ) मुलकी (?) कुलकर्णी मौज नगीनहाळ पा। उकली |
| | निशाणी नांगर |

(पुढे उजवे बाजूस)

| | | |
|---|---|---|
| वे।। तिमाजी केशव गु।। देशपांडे प।। कोकटनूर | बे।। व्यंकट राऊ देशपांडे गु।। देशमुख प।। कोकटनूर | बे।। आवजी गुंडो गु।। नाडगौंडा प।। बागेवाडी |
| गो। रामाजी आनजी देशपांडे | आनंदराव व्यासराव गु।। देशमुख | वै।। नारो व्यंकटाद्रि गु।। देशपांडे प।। बागेवडी |

प्रा किरुलजकर पा हिंदरगे
हिवदूर पत्रा प्रमाण साक्ष
गो रघुपतराव
त्रियंबक देशपांडे
सरकार
विजापूर

---

**क्रमांक : ९५** **दि. ७-५-१७५५**

अर्थिक व्यवहारासंबंधी अंतोबा सरलष्कर यांचे मालोजीराव घोरपडे याना पत्र

श्री

राजश्री मालोजीराव घोरपडे
देसमुख त।। वाळवे गो।

कवज बे।। अंतोबा सारलसकर मो नेवापूर सु।। खमस खमसेन मया अलफ. तुम्हाकडे रा बाबासेट हवळ यानी आपले रुपये बदल पाठविले होते. त्यासी तुम्ही आमचे गु।। ने दिल्हे रुपये बी।। यो

५० चैत्र वदी धसमी रु।।
५० वैशाख वदी येकादसी रुपये

१००

रु.।। संभर आमचे गु।। ने पावले ते बाबा सेटीस पावले कळले

पावती पाठऊन देऊ. लि।। सही तेरीख २४ रजेब.

साक्ष

दि।। नरसो राम
१

निशान कातरी

राघोजी कदम
१

---

क्रमांक : ९६. दि. २०-७-१७५५

विश्वंभर पंडित या नावाच्या ब्राम्हणास पंत प्रतिनिधी यानी मौजे साटेर येथे जमीन इनाम दिली होती. त्याचे नूतन इनामपत्र येकोजी दळवी यानी करून दिले.

या पत्रावर येकोजी दळवी यांचा शिक्का आहे.

तालिक

श्री

श्री राजा
शंभु छत्रपति
चरणी तप्तर ये
कोजी दळवी
निरंतर

नूतन इनामत राजश्री विश्वांबर गोसावी बिन गणेश गोसावी उपनाम पंडित गोत्र भारद्वाज सूत्र अश्विलायन वस्तव्य मौज साटेरे तर्फ हातखंबे सुभा प्रांत राजापूर सु।। सित खमसैन मया व अलफ. ब।। सनद श्रीमंत राजश्री पंत प्रतिनिधी मुकाम किले विशाळगड सु।। खमस खम सैन मया व अलफ. छ.२२ माहे सपर तेथे आज्ञा की गोसावी विद्यापात्र कुटुंबवछल आणि श्रीचे ज्यलमअष्टमीचा उछाह वारसिक करीत असतात. त्याचे योग्यक्षेम चालविलियाने स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याणवह जाणून याजवर कृपाळू होऊन यासी मौजे मजकुरी नूतन इनाम नजिक गोसावी याचे घर खेरीज हकदार व इनामदार जमीन बिघे ०।।. आर्ध बिघा इनाम जमीन करून दिल्ही असे. तुम्ही सदरहू

जमीन विसा पांडाचे बिघ्याने मोजून च्यतुसीमाक असल घेऊन गोसावी याचे दुमाला करणे. सदरहू ठिकाणाचे मधे फणसाची झाडे नारळ माड सुपारीची झाडे जी असतील ते यास इनाम करून दिल्हीं असे. देविल्याप्रमाणे हे इनाम याजकडे चालवणे असे आज्ञापत्र सादर जाहले व येक्सी किलाकडून सनद छ २४ माहे सपरची सादर जाहाली. त्याप्रमाणें च्यतु:सीमा करून घ्यावी. त्यास पेशजीचे तेच साली द्यावी तर धामधूम आंगांरकाची जाहाली त्यामुळे गाठ पडली नाही. याजकरिता साल मजकुरी राजश्री माहादाजी आपाजी कारकून किले मजकुराहून येऊन च्यतु:सीमा करून दिली

आगर जमीन बिघे ८॥. ठिकाण

अदा ठिकाण च्यतु:सीमा आगर जमीन मोजून दिल्ही असे

तपसील–

ठिकाण खासगत आगर जमीन नजिक घर गोसावी पूर्वेस बांध बंधारे उतरेस ठिकाण केसो कृष्ण पंडित धाडीचा ठावे त्या वेळीकडे ८।॥. पाटानजिक धाडे पछमेस पाट ८।॥. घर दक्षिणेस पांद यकूण मोजणी

कांटी —अर्जकाटी—तुळकाटी

८॥ २९

७

——

२०३

६।॥.

६।.

६॥.

——

२८

पै॥ चवथाई

सदरहू ठिकाणामध्ये

झाडा झाडा

१७ फणस झाडे

२ बारदान कदीम

१५ नवे राणे गोसावी याची

—— हात झाडे

१७

१ नारळ माड राणे पाच साली

७ सुपारी राणे अ(।)ट साली

——

२५

यकूण जमीन बिघे ८।। ।. पै।। बांघ घाडी ८।।. बाकी बिघे ८।। येणे प्रमाणे आगर जमीन बिघे आर्ध ८।। बिघा व फणस झाडे सतरा व नारळ येक सुपारीचे झाडे सात या प्रमाणे च्यतु:सीमा करून दिल्हा असे. छ १० शौवाल

मोर्तब
सुद

साक्षी मोजणीस

| किता | ग्रामस्त |
|---|---|
| १ माहादाजी आपाजी कारकून | १ राघदे प्रभु मुळ्ये |
| १ तानाजी देसाई तर्फ मजकूर | १ वासुदेव भट ताटके |
| १ त्रिबक केशव देशकुलकर्णी तर्फ मजकूर | १ माहादजी गणेश पंडित |
| | १ भगवंत कासी गद्रे कवगवडा (?) मौजे मा।र |
| १ गोविंद बलाल खोत मौजे मट | |
| १ कासी श्रीनिवास खोत असोडे | १ काना म्हार विटया (?) |
| १ येसाजीराव चारवली | मोजणी |
| १ महादजी अनंत खोत उमरे | |
| १ विठल बलाळ माहाजन वाळके | ५ |
| ८ | |

**क्रमांक : ९७** **दि. १३-८-१७५५**

शिंद्यांचे कारभारी रामचंद्र मल्हार यांच्या लोकांची देवस्थाने गोव्यांत होती. त्यांच्या खर्चासाठी त्यानी सोंधेच्या राजाकडून एक खेडे व दोन वाड्या मिळविल्या होत्या. त्यांचा कारभार जी माणसे बघावयास जातील त्याना अडथळा करू नये व सप्तकोटीश्वर देवस्थानचे जप्त करण्यात आलेले गाव परत करावे म्हणून नानासाहेब पेशवे यांचे गोव्याच्या उप-राजप्रमुखास पत्र.

गोवा बंदराचे उपराजप्रमुख फरान्सिस्कु आस्सिज द ताव्होरा, मार्केज द ताव्होरा याना नानासाहेब पेशवे यांचे पत्र.

श्रीयुत रामचंद्र मल्हार यांच्या लोकांची देवळे अंत्रुज (फोंडे) प्रांतात आहेत. या देवळांची योग्य प्रकारे देखभाल व्हावी म्हणून त्यानी सोंधेचे राजे इमंडी सदाशिव नायक यांजकडून कवळे येथील शांता-दुर्गेच्या मंदिरासाठीं कवळे हे गाव, प्रियोळ येथील म्हाळशेच्या मंदिरा-साठी प्रियोळ गाव व म्हार्डदोळ गावातील दोन वाड्या व मंगेशाच्या मंदिरासाठी मंगेशी हे गाव मिळवून दिले आहे. हा सर्व टापू मिळून एक खेडे व दोन वाड्या होतात. शिवाय ह्या तिन्ही देवस्थानांसाठी अंत्रुज प्रांताच्या खजिन्यांतून दर वर्षी अडीचशे रुपये मिळतात. ही सर्व देणगी मी कायम केली असून माझ्या सरकारने सबंधित अधिकाऱ्याना या बाबत पत्रे पाठविली आहेत. तेव्हा, तुम्हास पत्र पाठविण्याचे एवढेच कारण की, ज्यावेळी वरील खेड्यात आणि वाड्यांत माणसें कारभार बघण्यासाठी जातील, तेव्हां तुमच्या माणसांकडून त्याना कोणत्याच प्रकारचा उपसर्ग होऊ नये. तुमचे आणि सोंध्याचे संबंध चांगले नाहीत हे आम्हाला माहीत आहे. परंतु तुमच्या प्रश्नांत हस्तक्षेप करण्याची आमची इच्छा नाही. तरीहि वरील प्रदेशाला व देवस्थानाना तुमच्या-कडून उपद्रव होऊ नये अशी आमची इच्छा आहे.

सप्तकोटीश्वर[1] येथील मंदीर फार पुरातन आहे, पूर्वीच्या

---

१. सन १६६८ च्या नवंबर महिन्यात मतग्राममधील नार्वे येथील सप्त कोटीश्वर मंदिराचा जीर्णोद्धार शिवाजीने केला. या बद्दलचा शिलालेख मंदिराच्या महाद्वारावर आहे- पोर्तुगीज मराठे संबंध, ले. प्रा. पांडुरंग पिसुर्लेकर, पृ. ७६.

व्हाइसरॉयने डिचोली प्रांत आणि तेथील किल्ला वाडीकरांकडून जिंकून घेतल्यावर सप्तकोटीश्वर गावातील लोक पळून गेले. असे कळते की, सप्तकोटीश्वर देवस्थानच्या खर्चासाठी ते गाव नेमून देण्यात आले होते. परंतु तुम्ही ते जप्त केले आहे. माझी तुम्हाला विनंति आहे की, सदहू गाव मुक्त करून सप्तकोटीश्वर देवस्थानला ते परत करण्याचे आज्ञापत्रक काढावे. तसे झाले की, या देवस्थानच्या खर्चाचा प्रश्न मिटेल.

या शिवाय अधिक काही लिहिणे नाही.*

शाहू महाराजांचा
शिक्का

---

क्रमांक : ९८ दि. १–९–१७५५

छत्रपती संभाजी दुसरे यांनी अनंताचार्य पुराणिक नामक ब्राम्हणास दहा बिघे जमीन इनाम दिली. मातुश्री 'आईसाहेब (राजसबाई) व मातुश्री ताई यांच्या अस्ती वाराणसीस पाठविल्या' त्या वेळी अनंताचार्य त्या बरोबर महायात्रेस गेले होते असा उल्लेख या कागदात आहे.

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८२ युवानाम संवछरे श्रावण बहुल दशमी इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी

---

* उपर्युक्त मराठी पत्राचे पोर्तुगीज भाषांतर गोवा सरकारचा दुभाषी अनंत कामत वाघ याने दि. १३ ऑगष्ट १७५४ या दिवशी केले. ते गोवा पुराभिलेख संग्रहालयांतील Livro 2' de Pazes. Pg. 107 वर असून, त्याचेच हे फिरून स्वैर मराठी भाषांतर करण्यात आले आहे.

समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि चिरंजीव राजमान्य राजश्री मुराररराव घोरपडे वजारतमाब यासी आज्ञा केली यसीजे. वेदशास्त्र संपन्न राजश्री अनंताचार्य व।। श्रीनिवासाचार्य गोत्र काश्यप सूत्र आश्वलायन उपनाम पुराणिक वाडा सांगलीकर याणी करवीर मुकामी येऊन स्वामी संनीध्य विनंती केली की आपण कुटुंब वत्सल आहे. आनाची स्वस्था नाही. कांही भूमि दान इनाम करून देऊन कुटुंवासी स्वस्था करावी म्हणोन विदित केले. त्यावरून मनास आणिता हे विद्यावंत सत्पात्र ब्राह्मण. मातुश्री आईसाहेब× व मातुश्रीताई* यांच्या अस्ती वाराणसीस पाठविल्या त्या समागमे हे माहायात्रेस गेले. तिरस्थली यात्रा करून आले. याचे कुटुंबाचे संरक्षण केलिया स्वामीस श्रेयस्कर जाणोन स्वामी याजवरी कृपाळू होऊन नूतन धारादत भावानाम संवछरी वाडियात शतचंडी अनुष्टान समई भूमिदान सकुश हिरण्योदक संकलपयुक्त जमीन बिघे ८।० दाहा मौजे सांगवडे, क।। सांगाव प्रांत हुकेरी या गावी विसा पांडाच्या बिघ्याने कुलबाब कुलकानू सहित सर्वमान्य धाराधत इनाम जमीन बिघे दाहा उत्तम प्रतीची कीर्द वेदमूर्तीस दिल्ही असे. तरी तुम्ही मौजे म।।रपैकी सदरहूप्रो इनाम जमीन चतुःसीमा करून देऊन अनंताचार्य यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम दिल्हे. प्रतिवर्षी नवीन पत्राचा हुजुर न कर्णे. या सनदेची तालिक लिहून घेऊन असल सनद भोगवटीयासी अनंताचार्य याजकडे परतोन देणे. जाणिजे बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा मोा आसे.

---

× संभाजीची आई राजसबाई इ. सं. १७५१ त वारली.

* ह्या कोण ?

**क्रमांक : ९९** दि. २९-१०-१७५५

आंग्रे व पोर्तुगीज यांच्या समायिक शत्रू विरुद्ध दोघांनी दोस्ती केली पाहिजे, असा प्रस्ताव सादर करून तुळाजी आंग्रे यानी गोव्याच्या व्हाइसरॉयला पाठविलेले पत्र.

**गोव्याचे व्हाइसरॉय कौंट द आल्वा याना तुळाजी आंग्रे यांचे पत्र.**

आपल्या पत्राचा मोठ्या प्रेमाने आणि आनंदाने स्वीकार केला. ते वाचून सर्व मजकूर विदीत झाला. आपण हे पत्र इस्माइलखान याच्याकडे देऊन पाठविलेत व आपल्या हुकुमावरून ते तें इकडे घेऊन आले. मला आपणास कळवायचे आहे की, आपली मैत्री उत्तरोत्तर वृद्धिगत व्हावी व आपणा दोघांच्या शत्रूचा नि:पात करण्याच्या कामी ती कारणी लागावी ही माझी इच्छा आहे. आपण एकमेकाना मदत केल्याविना शत्रूला शासन होणार नाही, हे स्पष्टच आहे. आपले वकील इस्माईल खान यांच्याशी मी या प्रश्नाबाबत बोलणी केली असून ते आपणाला या बोलण्याचा आढावा सादर करतीलच. शिवाय मी आपणाकडे माझे वकील काणोपंत व कृष्णाजी जैतापूरकर या दोघाना पाठवित आहे. त्यांच्याशी आपण नि:शंकपणे बोलणी करावी. माझेच विचार ते व्यक्त करीत आहेत असे आपण धरून चालावे.

आपण इस्माईल खान यास कुमक देऊन इकडे त्वरीत पाठवावे. आपल्या मैत्रीची आकांक्षा बाळगणारा.

* हे पत्र २२ मोहरम रोजी (दि. २९-१०-१७५५) लिहिण्यात आले. पत्राच्या सुरवातीला डाव्या बाजूस मोठा आणि उजव्या बाजूस लहान शिक्का.

**Livro 2° de Pazes fol 9**

---

* तुळाजी आंग्रे यांच्या मराठी पत्राच्या पोर्तुगीज भाषांतराचे हे फिरून करण्यात आलेले स्वैर मराठी भाषांतर आहे.

**क्रमांक : १००** **दि. २९–१०–१७५५**

मैत्रीची अपेक्षा करून तुळाजी आंग्रे यानी गोव्याच्या व्हाइसरॉयला जे पत्र पाठविले, त्याचीच ही पुरवणी आहे.

तुमच्यामध्ये आणि माझ्यामध्ये जो तह होईल तो कायम टिकावा अशी माझी इच्छा आहे. तहाच्या वाटाघाटीसाठी मी तुमच्याकडे रामजीराव राणे याना पाठवित आहे. त्याना वाटाघाटीचे संपूर्ण अधिकार देण्यात आले आहेत. तुम्हामध्ये जी कलमे ठरतील त्यांचे पालन करण्यास मी बद्धपरिकर आहे, हे आपण जाणावे.

हे पत्र २२ मोहरम (२९–१०–१७५५) रोजी लिहिण्यात आले.

(या पत्रांचे* भाषांतर सरकारी दुभाषी आनंत कामत वाघ यानी केले.)

Livro de Pazes fol 9

---

**क्रमांक : १०१** **दि. ५–११–१७५५**

नानासाहेब पेशवे यांच्या स्वारीला तोंड देण्याकरितां तुळाजी आंग्रे यानी पोर्तुगिजांकडे सैन्याची कुमक मागितली होती. तुळाजी आंग्रे यांच्या विनंतीस मान देऊन गोव्याचा व्हाइसरॉय कौंट द आल्वा याने ५०० सैनिकांची तुकडी आंग्र्याच्या मदतीस पाठविण्याचे ठरविले. या कुमकेबाबत तुळाजी आंग्रे व पोर्तुगीज यांच्यामध्ये जो तह झाला त्याची ही कलमे आहेत. ही कलमे गोव्याच्या व्हाइसरॉयच्या वतीने गोवा राज्याचा सचीव व तुळाजी आंग्रे यांच्या वतीने त्यांचे वकील रामजीराव राणे व काणोपंत या तिघानी मिळून ठरविली.

कलम १

श्रीमान तुळाजी आंग्रे सरखेल यानी या राज्याची कुरापत काढल्याने

* त्या पोर्तुगीज भाषांतराचे हे स्वैर मराठी भाषांतर आहे.

या राज्याची त्यांच्यावर पुष्कळ दिवसापासून वक्रदृष्टि होती. परंतु त्यानी जेव्हां मेहेरवान दों. लुईज द मास्कारेन्यास, कौंट द आल्वा, हिंदुस्थानचे व्हाइसरॉय आणि कॅप्टन जनरल, याना अर्ज केला की आपले जुने अपराध विसरून जाऊन आपणाशी तह करावा, तेव्हां मेहेरबान दों लुईज द मास्कारेन्यास कौंट द आल्वा, हिंदुस्थानचे व्हाइसरॉय आणि कॅप्टन जनरल यानी श्रीमान तुळाजी आंग्रे यांचे अपराध विसरून जाऊन त्याना संरक्षण देण्याचा बेत केला.

कलम २

बाळाजी बाजीराव यांच्या स्वारीचे संकट टळावे म्हणून मेहरबान कौंट व्हाइसरॉय हे श्रीमान तुळाजी आंग्रे सरखेल याना पाचशे सैनिकांची कुमक पाठवितील. हे सैन्य त्यांच्या ठाण्यांचे रक्षण करील. त्यांचा तळ तुळाजी आंग्रे सरखेल यांची राजधानी ग्रिये (विजयदुर्ग) येथे असेल. या सैन्याला त्याच्या सेनापतीच्या संमतीविना अन्यत्र कुठे पाठविले जाणार नाही.

कलम ३

या सैन्याचा मुशाहिरा श्रीमान तुळाजी आंग्रे सरखेल हे आपल्या खजिन्यांतून प्रत्येक सैनिकाच्या ठरलेल्या मुशाहिऱ्याप्रमाणे फारीख करतील. या सैनिकांचा मुशाहिरा इस्तादाने जो ठरविला आहे त्याच्या यादीची एक प्रत सदहू सेनापतीकडे देण्यात येईल.

कलम ४

या सैन्याला ग्रियें येथे शक्य तेवढया सुख सोयी प्राप्त व्हाव्यात. शिवाय त्याला हिंदु आणि मुसलमान सैन्याच्या गोटापासून वेगळ्या-जागीं रहावयाची जागा मिळावी. तसेंच हे सैन्य ख्रिश्चन धर्मियांचे असल्याने सैनिकांना आपले धार्मिक विधि पार पाडण्याची पूर्ण मुभा राहावी.

कलम ५

या सैन्याला श्रीमान् तुळाजी आंग्रे सरखेल यांच्याकडून ज्या खाद्य वस्तूंचा पुरवठा होईल, त्या वस्तूंच्या किमती गोवा बंदरातील खाद्य वस्तूंच्या किंमतीहून अधिक असतां कामा नयेत. त्या वस्तूंच्या किंमतीची एक अस्सल यादी त्यांच्याकडून पुरविली जाईल. श्रीमान तुळाजी आंग्रे सरखेल यांच्या राज्यांत डुक्करे, कोंकरे, गहू, उकडा तांदुळ, खोबऱ्याचे तेल, वगैरे गोष्टी उपलब्ध नसल्याने त्यांचा पुरवठा ग्रिये येथील पोर्तुगीज सैन्याला या शहरातून व्हावा. अर्थात त्या तिकडे नेण्याची व्यवस्था श्रीमान तुळाजी आंग्रे हे आपल्या नौकांनी करतील.

कलम ६

पोर्तुगीज सैन्याच्या अधिकाऱ्यांचा पगार त्याना या शहरी मिळेल. कारण, त्याना ज्या वस्तूंची तिकडे जरूरी भासेल त्या वस्तू त्याना या शहरी खरेदी कराव्या लागतील. अर्थात या वस्तू ग्रिये येथे नेण्याची व्यवस्था उपरिनिर्दिष्ट कलमानुसार होईल. सैन्याला लागणाऱ्या सर्व वस्तूंचा साठा श्रीमान तुळाजी आंग्रे सरखेल यांच्या वस्तुभांडारात केला जाईल व सैन्याला त्या वस्तु भांडारांतून देण्याची व्यवस्था केली जाईल.

कलम ७

श्रीमान तुळाजी आंग्रे सरखेल हे या कलमान्वये शाही खजिन्याला दोन लक्ष रुपये देतील.

कलम ८

उपर्युक्त रकमेची व तहाच्या कलमांची हमी म्हणून तहाच्या वाटाघाटी करणारे श्रीमान तुळाजी आंग्रे सरखेल यांचे दोघे वकील काणोपंत व रामजीराव राणे हे या शहरी ओलीस राहतील. त्यांची

मुक्तता. मदतीस गेलेले सैन्य चालू उन्हाळ्यात जेव्हां इकडे माघारा परतेल तेव्हां होईल.

कलम ९

हे राज्य तुळाजी आंग्रे यांच्या मदतीला बिनीच्या सैन्याची एक कंपनी त्वरीत रवाना करील. तत्पूर्वी श्रीमान तुळाजी आंग्रे सरखेल हे शाही खजिन्यात एक लक्ष रुपये भरतील. यानंतर वीस दिवसानी कुमकेस जाणारी दुसरी तुकडी ग्रियेला निघेल, तेव्हां एक लक्ष रुपयांचा उरलेला हप्ता श्रीमान तुळाजी आंग्रे हे शाही खजिन्यात भरतील.

कलम १०

कुमकेस जाणारे पोर्तुगीज सैन्य इंग्रजांशी ग्रियेच्या किल्ल्याशिवाय समुद्रावर लढणार नाही. कारण, इंग्रज व पोर्तुगीज यांचा मैत्रीचा करार असून त्यानी युरोपांत किंवा आशियांत कुठेहि एकमेकांशी लढू नये, असे एक कलम सदहू करारात आहे.

कलम ११

या कराराच्या दोन नकला काढण्यात येतील व त्यांच्यावर उभय पक्षांचा शिक्का मोर्तब होईल. पैकी त्याची एक प्रत या राज्याच्या सचिवालयांत राहील, तर दुसरी प्रत श्रीमान तुळाजी आंग्रे सरखेल याना सादर केली जाईल. तसे केल्यावर कराराची अमलबजावणी होऊन कुमकेचे सैन्य जलद गतीनें रवाना होईल व उभयपक्षांचे संबंध अधिक घनिष्ठ होतील.

हा करार राज्याच्या सचिवालयांत पार पडला, व त्याच्यावर दि. ५ नवंबर १७५५ या दिवशी सह्या झाल्या.

शाही मुद्रा— बाल्शियॉर व्हाज द कान्हील्यु

रामजी राव राणे— कृष्णाजी जैतापूरकर

कराराच्या कलमांचे भाषांतर* राज्य दुभाषी अनंत कामत वाघ यानी त्यांचा मदतनीस सदाशिव कामत वाघ यांच्या मदतीने केले.

सचिवालय दि. ६ नवंबर १७५५

अनंत कामत वाघ

( Livro 2° de Pazes fol 19 )

---

क्रमांक : १०२ दि. २६–१२–१७५५

संभाजी दुसरे यांजकडून मिराखान यास कसबे वडगावची मुलाणकी इनाम.
कसबे वडगाव येथे मुलाणा नसल्याने तिथली मुलाणकी आपणास मिळावी म्हणून मिराखान याने संभाजी दुसरे याना अर्ज केला होता.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ८२ युवानाम संवत्सरे मार्गशीर्ष वद्य आष्टमी भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी मिराखान बिन पीर महमद मुलाणा कसबे वडगाव यास दिल्हे वतनपत्र ऐसीजे. तुवा हुजुर वडगावचे मुकामी स्वामीसन्नीध पेशजी आर्ज केला होता जे आपण बहुत दिवस दिवाणची शेवा चाकरी करून कसबे मजकुरी राहातो. माझे वतन विजापुरी आहे ते तिकडे राहिले आहे. (साहे)बी मेहरबान होऊन मज नूतन वतन द्यावयाची आज्ञा करावी म्हणोन. त्याजवरून मनास आणिता क॥ मजकुरी मुलाणा नाही. मुलाणकीत माल मसीदीची दिवाबत्ती उस्तवारी व्हावी लागते. याजकरिता मुलाणकीचे वतन तुज करार करून कसबे मजकूरच्या वतनदारास व देशकास महजर करून द्यावयाची आज्ञा केली. त्यास फकीरखान आगादुम (?) मुसलमान मुलाणकी आपली

---

* त्या पोर्तुगीज भाषांतराचे हे स्वैर मराठी भाषांतर आहे.

म्हणोन हुजूर हयाल[1] जाहला. त्यावरून अमलदारास व देशकास व कसबे मजकूरच्या वतनदारास त्याची मनसुबी मनास आणिता फकीरखान यास मुलाणकीस संबंध नाही. मुलाणकीयात फकीर खोटा. त्यावर दिवाणानी वतनदारास विचारले की आणखी काही या वतनास लढा आहे की काय हे सांगणे. यावरून कसबे मजकुरचे वतनदारानी अर्ज केला की कसबे मजकुरी मुलाणकी हयाल पूर्वी मुलाणा होता त्याचे नकल जाहाले. वतन निर्वारीस आहे. याउपरी मुलाणकीस मागेपुढे लढा नाही ऐसा केला. त्यावरून स्वामी तुजवरी कृपाळु होऊन मसीदीची दिवाबत्ती चालावी लागती याजकरिता कसबे मजकुरीची मुलाणकी आजराहमरहमत तुज वतन करार करून देऊन मुलाणकीच्या वतनास तुज इनाम जमीन वीसा पांडाच्या बिघियाने बिघे ॰३ दिली असे व मुलाणकीस हक इनाम कानु कायदे पेसजीचे असतील त्याप्रमाणे करार करून दिल्हे असेत. येविसी आमलदार व देशक व कसबे मजकूरचे वतनदार उभी पांढर याचे गुजारतीने माहजर आलाहिदा सादर असे. तरी मसीदीची चाकरी करून सदरहू इनाम जमीन पेशजीप्रमाणे हक्क इनाम कानु अनभवणे. तूं व तुझ्या अवलाद अफलादीने मुलाणकीचे वतन अनभवोन सुखरूप राहाणे. जाणिजे. निदेश समक्ष.

तेरीख २१[2]

रबिलावल सु॥सित खमसेन.

---

१. दाखल. २. मोडक जंत्रीत तेरीख २२ पडते. शिवाय त्या दिवशी तिथी आणि वार जुळतो म्हणून इंग्रजी तारीख २६-१२-१७५५ धरली आहे.

**क्रमांक : १०३** **दि. ३१-१२-१७५५**

कृष्णाजी जावजी व सुभानजी सुर्याजी माने मखदुम यांची वतनपत्रे मडलगे गावावर कापशीकरांनी स्वारी केली तेव्हां जळून गेली होती. आपणास नवीन वतनपत्रे मिळावी म्हणून त्या दोघांनी संभाजी दुसरे याना विनंती केली असता त्यानी त्याना नवीन वतनपत्र करून दिले.

श्री

शिका

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८२ युवनाम संवत्सरे मार्गसीर्ष बहुल चतुर्दसी सौम्यवासरे* क्षेत्रिय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी याणी कृष्णाजी बिन जावजी व सुभानजी बिन सूर्याजी माने मखदुम मौजे मडिलगे बु।। त।। यास दिल्हे वतनपत्र येसीजे. तुम्ही करवीर मुकामी स्वामी संनीध येऊन विनंती केली की पत्रे वतनाची होती ती कापसी-कराची स्वारी गावावरी पडली ते समई गाव जाळून स(त्या)नास केला त्यामधे आपली पत्रे वतनाची (दग्ध जाहली.) भोगवटियासी पत्र पाहिजेत म्हणून. त्यावरून मनास आणिता तुम्ही वतनदार तुम्हास भोगवटीयासी पत्रे पाहिजेत याकरिता स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन पूर्ववत्प्रमाणे भोगवटीयासी पत्रे करून दिल्ही असेत. या वतनास कानु कायदे इनाम जमीन बी त।। कानु काइदे.

इनाम जमीन मान्याची धूर
पैकी विधे
जमीन ८१ कदीम इनाम
कलमे ८१ नूतन अर्जी इनाम

८२

---

* वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

| | |
|---|---|
| | बिघे दोन व कानू काइदे सदरहू |
| | तू व तुझे पुत्र पौत्रादि वंश |
| परंपरेने | आन)भऊन गावची कीर्द माहामुरी |
| | वा करून सुखरूप राहाणे. |
| जाणिजे | (निदे)श समक्ष |

---

**क्रमांक : १०४** **दि. ३१–१२–१७५५**

कृष्णाजी जावजी व सुभानजी सूर्याजी मखदुम मौज मडलगे, यांची वतन–पत्रें नष्ट झाली होती, ती त्यांच्या विनंतीवरून नवीन करून दिली आहेत. म्हणून संभाजी दुसरे यांचे कोंडाजी भोसले सुभेदार यांस आज्ञापत्र.

या आज्ञापत्रांत कोंडाजी भोसले यास 'चिरंजीव' म्हणून संबोधिले आहे.

श्री

स्वस्ति (श्री) राज्याभिषेक शके ८२ युवनाम संवत्सरे मार्गसीर्ष-बहुल चतुर्दशी सौम्यवासरे[1] क्षत्रीये कुलावतंस श्री राजा संभु छत्रपती स्वामी याणी चिरंजीव राजमा(न्य) राजश्री कोंडाजी भोसले सुभेदार यास आज्ञा केली येसीजे– कृष्णाजी बिन जावजी व सुभानजी बिन सूर्याजी (माने) मखदुम मौजे मडलगे बु।। ता।। खानापूर याणी कर–वीरचे मु।। स्वामीसनिध विनंती केली कीं आपण मौजे म।।रची मखदुम वतनदार. वतनपत्रे होती ती दग्ध जाली. भोगवटीयास पत्रे पाहिजेत म्हणून. त्यावरून मनास आणिता हे वतनदार. याजपासी भो।।यास पत्रे असावी हे खरे. यास्तव हाली स्वामी कृपाळू होऊन पूर्ववत प्रो। भो।।यासि पत्रे करून दिली असेत. या वतनास कानु काइदे इनाम जमीन बी त।। कानु काइदे.

---

१ वाराप्रमाणें तारीख काढली आहे.

| | इनाम जमीन मान्याचे घुरग पैकी |
|---|---|
| म्हैस पालक १ | ०१ कदीम इनाम |
| राजमान कलमे | ०१ नूतन अर्जी इनाम |
| ३ | ०२ |

(रेघ कोरी)

३

येणेप्रमाणे जमीन विघे दोन व कानु काइदे मखदुमकीचे वतनास
याचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. प्रतिवर्सी नवीन पत्राची हुजुर न करणे. याची प्रति घेऊन असल पत्र भो।।यास देणे. जाणिजे. बहुत काय लिहिणे.

मोर्तब

---

**क्रमांक : १०५** इ. स. १७५५–५६

बेदनूर, सोंधे व बंकापूर या संस्थानच्या खंडणीचा हिशेब. त्यांत अंत्रूज (गोवा) महालाच्या खंडणीचाहि अंतर्भाव आहे.

श्री

नेमणूक संवस्थानापैकी वि।। पंतप्रधान सु।। सित खमसैन रुो
३०००० संवस्थान बिदरूर
३१००० संवस्थान सोंधे
२१००० सोंधे
१०००० अंतरूज

३१०००

५०००० संवस्थान बंकापूर

१११०००

पैकी वसूल सन सीत गु।। रा शेषो नारायेण

रु।।

५०००० वजा पंचोत्रा[1] रुपये २५०० बाकी

रुपये

४७५००

त।।

२२५०० संवस्थान बंकापूर

१२५०० संवस्थान सोंधे

१२५०० संवस्थान बिदरूर

४७५००

---

क्रमांक : १०६ दि. १३–२–१७५६

सावनूरच्या नबाबाने नानासाहेब पेशवे यांच्या विरूद्ध गोव्याच्या व्हाईसरॉयकडे लष्करी मदत मागितली होती. ती मदत पाठविताना व्हाइसरॉयने कुमकेस जाणाऱ्या अधिकाऱ्याला दिलेल्या या सूचना आहेत.

कॅ. आंतोनियु गोंसाल्विज यास
देण्यात आलेल्या सूचना

कॅ. आंतोनियु गोंसाल्विज यानी सावनूरचे नबाब व इतर दोस्त यांच्या कुमकेस सैन्य घेऊन गेल्यावर पुढील सूचनानुसार वागावयाचे आहे :–

---

१. पंचोत्रा : शेकडा पाच टक्के कर. राज्यात तटबंदी, गढी, वगैरे बांधल्यास हा कर छत्रपतीकडे द्यावा लागे. ( ऐतिहासिक शब्दकोश भाग १ पृ. ७५६ )

तुम्हाला हे पत्र मिळाल्यावर तुम्ही सावनूरच्या नबाबाच्या मदतीस जाण्याकरितां लगेच सावनूरकडे कूच करावे. तुम्ही नवाब मुझफरजंग यांची भेट घेऊन त्याना सोबत नेत असलेले पत्र देऊन सांगावे की, त्यानी या राज्याकडे मदतीसाठी जो अर्ज केला होता, तदनुसार तुम्हाला तुमच्या दुय्यम अधिकाऱ्यासह त्यांच्या सैन्याच्या मदतीला पाठविण्यात आले आहे. नबाब मुझफर जंग यांचा आणि माझा जो वैयक्तिक स्नेह आहे तदनुसार त्याना ही तांतडीची मदत मी पाठविली आहे, हे तुम्ही त्याना पटवून द्यावे.

नबाब मुझफरजंग हे तुमचा आणि तुमच्या दुय्यम अधिकाऱ्याचा मुशाहिरा तुमच्या योग्यतेनुसार देतील. तुम्हाला जे काय सामान सुमान लागेल त्याची मागणी तुम्ही त्यांच्याकडे करावी. पण तुमची मागणी पूर्ण झाली नाही, तर तुम्ही इथल्या सचिवालयामार्फत ही गोष्ट मला कळवावी. म्हणजे मी त्यांत त्वरीत लक्ष घालीन.

तुम्ही नवाबाच्या व त्यांच्या दोस्तांच्या सैन्याची पहाणी करून त्या सैन्याची रचना, त्याची तयारी, वगैरे गोष्टींचा अभ्यास करावा. त्याचबरोबर नानासाहेब पेशवे यांच्याहि सैन्याच्या हालचालींची तुम्ही माहिती काढावी व दोन्ही सैन्याची तुलना करून कुठल्या सैन्यात काय कमी अधिक आहे, त्याचा तपशीलवार निष्कर्ष काढावा.

या सूचना तुम्हाला आयत्यावेळी देण्यांत येत आहेत. तरी तुम्ही तुमचे चातुर्य आणि बुद्धिमत्ता यांचा उपयोग करून प्रसंगानुरूप वागावें व आमच्या स्वामीची चांगली सेवा करावी. तुमची कामगिरी तुम्ही योग्य प्रकारे वजावल्यास माझेहि धन्यवाद तुम्हास प्राप्त होतील.*

गोवा, १३ फेब्रुवारी १७५६

कौंट द आल्वा

---

* गोवा पुराभिलेख संग्रहालयातील Livro " Regimentos & Instrucors " fls 181-182 वरून घेतलेले पत्र.

क्रमांक : १०७ दि. १४-४-१७५६

अकाजी बंचे पाटील याने मौजे सावर्डे गावचे चौगलकीचे वतन विकत घेतले होते. ते आपल्या नावे करावे म्हणून त्याने संभाजी दुसरे याना विनंती केली असता त्यानी ती मंजूर केली.

श्री

सिका आसे

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८२ धातानाम संवछरे चैत्र शु॥ पौरणिमा सौम्यवासरे[1] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी त॥ अकाजी बिन परसोजी बंचे पाटील मौजे सावर्डे त॥ सातवे यासी दिल्हे चौगुलकीचे नूतन वतन येसेजे :—

सिका पेशवेचा पान घाटी — सिका प्रतिनिधीचा वर्तुळाकार

तुवा हुजुर करवीरचे मुकामी विनंती केलीस की पूर्वी चौगुले शिंदे होते त्यास त्यांचे नकल जाहले. त्यावर वतन मोहित्यानी घेतले. बाळोजी मोहिता म्हणोन होता त्याणे रुपये २७५ पावणे तीनसे देऊन दिवाणातून वतन करून घेतले. परंतु बालोजीस रुपये द्यावयास ताखत नाही. याजमुळे त्याणे खरेदी वतन व वतनाचे खरेदीपत्र व राजपत्र गावच्या पाचाच्या साक्षीने आपणापासी दिल्हे आणि आपण पावणे तिनसे रुपये वारिले म्हणोन हे वर्तमान हुजुर स्वामीस विदित केले. त्यावरून मनास आणिता तुम्ही रुपये वारून चौघाचे साक्षीनिसी वतन घेतले व तुम्ही पूर्वापार स्वामीसेवा निष्टेने करीत आहां हे जाणोन स्वामी तुजवरी कृपाळू होऊन पूर्वील कागद मोहिते यांचे आणून दाखविले ते बजिनस पाहून् मौजे म॥ चे चौगुलकीचे वतन नूतन करार करून दिल्हे आसे. तरी चौगुलकीच्या वतनसंबंधे कानु कायदे पेशजीपासोन चालत असतील त्याप्रो तू तुझ्या

---

१ वारांप्रमाणे तारीख काढली आहे.

पुत्र पौत्रादि वंशपरंपरे(ने) आनभऊन वतनाची चाकरी करून मौजे म।।रचे चौगुलकीचे वतन आनभवोन सुखरुप राहाणे. वतनसमंध्ये तुझ्या माथा जीवजला (?) व फिला (?)शेरणी रुपये १०० येकसे ठेविले त्याचा वसूल हुजुर पोताकडे जमा आसे. जाणिजे निदेश समक्ष.

सिका असे.

तेरीख १३
माहे रजब सु।। सित
खमसेन.

---

क्रमांक : १०८ दि. १४-४-१७५६

आकोजी परसोजी बंचे पाटील याने भिकाजी यादव व कुल्जोजी यादव पाटील यांच्याकडून त्यांच्या पाटीलकीचा कांही भाग विकत घेतला होता. परंतु नंतर यादवांनी विकलेल्या भागाबाबत दावा करण्यास प्रारंभ केला असता बंचे पाटलाने छत्रपती संभाजी दुसरे यांच्याकडे दाद मागितली. त्यानी बंचे पाटलाचे वतन कायम केले.

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८२ धातानाम संवछरे चैत्र शु।। पोरणिमा सौम्यवासरे[1] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा संभु छत्रपती स्वामी याणी त।। आकोजी विन परसोजी बंचे पाटील मौजे सावर्डे त।। सातवे

सिका पेशवे याचा पानघाटी

सिका प्रतिनिधी याचा वर्तुळाकार

यास दिले दुमालपत्र येसीजे. तू हुजुर करवीरचे मुकामी विनंती केली की, भिकाजी व रुद्राजी यादव प।। वडील घर

---

१. वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

मौजे म।।र याणी आपले तक्षिमेच्या निमे पाटीलकी प्रो चौथाई पाटी-लकी व नांगरपोळी भावई राहटया कुल्जोजी यादव पाटील मौजे म।।र याणी आपले निमे पाटीलकी पै।। तिसरी तक्षीम पेशजी मला आपल्या स्वसंतोषे विकत देऊन क्रयपत्रे करून दिल्ही आहेत. त्याप्रो हुजुरच्या सनदा व दस्तकाचे कागद आहेत. त्यापासून आपण पाटीलकी व कानु-कायदे सदरहूप्रो आनभवित असता यादव मजकूर याणी दिवाणात जाऊन वतन अमानत करविले आणि आपण गावातून बाहेर पडोन दावे करीत असता दाव्यामध्ये सापडले. त्यास किले पनाळा दिवाणात आणोन हजर केले. दिवाणानी मनसुबी मनास आणिता यादवानी स्वसंतोषे वतने विकत देऊन क्रयपत्रे करून दिल्ही आसता कजिया करावया प्रयोजन नाही याप्रो मनसुबी निवडली आहे. साहेब धणी आहेत. मनास आणोन माजे वतन माज्या स्वाधीन करून स्थापना करावी म्हणून व किले मजकुरी मनसुबी निवडल्याप्रो किला विनंती-पत्र व पेशजीचे कागदपत्र हुजूर आणून दाखविले. त्यावरून मनास आणिता यादव पा।म।।र याणी आपल्या राजिनिमेत पेशजी आपल्या वतनांप्रो तुज पाटीलकी व कानु काइदे विकत देऊन क्रयपत्रे दिल्ही आसता फिरोन लवाडो करून काजिया करावया गरज नाही. जाणून झाली स्वामी तुजवरी कृपाळू होऊन तुझे निसबतीची पाटीलकी आमानत केली होती ते तुझ्या दुमाला करून हे दुमालपत्र तुजे सादर केले आसे. तरी सदरहूप्रो पाटीलकी आपले स्वाधीन करून घेऊन पाटीलकीसमंधे कानु कायदे तुझे आसतील त्याप्रो तू व तुजा पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने मौजे म।।रचे पाटीलकीचे वतन आपले ताक्षिमेचे आनभवोन वतनाची चाकरी करून सुखरुप राहणे. याउपरी यादव म।।र याणी तुजपासी कजियास प्रयोजन नसे. जाणिजे निदेश समक्ष.

सिका आसे.

तरीख १३
माहे रजब सु।। सित
खमसेन

**क्रमांक : १०९** **दि. १८-९-१७५६**

मौजे चाफवळे या गावास वतनदार खोत नव्हता. ही खोती आपणास मिळावी म्हणून गोविंद नाईक माहुलकर याने छत्रपती संभाजी दुसरे याना विनंती केली असता, त्यानी ती मंजूर करून उपरिनिर्दिष्ट गावची खोती माहुलकरास दिली.

तालिक

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८३ धातानाम सवछरे भाद्रपद बहुल दशमी मंदवासरे[1] क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी त।। मोकदमानी मौजे चाफवली त।। देवाळे सुभा प्रांत राजापूर यासी आज्ञा केली यैसीजे. राजश्री गोविंद नाईक बिन हणमाजी नाईक उपनाम माहुलकर गोत्र कौसिक सूत्र आश्वलायन देसाई त।। देवाळे व सरदेसाई त।। देवाळे व तर्फ हातखंबे व त।। हरचिरी व त।। देवरुख देहे ८ यकून माहाल साडेतीन तालुक खेळणा सुभा प्रांत राजापूर याणी हुजूर करवीरचे मुकामी स्वामिसनिध येऊन विदीत केले की, मौजे मजकुरास वतनदार खोत कोणी नाही अणी शे सवासें वर्शेपर्यंत उपलग खोती कमाविसी दाखल जिल्हेदाराचे आज्ञेप्रमाणे करीत अले. गावास वतनदार खोत नाही. माहाराजानी कृपाळू होऊन सेवकास वतनी खोती करून दिल्हिया गावाची कीर्द माहामुरी करून खोतीचे वतन अनभऊ म्हणोन विदित केले. त्याजवरून माहाल देशक व वतनदार तुम्ही गावचे मिरासदार यासी आणोन दाखला मनास आणिता मौजे मजकुरास वतनदार खोत नाही हे खरे म्हणोन नाईक मजकूर हे माहाल देशमुख व सरदेसाई पिडीजादे वतनदार स्वामी सेवा निष्टेने करीत आले याजकरिता हली स्वामी यांजवर कृपाळू होऊन मौज मजकुराची खोती यासी वतन करार करून दिल्ही असे. तरी तुम्ही खोत याच्या स्वाधीन करून खोतीच्या वतनसबंधे इनाम कानु कायदे पुरातन चालत असतील त्याप्रमाणे यासी चालवणे अणो मौजमजकुराची यासी व याचे

---

१ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

पुत्र पौत्राधि वंशपरंपरेने खोती वतन चालवणे. प्रतिवर्षी ताजा सनदेचा उजुर न करिता या पत्राची तालीक लिहून घेऊन असल पत्र भोगवटी-यास परतोन देणे. जाणिजे निदेश समक्ष.

---

क्रमांक : ११० इ. स. १७५६–५७

बाळोजी करंडा याच्या घरात चोरी होऊन त्याच्या बायकोच्या अंगावरील दागिने आणि घरातील वस्तू गेल्या आहेत. तरी आऊवे, तळेगाव व भोय तळेगाव येथील बेरड व मांग यांना जमा करून चोरीचा तपास करावा, म्हणून उदाजी व आबाजी दिमत अणाजी साठम याना पेशव्यांचे पत्र.

श्री

राजा शाहू नरपती

हर्षनिधान बाळाजी

बाजीराव प्रधान

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ता॥ उदाजी व आबाजी दिमत राजश्री अणाजी साठम सु॥ सबा खमसेन मया व अलफ बाळोजी करंडा खिदमतगार याचें घर मौजे घामणे ता॥ हवेली प्रांत पुणे येथे आहे. त्यास त्याचे घरी चोरी होऊन वायकाचे अंगावरील वस्त व घरातील वस्तभाव चोरून नेली म्हणोन हुजुर विदित जाले. त्यावरून हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी तुम्ही आऊवे[1] व तळेगाव व भोय[2] तळेगांव असतील तेथील बेरड व मांग जमा करून घरीं चोरी जाली आहे त्याचें ठिकाण लावून देणे. ( मोर्तब सूद )

---

१ आवळे असावे. २ भोयरे असावे.

**क्रमांक : १११** **दि. २२–१–१७५७**

गोव्याहून पोर्तुगालच्या राजास पाठविण्यात आलेल्या ह्या मोसमी पत्रात, इंग्रजांच्या मदतीने नानासाहेब पेशवे यानी केलेला आंग्र्यांचा पाडाव, पोर्तुगिजांची आंग्र्यांना झालेली मदत, नानासाहेब पेशवे यांची सावनूरची स्वारी, सोंध्याच्या राजाचा त्यानी केलेला पराभव, गोव्याच्या व्हाइसरॉयने फोंड्यावर केलेली स्वारी व तीत झालेला त्याचा मृत्यू, वगैरे घटनांचा वृत्तांत आहे.

महाराज,

आंग्र्याच्या मदतीला आमचे सैन्य ग्रिये (विजयदुर्ग)ला पाठविण्यात आले होते, हे आम्ही आपणाला मागच्या पत्रात कळविले होते. हे सैन्य माघारा परतल्यावर ज्या घटना घडल्या त्या आम्ही आपणाला आता सादर करीत आहो. इंग्रज व मराठे यानी तुळाजी आंग्रे याच्या विरुद्ध दोस्ती केल्याने युद्धाच्या ज्वाला अधिकाधिक प्रज्वलित झाल्या. मराठे व इंग्रज यांचे हल्ले भयंकर तीव्र होत गेल्याने आंग्र्याला अखेर आपल्या राजधानीचा आश्रय घ्यावा लागला. तेथे इंग्रज व मराठे यानी त्याची पुरती कोंडी केली. मराठ्यांनी त्याला शरण येण्यास सांगितले. त्याच्या व त्याच्या कुटुंबियांच्या जीविताला अपाय होणार नाही, असे त्याला मराठ्यानी वचन दिले. त्या वचनावर विश्वास ठेवून आंग्रे मराठ्याना शरण गेला. परंतु आंग्र्याच्या या शरणागतीचा इंग्रजानी पुरताच फायदा घेतला. त्यानी किल्ला ताब्यात घेऊन आंग्र्याची राजधानी व त्याच्या कुटुंबियाना लुटले. त्याचे आरमार तेवढे सुरक्षित होते. परंतु त्याच्याच आज्ञेवरून ते जाळण्यात आले.

आंग्रे आता नानाच्या ताब्यात असल्याने त्याच्या मालकीचे जे काय होते, त्याच्यावर तो आपला हक्क सांगत आहे. आपणाला माहित आहेच की, आंग्र्याच्या मदतीला आम्ही ग्रिये येथे सैन्य पाठविले होते. या प्रसंगी आंग्र्याकडून आम्हाला चार लक्ष अश्रफी मिळाल्या, असा नानाचा दावा असून ही रक्कम आम्ही आपणास परत करावी अशी मागणी त्याने आमच्याकडे केली आहे. या व्यवहाराचा तपशील महा–

राजांना या पूर्वी सादर करण्यात आलाच आहे. आंग्र्याकडून मिळालेली रक्कम चार लक्ष अश्रफींची असली, तरी खजिन्यामध्ये फक्त साडेतीन लक्ष अश्रफी जमा झाल्याचा हिशेब मिळतो.

नानाने नबाबांवरहि विजय मिळविला आहे. सलाबतजंग याने दगलबाजी करून नानास जाऊन मिळाल्याने दोस्तांना अखेर शरणागती पत्करावी लागली. या तहांत नानाचा मोठाच फायदा झाला.

नबाबाचा पराभव करून माघारा परत फिरतेवेळी नानाने सोंधेच्या राजावर पंधरा हजार सैन्य धाडले. या सैन्याकडून राजधानीस वेढा पडण्याचा धोका निर्माण होताच सोंध्याचा राजा पहाडातील आपल्या एका किल्ल्याच्या आश्रयास जाऊन राहिला. त्याचा प्रतिकार कोलमडून पडल्यावर त्याने नानाशी तह केला. त्याने त्याला कांही रक्कम देण्याचे कबूल करून त्याबद्दल तारण म्हणून फोंडयाचा किल्ला त्याच्याकडे दिला. या किल्ल्याचा प्रदेश आमच्या तिसवाडी बेटाच्या हद्दीला लागून आहे.

मराठ्यांनी सोंधेला वेढा घालतांच व्हाइसरॉय कौंट द आल्वा यांना वाटले की, सोंध्याशी युद्ध सुरू करण्यास ही संधि नामी आहे. सोंधेच्या राजाने आमच्याशी तह केला होता. या तहान्वये त्याने आम्हाला जी खंडणी भरायची होती, तिचा पहिला हप्ता त्याने या शहरी भरला होता. तरीहि व्हाइसरॉयने त्याच्याशी युद्ध सुरू करण्याचा निर्णय घेऊन फोंड्याच्या किल्ल्यास वेढा घालण्याची तयारी चालविली. त्यांनी जांबावली घेऊन सैन्याच्या मोठ्या विभागासह जून महिन्याच्या पहिल्या तारखेस फोंड्याच्या मोहिमेस प्रारंभ केला. गेल्या ऑगष्ट महिन्यात आम्ही आपणाला जे पत्र लिहिले, त्यांत या मोहिमेचा उल्लेख केला आहे. हे पत्र थोडक्यांत लिहिले त्याचे कारण हे कीं, त्याच्या सुरक्षिततेविषयी भरवंसा न वाटल्याने इंग्रजी कंपनीमार्फत ते पाठविले होते. व्हाइसरॉय कौन्ट द आल्वा यांनी मोहिम सुरू केली खरी, परंतु ती किती अडचणीची आहे ते त्यांच्या ध्यानी येऊन त्यांनी त्याच दिवशी माघार

घेतली. या प्रसंगी शत्रूच्या संभाव्य हल्ल्याच्या भयाने सैनिक घाईघाईने नदी ओलांडित असता बरेच जण बुडून मेले. व्हाइसरॉयने माघार घेतली. परंतु त्यानी मराठ्यांचा किल्ला घेऊन त्यावर आमचा ध्वज फडकावण्यात यश संपादन केले.

व्हाइसरॉय राजधानीत परतले. परंतु त्याना उमेद होती की, मोहिमेचा शेवटचा टप्पा आपण पावसाळा ओसरल्यावर सप्टेंबर महिन्यात पुरा करू. पावसाळ्यांत तोफखान्याच्या हालचालींत व्यत्यय येणे स्वाभाविक होते. परंतु नंतर त्यानी हा निर्णय बदलला व मोहिम लगेच सुरू करायचे ठरविले. जूनच्या २८ तारखेस ते शिपायांच्या व लष्कराच्या तुकड्यांसह मोहिमेवर निघाले. परंतु त्यांच्या दुर्दैवाने या मोहिमेत ते कामास आले. शत्रूने त्यांचा हल्ला परतवून लावतांच पळापळ सुरू झाली. त्यात पुष्कळ सैन्य कामास आले.

आमचा हा जो पराभव झाला त्याला व्हाइसरॉय कौंट द आल्वा यांची घोडचूक कारणीभूत झाली. त्यानी ग्रॅनेडियर्सच्या तुकडीच्या पहिल्या कंपनीचे सेनापती लेफ्टनंट कर्नल आंतॉनियु मोइरांव द मिरांद यांना पहिला हल्ला करण्याचा हुकूम केला होता. या हुकुमाप्रमाणे त्यानी हल्ला चढविला. परंतु हा हुकूम लेखी नव्हता तर तोंडी होता, हे नंतर उघडकीस आले. त्याची चौकशी न्यायाधीश चान्सेलर यानी केली. त्या चौकशीची प्रत आपणाकडे पाठविण्यात आली असून आपण त्याबाबत शवटचा निकाल द्यायचा आहे. आमच्या सैन्याने माघार घेतल्यावर साष्टी प्रांताचे सेनापती ज्वांव मानुएल कौरेरया द लासेर्द हे अधिकृत हुकुमानुसार न वागता आपल्या सैन्यासह आपल्या ठाण्यास परतले. त्यानी व्हाइसरॉय कौंट द आल्वा यांचा तपास केला नाही. परंतु हे काम ग्रॅनेडियर्सचे कॅप्टन झुजे कार्लुश द कॉश्त यानी केले. त्यानी फोंड्याच्या सुभेदारास पत्र लिहून व्हाइसरॉयच्या शवाचा तपास करण्याची व ते माघारा आणण्याची परवानगी मिळविली. व्हाइसरॉयचे शव या राजधानीत तिसऱ्या दिवशी आणण्यात आले. कर्नल ज्वांव मानुएल कोरेस्या द लासेर्द यांच्याकडून जो प्रमाद घडला त्याबद्दल त्याना

आग्वादच्या सार्वजनिक तुरुंगात कैदेत ठेवण्याची आम्ही शिक्षा दिली. व्हाइसरॉय कौंट द आल्वा यांच्या मृत्यूची निश्चित माहिती हाती न आल्याने राजप्रमुखाच्या नेमणुकीचा प्रश्न तीन दिवस लांबणीवर पडला.

व्हाइसरॉय कौंट द आल्वा यांचा मृत्यू, मराठ्यांचा शेजारी आणि त्यांत आंग्र्याच्या ठाण्याचा सभोवताली असलेला वेढा यामुळे येथे काळजीचे वातावरण निर्माण झाले आहे व जागरूक राहाणे आवश्यक झाले आहे. जागरूक राहायचे झाल्यास लष्करी ठाण्याची तटबंदी केली पाहिजे. परंतु हे काम अत्यंत खर्चाचे आहे. महाराजांना ही वस्तुस्थिती सादर करण्याची परवानगी आम्ही घेतो. त्यानी कृपावंत होऊन द्रव्याची व सैन्याची मदत पाठविण्याची आठवण ठेवावी.

आमच्या बलाढ्य स्वामीस देव उदंड आयुष्य देऊन सुखी ठेवो*

गोवा, २२ जानेवारी १७५७

राज्य कारभार मंडळाच्या सदस्यांच्या सह्या.

---

क्रमांक : ११२ दि. २६-१-१७५७

छत्रपती संभाजी दुसरे यांचे जावजी, शिवाजी व चांगोजी वनगर यांना गावडकीचे वतनपत्र.

श्री

शिक्का

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८३ धातानाम संवत्सरे माघ शुध

---

* गोवा पुराभिलेख संग्रहालयातील
( Livro ' Moncoes do Reino No. 129 A fl s 283-284 v
वरून घेतलेले पत्र.)

सप्तमी सौम्यवासरे[१] क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी जावजी व भिवाजी व चांगोजी फयकर धनगर गावडा त।। ऐनघोल व त।। मैनघोल यासि दिले वतनपत्र ऐसेजे. तुवा करवीरचे मुकामी

शिका शिका

स्वामीसंनीध विदित केले की, तं।। ऐनघोल व मैनघोल येथे चारणीचे धनगर येऊन राहातात त्यांचे व आपण नेहमी धनगर रयता आणून ठेविल त्यांचे, गाउडकीचे वतन आपणास करून दिलियाने दिवाण चाकरी करीन म्हणून विदित केले. त्यावरून मनास आणून स्वामी तुजवरी कृपाळु होऊन तुजला घोल मजकुरी दोही घोलातील धणगराचे गाउड–कीचे वतन करार करून दिले असे. तरी तुम्ही घोल मजकुरी नेहमी धनगर आणून ठेवणे. त्याचे गाउडकीचे वतन अनभवणे. या वतनास पालक कलमे करार करून दिली आसेत ———

परडे ज्या गावी राहाल त्या गावी जमीन बिघा ०१ पालक घर १.

जो गाउडकी चालवील त्यास येक आसामीची महसूल फक्त कलम १

येणेप्रमाणे कलमे तीन जमीन बिघा येक व घर येक कुडकचा महसूल माफ या प्रो करार करून गाउडकीचे वतन दिलें असे. तरी तीं सदरहू वतन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन दिवाण चाकरी करून सुखरूप राहणे. निदेश समक्ष.

मोर्तब

तेरीख ५
जमादिलावल सु।। सबा खमसैन.

———

१ वारप्रमाणे तारीख काढली आहे.

क्रमांक : ११३ वि. १६-४-१७५७

येसाजी मोरे पाटील ह्याच्या कसबा खानापूरच्या पाटीलकीवर नाग्या हणबर दावा सांगत होता. पंचांनी त्याचा दावा खोटा ठरविल्याने छत्रपती संभाजी दुसरे यांनी पाटलास वतनाचे नवीन पत्र करून देऊन दोन बिघे जमीन इनाम दिली.

श्री

सिका असे

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८३ ईश्वरनाम संवत्सरे चैत्र बहुल त्रयोदसी मंदवासरे[1] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी बाबाजी बिन येसाजी मोरे पाटील कसबा खानापूर त।। मजकुर सुभा प्रांत तारळे यास दिल्हे दुमालेपत्र ऐसेजे.

| सिका पेशवे याचा पानघाटी | सिका प्रतिनिधी चा वर्तुळाकार |
|---|---|

तुवा करवीरचे मुकामी स्वामीसंनीध विनंती केली की, कसबें मजकूरचे पाटीलकीचे वतन व देशमुखीचे वतन पूर्वापार आपले वडिलानी अनभविले व हली अपण अनभवीत असता नाग्या व।। मन्या हणबर याने पाटीलकीचे वतन आपले म्हणून कथला करू लागला. ते समई खासखेलीचे मामले-दारानी अलग हरदूजणा वाद्यास हरयेक थलास जाऊन निवाडा करून घेणे म्हणून सांगितले अणी पाटीलकीचें वतन अनामत[2] केले. ते समई हणबर मजकूर थलास यावयासी राजी न होता. कसबे मज-कुरी पांचजण मिळून अपला निवाडा करा म्हणून बोलिला. ते समई किले भुदरगडचे गडकरी व सरदेसाई देशपांडे व भोवर गावीचे वतन-दार व कसबे मजकूरचे उभी पांढर मिळून वाजपूस करिता हणबर मजकुरास इदलशाई कारकीर्दीस महालातील आबेलबे (?) बद्दल कसबे मजकुरी काही जमीन दिल्ही होती ती चालत आसे. तो येवढे या अवसरेवरून पाटीलकी आपली म्हणून ह्मटतो. इदलशाई कारकीर्द त।।

---

१ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

शिवशाई ह्या कालपर्यंत कथला जाहालेला अढळ नाही. हाली कथला केला म्हणून याचा निकरीने कतबे घेतले ते समई हणबराने आपला खून खराब जाहाला म्हणून बोलला. त्याचा कयास करिता इदलशाई कारकीर्द मोडोन शिवशाई जाहली ते समई मुलुख वेरान जाहाला. ते समई हाणबराचा काल चालेनासा जाहला. तेव्हा चोरीच्या क्रमास प्रवर्तला अणी कसबे मजकुरी चोरीस सापडला. तें वेळेस हकीमानी ++++ शास्त करून सोडिला. त्यानंतर काही दिवसानी कलनाकवाडीस कुणबेचे खलेते चोरीस गेला. तेथे खलेकरानी जिवे मारिला. हे पाचीच्या निदर्शनास आल्यानंतर हणबरास विचारले, जे तुझे कागदपत्र काही असलिया अणून दाखविणे म्हणून बोलिल. ते समई कागद अणून दाखविले. ते मनास अणिता कागदपत्री काही अवसान नाहीसे जाणोन पाचानी भोगवटेचा शोध करिता भोगयही नाही. पाचाचे मते निवाडा जाहला जे हणबाराचा मारा जाहला तो चोरी करिता रयतेच्या खळ्यात गेल्याठाई मारिला. पाटलाच्या इलाख्याने मारिला नाही व कागदीपत्रीहि अवसान नाही. भोगयही नाही. हे जाणोन हाणबर मजकुरास इदलशाई कारकीर्दीस येक बिघा जमीन दिली आहे तेवढी अनभऊन कसबे मजकुरी अबेलबेची (?) चाकरी करून राहाणे. पाटीलकीस अर्थाअर्थी समंध नाही याप्रमाणे पाचानी निवाडा केला. त्यानंतर हाली आपणास व हणबरास तलब जाहली. त्यावरून आपण हुजुर हजीर होऊन+++++ जे ++++ जाहले. हणबर गैरहजीर जाहला. माहाराजानी आपले वतन आपणास करार करून भोगवटियासी पत्रे देऊन पाटीलकी दुमाला करावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणून विदित केले. त्यावरून मनास आणिता हाणबर गैरहजीर जाहला हे जाणोन त॥ मजकूरचे देसाई देशपांडे यासि हुजुर अणोन अज्ञा केली जे पाटील मजकुराचा व हणबराचा कथला निवाड्याबद्दल हरदूजणास आणविले त्यास बाबाजी बिन येसाजी पाटील हुजुर येऊन + + + + जाहले. हणबर गैर हजीर जाहला. ऐसियासी तुम्ही वतनदार देसक व मोरे पाटील पाचात जाऊन पाचाचे मते निवाडा होईल त्याप्रमाणे हुजुर विदित कर्णे म्हणून अज्ञा केली अणी पंचाइतात लाऊन

दिल्हे. नंतर पांचानी तुझा व देसाई देशपांडे याचा करिना मनास आणिता हणबर यासी सदरहू जमीन चालवावी. परंतु पाटीलकीचे वतनास समंध नाही. पाटीलकी मोऱ्याची खरी जाहली. हणबर खोटे जाहले. त्यावरून स्वामी तुजवरी कृपाळु होऊन सदरहु कसबे मजकूरचे पाटीलकीचे वतन तुजला करार करून दुमाला केले असे. तरी तू पाटीलकीचे वतन हाक इनाम कानु काइदे पूर्वापार चालत असेल त्याप्रमाणे तूं व तुझे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन पाटीलकीचे व देशमुखीचें वतनांची सेवा करून सुखरूप राहाणें. हाणबर याणे येक बिघा जमीन अनभऊन अबेलबे (?) करून असावे. त्यास पाटीलकीसी संमंध नाही. तुजला अर्जी इनाम नूतन कसबे मजकुरीं जमीन पडीची बिघे ८२ दोन बिघे भात रोप दिल्ही असे. चतुःसीमा करून घेऊन अनभवीत जाणे. वतनसंमधे तुझे माथा शेरणी रुपये १५० दिडशे ठेविले. याचा वसूल हुजुर जाहला. जाणिजे निदेश समक्ष.

रुजु

सिका असे.

तेरीख २६
रजब सु।। सबा खमसेन मया.

---

दि. २६-६-१७५७

क्रमांक : ११४

छत्रपती शिवाजी दुसरे यांचे उत्तरकार्य विधियुक्त पार पडले यास्तव मातुश्री ताराबाई यानीं कृष्णभट तासे यास मौजे गोळिवडे येथे जमीन इनाम दिली होती. कृष्णभट तासे यांचे पुत्र जिऊभट तासे याचे विनंतीवरून छत्रपती संभाजी दुसरे यानी ते इनाम चालू ठेवले.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ८४ ईश्वरनाम संवत्सरे आषाढ शुद्ध दशमी रविवासरे[1] क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी त।। मोकदमानी मौजे गोळीवडे तालुका हवेली कोल्हापूर यासी आज्ञा केली यैसीजे. वेदमूर्ती राजश्री जिउभट बिन कृष्णभट उपनाम

---

१. बाराप्रमाणे तारीख काढली आहे.

तासे गोत्र काश्यप सूत्र आश्वलायन वास्तव्य किले पनाळा याणी हुजूर करवीरचे मुक्कामी स्वामी संनिध विनंती केली की आपले पिंते कृष्णभट बिन शामराज भट यासी श्रीमंत मातोश्री आईसाहेब याणी राजश्री शिवाजी राजे महाराज याणी कैलासवास केला ते समयी पनाळियाचें मुकामी त्याचे उत्तरकार्यप्रसंगी संकल्प करून भूमिदान मौजे मजकुरी भूमि दिली आहे. त्याची पत्रे आहेत. माहाराज धर्मपरायण आहेत. पूर्ववतप्रमाणे भूमी दत्त इनाम करार करून भोगवटयास पत्रे द्यावी म्हणोन. त्यावरून व येविसयी वेदशास्त्र संपन्न राजश्री सदाशिव उपाध्ये यानीहि विदीत ( केले ) त्यावरून मनास आणोन वेदमूर्तीस पूर्ववत-प्रमाणे दत भूमी मौजे मजकूरपैकी भातरोप बिघे दोन इनाम करार केली असे. ( पुढे जमिनीचा तपशील दिला आहे. )

---

**क्रमांक : ११५** दि. १५-८-१७५७ (?)

हे पत्र ताराबाईनी बहुदा जिजाबाईच्या सन १७५७ मधील पुण्याहून कोल्हापूरला निघण्याच्या संदर्भात लिहिले असावे.

श्री

सहश्रायु चिरंजीव विजेभव राजश्री बाबाजी यांप्रति माहाराज मातुश्री ——— आईसाहेब आनेक आसीर्वाद. उपरी येथील कुशल त।। भाद्रपद शुध प्रतिपदा इंदुवासरपर्यंत येथास्थित जाणून स्वकीये लेखन करीत गेले पाहिजे. विशेष तुम्ही सिदोजी दळवी याजब।। पत्र पाठविले त्य प्रविस्ट होऊन लेखनाभिप्राये श्रवण जाला. पूर्वी राजश्री यशवंतराव गायकवाड ब।। आसीर्वादपत्र पाठविले त्यास चौथा वाडा यांच करवीरास जाणे जालियानंतर जे आज्ञा करणे ते केली जाईल म्हणून आज्ञा केली म्हणून म।।रनिलेनी सांगितले. त्यास हा काल-

पर्यंत आसीर्वादपत्र आले नाही म्हणून लिहिले व सिदोजीनेही विनंती केली. त्यावरून दळवी मा।र यास आज्ञाकर्तव्य ते केली आहे. सांगता कळो येईल ( बहुत काय लिहिणे हा आशीर्वाद[1] )

---

**क्रमांक : ११६** **दि. ४-९-१७५७**

मौजे पाटपनाळ व मौजे माजनाळ ह्या दोन गांवच्या चौगुलकीचे वतन माहादजी मल्हार कुलकर्णी ह्याला दिले आहे. म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे कृष्णराव अमात्य याना आज्ञापत्र.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ८४ ईश्वरनाम संवत्सरे भाद्रपद बहुल सप्तमी रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी ——— स।। राज (कार्य) धुरंधर विश्वास नि (धि) राजश्री कृष्णराव अमात्य यासी आज्ञा केली एसीजे. माहादाजी मल्हार ता।। कुलकर्णी त।। बोरगाव याणी हुजुर करवीरचे मुकामी स्वामीसंनीध विनंती केली कीं मौजे माजनाळ व मौजे पाटपनाळे त।। मजकूर या दोन्ही गावची चौगुलकीची वतने गयाळ निर्वारीस आहेत. पुरातन चौगुले वतनदार कोणी नाही. आपण माहाराजाच्या पायासंनीध बहुत दिवस निष्टेने सेवा करीत आहे. साहेब धणी आहेत. दोनी गावची चौगली आपणास वतन करार करून भोगीयास सनदा सादर करावयाची आज्ञा करावी म्हणोन विदीत केले. त्यावरून मनास आणिता दोनी गावची चौगुलकीयाज निर्वारीस पुरातन चौगुले वतनदार नाहीत. हे वतनदार स्वामीच्या पायासंनीध बहुत दिवस निष्टेने वर्तणूक करोन सेवा करीत आहेत. याचे सर्व प्रकारे अगत्य याजकरितां स्वामी याणी कृपाळू होऊन दोनी मौजे मजकूरची चौगुलकीची वतने यासि करार करून दिल्ही असेत. या वतनसंमंधे हक इनाम कानु काइदे मोईन करार बी तपशील:—

---

१ अक्षरे बालबोध.

मौजे पाटपनाळे ता।। मजकूर या गावची चौगुलकी माहादाजी मल्हार व शामजी गोपाळ ल।। कुलकर्णी ता।। मजकूर यासी करार हक इनाम कानुकाइदे बी

तपशील–

| | |
|---|---|
| इनाम मोईन पाटील कुलकर्णी या प्रो द्यावं कलम १ | पालक १ घर म्हैस १ मापाची सुसे री मापास सलई कलम १ |
| घोंगड्यास सालिना होनु येक रुपये ३. | |

मौजे माजनाळ ता।। मजकूर या गावी चौगलकी माहादाजी मल्हार याणी वतन करार केली असे. हक इनाम कानु काइदे मुकरर बी।।

तपशील–

| | |
|---|---|
| पालक घर १ म्हैस १ मापाची सु से री मापास सलई कलम १ | इंनाम मोईन पाटील कुलकर्णी यापैकी पांच सात का सि ला (?) कलम १ |
| | घोंगड्यास सालिना होन येक रुपये ३. |

येणेप्रमाणे ई(ना)म मोईल्या पाटील कुलकर्णी यापैकी मौजे पाटपनाळे येथील चौथाई वरोन पनाळपैकी पांचवीत कासीला पालक दर गावास घर येक व म्हैस येक सालीना घोंगड्यास दर गावी होन येक येकून रुपये तीन मापास सलई याप्रमाणे करार केले असेत. तरी तुम्ही मौजे मजकुरास ताकीद करून चौगुलकीची चाकरी याचे हाताने घेऊन सदरहुप्रमाणे हक इनाम कानु काइदे व मौजे मजकुरची चौगुलकी याची वतने यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करिता या पत्राची तालीक घेऊन असल भोगवटियावदल परतोन देणे. जाणिजे. बहुत लिहिणे तरी तुम्ही सूज्ञ असा. मोर्तब असे

क्रमांक : ११७ दि. ३०-९-१७५७

नरोजी, जोतजी, सिवाजी, हणगोजी व भिकाजी या सरनाईक भाऊबंदामध्ये वतनाबाबत तंटा उद्‌भवला होता. पन्हाळ्याच्या मामलेदाराने पंचाच्या सहाय्याने हा तंटा मिटविला व त्याच्याच शिफारसीवरून संभाजी दुसरे यांनी प्रत्येकाच्या नांवे त्यांच्या हिश्श्याची सनद करून दिली.

श्री

स्वस्ति श्री राज्याभि(षेक) (८४) ईश्वरनाम संवछरे आधिक अस्वीन बहुल त्रितीया भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी त॥

मोकादमानी मौजे तर्फ नंदगाव पो हवेली कोल्हापूर यासि आज्ञा केली यसीजे. सरनाईक +++ पो म॥र या

शिका शिका

बाबे हुजुर करवीरचे मुकामी कोट कोल्हापूरच्या मामलेदारानीं स्वामीचें संनीध्य विनंती केली की सरनाईक म॥र याच्या भावाबंदामध्ये परस्पर वतनसमधे कजिया होता. त्यासि हुजुरून किले पनालियाचे स्थल नेमून देऊन मनसुबीस लाऊन दिल्हे. तेथें किले म॥रच्या मामलेदारानी किलाचे वतनदार व प्रांतातील गावगनाचे वतनदार मनसुबीस बसवोन सरनाईक यासी पंचाइतास लाऊन दिल्हे. पंचाइतानी राजीनामे करीने लेहून घेऊन साक्ष मोज पास कोट म॥रच्या सड्या न्हेल्या आणि मनसुबीची झाड पिछाडी[1] करून सरनाईक याची भावबंदाची समजाविसी केली. त्या प्रो सरनाईक यांची परस्परे भावबंदानी येकमेकास समजपत्रे लिहून दिल्हे आहे. ते व किलाचे स्थलपत्र ते माहाराजानी मनास आणोन त्या प्रो हुजुरच्या सनदा भोग्यास सादर कराव्या म्हणोन विदीत केले. त्यावरून किले म॥रचे थलपत्र व भावाबंदाची समजपत्रे हुजुर पाहून त्याप्रो सरनाईक म॥र यास वाटणीब॥ वतन करार केले असे. सरनाईक याचे विल्हेस नंदगाव तर्फ पूर्वीपासून आहे. तर्फ मा॥रचे गाव देहे दाहापैकी

१. संपूर्ण झाडा.

साखा भावबंदाचे मते मौजे दिंडनेरलीपैकी इनाम जमीन बिघा ८१ येक व हक इनाम कानु कायदे समाईक सकट श्रीदेवी महाकाली क्षेत्र करवीर येथील पूजेऊर्जेबद्दल वजा देहे येक १ बाकी गावापौ ९ नऊ या पै।। नरोजी बिन कृष्णाजी व जोतजी व सिवजी बिन हनगोजी व भिकाजी बिन खेमजी ——— सरनाईक पो म।।र याचें तक्षिमेस वाटणी बी त।।

| गाव देहे | छेत्रा दिवटीचा[1] इनाम |
|---|---|
| १ मौजे म्हावलंगे | मौजे चुये व वडकसिवाळे |
| १ मौजे वडकसिवाले | जमीन बिघे ८१० दाहा |
| १ मौजे वडगाव खुर्द | पैकी वाटणी जमीन बिघे तीन |
| ३ | ८३ |

सदरहू तीन गांवी जमीन बिघे तीन व हक कानु काईदे पूर्ववत प्रो कलम १

यसे सदरहू तीन गावा पै।। जमीन बिघे ८३ तीन हक इनाम कानु काइदे पूर्ववत प्रो व छत्री दिवटीची इनाम जमीन वाटणी बिघे ८३ तीन येणेप्र।। थलपत्राब।। करार केले असे. तरी तुम्ही नरोजी व जोतजी व सिवजी व हणगोजी व भिकाजी + + + सरनाईक म।।र यासि व याचे वंशपुत्र परंपरेने सदरहूप्रो चालवणे. पुन्हा दुसरे याचे वाटणीसी कथला करण्यास प्रयोजन नाही. साल दरसाल ताजे सनदेचा हुजुर न करिता या पत्राची तालीक लेहून घेऊन असलपत्र भोगवटीयासि परतोन देणे जाणिजे. निदेश समक्ष. मो।। आसे.

---

१ देवीचे छत्रीचे व दिवटीचे इनाम.

क्रमांक : ११८ दि. २९-११-१७५७

तातडीने भेटीस यावे म्हणून ताराबाईचे बाबाजी जाधव यास पत्र.

श्री

आसल

पै।। छ २२ र।। वल
सन समान खमसेन
( मया व अलफ )

श्रियासह चिरंजीव विजईभव राजश्री बाबाजी यास माहाराज मातुश्री ________ आईसाहेब याणी कृतानेक आसीर्वाद. उपरी येथील कुशल ता।। छ १६ माहे र।। वल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जाणे. विशेष आपले ममतेचा आर्थ वरचेवर पत्री लिहीत आला त्याची सार्थकता घडोन यावी हे परम आगत्य जाणून येविसीची कितेक आज्ञा कर्तव्य ते राजश्री वासुदेव खंडेराव व संताजी नेवारे यासी करून पाठविले आहेत. आज्ञावचने सांगतील ते पूर्ण आंत:कर्णी चितात अणून कोणेविशई संशय तिळप्राय न धरिता अगमनाची त्वरा केलियास सर्व-सिधि असे. हें परिछिन जाणून अति सिघ्रता करणे. बहुत काय लिहिणे ( हे आशिर्वाद )*

---

* ( कंसातील अक्षरे बालबोध आहेत )

**क्रमांक : ११९** **सन १७५७(?)**

पत्र ताराबाईंनी नानासाहेब पेशव्यास लिहिलेले आहे. पेशव्याने उत्तरेत जो पराक्रम गाजविला त्याचे ताराबाईंनी कौतुक केले असून पेशव्यास आपल्या भेटीस त्वरीत बोलाविले आहे.

श्री

राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांस आज्ञा केली ऐसीजे :— तुम्ही विनंतिपत्र पाठविले, ते प्रविष्ट जाहाले. "उत्तरेकडे पठाणांनी दंगा केला. अंतरवेद वगैरे अंमल उठविला. तमाम साहुकारा लुटोन पैका बेमुबलग नेला. मथुरा वृंदावन इत्यादि तमाम शहरे मारून कत्तल केली. पुढे नर्मदा ऐलतीरी दक्षण प्रांते यावे, इकडील तमाम किल्ले कोट हस्तगत करून आपला बंदोबस्त करावा, वगैरे कित्येक मनसुबयाची ग्रुर्मी धरून मजल दरमजल येत असे. समागमे दिल्लीपतीही आहेत. याचा उपमर्द करावा, उठला अंमल पुन्हा बसवावा, घेतली ठाणी घालावी, या उद्देशें राजश्री अंताजी माणकेश्वर व राजश्री नारोशंकर व राजश्री समशेरबहादर अगोदर रवाना जालेच होते. हल्लीही चिरंजीव राजश्री रघुनाथपंत यांची फौजेसुद्धां रवानगी केली. नर्मदातीरी पावेतो जाऊन पोहोचले. हे त्याचे पारिपत्य करितीलच. ऐसेंही करिता त्यांनी लईच गुर्मी केली, तरी आह्मांसही जावे लागेल," ह्मणोन कित्येक तपशिले लिहिले. ऐशियास तुह्मी केले ते उत्तमच आहे. काही संकट पडणार नाही परस्पराच त्याचे पारपत्य होईल. तुह्मांस हुजुर दर्शनास यावयाची आज्ञा करून राजश्री सदाशिव हरी पाठविले आहेत. हे सांगतील त्याप्रमाणे पत्र पावतेक्षणी स्वार होऊन येणे. एक घडीचा विलंब न लावणे. जाणिजे. बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा. *

---

*हा लेख पारसनीस संपादित 'इतिहास संग्रह ऐतिहासिक टिपणे' लेखांक १० वरून घेतला आहे. लेखावर तारीख नाही. परंतु त्यांत ज्या अर्थी उत्तरेकडील घडा-मोडीचा उल्लेख आहे व पठाणाच्या पारिपत्यासाठी राजश्री रघुनाथपंत यांची फौजसुद्धा रवानगी केली असे म्हटले आहे, त्या अर्थी ही घटना १७५७ मधील असावी असे वाटते. रघुनाथराव उत्तरेस १७५६ च्या नवंबर महिन्यात गेला. १७५८ च्या जानेवारीत त्याने कुंजपुरा घेतला. (म. रि. पेशवा बाळाजी बाजीराव, पृ. ३००)

**क्रमांक : १२०** **सन १७५७–५८**

त्वरीत भेटीस येणे म्हणून नानासाहेब पेशवे यांचे अनाजी साठम यांस पत्र.

श्री

राजश्री अनाजी साठम गोसावी
यांसी
अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य

स्ने।। बाळाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद. सुरु सन समान खमसेन मया व अलफ. तुमचे प्रयोजन आहे तरी पत्र दर्शनी लवकर येणे. विलंब न करणे. छ. २१ बहुत काय लिहिणे.

सिक्का

---

**क्रमांक : १२१** **दि. २–१–१७५८**

कसबे वडगांव येथील शेटयेपणाबद्दल रायशेट, समशेट व साबसेट यांच्यामध्ये तंटा उद्भवला असता करवीरच्या राणी जिजाबाई यानी रायशेटच्या बाजूने निकाल दिला.

पूर्वीहि सदहूं सेटेपणाचा तंटा उद्भवला होता. त्याचा करिणा अर्जोजी यादव याने लिहून घेतला होता.

या आज्ञा पत्रावर जिजाबाईचा शिक्का असून तो संभाजीच्या हयातीतील आहे.

श्री

शंभु राजस्य भार्यायां जिजादेव्यां धरातले
बालेंदुरिव वर्धिष्णु मुद्रा भद्रा विराजते

शिका वर्तुळाकार पैलु १६

श्रीमंत सकल सौभाग्यादि संपन्न मातुश्री जिजाबाईसाहेब याणी ता।। रायशेट बिन सातशेट शेटया कसबे वडगांव प्रा।। पनाळा यासी

आज्ञा केली यसीजे. सु।। समान खमसैन मया अलफ. दिल्हे दुमालपत्र यसीजे. तुजमध्ये व समसेट बिन तमसेट व सावसेट बिन सातसेट शेट्या कौ म।। या मध्ये सेटेपणाचे वतनाचा पेशजी कज्या लागला होता. त्यास राजश्री अर्जुजी यादव याणी समडोलीचे थल नेमून दिल्हे होते. त्यास समसेट व सावसेट न निवडता थकून आले. त्याणी मागती ताकीद करून आलासाचे थल नेमून दिल्हे तेथे त्रिवर्ग गेला. थेली राजिनामे व करिने व जमान दिल्हे. येक वर्ष थली होता. थलकरी याणी निवडोन सांगावे तो ते हर दो जण थलकरी याचा निरोप न घेता पलोन आले. तू माघोन थलकरी याचे पत्र घेऊन आलास. त्याची वाजीपुसी व्हावी ती जाहली नाही. मग करवीरचे मुकामी तुज व समसेटीस सन तिसा आर्बेनात हुजुर आणविले आणि हरदुजणाचे राजिनामे व करिने व जमान घेऊन पचाइतात निवडून घणे म्हणोन आज्ञा केली. तो समसेट पळून गेला. खोटा जाम त्यावर. साबसेटीस हुजुर आणविले आणि आज्ञा केली जे तुझा कजिया असला तरी पाचांत बोलून घेणे. त्यास तो बोलिला जे माझा काही कजिया नाही. शेटेपण व वडिलकी व होलीची पोली व कानु काइदे त्याचे वडील करीत आले. त्या प्रो रायशेट बिन सातशेटीने करावे. आपण भाऊवाटा येईल त्या प्रो घेऊन असाव असे बोलिला. त्यावरी पंचाइतमते तुझा वडिलाकडे वतनाचा भोगवटा चालत आला आहे असे पाहोन तुझे दुमाला शेटेपण व वडीलकी व होलीची पोली व तश्रीफ व पान मान कानु काइदे पूर्ववत प्रो देऊन दुमालपत्र सादर केले आणि देशमुख व देशपांडे यांसी आज्ञा करून महजर करून घेतिला. त्या पत्राप्रमाणे शेटेपण अनभऊन असता दरम्याने रायेशेट बिन समशेट व नरसिया बिन सावसेट याणी सन खमस खमसेनात हुजुर येऊन अर्ज केला जे रायशेट बिन सातशेट शेटेपणाचे वतनाचा भोगवटा अनभवितो. आम्हास वशिलीप्रो शेटेपण करो देत नाही. तरी साहेबी वसिली करून दिल्हीया वशिलीप्रो शेटेपणाचे वतन अनभऊन राहो यशा अर्ज केला. त्यावरून साहेबी वशिलीप्रो वतन करून राहणे म्हणऊन पत्रे करून दिल्ही. त्यास रायशेट बिन सातशेट हा वशिलीस मान्य न होता परागंदा होऊन गेला जे वडिलाचे वडिली काही शेटेपणाचे वतन वशिली प्रो आजी पावेतो केले नाही म्हणून गेलासे. हे वर्तमान हुजुर विदीत जाले.

त्यावरून रायशेट बिन समसेट व नरससेट बिन साबसेट या हर दो जणेस आज्ञा केली जे तुमचा वाप भाऊ परागंदा होऊन गेला आहे तो सम–जाऊन घेऊन येणे. त्यास ते हर दु जण तुजकडे हा।णीस (?) तुझे समजाविसीबदल नेले होते. त्यास तूं बोलिलास जे पंचाइत थल्हीं पण–माने होऊन बोलून घेऊ. त्यास ते थलास राजी न होता हर दु जण माघारे आले आणि अर्ज केला जे रायशेटीस साहेबी हुजुर आणविलिया साहेव आज्ञा करतील त्याप्रो वर्तणूक करू म्हणून अर्ज केला. त्याजवरून तुज अभयपत्र सादर करून हुजुर आणविले आणि हरदुजण शेटे म।।स थलास जाण्याची आज्ञा केली. त्यास रायशेट बिन समशेट बोलिला जे आपण थलास जात नाही. त्याची आमची बोली थलविद्यमाने कांहीं नाही व जन्मी (?) व होलीची पोली व पान मान शेटेपणाचे वतन रायशेट बिन सातशेट याकडे पूर्वीपासून भोगवटा होत आला आहे त्याप्र।। त्याणे करावे. आम्ही भाऊ वाटा घेऊन असावे यसे बोलले जे. तुज समजपत्र दिल्हे आहे. आधी वशिलीप्रो करावे म्हणोन कागद करून घेतले होते ते माघारे आणावयाची आज्ञा केली. त्यास रायशेट बिन समशेट बोलिला जे आपले घर जलले ते समई कागद दग्ध जाले म्हणून हुजुर का।। वलि।। दिल्ह. त्यावरी नरसिया शेटेसे आज्ञा केली जे तुझा व रायशेटीचा कजिया आहे म्हणतोस तरी तुवा वशिलीची पत्रे सन सलासात करून घेतली होती ती माघारे परतोन देणे आणि थलविद्य–माने बोलोन घेणे. त्यास पत्र हुजुर आणोन दिल्ही आणि नरसिया बोलिला जे रायशेट बिन सातशेट याचे वडील शेटेपण वडिलकी अन–भवित येत होतो. त्याप्रो रायशेट बिन सातशेट याणे करावे. आम्ही भाऊ वाटणी तश्रीफ प्रो घेऊन राहो यसे बोलिला. आणि बोलिले प्रो तुज समजपत्र लेहून दिल्हे असे. तरी तूं मौ म।। चे शेटेपण व वडिलकी व होलीची पोली पानमान पूर्वापार चालत आला असेल त्या प्रो कानु काइदे जे असतील ते तुजे दुमाला करून दुमालपत्र तुज सादर हली केले आसे. आणि पेशजीची पत्रे तुज सादर आहेत त्याप्रो करार करून दिल्हे असे. तरी शेटेपणाचे वतन वंशपरंपरा अनभऊन सुखरूप राहणे. रायशेट बिन समशेट व नरससेट बिन साबशेट याही तुज समजपत्रे दिल्ही आहेत त्याप्रो व भाऊ वाटणी तक्षीम घेऊन असावे.

पेस्तर हर दु जणानी तुजसी कजिया करावया अर्थाअर्थी समंध नाही. दुमालपत्र सादर आहे. शेटेपणाचे वतन अनभऊन शेटेपणाची चाकरी करून सुखरूप राहणे. जाणिजे र।। छ २१ रविलाखर.

मोर्तब आठ पैलूचे.

---

**क्रमांक : १२२** दि. २५–४–१७५८

महाराणी ताराबाई याना पोर्तुगिजांकडून दोन हजार बंदुका हव्या होत्या. आम्ही बंदुका देण्यास तयार आहोत, पैशाचा व्यवहार पूर्ण होताच बंदुका दिल्या जातील, असे गोव्याचे हंगामो गव्हर्नर ताराबाईना लिहिलेल्या पत्रात म्हणतात.

ताराबाई याना गव्हर्नरांचे पत्र

राणी ताराबाई याना कळविण्यास आनंद वाटतो की, आपले पत्र मिळून फार आनंद झाला. आपण सदैव सुखी असावे व आपली मैत्री उत्तरोत्तर वृद्धिगत व्हावी ही आमची इच्छा आहे.

आमच्याकडून आपणाला दोन हजार बंदुका हव्या आहेत व त्या आम्ही इस्माईलखान याच्यामार्फत आपणाकडे पाठवाव्या अशी आपली इच्छा असल्याचे कळले. या बंदुकाची किंमत नबाब समशेरजंग बहादुर यांच्याकडून आम्हाला मिळणार होती. परंतु त्यांच्याकडून आम्हाला या व्यवहाराबाबत काहीच कळविण्यात आलेलें नाही. आपणहि आम्हाला या बाबत प्रत्यक्षपणे काही कळविलेले नाही. आपली मागणी मान्य असल्यामुळे आम्ही आश्वासन देतो की ती आम्ही तत्परतेने पूर्ण करू. आपण नबाब समशेरजंग याना या वाटाघाटीबाबत लिहावे.

ईश्वर आपणास सुखी ठेवो.*

गोवा २४ एप्रिल १७५८

आर्च बिशप प्रिमाज-ज्युआंव द मरिकता मातुश तैशैरा फिलिप द व्हालादारिज सोतु मायॉर

---

* हे पत्र गोवा पुराभिलेख संग्रहालयातील ( Livro dos Reis Vizinhos fls 9 ) वरून घेतले आहे.

**क्रमांक : १२३** **दि. १५–५–१७५८**

ताराबाई व नानासाहेब पेशवे यांच्यामध्ये जो संघर्ष उडाला तत्संबंधीचे हे पत्र आहे. यात ताराबाई लिहितातः "तुम्ही एकवेळ येऊन दर्शन घ्यावे. परस्परे कल्पना स्वामी शेवकाच्या दूर होतील. तदोतर साहेब पुणियास येऊन तुम्हा शेवक लोकांचा सन्मान करावयाचा अगाध काय आहे. तुम्ही येकनिष्ट सेवक कृपेस योग्य आहात."

श्री

आज्ञा केली यैसीजे. तुम्ही राजश्री वेंकाजी नानाजी याजसमागमे आर्जाची यादी कलमे लेहून पाठविली की साहेबाचे सेवेसी समक्ष साफ आर्ज करणे. त्या वरून त्याणी आर्ज केला. त्यास कलमा कलमाची

उत्तरे ———————————————————

चिरंजीव कैलासवासी जालियावरी साहेबानी आम्हास खावंद करून दिल्हा. जो देव वडिलानी करून दिल्हा त्याची पुजा आम्ही करू लागलो म्हणून आर्ज लिहिला. यैसीयासी याचा विचार तुम्हासही कळोन गेलाच आहे. प्रथम दिवसीच श्री———— कोटेश्वरी साहेबाची स्वारी न्हेली तेव्हा श्रीच्या देवालयात पुराणीक व गोपाळराव यादव व गोविंद खंडेराव व बापूजी खंडेराव चिटनिवीस या चतुवर्गास साहेबी त तक्षणीक आज्ञा केली की ही वस्तु खरी नाही. वंशास दाग लागतो. तेव्हां मुरडोन चौघानी आर्ज केला की आता

साहेबी प्रथम मजला वचन दिल्हे की सर्व प्रकारे तुमचा विश्वास तुम्ही नातवापेक्षा साहेबास आधीक. ऐसे आसता साहेबी गायकवाडास हुजुर पाठविले. रामदास पंतास कागदपत्र लिहिले. बाबूजी नाईक यास न्हेले. यमाजी पंताचे पारपत्य योजिले. रात्रंदिवस सेवकास विरोध पडे यैसे राजकारण होत जातात. मोगल केवळ हिंदु राज्यास शत्रु त्यास देखील अनुसंधाने होत असता शेवकच वाकडे वर्ततात, हा दोश साहेबी आज्ञापत्री लेहून सर्वासी बोलतात म्हणून विनंती लिहीली. यैसीयास साहेबाची तुमचे ठाई पूर्ण

समय नाही. म्हणावयाचा नव्हे, घात होतो. या प्रो साहेबाचे बुधीस भ्रंश करून तो समय या प्रो संपादिला. साहेबाचे मानसी की तेक्षणीच तुम्हास समक्ष बोलाऊन हे आज्ञा करावी. तो मध्यस्त प्रकार कारभारी याचे चिती की समक्षता होऊन द्यावी हे मानस त्यावर दुसरा प्रकार. प्रायश्चित आरंभिले तेव्हा साहेबी आज्ञा निरोपिली कीं, पुर्ता शोध होऊ द्या. मग हा विधी करणे हेही कोणाच्या चितास न ये. तोही विध केला. त्यानंतर मुंजीबंधन व शरीर संमंधाच्या निकडी होऊ लागल्या. ते समई आज्ञा करीतच गेलो की त्वरा कार्याची नाही. कार्यभागी न समजत यैसी वर्तणूक करून आपभ्रंसी पाडिले. गोत्पत आरंभिले तेव्हा साहेबी व रामाऊ[१] भोसली याणी यक प्रहर तट केला की हे काय करिता. ते वेळेस मराटे याणी तरी विचार करावा तर त्यास ताकीद तुमची सर्वानी भिडेस्तव कईम केला. आता तुम्ही तो आशय धरून खरे खोटे प्रत्यास आणून द्यावे यैसा दुराग्रह कृपा म्हणूनच पुणीयासि साहेबाची स्वारी जाहली होती की येणेकडून तुम्हांस संतोष व्हावा आणि साहेबी प्रारंभापासून घडत आले त्याची निवळ आज्ञा करावी. चितातील संशय नि:प्रांजल आज्ञाकर्तव्य ते करावे. तुमचे चित्त पाहता साहेबास आस्तेचा आर्थ किमपि द्रिष्टीस (न) पडला यैसे साहेबास दिसो न आले. यद्निमित्य श्रीसिखर यात्रेच्या उद्देशेकरून स्वारी जाहाली, तेव्हाच दर्शन घेऊन किले सातारीयावरी मुकाम जाहला. त्या नंतर तुमचे विचारे वेदशास्त्र संपन्न नारायणबावा विद्यमानी असता किलाहून खालते येणे जाहाले. तुम्हाकडून मध्येस्तीस राजश्री माहादाजी नाईक निंबाळकर व दिनकर महादेव न्हेमी हुजुर होते. साहेबाचा हेत कीं तुम्हास दर्शनांती आज्ञाकर्तव्य ते करून राज्याचा बंदोबस्त करावा हेच धनीयाचे मानस. जो तो तुमचे दर्शनास यावयाचा योग आजपर्यंत घडत न आला. दिवसे दिवस विक्षेपावरच गोष्टी पडिल्या. आता ही या क्षणपावेतो

---

१) रामाऊ भोसली ही नागपुरकर घरण्यांतील स्त्री. सातारा शहरी मंगळवारांत रामाऊचा गोठ म्हणून एक स्वतंत्र पेठ होती– म. रि. म. पृ. १९३

धरून अभिमानात पडोन हा पर्यास पुढे अणून विनंती लिहीता तरी तुमच्या पक्षी अभिमान पूर्ण असता मराटे निषेध खोटे यैसे म्हणू सकतात की काय तुम्हीच याचा विवेक चितात अणून भोसल्याच्या वरदी राज्यास व वंशास दाग न लागे यैस करावे हे तुम्हा मंत्रियास उचित आहे. खामखा दुराग्रहच करून येथील अमर्यादाच करावी हा निश्चय पुर्ता धरिला असला तरी बेरड, माहार, मांग शहरात घातले आहेत ते अन्योन्य वर्ततात. यातच तुमची मातबर सेवकाची कीर्ती असली तरी हेही उत्तम आहे. मागे पुढे जनास बोलावयास जाले जे तख्ताची मर्यादा ऐसी घडोन आली. साहेबाचे मानसी की वंशास दाग लागोन राज्यकारभार करावा हे किमपि घडणार नाही. येहलोक आणि परलोक उत्तम आसेल तेच करावे. मानवी देहास दुराग्रह नसावा. कोणे गोष्टीचे शाश्वत नाही. यैसे चितात अणून उत्तम मार्ग असेल तो करावा यातच निर्दोष आहे.

राजश्री बाळाजी माहादेव सेवकाचे इतबारी आहेत व तुकोजी सिंदेही इतबारी साहेबाचे वचन जे प्रारंभी दिल्ही आहे तेच प्रमाण आहे. तुम्हीही साहेबास आपल्या आराध्य दैवताच्या दुर्वा बेल भांडार क्रिया पुरसर दिल्ह्या आहेत त्याचे स्मरण असो देणे. राज्यभाराचा यत्त्यार तुम्हावरीच आहे. तुम्हा-पेक्षा दुसरा सेवक उपयोगी सांप्रत काली कोण. सर्व राज्यभाराचे कामकाज तुमचेच हाते घ्यावे हेच साहेबाचे मानस. यदर्थी चितात किमपि संशय न धरणे.

१

वडुथावरी सेवक दोन वेळ आलो. परंतु कृपा न केली. समीप-वर्ती याणी संशय घातले तेच साहेबाचे मनात आले. पुढे कोणे भरवशावर यावे हे कळतच आहे. प्रथम साहेब पुण्यास सेवकावरि कृपा करून आले तैसे मन औदार्य करून संशय टाकून कृपा केलिया सर्व गोष्टी उत्तम होतील म्हणून विनंती लिहिली. यैसीयासा तुम्ही वडुथाचे मुकामास आलेत तेव्हा साहेबी तुम्हास दर्शन द्यावे हाच निश्चय मुहुर्त पाहोन प्रस्थान देखील केले. राजश्री माहादाजी नाईक निंबाळकर व दिनकर महादेव मध्यस्तीस आले होते. बोलीत अंतर उभयतानी तुम्हास

आहेत. कर्तव्य असेल ते साफ साहेबी आज्ञा करावी. मोघम भ्रम राखोन तुम्ही याल तेव्हा आज्ञा करू यैसी आज्ञेने शेवकाचे येणे कसे होते. साहेब वडील आहेत. जे खरे आसेल ते करावयास स्थापावयास संकोच कशास पाहिजे म्हणून विनंती लिहिली. यैशीयास साहेबाचे मानस कीं तुम्ही दर्शनास यावेत. तदोतर खरे आहे तेच तुमचे व साहेबाचे विचारे स्थापावे यांत उत्तम. तुम्ही न यता मध्यस्तीचेच विचारे कर्तव्य ध्यानास आले आसले तरी यासच निक्षुण लिहून पाठवणे. म्हणजे यासच आज्ञा केली जाईल. भोसल्याच्या वंशास दाग नसावा. तुम्ही प्रधान मातबर सेवक सूज्ञ आहात. दुराग्रहावरी द्रिष्टि किमपि न देणे हा खोटा सा परिछिन्न तुमचे चित्ती कळलेच आहे. अत:पर संशय न धरणे. खरे आहे तेच सर्वथा करावे. विलंबावरी न टाकणे——

१

काय समजाविले या मुळे तुमचे चित्तास न ये (?) उठोन गेलेस हे गोष्ट साहेबाकडे काय साहेब कृपा करून पुणियासी यावे सर्व संशय दूर होऊन उत्तमच होईल म्हणोन लि॥. यैशीयासी साहेबाचें मानस की तुम्हीं एकवेळ येऊन दर्शन घ्यावे. परस्परे कल्पना स्वामी शेवकपणाच्या दूर होतील. तदोतर साहेब पुणियासि येऊन तुम्हा सेवक लोकाचा सन्मान करावयाचा आगाध काय आहे. तुम्ही यकनिष्ट सेवक कृपेस योग्य आहात——

१

सदरहू प्रमाणे कलमाची आज्ञा उत्तरे च्यार चौ कलमाची लि॥ आहेत. ही ध्यानात अणोन सेवक रीतीने वर्तणूक जाहालियास उत्तम आहे. हे जाणीजे● छ. ७ माहे रमजान सु॥ समान खमसैन मया अलफ. सुज्ञ आसा.

---

**क्रमांक : १२४** **दि. १९–५ १७५८ (?)**

**' आसीर्वाद पत्र लिहिले आहे. पुरते आक्षरशा मनन करून ज्याज कीर्ति संपादन होय ते गोष्ट करणे, ' म्हणून ताराबाई यांचे करवीरच्या राणी जिजाबाई याना पत्र.**

श्री

आसल

चिरंजीव सकल सौभाग्यादिसंपन्न जिजाबाई याप्रति माहाराज मातुश्री—— आईसाहेब आसीर्वाद. उपरी येथील कुशल ता॥ वैशाख शुध द्वादसी भृगुवासरपर्यंत यथास्थित जाणून स्वकीय लेखन करीत जाणे. विषेष वेदमुर्ती आले त्यासमागमे वार्तीकही[१] दिघले. बेत तुम्हाकडील आर्थ सर्व विदित जाला. इतका आवकाश पडावा यैसा समये नाही. वार्तीक ग्रहस्तासीच भेटून गेले. पावले असतील. सांप्रत अलाहिदा आसीर्वादपत्र लिहिले आहे. पुरते आक्षरशा मनन करून ज्याज कीर्ति संपादन होय ते गोष्ट करणे. याहून विषेष काय ल्याहावे ( बहुत काय लिहिणे हा आसीर्वाद *१ )

---

● हे पत्र क. छ. घ. इ. सा. खंड १, ले १०८ मध्येहि प्रसिद्ध झाले असून त्याची तारीख १५–५–१७५८ दिली आहे. या पत्राचा काही भाग म. रि. पेशवा बाळाजी बाजीराव पृ. ५६–५५ वर आला आहे. रियासतकारानी या पत्राची तारीख २६–५–१७५७ दिली आहे.

१ बातमीदार. *१ कंसातील अक्षरे निराळी आहेत.

**क्रमांक : १२५** दि. ३–६–१७५८

करवीरच्या जिजाबाई यानी ताराबाईना लिहिले होते की 'साहेबाचा वंश स्वतसिद्ध असता साहेब तोतिया न करतील...' त्याला ताराबाईनी प्रत्युतर धाडले की आपण पुण्यास जात आहोत. तेव्हां चिरंजिव म्हणजे शंभु छत्रपती हेहि तेथे आल्यास 'सर्व गोष्टी चितानुरुपच घडतील.'

श्री

तालिक

चिरंजीव सौभाग्यादिसंपन्न जिजाबाई याप्रति माहाराज मातुश्री आईसाहेब अनेक आसीर्वाद. उपरी, येथील कुशल त।। वैशाख वद्य १३ मंदवासरपर्यंत येथास्थित जाणून स्वकीये लेखन करीत जाणे. विशेष तुम्ही पत्र पाठविले त्यावरून लेखनाभिप्राये श्रवण जाला. तेथे लिहिले की साहेबाची स्वारी पुणियासी जाहलिया आमचे स्वहितच आहे. साहेबाचा वंश स्वतसिध असता साहेब तोतिया न करतील हे जेथच्या प्रतियासी गोस्ट येऊन गेलीच आहे. आजपर्येत्त जाती दूर धरून खोट ते खोटच करून दाखऊन म्हणणाराच्या प्रत्ययास आणून दिल्हे म्हंणोन कितयेक विस्तारे लिहिले. यैसीयासी साहेबाचा वंश असता तोतया करून डाग लाऊन घ्यावा हे प्रथम दिवसापासून साहेब म्हणतात त्याप्रमाणे तुम्हास आज्ञा करीत असता धैर्ये न होय आणि प्रति उतरे मात्र येतात. हा विषय क्षेत्रिय कुलावंतंस आहेत त्यास उचित नसे. परंतु वंशानुरुप कर्तुत्व घडोन न आले हा महिमा सानिध हितकारी आधीनत्व बे ध न (?) देणार त्याचाच आहे. परंतु हे गोष्ट मागे पुढे उपयोगी कदाचित पडणार नाही. आथःपर पोख्त मनसबा हाच आहे की साहेबाची स्वारी पुणेयासी जेष्ट शु।। त्रितियेस[१] गुरुवारी होत आहे. याजकरिता चिरंजिवानी स्वारीत कुच दरकूच येऊन पोचलियास सर्व गोस्टी चितानुरुपचे घडतील. तरी आपले चिताचे कल्पविकल्प दूर करून समयोचित येऊन पोचलियाने उतम आहे. बहुत काय लिहिणे. हा आसीर्वाद.

---

१. ( ८ जून १७५८ )

क्रमांक : १२६ दि. २३-६-१७५८

सदाशिव दीक्षित ठकार यानी ताराबाई व नानासाहेब पेशवे यांचा समेट केला म्हणून त्याना पंधरा हजारांचा गाव द्यावा असे ताराबाईचे नानासाहेबास आज्ञापत्र

श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब
याणी राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान
यांसी आज्ञा केली ऐसिजे

चिरंजीव शाहूबावा यांचा कैलासवास जाहलियानंतर साहेबास व तुम्हास कित्येकानी नानाप्रकारे विकल्प घालून राज्यात बखेडे केले. येविशी वेदशास्त्र संपन्न राजश्री सदाशिव दीक्षित ठकार याणी श्रम साहस करून साहेबाचे व तुमचे एक लक्ष करून बंदोबस्त केला. त्यानंतर साहेब यांजवर कृपाळू होऊन, हे कुटुंबवछल, स्नान संध्यादि षट्कर्मे आचरोन आहेत, यांचे प्रपंचाचा खर्च भारी यास्तव याचे चालविलिया श्रेयस्कर व हे राज्योपयोगी मनुष्य ऐसे जाणून याचे कुटुंबाचे बेगमीस यांस स्वदेशी इनाम गाव पंधरा सहस्त्र रुपयांचे द्यावे, ऐसे साहेबी चितात आणून तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले असे. तर वेदमुर्तीस पंधरा हजाराचे इनाम गाव स्वदेशी लाऊंन देऊन यांस व यांचे पुत्र पौत्रादि वंश-परंपरेने चालविणे. जाणिजे. छ. १५ माहे रमजान सु।। समान खमसैन मया व अलप. बहुधान्य नाम संवत्सरे.

* बहुत काय लिहिणे तरी सुज्ञ असा[1]

---

* येथून हस्ताक्षर ताराबाईंचे.

१ हे पत्र राजवाडे खंड ११ लेखांक ११३ वरून घेतले आहे.

**क्रमांक : १२७** **दि. २३–६–१७५८**

श्रीधरभट मुनिश्वर यांचा गोपाळभट व बाबदेभट यांच्याशी श्रीमहालक्ष्मीच्या पूजेच्या वृत्तीबद्दल तंटा उपस्थित झाला होता. श्रीधर भटाने आपली तक्रार संभाजी दुसरे यांच्याकडे नेली असतां त्यानी या तक्रारीचा निवाडा करण्याचे काम कोट कोल्हापूरच्या पंचायतीकडे सोपविले. पंचायतीने श्रीधर भटाचा दावा खरा असल्याचे जाहीर केल्याने संभाजी दुसरे यानी त्याला मंजुरी दिली.

श्री माहालक्ष्मी

श्री
राजा शंभु छत्र सिका
पति — — —

अज दिवाण कोट कोल्हापूर ता।। मोकदमानी क।। मजकूर सु।। लिसा खमसैन मया आलेफ. वेदमूर्ति राजश्री श्रीधरभट बिन शामभट उपनाम मुनेस्वर गोत्र भारद्वाज पूजारी श्री —— क्षेत्र करवीर याणी करवीरचे मुकामी श्रीमंत माहाराज राजश्री —— छत्रपती स्वामी सनीध विदित केले की गोपाळभट बिन बाबदेभट व बाबदेभट बिन मुकंदभट पुजारी यात व आपणात वृत्तीसंमधे विभागानिमित्य कलह होऊन दिवाणात ह्याल जालो. माहाराजानी आम्हा उभयेतांची मनसुबी बरहुक करून वृतीचे विभाग करून देविले पाहिजेत म्हणून विनंती केली. त्यावरून स्वामीनी या उभयेतांची मनसुबी कोट म।।राकडे पंचाइतात लाऊन दिली आणि उभयेतांत पंचाइतात कोट म।।रचे सदरेस लाऊन दिल्हे. सदरेस पंचाइतानी हर दूजणांस सांगितले जे तुम्ही आपले कागदपत्र भोगभोगवटेचे जे आसतील ते दाखऊन करीने देऊन रूजु मोझेनिसी पुरवणी करून घेणे. रास्ता मनसुफीमुळे कजिया निवडून घेऊन निवाडे-प्रमाणे वर्तणूक करणे आणि हर दूजण वादे जामीन देणे म्हणून सांगितले. त्यावरून श्रीधरभट बिन शामभट यानी जमान दिल्हा. गोपाळभट व बाबदेभट यानी जमान दिल्हा नाही. तेव्हा पंचाइतानी गोपाळभटास विचारिले जे तुम्ही उभयेता कजियाचे निवाडेबदल आले आसता जामीन देत नाही. तेव्हां मनसुबी कैसी होईल. निवाडा करून

घेणे आसिले तरी जमीन कतबा व राजीनामा व करीना देणे. कागदपत्र जे तुम्हापासी असतील ते जराबाजरा आणून दाखवणे. निवाडा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करणे आणी वर्तणुकेचे खूट जामीन देणे. त्यावरून गोपाळभट व बाबदेभट बोलिले जे आम्ही जमीन कतबा व राजीनामा व करीना खूट जामीन देत नाही. आमचे कागदपत्र या स्थली गाहाण पडिले आहेत. आपणापासी काही नाहीत. वादेबराबरी आमचे वस्तुवेव्हार बोलवत नाही. आजिपावतो याचा व आमचा कजिया होतच आहे. ते निमे विभाग आपला म्हणतच आहेत. आम्ही दोन तकसिमा खातच आहो. याप्रमाणे फांट घेऊन रेटाईने बोलू लागले. उपरी पंचाईत बोलिले जे तुम्ही वृतिवंत रेटाईच्या गोस्टी बोलता हे कार्याचे नव्हे. वाद्या उभा राहिला आसता न बोलता परिणाम काये. तुम्ही वेव्हार बोलत नाही. तेव्हा तुमचा वेव्हार खोटा दिसोन येतो पेश आदेश जाणोन वर्तणूक करणे. यावरी श्रीधरभट बिन शामभट याचे बंधुवर्गसमवेत यास पंचाइतानी विचारिले जे तुमचा करीना व पुरातन तुमच्या वडील वडिलातागायेत कागदपत्र व वतनाचे जे आसतील ते दाखवणे. त्यावरून श्रीधरभटानी आपले कागदपत्र आणोन दाखविले. त्यास बाबदेभट व मुकंदभट यांचे पत्र तुकणभटास लेहून दिल्हे आहे ते पत्र बी ॥

<table>
<tr>
<td>शके १५९० वर्षे कीलकनाम संवछर भाद्रपद शुध दशमीस तुकणभट मुनेस्वरास बाबदेभट मुनेस्वर यानी लिहून दिल्हे यैसेजे. आपण तुम्हापाशी कलह करीत होतो की आमच्या मुंजी तमणभटी केल्या. आम्ही त्याचे पुत्र त्याचा विभाग भक्षु. मग ग्रामस्तानी आम्हास सांगितले जे तुमच्या मुंजी धर्मार्थ बांधिल्या. तुम्हास समंध नाही. यैसे भोग्य</td>
<td>शके १५९० वर्षे कीलकनाम संवत्सरे भाद्रपद शुध दशमीस तुकणभट मुनेस्वरास मुकंदभट मुनेस्वर यानी लिहून दिल्हे यैसेजे. आपण तुम्हासी कलह करीत होतो की आमच्या मुंजी तमणभटी बांधल्या. आम्ही त्याचे पुत्र विभाग भक्षु. मग ग्रामस्तानी आम्हास सांगितले जे तुमच्या मुंजी धर्मार्थ बांधिल्या. तुम्हास समध नाही यैसे भोग्य साधन</td>
</tr>
</table>

साधन समजाऊन दिल्हे. आजियापासून आम्ही तुम्हासी कलह न करू. आमचा पिता कमळाकर भट त्याचा विभाग भक्षून सुखे आसो हे सत्ये.

यास साक्ष.

१ आवदेभट लाटकर
१ घोंडभट जेरे
१ तुकणभट जपे
१ सरस्वतीभट ग्रामोपादे
१ आवदेभट अस्टवधानी
१ लिंगणभट धर्मादिकारी

६

समजाऊन दिल्हे. आजीपासून आम्ही तुम्हासी कलह न करू. आमचा पिता कमलालाकर भट याचा विभाग भक्षून सुखे आसो हे सत्ये.

यास साक्ष.

१ आबदेभट लाटकर
१ घोंडभट जेरे
१ तुकणभट जपे
१ सरस्वतीभट ग्रामोपादे
१ आबदेभट आस्टावधानी

६ (?)

याप्रमाणे श्रीधरभटाचे पत्र वडिलांचे आहे. याउपरी का। मा।रचे वतनदार देखील जोसी ग्रामोपादे व धर्मादिकारी यांवरी पंचाइतानी श्री——चा तीर्थ अंगारा घालोन विचारिले जे तुम्हास पूजारीयाचा मा।र मुळीपासून दखल आसल त्याप्र।। करीना लिहून देणे. त्यावरून वतनदारांनी करिने लिहून दिल्हे. यावरून श्रीधरभटाचे साधन संपतीचे कागदपत्रावरून चौकसी पाहाता श्रीधरभटाचा न्याये खरा दिसोन आला. गोपालभटाचा न्याये मुलीपासून पाहाता खोटा यास्तव वेव्हारास उभा राहात नाहीं यैसा पंचाइतानी निवाडा केला. तो पाहाता श्रीधरभट बिन शामभट व गोपाळभट बिन बावदेभट व बावदेभट बिन मुकुंदभट यांचे मूल पुरूशाचा शोध पाहाता मूल पुरूश कृष्णभट याचा पुत्र नरसिंभट याचे पोटी पुत्र तीघे. वडील पद्मनाभभट व कृष्णभट व धाकटा नारायेणभट यैसे तीघे. या पै ।। नारायेण भटाचे नकल जाहाले. वडील पद्मनाभीभट याचा वंश शामभट याचे पुत्र श्रीधरभट देखील चौघे. कृष्णभटाचा वंश बाबदेभट व मुकुंदभट यांचे पुत्र गोपाळभट व बाबदेभट याप्रमाणे वंशावळी आसतां नारायेणभटाचे नकलाचा विभाग

उभयेता बंधूचे संततीने येथा विभागे निमे निमे प्रमाणे आनभवावे यैसे आसता बाबदेभट बिन कमलाकरभट रेटाईने नारायेणभटाचा नंकलाचा वंत खाऊ लागला यैसे क।। म।।रचे वतनदार देखील जोसी ग्रामोपादे घर्मादिकारी याचे करीनेवरून निवाडा जाहाला. गोपाळभट बिन बाबदेभट व बाबदेभट बिन मुकुंदभट याचा मुळीपासून वेव्हार पाहाता खोटा आहे यैसे जाह्याले. त्यावरून श्रीमंत माहाराज स्वामीस जाहाला निवाडा निवेदन केला. त्यावरून स्वामी श्रीधरभट बिन शामभट याजवरी कृपाळू होऊन श्रीचे पूजारकीचे निमे वतन व पूर्वीला घरठाव वाडा आंकणे ६ साहा पैकी निमे अंकणी ३ तीनी व यांची वडीलकी पुरातन यांकडे चालत आली आहे त्या प्र।। करार केली आसे. पेसजी गोपाळभट बिन बाबदेभट याणी हुजुर गैरवाका निवेदन करून पत्रे घेतली आहेत वगैरे कागद त्याकडे आसतील ते रद केले आसेत. श्रीधरभट याजवळ पूर्वील पत्रे होती ती आणोन निवेदन केली. श्री—— स्वामीचे निवाडपत्र व पैठणचे पत्र व हरिमंदीरचे पत्र यैसी पत्रें स्वामीनी ध्यानास आणून श्रीधरभट बिन शामभट यास निमे श्री——चे पूजारकीचे वतनाचा विभाग करून दिल्हा आसे. तरी तुम्ही श्री——चे निमे वतनाचा विभाग व घरठाव पुरातनपैकी आंकणे तीन श्रीधरभट बिन शामभट पूजारी श्री क्षेत्र करवीर यांसि व याचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. वेदमूर्ती निमे विभाग श्री—— चे पूजारकीचा आपले पुत्र पौत्रादि वंशपरंपरेन अनभवितील. गोपाळभट बिन बावदेभट व बाबदेभट बिन मुकुंदभट यानी पूजारकीचे निमे वतन व निमे घर तीन आंकणे अनभऊन सुखरूप आसावे. या उभयेतानी श्रीधरभटासी कजिया करावयास समंध नाही. निवाडेप्रमाणें निमे निम विभाग योग्य करावे. तरी तुम्ही श्रीचे पूजारकीचे निमे वतन श्रीधरभट यास परंपरागत चालवणे म्हणून आज्ञा. आज्ञेप्र।। सदरहूप्रमाणें श्रीधरभट बिन शामभट यास निमे श्रीचे पूजारकीचे वतन व घरठावपैकी निमे आंकणे ३ तीन व वडीलकी पुरातन याकडे चालत आली आहे त्याप्रमाणे करार केली आसे. तरी तुम्ही यास व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. साल दरसाल नवीन सनदेचा उजूर न करणे.

गोपाळभट व बाबदेभट यानी निमे पूजारकीचे वतन व निमे घरठाव आंकणे ३ तीन आनभऊन आसावे. यासी कजिया करावया समंध नाही. या पत्राची तालीक लेहून घेऊन हे पत्र भोगवटीयाबदल श्रीधरभट बिन शामभट पूजारी याकडे परतोन देणे. जाणिजे. रवाना छ. १६ माहे शौवाल मोर्तब सुद ——

मोर्तब

---

क्रमांक : १२८ दि. १२–७–१७५८

तर्फ रुकडी येथील वाडीस खोत नव्हता. राणी जिजाबाई यानी रुकडीच्या मामलेदाराच्या सूचनेवरून सदर्हू वाडीची खोती व सात बिघे जमीन शाबाजी रामजी जैन यादिवडेकर यास दिली.

सिका

श्रीमंत सकल सौभाग्यादि संपन्न मातुश्री जिजाबाई साहेब याणी ता।। शाबाजी बिन रामजी जैन यादिवडेकर यासि आज्ञा केली यसीजे. सु।। तिसा खमसैन मया आलफ. तुजला वतनपत्र सादर केले यसीजे. तुजबाबे राजश्री जिवाजी रुद्र मामलेदार ता।। रुकडी प्रांत मिरज याणी हुजुर करवीरचे मुकामी येऊन विनंती केली जे कसबे रुकडी येथील पूर्वीची वाडी आहे तेथील पुरातन खोत होता त्याचे नकल जाले. त्याचे कोणी नाही. त्यामुळे वाडीतील वसाहत मोडली. उदरवाही जमीनीची लावणी जुजुबी होत आहे. याकरिता मावजी बिन रामजी जैन यादिवडेकर म्हणून कसबा मजकुरी मिरासी कुणबी रयतावा करून आहे. साहेबी कृपावंत होऊन पूर्वेकडील वाडीची खोती वतन करून दिल्हीयाने वाडीत जाऊन रयत मेळवून घरे कोपटे बांधोन वसाहत करून जमीनीची जरा बाजरा लावणी करील येसी विनंती. व देशमुख व देशपांडे प्रांत मजकूर व मोकदम कसबे म।।र याणीही अर्ज केले की इदलशाहीतील चावराची वाडी आहे खोतीचे वतन करून दिल्हीयाने

उस्तवारी होईल असा अर्ज केला. तेव्हा लावणीचे उस्तवारीवर साहेबी नजर देऊन साहेबी तुजवर कृपाळु होऊन कसबा मजकुरी येथील पूर्वेकडील वाडीस खोत कोणी नाही याकरितां नूतन वाडीचे खोतीचे वतन करून अजरामरहमत करून दिल्हे असे. तरी वाडीत जाऊन घरे कोपटे बांधोन् जमीनीची लावणी सारी करून कौलाप्रमाणे गावस्वरुपे म्हसूल सरकारात देत जाणे. तुजला खोतीचे वतन करून दिल्हे याकरिता तुजपासून शेरणी रुपये ४०० च्यारशेहे घेतले ते सरकारचे पोत्यास करवीरचे मुकामी जमा जाहले असेत. खोतीचे वतन करून दिल्हे आहे. आज्ञाप्रमाणे वर्तणूक कर्णे. तुजला वतनाची चाकरी पडती त्याकरिता इनाम जमीन पडीपैकी वीसा पांडाच्या काठीमूळ जमीन बिघे

| कीर्द जमीन बिघे | पड जमीन बिघे |
|---|---|
| ०५ | ०२ |

येकूण कीर्द पाच बिघे व पड जमीन दोन बिघे करार करून देविली आहे. याप्रमाणें इनाम जमीन व घर तुजे पालक व म्हैस येक पालक व वाडीत कार्य प्रयोजन होईल तेव्हा तुजे घरची सवाष्ण यसे करार करून आज्ञा सादर केली आहे. या बरहुकुम अनभवणे. वरकड वाड्या भोंवर-गावी व कसबे मंजकुरच्या आहेत. तेथे खोत आहेत त्यास कानुकायदा पूर्ववत ज्याप्रमाणे चालत येत असेल त्या दाखलेप्रमाणे चालेल. इनाम जमीन सदरहू सात बिघे तुजला करार करून दिल्ही आहे. त्याखेरीज रयतावेची जमीन केलीस तर रयताव्याचा वसूल द्यावा लागेल. आज्ञे–प्रमाणे वर्तणूक करून तूं व तुझे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन खोतीचे वतन करून सुखरूप वाडीत राहणे. जाणिजे. र॥ छ. ६ ज़िलकाद. लेखन सिमा मोर्तब आसे.

**क्रमांक: १२९** **रवाना दि. १-११-१७५८**

महाराणी जिजाबाई यांचेकडून शिवाजी तुकदेव या नावाच्या ब्राम्हणास मौजे मळगे व मौजे सोनाळी या गावचे कुलकर्णी इनाम. संभाजी दुसरे यांच्या हयातीतच हे इनाम जिजाबाईनी दिले असून ' चौथा वाडा मोर्तब सुद ' असा त्यांचा त्यावर मोर्तब आहे.

श्री

श्रीमंत सकल सौभाग्यादिसंपन्न मातुश्री जिजाबाईसाहेब याणी शिवाजी तुकदेव गोत्र गार्ग्य सूत्र आस्वलायेन यासी आज्ञा केली यैसीजे. सु।। तिसा खमसैन मया आलफ. तुम्ही साहेबासनीध बहुत निष्टेने शेवा बहुत दिवस करीत आला. साहेब तुम्हावरी कृपाळु होऊन तुमचा आर्ज काये आहे ते विनंती करणे म्हणोन आज्ञा केली. तेव्हा आपण कुटुंबवत्सल आपल्यास वतन नाही. साहेबी कृपा करून हर येक जागा वतन देऊन स्थापना केलेयाने साहेबास व साहेबाच्या राज्यास कल्याण चिंतून सेवा करीन म्हणोन आर्ज केल्यावरून साहेब संतोषी होऊन तुमचा योगक्षम चालावा हे चितात आणोन वतनाचा शोध केला. तेव्हा निर्त्रारीस वतन मौजे मळगे बु।। व मौजे सोनाळी हे दोन्ही गाव कागल तर्फेचे कुलकर्णाच नकल होऊन वतन सरकारात आमानत होते ते दोन्ही गावचे कुलकर्णीचे वतन व इनाम व हक्क वतनसमंध कानुकाइदे प्राचीन चालत आसतील त्या प्रो। तुम्हासी करार करून वतन मन्हामत करून दिल्हे आसे.

पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने कुलकर्णाचे वतन आनभऊन सुखरूप राहणे. वतनी सेवा करीत जाणें. *

रवाना छ २९ सफर लेखनसीमा
शके ८५ बहुधान्यनाम संवत्छर

चवथा
वाडा मोर्तं
ब सुद

बार

---

**क्रमांक : १३०** **दिनांक १८–११–१७५८**

जिवाजी तुकदेव कुलकर्णी याने महाराणी जिजाबाई यांची इमाने इतबारे सेवाचाकरी केली यास्तव खुष होऊन संभाजी दुसरे यानी त्याला मौजे मळगे व मौजे सोनाळी या गावची वारसा अभावी पडून राहिलेली कुलकर्णाची वतने व दोन्ही गावी मिळून दहा बिघे जमीन इनाम दिली.

श्री
श्री
प्रतिपच्चंद्र रेख
व वर्धिष्णुर्विश्ववं
दिता शंभु छत्रप
तेर्मुद्रा रामसूनो
विराजते

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ८५ बहुधान्यनाम संवछरे कार्तीक

---

* सदरहू ब।। जिजाबाईसो यांची आज्ञापत्रे सदर तारखेची आहेत ती :–
(१) देशमुख व देशपांडे प्रांत कागल.
(२) मोकदमानी मौजे सोनाळी (सोनाळीचे कुलकर्णी ब।।)
(३) मोकदमानी मौजे मळगे बु।। (मळगे येथील कुलकर्णी ब।। )
(४) राजश्री शिवाजी कोरे मौजे सोनाळी प्रां. कागल यास मौजे म।।स्चे कुलकर्णी ब।।
(५) शिवाजी जाधव मौजे मळगे बु।। येथील कुलकर्णी ब।।
(६) जिवाजी तुकदेव यास कुलकर्णाच्या वतना खेरीज दोन्ही गावी दहा बिघे जमीन इनाम दिल्याच्या संभाजी दुसरे व महाराणी जिजाबाई या दोघांच्या सनदा असून त्या अनुक्रमे दि. १७–११–१७५८ व दि. २७–११–१७५८ च्या आहेत.

बहुल चतुर्थी भृगुवासरे[1] क्षत्रीये कुलावंतंस श्री राजा शंभु छत्रपती

| श्री | श्री | |
|---|---|---|
| श्री राजा शंभु छ<br>त्रपति हर्ष निदान<br>केशव सुत भ<br>गवंत पंडित मु<br>ख्य प्रधान | आई आदि पुरु<br>ष श्री राजा शंभु<br>छत्रपती स्वामी कृ<br>पनीधी अमृतराव<br>कृष्ण प्रती<br>निधी | स्वामी याणी जिवाजी<br>तुकदेव गोत्र गार्ग्य<br>कुलकर्णी मौजे मळगे<br>बु।। व मौजे सोनाळी<br>प।। कागल यासि दिल्हे<br>वतनपत्र ऐसेजे. तुवा |

राणीवास वाडा ४ या सनीध वहुत दिवस निष्टेने सेवा करीत आलास. तेणेकरून स्वामी कृपाळु होऊन तुझा अर्ज कार्य आहे तो विनंती करणे म्हणोन आज्ञा केली. त्यावरून तुवा अर्ज केला की आपण कुटंब वछल आपणास वतन नाहीं. माहाराजानी कृपा करून हरयेक जागा स्थापना केलियाने माहराजांस व माहाराजांच्या राज्यास कल्याण चिंतून राहून सेवा करीन म्हणोन विदित केले. त्यावरून स्वामी कृपाळु होऊन तुजा योगक्षेम चालावा हे चितात आणून वतनाचा शोध केला तेव्हा निर्वारीस वतन मौजे मळगे बु।। व मौजे सोनाळी प।। कागल येथील कुलकर्णाचे नकल होऊन वतन सरकारात अमानत होते. ते दोनी गावीचे वतन कुलकर्णाचे व हक इनाम वतन समंधे कानु काइदे पुरातन चालत असतील त्याप्रो करार करून वतन तुजला दिल्हे असे. व या वतनास अर्जी इनाम जमीन कुलबाव कुलकानु बिघे ० १०

| मौजे मळगे बु।। जमीन | मौजे सोनाळी जमीन |
|---|---|
| ० ६ | ० ४ |

येकून दाहा बिघे इनाम दिली असे. तरी तू सदरहू जमीन चतुःसीमा करून आपले स्वाधीन करून घेणे आणि इनाम जमीन व कुलकर्ण कानु

---

१. वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

काइदे तू व तुजे पुत्र पौ।। वंशपरंपरेने अनभऊन वतनाची सेवा करून राहाणे[१]

निदेश समक्ष.

मर्यादेयं
विराजते
रूजु संमत
मंत्री

तेरीख १६
रबिलावल सु।। तिसा खमसेन
मया मलफ

बार सुरु सुद्र बार

---

**क्रमांक : १३१** **दि. २७-११-१७५८**

महाराणी जिजाबाई यानी जिवाजी तुकदेव कुलकर्णी यास मौजे मळगे या गावी सहा व मौजे सोनाळी या गावी चार, एकूण दहा बिघे जमीन इनाम दिली.

श्री

श्रीमंत सकल सौ।। संपन्न मातुश्री जिजाबाईसाहेब याणी जिवाजी तुकदेव कुलकर्णी मौजे मळगे बु।। व सोनाळी प्रां कागल यांसी आज्ञा केली यैसीजे. सु।। तिसा खमसैन मया आलफ. तुम्ही कुटुंबवत्छल, तुमचे चालवणे साहेबास आवशक हे जाणोन हर दो गावी आर्जी इनाम बिघे येणे प्रो पेसजीपटी व हालीपटी खेरीज करून काटीमुळे जमीन बिघे कीर्द—

| मौजे मळगे बु।। | मौजे सोनाळी प्रां म।। र |
| --- | --- |
| ०६ | ०४ |

येकून विघे दाहा करार करून दिल्हे आसत. तुम्ही आपले पुत्रपौत्रादि

१. सदरहू ब।। आज्ञापत्रे शंभू छत्रपती यांची याच तारखेची सिके २ व मोर्तब- सहीत :

१) देशमुख व देशपांडे प।। कागल
२) मोकदमानी मौजे सोनाळी ( सोनाळीचे कुलकर्णाब।। )
३) मोकदमानी मौजे मळगे ( मळगे येथील कुलकर्णाब।। )

वंशपरंपरेने कुलकर्णाचे वतन समंधे आर्जी इनाम आनभऊन सुखरूप राहणे. जाणिजे छ. २५ रा।।वल लेखन सीमा. [१]

चवथा
वाडा मो
तंब सुद

---

**क्रमांक : १३२** दि. २०-११-१७५८

महाराज मातुश्री आईसाहेबांची (ताराबाई) स्वारी साताऱ्यास प्रयाण करीत आहे, तरी सरहद्दीवर येऊन त्यांचे स्वागत करावे व त्यांच्याबरोबर हत्ती घोडे पागा वगैरे जात आहे, त्यांच्या साठी गवत काढून घेण्याची व्यवस्था करावी म्हणून नानासाहेब पेशवे यानी शामराव अंबाजी यास पत्र पाठविले होते. त्या पत्रास त्याने उत्तर धाडले की, ताराबाई साताऱ्यास कधी व कोणत्या मार्गाने निघणार ते कळवावे.

श्री

पौ।। छ. २०
रबिलोवल
तिसा कार्तिक

श्रीमंत राजश्री ——— पंत
प्रधान स्वामीचे सेवेशी

विनंती शेवक शामराव अंबाजी साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ता।। छ. १८ रोावलपर्यंत स्वामीचे कृपावलोकने यथास्थित असे. विशेष छ. १५ मिनहूचे पत्र सादर जाले ते छ. १७ मिनहूस पावले. तेथे आज्ञा की श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेबाची स्वारी आठा दिवसा-आलीकडे सातारियास होणार. तुम्ही आपले सरहद्देवर येऊन साहित्य

---

सदरहू ब।। सदर तारखेची जिजाबाई सो यांची आज्ञापत्रे मोर्तबसहीत.

(१) मोकदमानी मौजे मळगे
(२) मोकदमानी मौजे सोनाळी
(३) जिवाजी जाधव ( मौजे मळगे बु।। येथे जमीन दिले ब।। )

सरंजाम उत्तम प्रकारे करणें. यंदा हत्ती घोडे पागा कारखाना भारी सातारियास जाणार. कुरणाची नेमणूक केली त्यात मातुश्रीकडील कुरणे व राजश्री गोविंदराव मोरेश्वर याजकडील कुरणे नेमली त्यास वीस पंचवीस लक्ष गवत जरूर कापले पाहिजे. त्यास कराड देसचे बिगारी व तुम्ही आपुणाकडील लाऊन गवत काढून ठेवणे. तुम्हास पूर्वसूचना असावी याजकरिता लिहिले आहे म्हणून आज्ञा. ऐसियास मातुश्रीची स्वारी पुणियाहून कधी निघणार कोणत्या घाटाने येतील. घाटावर आलियावरी मुकाम कोणे ठिकाणी करावे हे तपसीलवार वर्तमान लेहावयास आज्ञा करावी; त्याप्रो आपले सरहद्देत येऊन आज्ञेप्रमाणे साहित्य सरंजाम उत्तम प्रकारे करू. राजश्री गोविंदरायाकडे व मातुश्रीकडे कुरणे आहेत त्यांतील गवत कापावयाची तर्तूद करून राजश्री गोविंदरायाकडे काही दिल्ही आहे. काही राहिले गवत त्याचीहि तर्तूद करून देऊन गवत आज्ञेप्रमाणें काढऊन गंजी घालून ठेवितो. सेवेसी श्रुत जाहाले पाहिजे हे विनंती.

---

**क्रमांक : १३३** **इ. स. १७५९**

नानासाहेब पेशवे यांचे तुळाजी नाईक साठम यास पत्र की, सैन्यासह त्वरीत यांवे.

श्री

राजश्री तुळाजी नाईक साठम गोसावी यांसी अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने।। बाळाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद. सु।। तिस्सा खमसैन मया व अलफ. तुम्हास जमावासुद्धा हुजूर यावयाची आज्ञा करून हे पत्र सादर केले असे. तरी राजश्री अनाजी नाईक साठम हें तुम्हाम लिहितील त्याप्रमाणें लोक चांगले निवडक कसलेले घेऊन हुजूर येणे. लोक* ++ जातील तरी पत्र दर्शनी जमावासुद्धा हुजूर येणे. जाणिजे. बहुत काय आज्ञा प्रमाण.

---

* दोन अक्षरे लागली नाहीत.

**क्रमांक : १३४** **दि. २३-१-१७५९**

किल्ले पन्हाळेची फडणिसी शामभट उपाध्ये राजपुरोहित यांच्याकडे दिली आहे, म्हणून छत्रपती संभाजी दुसरे यांचे नरसिंगराव दळवी नामजाद व कारकून किल्ले पन्हाळा यांस पत्र.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ८५ वहुधान्यन्नाम संवत्सरे पौष बहुल दशमी भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजमान्य राजश्री नरसिंगराव दलवी नामजाद व कारकून किले पनाला यासी आज्ञा केली ऐसीजे. किले मजकुरची सबनिसीकडील फडनिसी पेशजीची फडनिसी दूर करून हली राजश्री शामभट उपाध्ये राजपुरोहित याकडे दिली असे. हे आपले तर्फेने जो ठेवितील त्याचे हातून फडनिसीचा धंदा व कैदकानू पेशजी चालत आहे त्याप्रमाणे सेवा घेणे. यासी वेतन बारनि।। मानी प्रो करार केले असे. ही सनद पों पासून दंडकप्रो वजा करून उरलेले वेतन सिरस्ताप्रमाणे पाववणे. जाणिजे. बहुत काय लिहिणे.

तेरीख २३. जमादिलावल. सु।। तिसा खमसैन.

---

**क्रमांक : १३५** **दि. ३०-१-१७५९**

निळो रघुनाथ कुलकर्णी याने प्रसिद्धगडच्या मामलेद्वाराच्या आज्ञेवरून मौजे विळवडे येथे नवीन पेठ वसविली होती. या पेठेची महाजनकी आपणास मिळावी म्हणून त्याने संभाजी दुसरे यांना विनंती केली असता त्यानी ती मंजुर केली.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८५ बहुधान्य नाम संवत्सरे माघ शुद्ध द्वितीया भोमवासरे[1] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी निळो रघुनाथ कुलकर्णी मौजे वळिवडे त।। म्यानघोल त।। तारळे यासि दिले वतनपत्र ऐसाजे. त्वां करवीरचे मुक्कामी स्वामीसंन्नीध विनंती केली की आपणास किले प्रसिद्धगडचे मामले-

---

१ वाराप्रमाणे तारीख काढली आहे.

दारानी आज्ञा करून मौजे मजकुरी नवी पेठ करून बाजार भरणें, त्यावरून आपण खटपट करून पेठ करून बाजार भरवीत आहे. त्यास किलेकरी याणी आपणास पेठमजकूरचे महाजनकीचे वतन करून दिल्हे आहे. त्यास माहाराजानी वतन करार करून पत्रे देविले पाहिजेत म्हणून त्यावरून स्वामी कृपाळु होऊन कोट मजकूरचे महाजनकीचे वतन नूतन करून दिल्हे असे. , या वतनास मौजे मजकुरी इनाम जमीन भातरोप बिघे तीन दिली असे. वरकट हक्क लाजिमा बाजे पेटा प्रमाणे करार केले असे. तरी तू सदरहू वतन व इनाम हक लाजिमा पुत्रपौत्रादि-वंशपरंपरेने अनभवणे. वतनासंबंधे तुझे माथा शेरणी रुपये पंचवीस २५ ठेविले याचा वसूल हुजुर झाला. तू वतन अनुभवणे.

तेरीख

१

जमा दिलाखर सु।। तिसा खमसइन

---

**क्रमांक : १३६** **जाने. फेब्रुवारी १७५९**

करवीरचे संभाजी दुसरे व पेशवे यांच्यामधील कराराची यादी.

श्री

तालीक

यादी येणेप्रमाणे सरकार निसबतीची कलमे करारात लेहून द्यावी

वारणे ऐलेकडे राजमंडळचा तालुका जो आहे तो साहेबाकडे निर्वेध असावा ——

" सुदामत चालत आल्या-प्रमाणे चालऊ—— "

हुकेरी प्रांत साहेबाचे खासगीस संवस्थाने बिदरूर व सोंधे व सावनूर येथील तोफेचा[1], यैवज करार पेशजी जाहाला आहे त्याप्रो साहेबाकडे निखालस पाठवावा ——

" पावत आल्याप्रो यैवज पावता होईल."

---

१. नजराणा.

दरोबस्त दिल्हा त्याप्रमाणे निर्वेध साहेबाकडे चालावा.

"हुकेरी प्रांत दरोबस्त साहेबाकडे चालऊ ——

सातारेचे राजधानीस खासगी खर्चाचा सरंजाम साहेबाकडे द्यावा.

"जरुराती खर्चाप्रो काही सरंजाम काही नख्ती नेमणूक करून देऊ."

धण्यासंनिध लाहान मोठे सेवक सेवा करून होते, त्यास त्यांचे योग्यतेप्रो चालवावे ——

"योग्यतेनुरुप समजून चालेसे करू —— "

धण्याचे हुजुरातीस किले आहेत. त्याचा सरंजाम, पूर्वील नेमणुकेप्रो किलेचे तनखे किलेकडे सुधामत चालवावे.

"भोगवट्याप्रो निर्वेध चालऊ —— "

हुजुरचे सनदेचे लोकास गाव इनाम दिल्हे. वतने करार जाहाली असतील ते चालवावी. अंतर करू नये. ——

"भोगवटा मनास आणून चालऊ. भोगवटा नसला, सनद असली, तरी मनसुबीचे रीतीने मनास आणून, योग्य असेल ते चालऊ."

सरदेश कुलकर्णाचे व इनाम साहेबास तुम्हास किमपी पडदा नसावा. साहेबी जे केले, ते तुम्ही परिणामास नेहून साहेबाच्या लक्षानरुप प्रांजळ साहेबासी असावे.

"साहेबी लेकाप्रो येखतियार दिल्हा अहे. बरेत्राईट करावयाचा येखतियार साहेबानी दिल्हा आहे. असे असता ज्यांत राज्यास स्वामीस उतम तेच सेवकापासून होईल. साहेबाचे उतम लक्ष असेल त्यास अंतर होणार नाही —— "

सिदे नरगुंदे व पतकेचे हुजूर पागेचे सरदार सरंजामसुधा पूर्ववतप्रो धण्याचे हुजरातीस त्याणी असावे.

व त्याचे सरंजामाचा व पागेचा फडशा होणे तो हुजुर होत असावा.

"साहेबाचे मर्जीप्रो हुजरातीस करार आहेत तसे राहू."

सेना खासकेल याचा सरंजाम नेमून दिल्हा अहे. काही चालतो काही चालत नाही. अगत्यवादे त्यांचा सरंजाम नेमून दिल्हेप्रमाणे चालवावा ——

"भोगवट्याप्रो चालऊ. जो चालत नसेल त्याची चौकसी मनास अणून चालवावया योग्य दिसल तो चालऊ." ——

| | |
|---|---|
| गाव चालवावे——— | सरदेशमुखी व बाजे वतने सरकार तालुकेस अहेत ती सरकारात असावी. |
| " सुदामत प्रो चालऊ " | " जसा दहावीस वर्षे सरकारात असेल तैसा चालेल." |
| | आंगरेकडील पंचमहालाचा मख्ता करार केला, त्याप्रो ऐवज साहेबाकडे द्यावा. |
| | "चिरंजीव भाऊनी ऐवज करार केला असेल त्याप्र।। प्रविष्ट होईल——— " |

सदरहूप्रो चालवावयास शफत कुलस्वामीची. अंतर करू तर असे+

( यादी लि।। यखतासी कोल्हापूरचे मु।। श्रीमंती केली. परंतु यादीवरी साल तेरीख महिना नव्हता. सबब शोध करून हाली सन इसन्ने सितैनात फाल्गुण मासी मौजे वणूर प्रांा कित्तूरचे मु।। श्रीमंत माधवराव पंडित प्रधान अले तेव्हा लि।। असे. माघ मास सन तिसा खमसैनचे साली कोल्हापुरी यादी जाहाली. )

---

टीप :– + कंसातील मजकूर महत्वाचा आहे. त्यात म्हटले आहे की, 'यादीवर साल तेरीख महिना नव्हता.' ती पुढे निश्चित कशी केली गेली ते सांगताना या टिपणात म्हटले आहे की, श्रीमंत माधवराव पेशवे इसने सितैनात फाल्गुण मासी ( फेब्रु.– मार्च १७६२ ) मौजे वणूर, प्रांत कित्तूरचे मुक्कामी आले, तेव्हां यादी माघ सन तिसा खमसैनचे साली ( जाने–फेब्रुवारी १७५९ ) कोल्हापुरी झाली हे चौकशी अंती ठरविण्यात आले.

सन १७६२ च्या फेब्रुवारी–मार्च महिन्यांत माधवराव पेशवे कर्नाटकांत कित्तुर प्रांती होते, हे पेशवे दप्तर भाग ३७, अनुक्रमांक ५ च्या कागदावरून सिद्ध होते; प्रस्तुत कागद मार्च १७६२ चा असून त्यांत म्हटले आहे. 'खासा स्वारी कित्तुर प्रांती आली; कित्तुरच्या ठाण्यास मोर्चे लावले.'

प्रस्तुत यादी **Treaties, Agreements and Sanads** संपादक, मावजे पारसनीस मध्ये पृ. ४६ वरही प्रसिद्ध झाली आहे. परंतु तींत उपरिनिर्दिष्ट कंसातील टिप्पण नाही. त्यावरून आम्हास उपलब्ध झालेल्या नकलेहून मावजे पारसनीस याना सापडलेली नक्कल वेगळी होती हे स्पष्ट आहे. —संपादक

**क्रमांक : १३७** दि. ३–५–१७५९

छत्रपती संभाजी दुसरे यानी मुक्तेश्वराचे पुत्र निरंजन यांस मौजे तेरवाड परगणा रायबाग हा गाव इनाम दिला. हा गाव पूर्वी मुक्तेश्वराच्या समाधीस इनाम होता.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ८५ प्रमाथीनाम संवत्सरे वैशाख शुध सप्तमी गुरुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती याणी रा।। निरंजन गोसावी बिन मुक्तेश्वर गोसावी गोत्र आत्री सुत्र आस्वलायन यासी दिल्हे इनामपत्र यैसेजे. तुमचेविसी राजश्री नरसिंगराव देवाजी दि।। पंतप्रधान याणी करवीरचे मुकामी स्वामीसनीध विदित केले की मौजे तेरवाड प।। रायेबाग हा गाव पूर्वी रा।। मुक्तेश्वर गोसावी हे श्री ——— येकनाथ स्वामीची कन्या गंगाबाईचे पुत्र याचे वृंदावन मौजे मजकुरी आहे, त्यास वृंदावनी पूजा उछाह व आन्नसंतर्पण करावयासी पुरातन इनाम होता. त्यास यैलीकडे त्याचे पणतु मुक्तेश्वर गोसावी बिन आकाणा गोसावी यासी इनाम दिला होता त्याप्रमाणे ते उपभोग करीत आहेत. त्यास गोसावी म।। निले याचा वृद्धापकाळ जाहला म्हणून गोसावी याणी विदित केले, जे वृंदावनी पुजा उछाह व आनसंतर्पण करावयासी आपली कन्या बकुबाई इचा पुत्र निरंजन गोसावी याचे नावे पत्रे करून द्यावी म्हणून विदित केले. त्यावरून तुम्हावरी कृपाळू होऊन मौजे तेरवाड प।। रायबाग हा गाव पेशजीप्रमाणे इनाम करार करून दिला असे. तरी तुम्ही सदरहू मौजे मजकूर आपले स्वाधीन करून घेणे आणि इनाम गाव दरोबस्त तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण चिंतून सुखरूप राहणे. जाणिजे निदेश

तेरीख ५

रमजान सु।। तिसा खमसैन मया

क्रमांक : १३८ दि. १३-६-१७५१

सातारा, चंदन आणि वंदन हे किल्ले कसे हस्तगत झाले तो वृतांत पेशव्यांचा सातारा येथील कारकून या पत्राचे द्वारा पेशव्याना सादर करीत आहे. गडकरी किल्ले स्वखुषीने खाली करण्यास तयार नव्हते. ताराबाईंची पत्रे आणि हुजरेहि चंदन वंदनकरांनी वर घेतले नाहीत. अखेर ' रांडापोरे कैदेत ठेवतो आणि तुमची सर्वांची डोकी मारतो' अशी धमकी दिल्यावर गडकऱ्यांनी किल्ले खाली केले असे पत्रात म्हटले आहे.

श्रीशंकर

पै।। छ. १९ सवाल
सु।। सितैन जेष्ठमास

सेवेशी विज्ञापना त।। छ. १७ सवालपर्यंत स्वामींचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष स्वामीनी स्वदस्तुरे कृपा करून पूर्वी कोकणातून पत्र प।। तेथे पत्री लि।। आहे की किले सातारा व चंदन व वंदन हे तिन्ही किलें युक्तीने हस्तगत करणे. हेच काम सारे कामात कठीण मातबर शाहणपणाचे आहे. हे तुम्ही केले म्हणजे सर्व प्रकारे तुमचे चाकरीचा मजुरा आहे. त्या अक्षराचे स्मरण धरून यथामतीने सातारा व चंदन हस्तगत केला ते वृत्त पूर्वी सेवेसी लि।। च आहे. किले वंदनकर बदलून जुजावयास तयार जाले. कोणेही प्रकारे युक्ति न चाले. तेव्हां मातुश्री साहेबास बोध करून त्यांचे पुत्र (व) हुजरे येकदोनदा पाठविले. मातुश्रीसही संशय वाटतच असे. तथापि येक दोनदा पत्रे (व) हुजरे गेले ते किलेकरी यानीं वर न घेतले, बेकैदी केली. हीच गोष्ट मातुश्रीस बिबऊन किले चंदनास व वंदनास मातुश्रीसाहेबांच्या सनदा घेतल्या की किल्यावर लोक पेशव्याकडील से पन्नास घेऊन तुम्ही हे येक विचारे वर्तणे. त्याउपर मागती मातुश्रीस युक्तीने समजाऊन हुजरे वंदनास पत्रे देऊन रवाना केले. तेही वंदनकरानी वर न घेतले. मग तर आपल्यास राग येऊन खाली फौज लोक पाठविली. परंतु ताकीद केली की जवळ न जाता दूर बसोन वाटा बंद करणें. किलेकरी यांची वैरण कडबे खाली आहेत ते मात्र चिरणे. त्यांसी तुम्ही होऊन जुजाचा प्रकार न करणे. त्याउपर मोर्च्याची जागा पाहावयास शाहाणे लोक कारकून प।। त्यांजवर

किलेकरी यानी गोळ्या मारिल्या. हे वर्तमान येताच येकदाच आसपासचे गांवी राऊत कारकून निरनिराले पांठऊन किलेकरी यांची माणसे कबिले चोरून छपून काही थोडे थोडे राहिले होते ते कुल कैद केले आणि हशमी माणूस तीनच्यारसे पाठऊन चौकी बंदी केली. त्या उपरी किलेकरी धोंडे लवंडू लोटू लागले. मग किले चंदनावर बेलदार पाथर्वट गवंडे सेदोनशे माणूस याप्र।। पाठऊन व कारखाना लाऊन जेजालांचा मोर्चा व तोफांचे मोर्चे बांधू लागलो. जेजाला नाहीत व गोले तोफांचे नाहीत म्हणून सेवेसी विनंति लि।। यावयास दिवसगत लागली म्हणून जेजाला वीस पंचवीस चहूकडून मेलविल्या. काही चिमणगावीहूनही मागून आणिल्या. गोलेही सेदीडसे मेलविले. जेजाला किले चंदनास रवाना केल्या. येक दोघे गडकरी किले वंदनकर बातमीस आले त्यास या प्रकारे दबावले की या उपर तुमची सर्वाची डोकी मारल्याखेरीज व रांडा पोर कैदेत ठेविल्याखेरीज राहात नाही. याप्रकारे दबावणी फारच केली. त्यांस निकर्ष फारच कलून किलेकरी बोलू लागले, आम्ही किला देतो, आम्हास मुला माणसासुद्धा आबरूने रजा द्यावी. हे वर्तमान लिहून आले. मग किलेकरी दाहावीस सबनीस सरनोबत इतके मात्र खाली आणून साता–रियास आणिले. मातुश्री साहेबांचे पायावर घातले. आम्हीच वराडी होऊन अन्याय (?) मागोन घेतला. मातुश्रीपासूनही फजित करविली. साहेब रागे भरली. बेकैदी केली म्हणून तुमचे पारपत्य करविले. याप्र।। जाल्यानंतर किलेकरी यास ताकीद साहेबानी रूबरू केली की तुम्ही कबिले सुधा खाली उतरणे किला पेशव्याचे लोकांचे हवाली करणे. या प्र।। निक्षून ताकीद करून राजश्री शेषो रामचंद्र नि गोविंदराव मोरेश्वर व हशमी लोक व मातुश्री साहेबांचे दोन हुजरे याप्र।। रवाना केले ते आज बुधवारीस कालच्या सा घटका दिवसा किल्यावर चढले. स्वामीचा पुण्यप्रताप थोर. जागा फार कठीण. परंतु श्रम न होता आली ये गोष्टीचे तरतूदेस रात्र दिवस मेहनत केली ते ईश्वरास ठाऊक असेल. सर्व प्रताप स्वामीचा. सेवक लोकी श्रम करून स्वामीसेवा करावी हे खरे. कृपा करणार स्वामी. हे विज्ञापना.

---

क्रमांक : १३९ दि. ६-८-१७५९

लढाईत पाडाव झालेली घोडी व नोकरीस ठेवलेल्या लोकांचा रोजमुरा याबाबत उद्‌भवलेल्या तंट्यासंबंधीचा हा महजर आहे.

श्री

निवाडपत्र थल दर जागा श्री देव दुधेस्वर क॥ दुधगाव प॥ हुकेरी सु॥ सितैन मया अलफ. शके १६८१ प्रमाथीनाम सवछरे सन ११६९ श्रावण शुध १३ इंदुवासरे

राजमुद्रा

सेवक

हजीर मज्यालसी

भानजीराम व नारो राम

घुमगौडा पाटील
समडोलीकर
लिगापा व सिवाणा
व थंबाणा पडीकर
क॥ अस्टे

थल क॥ मजकूर

सावतराव पाटील
नांगर
सम गौडा

लालापा साजणे
रागाणा पोतदार

कुलकर्णी
बाबाजी नरसिव्हे दाजी
नारायेण खंडो लिंगदेव
कोंडो अपाजी

मखदुम
अपाजी अडमोटे
तमाणा अडमोटे
सेटे पाकोळे
खान महमद नगा (?)
कोरबु

या समक्ष जाहाले निवाडपत्र ऐसे जे. जोत्याजी बिन सटवोजी सकपाळ पाटील मौजे बाबवडे प।। मिरज यात व रघुजी बिन रुद्राजी नलवडे पाटील मौजे काले कसबा वाघवे प।। पनाळा या उभयतामधे नालबंदीचा व पाडावे घोडेचा कजिया लागोन निवाडे व।। राजश्री बहीरजी थोरात ठाणे क।। वाळवे यानी आपले पत्र देऊन क।। मजकुरचे थलासी पाठविले. थली उभयेता वादे येऊन हाजीर जाहाले. यासी थल नाईकी आज्ञा केली जे उभयेता थलासी रजावंद असलेलिया राजीनामे लिहून घेणे. यासी उभयेता वादी यानी रजावंद होऊन आपले स्वसंतोषे राजीनामे लिहून दिल्हे. उपरातीक गोतनाइकी उभयेता वादीयासी जमान आणून देणे. त्याजवरून उभयेता वादी यानी जामीन आणून दिल्हे इ।।

जोत्याजी सकपाल यानी जमान कतबा आणिला. जोती दिडे पाटील मौजे जरळे. याचे नावचा आणून दिल्हा. रघोजी नलवडे यात व जोती सकपाळ यात नालबंदीचा व पाडाव घोडेचा कजिया लागोन स्वामीचे थलासी निवाडे व।। आले. त्यासी जोती सकपाळ यासी आम्ही जामीन असो. निवाडा होये परियेत थली हाजीर राहून निवाडे प्र।। वर्ततील. निवाडे प्र।। न वर्तता गैर हाजीर जाहालिया अम्ही हाजीर करून देऊ. निवाडे प्र।। आम्ही वर्तवू. लिहून दिल्हे. सही छ. १९ सेवाल सन सितैन. निशान नांगर.

रघोजी नलवडे यांनी जमान कतबा आणिला मोकदम मौजे ढवळी क।। अस्टे प।। मिरज याचे नावचा लिहून दिल्हा कतबा यैसाजे. जोतजी सकपाळ यात व रघोजी नलवडे यांत नालबंदीचा व पाडावे घोडेचे कजिया लागोन निवाडे व।। स्वामीचे थलासी आले. त्यासी रघोजीस आम्ही जामीन असो. निवाडा होये परियेत थली हाजीर राहून निवाडेप्रमाणे वर्ततील. निवाडे प्र।। न वर्तता गैर हाजीर जाहालीया हाजीर करून देऊ. निवाडे प्र।। आम्ही वर्तऊ. लिहून दिल्हे. सही छ. २१ माहे सेवाल सन सितैन. निशान नांगर.

उभयेता वादी यानी जमान कतबे आणून दिल्हेवरी हर दो जण वादी यासी दैवानी आज्ञा केली जे तुमचा करीना कैसा काय आहे तो लिहून देणे. त्याजवरून उभयेता वादी यानी अपलाले करीन लेहून दिल्हे. त्यातील ह्रौंशे इ।।

जोत्याजी ° संकपाळ यानी तकरीर केली यैसीजे

बी।।

१ रघोजी नलवडे याजकडे रोज (म) राची बोली आम्ही करून लोक असामी सुमार २० वीस व आम्ही येक ये।। २१ येकवीस दर माहे दर असामी सेरा रु।। ८ व ब्यासा रु।। १६ या प्र।। करार करून तुर्त नालेबंदी रु।। १५४ येकसेहे चोपन पदरी घातले. बाकी महिने पै।। बाकी रु।। बावीस घाटाखाले गेलेवरी (देऊ) यैसा करार केला.

कलम

१ घाटाखाली गेलेवरी रु।। १५ पंधरा दिल्हा.

कलम

१ आम्ही चाकरी माहे २।।। पावणे तीन महिने केली. त्याची तलब जे हिसेबी होईल त्यापैकी नालबंदी रु।। १५४ व रोजमरा रु।। १५ यै।। रुपये १६९ अम्हासी

रघोजी नलवडे यानी तकरीर केली यैसीजे

बी।।

१ जोती संकपाल याची बोली आम्ही करून नोकर ठेविले. अ।। सुमार २१ येकवीस. दर माहे दर अ।। रु।। ७ सात व नाइकास रु।। १४ यै।। रु।। १५४ करार करून तुर्त सदरहू एक महिना नालबंदी पदरी घालून विजयादुर्गास नेईल. कलम ——————

१ घाटाखाले गेल्यानंतर रोजमरा रु।। १५ दिल्हा.

कलम

१ चाकरी दोन्ही महिने केली. त्यासी दरबार सिरस्ता दसमाही वजा करून दरबार राबू (?) माहे १ रोज २०

कलम

१ आंगरेत व सावंतात झुंज जाहाले ते समई जोती संकपाळ यासी घोडी पाडाव येक सापडिली. ते घोडी करिता आंगरे

पावले. ते वजा करोन बाकी जे हिशेबी निघतील ते आम्हासी यावे. लोकासी रोजमरा पावना. लोकानी पोटासी नाही म्हणून गवगवा केला. त्यासी सुभानजी प।। चावरेकर यानी तुर्त समजाविसी करून रु।। २०८ दोनीसेहे आटाचा कतबा रो गोपाळराव याचे विद्यमाने दिल्हा. त्यावरून आम्ही सावकाराचे कर्ज काडून लोकाची समजाविसी केली. सदरहू रु।। सुभानजी चावरेकर यानी अम्हासी द्यावे.
कलम

१ अम्हाकडील लोकांची हत्यार फिरगा ५ बंदुखा ५ ढाला २ सिंग १ ये।। दागिने १३ गेले ते लोकानी आम्हा पासून घेतले ते रघोजी कडून यावे.
कलम

१ बुरजामधे आम्ही तरवार मारली. अमचे मेहुणेसी व यानी घोडीविसी आम्हासी अटक केले. हे यैकोन जोती संकपाळ घोडी सुधां पळून गेला म्हणून आमची पडिली घोडी ४ चारी वर्तेनात यावी. ती बुडाली "
कलम

१ जोती संकपाळ याजपासी आम्ही घोडी तुम्हाकडे आहे त्या ब।। पडिली घोडी च्यारी वर्तेनात बुडाली. घोडी तुजकडील देणे. त्यासी तो बोलीला जे आमची हत्यार बुरजात गेली व आमचे तळबाचे रु।। व बकसिसी तरवार मारल्याली देणे. यैस बोलोन धटपणासी येऊन घोडी ठेऊन घेतली.
कलम

---
५

सदरहू लेहून दिल्हे श्र।। सुभानजी मोहिते प।। चावरेकर व रुद्राजी तोवर याचे मुखे खर करून घेऊ. खरे करू न देऊ तरी दिवाणचे गुनेगार गोताचे अन्याई. लेहून दिली तकरीर. सही छ २६ सेवाल सन सितैन

लोकासी जखमा लागल्या. खराबी बहुत आमची जाहाली. खबर रघोजीने घेतली नाही. तरवार मारली त्याची बकसिसी यावी.

कलम

१ बुरजात घोडी पाडाव करून आणिली. त्या ब।। आंगरे यानी आम्हासी घोडीचा तगादा केला ते समई आम्ही तरवार मारिली आणि खराबी जाहाली त्याचा दाखला परभार लोकाचे मुखे पुरवला. त्यावरून आम्ही अर्ज केला. खावंद अहां. बकसिसी द्यावी. गेली हत्यारे द्यावी म्हणून अर्ज केला. ती गोष्ट खावंद आंगरे यानी मेहरबान होऊन बकसिसीत व हत्याऱ्यात घोडी आम्हासी बकसीस दिली. यैसे असता घोडीचा कजिया रघोजी सांगतो.

कलम

१ बुरजात आमचा पोरगा सावतानी धरून न्हेला. आम्ही रु।। ५० देऊन सोडऊन आणिला. ते रुपये यावे.

कलम

१ हाली केदारजी थोरात व रघोजी नलवडे यानी येऊन

आम्हासी कजिया करून आम्ही
दुराई देत असता आमचा खुन
केला त्याचा जाब करावा.

कलम
८

सदरहू लिहून दिल्हे प्रा खरे
करून देऊ. न देऊ तरी दिवाणचे
गुणेगार गोताचे अन्याई. लिहून
दिली तकरीर. सही छ २५
सेवाल सन सितैन.

हर दो जण वादी यानी करीने लेहून दिल्हे त्यासी गोत नाईकी कयास पहाता साक्षीदार याचा मोझा पाहावासा जाहाला. त्यासी उभयेता वादीयासी विचारणा केली. त्यासी रघोजी नलवडे बोलिल जे सुभानजी प।। चावरेकर व रुद्राजी तोवर या उभयेतासी आणवणे. त्याजवरून जोती संकपाळ याने सुभानजी प।। चावरेकर यानी आपले नावाचा कतबा रु।। २०८ दोनसेहे अटाचा जोती संकपाळ यासी पूर्वी दिल्हा होता तो यैन जिनस दैवासी दाखविला. येणे प्र।। कतबा ——————————————————— बी।।

श्री

राजेश्री जोतजी सकपाळ दाजी
गोसावी यांसी

दे।। बे।। सुभानजी मोहिते पाटील मौजे चावरे रामराम विनंती. उपरी लोकाच्या सिबंदी रु।। दोनीसेहे आठ जाहाले. त्याची निभावणी कोणाच्यान होत नाही. त्यासी आम्ही तुमचे रुपयेचा हवाला घेतला आहे. रु।। २०८ दोनीसेहे आठ वर ते घरासी गेलेवरी देऊ. यासी आंतर पडो देणार नाही. घरासी गेलेवरी खामखा तुमचे रुपयेचा भाग वारून

देऊ. यासी गुजरत नानाजी सिदा वाळवेकर देशमुख व मुशेलमान इभराम खान मिरजकर. हे लिहिले. सही. प्रजापती नाम संवत्सरे कार्तिक मास. लिहिले. सही. निशान कटारी.

या प्र।। जोती संकपाळ यानी कतबा दैवास दखल केला. दैवानी रघोजीस विचारणा केली. कतबेचा मजकूर कैसा काय आहे तो सांगणे. त्यासी रघोजी बोलिला जे कतबा काही चावरेकरानी दिल्हा नाही. थोतांड आहे. यैसे बोलिला. त्याची रघोजीची व जोती संकपाळ याची रुबरु केली. रुबरु होताच उभयता येकमेकासी वाद घालून हर जितीवरी येऊन स्वसंतोषे कतबे लेहून दिल्हे. बी।। त।।

श्री

राजकी पंचाईत दे।। क।। दुधगाव
स्वामीचे सेवेसी

दे।। बे।। जोती संकपाळ पाटील मौजे बाबवडे सु।। सितैन मया व अलंफ. करिणे लिहून दिल्हा कतबा यैसाजे. आम्हात व रघोजी नलवडे यात कतबा रु।। २०८ दोनीसेहे आटाचे कतबेची हारजिती पाडिली. त्यासी सुभानजी प।। चावरेकर याचे मुद (ख) कतबा खोटा जाहाला. तरी रघोजी नलवडेची वाद खरा. आमचा वाद खोटा. हा लिहून दिल्हा कतबा. सही. तेरीख ५. जिलकाद. निशान नांगर.

श्री

राजेश्री पंचाईत दे।। क।। दुधगाव स्वामीचे सेवेसी

दे।। बे।। रघोजी नलवडे पाटील मौजे काला सु।। सितैन मया आलफ. कारणे लिहून दिल्हा कतबा यैसाजे. आम्हात व जोती संकपाळ यात कतबा रु।। २०८ दोनीसेहे आटाचे कतबेची हारजिती पडिली. त्यास सुभानजी पाटील चावरेकर याचे मुखे कतबा खरा जाहाला तरी जोती संकपाळ याचा वाद खरा. आमचा वाद खोटा. लेहून दिल्हा कतबा. सही. तेरीख ५. जिलकाद. निशान नांगर.

याज प्र।। कतबे उभयेता वादी यानी लेहून दिल्हे. उपरांतिक सुभानजी पाटील चावरेकर यासी पत्र पाठऊन थल मजकुरासी आणिले. थलनाईकी त्यासी आज्ञा केली जे रघोजी नलवडे व जोती संकपाळ यामधे नालबंदीचा व घोडिचा कजिया लागला आहे. तुम्ही साक्षीदार आहा. तुमचे नावचा कतवा आहे. त्याचा मा।र कैसा काय आहे तो सांगणे. त्याजवरून त्यानी लिहून दिल्हा. बी।।

श्री

राजश्री थल पंचाईत क।। दुधगाव व स्वामीचे सेवेसी

तकरीर क।। बे।। सुभानजी बिन हणमाजी मोहिते पा।। मौजे चावरे सु।। सितैन मया आलफ. कारणे लिहून दिली तकरीर यैसीजे. रघोजी नलवडे व जोतजी संकपाल या उभयतामधे नालबंदीचा व पाडाव घोडेचा कजिया लागोन तुमचे थलासी निवाडे बा। आले. त्यासी आमचे साक्षीवरी निवाडा येऊन ठरला. त्याजवरून अम्हासी आणविले. आम्ही येऊन तुम्हापाशी हाजीर जाहालेवरी समस्त दैव मिळोन श्री देव याचे देवळी बैसोन आपले बेतालीस स्मरोन क्रीया पुरस्करे जे असले. तुम्ही ज्या प्र।। बोलीचाली लिहिले देऊन जेण प्र।। ते समई जाहाले असेल ते सांगणे म्हणऊन आज्ञा केली. मग आमचे माथा श्री चा तीर्थ अंगारा घातला. ते मस्तकी वंदोन बेतालीस स्मरोन बोलिलो जे रघोजी नलवडे यानी जोतजी संकपाळ याची तैनातीची बोली करून चाकरीस ठेविले. त्यासी तलबा तुली रु।। या पावना म्हणुन जोती संकपाळ याने कटकट केली. तेव्हा आम्ही आपले नावचा कतबा रु।। २०८ दोनीसेहे अटाचा जोती संकपाल यासी आम्ही दिल्हा आहे. तो खरा आहे हे लिहून दिली तकरीर. सही. छ ९ जिलकाद. निशान नांगर.

या प्र।। सुभानजी पा।। चावरेकर याने लेहून दिल्हेनंतर जोती संकपाळ यासी दैवानी आज्ञा केली जे तुजे साक्षीदार कोण अहेती ते आणवणे. त्याजवरून राजाराम यासी आणवले. त्याने आपले इमान पुरवक श्री चा अंगारा घेऊन बेतालिस स्मरोन लिहून दिल्हे. बी।।

श्री

राजश्री पंचाईत गोतगंगा क ॥
दुधगाव स्वामीचे सेवसी

तकरीर कर्द बे।। राजाराम रजपुत मोा मौजे बागिणी दि।। श्रीमंत राजश्री दादा मंत्री सु।। सितैन मया अलफ. कारणे लिहून दिली तकरीर यैसीजे. जोती संकपाल (व) रघोजी नलवडे यामधे पाडाव घोडिचा व नालबंदीचा कजिया लागोन तुमचे थलासी आले. याचा म।।र कैसा काये आहे म्हणून तुम्ही आमचे माथा श्री चा अंगारा घालून जे दखल आसल ते सत्ये स्मरोन सांगणे म्हणोन आज्ञा केली. त्यासी आम्ही आम्ही[1] र।। संभाजी भिलारा याजपासी चाकर होतो. जोती संकपाल रघोजी नलवडे याचपासी चाकर होत. आमचा व जोती संकपाल याचा गोट सेजारी होता. त्यासी मसुरावरी आंगरेत व सावंतात झुंज जाहाले. सावताचा मोड जाहाला. पहिले झुज कुडालावरी जाहाले तेव्हा हत्यार संकपाल याजकडील लोकाची गेली. ते समई संकपाल याने तरवार केली. पोरगा संकपालाकडील सावतानी धरून नेहला. त्यासी रा संकरराव आगरेचा सासरा याने + + + हत्यारे नेली. लोक जखमी जाहाले व कितीयेक खराबी जाहाली आणि जोती संकपाल याने तरवार मारली हे पाहून घोडी बकसीसीत व हत्यार (?) यात व कितीयेक खराबी पाहुन घोडी सकपाल यासी दिली हे आम्हासी दखल आहे. लिहिले प्राा दिव्यानिसी पुरऊन देऊ जरी करता यासी तफावत जाहालीया दिवाणचे गुनेगार दैवाचे अन्याई. लिहून दिली तकरीर. सही तारीख २९ सेवाल. निशान कटारी.

या प्र।। साक्षीदाराचे मोझे मुकाबिले लिहून घेतले. उपराला दैवानी उभयेता वादी यासी विचारणा केली जे कागदपत्र हिसेब कितेह तैनाती जाबिते व रोज मजरेचा हिसेब काही असलिया दाखवणे म्हणून आज्ञा केली. त्यासी रघोजी बोलिला जे कागदपत्र हिसेबकितेह काही

१. मुळातच दुबार

आपणापासी नाहीत. तैसेच जोती संकपाल यासी विचारणा केली तो बोलिला जे तैनाती जाबिता व कागदपत्र हिसेब कितेह आपणापासी काही नाहीत. रा गोपाळराव याचा कागद एक आपणापासी आहे त्या कागदातील अन्वये. बी।।

श्री

राजेश्री जोत्याजी संकपाल गोसावी यासी

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्ने।। गोपाळराव विठल रामराम विनंती उपरी. तुम्हीविसी रघोजी उबाले यानी सांगितले त्याजवरून रुपये १४० एकसेहे च्यालीस पाठविले ते घेऊन लोक वीस पंचवीस घेऊन येणे. रो।। खासेस रु।। १६ व लोकास दर माहे रु।। ८ दर आसामीस येणे प्रमाणे दिवाणातून करार केले आसे. तरी तुम्ही पंचेवीस लोक घेऊन येणे. येथे कोकणात आलेवरी दोनी महिने पदरी घालितो. कलल पाहिजे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

या प्रा जोती संकपाल याने कागद दाखविला. उपरातीक गोत नाईकी उभयेता वादी यासी विचारणा केली जे पाडाव घोडेचा किमती इमान पुरवक सत्ये स्मरोन सांगणे. त्यासी रघोजी नलवडे व जोती संकपाळ इमान घेऊन किमत लिहून दिल्ही बी।।

रघोजी नलवडे बोलिला जे घोडिची किमत रु।। २०० दोनीसेहे हे आपले इमान पुरवक. छ २३ जिलकाद

जोती संकपाळ बोलिला जे घोडिची किमत रु।। १५० दीडसेहे हे आपले इमान पुरवक. छ २३ जिलकाद

उभेयता वादी यांनी घोडिची किमत बेतालिस स्मरोन लेहोन दिल्हे. उपरातिक गोत नाइकी जोती सकपाल यासी विचारणा केली जे सावताती तुमचा पोरगा धरून नेहला त्यासी रु।। ५० पनास देऊन सोडऊन आणिला म्हणून सांगतो हे कसे काये आहे ते सत्ये स्मरोन सांगणे. त्याजवरून जोती सकपाळ बोलिला जे आम्ही काही रु।। ५०

पनास दिल्हे नाहीत. भीडभाड घालून पोरगा सोडऊन आणिला हे खरे. येणे प्र।। जोती संकपाळ बोलिले. उपरांतिक रघोजी नलवडे यासी सभा नाईकी पुरुसीसी केली जे तुम्ही हरजितीचे कतबे लिहून दिल्हे जे सुभानजी पा। चावरेकर याचा कतबा खरा जाहला, तरी आमचा वाद खोटा यैस लिहून दिल्हे होते. त्यासी सुभानजी पा। यासी थल मजकुरासी आणून विचारणा केली. त्यानी क्रिया पुरस्करे कतबा रु. २०८ दोनसेहे आटाचा आपण लिहून दिल्हा आहे खरा यैस दैवासी लिहून दिल्हे ते लिहिले. येन जिनस रघोजी नलवडे यासी दैवानी वाचून दाखविले. उपरांतिक रघोजी बोलिला जे माझे रुबरु सुभानजी पाटलानी लिहून दिल्हे नाही. यैस उलटपालट बोलु लागला. आणिखी सुभानजी पाटील व रुद्राजी तोवार यासी थल मजकुरासी आणून आमची त्याची रुबरु समीक्षा पुरवणे. त्याजवरून सुभानजी पा। व रुद्राजी तोवार यासी मागती थल मजकुरासी आणविले. रघोजीने केदारजी थोरात यासी घेऊन आले. उपरांतीक रघोजी नलवडेसी दैवानी आज्ञा केली जे सुभानजी पा। व रुद्राजी तोवार आले आहेती. तुमची अशेंका मनामधे जे काये आहे ते आमचे विदमान पुरऊन घेणे. त्याजवरून केदारजी थोरात व रुद्राजी तोवार व सुभानजी पा। हे त्रिवर्ग व रघोजी नलवडे व रघोजीचा बाप यैस एकत्र करून सुभानजीस आज्ञा केली जे कतबेचा मा।र पूर्वी तुम्ही थल मजकुरी क्रिया पुरस्करे रु।। २०८ दोनसेहे आटाचा कतबा आपले नावे जोती संकपाल यासी लिहून दिल्हा आहे यैस लिहून दिल्हे आहे. त्याचा अशेंका रघोजीने घेतली आहे. आमचे विदमाने रघोजीचा अशेंका पुरऊन देणे. त्यासी सुभानजी पा। व रुद्राजी तोवार यानी रघोजीस सांगितले जे जोती संकपाल यासी दोनीसेहे आटाचा कतबा दिल्हा हा खरा. तुम्ही लटका अशेंका घ्यावी यैस नाही. त्याजवरून दैवानी रघोजीस विचारणा केली जे तुझी अशेंका आणिखी काही आहे की काय. त्यासी तो बोलिला जे आमची काही अशेंका नाही. तुम्ही गोतगंगा आहा. ज्या प्र।। निवाडा करून द्याल त्यासी रजावंद असो. त्याजवरून जोती संकपाल व रघोजी नलवडे उभयता वादी यासी आज्ञा केली जे खुंटीतपत्र व खुंटीत

जमान आणून देणे. त्यावरून उभयेता वादी यानी आपले स्वसंतोसे खुंटीतपत्र लिहून दिल्हे. बी।।

श्री

राजश्री समस्त दैव क।। दुधगाव
स्वामीचे सेवेसी

खुंटितपत्र बे।। जोती बीन सटवोजी संकपाल प।। मौजे बांबवडे सु।। सितैन मया अलफ. कारणे लिहून दिल्हे खुंटितपत्र यैसजे. आम्हामधे व रघोजी नलवडे यामध्ये नालबंदीचा व पाडाव घोडेचा व कितियेक कजिया लागोन निवाडे ब।। तुमचे थलासी आलो. यासी थली राजीनामे व जमान कतबा व करीने लेहून दिल्हे. नंतर दैवानी आज्ञा केली जे साक्षे मोझेकरी कोण आहेती सांगणे. त्यावरून साक्षीदारही सांगोन आणविले. त्यानी साक्षी मोझा देणे तो तुम्ही पुरऊन घेतला आहे. या उपरी आमचे बोलणे अगर साक्षे मोझे अगर कागदपत्र कांही नाहीत, जे होत ते लिहून दिल्हे. साक्षीदारहि रुजु केले. यापरते आम्चे बोलणे आजीपासून खुंटले. तुम्ही दैव ज्या प्र।। निवाडा करून द्याल तेणे प्रमाणे वर्तणूक करूं नवदिगर करु तरी दिवाणचे गुनेगार गोताचे अन्याई. ही लिहून दिल्ही खुंटितपत्र. सही.
छ १ माहे जिल्हेजे. निशान नांगर.

श्री

राजश्री समस्त दैव क।। दुधगाव स्वामीचे सेवेसी

खुंटितपत्र बे।। रघुजी बिन रुद्राजी नलवडे प।। मौजे काला सु।। सितैन मया अलफ. कारणे लिहून दिल्हे खुंटितपत्र यैसेजे. आम्हामधे व जोती संकपाल या मध्ये नालबंदीचा व पाडावे घोडेचा व कितेयेक कजिया लागून निवाडेबद्दल तुमचे थलासी आलो. त्यासी थली राजीनामे व जामीन कतबे व करीने लेहून दिल्हे. नंतर दैवाने आज्ञा केली जे साक्षे मोझेकरी कोणे आहे ते सांगणे. त्यावरून साक्षीदारहि सांगोन

आणविले. त्यानी साक्षेमोझा देणे तो तुम्ही दैवानी पुरऊन घेतला आहे. या उपरी आमचे बोलणे आगर साक्षी मोझा आगर कागदपत्र काही नाहीत. जे होत ते लिहून दिल्हे. साक्षीदारहि रुजू केले. या उपरते आमचे बोलणे आजीपासून खुंटले. तुम्ही दैव ज्या प्र॥ निवाडा करून चाल तेणे प्र॥ वर्तणूक करू. नवदिगर करू तरी दिवाणचे गुन्हैगार व गोताचे अन्याई. लिहून दिले खुंटितपत्र. सही.
छ १ जिल्हेज. निशान नागर.

हर दो जण वादी यानी खुंटितपत्र लेहून दिल्हे. उपरातिक गोत नाइकी उभयेता वादी यासी आज्ञा केली जे खुंटीत जमान देणे. त्यावरून उभयेतानी खुंटीत जमान दिल्हे बी॥

श्री

राजश्री समस्त दैव क॥ दुघगाव स्वामीचे सेवेसी

खुंटित जमान कतबा बे॥ देवजो बिन बहिरुजी पा॥ दिंडे मौजे नेरले सु॥ सितैन मया अलफ. कारणे लेहून दिल्हे खुंटित जमान कतबा यैसाजे. जोती संकपाळ व रघोजी नलवडे या मधे घोडेचा व नालबंदीचा कजिया लागून निवाडे ब॥ तुमचे थलासी आले. त्यासी तुम्ही उभयेतासी जमान मागितले जे दैव ज्या प्र॥ निवाडा करून सांगतील तेणे प्र॥ वर्तविल्यास जमान मागितले. यैसियास जोती संकपाल यासी आम्ही जमान असू. जेणे प्र॥ निवाडा करून सांगाल तेणे प्र॥ जोती संकपाळ वर्ततील. जरी करिता न वर्तता नवदिगर केलिया आम्ही वर्तऊ यासी आंतर होणार नाही. हा लिहून दिल्हा खुंटित जमान कतबा. सही.
छ १ माहे जिल्हेज. निशान नागर.

श्री

राजश्री समस्त दैव क॥ दुघगांव स्वामीचे सेवेसी

खुंटीत जमान कतबा बे॥ नरसोजी बिन कळसोजी मोरे पा॥ मौजे इटकर का॥ अस्टे पा॥ मिरज सु॥ सितैन मया अलफ. कारणे

लिहून दिल्हा खुंटित जमान कतबा यैसाजे. रघोजी नलवडे व जोती संकपाल या उभयतामधे घोडेचा व नालबंदीचा कजिया लागोन तुमचे थलासी आले. त्यासी तुम्ही उभयेतासी जामीन मागितले जे दैव ज्या प्र।। निवाडा करून सांगतील तेणे प्र।। वर्तावियासी जमान मागितले. येसीयासी आम्ही रघोजी नलवडे यासी जामीन असो. जेणे प्र।। निवाडा करून सागाल तेणे प्र।। रघोजी नलवडे वर्ततील. जरी करीता न वर्तता व नवदिगर केलीया आम्ही वर्तऊ यासी आंतर होणार नाही. हा लिहून दिल्ह खुंटित जमान कतबा.
सही. छ १ माहे जिल्हेज. निशान नांगर.

येणे प्र।। उभयेता वादी यानी खुट जमान दिल्हे वरी समस्त गोत नाईकी मिळोन कयास घ्यानासी आणिता करिन्यातील झाड पछाडी साक्षीदार याची साक्षी पाहाता सुभानजी प।। चावरेकर यानी आपला कतबा रु।। २०८ दोर्नासेहे आटाचा जोती संकपाळ याचे तैनाती पैकी दिल्हा यैसी पुरंवणी जाहाली. जोती संकपाळ याचा पोरगा सावताती धरून नेहला होता, त्यासी रु।। पनास देऊन सोडऊन आणिला येस जोती संकपाळ याने लिहून दिल्हे होते. त्यासी क्रिया पुरस्करे रु।। दिल्हे हे खरे काये यैस विचारले. त्यासी त्यानी सांगितले. जे आमचे सोइरे अप्तेविसी सावताकडे होत. भीडभाड घालून पैका न देता सोडविला. रु।। पनास दिल्हे म्हणून लेहून दिल्हे होते ते कलम उडाले. हत्यार डागिने तेरा जुजात जोती संकपाळ याजकडील लोकांची गेली ती रघोजी नलवडे याजकडून उगवली नाहीत. लोकानी जोती संकपाल याजपासून घेतली. तरवार मारली त्यासी बकसिसी रघोजीने दिली नाही. घोडे पाडावे जोती संकपाल याने केले ते जोतीकडे होत. त्याची किमत जोत्याजीस विचारली. त्याने सांगितले जे दीडसेहे रुपये पावतो किमत सांगितले. तैसेच रघोजी नलवडे यासी घोडिची किमत क्रियापुरस्कर विचारणा केली. त्याने इमानपुरवक सत्ये स्मरोन सांगितले जे घोडिची किमत रु।। दोनिसेहेचा माल होता यैसे सांगितले. जोती सकपाळ यासी विचारणा केली जे घोडी कोठे आहे. त्यासी घोडी दैवानी पाहावी + + + + + + + पावली. त्याची किमत रघोजीचे मुखे रु।। दोनीसेहे

थरावेले. +++ ++ + +++ ++ पडिली घोडी सरकारातून उगऊन यावी ती बुडाली. यैस रघोजीने लेहून दिल्हे आहे. याचा मजकूर जोती संकपाळ याने सांगितला जे रघोजीने पाचसेहे लोकाची नालबंदी घेऊन आले होते. त्यासी बोली प्र॥ लोकाची पुरवणी जाहाली नाही. हाजरीस लोक तिनसेहे पुरवले दोनीसेहेची नालबंदी रघोजीकडे तैसीचे राहिली. त्यासी ख़लबेविसी रघोजीने सरकेले यासी कटकट केली आणि पाडिली घोडी ४ च्यारी द्यावी आणि लोकाची नेबत द्यावी यैसा दंगा केला. तेव्हा सरकेले यानी (सांगितले) तीनसेहे लोकाचा हिसेब येक महिना वीस रोज़ाचा करून येक महिना नालबंदी पहिलेचे पावली आहे. विसा रोजाची नेबत व पडिली घोडी च्यारी मागता तरी दोनी-सेहे लोकाचे नालबंदीचा यैवज तुम्हाकडे जाजती असोन नेबतीचे रुपयेचा व पडले घोडेचा कजिया काये समजोन करिता नालबंदीचा यैवज जाजती आहे. तुमची नेबत व पडिली घोडी च्यारी त्या यैवजी उगऊन यैवज जाजती होईल यैस सरकेले यानी रघोजीची समजाविसी केली. रघोजीने सेरा लेहून दिल्हा. दर असामीस दरमाहे लोकासी रु॥ ७ सात व खासा दर माहे रु॥ १४ या प्र॥ लेहून दिल्हे आहे. त्याचा शोध पाहाता रो गोपाळराव विठल याचे पत्र जोती संकपाल यासी रघोजीने पाठविले. त्यात सेरा दर माहे दर अ॥ लोकासी रु॥ ८ आठ व खासा दर माहे रु॥ १६ सोळा यैसा दाखला पत्रावरून पुरवला. चाकरीचा शोध पाहाता जोती संकपाळ याने दोनी माहे रोज १२ बारा चाकरी केली यैस करार जाहाले. त्यावरून दैवानी निवाडा केला बी॥

रघोजी नलवडे यानी जोती संक-पाळ यासी नोकर ठेविले खासा १ दर माहे रु॥ १४ व लोक असामी २० वीस दर माहे रु॥ ७ सात प्रा ये॥ आ सुमार २१ दर माहे रु॥ १५४ मुदती माहे २ पैकी वजा रोज १० बाकी माहे १ रोज

जोती सकपाळ असामी २१ दर अ॥स दर माहे रु॥ ८ आठ खासा दर माहे रु॥ १६ सोळा ये॥ दर माहे रु॥ १७६ ये॥ मुदती माहे २॥। पावणे तिनी पैकी वजा रोज १० बाकी माहे २ दोनी रोज १२ पैकी वजा

२० वीस ये।। कबज रु।। २५६।।
पैकी आदा रु।।

१५४ नालबंदी
 १५ रोजमारा
——
१६९

बाकी देणे रु।।
८७।। येक रुजुवात
३७ गोपाळराव विठल याचा कागद जोती संकपाळ यासी रघोजीने चाकरीस ठेविले ते समई रघोजीने दर आ।। रु।। सेरा रु।। ८ आठ व खासा दर माहे रु।। १६ या प्र।। पूर्वीचा कागद दिल्हा होता त्यामुले रु।।
५८।। लोकाचा जमाव व लोकमार्गी जाता रोज १२ लागले. वजा रोज २ बाकी करार रोज १० दर माहे रु।। ८ प्र।।
——
१८३

दरबार सिरस्ता दर माहा रोज १२ बाकी करार माहे २ येकून कबज रु।। ३५२
पैकी अदा रु।।

१५४ नालबंदी
 १५ रोजमरा
——
१६९

बाकी रु।। रघोजीने घ्यावे
रु।।
१८३
वासीलाती पाडावे घोडे बा।। रु।।२०० दोनसेहे बाकी ० फाजील जोतजी सकपाल याने रघोजी नलवडेसी घ्यावे
रु।।
१७

जोती संकपाळ यासी द्यावे
त्यासी घोडे ब।। रु।। दोनीसेहे
पैकी वजा रु।। १८३ येकसेहे
त्र्यायेसी बाकी देणे ० जोती
संकपाळ याजकडून रघोजी
नलवडेसी फाजील बाबत द्यावे
रु।। १७

येणे प्रा निवाडा करून दिल्हा आसे. वरकड करीत्यातील कलमाची झाडफेक पाहाता मोझा मोका दिल्याचा शोध पाहिला. परंतु काही थाक दिसून येत नाही. त्यामुळे कलम उभयेता वादीयाची हातील यैस दिसोन आले. जोती सकपाल यांनी रघोजी नलवडे याजकडे तलबाविसी व हत्याराविसी व बकसिसीविसी खुनखराबीविसी कालकाला कजिया करावियासी समध नाही. रघोजी नलवडे यानी जोती संकपाळ यासी पाडाव घोडेविसी पडिली घोडी व बुडाली तैनातीविसी व चाकरीविसी कालकाला कजिया कराविशासी गरज नाही. सदरहू प्रा निवाडा करून असावे. यास उभयेतातील जो कोण्ही नवदिगर करील तो दिवाणचा गुनेगार गोताचा अन्याई. लिहून दिल्हें निवाडपत्र. सही. तेरीख १२ माहे जिल्हेज.

---

**क्रमांक : १४०** **दि. १३–९–१७५९**

शंकराचार्यांच्या मठास सरकारातून मिळालेल्या जमिनीपैकी मळीची जमीन दुसरीकडे लावून दिली गेली यास्तव संभाजी दुसरे यानी सदरची जमीन मठाकडे चालवावी अशी शिवाजी बल्लाळ यास दिलेली ही ताकीद आहे.

### शंकराचार्य

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ८६ प्रमाथीनाम संवत्सरे भाद्रपद बहुल सप्तमी गुरूवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजमान्य शिवाजी बल्लाळ यास आज्ञा केली ऐसीजे. वाडी कोपेश्वर कर्यातं जुगुल प।। हुकेरी हे वाडी जमीन चावर ४।।

साडेचार सुधा श्री स्वामीकडे पेषजीपासोन इनाम चालत असता वाडी मजकूरपैकी मळ्या जमीन काही कसबे जुगुलाकडे लावोन श्री—— कडे वसूल देत नाही म्हणून विदित जाले. आशास श्री——स धर्मकृत्या-निर्मात्य राज्यांतून दत्त आहे. त्याचा आपाहार केलेयाने श्रेयस्कर आहे ऐसे नाही. साडेचार चावरामध्ये मळ्या आहेत खेरीज नाहीत या करिता मळ्या श्रीकडे वाडी निसवत स्वाधीन करून देणे. श्री—— स्वामीच्या आज्ञेने मळ्याची कीर्द कमाविसी होऊन उतरोतर शिश्य परंपरेने श्रीच्या मटाकडे इनाम चालेल. फिरोन ये विसीचा बोभाटा हुजुर येऊ न देणे. जाणिजे. बहूत काय लिहिणे.

---

**क्रमांक : १४१** दि. २३-१०-१७५९

अण्णाजी नाईक साठम याना सर पाटीलकी वतन आदिलशाही काळात होते. त्याचा काही तपशील या कागदात आहे.

यादी इनामपत्रे राजश्री अनाजी माईक साठम छ १ माहे रबिलावल मुकाम पुणे सु॥ सन सितैन मया व अलफ.

सरपाटीलकी वतने यासी पत्रें —————— पारसी पत्रें

अल्लीइदलशाही व विजापूर सन वर्षे १०७६

पत्र पारसी इदलशाही गांव-गन्ना कुडव तर्फ साळसी ।· बांदिवडे बुजुर्ग

बाग एक आडवली व वाडी सांडवे सेत काडे मौजे गोठणे वाग नारळ मौजे आडवली नजीक सैतानकोंड गादीतंबाकू मौजे श्रावण मौजे सांडवे

जकातीस पतके यासी

२

विश्वा मौजे

सांडवे व मार्ग बेळणे

झाडा रोखा बे॥ प्रतापजी घोरपडे सु॥ सलास आशेरन मया आलफ. गु॥ रवेलजी प॥ नरुणकर छ ४ जमादिलावल–

४५ सेत कीर्दी जमीन ८८ विघे सनद रा॥ राऊ प्रतिनिधि वजा दिल्हे ०५ बाकी ८३

० दर बिघा रु॥ १५ प्रमाणे

---

३२ गु॥ वा वजा
२३ नगद
६ बैला ब॥
३ गाई

---

३२

३ सोडी ब॥
१० सिवाजीपंत नगद दिल्हे

---

४५

बाकी ० झाडा रोखा सही

ब॥ रुद्राजी माहादेव
कुलकर्णी

निशाण तलवार

---

**क्रमांक : १४२** **दि. १६–११–१७५९**

" मनसुबी लवकरच होईल, तुम्ही तयार होऊन येणे " म्हणून सदाशिवराव भाऊ यांचे अण्णाजी नाईक साठम यांस पत्र.

श्री

श्री
राजा शाहू
नरपती हर्ष
निधान बाळाजी
बाजीराव
प्रधान

राजश्री अनाजी नाईक साठम गोसावी
यासी

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने।। सदाशिव चिमणाजी आशिर्वाद. सुरु सन सितेन मया व अलफ. तुम्ही विनंतीपत्र पाठविले प्रविष्ट जाले. मनसबी लवकर करावयासी आज्ञा दिनकरपंतास जाहली पाहिजे म्हणून तुम्ही पत्री लिहिले ते विदित झाले. त्यावरून दिनकर महादेव यास पत्र लिहिले आहे. मनसबी लवकरच होईल तुम्ही तयार होऊन येथे येणे. जाणिजे. छ. २५ रबिलावर. बहुत काय लिहिणे. (लेखन सीमा)

क्रमांक : १४३ दि. २८-११ १७५९

सातपा सुल्ताना याचे महिपतराव घोडपडे यास 'फारिखत' की, चाळीस रुपये वडिलानी घेतले ते हिशेबासकट पावले.

श्री मीं प्र॥

राजेश्री महिपतराऊ घोरपडे
देसमुख प्र॥ वाळवे गोसावी यासी

फारीखत बे॥ सातपा सुलताना मो वडगाव सु॥ सितैन मया आलफ. कारणे लिहून दिल्हे फारिखत यैसेजे. रो रोपाजी खाटिकाचे विद्यमाने रा। तीर्थरुपने रु॥ ४० च्याली(स) घेऊ(न) गेले होते ते हिसबासुदा पावले. हे लिहून दिल्हा फारिखत. सही. छ.७ रबिलाकर. कतबा असल तरी तो रद आसे.

गाही

१ कृष्णराऊ यादव मौजे सावर्डे
प्र॥ कराड

१ नरसूपा गाड बालल

---

रा॥ बयाजी बाळाजी कुलकर्णी मौजे
सावर्डे प्र॥ कराड ———

**क्रमांक : १४४** इ. स. १७५९-१७६०

यशवंतराव सर्जेराव घाटगे यांचे वतीने पेशव्यास सादर केलेला हा घाटगे घराण्याचा करीणा आहे. वडील भावाने कारभार करण्याची चाल या घराण्यांत होती. त्या चालीनुसार मयत बंधूच्या पश्चात कारभाराचा अधिकार आपला, असे यशवंतराव घाटगे यांचे म्हणणे आहे.

श्रीमंत राजश्री पंतप्रधानसाहेब

साहेबाचे सेवेसी

करीना बेसमे यशवंत सर्ज्याराव घाटगे देशमुख प्रांत कागल सु॥ सितैन मया आलफ. लिहून दिल्हा करीना यसाजे. वडीलपणाची चाल आपले तीर्थरुपापासून चालत आली. आपले पिते तीर्थरुप पिराजी बावा होत. त्यासमई देशमुखी व दौलत करीत होत. त्याचे पोटी पुत्र पाच ५. वडील पुत्र राणोजी बावा. त्याचे पाटीचे बंधु विठोजी बावा. त्याचे पाटीचे आबाजी बावा. त्याचे पाटीचे तुळजोजी बावा. त्याचे पाटीचे आपण येशवंतराव. येणेप्रो पाच जण बंधू होतो. त्यास तीर्थस्वरुपाचे देहआवसान जाहाले समई वडीलपणाची पद्धत त्याणी सांगितली. त्यासमई आमची मातुश्री व शरीरसंमंधी ग्रहस्त येक दुसरे व सेवक यक दुसरे होते. वडील पुत्र जे आसतील त्याणी वडीलपण करावे. त्याचे आज्ञेत सर्वत्रानी राहुन जोपर्यंत पुत्र आहेत तोपर्यंत पुत्रानीच वडीलपण करावे याप्रो आज्ञा करून त्यानी देह ठेविला. मग वडील राणोजी बावा याणी वडीलपण केले. त्याचे पोटी पुत्र सुभानराव होते. राणोजी बावाचे देहावसान जाहलेनंतर मग विठोजीबावा याणी वडीलपण केले. त्यासमई सुभानराव होते. त्यास थोडा बहुत तनखा देऊन त्याचे चालविले. विठोजी बावाचे पोटी पुत्र नाही. विठोजी बावाचे देहावसान जाहले. उपरांतिक आबाजीबावा याणी वडीलपण केले. त्यासमई सुभानराव होते. आबाजी बावाचे देहावसान झाले. उपरांतिक तुळजोजी बावा याणी वडीलपण केले. त्या समई सुभानराव होते. त्याचेही देहावसान जाहले. त्यास चार वरसे जाहली. त्याचे पोटी पुत्र चार वर्षाचा होता. त्यास देवी येऊन मृत्य आला. याप्र॥ चाल चालत आली. आसे आसता

चिरंजीव राणोजी बावा याणी तुळजोजी बावासी कजिया मांडिला. उभयेताही श्रीमंतासंनीध आले. सेवट कजियामधेच तुळजोजी बावाचे शरीरास आवकाश नाहीसे जाहले. हुसमाची आज्ञा (?) घेऊन घरास येत असता मार्गी भोईजेस देहावसान जाहले. सांप्रत आम्ही येशवंतराव आसेतोपर्यंत वडीलपण आम्ही करावे म्हणजे वडिलाचे आज्ञेप्रमाणे चाली चालत आली. वडिलाचे पोटी पाचजण पुत्र येथा आनुक्रमे चवघे बांधवाचे पोटी पाचजण पुत्र येथा आनुक्रमे चवघे बांधवानी आनभविले. त्याप्रमाणे आम्ही आनभवावे. उपरांतिक आमचे माघारे वडील आसतील त्याणी करावे. यणप्र।। चाल चालत आली आहे. हे लिहून दिल्हा करीना. सही तेरीख छ

---

दि. २४–२–१७६०

**क्रमांक : १४५**

वाडीकरांचा गवसे गाव त्याना परत करावा, सिरगावची वळवून नेलेली गुरे त्या गावाला परत करावी व कुणाचा पैसा घेतला असल्यास तोही परत करावा, म्हणून नानासाहेब पेशवे यांचे राणोजी घोरपडे यांना पत्र.

तालीक

श्री

राजश्री राणोजी घोरपडे सेनापती गोसावी
यास

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य—— स्नेही बाळाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद विनंती. उपरी येथील कुशल लिहित असिले पाहिजे. विशेष पे।। चांधगड राजश्री लखम सावंत याजकडे आहे. त्यास पे।। मजकूर पै।। गवसे गाव तुम्ही घेतला आहे व सिरगावची गुरे वळून नेली म्हणोन कळले. येशास तुमचा काही कज्या नसता याचे गावास उपसर्ग करणे उचित नाही. तरी

गवसे गाव घेतला तो देणे व सिरगावची गुरे नेली ती देणे. पैका घेतला तो देणे. गैरवाजवी न करणे. र।। छ ६ रजब. बहुत काय लिहिणे. लोभ असो दीजे हे विनंती. मोर्तब सु(द)

| बाळाजीचा शिका | सितैन पाहिजे | पे।। छ २९ माहे रजब सन सी (तैन) मया व अलफ शके १६८१ प्रमाथी संवत्सर |
|---|---|---|

---

**क्रमांक : १४६** दि. ४-३-१७६०

सुभानजी जाधव व बाबाखान मोमीन या दोघांमध्यें मौजे सावर्डेच्या पाटीलकीबद्दल तंटा लागला होता. तो अर्जोजी यादव यानी पंचायत भरवून व आजूबाजूच्या गावच्या लोकांच्या साक्षी घेऊन सोडविला. पाटीलकी सुभानजी जाधव याची होऊन बाबाखान मोमीन खोटा ठरला.

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८६ प्रमाथीनाम संवत्सरे फाल्गुण बहुल त्रितिया भोमवासरे क्षत्रिये कुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजेमान्य राजश्री खंडेराव यादव हवालदार दि।। दरूनी यासी आज्ञा केली ऐसीजे. सुभानजी बिन मुरारजी जाधव पाटील मौजे सावर्डे प्रांत कऱ्हाड हा मौजे म।।रचे पाटीलकीचे वतन अनभवित असता बाबाखान मोमीन रया मौजे म।।रचे याणे आपली पटीलकी म्हणून हयाल जाला. त्यावरून ठाणे वडगावचे मु।। अर्जोजी यादव हवालदार याणी हर दूजणास आणून वाजपुसी करून जमान कतबे घेऊन मौजे हिंगणगाव त।। आऊद या थलास लाऊन दिल्हे. हर दूजण थली जाऊन राजिनामे व जमान कतबे व खुटपत्रे घेऊन मनसुबी जाली. उभे पांढ-रीचे साक्षीनिसी व भोवर गावीचे दाखले पाहून मनसुबी रास्ता पंचाईत मते निवाडा जाला. मोमीन म।।र यासी आधार आश्रा काये

नाही. गावची रयेत असे उभे पांढरीचे व भोवर गावीचे पंचाइताचे साक्षीने होऊन जाधव म।।र पुरातन पाटील खरा जाला. त्यावरून मौजे म।।रचे व अवांतर गावीचे पंचाईत मिळोन देशकाचे सडीचा म।।र मनास आणून थलपत्र करून दिल्हे आणि ठाणे मजकुरास आर्जोजी यादव यासी॰ पंचाइतानी पत्रे देऊन पाठविले. त्यावरून याचे माथा सेरणी ठेऊन पटीलकी याची खरी करून अनभवणे म्हणून सांगितले. त्यावरून जाधव म।।र वतन अनभऊ लागला. परंतु सरकारची सेरणी दिली नाही याबदल यासी हुजुर करवीरचे मु।। आणून तुम्ही प्रांत मजकूरचे देसाई याकरिता तुमचे विद्यमाने यासी मौजे म।।रचे पाटील-कीचे वतन करार करून दिल्हे असेत.

———————————————— बी त।।

| ——— किता कलमे | ——— किता कलमे |
|---|---|
| १ होळीची पोळी | १ भेटीस नारळ |
| १ नागर | १ हक सिरस्ता प्र।। |
| १ पडद | १ कळस |
| १ बायजमा | १ सवासीण |
| १ मोही सिरस्ते प्र।। | १ राहट्या म्हार |
| १ वेटवा | १ भावईचा दिवा |
| १ मो(ह)तर्फा कुळास | १ पानमान तश्रीफ |
| १ रतीब तेल वजन | —— |
| —— | ७ |
| ८ | ८ तेरीज |
| | —— |
| | १५ |

येकून कलमे पंधरा होळीची पोळी व नागर व पडद व बायजमा व मोही सिरस्ते प्रा वेटवा व मो(ह)तर्फा कुळास व रतीब तेल वजन भेटीस नारळ व हक सिरस्ता प्रा व कळस व अहेव सवासीण व राहाट्या म्हार व भावईचा दिवा व पानमान तश्रीफ करार करून

पाटील मा।र याचे स्वाधीन मौजे मजकूरची पाटीलकी केली असे. तरी तुम्ही सदरहूप्रमाणे कानूकाईदे व मौजे मा।रचे पाटीलकीचे वतन पाटील मजकूर यासी व याचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने चालऊन याचे हातोन वतनाची सेवा घेत जाणे. प्रतिवर्षी ताजा सनदेचा उजूर न करिता याची तालिक घेऊन असल पत्र भोगवटियास परतोन देणे.[1] जाणिजे. बहुत काय लिहिणे ——————

मर्यादेय
विराजते

---

**क्रमांक : १४७** **दि. ३–४–१७६०**

यज्ञेश्वर दीक्षित आठले यांच्या विनंतीवरून ताराबाईंनी त्यांना मौजे नेरले येथे दोन चावर जमीन दिल्याचे कृष्णाजी त्र्यंबक याचे हे पत्र आहे. पंतप्रधान व प्रतिनिधी यानीही मान्यतादर्शक पत्रे दिली असे यात म्हटले आहे.

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री येज्नेस्वर बिन विनायक दीक्षित उपनाम आठले स्वामीचे सेवेसी

सेवक कृष्णाजी त्र्यंबक आजाहृत देशमुख व देशपांडे व देशचौगुले प्रां।। कराड कृतानेक नमस्कार व अनुक्रमे दंडवत विनंती. सु।। सितैन मया व आलफ. तुम्ही शाहुनगर नजिक किल्ले सातारा येथे श्रीमंत मातुश्री आईसाहेब याजपाशी विनंती केली की आपण कुटुंबवछल योगक्षेमास जमीन दिलीया स्नानसंध्यादि शटकर्मे आचरोन राज्यास कल्याण चिंतू. त्यावरून साहेब तुम्हावरी कृपाळू होऊन मौजे नेरले प।। मा।र येथे इनाम नूतन जमीन चावर २ दोन नेमोन देऊन पत्रे करून दिली आहेत व श्रीमंत राजश्री प्रधानपंत याची पत्रे व श्रीमंत राजश्री प्रतिनिधि याची पत्रे सादर आहेत त्याजवरून

---

१. याच आशयाची पत्रे संभाजी दुसरे यानी भवानराव गंगाधर देशमुख व देशपांडे प्रांत कऱ्हाड व मोकदम मौजे सावर्डे यास याच तारखेस लिहिली आहेत.

तुम्हास हे पत्र करून दिले आहे. तरी सदरहू जमिनीचा उपभोग तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन सुखरूप राहणे. छ. १५ रजब* बहुत काय लिहिणें. हे विनंती.

मोर्तब सुद बार

१० 
श्री कृष्णाजी
त्र्यंबक

---

क्रमांक : १४८ दि. ५-३-१७६०

करवीरकरांच्या सैनिकानी शिराळे प्रांतात शिरून दंगल माजविली म्हणून कृष्णाजी त्रिंबक याने नानासाहेब पेशव्यांस लिहिले होते. पेशव्यांनी उत्तर पाठविले की, कुमक पाठविली आहे. जशास तसे उत्तर द्यावे.

श्री

राजश्रीया विराजीत राजमान्य राजश्री कृष्णाजी त्रिंबक स्वामी गोसावी यासी.

पोष्य बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे. विशेष तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहले.

---

* अक्षर वळण वेगळे.

सिराले प्रांत उदवस जाला. करवीरवासी याचे दिडसे दोनसे प्यादे व दहा वीस राऊत आले ते रा।। सिवाजी बलाळ याणी वारणेहून कलक व लाकडे आणिल्या आहेत त्या नेऊ लागले. याजकरितां गोपाळजी भोसले याजकडून सेटयाजी खराडे याणी आम्हाकडून राऊत प्यादे घेऊन गेले. त्याची याची कटकट जाली. त्याकडून व इकडून माणसे जाया जाली. आम्हाजवळ सरंजाम नाही यास्तव रा।। माधवराव यास लिहिले आहे. गडाखेरीज करून मुलुख वोस जाला म्हणून लिहिले ते कळले.

रा।। सिवाजी बल्लाळ याचे वेलु व लाकडे मागलेकरांनी नेली. दोनसे जोडी लाऊन नेली. त्यास नेऊ न द्यावी. सिवाजी बल्लाळ याचा शद्ब लागेल म्हणोन सर-हदेस गेले व समंजस बोलत असता गोळ्या अहीलोजी यादव याणी टाकून माणसे जखमी केली. म्हणोन ली।।

सिराले प्रांताची गुरे नागावा याणी (त्याणी ?)नेला असेल तो +++ माघारा घेणे व त्याचे मुलकातील तुम्ही आणिली असेल ती देणं म्हणून आज्ञा. आज्ञे प्रो। सिरालियात राऊत गडदी ठेविले आहेत. त्यास ताकीद उपद्रव न करावा ऐसी केली आहे. त्यास याचे मुलकातील नागावा आम्ही आणिला नाही. सिराले प्रांतीचे पाच सात गाव उठून गेले आहेत. त्याचा नागावा त्याजवळ मागत असता देत नाहीत. पाच हजार रुपये मागतात म्हणून लिहिले ते कलले.

ऐशास तुम्ही तीनी मजकूर लिहिले ते कळले. तुम्ही समजंस बोलत असता ना दक्कत अहिलोजी यादव याणी गोळ्या टाकून माणसे जखमी केली. आम्ही कजीया केला नाही. त्याजकडूनच जाले म्हणोन तपसिले

लि।। ते कळले. तुम्ही समंजस रीतीने बोलत असता कजीया करितात, आगलिक करितात. चिंता काय, तुम्ही मर्यादा करणे गारदी तुम्हाकडे पाठविलेच असेत. तुम्ही अत:पर मोबदला करणे. जाणिजे. छ. १६ रजब. सु।। सीतैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती. पै।। छ. २७ रजब.

---

**क्रमांक : १४९** **दि.६–६–१७६०**

सुबराव शिंदे मनोळीकर यांचे निधन झाले असल्याने त्यांच्या सरंजमापैकी सतिगरे ही कर्यात राणोजी शिंदे यांना दिली आहे. म्हणून नानासाहेब पेशवे यांचे देशमुख व देशपांडे कर्यात सतिगरे यांस आज्ञापत्र.

श्री

श्री
राजा शा
हू नरपति
हर्ष निधान बा
ळाजी बाजीराव
प्रधान

म।। अनाम देशमुख व देशपांडे कर्यात सतिगरे पो। मजकूर सरकार तोरगल यासी बाळाजी बाजीराऊ प्रधान सु।। ईहिदे सितैन मया व आलफ. कर्यात मजकूर सुबराऊ सिंदे मनोळीकर याजकडे होती. त्यास साल गु।। म।।रनिले मृत्य पावले. याजकरीतां त्याजकडून दूर करून हाली राजेश्री राणोजी सिंदे याजकडे करार करून सरंजाम दिल्हा असे. तर म।।रनिल्हे यासी रूजु होऊन अमल दरोबस्त वसूल सुरळीत देणे. क।। मजकूरचे ठाणे म।।रनिले याचे हवाल करणे. जाणिजे. छ २१ सवाल आज्ञा प्रमाण.

सिका
लेखन
सीमा

---

**क्रमांक : १५०** दि. १०-६-१७६०

सुरराव यादव हवालदार यांचा मौजे सावर्डे या गावचा त्यांच्या तक्षिमेचा वसूल त्याना मिळत नाही अशी तक्रार आहे. तरी तो त्यांच्याकडे सुरळीतपणे पावता करावा, म्हणून महाराणी जिजाबाई यांचे मोकदम मौजे सावर्डे यास पत्र.

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री जिजावाईसाहेव याणी त।। मोकदमानी मौजे सावर्डे यास आज्ञा केली यैसीजे. सु।। ईहिदे सितैन मया अलफ. मौजे मजकूरपैकी यैवज राजश्री सुरराव यादव हवालदार याजकडे तक्षमेप्रमाणे पावत नाही. याजवरून आज्ञापत्र सादर केले असे. तरी ज्यापासून याचा गुंता राहिला आसल त्याप्रमाणे सालासाल आकार ब।। यैवज याचे तक्षमे प्र।। पावित करणे. ज्याचा त्यास साल दरसाल हिसेबाप्रमाणे यैवज पावित करीत जाणे. सेते ज्याची त्यास येथाविभागे व मळे वगैरे राबणूक प्यादे जवदे व वेठे व म्हार फडफरमाविसी येथाविभागे ज्याची त्यास पावित करीत जाणे. फिरोन बोभाट आलिया कार्यास येणार नाही. या कामास हैवती मोरे खासबारदार पाठविला आसे. यासि मसाला रु।। ५ आदा करणे. याचे गु।। समजाविसी करणे. जाणिजे छ २५ माहे शवल. लेखन सीमा

लेखन
सीमा

---

**क्रमांक : १५१** दि. १०-७-१७६०

चंदनगोंडा पटेल यास अबदागिरी दिली होती. तिच्या खर्चासाठी जमीन देण्यात आल्याबद्दलचे मानसिंगराव सिंदे, हवालदार किल्ले तोरगल यांचे पत्र. हवालदारास अबदागिरीचा मान बहाल करता येत होता हे या पत्रावरून दिसून येते.

श्री व्यंकटेश प्रा

सिका

आज दिवाण सरकार राजमान्य राजश्री मानसिंगराव सिंदे हवालदार किले तोरगल ता चंदनगोंडा पटेल क।। बनूर शके १६८२

विक्रमनाम संवछरे सु।। ईहिदे सितैन मया आलफ. लि।। दिल्हे इनाम पत्र येसाजे. तुजविषयी नाडगीर याणी अर्ज केला जे कां मजकूर पाटील मातबर साहेब कामाचा आहे. साहेबी मेहरबानी होऊन आप्तागिरी द्यावी म्हणोन. विनंती चितास आणोन तुज आप्तागिर मेहरबानी होऊन दिल्ही आसे. दिल्हे सारखे चालू द्यावे. या बाबे भोई ठेऊन आप्तागिरी चालवणे बदल को। म।।र खालसात रगट (रगबा?) जमीन पैकी ८– येकवीस हिजवर देसरी मापे कैली ८।= साहा सोलोली हिजवर मोकरार करून इनामपत्र सादर आसे. सदरहू विसाचे शेत वंशपरंपरा अनुभऊन पाटीलकी वृत्ती सुखरूप अनुभऊन असीजे. लेहून दिल्ह पत्र सही त्याबाबे तुजपासून नजर रु० ३५० साडेतीनशेहे कबूल करून इनामपत्र सादर आसे. वृत्ती भोगवटा करून सुखी असीजे. ता. २६ माहे जिल्काद.

मो।। असे.

---

दि. ९–९–१७६०

**क्रमांक : १५२**

सुमराव शिंदे शिंदे मनोळीकर यांचे निधन झाल्याने, त्यांचा संरंजाम राणोजी शिंदे यांच्याकडे करार करून देण्यात आला, त्याचा तपशील ह्या कागदात आहे.

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राज-

श्री लक्ष्मण कोनेर स्वामी गोसावी यास

पो।। बाळाजी बाजीराव प्रधान (न)मस्कार विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे. विशेष सुभराव सिंदे मनोळीकर यास सरंजाम तुमच्या तालुक्यात नेमून दिल्हा होता. त्यास ते मृत्य पावले. स।। त्याजकडील सरंजाम दूर करून हाली साल मजकूर पासून राजश्री राणोजी सिंदे याजकडे सरंजाम पेशजी प्रमाणे करार करून दिल्हा असे.

रो

१००० पो रायर हुबळी पैकी
५००० पो लखमेश्वर पै।।
५२०० पो कितूर मामल हुबळी
पै मुकासबाव
१२५० पो मुलगुंद पै।।
२५० नांगनूर ता + + + + +
फुटगाव पै।। रो

१३०००

यकूण तेरा हजार रुपयाचा सरंजाम सदरहू प्रो करार करून तुम्हास सनद सादर केली असे. तरी या प्रमाणे सरंजाम म।।र निलेकडे चालवणे. सदरहूप्रमाणे सरंजामाचा यैवज माहालामध्ये देहवार देखील कमते सुधा नेमून देणे. माहाली फड परमास सुदामत चालत आली असेल त्या प्रो चालवणे. र।। छ २८ मोहरम सु।। ईहिदे सितैन मया व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

**क्रमांक : १५३** **दि. ११-११-१७६०**

कर्यात नेसरीचा देशपांडे निळो विरुपाक्ष याने दत्तक पुत्र घेतला होता. परंतु तो कायदेशीर नाही असा आक्षेप घेऊन कापशीकर देशपांडे यानी नेसरीच्या देशपांडे वतनावर आपला हक्क सांगितला. तो पंचायतीच्या मते खोटा ठरल्यावर संभाजी दुसरे यानी लक्ष्मण नीळकंठ देशपांडे, दत्तक पुत्र निळो विरुपाक्ष याच्या नावे सदर्हू वतन करून दिले.

स्वस्तिश्री राज्याभिषक शके ८७ विक्रमनाम संवत्सर कार्तीक शुध चथुर्थी भौमवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी लक्षुमण नीलकंठ देशपांडे कर्यात नेसरी गोत्र काश्यप यासी दिल्हे

वतनपत्र येसेजे. तुमचेविसी राजश्री नरसिंगराव सिंदे याणी करवीरचे मुकामी स्वामी संनिध विनंती केली की कर्यात मजकूरचे देशपांडे निळो विरुपाक्ष होते. त्याचे पोटी पुत्र संतान नव्हते. त्याचा अंतीकाल समीप आला ते समई त्याने नारो नरसिह आपला मुतालीक यासी पाटवून सरदेसाई निसबत येमाजी रुद्र देशमुख, वगैरे वतनदार यासी येकत्र करून सर्वांसंमते ,कबनूरकर देशपांडे हे निलो विरुपाक्ष याचे दशेतले त्याचे पुत्र हे यासी वोठेत घेतले. येसे आसता कापशीकर देशपांडे याणी वतनाबदल कटकट मांडिली आणि येक वर्ष पर्यंत आडथळा जाहला आहे. त्यास कापशीकरही आम्हाकडे आले होते. तेव्हा पंचाईतमते कबनूरकर घराणे याचे दशेतील आणि समयास समीप होते. या करीता यासी वोठेत घेतले. कापसीकरास कथला करावयासी संमध नाही, यैसे पंचाइत मते जाहाले. या करिता माहाराजानी यांचे वतन यासी करार करून देऊन भोगवटियासी पत्रे करून देविली पाहिजेत म्हणोन राच मशारनिलेनी विदीत केले. त्यावरून मनास आणिता तुम्ही वतनदार स्वामीच्या पायासी निष्टेने वर्तत आहा यास्तव स्वामी कृपाळु होऊन निळो विरुपाक्ष याणे पुत्र घेतला हे खरे जाणोन सदरहू कर्यात मजकूरचे वतन तुम्हास पूर्ववत प्रमाणे करार करून दिल्हे असे. तरी तुम्ही सदरहु वतन देशकुलकर्ण व गावकुलकर्ण पुरातन चालत असले त्याप्रमाणे तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन हाक ईनाम कानुकाईदे क॥ मजकूरी चालत आसतील त्या प्रमाणे आनभवित जाणे. वतनसंबंधे तुमचे माथा शेरणी रुपये २९० दोनसे णवद ठेविले असत. याचा वसूल हुजूर जाहाला. तुम्ही वतन आनभवित जाणे. जाणीजे. निदेश समक्ष.

तेरीख २ रबिलाकर

सू॥ इहीदे सितैन मया.

**क्रमांक : १५४** दि. ४-१२-१७६०

महाराणी जिजाबाई यांजकडून शिवराम भिकाजी देसाई नाडगौंड प्रांत रायबाग यास चोवीस गावची देशमुखी व नाडगौडकी इनाम.

श्रीमंत सकल सौभाग्यादिसंपन्न मातुश्री जिजाबाईसाहेब याणी राजश्री सिवराम भिकाजी देसाई नाडगोंडा प्रांत रायबाग यासी आज्ञा केली ऐसीजे. सु॥ इहीदे सीतैन मया अलफ. तुमचे वतन सरकारात आमोनत होते. हली तुम्हावरी साहेब कृपाळू होऊन 'देशमुखी व नाडगोंडकीचे हक इनाम व कायदे तुमचे तुम्हासी' दुमाला करून देऊन माहालांसी ताकीदी दिल्हया आहेत.

बी तपसील

| प्रांत कुंभोज | कसबे सिरोल | कसबे एकसंबे |
|---|---|---|
| १ कसबा | १ कसबा | १ कसबा |
| १ कवाटे | १ कुरुंदवाड | १ मौजे उमळवाड (?) |
| १ निंमे सिरगाव | १ सिरढोण | १ मौजे आकीवाट |
| १ हिंगणगाव | १ आर्जुनवाडा | १ सिरगाव |
| १ मौजे माले | १ मौजे नांदणी | १ मौजे भोज |
| १ कवटे सार | १ मौजे चिंचवड | १ तालवडा |
| १ मौजे कोरची | १ मौजे हेरवाड | १ मौजे दानवाड |
| ७ | १ मौजे जांभली | ७ |
| | १ मौजे तेरवाड | |
| | १० | |

१४ तेरीज

७ प्रा

७ प्रा

१४

२४

एकूण देहे चवीस येथील देशमुखी नाडगोंडी तुमचे तुम्हासी बर करार करून दिल्हे असेत. तरी सदरहू वतन तुम्ही पुत्रपौत्रादी अनभऊन सेवा करून सुखरुप राहणे. जाणीजे. २५ माहे रबिलाखर. लेखन सीमा.

---

क्रमांक : १५५ इ. स. १७६०–१७६१

मराठ्यांना कर्नाटकात ज्या संस्थानाकडून खंडणी मिळत असे, त्यापैकी काही संस्थांनची यादी.

ईहिदे सितैन मया कर्नाटकांतील खंडणीचे एक तक्ता आहे. त्यात खालील संस्थानच्या खंडण्या नमूद आहेत.

तालुका कनोल ( कर्नूल )

| | | |
|---|---|---|
| सं. सुरापूर | गुमनाड पाले (गार) | कोपल |
| ,, श्रीरंगपट्टण | केचनगुड | पुंगुनूर |
| ,, आर्काट | सालवाडगी (?) | कगोदी ? |
| ,, सातगड | होनगुपे | रायदुर्ग |
| ,, अंकूसगिरी | गुबी होसहली | चिकबाळापूर |
| ,, तावरगिरे | मौजे वडवठी ? | चित्रदुर्ग |
| ,, अंबूरगड | बल्हारी | सिरहट्टी वगैरे |
| ,, गुंतल | कनकगिरी | मनोली |
| ,, अनंतपूर | आनीहोसूर | चिकोडी |
| ,, हर्पनहली | हवेली विजापूर | ताडमरी |
| ,, टुकेशाहा डोंगर ? | बागलूर | सिरे (पाळेगार) |
| ,, दापनाईक पाले (गार) | तरीकरे | रत्नगिरी (सं.) |
| | | कोरटगिरे |
| | | नरीमले |
| | | पावागड |

---

**क्रमांक : १५६** दि. ०–१–१७६१

ताराबाई उत्तरेकडील राजकीय वर्तमान विचारतात. तरी आपण ते वरचेवर पाठवित जावे, अशी विनंती सातान्याहून माधवराव विश्वनाथ याने सदाशिवराव भाऊ याना पाठविलेल्या या पत्रात केली आहे.

श्री शंकर

श्रीमंत राजश्री ——— भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी विनंती सेवक माधवराव विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंती येथील कुशल ता। छ. जमादिलोवलपरियंत। मु।। सातारा स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. तीर्थस्वरुपी भेटीस बोलाविले म्हणून श्रीमंत राजश्री ––– नानासाहेब यांची आज्ञा घेऊन सप्तरिषीस आलो. स्वामीचे शेवेसी यावयाचा बहुत हेत होता परंतु श्रीमंतास शरीरी अनरोग्यता जाली येतनिमित्य तीर्थस्वरुप श्रीमंताचे भेटीस नगरास गेले. मजला येथील॰राजमंडलचे बंदोबस्तास ठेविले म्हणून. माझे राहणे जाले. मातुश्री ——— आईसाहेब राजकी वर्तमान हिंदुस्थानचे व मोगलाकडील वगैरे विचारित असतात. यैशास तीर्थस्वरुप येथे होते. तेव्हा त्यास आपण लिहीत होते. मजलाहि लिहिल्यास उपयोगीच पडेल. तरी कृपा करून राजकी व हिंदुस्थानचे व मोगलाकडील बिघाड सलुखाचे वगैरे लिहून पाठवावयाविसी आज्ञापिले पाहिजे. बहुत दिवस जाले शेवकाचा परामर्श न जाला, तेणेकरून चित्त सचित आहे. सर्वस्वे आश्रा आपले चरणाचा अन्य अवलंब किमपिही नाही. तरी सर्वस्वे कृपायुक्त पत्र प्रेषिणार व सर्व प्रकारे अंगीकार करणार स्वामी समर्थ असेत. संक्रमणप्रयुक्त सशर्करा तिल सेवेसी प्रेषिले आहेत. ते स्वीकारून उत्तर प्रेषिणी आज्ञापिणार स्वामी समर्थ असेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

क्रमांक : १५७ दि. ७–२–१७६१

राणोजी घोरपडे यांच्या हल्ल्यात देवगोंडा पाटील याने चांगली मदत केली ह्यास्तव जिवराव शिंदे हिमतबहादर यानी त्याला मौजे लिगनूर येथे पाच बिघे जमीन इनाम दिली.

श्री

शिका

आज्ञापत्र राजमान्य राजश्री जिवराव सिंदे हिंमतबाहादर ता॥ देवगोंडा बिन लिंगण पाटील मौजे लिंगनूर का॥ नुली सु॥ इहिदे सितैन मया अलफ. शके विक्रमनाम संवछरे दिनी दिल्हे वतनपत्र यसेजे. तू कसबे नूलचे मुकामी विनंती केली की आपण वतनदार. राजश्री राणोजी घोरपडे सेनापती याचे दावेमधे स्वहस्त मेहनत केली. आपणास नूतन इनाम देऊन उर्जित करावे म्हणोन अर्ज केलास. त्यावरून तू कार्याचा मर्दाना स्वामी शेवेशी येकनिष्ट जाणोन तुजवरी कृपालु होऊन मौजे म॥री नूतन इनाम काटी मूळ विसा पांडाच्या बिघाने जमीन ०५ पाच बिघे दिल्ही असे. अवल दुमसीम चतु:सीमा करून मो॥न घेणे. तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन सुखरूप राहणे. प्रति वर्षी नूतन पत्रांचा आक्षेप न कर्णे. या जमिनी-मध्ये तुमचे भाऊबंदास काही समंध नाही. तुमचे तुम्ही अनभवित जाणे. जाणिजे. छ १ माहे रजब.

---

क्रमांक : १५८ दि. २१–४–१७६१

कृष्णराव भगवंत अमात्य यांजकडून व्यंकटराव यादव यास तर्फ हवेली प्रांत कोल्हापूर येथील नाइकीचे वतन इनाम.

श्री रामचंद्र

म॥ अनाम व्यंकटराव यादव बिन द्वारकोजी यादव नाईक प॥ कोलापूर यास कृष्णराऊ भगवंत आमात्य हुकुमत-पन्हा सु॥ ईहिदे सितैत मया अलफ. तुम्ही करवीरचे

मुकामी येऊन विनंती केली जे माहाराज राजश्री ——— स्वामीनी कृपाळू होऊन आपणास त॥ हवेली प्रां कोलापूर येथील नाईकाचे वतन करून दिल्हे आहे. त्याप्रमाणे साहेबी कृपा करून आपले पत्र भोगवटियास करून द्यावे म्हणोन. त्यावरून मनास आणिता तुम्ही व तुमचे वडिलाही स्वामी सेवा बहुत निष्ठेने केली व हाली करीत आहा. तुमचे चालवणे आवश्यक जाणून नाईकीचे वतन करार करून दिल्हे आसे. तरी राजपत्राप्रमाणे वतनास इनाम व हक कानू काइदे करार केले आसेत. वतनाची सेवा करून तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन सुखरूप राहाणे. सदरहू वतनास तिजाई माफ केली आसे. जाणिजे. छ. १५ माहे रमजान निदेश समक्ष.

लेखना
वधी मु
द्रा

बार.

---

क्रमांक : १५९

दि २१-४-१७६१.

द्वारकोजी यादव याने नरसोजी पाटील याच्या पाटीलकीची तिसरी तक्षिम विकत घेतली होती. तें वतन चालवावे अशी विनंती द्वारकोजी यादवाचा भाऊ डोंगरोजी यादव याने कृष्णराव अमात्य याना केली असता त्यानी ती मंजूर केली.

श्री रामचंद्र

श्री सितारा
म चरण

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री कृष्णराऊपंडित आमात्य हुकूमत पन्हा. ताहां डोंगरोजी बिन कृष्णाजी

यादव पाटील मौजे बावडे क।। हवेली प्र।। कोल्हापूर सु।। ईहिदे सितैन मया अलफ. तुम्ही करवीरचे मुकामी विनंति केली जे नरसोजी बिन मुरारजी पाटील पोवार यांचे वतन मौजे म।।रचे पाटीलकीचे तिसरी तक्षीम त्यास कर्जवाम बहुत जाले यामुळे त्याणे आपले तक्षिमेचा वंत[1] हर कोणास क्रय करून कर्ज फारीक करावे या विचारे त्याणे आपले भाऊबंद यांस विचारले जे आपले विभागाचे वतन तुम्ही घेऊन आपणास कर्जापासून मुक्त करणे. तेव्हा भाऊबंद बोलिले जे आम्हास रुपये द्यावया ताखत नाही. तू आपली तक्षीम कोणी येईल त्यास देऊन आपले कर्ज वारणे. तेव्हां तो फिरत आपणाकडे आला. ते समई आपले वडील बंधू द्वारकोजी यादव याणी प्रांत मजकूरचे देसाई देशपांडे व नाईकवाडी कसबे म।।रचे वतनदार व भोवर गावचे वतनदार मेळऊन नरसोजी पाटील यांचे कर्ज वारून त्याचे स्वसंतोषे त्याच्या भाऊबंदाचे विद्यमाने क्रयपत्र करून घेतले आणि श्रीमंत माहाराज राजश्री ——— स्वामीची पत्रे करून घेतली. त्याप्रमाणे साहेबाचे पत्र भोगवटियास पाहिजे म्हणून पूर्वी श्रीमंत राजश्री ——— राव आमात्य यांस विनंती करून पत्र करून घेतले होते ते गैरविलेस पडिले. याजस्तव हाली विनंती केली आहे म्हणोन. त्यावरून मनास आणिता पेशजीपासून रा।। द्वारकोजी यादव व तुम्ही स्वामी सेवा करून येकनिष्टेने वर्तत आला. तुमचे चालवणे आवश्यक जाणून पाटीलकीचे तिसरी तक्षीम वतन व हक कानू काइदे इनाम व आर्जी इनाम राजपत्राप्रमाणे चालत आले आहे त्याप्रमाणे आपले तक्षिमेचे वतन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभऊन सुखरूप राहाणें. तुमच्या वतनाच्या वंतास व आर्जी इनामास इनाम तिजाई माफ केली असे. जाणिजे. छ. १५ माहे रमजान निदेश समक्ष.

मुद्रा

---

१ वंत = वाटणी, हिस्सा, भाग.

**क्रमांक : १६०**

दि. १६-७-१७६१

करवीर राज्यास वारस जन्मास आल्याची बातमी कळल्याने गोव्याच्या व्हाइसरॉयने राणी जिजाबाई याना आपल्या राज्य सचिवामार्फत पाठविलेला अभिनंदनपर संदेश.

राणी जिजाबाई यांचे सरदार रामजीराव घोरपडे यांना गोव्याच्या राज्य सचिवाचे पत्र.

आपणाला बातमी कळलीच असेल की, या प्रदेशावरील दैवी अनुग्रहानुसार कौंट व्हाइसरॉय याना या राज्याची सूत्रे हाती घेण्याची परवानगी मिळाली आहे. त्यानी करवीर राज्याचा वारस जन्मास आल्याबद्दल आनंद व्यक्त करून राणी जिजाबाई याना अभिनंदनपर पत्र लिहिण्याचा निर्णय घेतला. तसेच हे पत्र राणी जिजाबाई यांच्याकडे पोहोचते व्हावे म्हणून ते आपणाकडे पाठविण्याचा हुकूम त्यानी मला केला. तरी आपण हे पत्र राणी जिजाबाई याना पोहोचते करून त्याना मेहेरबान व्हाइसरॉय साहेब यांची सदिच्छा कळवावी. ईश्वर आपणास सुखी ठेवो.[1]

गोवा, दि. १६ जुलै १७६१
वाल्शियाँर झुजे व्हाज द काव्हाल्यु.

---

**क्रमांक : १६१**

दि. १६-७-१७६१

करवीरचे संभाजी राजे यांच्या निधनाबद्दल गोव्याच्या व्हाइसरॉयने राणी जिजाबाई याना पाठविलेला दुखवट्याचा संदेश.

गोव्याच्या व्हाइसरॉयचें संभाजी राजे यांच्या विधवा राणीस पत्र.

श्रेष्ठतम महाराजांच्या शोचनीय निधनाची वार्ता ऐकून कमालीचे दुःख झाले. या वैभवशाली राज्याचे व त्यांचे उत्कट असे मैत्रीचे संबंध होते. आतां ज्या अर्थी ईश कृपेने या राज्याची सूत्रे माझ्या हातीं आली आहेत त्या अर्थी या प्रदेशाचे आपणाशी पूर्वीसारखेच संबंध राहतील

१ हे पत्र गोवा पुराभिलेख संग्रहालयातील Livro dos Reis Vizinhos Fls 32 v वरून घेतले आहे.

हे आपणास कळविण्याची मी परवानगी घेतो. आपणाकडूनहि मी अशाच सदिच्छेची व चांगुलपणाची अपेक्षा करतो.

उभय पक्षांचे पूर्वीचे संबंध घनिष्ठ व्हावेत अशी इच्छा व्यक्त करून हे पत्र संपवितो.'

गोवा, १६ जुलै १७६१
कौंट द एगा.

---

दि. २९-११-१७६१

**क्रमांक : १६२**

रघुनाथ बाजीराव हे निजामावरील स्वारीत असता, अण्णाजी नाईक साठम हे त्याना ससैन्य घेऊन मिळाले नाहीत म्हणून त्यानी अण्णाजी नाईक साठम याना हे खरमरीत पत्र लिहिले. 'तीन हजार रुपयाचा गाव तुम्हाकडे आहे' असा पत्रात उल्लेख आहे.

श्री

राजश्री अनाजी नाईक साठम गोसावी
यांस

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य
स्ने॥ रघुनाथ बाजीराव आशीर्वाद. सुरू सन इसन्ने शितेन मया व अलफ. खासा स्वारी मोंगलावर दर मजल चालली त्याचा मुकाबिला व्हावयास बहुत तफावत राहिली नाही. असे असोन तुम्ही घरीच राहिला, येत नाही. तेव्हा परिछिन्न कार्याची तसे. तीन हजार रुपयाचा गाव तुम्हाकडे आहे. चाकरीच्या समई हुजूर येत नाही हे उत्तम की काय ? हल्ली या उपरी पत्र दर्शनी निघोन येणे. विलंब केलिया मसाला केला जाईल. स्पष्ट समजोन जलद येणे. जाणिजे. छ. १ जमादिलावर. बहुत काय लिहिणे.

लेखन
सीमा

सिका

---

१. हे पत्र गोवा पुराभिलेख संग्रहालयातील Livro Dos Reis Vizinhos, Fls 32 v वरून घेतले आहे.

क्रमांक : १६३ दि. ३-१२-१७६१

यज्ञेश्वर विनायेक दीक्षित आठले यास मौजे भणग हा गाव इनाम दिला आहे म्हणून ताराबाईंचे देशाधिकारी व लेखक त।। मेढे यांना आज्ञापत्र.

ताराबाई ता. १० डिसेंबर १७६१ रोजी वारली. त्या आधी सातच दिवस ही सनद तिने दिलेली आहे. यावरून शेवटपर्यंत ती कारभार करीत होती हे दिसून येते.

अस्सल सनद

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी त।। मेढे यासी आज्ञा केली यैसीजे. वेदशास्त्र संपन्न राजश्री यज्ञेश्वर बिन विनायेक दीक्षित उपनाम आठले देवळेकर गोत्र काश्यप सूत्र आश्वलायेन वास्तव्य क्षेत्र श्री ———— हे भले ब्राम्हण सत्पात्र कुटुंबवछल यांचे चालविलिया श्रेयस्कर जाणोन साहेब यांजवर कृपालु होऊन वृषनाम संवत्सरी कार्तिक शुध पौर्णिमेस चंद्रग्रहण राहु पर्वी सुवर्णसहित धारादत इनाम मौजे भणंग त।। मजकूर हा गांव पेशजीचे मोकासी यांजकडून दूर करून हाली यांस स्वराज्य व मोगलाई येकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई व चवथाई व बाबती व सरदेशमुखी व सावोत्रा व नाडगौडी व धारकरी पाटील कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी जळ तरु तृण काष्ठ पाषाणं निधिनिक्षेप सहित खेरीज हकदार व कदीम इनामदार व सरकारचे कुरण खेरीज करून वंशपरंपरेने धारादत्त इनाम हुजरुन करार करून दिल्हा असे. तर तुम्ही जमीनदारास ताकीद करून मौजे मा।।र चतु:सीमापूर्वक पूर्वं मर्यादेप्रमाणे याचे दुमाला करून यास व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने सदरहुप्रमाणे मौजे मजकूर इनाम चालवणे. प्रतिवर्शी नवीन पत्राचा आक्षेप न कर्णे. या पत्राची प्रति लेहून घेऊन हे आस्सल पत्र भोगवटी-यास परतोन वेदमूर्तीजवळ देणे. जाणिजे. छ. ५. माहे जमादिलावल सु।। इसनें सितैम मया आलफ. वृषा संवत्सरे.

लेखनावधि

# सूची

( आकडे पृष्ठांचे आहेत )

## आ



## इ

## घ



## च

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | २२ | बाबल[१] | बावल |
| १२ | ७ | रामचंद्र बावा | श्रीमंत बावा |
| १७ | १ | ७५१ | १७५१ |
| ३० | ४ | मार्चेबंदी | मोर्चेबंदी |
| ४६ | ७ | उमयतास | उभयतास |
| ५७ | १९ | त्यावरूर | त्यावरून |
| ७४ | २१ | करतो | मारतो |
| ८० | २१ | मेद | भेद |
| ८४ | १० | इतला | इजला |
| ९१ | ६ | खयसैन | खमसैन |
| १५५ | २४ | मौ | मौ ।। |
| १६६ | ३ | कमलालाकर | कमलाकर |
| १७६ | १६ | विळवडे | वळिवडे |
| २०३ | १ | घोंडपडे | घोरपडे |
| २१३ | १३ | शिंदे शिंदे | शिंदे |